# HISTORY OF MODERN INDIA.

# BRITISH PERIOD,

## PART I.

---

**SECOND EDITION.**

---

*By*

G. S. SARDESAI, B. A., BARODA.

---

PUBLISHED BY

**GANESH MAHADEO & Co.**

621, Girgaon Road, Bombay No. 4.

---

**1923.**

---

Price Rs. 3-8-0.

हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास.

# ब्रिटिश रियासत,

( आवृत्ति दुसरी. )

---

लेखक

गोविंद सखाराम सरदेसाई, बी. ए., बडोदें.

---

प्रकाशक

गणेश महादेव आणि कंपनी,

६२१ गिरगांव रोड, मुंबई नं. ४.

सन १९२३.

किंमत साडेतीन रुपये.

# प्रस्तावना

## १ ब्रिटिश रियासत पूर्वार्ध, नवीन आवृत्ति.

ईशेच्छेनें हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास तयार करण्याचें काम मीं हातीं घेतलें, त्याचा परिपोष आज पावेतों कसा झाला हें वाचकांस माहीत आहेच. **मुसलमानी रियासत** पूर्ण झाली असून, **मराठी रियासतीचा** पल्ला पानिपतअखेर आला आहे. मध्यंतरीं **ब्रिटिश रियासतीचा पूर्वार्ध** प्रसिद्ध केला त्याची आवृत्ति संपून बरींच वर्षे झालीं. हल्लीं ऐतिहासिक संशोधन पुष्कळ चालत असल्यामुळें, नवीन आवृत्ति काढणें झाल्यास, केवळ जुनीचाच अनुवाद करून भागत नाहीं. पहिल्या आवृत्तीचें अनेकांनीं परीक्षण करून गुणदोष दाखविले; कित्येकांनीं खासगी रीतीनेंही उपयुक्त सूचना केल्या; कांहीं मुद्यांवर नवीन माहिती व चर्चा प्रसिद्ध झाली. विद्यालयांचे अभ्यासक्रमही आतां पुष्कळसे बदलून स्वभाषेंतून शिक्षण देण्याकडे प्रवृत्ति झाली आहे. तसेंच महायुद्धानें भूतलावर नवीन जागृति होऊन कांहीं बाबतींत पूर्वीची विवेचनदृष्टि बदलली आहे. हीं सर्व कारणें लक्षांत घेऊन सर्वसंग्राहक दृष्टीनें ब्रिटिश रियासतीची ही नवीन आवृत्ति तयार करून वाचकांस सादर करीत आहें.

## २ प्रस्तुत समयीं या पुस्तकाची जरूर.

पहिली आवृत्ति लवकरच खलास झाली यावरून या पुस्तकाचा उपयोग वाचकांस चांगला झाला असें मानण्यास हरकत नाहीं. हल्लींच्या स्थितींत तर सर्व विद्यार्थ्यांस व सामान्य वाचकांसही हा विषय विशेष जरुरीचा आहे. आपल्या या भरतभूमीचें स्वामित्व पाश्चात्यांच्या हातांत जाणें हा जगाच्या इतिहासांतील एक अत्यंत महत्त्वाचा प्रसंग होय. पूर्वी आशिया व यूरोप या दोन खंडांचा संबंध कसा होता आणि पाश्चात्यांच्या उद्योगानें या संबंधाचें स्वरूप अर्वाचीन काळीं कसें बदललें, या गोष्टी आज प्रत्येक राष्ट्राभिमानी व्यक्तीनें समजून घेतल्या पाहिजेत. राज्यांच्या घडामोडींचें प्रधान कारण मनुष्याची धनतृष्णा होय. धनोत्पत्तीचें

बीज व्यापार असून, व्यापारामुळेंच आपल्या देशास पूर्वी ' सुवर्णभूमि—हें नांव प्राप्त झालें होतें. आपल्या इकडच्या व्यापार काबीज करण्यासाठींच पाश्चात्य राष्ट्रांत चढाओढ सुरू होऊन त्यांत हा देश अखेरीस ब्रिटिश सत्तेखालीं गेला. सबब ह्या व्यापाराची प्राक्कालीन घडामोड, तत्संबंधीं मध्यकालीन राष्ट्रांचे उद्योग, अर्वाचीन काळीं नौकानयनाचे साह्यानें पाश्चात्य राष्ट्रांनीं केलेले संचार, आणि शेवटीं ब्रिटिश राष्ट्रानें मिळविलेलें यश, इत्यादि अनेक विषयांचें विस्तृत व साधक बाधक विवेचन या पुस्तकांत केलें आहे, तें आजकालच्या आपल्या उदयेच्छु राष्ट्रास बोधप्रद झाल्याशिवाय राहणार नाहीं. या विषयावर इंग्रजींत लहान मोठे अनेक ग्रंथ असून ते भिन्न भिन्न दृष्टींनीं लिहिलेले आहेत. त्यांतील सारभूत अंश उपयोगाच्या दृष्टीनें निवडून त्याची स्वतंत्र व विवेचक रचना या पुस्तकांत केली आहे. कोणत्याही प्रसंगाचें वर्णन व त्याची चर्चा ह्या दोहोंच्या मिलाफानें पुस्तक होईल तितकें सुगम व मनोरंजक व्हावें, असा प्रयत्न केला आहे. आल्बुकर्क, सर टॉमस रो, सर जॉन चाइल्ड, डुप्ले, क्लाइव्ह, सिराजुद्दौला, इत्यादि अनेक व्यक्तींचीं मनोरंजक जीवनचरित्रें व स्वभावविशेष यांत वाचकांस पाहण्यास मिळतील. ईस्ट इंडिया कंपनीची रचना, सुरत, मद्रास, मुंबई, कलकत्ता इत्यादि ठिकाणीं इंग्रजांनीं केलेला प्रवेश, राज्यस्थापनेच्या नादांत इंग्रजफ्रेंचांनीं मांडिलेले युद्धप्रसंग, आणि त्यांतच उद्भवलेले कलकत्याच्या अंधारकोठडीसारखे प्रकार, इत्यादि विषय कादंबरीसारखे चटकदार वाटतील. सारांश, व्यापाराच्या योगानें धनसंचय, धनसंचयापासून राज्यलाभ, आणि राज्यविस्तारानें पुनरपि व्यापारवृद्धि, असा हा अन्योन्यावलंब आज सुद्धां आपणांस बोधप्रद असून, या विषयाचा ज्यास्त अभ्यास करण्यास या पुस्तकापासून वाचकांस स्फूर्ति उत्पन्न होईल, अशी आशा आहे.

## २ पूर्वार्ध व उत्तरार्ध यांचा विभाग.

हिंदुस्थानांत ब्रिटिश राज्यस्थापनेची सुरुवात सामान्यतः स. १७५७तील प्लासीच्या लढाईपासून धरितात. तेव्हांपासून स. १८५८ तील राणीच्या जाहीरनाम्यापर्यंतच्या शंभर वर्षांत तें काम पुरें होऊन पुढें येथील राज्यकारभारास

निराळें वळण लागलें. म्हणजे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे ब्रिटिश रियासतीचे दोन भाग पाडणें झाल्यास, प्लासीची लढाई हीच त्याची विभाजक मर्यादा घ्यावी लागते. या योजनेस अनुसरून पूर्वार्धाचा हा भाग प्लासीच्या लढाईशीं तोडिला आहे. प्रथमावृत्तींत सन १७७३तील रेग्युलेटिंग ॲक्टापर्यंतचा विषय दिला होता. अर्थात् स. १७५७ च्या पुढील राहिलेला भाग व त्यापुढचा स. १८५८ पर्यंतचा एकंदर विषय सवडीप्रमाणें लवकरच वाचकांस देऊन अंगीकृत कार्य पुरें करण्याचा संकल्प आहे. त्या संबंधानें वाचकां- इतकीच मलाही उत्कंठा आहे एवढें सांगितलें म्हणजे पुरे.

## ४ नकाशे, चित्रें वगैरे.

प्राचीन व्यापाराचे मार्ग, ख्रिस्ती–मुसलमानांचीं धर्मयुद्धें, कोलंबस, वास्को ड गामा वगैरेंचे शोध, मॅगेलनची पृथ्वीप्रदक्षिणा, आणि आफ्रिकेपासून जपानपावेतोंच्या विस्तृत समुद्रकिनाऱ्यांवर झालेले पाश्चात्यांचे संचार व झगडे, इत्यादि प्रकार नीट समजण्यास पृथ्वीचा नकाशा वाचकांचे दृष्टीसमोर अवश्य पाहिजे. सबब असा एक नकाशा पुस्तकास जोडिला असून त्यांत सर्व स्थलांचा समावेश अशक्य झाल्यामुळें, निरनिराळे खंड पाडून, त्यांतील स्थलांच्या याद्या सोबत दिल्या आहेत, त्यांचा अभ्यास- कांस चांगला उपयोग होईल. तसेंच पोर्तुगीज, डच, फ्रेंच व ब्रिटिश या चार राष्ट्रांच्या चार ऐतिहासिक व्यक्तींचीं चित्रेंही पुस्तकांत दिलीं आहेत. नकाशे व चित्रें भरपूर देऊन पुस्तक सुंदर करण्याविषयीं कितीही हाव माझ्या मनांत असली, तरी आपली एकंदरीत निर्धन स्थिति ध्यानांत आणून, वाचकांनीं ही अल्प सेवा गोड करून घ्यावी, अशी त्यांस सविनय प्रार्थना आहे. आधारभूत ग्रंथांची यादी पृथक् दिली आहे त्या सर्व ग्रंथ- कर्त्यांचा मी अत्यंत आभारी आहें.

बडोदें, ता. १ एप्रिल १९२३. गोविंद सखाराम सरदेसाई.

# शुद्धिपत्र.



अनेक कारणांमुळें कांहीं चुका पुस्तकांत राहिल्या आहेत. पैकीं विशेष महत्त्वाच्या तेवढ्याच खालीं दाखविल्या असून, त्या प्रथमच वाचकांनीं दुरुस्त कराव्या.

| पृ. | ओ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| १०१ | ११ | कानपूर | काननूर. |
| १०३ | खा. ७ | १५९५ | १४९५ |
| १०६ | ६ | १५०९ | १५१० |
| १०९ | १४ | १५३० | १५१० |
| ११९ | खा. ३ | हुबळीस | हुगळीस. |
| १२४ | ७ | १५६५ | १५५५ |
| १२५ | ४ | कालिकोट | तालिकोट. |
| २५६ | ९ | फिरविला | फिरवावा. |
| २६८ | १९ | १६९१ | १६११ |
| २७० | १४ | १६६९ | १६३९ |
| ४४५ | ६ | कर्नेल | कर्नूल |
| ४७४ | खा. १ | मद्रास | सद्रास |
| ५४५ | नकाशा | चंद्रनगर० हुगळीच्या दक्षिणेस असी हुगळी नदीच्या पूर्व तीरावर. | |

# अनुक्रमणिका.

## प्रकरण पांचवें—पोर्तुगीझ राज्याची अमदानी. ११६–१३२



## प्रकरण सहावें—पोर्तुगीझ राज्याची गुणदोषचर्चा. १३२–१६१



## प्रकरण सातवें—डच लोकांची हकीकत.१६१–१८६



## प्रकरण आठवें—ईस्ट-इंडिया—कंपनीची स्थापना. १८७-२२४

## प्रकरण नववें-पृथक् सफरी व सर टॉमस रो. २२४-२५७



## प्रकरण दहावें-कंपनीचें संकटमय अर्धशतक. २५७--२९२



## प्रकरण अकरावें -मुंबईची स्थापना व भरभराट. २९२-३३१



## प्रकरण बारावें-राज्यस्थापनेची हाव. ३३१-३५७



## प्रकरण तेरावें-दोन विरुद्ध पक्ष व तडजोड ३५८-३८०.

## प्रकरण चौदावें—हिंदुस्थानांत फ्रेंचांचा उद्योग. ३८१—३९५



## प्रकरण पंधरावें—कर्नाटकच्या रणभूमीवरील तयारी ३९६—४१२



## प्रकरण सोळावें—कर्नाटकांतलें पहिलें युद्ध. ४१३—४२९



## प्रकरण सतरावें—कर्नाटकांतील दुसरें युद्ध. ४३०—४६३



## प्रकरण अठरावें—फ्रेंच, निजाम व मराठे. ४६३—४८६

## प्रकरण एकोणिसावें--कर्नाटकांतील तिसरें युद्ध. ४८७--५०८



## प्रकरण विसावें--सिराजुद्दौला व बंगाल. ५०९--५४९



## प्रकरण एकविसावें--प्लासी व बंगालचा ग्रास. ५५०--५८०



---



---

# यादी.

## १ मुख्य आधारभूत पुस्तकांची.

1 Robertson's Historical Disquisition of Ancient Indian Trade.
2 Danvers' History of the Portuguese in India.
3 Birdwood's Report on the Records of the India office.
4 Birdwood's First Letter-book of the East India Co.
5 Birdwood and Forster's East India Co.'s Letters, Vols, I-VI.
6 Imperial gazetteer of India. Vol. II.
7 Beckles Willson's Ledger and Sword.
8 Forster's Embassy of Sir Thomas Roe.
9 Vincent Smith's Early History of India.
10 Logan's Malabar, Vol. I., 1887.
11 Gerson Da Cunha's Origin of Bombay.
12 Rulers of India Series,-Albuquerque.
13 Sir Alfred Lyall's British Dominion in India.
14 Malleson's History of the French in India.
15 Malleson's Lord Clive, Founders of the Indian Empire.
16 Hill's Records of Bengal, 1757, Vols. I to III.
17 Wilson's Early Annals of Bengal.
18 Stewart's History of Bengal.
19 Plassey, by A. K. Mitra, Modern Review, July 1907.
20 Orme's war of the Coromandel.
21 Anderson's History of the English in Western India.

---

## २ कारणपरत्वें उपयोग केलेल्या पुस्तकांची.


1. Grant Duff's History of the Marathas.
2. Cunningham's Growth of English Industry and Commerce.
3. Thornton's History of the East India Company.
4. Macpherson's History and Management of the East I. Co.
5. Kaye's Administration of the East India Company.
6. Wheeler's Early Records of British India.
7. Wheeler's Short History of India.
8. Meadows Taylor's Students' History of India.
9. Gibbin's History of Commerce in Europe.
10. Sir Alfred Lyall's Colonies & Chartered Companies, ( Times of India, June 9-1898. )
11. Caraccioli's Life of Clive, Vols. I to IV.
12. Private Diary of Ananda Ranga Pillai, Dupliex'Dubhas.
13. Vincent's Ancients in the Indian Ocean.
14. Peter Auber's Rise & Progress of Brit, Power in India.
15. Synge's Story of the World, Vols. I to V.
16. Bruce's Annals of British Commerce in Bengal.
17. Mahon's Influence of Sea-Power in History.
18. Memoirs of the Revolution in Bengal (Annonymous),
19. Brigg's Nizam.
20. Myer's Genral History.

शिवाय मराठींतील ऐतिहासिक साहित्य.

श्री.

## हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास.

# ब्रिटिश रियासत.

## प्रकरण पहिलें.

### प्राक्कालीन व्यापाराचा घडामोड.

| | |
|---|---|
| १ प्राचीन धनसंपन्नतेचें बीज. | २ प्राचीन व्यापाराचे हमरस्ते. |
| ३ प्राच्य जिनसांचा युरोपांत प्रवेश. | ४ मिसर व फिनिशियन राष्ट्रांचा व्यापार. |
| ५ यहुदी लोकांचा व्यापार. | ६ सिकंदरबादशहाचें व्यापारी धोरण. |
| ७ मिसरचा टॉलमी फिलाडेल्फस. | ८ रोमन लोकांचे प्रयत्न. |
| ९ इराण. | १० आरब मुसलमानांचा उद्योग. |

**१. प्राचीन धनसंपन्नतेचें बीज.**—ईशेच्छेनें यूरोप व आशिया ह्या दोन खंडांचा संबंध अलीकडे कित्येक शतकें उत्तरोत्तर निकट होत चालला आहे; आणि ह्या संबंधाचें पर्यवसान पुढें कसें होणार ह्या प्रश्नाकडे सर्व राष्ट्रांतील शहाण्यांचें लक्ष लागून राहिलें आहे. अशा प्रसंगीं आशिया व यूरोप ह्यांचा पूर्वसंबंध कसा होता, हें समजणें अगत्याचें असून त्यांतच हिंदुस्थानांतील ब्रिटिश राज्यस्थापनेचा इतिहास येतो.

यूरोप व आशिया ह्या दोन खंडांमध्यें फार प्राचीन काळापासून दळणवळण चालू होतें. आशियाखंड हें प्राचीन काळीं अखिल सुधारणेचें आदिस्थान असून, विद्या, कला, व्यापार, तत्वज्ञान वगैरे हरएक विषयाचें ज्ञान युरोपास आशियाखंडापासून मिळत असे. त्यांतही व्यापारासंबंधानें पाहावयाचें तर आशियाखंडावांचून यूरोपाचें पावलोपावलीं नडत असे. कारण नेहमींच्या उपयोगाचे बरेच जिन्नस युरोपांत आशियाखंडांतून जात. हिंदुस्थान, चीन वगैरे आशियाखंडांतील पुरातन राष्ट्रें सुसमृद्ध असून त्यांजकडूनच पाश्चात्य राष्ट्रांस निर्वाहाचे जिन्नस प्राप्त होत.

पाश्चात्य राष्ट्रांच्या अर्वाचीन इतिहासाचें सूक्ष्म अवलोकन केलें असतां असें दिसून येतें, कीं स्पानिश, पोर्तुगीझ, डच, फ्रेंच, ब्रिटिश, जर्मन वगैरे अर्वाचीन राष्ट्रें व्यापारावर सधन झालीं; आणि सधन झाल्यामुळें त्यांची राज्यसत्ता वाढली. ह्मणजे ज्या राष्ट्राच्या हातांत जगाच्या व्यापाराची घडामोड ज्यास्त, तें राष्ट्र ज्यास्त सधन, आणि जें राष्ट्र सधन त्याची राज्यसत्ताही ज्यास्त. हा प्रकार अर्वाचीन इतिहासांत जसा स्पष्ट दिसून येतो, तसाच, किंबहुना त्याहून ज्यास्त, प्राचीन इतिहासांतही दिसून येतो. मात्र प्राचीन इतिहासाची माहिती आपणांस विशेष नसल्यामुळें ही गोष्ट आपल्या दृष्टीसमोर तितकी स्पष्ट येत नाहीं. लोकांस उपयोगी पडणारा कच्चा माल देशांत उत्पन्न झाला पाहिजे, आणि त्या मालापासून खपाचे जिन्नस तयार करण्याचें कौशल्य लोकांस ठाऊक पाहिजे. ह्या दोन गोष्टी असल्या, म्हणजे हल्लीं राष्ट्रास निर्वाहासंबंधानें दुसऱ्यावर अवलंबून राहावें लागत नाहीं. इतकेंच नाहीं, तर आपल्याकडचा फाजील माल दुसऱ्यांस विकून, त्याजबद्दल वाटेल ती किंमत मागतां येते. प्राचीन काळच्या राष्ट्रांचाही असाच प्रकार होता. हिंदुस्थान, चीन वगैरे देश पूर्वी धनसंपन्न असण्याचें कारण हेंच. हिंदुस्थानची हवा हरएक पिकास माफक असून जमीन सुपीक असल्यामुळें पृथ्वीवर दुसरे कोठेंही उत्पन्न होणारे बहुतेक पदार्थ येथें पिकूं शकतात. ह्यामुळें येथलि लोकांस निर्वाहासाठीं दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहण्याची पाळी कधींच येत नसे. तसेंच

उत्तम कारागिरी व कौशल्य ह्यांचा उदयही अगदीं प्राचीन काळीं ह्या देशांत झाला होता, हें आमच्या पुरातन ग्रंथांवरून अनेक विद्वानांनीं सिद्ध केलें आहे. अर्थात् पृथ्वीवरील इतर राष्ट्रें हीन स्थितींत असतां हा देश अत्यंत भरभराटींत होता. आमचा स्वतःचा निर्वाह येथील उत्पन्नावर होऊन, दुसऱ्या अनेक राष्ट्रांचा निर्वाहही येथच्या मालावर अवलंबून असे. प्राचीन काळीं पूर्व, दक्षिण, पश्चिम व उत्तर ह्या चारही दिशांकडे दूरपर्यंत ह्या देशाचें दळणवळण बाह्य देशांशीं चालू होतें. आग्नेयीकडील बेटें, तसेंच पूर्वेकडील चीन, जपान वगैरे देश इत्यादि ठिकाणीं हिंदुस्थानचा व्यापार प्राचीन काळीं चालू होता. बुद्धधर्माचा प्रसारही ह्याच अनुरोधानें झालेला आहे. तथापि आज आपण पश्चिमेकडील अतिदूरच्या एका बलवान् राष्ट्राच्या ताब्यांत गेलों असून, ही प्रचंड राज्यक्रान्ति कशी घडून आली हें सांगण्याचें ह्या पुस्तकाचें मुख्य प्रयोजन असल्यामुळें, व्यापाराच्या कामांत हिंदुस्थानच्या पश्चिमेकडील राष्ट्रांची, व विशेषतः युरोपीय राष्ट्रांची स्थिति पूर्वीं कोणत्या प्रकारची होती आणि त्यांचा ह्या देशाशीं संबंध कसकसा जडत गेला, हें प्रथम सांगितलें पाहिजे.

हिंदुस्थान व युरोपियन राष्ट्रें यांजमधील व्यापार अगदीं प्राचीन काळीं बहुतेक जमिनीवरून व कांहीं अंशीं किनाऱ्याकिनाऱ्यानें चालू असे. त्या वेळीं नौकाप्रवास जरी बऱ्याच लोकांस माहीत होता, तरी हल्लींच्याप्रमाणें किनारा सोडून भरसमुद्रांत जाण्यास त्या वेळचीं गलबतें धजत नसत. हिंदुस्थानांतून बाहेर पडून युरोपांत उतरण्याचे ह्या व्यापाराचे हमरस्ते ठरलेले होते. ह्या रस्त्यांचें महत्त्व त्या वेळीं अतोनात असे. त्या ठरीव रस्त्यांनीं उंटांचे व इतर जनावरांचे मोठमोठे तांडे व्यापारी माल येथून दूर देशीं नेऊन पोंचवीत. ह्या व्यापाराची नेआण ताब्यांत ठेवण्यासाठीं तत्कालीन राष्ट्रांत मोठी स्पर्धा चालू असून, हल्लींप्रमाणेंच त्यांची किफायत व्यापारावर अवलंबून असे. यूरोपसारख्या अफाट प्रदेशांतील लोकांस नेहमींच्या जरुरीचा व ऐषआरामाचा माल पुरविणें म्हणजे कांहीं लहानसहान फायद्याची गोष्ट नव्हती. ग्रीक,

रोमन, मिसर, फिनिशियन, आसीरियन, हिब्रू वगैरे अनेक पराक्रमी राष्ट्रें ह्याच पैदासीकरितां झगडत होतीं. ह्या झगड्यांचा उल्लेख बायबल वगैरे पुस्तकांतून आढळतो. व्यापाराच्या हमरस्त्यांवर ज्या राष्ट्राचा ताबा, तें राष्ट्र भरभराटींत असे. चंगीझखान, तयमूरलंग वगैरे पराक्रमी पुरुषांचें लक्ष ह्या फायद्याकडेच होतें. सारांश, हल्लींप्रमाणेंच प्राचीन काळींही देशाची धनसंपन्नता व्यापाराच्या किफायतीवर अवलंबून असे.

२. **प्राचीन व्यापाराचे हमरस्ते**.—इंग्लंड देश पृथ्वीवरील भूप्रदेशाच्या मध्यावर व समशीतोष्ण कटिबंधांत आहे, ह्या दोन भूगोलिक कारणांचा फायदा त्या देशास मोठा होतो. तेथून दक्षिणेकडे व पूर्वेकडे किनाऱ्या किनाऱ्यानें येऊं लागलें, म्हणजे थेट चिनी समुद्रापर्यंत आठ दहा हजार मैलांचा समुद्रकिनारा लागतो. ह्या किनाऱ्यावर व्यापाराचीं मोठमोठीं अनेक बंदरें असून, निरनिराळ्या हवेंत उत्पन्न होणाऱ्या अनेक उपयुक्त जिनसांची नेआण ह्या सर्व बंदरांतून चाललेली असते. हिंदुस्थान व पूर्वेकडील बेटें यांतील अपार संपत्तीची वार्ता अगदीं प्राचीन काळापासून पाश्चात्य राष्ट्रांस होती. मात्र प्राच्य व पाश्चात्य राष्ट्रें प्रत्यक्ष एकमेकांस ओळखीत नसत. व्यापाराची नेआण निरनिराळ्या राष्ट्रांच्या हातांत असल्यामुळें, अमुक ठिकाणच्या अमुक एका जिनसावरूनच एक राष्ट्र दुसऱ्यास ओळखीत असे. सुवेझच्या संयोगिभूमीचा मध्येंच अडथळा आल्यामुळें, पूर्वसमुद्रावरील माल भूमध्यसमुद्रावर उतरण्यास दोन मुख्य मार्ग होते. एक पश्चिम किनाऱ्यावरून इराणच्या अखातांतून वर जाऊन पुढें जमिनीवरून युफ्रेटिस नदीच्या कांठानें आशियामायनरमधून जाई; आणि दुसरा, इराणच्या अखातांत न शिरतां आरबस्तानच्या किनाऱ्यानें तांबड्या समुद्राच्या उत्तर टोंकांवर उतरून जमिनीवरून मिसरदेशांतून भूमध्यसमुद्रावर येई. पण त्यांशिवाय अगदीं उत्तरेकडचा एक तिसरा मार्ग होता. हा काश्मिरांतून पलीकडे जाऊन मध्यआशियांतील ऑक्सस ऊर्फ अमूदर्या नदीच्या कांठानें कास्पियन समुद्रावरून

काळ्या समुद्रावर उतरे. कास्पियन समुद्राच्या उत्तरेकडून व दक्षिणेकडून त्यास दोन फांटे होते. ते दोनही काळ्या समुद्रावर एकत्र होत.

त्यांपैकीं आशियामायनरमधून जाणारा पहिला रस्ता अगदीं प्राचीन होय. हिंदुस्थानचीं जहाजें किनाऱ्याकिनाऱ्यानें इराणच्या अखाताच्या उत्तर-टोंकाशीं जाऊन तेथील बंदरांत हिंदुस्थानांतला माल विकीत. यूफ्रेटिस नदीच्या मुखाजवळच्या प्रदेशास प्राचीन काळीं खाल्डिया हें नांव होतें. खाल्डियाच्या बंदरांत तो माल भरून उंटांचे तांडे उत्तरेस जाऊन मग वाळवंटांतून पश्चिमेस वळून पालमीरा ऊर्फ ताडमूर येथें येत. तेथून ते पुढें नैर्ऋत्येस डमास्कस येथें उतरत. डमास्कस येथें त्यास दोन फांटे फुटत; एक समोर पश्चिमेस समुद्र किनाऱ्यावर जाई; त्यावर टायर, सीडोन, एकर, आस्कलन वगैरे प्राचीन शहरें होतीं. दुसरा दक्षिणेकडे वळून पालेस्टाईनच्या किनाऱ्यानें इडॉम प्रांतांतून मिसर देशांत शिरे. तेथें तांबड्या समुद्रावरील रस्त्याचा व ह्याचा संगम होई. प्राचीन काळच्या व्यापाराचा मुख्य रस्ता हा मधला होय.

उत्तरेकडचा रस्ता हिमालयाच्या पश्चिम रांगांतून बाहेर पडून मध्य-आशियांत ऑक्सस नदीवर जाई. तेथें हिंदुस्थानच्या जिनसांची व चीन देशांतून आलेल्या रेशमी मालाची गांठ पडे. हें रेशमी कापड चीनच्या भागांतून पायरस्त्यानें ऑक्सस नदीपावेतों येण्यास ऐशींपासून शंभर दिवस लागत. नंतर तो सर्व माल काळ्या समुद्रावर जाण्याच्या दोन वाटा होत्या. एक कास्पियन समुद्राच्या दक्षिणेकडून व दुसरी उत्तरेकडून. शिवाय कास्पियन समुद्रांतून व कित्येक नद्यांतून हा माल जहाजांच्या साह्यानेंही पुढें नेण्यांत येत असे. हल्लीं कास्पियन समुद्राच्या पश्चिम किनाऱ्यावर बाकू ह्मणून शहर आहे, तेथून काळ्या समुद्राच्या पूर्वकिनाऱ्यावरील बाटूम शहरापर्यंत रशियन आगगाडीचा रस्ता आहे, तोच बहुशः पूर्वीच्या व्यापाराचा मार्ग होता, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. ह्या रस्त्यावर टिफ्लिस शहर आहे.

ह्यांशिवाय अफगाणिस्तानांतून थेट पश्चिमेस इराणांत जाऊन बगदाद येथें मधल्या रस्त्यास मिळणाराही एक मार्ग होता. पण ह्या सर्व मार्गांचें महत्त्व निरनिराळ्या वेळीं भिन्न होतें. सर्वांत उत्तरेकडचा मध्यआशियांतला मार्ग फार दूरचा, खर्चाचा व जोखमीचा होता. तो केव्हां वाळूच्या अफाट मैदानांतून तर केव्हां बर्फाळ अरण्यें व डोंगर ओलांडून जात असे. ह्मणून थोड्या वजनाच्या व भारी किंमतीच्या चिनी रेशमासारख्या मालाशिवाय दुसरा हलका माल ह्या रस्त्यानें फारसा जात नसे. मात्र यूरोप व चीन ह्यांचें दळणवळण नेहमीं ह्याच मार्गानें होत असल्यामुळें मधला सिरियांतला रस्ता बंद झाल्यावर, ह्या उत्तरेकडच्या रस्त्यास विशेष महत्व आलें.

काळ्या समुद्रावर आलेला बहुतेक माल कान्स्टांटिनोपल येथें जाई व तेथून युरोपांत पसरे. क्वचित् डान्यूब वगैरे नदींतून तो परभारें पुढें जाई. क्रिमिया व डान्यूब नदीच्या कांठचे प्रदेश प्रथम सुधारणेच्या मार्गास लागण्याचें कारण हा पूर्वेकडील व्यापार होय. क्रिमियांत थिओडोसिया नांवाचें एक ग्रीक लोकांचें व्यापाराचें मुख्य ठाणें असून, त्याच भागांत पुढें अनेक राष्ट्रांनीं आपापलीं व्यापाराचीं ठाणीं बसविलीं होतीं.

**३. प्राच्य जिनसांचा युरोपांत प्रवेश.**—मानव जातीचा उदय प्रथमतः आशिया खंडांत झाला असे ह्मणतात. आरंभीं जलप्रवास प्रचारांत नसल्यामुळें, निरनिराळ्या राष्ट्रांमध्यें दळणवळण जमिनीवरूनच चालत असे. परमेश्वरानें उंट हें उपयुक्त जनावर मानवी प्राण्यास दिल्यानें, त्यांना दूरचा प्रवास उंटाच्या योगानेंच सुसाध्य झाला. पश्चिम आशियाखंडांत वाळूचीं मोठमोठीं मैदानें असून त्यांतून मालाची नेआण केवळ उंटाच्याच योगानें साध्य होती. पुष्कळसे व्यापारी समूह करून अनेक जनावरांवर व्यापारी माल लादून, हजारों मैलांचा प्रवास नियमित वेळांत व मोठ्या व्यवस्थेनें करीत असत. ही व्यापारी तांड्यांची पद्धत युगानुयुग चालली होती. ह्या पद्धतीमुळेंच आशियाच्या पूर्वकिनाऱ्यावरील राष्ट्रांस पश्चिम किनाऱ्यावरील व पलीकडील युरोपीय राष्ट्रांची ओळख होती.

भूमार्गानें मालाची नेआण करण्याची ही पद्धत त्या वेळीं कितीही उपयोगाची असली, तरी तिला अनेक अडचणी येत असत. रस्त्यानें धोका फार असे. खर्च व श्रम अतोनात लागत. अर्थात् ह्याहून सुलभ मार्ग मनुष्याच्या बुद्धीनें लवकरच शोधून काढिला. नदींतून, खाड्यांतून व किनाऱ्या जवळील लहान लहान समुद्रशाखांतून लहान मोठ्या होड्यांचा प्रवास जरी प्राचीन काळीं सुरू झाला, तरी नौकानयनशास्त्रास आजचें पूर्ण स्वरूप येण्यास पुष्कळ काळ लागला. आज उपलब्ध असलेल्या ऐतिहासिक माहितीवरून असें कळतें कीं, भूमध्यसमुद्र, आरबी समुद्र, इराणचें अखात, इत्यादि ठिकाणीं प्राचीन काळीं गलबतांचा व्यापार सुरू होता. फिनिशियन नांवाचें राष्ट्र सिरियाच्या पश्चिम किनाऱ्यावर असून त्याची राजधानी टायर नांवाचें शहर होतें. ह्या राष्ट्रांतील लोक व्यापाराच्या कामांत धाडशी होते. तसेंच प्राचीन मिसर लोकही व्यापारांत अग्रगण्य होते. पश्चिम आशिया खंडांत प्राचीन काळीं जीं राष्ट्रें उदयास आलीं, त्यांचा उदय व अस्त ह्या व्यापाराच्या योगानेंच झालेला आहे. दोन राष्ट्रांत युद्ध होऊन एकानें दुसऱ्यास जिंकिलें असतां, जिंकिलेलें राष्ट्र जसें नामशेष होऊन जातें, त्याच प्रकारचे राष्ट्रांच्या घडामोडींचे परिणाम शांत काळच्या एकाद्या क्षुल्लक वाटणाऱ्या गोष्टीपासून उत्पन्न होतात. वास्को ड गामा ह्यानें स. १४९८ त आफ्रिकेस वळसा घालून युरोपांतून पूर्वसमुद्रांत जलमार्गानें उतरण्याचा मार्ग शोधून काढिल्याबरोबर, अनेक मध्यकालीन राष्ट्रांचा झपाट्यानें अस्त झाला.

ह्या व्यापाराची देवघेव अगदीं प्राचीन काळीं निरनिराळ्या राष्ट्रांत केव्हां सुरू झाली ते निश्चयात्मक सांगतां येत नाहीं. हिंदुस्थान, चीन वगैरे पूर्व देशांतच होणाऱ्या अनेक जिनसांचीं नांवें युरोपांतील कित्येक अत्यंत जुन्या ग्रंथांतून आढळतात; आणि कित्येक नांवें तर भाषादृष्टीनें केवळ एकच आहेत, असेंही दिसून येतें. त्यावरून अगदीं प्राचीन काळीं सुद्धां, ह्मणजे ग्रीक लोकांच्याही पूर्वीं पूर्वेकडील जिन्नस यूरोपांत जात असत असें दिसतें. मात्र ते कोठून व कसे येतात हें त्या लोकांस ठाऊक नसे. केशर, मलमल, साग, शिसू,

नीळ, कापूस, चिंच, रत्नें, इत्यादि पदार्थ; तसेंच हत्ती, अस्वलें वगैरे जनावरें हीं इ. स. पू. १७०० च्या अगोदर युरोपांत गेलीं होतीं. हस्तिदंत, कथील व कापड हीं होमरच्या ख्रि० पू० ८०० च्या अगोदर तिकडे गेलीं होतीं. इल्यड व ऑडिसे ह्या होमरच्या काव्यांत आलेलीं मोत्यांचीं कर्णफुलें हिंदुस्थानांतलींच असावींत. मरकत हा संस्कृत शब्द ग्रीक भाषेंत मोत्याचा वाचक आहे. बायबलांतील जुन्या भागांत कस्तुरी, अगरू, चंदन, दालचिनी, कापूर, ऊंस, अबनूस ( एबनी ), कापसांचीं वस्त्रें, सोनें व मोर, माकड वगैरे जनावरें, ह्यांचा उल्लेख आहे. ग्रीक इतिहासकार हिराडोटस इ. स. पू. ५०० च्या सुमारास झाला, त्याचे ग्रंथांत नीळ, तीळ, एरंडी, अंबाडी ह्यांचा उल्लेख आहे. तांदूळ आणि हिरा ह्यांचा उल्लेख स्ट्रेबोच्या ग्रंथांत इ. स. पू. ३०० च्या सुमारास आहे. काळें मिरीं, लांब मिर्ची, सुंठ, लवंग, साखर, तूप, वैडूर्य, नारळ, इत्यादि जिन्नस ह्याच सुमारास ग्रीस देशांत माहीत होते. वास्तविक ह्याच्याही पूर्वी पुष्कळ दिवस हे जिन्नस आशियांतील पश्चिम राष्ट्रांस माहीत असले पाहिजेत. मात्र प्राचीन काळीं हे जिन्नस एका देशाहून दुसऱ्या देशास जाण्यास दिनावधि पुष्कळ लागे. सिकंदराच्या पूर्वी हिरा, व जूलियस सीझरच्या पूर्वी तलम रेशमी कापड युरोपांत माहीत नव्हतीं. इ. स. ५४५ पूर्वी कापूर युरोपांत गेला नव्हता. अंबर, वेलची, जायपत्री हे जिन्नस बरेच पुढें युरोपांत ठाऊक झाले. नारिंग, लिंबू वगैरे फळें इ. स. १००० चे पुढें धर्मयुद्धां ( क्रूसेड्स् ) च्या वेळेस युरोपांत गेलीं. अरिठ्याचें फळ उन लोकांनीं प्रथम तिकडे नेलें. कात सतराव्या शतकांत गेला. येणेंप्रमाणे प्राच्य जिनसांचा प्रवेश युरोपांत झालेला आहे.

पूर्व व पश्चिम देशांमधील ह्या व्यापारास उत्तेजनही निरनिराळ्या वेळीं मिळत गेलें आहे. मिसर राजा फारो सामेटिकस ( इ. स. पू. ६७१-६१७ ) व बाबिलोनियाचा राजा नबूचंद नझर ( इ. स. पू. ६०५-५६२ ) ह्यांनीं आपल्या कारकिर्दीत पूर्वेकडील व्यापारास विशेष सवलती दिल्या, तेणेंकरून पुढें दोन हजार वर्षेंपावेतों हा व्यापार वृद्धि पावला. ह्या अवकाशांत सर्व

सेमिटिक* राष्ट्रांशीं हिंदुस्थानचा फारच निकट संबंध होता. ह्या संबंधामुळें तत्कालीन धर्मसमजुतींत अनेक फेरफार घडून आले आहेत. हिंदुस्थानांतील देवनागरी लिपीचीं अक्षरें व कित्येक युरोपियन अक्षरें मूळचीं एकाच मिसर अक्षरांचीं रूपांतरें होत, असें कित्येक शोधक मानतात. मिसर देशांतील अक्षरें फिनिशियन व्यापाऱ्यांनीं युरोपांत व आरब लोकांनीं हिंदुस्थानांत नेलीं असें सांगतात. सारांश, धर्माचार, अक्षरलिपि व नाणीं ह्या बाबतींत प्राचीन आशिया व अर्वाचीन यूरोप यांचें केवळ साम्यच नव्हे, तर पूर्ण ऐक्य आहे ( बर्डवूड ). केशराचा उपयोग कॉर्नवालच्या किनाऱ्यापासून ब्रह्मदेशच्या किनाऱ्यापर्यंत पूर्वींपासून सर्वसामान्य आहे. वर दिलेल्या पदार्थांचीं नांवें ग्रीक इतिहासकार एरियन ह्याच्याही ग्रंथांत आढळतात. एकंदरींत वरील व्यापार फार प्राचीन काळापासून चालत आला असून, त्यावरच, हल्लींप्रमाणें प्राचीन राष्ट्रें फार सधन झालीं होतीं, आणि त्यांचे झगडेही ह्या व्यापाराकरितांच होते. सिकंदर बादशहानें अलेक्झांड्रिया शहर ह्याच व्यापाराकरितां वसविलें. आरब लोकांनीं स. ६७५ त बसरा, व स. ७६२ त बगदाद हीं शहरें त्याच कारणासाठीं वसविलीं. ग्रीक, कार्थेजिनियन, रोमन, बायझंटाईन ह्मणजे पूर्व रोमन, व आरब हीं राष्ट्रें भूमध्यसमुद्रांत एकामागून एक वरचढ झालीं, तीं ह्या हिंदुस्थानच्या व्यापारावर होत. या राष्ट्रांच्या उद्योगाची थोडी ज्यास्त स्पष्टता करणें जरूर आहे.

**४. मिसर व फिनिशयन राष्ट्रांचा व्यापार.**–यूरोप आणि आशिया यांजमधील व्यापार प्राचीन काळीं ह्मणजे इ. स. पू. दोन हजार वर्षांपूर्वी खाल्डियन लोकांच्या ताब्यांत होता. पण त्यांचा इतिहास उपलब्ध

* सेमेटिक राष्ट्रें म्हणजे इ. स. पू. १००० पासून इ. स. नंतर १००० पावेतों पश्चिम आशियाखंडांत जीं राष्ट्रें होतीं तीं: मिसर, सिरिया, पालेस्टाईन, आशियामायनर, आरबस्तान, इराण इत्यादि ठिकाणीं जीं राष्ट्रें प्राचीन काळीं प्रसिद्धीस आलीं, त्यांस सेमेटिक राष्ट्रें अशी सामान्य संज्ञा देण्यांत येते.

नाहीं.* पुढें आरब व फिनिशियन लोक व्यापारांत पुढें आले. पैकीं आरब लोक तांबडा समुद्र व त्यापूर्वेकडील भागांत फिरत, आणि फिनिशियन लोक भूमध्यसमुद्रांत व्यापार करीत. पुढें फिनिशियन लोकांचीच एक शाखा आफ्रिकेच्या उत्तर किनाऱ्यावर कार्थेज येथें उदयास आली, तिनें कार्थेजचें राज्य स्थापिलें. कार्थेजचा उदय आरंभीं व्यापारामुळें झाला. प्राचीन व्यापाराची भरंवसेलायक माहिती मिसर व फिनिशियन ह्या राष्ट्रांच्या इतिहासांत मिळते. ह्या दोन्हीं राष्ट्रांचे व्यापार दर्यावर्दी असून, भूमध्यसमुद्रांत व आरबी समुद्रांत सफरी करीत. मिसर लोकांस आरंभीं हा व्यापार आवडत नसे. कारण त्यांचा देश सुपीक व संपन्न असल्यामुळें त्यांस निर्वाहाकरितां दुसऱ्यांच्या तोंडाकडे पाहावें लागत नसे, आणि ते परकी लोकांस आपल्या देशांत येऊं देत नसत. पुढें त्यांचा सिसास्ट्रीस नांवाचा एक राजा झाला, तो मोठा साहसी व धूर्त होता. परदेशाशीं व्यवहार केल्याशिवाय आपणांस महत्त्व यावयाचें नाहीं, हें जाणून त्यानें चारशें गलबतांचें एक आरमार तयार करून हिंदुस्थानच्या किनाऱ्यापर्यंतचे सर्व देश काबीज केले. परंतु हा राजा मरण पावल्यावर मिसर लोकांनीं जलपर्यटनाचें काम बंद केलें तें पुढें बरेच दिवस चालू झालें नाहीं.

फिनिशियन लोकांची माहिती ह्यापेक्षा ज्यास्त उपलब्ध आहे. ह्या लोकांचें राज्य सिरियाच्या किनाऱ्यास भूमध्यसमुद्रावर होतें. इ. स. पू. १००० पासून इ. स. पू. ५०० पावेतो सुमारें पांचशें वर्षें ह्या लोकांची भरभराट होती; आणि ही भरभराट सर्वस्वी व्यापारावर अवलंबून होती. कारण, त्यांचा देश अत्यंत रुक्ष असल्यामुळें निर्वाहाचा जिन्नस त्यांस परदेशांतून आणावे लागत. अर्वाचीन काळीं इंग्लंड किंवा हॉलंड हे देश जसे व्यापारावर सधन झाले, त्याप्रमाणें प्राचीन काळीं फिनिशियन राष्ट्र सधन झालें होतें. फिनिशियन खलाशी दर्यावर्दी म्हणून नांवाजलेले होते आणि त्यांचा विशेष फायद्याचा

*खाल्डियन इतिहासावर लो. बा. गं. टिळक ह्यांनीं व्याख्यान दिलें होतें.

व्यापार हिंदुस्थानाशींच होता. हिंदुस्थानांतील माल जलमार्गानें इराणच्या अखातांतून वर जाऊन पुढें जमिनीवरून पश्चिमेकडे भूमध्यसमुद्रावर जात असे. नौकानयनविद्या त्या वेळीं मागसलेली असल्यामुळें फिनिशियन लोक स्वतः आपलीं जहाजें घेऊन हिंदुस्थानास येत नसत तांबड्या समुद्राच्या उत्तरभागीं दोन लहान अखातें आहेत, एक सुवेझचें व दुसरें आकाबाचें. ह्या अखातांच्या दरम्यान इडयूमियन नांवाच्या लोकांचें लहानसें राज्य होतें. त्याजपासून तांबड्या समुद्राच्या किनाऱ्यावरील चार उत्तम बंदरें व्यापारासाठीं फिनिशियन लोकांनीं जिंकून घेतलीं. ह्या बंदरांतून ते हिंदुस्थानाशीं व आफ्रिकेच्या पूर्व व दक्षिण किनाऱ्यांशीं दळणवळण ठवीत. त्यांची भूमध्यसमुद्रावरील राजधानी टायर तांबड्या समुद्रापासून दूर असल्यामुळें, ऱ्हिनोकोल्युरा नांवाचें, तांबड्या समुद्रास जवळ पडेल असें, भूमध्यसमुद्रावर एक बंदर आहे, तें त्यांनीं मिळविलें. त्या ठिकाणीं हिंदुस्थानांतला माल आणून तेथून तो प्रथम टायर येथें व मग युरोपांत निरनिराळ्या ठिकाणीं ते पाठवीत हिंदुस्थानाशीं व्यापार करण्याचा हाच मार्ग कमी खर्चाचा व त्रासाचा असल्यामुळें त्यांस विशेष सोयीचा पडे. ह्या मार्गानें चालविलेल्या व्यापारावर फिनिशियन लोक इतके सधन झाले, कीं '*टायरचे व्यापारी म्हणजे प्रतिराजे व पृथ्वीवरील सर्व लोकांत अतिशय सन्माननीय होत,*' असे उद्गार ( बायबलांत ? ) आहेत. अलेक्झांडर बादशहानें फिनिशियन लोकांचें टायर शहर जमीनदोस्त करून सिडोन काबीज केलें. तेव्हां फिनिशियन लोकांचा कारभार आटोपला.

५. **यहुदी लोकांचा व्यापार.**—ज्यू अगर यहुदी लोकांचें राज्यही फिनिशियन लोकांच्या मुलखास लागूनच होतें. टायरची संपत्ति पाहून त्यांनींही व्यापाराचा उद्योग पत्करिला. डेव्हिड व त्याचा मुलगा सालोमन हे यहुदी लोकांचे दोन पराक्रमी राजे अनुक्रमें इ. स. पू. १०४९–१०१६ व १०१६ पासून ९७६ पावेतों राज्य करीत होते. त्यांचें वर्णन बायबलच्या जुन्या करारांत आहे. डेव्हिडनें जरुसलेम शहरांत राजधानी केली. ह्या ठिकाणाहून व्यापाराचा मधला म्हणजे सिरियन रस्ता त्यानें आपल्या कबजांत घेतला. उत्तरेचें

डमास्कस शहरही त्याच्या ताब्यांत होतें. राबा नांवाची जरुसलेमच्या पूर्वेस व्यापाराची उतारपेठ होती, तीही त्यानें आपल्या ताब्यांत घेतली. दक्षिणच्या बाजूस मिसरच्या सरहद्दीवर इडयूमियन व मोआबाईट हीं लहानशीं राज्यें होतीं, तीं डेव्हिडनें जिंकिलीं. सारांश, वर डमास्कस पासून खालीं मिसरपर्यंत सर्व प्रदेश डेव्हिडनें आपल्या कबजांत आणिला. ह्यांत त्याचा मुख्य हेतु व्यापाराचा होता, तो त्याचा मुलगा सालोमन ह्यानें तडीस नेला. डमास्कसच्याही पुढें पाल्मीरा नांवाची तांडे उतरण्याची एक जागा होती, ती सालोमननें काबीज करून तेथें ताडमूर नांवाचें ठाणें वसविलें. त्या योगें युफ्रेटिस नदी व भूमध्यसमुद्र ह्यांजमधील व्यापाराचा मुख्य भाग त्याच्या हातांत आला. टायरचा फिनिशियन राजा हिराम म्हणून होता, त्याजबरोबर सालोमननें व्यापाराचा तह केला. एवंच ह्या राजघराण्याचा मूळ पुरुष अॅब्रहाम ह्यास देवानें दिलेला वर सालोमनच्या वेळेस खरा झाला. उत्तरेकडच्या व्यापाराची व्यवस्था लाविल्यावर सालोमननें दक्षिणेकडची व्यवस्था केली आकाबाच्या अखातावर ईलाथ आणि एझन्जीबर हीं दोन शहरें त्यानें ईडयुमियन लोकांपासून मिळविलीं; आणि ह्या बंदरांतून त्यानें आपलीं जहाजें बाहेर पाठविलीं. हीं जहाजें व तीं चालविणारे खलाशी त्यानें फिनिशियन राजा हिराम ह्याजपासून मागून घेतले. अशा रीतीनें ह्या दोघां राजांनीं टार्शीश व ओफीर ह्या दोन दूरच्या बंदरांशीं व्यापार चालविला. हीं बंदरें पूर्वी कोठें तरी आफ्रिकेच्या किनाऱ्यावर होतीं असा तर्क आहे. सालोमनचीं जहाजें बाबेलमांडेब सामुद्रधुनींतून खालीं आफ्रिकेच्या किनाऱ्यानें सोफाला नामक भागापर्यंत जात; आणि सोफालांतील सोनें, रुपें व दुसरे जिन्नस घेऊन परत येत. तरी ह्या यहुदी लोकांचें हिंदुस्थानाशीं प्रत्यक्ष दळणवळण होतें असें दिसत नाहीं. सालोमन राजानें व्यापाराच्या योगानें जरुसलेम शहर अनेक उत्कृष्ट चिजांनीं सुशोभित केलें. बायबलांत सालोमनचें स्तोत्र आहे, त्यांत केवळ व्यापाराच्या जिनसांची यादी आहे. त्यांपैकीं काहीं जिन्नस खास हिंदुस्थानांतलेच आहेत. त्याच्या सिंहासनास लाविलेला हस्तिदंत, त्याचें सुंदर जवाहीर, व सोन्याच्या तीनशें ढाला,

मेसाल, त्याच्या बागांतील माकडें आणि मोर, व देवळाचे चंदनी दरवाजे हे सर्व हिंदुस्थानांतले होते. मिसरचा राजा फारो त्याची मुलगी सालोमनास दिली, त्या वेळीं म्हटलेलें ' शुभ-मंगल-स्तोत्र ' उपलब्ध आहे, त्यांत व्यापाराचाच गूढार्थ भरलेला आहे. या लग्नप्रसंगीं मिसरमधून सालोमन यास घोडे व वस्त्रें नजर आलीं होतीं इ. स. पू. ९७६ त सालोमन मरण पावल्यावर त्याच्या राज्याचे विभाग झाले; आणि यहुदी लोकांचें राज्य पुढें लवकरच लयास गेलें. पुढील एक हजार वर्षांत मिसर, आसीरिया, बाबिलोनिया, इराण, ग्रीस व रोम हीं राष्ट्रें सिरियांत प्रबळ झालीं. जें राष्ट्र प्रबळ असे, तें दुसऱ्यास जिंकून आपली सत्ता वाढवी. पुढें त्याचा ऱ्हास होऊन दुसरेंच राष्ट्र उदयास येई. ह्या उदय व ऱ्हास ह्यांचें बीज व्यापार होय.

**६. सिकंदर बादशहाचें व्यापारी धोरण.**—त्या पुढची जगाच्या व्यापारांतील महत्वाची घडामोड म्हणजे सिकंदर बादशहाची स्वारी होय. या स्वारीचा हिंदुस्थानच्या इतिहासाशीं निकट संबंध असल्यामुळें, त्याची हकीकत थोडी विस्तारानें देणें जरूर आहे.

क्रिस्ताच्या पूर्वी सुमारें पांच सहाशें वर्षें ग्रीक लोकांचें राज्य, विद्या व कलाकौशल्य भरभराटींत येऊं लागलीं. या ग्रीक लोकांचा संबंध पूर्व युरोपाशीं व पश्चिम आशियाशीं कैक शतकेंपर्यंत निकट होता. दर्यावर्दी कामांत त्यांची विशेष प्रगति होती. ग्रीसच्या उत्तरभागीं मासिडोन म्हणून प्रांत आहे तेथील राजा फिलिप विशेष पराक्रमी निघाला, (इ. स. पू. ३५९-३३६) त्यानें ग्रीक राज्यें पादाक्रान्त करून त्या सर्वांचें एकच मोठें राज्य स्थापिलें, त्याची हद्द पूर्वेस इराणपावेतों येऊन भिडली. इराणी लोकांनीं पूर्वी कैक वेळां ग्रीसचा पाडाव केला होता, त्याचा वचपा भरून काढण्यासाठीं म्हणून फिलिपनें इराणावर जंगी स्वारी करण्याची सिद्धता केली, परंतु तें काम हातीं घेण्या-पूर्वीच त्याचा खून झाला, आणि जमलेल्या फौजेचें आधिपत्य, त्याचा वीस वर्षांचा तरुण मुलगा सिकंदर यास मिळालें. सिकंदरानें बाराच वर्षें कारभार

केला, परंतु एवढ्या अवधींत त्यानें जगाच्या इतिहासांत अद्वितीय घडामोडी करून सोडिल्या. सिकंदर शब्दाचा लौकिक अपभ्रंश असकंदर यावरून युरोपांत तें नांव अलेक्झांदर असें प्रचारांत आहे.

प्रसिद्ध ग्रीक तत्ववेत्ता आरिस्टॉटल् हा सिकंदरचा गुरु असून त्याजकडून व सिकंदरच्या आईकडून त्यास लहानपणीं फार चांगलें शिक्षण मिळालें होतें. दोन वर्षांतच ग्रीसमधील बंडाळी मोडून तो आशियांत उतरला. प्रथम इराणी फौज चालून आली होती, तिचा पराभव करून त्यानें आपला मोर्चा दक्षिणेस वळविला. टायर शहर काबीज करून त्यानें फिनिशन राज्य धुळीस मिळविलें, आणि नंतर इजिप्तचें राज्य हस्तगत केलें. नील नदीच्या मुखाजवळ पूर्व पश्चिम व्यापाराच्या सोयीसाठीं त्यानें अलेक्झांड्रिया नांवाचें नवीन शहर वसविलें, तें शेंकडों वर्षे पुढें भरभराटींत होतें. इजिप्तमधून परत येऊन सिकंदर पूर्वेस इराणाकडे वळला. तैग्रीस नदीच्या पूर्वेस आरबेला येथें इराणचा बादशहा दारियस प्रचंड फौज घेऊन आला होता, त्याचा फन्ना उडवून, सिकंदर दक्षिणेस वळला. यूफ्रेटिसच्या कांठीं बाबिलोन शहर विख्यात होतें. तें त्यानें जिंकिलें आणि इराणचा पाडाव करून तेथच्या पर्सिपोलिस नामक राजधानींत त्यानें आपणास इराणचा बादशहा असा राज्याभिषेक करवून घेतला. तेथून अफगाणिस्तानचा प्रदेश हस्तगत करून तो उत्तरेस मध्यआशियाच्या सपाट प्रदेशांतून अमूदर्या व सिरदर्या नद्या वाहतात तिकडे वळला. हिरात, बुखारा व काबूल याजमधील त्रिकोण प्रदेशास त्या वेळीं बॅक्ट्रिया म्हणत, तो प्रांत व त्याच्या ईशान्येकडचा सोग्डियाना प्रांत (म्हणजे बाबरचा फरघाना) हे कबजांत आणून सिकंदर दक्षिणेस हिंदुस्थानाकडे येण्यास निघाला. तेथें पंजाब प्रांत हस्तगत केल्यावर तो सिंधु नदींतून समुद्रापर्यंत येऊन तेथून बलुचिस्तानच्या दक्षिण किनाऱ्यानें परत बाबिलोन येथें पोंचला. हें शहर त्यानें एकंदर जिंकिलेल्या मुलखाची राजधानी केली, परंतु आणखी उद्योग करण्यास तो पुढें वांचला नाहीं. बाबिलोन येथेंच ताप येऊन तो एकाएकीं मरण पावला.

बारा वर्षांच्या सिकंदरच्या या उद्योगास एवढें महत्व येण्याचीं कारणें अनेक आहेत. ग्रीसच्या विद्या, कला, व सुधारणा यांचा फैलाव आशियांत होऊन, आशियाचा व्यापार व संस्कृति यांचा फैलाव युरोपांत झाला. ह्या मिलाफाच्या परिणामानें पुढें क्रिस्ती धर्म उत्पन्न होण्याची सोय झाली, परंतु ग्रीक लोकांस बादशाही मिजासीची चटक लागून त्यांचें वर्चस्व लवकरच नष्ट झालें. या गोष्टी सोडून दिल्या तर या स्वारीनें जगाच्या व्यापारावर जो परिणाम घडला, तोच हिंदुस्थानच्या इतिहासांत संस्मरणीय असून त्या दृष्टीनें सिकंदराच्या स्वारीची पुढील विचक्षणा समजण्यासाठीं, तिची रूपरेखा वर थोडक्यांत दिली आहे.

फिनिशियन लोक थोड्याशा जहाजांवर शत्रूंशीं टक्कर देऊन पृथ्वीच्या व्यापारावरील किफायतीनें सधन झाले आहेत, ही गोष्ट लक्षांत आणून सिकंदरानें एकंदर भूजलप्रदेशावर आपलें राज्य स्थापण्याची महत्वाकांक्षा धारण केली. अलेक्झांड्रिया शहर स्थापून त्यानें फिनिशियन लोकांच्या टायर शहरास चांगलाच शह दिला. हें शहर वसविण्यांत सिकंदराची दूरदृष्टि व धूर्तता उत्तम व्यक्त होते. शेंकडों राज्यक्रांती घडून आल्या, तरी सुमारें अठराशें वर्षें हें शहर हिंदुस्थानच्या व्यापाराचें मुख्य नाकें होतें. इराण देश जिंकल्यावर सिकंदर समर्कंद येथें गेला, आणि तेथून हिंदुस्थानाकडे वळला. रस्त्यांत त्यानें अनेक प्रदेशांची व लोकांची पाहणी केली. त्यावरून सर्व उत्तम चिजांचें मूळ ठिकाण हिंदुस्थान आहे असें त्यास कळून आलें; आणि हिंदुस्थान जिंकण्याची त्याची हांव अधिकच वाढली. पुढें वायव्येकडील खिंडीनें तो हिंदुस्थानांत आला. खैबर घाटांतून हिंदुस्थानांत येणारा ऐतिहासिक काळांतील पहिला शूर पुरुष हाच होय. सिंकदरच्या या स्वारीचा तपशील व्हिन्सेंट स्मिथच्या इतिहासांत दिलेला उपयुक्त आहे, त्याचाच अनुवाद पुढें केला आहे.

इ० स० पू० ३२७ च्या वसंतऋतूस सुरुवात होऊन बर्फ वितळूं लागतांच, सिकंदरानें हिंदुस्थानाकडे कूच केलें. त्याजबरोबर यूरोपांतील ५०,

६० हजार फौज होती. दहा दिवसांत हिंदुकुश पर्वत ओलांडून तो कोहि-दामनच्या दरींत उतरला. तेथें आपलें लष्करी ठाणें बसवून निकेनोर यास तेथील बंदोबस्तास ठेविलें. ह्या ठिकाणीं पश्चिम, उत्तर व दक्षिण या तीनही दिशांकडील मार्गांचा संगम होत असे. तेथून सिकंदर निकेया येथें आला. हें नेकिया शहर जलालाबादेजवळ पश्चिम बाजूस होतें. या ठिकाणीं सिकंदरानें आपल्या फौजेचे दोन भाग केले. एक भाग काबूल नदीच्या कांठानें मुलूख जिंकीत हिफेस्टिअन् व पार्डिकास या दोघां सेनापतींच्या हाताखालीं त्यानें पुढें पाठविला. तक्षशिला नांवाचें शहर सिंधुनदीच्या पूर्वेस तीन टप्प्यांवर होतें. रावळपिंडीच्या वायव्येस व हसनअबदालच्या आग्नेयीस कित्येक मैलपावेतों जुने पडके भाग दिसतात ते ह्याच शहराचे होत. या तक्षशिलेचा राजा सिकंदरास शरण गेला आणि हिंदुस्थानांतील एकंदर स्थितीची माहिती सिकंदरास देऊन त्याची हरएक प्रकारची व्यवस्था त्यानें स्वतः लावून दिली. सिंधुनदीच्या पश्चिमेकडील राजे सिकंदराच्या फौजेस शरण गेले. त्या सर्वांच्या मदतीनें सिंधुनदीवरून अलीकडे येण्यासाठीं त्यानें होड्यांचा पूल बांधविला. अशी पुढील व्यवस्था लावल्यावर मागील फौजेचें आधिपत्य स्वतः स्वीकारून सिकंदर ३२७ च्या सेप्टेंबरांत पुढें निघाला. रस्त्यांत अनेक अडचणी आल्या व पुष्कळ लढाया झाल्या; परंतु त्याची व्यवस्था व टापटीप उत्तम असल्यामुळें त्यास यश येत गेलें. जे शरण येत त्यांस तो आपल्या नोकरींत ठेवी आणि जे विरुद्ध वागत त्यांस तो देहान्त शिक्षा देई. याप्रमाणें इ० स० पू० ३२६ च्या जानेवारी महिन्यांत सिकंदर सिंधुनदीवर येऊन पोहोचला. तेथें एक महिनाभर आपल्या फौजेस विश्रांति घेऊन ख्यालीखुशाली करण्यास त्यानें रजा दिली.

पंजाबांत त्या वेळीं लहान मोठीं अनेक राज्यें होतीं. एक पश्चिमेस तक्षशिलाचें, दुसरें उत्तरेस पहाडांत अभिसारांचें व तिसरें दक्षिणेस पौरसचें. ह्याच सुमारास तक्षशिलाचा राजा मृत्यु पावला व त्याचा मुलगा ऑफिस गादीवर बसला. त्यानेंही बापाप्रमाणेंच सिकंदराचें साह्य केलें. पौरसचें राज्य

झेलम व चिनाब या नद्यांचे दरम्यान, हल्लींचे जिल्हे झेलम, गुजरात व शहापूर यांस अनुसरून होतें. पौरसचें व तक्षशिलाचे राजाचें वांकडे असल्यामुळें पौरसचा पाडाव करण्यासाठीं तक्षशिलाच्या राजानें सिकंदरास सिंधु नदीवर होड्यांचा पूल तयार करून दिला. हा पूल अटकपासून वर सोळा मैल ओहिंद्र उर्फ उंद म्हणून गांव आहे तेथें असावा. इ० स० पू० ३२६ च्या मार्च महिन्यांत या पुलावरून सिकंदर आपल्या सर्व फौजेसह तक्षशिला येथें आला. त्या वेळीं हें शहर फार नामांकित होतें. तेथें विद्वानांचा भरणा फार मोठा असून सर्व देशांतून विद्या संपादन करण्यासाठीं नानाविध लोक तेथें येत असत. सिकंदरानें तेथच्या राजास नानाप्रकारें खूष करून पुढील उद्योगास त्याचें साह्य घेतलें. अभिसारचा राजा व पौरस यांचा स्नेहभाव असून दोघांनीं मिळून सिकंदराशीं झुंजावें असा बेत चालविला होता. तथापि पुढें अभिसारच्या राजानें आपले वकील तक्षशिला येथें सिकंदराकडे पाठवून त्याचें मांडलिकत्व कबूल केलें. अशीच तजवीज सिकंदरानें पौरसकडेही चालविली होती. सिकंदरानें त्यास आपल्या भेटीस बोलाविलें असतां त्या मानी राजानें परत जाब पाठविला कीं, ‘सरहद्दीवर आपल्या भेटीस येण्यास मी तयार आहें, मात्र फौजेसह येतां.’ हें उत्तर पाठवून पौरस ५० हजार फौज घेऊन झेलम नदीच्या पूर्वकाठीं सिकंदराशीं सामना करण्यास गेला. इकडून सिकंदरही तक्षशिलेहून निघाला, तो १५ दिवसांत झेलम नदीच्या पश्चिम तीरावर पौरसच्या समोर येऊन उतरला (मे, ३२६). सिंधुनदी उतरण्यास होड्या होत्या त्यांचेच तुकडे गाड्यांवर घालून सिकंदरानें झेलम नदीवर आणिले. पौरसची फौज समोर असतां नदी ओलांडणें शक्य नव्हतें, म्हणून सिकंदरानें नदीची व पलीकडील प्रदेशांची प्रथम तपासणी करून चांगली माहिती मिळविली. त्या वेळीं उन्हाळा असून नदीस पूर आलेला होता. तेव्हां पूर कमी झाल्याशिवाय आपण नदी ओलांडीत नाहीं अशी आफवा सिकंदरानें उठविली. पुढें लौकरच पावसाळा सुरू होऊन पूर ज्यास्तच वाढला. अशा पावसाळ्यांत एके रात्रीं गुप्तपणें नदीच्या वर सुमारें १६ मैल जाऊन थोड्याशा

निवडक लोकांनिशीं होड्यांच्या साह्यानें त्यानें नदी ओलांडिली. ही बातमी पौरस ह्यास लागतांच तो आपली सर्व फौज घेऊन सिकंदराच्या अंगावर गेला. पौरसच्या फौजेंत २०० हत्ती व ३० हजार पायदळ, ४००० स्वार व ३०० रथ होते. दर रथास ४ घोडे जुंपलेले असून आंत दोन तिरंदाज, दोन ढालवाले व दोन सारथी असे सहा इसम होते. पायदळ लोकांजवळ ढाल, तलवार व धनुष्यबाण होते. पौरसची तयारी जरी चांगली होती, तरी त्याची फौज अवजड होती. सिकंदराची सर्व भिस्त घोडेस्वारांवर असल्यामुळें त्याच्यांत सुटसुटीतपणा व तरतरी हे गुण ज्यास्त होते. सिकंदराच्या फौजेचा दुसरा भाग केटिरास नामक त्याच्या हुशार सेनापतीच्या हाताखालीं तळावर होता. तिकडे पौरस व सिकंदर यांच्या लढाईचें तोंड लागतांच, केटिरासनें एकदम दक्षिणेकडून नदी उतरून पौरसवर पाठीमागून हल्ला केला. त्यामुळें पौरसची धांदल उडून त्याचा पराजय झाला, व तो केटिरासच्या हातांत सांपडला. पौरस भव्य साडेसहा फूट उंचीचा पुरुष होता. तो स्वतः शिकस्त करून लढला व नऊ जखमा लागल्यावर नाइलाज होऊन पकडला गेला. सिकंदरानें त्यास मोठ्या सन्मानानें वागविलें, व त्याचें राज्य त्यास परत देऊन आणखीहि ज्यास्त मुलूख त्यास दिले. येणेंप्रमाणें सिकंदरानें त्यास औदार्य दाखविलें त्या योगें पौरस त्याचा दोस्त बनला. ह्यावरून सिकंदराची धूर्तता दिसून येते. वरील लढाई इ० स० पू० ३२६ च्या जुलै महिन्याच्या आरंभीं झाली. या लढाईच्या स्मरणार्थ संग्रामभूमीनजीक सिकंदरानें दोन नवीन शहरें स्थापिलीं, त्यांपैकीं बूकिफल ( Buokephala ) हें हल्लींच्या झेलम शहराजवळ असून बरेंच प्रसिद्धीस आलेलें होतें.

पुढें केटिरास यास तळावर ठेवून सिकंदरानें आजूबाजूचे बरेच प्रदेश जिंकिले. तो चिनाब नदी ओलांडून रावीच्याही अलीकडे आला. तेथें कथई लोकांचें मुख्य ठिकाण संगल म्हणून होतें तें त्यानें जिंकिलें. ३२६ च्या सेप्टेंबरांत तो ब्यास नदीच्या कांठीं आला. पंजाबची सुपीकता पाहून त्यानें धन्यतेचे उद्गार काढिले. नील, युफ्रेटिस, तैग्रिस इत्यादि अनेक नद्या व

त्यांच्या कांठचे अनेक सुपीक प्रदेश त्यानें पूर्वीं पाहिले असतांही, पंजाबप्रांत पाहिल्यावर परमेश्वराच्या कृपेची, सृष्टीच्या वैभवाची व मनुष्याच्या अकलेची येथें केवळ कमाल झाली आहे असें त्यास वाटलें. लोकांनीं त्यास सांगितलें कीं, सिंधु नदी व पंजाब कांहींच नाहीं, पुढें गंगानदी व तिच्या कांठचा प्रदेश ह्याहीपेक्षां विशेष सुपीक व शोभिवंत आहे. तें ऐकून लगेच त्यानें आपले सर्व सैनिक जमा केले आणि त्या पुढील प्रदेशांत चलण्याबद्दल त्यांस अत्यंत आग्रह केला. परंतु त्यांनीं ह्यापूर्वीं पुष्कळ हाल व संकटें सोशिलीं असल्यामुळें, पुढें जाण्यास त्यांचा पाय धजेना. सिकंदरानें परोपरीनें त्यांची विनवणी केली ती सर्व फुकट जाऊन, कोइनास ह्मणून त्याचा एक विश्वासु सरदार होता त्यानें धीर करून सर्व लोकांचें गाऱ्हाणें सिकंदराचे कानावर घातलें. तेव्हां त्याचा फार हिरमोड झाला. तीन दिवसपर्यंत तो आपल्या तंबूच्या बाहेर पडला नाहीं. शेवटीं त्यानें परत फिरण्यास हुकूम दिला. निघण्यापूर्वीं त्यानें ब्यास नदीच्या पलीकडे बारा देवतांच्या नांवानें बारा प्रचंड चौकोनी दगडी स्तंभ उभारले व मोठा उत्सव केला. प्रत्येक स्तंभाची उंची ५० हात होती. अपालोनियस टायेनियस नांवाचा एक ग्रीक गृहस्थ इ. स. ४६ त पंजाबांत आला होता, त्यानें हें खांब पाहिले असून त्यांवरचे लेख वाचतां येत होते, असें तो लिहितो.

परत फिरून सिकंदर चिनाब नदीवर आला. तेथें त्यास ५००० स्वार आणि ७००० पायदळ अशी नवीन फौज ग्रीस देशाहून मदत आलेली मिळाली. पुढें लवकरच तो झेलम नदीच्या कांठीं आला. प्रथम ही नदी त्यानें ओलांडिली, तेव्हां पुष्कळ नवीन होड्या बांधण्यास त्यानें हुकूम दिला होता, त्याप्रमाणें परत येतांच होड्या तयार होत्या. होड्यांची व स्वारीची व्यवस्था त्याचा कारभारी निआर्कस मोठ्या दक्षतेनें ठेवीत होता. झेलमच्या कांठीं आपल्या फौजेचे तीन भाग करून, एक भाग नदींतून होड्यांनीं, व दोनही कांठावरून दोन भाग, अशा रीतीनें झेलम नदींतून खालीं समुद्रापर्यंत सफर करून, सर्व प्रदेशाची पाहणी करण्याचा त्यानें निश्चय केला. नदीवर फिर-

णाऱ्या लोकांच्या होड्याही त्यानें आपल्या कामास घेतल्या. निरनिराळ्या राष्ट्रांतले पुष्कळ खलाशी त्याच्या फौजेंत होते, ते त्यानें ह्या होड्यांवर कामास घेतले. तीस वल्हीं असलेली एक होडी, अशा ८० मोठ्या होड्या त्याच्या स्वारींत असून, एकंदर लहान मोठ्या सर्व होड्या २००० होत्या. कांठांवरून चालणाऱ्या दोन भागांवर क्रेटिरास व हिफेइस्टन हे अंमलदार मुख्य होते. स्वतः सिकंदर पाण्यांतील भागाबरोबर होता. निघण्यापूर्वी मोठा दरबार भरवून तेथें त्यानें पौरसची त्याच्या राज्यावर कायम नेमणूक केली. तसेंच अभिसारच्या राजास सिंधुनदीच्या पूर्वेकडील प्रदेशाचा छत्रप नेमून पश्चिमेकडील प्रदेशावर फिलिपस ह्यास छत्रप नेमिलें. हिंदुस्थानांतील निरनिराळ्या विद्या जाणणारे पुष्कळ विद्वान लोक त्यानें आपल्या बरोबर घेतले. याप्रमाणें ऑक्टोबर स. ३२६ च्या अखेरीस एके दिवशीं सुमुहूर्तावर सकाळीं देवपूजा करून व जलदेवतांस नैवेद्य वगैरे अर्पण करून, रणवाद्यें वाजवून त्यानें कूच करण्याचा फौजेस हुकूम दिला. गलबतांवर घातलेले पुष्कळ घोडे होते, तो अजब प्रकार पाहून लोकांस मोठें आश्चर्य वाटलें. एवढा तांडा अत्यंत शिस्तीनें चालविलेला पाहून आसपासचे लोक आश्चर्यचकित झाले. हजारों वल्ह्यांचे आवाज, हुकूम सोडणाऱ्या जासुदांचे पुकारे, खलाशांच्या गाण्यांचे सूर, इत्यादिकांनीं दोनही कांठांच्या दरम्यान प्रतिध्वनि उठून एकच कल्लोळ उडून गेला. आठव्या दिवशीं हें लष्कर झेलम व चिनाब ह्यांच्या संगमावर आलें. तेथें कांहीं होड्या बुडाल्या आणि प्रत्यक्ष सिकंदरची होडीही बुडण्याच्या बेतांत आली होती. प्रवास करितांना बाजूच्या लोकांशीं सिकंदराचे अनेक युद्धप्रसंग झाले, व त्यानें अनेक शहरें व प्रदेश काबीज केले एका प्रसंगीं सिकंदर यास जबर जखम लागून तो बेशुद्ध पडला. जखम कापून आंतील शल्य काढून टाकल्यावर तो बरा झाला. पुढें प्रवास करून सर्व मंडळी सिंधु व पंचनद ह्यांच्या संगमावर आली. ह्या ठिकाणीं सिकंदरानें एक शहर वसविलें, व क्रेटिरास यास खुष्कीच्या मार्गानें इराणांत रवाना केलें. पुढें कूच करून, निघाल्यापासून दहा महिन्यांनीं, सिकंदर सिंधु नदीच्या फांट्यांनीं झालेल्या तिकोनाच्या माथ्याशीं

आला. येथें पटल (पत्तल ? हल्लींचें ठठ्ठा) ह्मणून मोठें शहर होतें. तें नाक्यावर असल्यामुळें सिकंदरास फार उपयोगाचें वाटलें. तेथून सिंधुनदीच्या पूर्वपश्चिम प्रवाहांतून समुद्रापर्यंत स्वतः प्रवास करून सिकंदरानें युद्धोपयोगी व व्यापारोपयोगी साधनांचा पूर्ण तपास केला; आणि नवीन गलबतें, गोद्या व बंदरें बांधून तो परत पटल येथें आला. ही सर्व पाहणी झाल्यावर पुढें युरोपास जाण्याचे मार्ग नक्की करण्याच्या विचारानें त्यानें आपल्या फौजेचे दोन भाग केले. एका भागानें समुद्रांतून प्रवास करावा व दुसऱ्यानें समुद्रांतील भागावर नजर ठेवून किनाऱ्यावरून जावें, अशी योजना त्यानें ठरविली. झेलम नदींतून पटल येथें येण्यास दहा महिने लागले. स्वारीची व होड्यांची सिद्धता त्याचा सरदार निआर्कस ह्यानें उत्कृष्ट ठेविली, ह्मणून त्यासच समुद्रांतून चालणाऱ्या भागावर मुख्य नेमून सिकंदर स्वतः जमिनीवरून चालला. जमिनीवरचा हा प्रवास मोठ्या कष्टानें पार पडला. मोठमोठे पर्वत व वाळूचीं मैदानें मध्यें येऊन आपणांस संकटें येतील हें सिकंदरास ठाऊक नव्हतें, त्यामुळें त्याचे पुष्कळ लोक वाटेंतील शत्रूंशीं व प्रवासाच्या अडचणींशीं झगडतांना मृत्युमुखीं पडले. समुद्रांतून जाणाऱ्या फौजेची व सिकंदराच्या फौजेची एकमेकांस मदत न होतां, सिकंदर मोठ्या संकटांत असतां ऑर्मझनजीक कार्मेनिया येथें निआर्कस अवचित येऊन त्यास भेटला. दोनही शाखांचा प्रवास इ. स. पू. ३२५ च्या ऑक्टोबर महिन्यांत सुरू होऊन तो पुरा होण्यास दोन महिने लागले. समुद्राच्या प्रवासांत निआर्कस ह्यासही पुष्कळ अडचणी आल्या. एकमेकांच्या भेटीनें सर्वांस मोठी खुशाली होऊन पुनः प्रवास सुरू करून मंडळी इराणच्या आखाताच्या टोंकावर सूझा येथें इ० स० पू० ३२४ च्या एप्रिलच्या अखेरीस येऊन पोहोंचली. पुढें एक वर्षानें ह्मणजे ३२३ च्या जून महिन्यांत हा पराक्रमी पुरुष बाबिलोन येथें मरण पावला.

ह्या हकीकतीवरून सिकंदराचें धोरण व शहाणपण चांगलें दिसून येतें. ग्रीस देशापासून हिंदुस्थानच्या पूर्वसीमेपर्यंतच्या सर्व प्रदेशावर आपलें राज्य असावें, अशी त्याची महत्वाकांक्षा होती, व त्याची शोधकबुद्धि व व्यवस्था

ह्यांवरून तो जगला असता तर ही इच्छा तडीस जाण्यास हरकत नव्हती, असें दिसतें. त्यानें पश्चिम आशियाच्या राष्ट्रांत नवीन चळवळ उत्पन्न केली. दूरदूरच्या लोकांस एकमेकांची ओळख झाली; निरनिराळ्या ठिकाणचे उपयोगाचे व खपाचे जिन्नस त्यांस ठाऊक झाले; व्यापाराचे नवीन मार्ग व नवीन पेठा उत्पन्न झाल्या. त्या योगानें व्यापार व उद्योग ह्यांस नवीन चलन मिळालें. हिंदुस्थानांतील कापूस व तांदूळ, तिबेटांतील लोकर वगैरे अत्यंत उपयोगाचे पदार्थ पश्चिमेकडे खपूं लागले. सर्व संपत्तीचें माहेरघर हिंदुस्थान होय, अशी सिकंदराची खात्री झालेली दिसते. सिकंदराच्या मृत्यूनंतर त्याचे बेत जागच्याजागीं राहिले. सिकंदरानें नेमिलेले कामदार त्याच्या मृत्युनंतर पांच सहा वर्षें कामावर होते. प्रथम सिंधुनदीवर आल्यापासून इराणच्या अखातावर परत पोहोंचेपर्यंत सिकंदराचीं एकंदर तीन वर्षें ह्या स्वारींत गेलीं. त्यांपैकीं सुमारें एकोणीस महिने सिंधुनदीच्या पूर्वेकडील प्रदेशांत गेले. योद्धा या नात्यानें पाहिलें तरी या तीन वर्षांतले प्रकार निःसंशय सिकंदरास मोठेपणा आणणारे आहेत. फौजेची शिस्त, टापटिपीची व्यवस्था व युद्धकला या गोष्टी सिकंदर चांगल्या जाणत असून, तो अनेक प्रसंगीं जिवाची परवा न करितां संकटांत उडी घाली. झेलम नदींतील प्रवास, निआर्कसची समुद्रांतील सफर व सिकंदरचा बलुचिस्तानच्या वाळवंटांतील प्रवास, हे तीनही प्रकार मोठे वाखाणण्याजोगे आहेत. दुसरा प्रकार असा दिसून येतो कीं, त्या वेळींसुद्धां युद्धकलेंत हिंदुस्थानच्या फौजा युरोपियनांपेक्षां कमी योग्यतेच्या होत्या. ग्रीक स्वारांच्यापुढें पंजाबचे हत्ती निरुपयोगी ठरले. तथापि ह्या स्वारीचा हिंदुस्थानावर सांगण्यासारखा कायमचा परिणाम झाला नाहीं. सिकंदरासारखे पुरुष एवढा खटाटोप करून आपल्या देशांत कां येतात आणि ह्या परकीय युरोपियन लोकांपासून आपणांस काय शिकावयाचें आहे, त्यांची राज्यपद्धति, व्यवस्था व सुधारणा कोणत्या प्रकारच्या आहेत, ह्या प्रश्नांकडे, अलीकडच्या मनूप्रमाणेंच त्या कालींहि, आपल्यांतील शहाण्या लोकांचें लक्ष गेलें नाहीं. ह्मणून थोड्या वेळांत ग्रीक लोकांची स्वारी आली

होती कीं नाहीं याचा मागमूसही राहिला नाहीं. युरोपावर मात्र ह्या स्वारीचा परिणाम अगदीं उलट झाला. इकडील व्यापार व संपत्ति, विद्या, शास्त्रें व कलाकौशल्य इत्यादि गोष्टींची झाडून सारी माहिती ग्रीक लोकांनीं युरोपांत नेली. युरोपाच्या इतिहासांत पुढें निराळेच प्रकार घडून आल्यामुळें सिकंदराचा उपक्रम त्या वेळीं युरोपास एकदम फलद्रूप झाला नाहीं.

त्या वेळी हिंदुस्थानांत अनेक लहान मोठीं राज्यें असून, लोकस्थिति चांगली होती. लोकांच्या चालीरीति, पेहेराव व कलाकौशल्य वगैरेचें सिकंदराच्या वेळचें वर्णन अलीकडच्या शेंपन्नास वर्षांपूर्वीच्या स्थितीला इतकें जुळतें कीं, ह्या दोन हजार वर्षांत त्यांत फारसा फरक पडला नाहीं, असेंच वाटण्याचा संभव आहे. हिंदुस्थानचे ऋतु, येथला ठरीव वर्षाकाल, नद्यांची भरती ओहोटी, त्यांस येणारे पूर, त्यांपासून होणारी वाताहत व त्या वेळचा देखावा, ह्या सर्व गोष्टी आजच्या स्थितीशीं उत्तम जुळतात. ग्रीस देशापासून हिंदुस्थानापर्यंतचा सर्व अफाट प्रदेश एकाच्या ताब्यांत राहणें शक्य नव्हतें. तथापि सगळया जातीच्या लोकांस आपापल्या कारभाराची स्वतंत्रता असावी, आणि सर्वांस सुख होईल तोच राज्य करण्याचा उत्तम मार्ग होय, हें सिकंदर जाणून होता. ह्यासंबंधानें जवळच्या सल्लागारांचा व त्याचा मोठा विरोध पडला. त्याचा गुरु ॲरिस्टॉटल् ह्यानें त्यास सांगितलें कीं, 'ग्रीक लोकांस मात्र तुम्ही बरोबरीच्या नात्यानें वागवावें; पण इतर लोक हलक्या कोटींतील समजावे.' हें मत सिकंदरास आवडलें नाहीं. लोकांचें मन ओळखण्याची अक्कल गुरूपेक्षां शिष्यासच चांगली होती. म्हणून हा उपदेश त्यानें मानिला नाहीं. आरबेला येथील विजयानंतर त्यानें स्वतः इराणी पोषाख स्वीकारिला आणि जवळच्या सरदारांसही त्यानें तो पोषाख स्वीकारण्यास लाविलें. त्याचप्रमाणें, 'आमच्या ग्रीक लोकांतील चांगल्या गोष्टी तुम्ही शिका,' असा त्यानें इराणी लोकांस आग्रह केला. स्वतः त्यानें दोन इराणी राजकन्यांशीं लग्न केलें; आणि आपल्या शंभर सरदारांचीं व दहा हजार ग्रीक शिपायांचीं लग्नें इराणी मुलीशीं लाविलीं. हे सगळे विवाह मोठ्या थाटानें झाले.

एवढ्यानेंच तो थांबला नाहीं. कायदे व रीतरिवाज वगैरे बाबतींतही उभय-तांनीं पूर्ण देवघेव करावी असा त्याचा मनोरथ होता. त्यानें राज्याच्या बंदोबस्ताकरितां किल्ले वगैरे बांधून, हिंदुस्थानांतील व्यापाराचा ताबा आपल्या ताब्यांत राहवा अशी तजवीज केली. ह्याच कारणास्तव त्यानें सिंधु नदीचा प्रवास केला, आणि इराणच्या अखातांतून व्यापाराचा मार्ग ठरविला. सिंधु-नदीप्रमाणें युफ्रेटिस व तैग्रिस ह्या नद्यांची त्यानें पाहणी केली. तीस वर्षांच्या वयांतील त्याचें हें शहाणपण वर्णनीय होय.

सिकंदर मरण पावल्यानंतर त्याच्या राज्याचे तुकडे झाले; आणि हिंदु-स्थानच्या लगत्याचा मध्यआशियाखंडांतील सर्व प्रदेश सेनापति सेल्युकस ह्याच्या ताब्यांत आला. सेल्युकस सिकंदरच्या तालमेंत तयार झालेला असून सिकंदराचीं धोरणें त्यास अवगत होतीं. त्यानें हिंदुस्थानावर स्वारी करून चंद्रगुप्ताशीं युद्ध केलें. पुढें त्या दोघांचा तह ठरून सख्य झालें. सिकंदरानंतर ४२ वर्षें सेल्युकसनें राज्य केलें. त्यानें आपल्या कारकिर्दीत मेगास्थेनीस नांवाचा एक हुषार वकील चंद्रगुप्ताकडे पाटलीपुत्र येथें पाठविला होता. हा मेगास्थेनीस सिकंदरच्या स्वारीबरोबर पूर्वी हिंदुस्थानांत आलेला होता. भागीरथी नदी व तिच्या कांठचा सुपीक प्रदेश पाहणारा पहिला युरोपियन गृहस्थ हाच असावा; व बहुतेक उत्तर हिंदुस्थानची अस्सल हकीकत युरोपमध्यें ह्यानेंच प्रथम नेली. हिंदुस्थानचें ऐश्वर्य पाहून तो अगदीं थक्क झाला. स्ट्रेबो, एरियन ( इ० स० ९०–१८० ) वगैरे ग्रीक ग्रंथकारांनीं दिलेली हिंदुस्थानची माहिती मेगास्थेनीसपासूनच घेतलेली असावी. परंतु मेगास्थेनीसच्या वर्ण-नांत काल्पनिक व असंभाव्य भाग पुष्कळ असल्यामुळें ते सर्वस्वी भरंवसे-लायक नाहींत. तो म्हणतो कीं, 'पाटलीपुत्र शहराची लांबी दहा मैल व रुंदी दोन मैल होती. सभोंवारच्या कोटास ५७० बुरूज व चौपन्न दरवाजे होते.' चंद्रगुप्ताच्या मुलाकडेही डाइमेकस नांवाचा ग्रीक वकील आला होता.

**७. मिसरचा टॉलमी फिलाडेल्फस.**—सिकंदर बादशहानें मिसर-देश काबीज केला होता, तो त्याच्या मृत्यूनंतर टालेमी नांवाच्या एका कुशल

पुरुषानें काबीज करून अलेक्झांड्रिया येथें आपली राजधानी केली व तेथें बंदरांत शुभ्र आरसपानी दगडाचा चारशें फूट उंचीचा एक भव्य दीपस्तंभ बांधिला, तो जगांतील सात आश्चर्यांपैकीं एक असें अद्यापि समजतात. ह्या राजानें नौकानयन व व्यापार ह्यांची पुष्कळ सुधारणा केली. ह्या टॉलेमीचा मुलगा टॉलेमी फिलाडेल्फस (इ. स. पू. २८५–२४७) ह्यानें तर टायर शहराचा व्यापार अलेक्झांड्रिया येथें यावा म्हणून सुवेझच्या कालव्यासारखाच १०० हात रुंद व ३० हात खोल असा एक कालवा खोदण्यास सुरुवात केली. मात्र तो कालवा हल्लींप्रमाणें सुवेझपासून भूमध्यसमुद्रास न मिळवितां आर्सिनो-बंदरापासून नीलच्या पूर्व फांट्यास नेऊन मिळवावयाचा होता. परंतु तें काम तडीस गेलें नाहीं. तथापि हल्लींचा सुवेझचा कालवा, त्या जुन्याचीच थोडी-बहुत पुनरावृत्ति आहे. कालवा तडीस गेला नाहीं तरी तांबड्या समुद्राच्या पश्चिम किनाऱ्यावर बर्निस नांवाचें बंदर त्यानें वसविलें. ह्या बंदरांत हिंदुस्थानचा माल येई; व तेथून जमिनीवरून तो माल कॉप्टॉस म्हणून नील-नदीवर एक शहर होतें तेथें जाऊन पुढें तो अलेक्झांड्रिया येथें पोंचे. बर्निस व कॉप्टॉस ह्यांजमध्यें सुमारें २५० मैल अंतर होतें. तेवढ्यांत ह्या राजानें प्रवाशांच्या सोयीचा रस्ता बांधून ठिकठिकाणीं उतारघरें बांधिलीं. ह्या रस्त्याचा उपयोग २५० वर्षेपावेतों होत होता. बर्निस येथून निघालेलीं गलबतें आरबस्तान व इराण ह्यांच्या कांठाकांठानें सिंधुनदीच्या मुखाशीं ठठ्ठा येथें येत. ठठ्ठाचें प्राचीन नांव पत्तल असें होतें. मिसरचे राजे त्या वेळीं ह्या व्यापाराच्या जोरावर फार सधन झालेले होते. टॉलेमी फिलाडेल्फस याचा वकील डायोनिसियस हा हिंदुस्थानांत मौर्य बादशहांकडे आला होता. तसेंच अशोकाचे वकील इजिप्टच्या दरबारीं गेले होते. इसवी सनाच्या आरंभीं मिसर व सिरिया हे देश रोमन लोकांच्या ताब्यांत गेले (इ. स. ४०). पाटलीपुत्र येथील पराक्रमी राजा दुसरा चंद्रगुप्त (इ. स. ३७५–४१३) ह्यानें हिंदुस्थानचा व युरोपचा व्यापार इजिप्टमधून सुरू केला, त्यामुळें उभयतांचें बरेंच दळणवळण वाढलें होतें.

**८. रोमन लोकांचे प्रयत्न.**--ग्रीक लोकांचें महत्त्व संपून तें रोमन लोकांस प्राप्त झाल्यावर त्यांच्या हातांत हा व्यापार कसा काय चालला तें सांगावयाचें. रोम व कार्थेज ह्यांचीं युद्धें झालीं त्यांस 'प्युनिक वॉर्स' म्हणतात, त्यांच्या मुळाशीं हा व्यापार आहे. कार्थेज ही मूळची फिनिशियन लोकांची वसाहत होती. भूमध्यसमुद्रांतील व्यापारावर तेथचे लोक सधन झाले. ते दर्यावर्दी व व्यापारांत कुशल असल्यामुळें त्यांची सत्ता वाढली. सिसिली बेटा-नजीक आफ्रिकेचें टोंक भूमध्यसमुद्रांत घुसलें आहे, त्यावर हें कार्थेज बंदर वसलेलें होतें. माल्टा, कॉर्सिका, सार्डिनिया, स्पेनच्या लगत्याचीं बेटें व स्पेनचा दक्षिणभाग इत्यादि प्रदेश कार्थेजच्या अमलाखालीं मोडत असत. जिब्रॉल्टर-जवळ भूमध्यसमुद्रांतून अटलांटिक महासागरांत उतरण्याचा चिंचोळा जलमार्ग आहे, त्याच्या दोन बाजूंस दोन मोठाले खडक आहेत, त्यांस हर्क्युलीझचे खांब अशी संज्ञा होती. हे खांब ओलांडून कार्थेजचे खलाशी प्रथम पलिकडे गेले; व हानो नांवाच्या कार्थेजच्या एका गृहस्थानें आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्यानें बऱ्याच प्रदेशांचा शोध लाविला. कार्थेजची संपत्ति वाढली व कांहीं काळपावेतों रोमन राज्याशीं टक्कर देण्यास त्यानें कमी केलें नाहीं. अर्थात् कार्थेजचा बहुतेक व्यापार पूर्वेकडील मालाचा होता. कार्थेजची सधनता पाहून रोमन लोकांच्या तोंडास पाणी सुटलें. त्यांनीं गलबतें वगैरे बांधून भूमध्यसमुद्रांत व्यापार सुरू केला, तेव्हां लवकरच त्याची किफायत रोमन लोकांस कळूं लागली. हिंदुस्थानांतील उंची मालावर त्यांची अतिशय आवड बसली; तेव्हां त्यांनीं आणखी नवीन गलबतें बांधिलीं, आणि कार्थेजचा संहार करून तेथें त्यांनीं आपला अंमल सुरू केला. त्या प्रांतास आफ्रिका हें नांव रोमन लोकांनींच प्रथम दिलें, तें पुढें सर्व खंडाचें नांव पडलें. पुढें रोमन लोकांनीं ग्रीस देश जिंकिला आणि आशियाखंडांतही राज्य वाढविलें. दक्षिण हिंदुस्थानांतील मदुराच्या पांड्य राजानें आपले वकील रोम येथें ऑगस्टस सीझरकडेस पाठविले होते. मदुराच्या राज्यांत मोत्यें उत्पन्न करण्याचे कारखाने असून, त्यांचा खप युरोपांत होत असे. रोमन इतिहासकार

प्लिनी ह्यानें मदुराच्या राज्याची हकीकत दिली आहे. मदुराच्या हद्दींत अलीकडे रोमन लोकांचीं सोन्याचीं भारी नाणीं व इतर हलकीं नाणीं इतकीं सांपडलीं आहेत कीं, तेथें रोमन लोकांच्या वसाहती असल्या पाहिजेत. हीं नाणीं इ. सनाच्या आरंभापासून पुढें ४०० वर्षांतलीं आहेत. सोन्याचीं रोमन नाणीं तर मदुराच्या राज्यांत हल्लींच्या इंग्रजी पौंडासारखीं चालू होतीं. ह्यावरून मलबार किनाऱ्याचा मोठा व्यापार रोमन बादशाहीशीं चालू असला पाहिजे. त्यांत विशेषतः मोत्यांचीं गणना प्रमुखत्वेंकरून आहे (व्हिन्सेंट-स्मिथ). रोमच्या सधन लोकांस हिंदुस्थानांतील उंची मालाची फार आवड होती. आरंभीं हा माल मुख्यत्वें वर सांगितलेल्या मिसर देशांतील मार्गानेंच जात असे; तथापि पुढें युफ्रेटीस नदीनें सिरियांतून भूमध्य समुद्रावर तो येण्याचा प्रघात पडला. ह्या रस्त्यानें जमिनीचा प्रवास सुमारें २०० मैल होता; व ह्या प्रवासाच्या जवळजवळ मध्यावर पाल्मीरा ऊर्फ ताडमूर हें शहर होतें. हें शहर म्हणजे व्यापाराच्या किफायतीवर वृद्धि पावलेलें एक लहानसें प्रजासत्ताक राज्यच होतें. कांहीं थोडीं वर्षें ह्या राज्याचा दरारा सभोंतालच्या राज्यांवर मोठा होता.

तांबड्या समुद्रांतील मार्गाचा उपयोग रोमन लोकांस चांगला झाला. आरंभीं ग्रीक व मिसरचे खलाशी हिंदुस्थानास भरसमुद्रांतून न येतां किनाऱ्याकिनाऱ्यानें येत असत. आरबी समुद्रांत वर्षाऋतूचे वारे नियमितपणें दोन भिन्न दिशांस वर्षभर वाहत असतात, त्यांस मॉन्सून (मोसम) असें म्हणतात, ही गोष्ट त्या खलाशांना माहीत होती. तिचा उपयोग हिप्पालस नांवाच्या एका नाखव्यानें इसवी सनाच्या दुसऱ्या शतकांत करून घेतला. रोमन इतिहासकार प्लिनी यानें त्याची हकीकत दिली आहे, तो लिहितो कीं, अलेक्झांड्रियाहून २ मैलांवर जूलिओपोलिस येथें हिंदुस्थानास जाणारा माल नील नदीवर गलबतांत चढे. तेथून ३०३ मैलांवर कॉप्टॉस येथें तो माल जाई. ह्या नील नदींतील प्रवासास १२ दिवस लागत. कॉप्टॉस येथून खुष्कीनें २५८ मैलांवर बर्निस येथें तो माल तांबड्या समुद्रांतील गलबतांवर चढे. हा

खुष्कीचा प्रवास १२ दिवसांत संपे. उष्णतेमुळें उंटांचे तांडे रात्रभर चालत व दिवसा विश्रांति घेत. बर्निसपासून आरबस्तानच्या किनाऱ्यावर गेला या स्थळीं पोंचण्यास थोडे दिवस लागत. तेथून वर्षाऋतूच्या वाऱ्यांच्या साह्यानें ते लोक ४० दिवसांत सरळ मध्यमार्गानें मलबार किनारा गांठीत. येथें मालाची विक्री करून व नवीन माल भरून ते डिसेंबरच्या सुमारास परत मिसर देशास जाण्यास निघत. अशा प्रकारें जाण्यायेण्याच्या एकंदर सफरीस त्यांस जवळ जवळ एक वर्ष लागे. ह्या मॉन्सून नांवाच्या वर्षानिलांच्या साह्यानें भरसमुद्रांतून पार जाण्याचा हा मार्ग रोमन लोकांस माहीत होता. मिसर देश रोमन लोकांनीं जिंकिल्यामुळें पूर्वेकडील व्यापार त्यांच्या ताब्यांत गेला.

सुगंधी व इतर मसाले, जवाहीर व उंची कापड, असा मुख्यतः तीन प्रकारचा माल रोमन लोक हिंदुस्थानांतून युरोपांत नेत. रोमन लोकांत प्रेतें जाळण्याची वहिवाट होती. त्या कामीं हिंदुस्थानांतील सुगंधी द्रव्यांचा ते उपयोग करीत. सिला ह्याच्या सरणास सुगंधी द्रव्यांचीं २१० ओझीं लागलीं. पांपेच्या प्रेतविधीस नीरो बादशहानें जितकीं द्रव्यें जाळलीं, तितकीं सर्व हिंदुस्थानांत एक वर्षांत पिकत नसत. ह्यांपैकीं कांहीं द्रव्यें आरबस्तानांतूनहि येत. सारांश, सर्व प्रकारचे मसाले व सुगंधी द्रव्यें आशियाच्या पूर्व किनाऱ्यावरून तों थेट पश्चिम युरोपांत जात असत. ऑगस्टस बादशहाच्या वेळेस रोममधील एका आळीचा सर्व बाजार फक्त ह्या मसाल्यांनीं व सुगंधी द्रव्यांनीं भरलेला होता. दुसरा माल म्हणजे जवाहीर. ह्यांत मोत्यें व रत्नें असे दोन प्रकार होते. प्लिनीनें निरनिराळ्या रत्नांची, त्यांच्या गुणांची व मोलाची याद दिली आहे, ती अत्यंत सूक्ष्म व भरपूर आहे. रोमन लोकांचा ऐषआराम व थाट केवळ ह्या हिंदुस्थानच्या रत्नांवर व मोत्यांवर अवलंबून होता. ब्रूटसची आई सर्व्हिलिया म्हणून होती, तिला जूलिअस सीझरनें एक मोती नजर केलें, त्या एका मोत्याची किंमत जवळ जवळ पांच लाख रुपये होती. क्लिओपॅट्राची मोत्यांच्या कर्णफुलांची एक जोडी होती, तिची किंमत १५ लाख रुपयांवर होती. हीं मोत्यें व रत्नें पूर्वेकडील सर्व देशांतून युरोपांत जात असत, तरी

हिंदुस्थानचा माल सर्वांत ज्यास्त जाई व त्याची प्रख्याति इतरांपेक्षां ज्यास्त होती. तिसरा माल रेशमी वस्त्रें. रोमन स्त्रियांना विशेषतः ह्या तलम वस्त्रांचा फार शोक होता. रेशमी कापडाची किंमत वजनानें जवळ जवळ सोन्याच्या भारंभार असे. बहुतेक रेशीम चिनांतून जाई. तें कसें तयार कारितात हें युरोपांत माहीत नव्हतें, व त्याची उत्पत्ति फार थोडी असल्यामुळें किंमत भारी असे. एरियन लिहितो कीं, लोकरीचें पातळ कापड, कापसाचीं रंगी बेरंगी वस्त्र, कांहीं जवाहीर व हिंदुस्थानांत ठाऊक नसलेलीं कांहीं सुगंधी द्रव्यें, पोंवळीं, कांचेचीं भांडीं, चांदीचे ओतींव जिन्नस, नाणीं व दारू वगैरे माल भरून मिसरचीं जहाजें ठठ्ठा येथें हिंदुस्थानांत येत व त्यांच्या बदल्यांत हिंदुस्थानांतून मसाले, जवाहीर, रेशमी कापड, कापसाचें कापड व काळे मिरीं हे जिन्नस ते युरोपांत नेत. मिसरचीं गलबतें ठठ्ठाप्रमाणेंच भडोच येथेंही येत असत. भडोचचा संबंध तगर शहराशीं होता. हें तगर निजामशाहींत धारूर नजीक असून तेथचा माल भडोच येथें येत असे. रोमन कायद्यांत हिंदुस्थानांतून येणाऱ्या जकात द्यावयाच्या जिनसांची यादी दिलेली आहे, त्यावरूनही ह्या व्यापाराचा अंदाज होतो. हिंदुस्थानांतून कच्चा माल त्या वेळीं युरोपांत फारसा जात नसे हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. रोमन लोकांस हिंदुस्थानच्या पूर्व किनाऱ्यावरील बंदरांची फारशी माहिती नव्हती. तथापि त्या बंदरांतला व इतर माल खुष्कीनें पश्चिम किनाऱ्यावर येऊन तेथून युरोपांत जाई. ऑगस्टस बादशहाच्या कारकिर्दींत लिहिलेला स्ट्रेबोचा ग्रंथ पाहिला, तर पूर्व हिंदुस्थानची माहिती त्यास चांगलीशी नव्हती. त्यानंतर पन्नास वर्षांनीं झालेला प्लिनी ह्यासही ती माहिती नव्हती. त्यानंतर सुमारें ऐशीं वर्षांनीं लिहिलेली टालेमीची हकीकत उपलब्ध आहे, ती भूगोलशास्त्रासंबंधानें फारच महत्त्वाची आहे. पश्चिमेकडील पहिला प्रसिद्ध ज्योतिषज्ञ हा टालेमीच होय.

९. **इराण.**—इराण देश आरंभीं स्वतंत्र होता तेव्हां त्याची मोठी भरभराट होती. तेथील पराक्रमी राजा डरायस यानें आपल्या राज्याचे व आजूबाजूचे सर्व भाग तपासून पाहिले व हिंदुस्थानची माहिती मिळविण्याविषयीं

फार परिश्रम केले. सायलॅक्स् नांवाच्या सरदारास फौजेसह हिंदुस्थानांत पाठवून सिंधु नदीच्या प्रवाहांत कोठपर्यंत गलबतें जाऊं शकतील हें त्यानें तपासून आणिलें. हिंदुस्थानचा प्रदेश सुपीक व शेतकी उत्तम स्थितींत असून लोक शांत व सधन आहेत असें या सरदारानें डरायस ह्यास कळविल्यावर, त्यास ह्या देश जिंकिण्याची अत्यंत उत्कंठा झाली. त्याप्रमाणें स्वारी करून त्यानें सिंधु नदीपर्यंतचा प्रदेश काबीज केला. त्या वेळीं डरायसच्या राज्याचा एकंदर वसूल जितका होता, त्याचा एकतृतीयांश भाग फक्त ह्या नवीन जिंकलेल्या मुलखांतून त्यास मिळत असे. एवढ्यावरून हिंदुस्थानच्या सुस्थितीची कल्पना होते.

पुढें सिकंदर बादशहानें इराण देश जिंकला व त्याच्या अनुयायांनीं इराणांत नवीन राजघराणें स्थापन केलें. पण तें फार दिवस टिकलें नाहीं. पार्थिया म्हणून इराणच्या पूर्वेकडील एक भाग होता, तेथच्या लोकांच्या हातीं पुढें इराणचें राज्य गेलें. त्यास पार्थियन घराणें असें म्हणतात. हें घराणें सुमारें सहाशें वर्षें टिकलें. पुढें इ. सनाच्या तिसऱ्या शतकांत आर्देशीर व शापुरी ह्या दोन राजांनीं पहिल्या इराणी वंशाची पुनः स्थापना केली. आर्देशीर ह्यास आर्टाक्झार्झिस (इ. स. २२६–२४०) व शापुरी यास सापोर ( इ. स. २४०–२७१ ) या नांवांनीं युरोपियन लेखक संबोधितात. ह्या दोन राजांच्या कारकिर्दीत इराण व चीन ह्यांचें दळणवळण विशेष वाढलें. मानी नांवाच्या एका इराणी धर्मसुधारकानें चीन देशांतून कलाकौशल्याचे व कारागिरीचे जिन्नस इराणांत आणून तेथें त्यांचा प्रसार केला ( इराण,–राष्ट्रकथामाला ). त्या वेळेपासून इराणी लोक व्यापाराच्या कामांत पुढें सरसावले. पूर्वी त्यांस जलप्रवासाचा बाऊ वाटे. तो नाहींसा होऊन, ते जलमार्गानें हिंदुस्थानचा व चीनचा जो व्यापार कास्पियन समुद्रावरून व युफ्रेटीस नदीच्या खोऱ्यांतून युरोपांशीं चालू होता, ते दोनही मार्ग इराणी लोकांनीं आपल्या हस्तगत केले. पूर्वी ग्रीक लोकांशीं इराणी बादशहाचा झगडा चांगला शेंदोनशें वर्षें निकरानें चालला, त्याचें मूळ कारण ह्या व्यापाराची किफायत होय.

रोमन लोक पुष्कळ ऐषआरामी असल्यामुळें त्यांस इकडील जिनसांची विशेष जरूर पडे; आणि ते जिन्नस युरोपास पुरविण्याचें काम इराणी व्यापाऱ्यांच्या ताब्यांत गेल्यामुळें, ते सधन झाले, आणि आपण आणिलेल्या मालाची किंमत ते मर्जीमाफक वाटेल ती मागूं लागले. रोमन बादशहा ऑरेलियन याच्या कारकिर्दीत (इ. स. २७०–२७५) रोम शहरांत एक पौंड (४० तोळे) वजन रेशमी कपडयाची किंमत बारा औंस ह्मणजे तीस तोळे सोन्याइतकी पडे. (Smith's Students' on Gibbon, 300). आपणास रेशमाची तर विशेष जरूर; ह्या महत्वाच्या जिनसांचा संपूर्ण मक्ता पार्थियन व्यापाऱ्यांच्या हातांत; खुष्कीचा मार्ग व जलमार्ग दोनही ठिकाणीं तेच प्रबळ; ह्या व्यापारांत आपल्या देशाची संपत्ति हे परधर्मी व्यापारी धुऊन नेत आहेत, ह्याचा जस्टिनियन बादशहास (इ. स. ५२७–५६५) विशेष खेद वाटला. असा हा प्रकार शेंदोनशें वर्षे चालू होता. जस्टिनियन बादशहा पराक्रमी होता. त्यानें इराणी लोकांचा व्यापार बुडविण्यास अनेक युक्त्या केल्या.

हिंदुस्थानांत मलबार किनाऱ्यावर सेंट टॉमस येथें खिस्ती लोकांचे मठ होते. तसेंच इराणांतील दोन खिस्ती पाद्री चीन देशांत नांकिन येथें फार दिवस राहत होते. त्या वेळीं सीलोन व चीन ह्यांजमध्यें दळणवळण चालू होतें. त्या खिस्ती पाद्यांनीं चिनी लोकांचीं रेशमी वस्त्रें पाहून, त्यांची उत्पत्ति किड्यांपासून कशी होते हें शिकून घेतलें. पुढें धर्मप्रसाराकरितां ह्मणा, किंवा पैशाच्या लालचीनें ह्मणा, ते युरोपांत जाऊन जस्टिनियन बादशाहास भेटले. त्यानें त्यांस पैशाची मदत देऊन हे किडे आपल्या राज्यांत येतील तर त्यांस मोठें बक्षिस देण्याचें कबूल केलें. त्यावरून ते पाद्री चिनांत गेले; तेथें त्यांनीं रेशमाच्या किड्यांची सर्व माहिती शिकून घेतली; व बांबूच्या नळकांड्यांतून ते किडे चोरून त्यांनीं युरोपांत नेऊन बादशहास दिले; आणि तेथें मलबेरी म्ह० तुतीच्या झाडांची लागवड सुरू केली. ह्याप्रमाणें ह्या झाडांची व किड्यांची लागवड ग्रीस देशांत व विशेषतः पेलापोनेसस प्रांतांत विशेष पसरली. ग्रीस देशांतून ह्या उद्योगाची प्रसृति सिसिली बेटांत झाली व

तेथून इटलींत गेली. तेव्हांपासून चीनचें रेशीम मागें पडलें व युरोपियन व्यापारी रेशमाच्या धंद्यांत पुढें सरसावले.

**१०. आरब मुसलमानांचा उद्योग.**—आरब लोक प्राचीन काळापासून आरबस्तानांत राहणारे. महंमद पैगंबराच्या जन्मापूर्वी आरबस्तानाच्या बाहेर जाण्याचा त्यांचा परिपाठ नव्हता. महंमदासारखा चतुर पुढारी मिळाल्यावर त्यांचें राष्ट्र प्रबल झालें, आणि नवीन धर्माच्या छत्राखालीं त्याची भरभराट होऊन सभोंवतालचे प्रदेश आरबांनीं जिंकिले. दर्यावर्दी कामांतही त्यांनीं पुढाकार मिळविला, त्या योगानें पूर्वेकडील सर्व व्यापार लवकरच त्यांच्या ताब्यांत गेला. धर्मप्रसारांत व देश जिंकण्यांत ते जसे शूर व कडवे होते, तसेच व्यापाराच्या कामांतहि कुशल होते. मुसलमानांचा अंमल ज्या ज्या देशांत पसरला, तेथें जमिनीवरचा प्रवास वाढला, तेणेंकरून व्यापारही वाढला. मक्केच्या यात्रेस जाण्याची सर्व मुसलमानांस महंमदाची सक्त ताकीद होती. यात्रेकरूंबरोबर व्यापारी लोकही प्रवास करूं लागले. मक्केच्या जत्रेएवढी मोठी जत्रा भूतलावर दुसऱ्या कोठें झाली नाहीं. त्या जत्रेंत कोट्यावधि रुपयांची घडामोड चाले. खलीप उमर ह्यानें इराण देश जिंकल्यावर तेथचा व्यापार आपल्या ताब्यांत राहवा ह्मणून त्यानें बसरा शहर वसविलें तें पुढें फार प्रसिद्धीस आलें. मिसरचे व्यापारी सिलोनच्या पलीकडे जात नसत, पण हे आरब खलाशी थेट चीनपर्यंत स्वतः जाऊन तिकडचा माल आणीत. इराण देश मुसलमानांनीं जिंकल्यावर सुमारें दोनशें वर्षांनीं लिहिलेला एका आरबी प्रवाश्याचा ग्रंथ उपलब्ध आहे, त्यावरून त्या वेळच्या व्यापाराची बरीच माहिती मिळते. त्या प्रवाश्यानें आपली सफर इ. स. ८५१ त केली; व दुसऱ्या एका आरब प्रवाश्याच्या हकीकतीचें त्यास प्रत्यंतर मिळून त्या दोहोंवरून आरबांच्या उद्योगाची माहिती साधार मिळते. आरब खलाशांस होकायंत्र ठाऊक नव्हतें, ह्मणून ग्रीक व रोमन लोकांप्रमाणेंच ते किनाऱ्याकिनाऱ्यानें प्रवास करीत. सयाम, सुमात्रा, पूर्वेकडील द्वीपसमूह इत्यादि ठिकाणीं जाऊन चिनांत कांतान येथें ते जात आणि तेथचा माल

इराणच्या अखातांत आणीत. पुष्कळ आरब लोक हिंदुस्थानांत व पूर्वेकडील देशांत वस्ती करून राहिले. कांतान येथें त्यांची वस्ती इतकी वाढली कीं चीनच्या बादशहानें त्यांच्या न्यायनिवाड्याकरितां एक मुसलमान काजी नेमून दिला. पुष्कळ ठिकाणच्या लोकांस ते मुसलमानी धर्माची दीक्षा देत. बहुतेक मोठमोठ्या बंदरांत आरबी भाषा प्रचारांत आली. चिनी मातीच्या भांड्यांची माहिती प्रथमतः आरबांनीं हिंदुस्थानांत आणिली. चहा व त्याचा उपयोग चीन देशांत नवव्या शतकांत सार्वत्रिक होता, तो ह्या आरब प्रवाश्यांनीं बाहेरच्या राष्ट्रांस माहीत करून दिला. हिंदुस्थानांतील स्थलांची व जिनसांची माहिती तर ह्या आरबांनीं इत्थंभूत मिळविली. हिंदु लोकांचें ज्योतिषशास्त्र परिणत असून त्यांत हिंदूंची बरोबरी करणारे कोणी नव्हते. तें शास्त्र व गणितशास्त्र आरबांनीं बाहेर पोहोंचविलें.

इराणांतले मुसलमान व्यापारांत पुढारी झाले, त्याप्रमाणें इराणचे क्रिस्ती लोकही मागें राहिले नाहींत. नेस्टोरियन क्रिस्ती पंथ इराणांत बराच वृद्धि पावला होता. त्याच्या शाखा हिंदुस्थानाच्या दक्षिण भागीं व सिलोनांतही पसरल्या होत्या. आरब खलाशांच्या साह्यानें क्रिस्ती पंथ बाहेर फैलावले. चिनांतही त्यांची संख्या बरीच झाली. पण त्या सर्वांचा नेस्टोरियन धर्मगुरु इराणांत असल्यामुळें, निरनिराळ्या ठिकाणीं लागणारे पाद्री इराणांतूनच पाठविण्यांत येत. पुढें दोन तीनशें वर्षांत सिंधु नदीपासून भूमध्यसमुद्रापर्यंतचे बहुतेक प्रदेश आरबांनीं जिंकून पूर्वेकडे होणारा युरोपीयनांचा संचार बंद केला. मिसर देश मुसलमानांच्या ताब्यांत गेल्यामुळें अलेक्झांड्रिया बंदरांत ग्रीक वगैरे युरोपीयन राष्ट्रांचा शिरकाव होईना, आणि त्यांस पूर्वेकडील माल मिळेना. तेव्हां चिनांतून उत्तरेच्या मार्गानें माल जाण्याचा कास्पियन समुद्रावरील रस्ता विशेष प्रचारांत आला. तथापि हा रस्ता अवघड व लांबीचा असल्यामुळें अगदीं थोडा व मोलवान माल तेवढाच तिकडून जाऊन पुढें तो काळ्या समुद्रांतून कॉन्स्टांटिनोपलवर येऊन युरोपास मिळे.

अशा रीतीनें मुसलमानांकडून क्रिस्ती राष्ट्रांचा युरोपांत कोंडमारा झाला, तो निकरावर आल्याशिवाय राहिला नाहीं. मुसलमानांनीं भूमध्यसमुद्रांत प्रवेश करून आफ्रिकेचा उत्तर किनारा काबीज केला; पश्चिमेकडचे पोर्तुगाल व स्पेन देश त्यांनीं हस्तगत केले. पूर्वेकडून सिसिली बेटापर्यंत ते पोंचले. ह्या सर्व चळवळीचें मुख्य बीज धर्मद्वेष व राज्यतृष्णा होय हें जरी खरें आहे, तरी त्याच्या मुळाशीं व्यापाराची किफायत हें कारण होतें. व्यापारावरच मुसलमान सधन होऊन लढण्यास उद्युक्त झाले. पश्चिम युरोपांतील राष्ट्रांस हा कोंडमारा खपला नाहीं. लवकरच इतिहासाचा ओघ बदलला आणि पश्चिम आशिया व पूर्व यूरोप हे भाग तुर्कांच्या ताब्यांत गेल्यामुळें नवीन क्रान्ति घडून आली. तिचें स्वरूप आतां पुढील प्रकरणांत सांगावयाचें आहे.

# प्रकरण दुसरें.

## युरोपीयनांची पहिली धडपड.

१ इटलींतील प्रजासत्ताक संस्थानें. २ क्रिस्तीमुसलमानांचीं धर्मयुद्धें. (१०९५–१२७२).
३ हंस-संघ (Hanseatic League).
४ रुब्रुकी व मार्को पोलो ह्यांचे प्रवास. ५ पूर्वेकडील व्यापाराची नाकेबंदी.
६ अमेरिका व हिंदुस्थान यांचे शोध. ७ प्राच्य प्रश्नाची किल्ली.

**१. इटलींतील प्रजासत्ताक संस्थानें.**—पश्चिम युरोपांतील क्रिस्ती राष्ट्रांच्या ताब्यांत पूर्वेकडील व्यापार जाण्यापूर्वी इटलींतील कित्येक प्रजासत्ताक राज्यांनीं तो व्यापार हस्तगत केला होता, त्याची थोडी हकीकत इतिहासपूर्ततेसाठीं प्रथम सांगितली पाहिजे. अकराव्या शतकापासून पंधराव्या शतकापर्यंत इटलीमध्यें कित्येक नगरराज्यें भरभराटीस आलीं. त्यांची

रचना प्रजासत्ताक असून व्यापारामुळें व पैशाच्या देवघेवीमुळें त्यांस दोन चारशें वर्षेपर्यंत मोठें महत्त्व प्राप्त झालें. ह्या नगरांत जिनोआ, फ्लॉरेन्स व व्हेनिस हीं प्रमुख होतीं. **अमाल्फी** ( Amalphi ) नांवाचें शहर इटलीचे दक्षिण किनाऱ्यावर आहे, तें प्रथम प्रसिद्धीस आलें. त्याचीं मोठमोठीं व्यापाराचीं गलबतें असून तीं मिसर वगैरे देशांत माल आणण्यासाठीं जात असत. भूमध्यसमुद्रावर फिरणाऱ्या व्यापारी गलबतांच्या व्यवहारांचे नियम प्रथमतः अमाल्फी येथील कायदेपंडितांनीं बांधून दिले. ह्या नियमांची पहिली बजावणी इ. स. १०१० त सुरू झाली. इ. स. १२०० च्या सुमारास जिनोआ व पीसा ह्या दोघांनीं अमाल्फीचा नाश केला.

दुसरें भरभराटीस आलेलें शहर **पीसा** होय. आठव्या शतकांत मुसलमानांनीं सार्डीनिया बेट जिंकिलें, तेव्हां तेथील व्यापाऱ्यांनीं पीसा येथें येऊन वसाहत केली. हे व्यापारी पुढें स्पेन, आफ्रिका व आशिया इत्यादि ठिकाणीं व्यापार करून गबर झाले. क्रिस्ती मुसलमान यांजमध्यें चाललेल्या धर्मयुद्धांत सामील होऊन पीसाच्या व्यापाऱ्यांनीं व्यापार व संपत्ति वाढविली. इ. स. १२८४ पासून इ. स. १४०६ च्या दरम्यान जिनोआ व फ्लॉरेन्स ह्यांनीं पीसाचा नाश केला.

तिसरें शहर **फ्लॉरेन्स** होय. हें स. १२५४ चे सुमारास व्यापाराचे योगानें विख्यात झालें. येथचे कोष्टी व सोनार फार नामांकित होते. स. १४३४ त मेडिसाय नांवाच्या घराण्याकडे फ्लॉरेन्सचा राज्यकारभार गेल्यावर, त्या शहराचा लौकिक फार वाढला. ह्या घराण्याचा मूळपुरुष गिओवन्नी (Ciovanni) हा मोठा धनाढ्य सावकार होता. त्याचा मुलगा कास्मो ह्यानेंही मोठा लौकिक संपादन केला. फ्लॉरेन्सच्या राज्यकारभारांत ह्याचें वजन फार होतें. कास्मोचा मुलगा लॉरेन्झो (स. १४४८–९२) हा तर फारच नामांकित झाला. विद्वत्ता, उद्योग, औदार्य, इत्यादि गुणांनीं त्याचें नांव युरोपांत अजरामर झालें आहे. उत्तमोत्तम ग्रंथकार, कवि व कारागीर लॉरेन्झोच्या पदरीं असत. त्याचा एक मुलगा पुढें दहावा लिओ नांवाचा पोप झाला ( स. १५१३ ). पोप सातवा

क्लेमंट हाही त्याच घराण्यांतील होय ( स. १५२३ ). फ्लॉरेन्सचा राज्यकार-भार कित्येक वर्षेपर्यंत त्याच घराण्याकडे होता. उदार व धार्मिक कृत्यांत फ्लॉरेन्सच्या व्यापाऱ्यांची बरोबरी मोठमोठ्या राजांकडूनही होत नसे.

फ्लॉरेन्सची भरभराट व्यापारावर झाली. हा व्यापार म्हणजे मुख्यतः पैशाची देवघेव होय. तसेच रेशमी वगैरे उंची वस्त्रांचाही व्यापार तेथे होत असे. फ्लॉरेन्स शहर इटलीच्या मध्यभागीं आहे; त्यास समुद्रकिनारा नाही म्हणून गलबतांच्या योगानें चालणारी परकीय मालाची नआण फ्लॉरेन्सच्या हातांत आली नाही. मात्र तेथें कलाकौशल्य फार वाढलें. मुख्यतः सर्व युरोपच्या पैशाची देवघेव फ्लॉरेन्स येथे होत असे. आपल्या येथल्याप्रमाणे फ्लॉरेन्स शहरात व त्या वेळच्या बहुतेक युरोपियन राष्ट्रात प्रत्येक धंद्याच्या जाती ऊर्फ संघ बनलेले होते. प्रत्येक संघाचे नियम ठराव असून त्यात परक्यांचा प्रवेश होत नसे. ह्या संघाच्या योगाने हरएक कसब उत्कृष्ट स्थितीस पोचून त्यास परकीयाची चढाओढ सोसावी लागत नसे. लोकरीचे व रेशमी कापड करणारे कोष्टी, सोनार, जवाहिऱ्ये वगैरे कसबी लोक फ्लॉरेन्स-सारखे दुसरे कोठें नव्हते. त्यांनी तयार केलेला माल फ्लॉरेन्समधून सर्व युरोपास मिळत असे. पण फ्लॉरेन्सचा मुख्य व्यापार पेढीचा होय. युरोपच्या सर्व राजास फ्लॉरेन्सच्या व्यापाऱ्याकडून कर्ज मिळे. इंग्लंडच्या तिसऱ्या एड्वर्ड राजाने चौदाव्या शतकात फ्रान्सशी युद्ध चालविलें, त्याच्या खर्चास त्या राजाने फ्लॉरेन्सकडून कर्ज घेतले होतें. बार्डी म्हणून एक फ्लॉरेन्सचा व्यापारी होता, त्या एकट्यापासून एड्वर्डनें तीस लाख व पेरूझी नावाच्या दुसऱ्या व्यापाऱ्यापासून वीस लाख रुपये कर्ज घेतले होतें. व्यापाराबरोबरच विद्या आणि कला ह्यांची फ्लॉरेन्समध्ये भरभराट होऊन तेथे मोठमोठे नामांकित कवि, ग्रंथकार व मूर्तिकार उदयास आले. पुढें पीसा बंदर फ्लॉरेन्सच्या ताब्यांत गेलें, तेव्हां समुद्रावरील व्यापारही कांहीं दिवस फ्लॉरेन्सच्या ताब्यांत होता.

**व्हेनिसचा** उदयही असाच आहे. इटली देशावर उत्तरेकडील रानटी लोकांनीं स्वाऱ्या केल्या, तेव्हां पूर्व किनाऱ्यावरील कित्येक लोक आपलीं घरेंदारें सोडून आड्रिआटिक समुद्राच्या माथ्याशीं सुमारें सत्तर ओसाड व नापिक बेटें होतीं तेथें जाऊन राहिले. ह्या ठिकाणीं मीठ व मासे ह्या दोन जिनसांचा व्यापार त्यांनीं सुरू केला. त्यावर ते इतके श्रीमंत झाले कीं, सातआठशें वर्षपावेतों व्हेनिसइतकें धनाढ्य व शक्तिमान् शहर युरोपांत दुसरें नव्हतें. त्या शहराची रचना अनेक बेटांवर झालेली असून, त्यांत रस्त्यांऐवजीं होड्यांतून फिरण्याचे कालवे आहेत. सर्व व्यवहार होडीनें चालतो. ह्या होड्यांस गोंडोला असें ह्मणतात. त्या वेळीं खाणीचें मीठ लोकांस ठाऊक नव्हतें. उपासाच्या दिवसांत ख्रिस्ती लोक मासळीशिवाय दुसरें कांहीं खात नसत; तसेंच हिंवाळ्यांत इतर जनावरांचें मांस मिळण्यास मुष्कील पडे, त्यायोगें मासळीचा खप विशेष होई. त्यामुळें मीठ व मासळी ह्या दोन मुख्य जिनसांवर व्हेनिसची भरभराट झाली. ह्या जिनसांचा खप युरोपांत सर्व ठिकाणीं होत असे. स. ६९७ त व्हेनिस येथें प्रजासत्ताक राज्य स्थापन झालें. राज्य चालविणाऱ्या सभेचा अध्यक्ष असे, त्यास डोज (doge) असें म्हणत. ह्या डोजांचा वाडा, त्यांच्या कचेऱ्या, न्यायासनें, मनोरे, रिआल्टो नांवाचा देवघेवीचा बाजार, पुतळ्यांचे व कांचेच्या जिनसांचे कारखाने व प्रदर्शनें इत्यादि व्हेनिसचे प्रकार पाहून अजूनही मन थक्क होतें.

व्हेनिसच्या ह्या भरभराटीचें मुख्य कारण समुद्रावरील व्यापार होय. मिसर, सिरिया इत्यादि प्राच्य देशांशीं व्हेनिसच्या सरकारानें स्नेह संपादिला, व पूर्वेकडून युरोपांत येणाऱ्या सर्व मालाची नेआण आपल्या हातांत घेतली. ह्यामुळें व्हेनिस हें सर्व दक्षिण युरोपाची मुख्य पेठ बनली. नौकाशास्त्रांत त्या वेळीं व्हेनिसची प्रगति फार होती. व्यापारी गलबतांस चांचे लोकांकडून उपद्रव होत असे, तो बंद करण्याकरितां व्हेनिसच्या सरकारानें एक प्रचंड लढाऊ आरमार तयार केलें. भूमध्यसमुद्रांत ह्या आरमाराचा मोठा दरारा होता. चौदाव्या शतकांत व्हेनिसचीं व्यापारी गलबतें, लहान मोठीं म्हणजे १०

टनेपासून १०० टन आकाराचीं, तीन हजार होतीं. शिवाय मोठीं लढाऊ गलबतें चाळीस असून त्यांवर अकरा हजार फौज होती. क्रिस्ती व मुसलमान ह्यांजमध्यें धर्मयुद्धें झालीं, त्यांत युरोपांतील क्रिस्ती फौजा आशियांत आणून पोंचविण्याचें काम व्हेनिसनें केलें. ह्या नेआणींत त्यास पुष्कळ किफायत होऊन शिवाय व्यापारही वाढला. पूर्वव्यापाराचें मुख्य नाकें जें कॉन्स्टांटिनोपल तें व्हेनिसच्या ताब्यांत आलें. कांन्स्टंटाइन बादशहाच्या वेळेपासून त्या शहरांत अपार संपत्ति व जगांतील उत्कृष्ट उत्कृष्ट चिजा यांचा संचय झाला होता, तो व्हेनिसच्या हस्तगत झाला.

पंधराव्या शतकाचे आरंभीं व्हेनिसच्या भरभराटीची परमावधि झाली. त्या वेळीं सालीना वीस हजारपासून सवा लाख रुपये उत्पन्नाचे निदान हजार तरी सावकार व्हेनिस येथें होते. शहरची लोकसंख्या दोन लाख असून फ्लॉरेन्सप्रमाणें पैशाच्या देवघेवीचा व्यापारही मोठा चालत असे. सर्व देशचीं जहाजें व सर्व देशचे लोक व्हेनिस येथें दृष्टीस पडत. युरोपांत भोजनवसतिगृहें प्रथम व्हेनिस येथें सुरू झालीं. पहिलीं होटेल तेथें स. १३१९ व १३२४ ह्या वर्षी निघालीं.

व्हेनिसप्रमाणेंच **जिनोआ** शहर व्यापारामुळें भरभराटीस आलें. हें इटलीच्या वायव्य कोपऱ्यांत मोठें बंदर आहे. क्रिस्ती मुसलमानांच्या धर्मयुद्धांत जिनोआस मोठीच किफायत होऊन त्यावर जिनोआची भरभराट झाली. पुढें व्हेनिस व जिनोआ ह्यांजमध्यें स्पर्धा उत्पन्न होऊन युद्ध सुरू झालें, त्यांत दोघांचाही नाश झाला. व्हेनिसचीं व्यापाराचीं ठाणीं ठिकठिकाणीं होतीं, तेथें नजीकच जिनोआनें आपलीं ठाणीं बसविलीं, त्यामुळें व्हेनिसचें नुकसान होऊं लागलें. शेवटीं युरोपांतून हिंदुस्थानास येण्याचा समुद्रमार्ग वास्कोडगामानें काढिला, व स. १५१७ त इजिप्ट देश मुसलमानांच्या हातांत गेला, ह्या कारणांनीं व्हेनिस व जिनोआ ह्या दोघांचाही एकदांच नाश झाला.

२. **क्रिस्ती मुसलमानांचीं धर्मयुद्धें**—(स. १०९५–१२७२) त क्रिस्ती व मुसलमान यांजमध्यें धर्मयुद्धें झालीं, त्यांमुळें आशिया व युरोप यांजमधील व्यापारावर काय परिणाम घडला तें समजण्याकरितां वरील

हकीकत दिली आहे. आशियाच्या पश्चिमभागीं पालेस्टाईन प्रांतांत जरुसलेम शहर आहे, तें येशू क्रिस्ताचें चरित्रस्थळ म्हणून क्रिस्ती लोक पवित्र मानतात. तें मुसलमानांच्या ताब्यांत गेल्यामुळें त्या ठिकाणीं दर्शनास जाणाऱ्या क्रिस्ती लोकांस मुसलमानांपासून जाच होऊं लागला; पीटर नांवाचा फ्रान्स देशांतील एक क्रिस्ती साधु जरुसलेम येथें आला असतां, आपल्या धर्मबांधवांचे हाल पाहून त्याचें अंतःकरण कळवळलें. तसाच तो परत निघून युरोपांतील सर्व क्रिस्ती राष्ट्रांच्या दरबारीं फिरत गेला व यात्रेकरूंचा मुसलमानांपासून बचाव करण्यासाठीं त्यानें सर्वांना मोठ्या कळकळीची प्रार्थना केली. ती लक्षांत आणून क्रिस्ती राष्ट्रांनीं आशियांत जाऊन जरुसलेम काबीज करण्याची सिद्धता केली, आणि सर्वांनीं एकमत करून मुसलमानांशीं युद्ध सुरू केलें. ह्या युद्धांस क्रूझेडस् ह्मणजे धर्मयुद्धें असें ह्मणतात. हीं इ. स. १०९५ पासून १२७२ पर्यंत चाललीं. त्यांत सात मोठमोठीं युद्धें होऊन अखेरीस मुसलमानांसच जय मिळाला. पूर्वेकडील व्यापाराचें मध्य ठिकाण जो आशियाचा पश्चिम भाग सिरिया वगैरे देश, ते काबीज करण्याचा, ह्मणजे पर्यायानें जगाचा व्यापार आपल्या ताब्यांत ठेवण्याचा, पश्चिम युरोपांतील क्रिस्ती राष्ट्रांचा विचार होता; पण तो ह्या युद्धांनीं तडीस गेला नाहीं. मात्र पूर्वेकडील चाली रीतींची, उत्पन्नांची व व्यापारी मालाची क्रिस्ती राष्ट्रांस प्रत्यक्ष ओळख पूर्वी नव्हती ती या युद्धांनीं झाली. तथापि कान्स्टांटिनोपल मुसलमानांच्या हातांत पडेपर्यंत उत्तरेच्या मार्गानें बराच व्यापार युरोपाशीं प्रत्यक्षपणें चालत असे. धर्मप्रसारासारखें एकादें मोठें काम लोक हातीं घेतात, तेव्हां त्याच्या मुळाशीं पैशाच्या किफायतीचा अंतस्थ हेतु कसा असतो, हें पाहणें असल्यास वरील धर्मयुद्धाचें उदाहरण उत्तम आहे. मक्केस यात्रेकरू जात, तेही व्यापार करीत. क्रिस्ती मुसलमानांच्या वरील धर्मयुद्धांत क्रिस्ती लोकांना आरंभीं बरेंच यश येत गेलें. सुमारें दोनशें वर्षें जरुसलेम क्रिस्त्यांचे ताब्यांत होतें; व कॉन्स्टांटिनोपल पन्नास वर्षें होतें. एवढ्या अवधींत परराष्ट्रांच्या घडामोडी व संपत्तीचे उगम पाहण्याची संधि क्रिस्ती राष्ट्रांस मिळाली. अँटिओक,

डायर वगैरे भरभराटीचीं शहरें त्यांच्या हस्तगत होऊन तेथचे सधन व लक्षाधीश व्यापारी त्यांच्या दृष्टीस पडले. पूर्वेकडील उंची मालाच्या उतार-पेठा पाहून क्रिस्त्यांची धनतृष्णा प्रदीप्त झाली; आणि त्याचा फायदा पुष्कळांनीं करून घेतला. क्रिस्ती फौजा ह्या युद्धांत दोनशें वर्षें लढत होत्या, त्यांच्याबरोबर बाजारबुणगे, व्यापारी व इतर लोक प्रदेश पाहण्याच्या, व्यापार करण्याच्या, किंवा ज्ञान मिळविण्याच्या उद्देशानें पुष्कळच जात असत. अशा लोकांस युद्धाची परवा नसून, व्यापार व पैसा हाच त्यांचा मुख्य उद्देश होता.

या युद्धांत क्रिस्ती राष्ट्रांनीं इटलींतील वर सांगितलेल्या दर्यावर्दी राज्यांची मदत घेतली. सर्व राष्ट्रांच्या फौजा कान्स्टांटिनोपल येथें जमावयाच्या व तेथून सर्वांनीं मिळून जरुसलेमवर स्वारी करावयाची, असा संकेत ठरला. ह्या कामीं गलबतांची अत्यंत जरूर असून, पुरेशीं गलबतें फक्त व्हेनिस व जिनोआ यांजपाशींच होतीं. ह्या जहाजांच्या मदतीशिवाय एवढ्या फौजेस दारूगोळा व पोटगी पुरण्याचा संभव नव्हता. म्हणून प्रथमतः सर्व राजांनीं ह्या इटालियन संस्थानांशीं सख्य जोडून त्यांची मदत घेतली. त्या संस्थानांनींही मदत देण्याचें कबूल केलें, तें केवळ व्यापारवृद्धीच्या आशेवर होय. त्या वेळीं नौकानयनकलेंत हीं राष्ट्रें अग्रगण्य होतीं. त्यांनीं धर्मयुद्धास जाणाऱ्या फौजा आड्रिआटिक समुद्रांतून पलीकडे डाल्मेशियाच्या किनाऱ्यावर नऊन पोंचविल्या; तेथून पुढें त्या फौजा किनाऱ्या किनाऱ्यानें जमिनीवरून जात; व वरील गलबतें सर्व सामुग्री घेऊन त्यांस मदत करण्याकरितां त्यांजबरोबर समुद्रांतून चालत. या सफरी करितांना प्रत्येक बंदरांत तीं आपला व्यापार चालवीत. क्रिस्ती फौजांनीं एखादें स्थळ शत्रूपासून काबीज केलें, म्हणजे तेथें ह्या मदतनीस संस्थानांस विशिष्ट सवलती मिळत. त्या ठिकाणीं व्यापार करण्याची पूर्ण मोकळीक असावी; त्यांच्या व्यापारावर जकात मुळींच माफ असावी किंवा थोडी असावी; कांहीं शहरांच्या आजूबाजूच्या स्थळांची किंवा शहरांतील कांहीं पेठांची लूट त्यांस मिळावी; व आपल्या हद्दींत राहणाऱ्या कोणत्याही इसमाचा न्याय परकीयांकडे न जातां त्यांनीच करावा. अशा प्रकारच्या सवलती

घेऊन हे इटालियन व्यापारी धर्मयुद्धांत सामील झाले, त्या योगें ते सधन झाले. त्यांनीं आपला व्यापार वाढविला; व पूर्वेकडील नवीन नवीन वस्तु यूरोपच्या बाजारांत विक्रीस आणून त्याबद्दल यूरोपांत त्यांनीं नवीन अभिरुचि उत्पन्न केली.

चवथ्या धर्मयुद्धांत तर व्हेनिस व जिनोआ ह्या राज्यांचा मोठाच फायदा झाला. मुसलमानांशीं लढण्याचें सोडून सर्व क्रिस्ती राष्ट्रांनीं प्रथम कान्स्टांटिनोपलची ग्रीक बादशाही बुडवून तेथें लाटिन घराण्याची स्थापना केली ( इ. स. १२०४ ). हें नवीन घराणें सत्तावन वर्षे टिकलें; व पुनरपि स. १२६१ त ग्रीक घराण्याची स्थापना झाली. ह्या दोनही घडामोडींत इटालियन संस्थानांचा मोठा फायदा झाला. पहिलींत त्यांनीं कान्स्टांटिनोपल शहर लुटलें; व त्या राज्याचे चार भाग करून, त्यांनीं त्यांतील एक भाग नवीन पादशाहास दिला; बाकीचे तीन सर्वांनीं वांटून घेतले. त्यांत व्हेनिसच्या लोकांनीं पसंत केलेला भाग व्यापाराच्या सोईचा विशेष होता. रेशीम उत्पन्न होणारा पिलापोनेसस व पूर्व द्वीपसमूहापैकीं कित्येक सुपीक व विस्तीर्ण बेटें व्हेनिसनें घेतलीं; आणि आड्रिआटिक समुद्रापासून तों कान्स्टांटिनोपलपावेतों सर्व किनाऱ्यावर आपलीं व्यापाराचीं व लष्करी ठाणीं बसविलीं. कित्येक व्हेनिशन व्यापारी कान्स्टांटिनोपल येथेंच येऊन राहिले; आणि तेथचा सर्व व्यापार त्यांनीं आपल्या हातांत घेतला. इतर राजांचें लक्ष व्यापाराकडे नसल्यामुळें व्हेनिशन लोकांचा हा कावा चांगला साधला. प्रथमतः व्हेनिशन व्यापाऱ्यांनीं सर्व रेशमाचा मक्ता आपल्या कबजा घेतला. रेशमी कपड्याचें कसब स्वतः शिकून त्यांनीं आपल्या राज्यांत नवीन कायदे व उद्योग सुरू करून रेशमाची लागवड केली. हे प्रयत्न इतके सफल झाले कीं, व्हेनिशन रेशीम म्हणजे अत्युत्तम असें पुढें कैक शतकें समजलें जात असे. मागें सांगितलेंच आहे कीं, चीन व हिंदुस्थान येथील बराच माल, उत्तरेकडच्या रस्त्यानें काळ्या समुद्रावरून कान्स्टांटिनोपल येथें विक्रीकरितां येई. त्या शहरांत व्हेनिशन व्यापाऱ्यांचा पगडा चांगला बसल्यामुळें, अलेक्झांड्रियापेक्षां

येथें त्यांचा व्यापार अतिशय झपाट्यानें वाढून ते फारच सधन झाले. हा प्रकार सत्तावन वर्षांच्या लाटिन अंमलांत झाला. त्यानंतर पुनः ग्रीक घराण्यास पुढें येण्यास मुख्य मदत जिनोआची होती. जिनोआ व व्हेनिस ह्यांचें वांकडें होतें. व्हेनिसची भरभराट जिनोआच्या डोळ्यांत सलूं लागली, तेव्हां जिनोआचे व ग्रीक क्रिस्त्यांचें जरी हाडवैर होतें, तरी व्हेनिसला रसातळास पोंचविण्याच्या हेतूनें जिनोआनें पोपच्या हुकुमासही धाब्यावर बसवून ग्रीक राजांस मदत दिली. ते राजे गादीवर आल्यावर त्यांनीं जिनोआचे उपकार फेडण्याकरितां कॉन्स्टांटिनोपलचे शेजारचें ठिकाण पेरा हें कायमचें त्यांस दिलें. ह्या ठिकाणीं जिनोआच्या लोकांनीं तटबंदी करून व्यापाराचीं मुख्य नाकीं बळकाविलीं, तेव्हां सर्व काळा समुद्र त्यांच्या सत्तेखालीं आला. त्या समुद्रांतील क्रिमियाचें द्वीपकल्प आपल्या ताब्यांत घेऊन तेथें काफा नांवाचें ठाणें त्यांनीं मजबूत केलें. काफा हें व्यापाराचें एक मुख्य नाकें होतें. अशा उद्योगानें जिनोआची व्यापारी व सामुद्रिक सत्ता युरोपांत अग्रगण्य झाली; व त्याचा राज्यकारभार शहाणपणानें चालला असता तर हें ऐश्वर्य त्यास बरेंच दिवस भोगतां आलें असतें. पण व्हेनिसची राज्यपद्धति जशी शहाणपणाची होती, तशी जिनोआची नव्हती. एकदां बसलेला जम व्हेनिस कधीं बदलीत नसे; व जिनोआस रोज नवीन नवीन प्रकार आवडत. तथापि ग्रीक बादशाहांशीं जिनोआचें संधान होतें तथपर्यंत व्हेनिसचे व्यापारी कॉन्स्टांटिनोपलकडे फारसे फिरकत नसत; ते विशेषतः अलेक्झांड्रियाकडे जात. मिसरदेशांत आरबांचें राज्य सुरळीत व पद्धतशीर स्थापन झालें, तेव्हां व्हेनिसनें आरबांशीं सख्य ठेवून, अलेक्झांड्रियाकडील सर्व व्यापार स्वतःकडे घेतला. परंतु मुसलमान लोकांशीं उघडपणें स्नेहसंबंध क्रिस्ती राष्ट्रानें ठेवणें बरोबर नसल्यामुळें, ही गोष्ट धर्मबाह्य नाहीं असें व्हेनिशन सरकारानें पोपकडून ठरवून घेतलें; आणि अलेक्झांड्रिया व डमास्कस ह्या दोन ठिकाणीं आपले दोन वकील व्यापाराच्या घडामोडींवर देखरेख ठेवण्याकरितां मुद्दाम ठेवून दिले. येणेंकरून मुसलमानांविषयीं क्रिस्त्यांचा द्वेषभाव थोडासा कमी होऊन त्यांचा सलोखा कांहीं दिवस टिकला.

ह्या वेळीं युरोपच्या राष्ट्रांची अंतःस्थितिही व्हेनिसच्या व्यापाराच्या अनुकूल अशीच होती. इंग्लंडांत आपसांत युद्धें चालू असल्यामुळें तेथच्या लोकांचें लक्ष व्यापाराकडे लागलें नव्हतें. फ्रान्सांत ही पुष्कळ अव्यवस्था होती. स्पेन देश मुसलमानांच्या तावडींतून नुकता सुटत होता. त्याचे सर्व अवयव एक झाले नव्हते. पोर्तुगीझ खलाशीही अजून निजूनच होते. तेव्हां व्हेनिसचेंच काय तें विशेष प्राबल्य होतें. दक्षिण युरोपाचें स्वामित्व व्हेनिसच्या हातांत असल्यामुळें व उत्तरयुरोपांतील हंसजुटीशीं व्हेनिसचें सख्य असल्यामुळें बहुतेक सर्व युरोपची घडामोड एकट्या व्हेनिसच्याच हातांत होती, असें ह्मणण्यास चिंता नाहीं. हे व्हेनिसचे व्यापारी आपल्या जवळचा रोख पैसा कधीं खर्च करीत नसत. सर्व प्रकारचे धातु, लांकूड, कांच वगैरे इजिप्टमध्यें खपणारे पुष्कळ जिन्नस ते बाहेर पाठवीत, आणि त्यांच्या ऐवजीं हिंदुस्थानचा व आशियाचा माल अलेक्झांड्रिया, आलेप्पो, बेरूट, डमास्कस, इत्यादि ठिकाणीं विकत घेऊन, तो युरोपांत आणीत. त्या योगानें त्यांच्या देशांतील रोकड पैसा व सोनेंचांदी कधींच बाहेर जात नसे. व्हेनिसच्या राज्यांतील बहुतेक कायदे ह्या व्यापाराच्या उद्देशानें रचलेले होते. व्यापाराचें खातें हें सरकारचें मुख्य अंग होतें. गलबतांचे संचार व मालाची नेआण ह्या बाबतींसंबंधीं सक्त नियम केलेले होते. तसेंच खासगी व्यापारांत साहस किंवा कौशल्य दाखविणारास सरकारांतून उत्तम मदत किंवा बक्षीस मिळत असे. ह्या व्यापारावर व्हेनिस व दुसरीं शहरें अतिशय धनसंपन्न झालीं. व्यापार हाच धनसंपन्नतेचा मुख्य व उत्तम मार्ग, हें तत्व व्हेनिसच्या इतकें दुसऱ्या कोठें आजसुद्धां खरोखर दिसून येत नाहीं. व्हेनिसमुळेंच उत्तरेच्या हंससंघाचेंही महत्व वाढलें. ब्रुजीस शहराच्या व्यापारी मंडळीचा पेहराव, त्यांचे टोलेजंग वाडे, व ऐषआरामाची राहणी पाहून राजेलोकांसही वैषम्य वाटे. ब्रुजीसचें वैभव ऍंट्वर्प शहरालाही लौकरच मिळालें. जर्मनींत ऑग्सबर्ग शहराच्या व्यापाऱ्यांस विलक्षण मान मिळत असे. व्यापाराचे हे परिणाम पुढील हंस-संघाच्या हकीगतीवरून चांगले कळून येतात.

३. हंस-संघ. ( Hanseatic League ).—वर सांगितल्याप्रमाणें दक्षिणयुरोपांत इटलींतील राज्यांचा व्यापार चालू असतां उत्तरयुरोपांत 'हंस-संघ' नांवाची एक व्यापारी संस्था होती, तिची हकीगत समजून घेण्या सारखी आहे. डेन्मार्क, स्वीडन, नॉर्वे वगैरे देशांतले पुष्कळ लोक जर्मन समुद्र व बॉल्टिकसमुद्र ह्यांवर चांचेपणाचा धंदा करून तेथील व्यापाऱ्यांस उपद्रव देत असत. अशा चोरांचा बंदोबस्त करण्यासाठीं ह्या हंससंघाची उत्पत्ति झाली. नवव्या शतकाच्या सुमारास हल्लींच्या जर्मनीच्या किनाऱ्यावरील शहरांनीं आपल्यांतील व्यापाऱ्यांची एक जूट बनविली. ती चालू असतां स. ११६९ चे सुमारास हॅमबुर्ग व लूबेक ह्या दोन शहरांनीं आपसांत तह करून आपला व्यापार बचावण्याचा निश्चय केला. ह्या तहांत पुढें अनेक शहरें हळू हळू सामील झालीं. कोलोन शहर किनाऱ्यावर नाहीं, आंत ऱ्हाईन नदीच्या कांठीं आहे. तें शहर वरील संघांत सामील झाल्यामुळें ह्या उत्तरेकडील व्यापारी संघाचा संचार ऱ्हाईन नदीच्या द्वारें सुरू झाला. स. १३०० त ह्या संघांत उत्तरेकडचीं ७० शहरें सामील होतीं. त्यांचें मुख्य शहर लूबेक होतें. ह्या संघाच्या सभा वारंवार होत; आणि त्यांत झालेले ठराव व नियम सर्वांस पाळावे लागत. आरंभीं केवळ स्वतःचा बचाव एवढाच त्यांचा हेतु होता; पण हळू हळू व्यापारवृद्धीची कल्पना त्यास जोडल्यामुळें संघाची भरभराट झाली. कित्येक जिमसांचा व्यापार सर्वस्वी त्यांच्या ताब्यांत असून, दुसऱ्या कोणास त्या जिनसांचा व्यापार करण्याची मोकळीक नसे. समुद्रावर चांचे लोकांचा पाडाव करणें, जमिनीवर लुटारू लोकांचा बंदोबस्त करणें, आणि व्यवस्थितपणानें वागून ठरलेले नियम नीटपणें बजावणें, ह्या योजनांनीं त्यांनीं युरोपाची पुष्कळ सुधारणा केली. पैसा वाढल्यामुळें सुखोपभोगाचे नवीन प्रकार व नवीन पदार्थ निर्माण झाले. मोठमोठ्या सुंदर इमारती उभारल्या गेल्या. सौंदर्य व सुबकपणा ह्या गुणांकडे लोकांचें लक्ष जाऊं लागलें. ह्यांनीं देशांतले उद्योग वाढविले. स्वीडन व पोलंड ह्यांजमधील जंगलें तोडून तेथें त्यांनीं सुंदर शेतें तयार केलीं. खाणींचा उद्योग सुरू झाला. तसेंच

दक्षिणयूरोप व उत्तरयूरोप ह्यांजमध्यें व्यापाराची देवघेव सुरू होऊन, लोकांचा फायदा झाला. उत्तरेकडील लांडगे व अस्वलें ह्यांचीं कातडीं दक्षिणेंत येऊन त्याऐवजीं दक्षिणेकडचें रेशमी व सुती कापड उत्तरेंत जाऊं लागलें. येणेंकरून मोठमोठ्या राजांशीं टक्कर देण्याची ह्या व्यापारी संघास शक्ति आली. कांहीं काळानें ह्या संघाच्या वखारी सर्व यूरोपभर पसरल्या. लंडन येथेंही त्याची एक मोठी वखार होती. ह्या संघामुळें युरोपीयन राष्ट्रांची सुधारणा व उदय झाला. संघशक्तीनें केवढे परिणाम घडतात व व्यापारांत तिचें महत्त्व केवढें आहे, हें ह्या हकीकतीवरून शिकण्याजोगें आहे.

मरीनो सॅन्यूडो नांवाच्या व्हेनिसच्या एका गृहस्थानें चौदाव्या शतकाच्या आरंभींची व्यापाराची हकीगत दिली आहे, तींत तो लिहितो कीं, ह्या वेळेस पूर्वेकडील भारी किंमतीचा व थोड्या वजनाचा माल इराणी अखाताच्या रस्त्यानें युफ्रेटिस नदींतून भूमध्यसमुद्रावर येई; आणि जड माल तांबड्या समुद्रांतून अलेक्झांड्रिया येथें येई. तो माल पुढें फ्लॉरेन्स, जिनोआ व व्हेनिस येथील व्यापारी युरोपांत दक्षिणकिनाऱ्यावर आणीत. तेथून हंस संघांतील व्यापारी तो माल उत्तरेस जर्मनसमुद्राच्या किनाऱ्यावर नेत. हंस संघाच्या उद्योगानें पूर्वेकडील व्यापारास चांगलेंच उत्तेजन मिळालें.

युरोपांत त्या वेळच्या चार पांचशें वर्षांत जत्रांचें महत्व मोठें असे. आगगाड्या व आगबोटी होण्याचे पूर्वी हरएक व्यापारी मालाच्या प्रदर्शनासाठीं ह्या जत्रांचा उपयोग होत असून, निरनिराळ्या शहरांतून कांहीं ठरीव दिवशीं ह्या जत्रा भरत आणि तेथें मालाचा खप फार होई.

**४. रुब्रुकी व मार्को पोलो ह्यांचे प्रवास.**—मुसलमानांनीं कॉन्स्टांटिनोपल घेतलें त्यापूर्वीही पूर्वेकडील व्यापार आपल्या ताब्यांत येण्यासाठीं पाश्चात्य राष्ट्रांची धडपड चालली होती. वर सांगितलेल्या धर्मयुद्धांत तुर्कस्तानच्या पूर्वेकडील आशियांतलीं राष्ट्रें आपणांस मदत करतील अशी क्रिस्त्यांस आशा वाटत असे. आठ धर्मयुद्धांपैकीं सातवें सन १२४८-५४ पर्यंत चाललें. त्यांत फ्रान्सचा राजा सेंटलुई यानें सन १२५३ त रुब्रुकी (Rubruquis)

नांवाचा आपला वकील काळ्या समुद्राचे लगत्यापासून चीनच्या हद्दीपर्यंत तार्तार लोकांच्या सर्व खानांकडे पाठविला होता. ह्या रुब्रुकीनें पूर्वेकडील स्थितीची उपयुक्त माहिती युरोपांत नेली; पण त्यांत पुढील राष्ट्रीय घडामोडींचें स्पष्टीकरण त्यास करतां आलें नाहीं. मात्र तार्तार लोकांची सत्ता त्यास प्रबळ दिसली. तसेंच स्पेनचे वकील तार्तार लोकांचा बादशहा तयमूर याजकडे सन १४०२ त गेले होते. तयमूरचें प्राबल्य पाहून आपला मध्यआशियांत रिघाव होईल असें त्या वकिलास वाटलें नाहीं.

अशा प्रकारें युरोपांत हिंदुस्थानच्या व्यापाराची वृद्धि होत असतां, मार्कोपोलो नांवाचा व्हेनिसचा एक सुप्रसिद्ध व श्रीमान व्यापारी बहुतेक आशियाखंड पायीं फिरून स. १२७१ पासून सन १२९५ पावेतों पंचवीस वर्षें चिनांत राहिला. चिनांतून समुद्रमार्गानें इराणच्या अखातांतून तो परत युरोपांत आला तेव्हां त्यानें प्राच्य देशांची अत्यंत उपयुक्त माहिती युरोपच्या लोकांस आणून दिली. मार्को पोलो सन १२५४ त जन्मला. त्याचा बाप व चुलता ह्यांचा कान्स्टांटिनोपलशीं व्यापार असून ते घर सोडून पंधरा वर्षेंपर्यंत पूर्वेकडील देशांत फिरत होते. परत आल्यावर त्यांनीं नानाप्रकारच्या चमत्कारिक गोष्टी लहान मार्को यास सांगितल्या. त्यांवरून पूर्वेकडील देश स्वतः पाहण्याची त्यास उत्कंठा झाली; आणि दोन वर्षांनीं बाप व चुलता पुनः प्रवासास निघाले, तेव्हां हा मुलगाही त्यांच्याबरोबर गेला. व्हेनिस येथें गलबतांत बसून ते आशियाच्या किनाऱ्यावर एकर येथें उतरले. तेथून ते ईशान्येकडे व उत्तरेकडे दूरपर्यंत फिरत गेले. मार्कोपोलो हा कांहीं दिवस पश्चिमआशियाखंडांत व्यापार करून पुढें तो बुखारा येथें गेला. चिनास त्या वेळीं युरोपीयन लोक क्याथे असें म्हणत. व्यापाराची माहिती मिळवीत बुखाऱ्याच्या खानाचा वकील म्हणून मार्कोपोलो चीन देशांत पेकीन येथें गेला. तेथून थेट दक्षिणेस उतरून कित्येक ठिकाणें त्यानें पाहिलीं. जपान, जावा, सुमात्रा, सीलोन ह्या ठिकाणीं तो फिरत गेला; तेथून तो हिंदुस्थानांत आला. येथें विशेषतः बंगाल व गुजराथ हे दोन प्रांत बारकाईनें पाहिले, आणि खंबायत-

पर्यंत पश्चिमकिनाऱ्याची त्यानें पाहणी केली. हा प्रवास त्या वेळच्या मानानें मोठ्या हिंमतीचा होय. ह्याप्रमाणें साडेतीन वर्षे प्रवास करून पेकीनच्या उत्तरेस एक मोठा राजा राहत होता, त्याच्या दरबारीं ते गेले. त्या राजानें त्यांस मोठ्या सन्मानानें आपल्या पदरीं ठेवून घेतलें. तरुण मार्को हा थोड्याच दिवसांत चिनी भाषेंत व व्यवहारांत प्रवीण झाला. त्यास एकदां राजानें कांहीं कामानिमित्त सहा महिन्यांच्या प्रवासावर पाठविलें. तेथून परत आल्यावर मार्कोनें तेथची खडानखडा माहिती राजास कळविली, त्यावरून राजाची त्याजवर अतिशय मर्जी बसली. पुढें हे त्रिवर्ग सतरा वर्षेंपावेतों चीन देशांत राहिले. ह्या मुदतींत मार्कोनें अनेक देश पाहिले व माहिती मिळविली. पुढें त्यांस स्वदेशीं येण्याची उत्कंठा झाली. पण राजा त्यांस सोडीना. तथापि कांहीं दिवसांनीं तसा योग आला. ह्या चीनच्या राजाचा एक संबंधी इराणांत राज्य करीत होता. त्याची पहिली बायको मरून चीन देशांतील दुसरी बायको त्यास करावयाची होती. ती चीनच्या राजानें पसंत करून जलमार्गानें इराणास पाठविली व तिच्या बरोबर ह्या पोलो मंडळीस संरक्षणार्थ दिलें. ह्या सफरींत चौदा गलबतें असून प्रत्येकावर अडीचशें खलाशी होते. पोलो यांस राजानें मोठ्या कष्टानें रजा दिली, व नानाप्रकारचीं हिरेमाणकें बक्षीस दिलीं. तीन महिने समुद्रप्रवास करून ते जावा बेटास आले. तेथून पुढें आणखी अठरा महिन्यांनीं ते इराणास येऊन पोहोंचले, तेव्हां ज्या राजासाठीं वधू आणिली होती, तो मरून त्याचा मुलगा गादीवर होता. त्यानेंच पुढें तिला वरिलें. इराणांतून ते तिघे पोलो सन १२९५ त व्हेनिस येथें आले. प्रवासाच्या श्रमानें ते अगदीं बदलून जाऊन त्यांचा पेहरावही प्राच्य तऱ्हेचा असल्यामुळें, त्यांस कोणी ओळखिलें नाहीं. त्यांची भाषा सुद्धां बरीच बदललेली होती. त्यांस कोणी ओळखीना, तेव्हां एक मेजवानी करून पुष्कळ मंडळीस त्यांनीं आपल्या घरीं बोलाविलें, आणि तेथें नानाप्रकारचीं रत्नें वगैरे सर्वांस दाखवून व युरोपीयन पोषाख करून, त्यांनीं आपल्याविषयीं लोकांची खात्री केली. पुढें कांहीं दिवसांनीं व्हेनिसचें व जिनोआचें युद्ध झालें,

त्यांत मार्को पोलो हा आरमारावर मुख्य अधिकारी होता. त्या युद्धांत अपयश येऊन जिनोआच्या लोकांनीं त्यास पकडून कैदेत टाकिलें. त्या कैदेंत असतां मार्कोनें आपल्या प्रवासाचें वर्णन लिहिले. कांहीं वर्षांनीं कैदेंतून सुटून व्हेनिस येथें परत येऊन तो मरण पावला.

मार्कोपोलोची माहिती त्या वेळीं फार उपयुक्त होती. आशियाखंडांत किफायतीचे मुख्य जिन्नस कोणते, ते कोठे व किती उत्पन्न होतात, आणि त्यांचा व्यापार कसा चालतो, इत्यादि विषयांची खात्रीलायक माहिती मार्को पोलोने स्वपराक्रमाने मिळवून युरोपात प्रसिद्ध केली. मुसलमानांचा उदय झाल्यापासून सुमारें सहासातशे वर्षांत कोणीही युरोपीयन गृहस्थ हिंदुस्थानांत आला नव्हता. सहाव्या शतकांत कॉस्मास नांवाच्या व्यापाऱ्यानें जी माहिती आणिली म्हणून वर सांगितले, त्यानंतरची माहिती ही मार्को पोलोचीच होय. मार्को पोलोच्या हकीकतीनें युरोपीयन लोकाचे डोळे एकदम उघडले आणि त्याच्यांत नवीन चळवळ उत्पन्न झाली, तरी त्या वेळीं छापण्याची कला निघाली नव्हती.

५. **पूर्वेकडील व्यापाराची नाकेबंदी.**—व्हेनिसचें राज्य लक्ष्मीचें माहेरघर असतां जगाच्या इतिहासाचा ओघ बदलणारी एक महत्वाची गोष्ट घडून आली. पंधराव्या शतकात तुर्कांनी युरोपात प्रवेश करून कान्स्टांटिनोपल आपले येथें राज्य स्थापिलें, त्यामुळे युरोपआशियांमधील व्यापाराचे जुने मार्ग बंद पडले.

तुर्क-मुसलमानांचे नांव युरोपात प्रथम सन १२४० च्या सुमारास माहीत झालें. आशिया खंडाच्या पश्चिमेकडचा बराच भाग पूर्वरोमन बादशाहीत मोडत होता, तो प्रथम तुर्कांनी काबीज केला. स. १३६१ त त्यांनीं युरोपाच्या पूर्वटोंकावरील हॅड्रियानोपल म्हणजे हेड्रियन बादशहाचें नगर काबीज केलें; आणि तेथें आपली राजधानी करून बल्गेरिया व सर्व्हिया हे प्रांत बळकाविले. पुढें तयमूरलंगाशीं लढण्याचा तुर्कांस प्रसंग आल्यामुळें, सुमारे पन्नास वर्षेंपावेतो त्यांस युरोपांत जास्त लक्ष देण्यास सवड झाली

नाहीं. तयमूरलंग सन १४०५ त मरण पावला, तेव्हां तुर्क लोक पुनः युरोपांत चळवळ करूं लागले. त्यांचा युरोपांत प्रवेश सहज होण्याचें खरें कारण व्हेनिस व जिनोआ यांचें भांडण होय. काळया समुद्रावर ह्या दोनही राज्यांचीं व्यापाराचीं ठाणीं असून, त्यांजमध्यें मोठी स्पर्धा चालत असे. ह्या आपसांतील फुटीमुळें तुर्कांचा युरोपांत शिरकाव झाला. कान्स्टांटिनोपलच्या रोमन बादशहाचा पाडाव करण्याकरितां जिनोआच्या क्रिस्ती राष्ट्रानें तुर्क-मुसलमानांची मदत मागितली. ते मदतीस आले; आणि जिंकिलेली बादशाही स्वतःच बळकावून बसले. सन १४४४ त चाळीस हजार तुर्क सैन्य जिनोईझ जहाजांतून बास्फोरसची सामुद्रधुनी ओलांडून कान्स्टांटिनोपलवर आलें; पुढें त्यांनीं तें शहर सन १४५३ त काबीज केलें. काफा, सोल्डेया वगैरे जिनोईझ लोकांचीं ठिकाणें काळया समद्रावर होतीं, तीं सर्व तुर्कांनीं लौकरच घेतलीं. आशियामायनर, मेसापोटेमिया व सिरिया हे देशही तुर्कांच्या हातांत पडल्या-मुळें पूर्व व्यापाराचे उत्तरेकडील दोन मार्ग युरोपीयन राष्ट्रांस बंद झाले.

सन १५२० व १५२२ चे दरम्यान तुर्कांचा बादशहा सलीमशहा ह्यानें मिसरदेश काबीज केला, तेव्हां पूर्वेकडील व्यापाराचा तिसरा मार्ग व्हेनिशन लोकांच्या ताब्यांत होता, तोही युरोपीयनांस बंद झाला. त्यामुळें तिकडे कांस्टांटिनोपल व इकडे अलेक्झांड्रिया ह्या दोनही मोठ्या उतारपेठा युरोपियन व्यापाऱ्यांच्या हातांतून गेल्या; त्यामुळें इटालियन शहरांच्या भूमध्यसमुद्रांतील व हंससंघाच्या ऱ्हाइन नदीवरील व्यापाराच्या हालचालीही त्यामुळें बंद पडल्या.

ह्याच वेळेस दुसरे दोन प्रकार घडून आले, त्यांची व्हेनिसच्या लोकांस आगाऊ कल्पना नव्हती; आणि ती कल्पना त्यांस असती तरी त्या बंद पाडण्याचें त्यांच्या हातांत नव्हतें. एक, कोलंबसानें लाविलेला अमेरिकेचा शोध व दुसरा आफ्रिकेच्या दक्षिण टोकास वळसा घालून हिंदुस्थानास जाण्याच्या जलमार्गाची वास्कोडगामानें आणिलेली माहिती. ह्या गोष्टी कशा घडल्या हें आतां सांगावयाचें आहे.

एकट्या व्हेनिसच्या हातांत सर्व व्यापराची घडामोड असलेली पाहून युरोपाच्या सर्व लोकांस फार दिवस मोठें वैषम्य वाटत होतें; आणि हिंदुस्थान व इतर पूर्व देशांत जाण्याचा दुसरा एखादा मार्ग असेल तर शोधून काढण्याकडे अनेक विद्वान् व कल्पक लोकांचें लक्ष लागून राहिलें होतें. जिनोआ येथें क्रिस्टोफर कोलंबस नांवाचा एक गृहस्थ नौकानयन व भूगोल या शास्त्रांत मोठा प्रवीण झाला होता. त्यास असें वाटलें कीं, पृथ्वी वाटोळी असल्यामुळें मार्कोपोलोनें पाहिलेला आशियाचा पूर्वकिनारा युरोपाच्या पश्चिमेस जवळच कोठें तरी असला पाहिजे. ही केवळ कल्पना होती, मात्र पृथ्वीचा व्यास आहे त्याहून कोलंबसास कमी वाटला, इतकाच फरक. जिनोईझ सरकारानें कोलंबसाच्या ह्या कल्पनेचा न समजून अव्हेर केला. पोर्तुगालच्या सरकारानें कोलंबसाची कल्पना समजून घेऊन विश्वासघातानें त्यास फसविलें. शेवटीं स्पेनच्या राणीनें त्यास आश्रय दिला आणि कोलंबसानें अमेरिका खंड शोधून काढिलें. ह्या साहसाचें बक्षीस स्पेनला चांगलें मिळालें. अमेरिकेंतला अत्यंत सुपीक प्रदेश आणि सोन्यारुप्याच्या व रत्नांच्या खाणी ताब्यांत आल्यामुळें, पुढें शेंदीडशें वर्षेपावेतों स्पेन देशास युरोपांत वर्चस्व प्राप्त झालें.

नंतर लवकरच पोर्तुगालचा खलाशी वास्कोडगामा यानेंही विलक्षण धाडस करून आफ्रिका खंड ओलांडून ता. २६ ऑगस्ट १४९८ रोजीं मलबार किनाऱ्यावरील कालिकोट बंदरांत प्रवेश केला. लिस्बन शहर सोडल्या दिवसापासून ह्या प्रवासास १० महिने आणि दोन दिवस लागले. ह्या गोष्टीनें हिंदुस्थानच्या व्यापाराची दिशा बदलणार आणि त्या योगानें यूरोप व आशिया खंडांतील राज्यांत क्रांति घडून येणार, हें चतुर पुरुषांस तेव्हांच समजून आलें. व्हेनिसची संपत्ति आतां लिस्बन शहरांत येणार असें पोर्तुगीझ लोकांस वाटलें; आणि व्हेनिसलाही आपली सत्ता लवकरच लयास जाणार असें वाटल्याशिवाय राहिलें नाही. ज्यानें नवीन प्रदेश शोधून काढिला त्याचा तो समजावा, असें फर्मानही त्या वेळीं पोपनें क्रिस्ती राष्ट्रांस दिलें होतें.

**६. अमेरिका व हिंदुस्थान यांच्या शोधांचे परिणाम.**—पोर्तुगीझ लोकांस हिंदुस्थान व स्पेनच्या लोकांस अमेरिका प्राप्त झाल्यानें निरनिराळे परिणाम घडून आले. भूमध्यसमुद्रावरील सर्व नाकीं मुसलमानांच्या ताब्यांत गेल्यानें युरोपियन व्यापाऱ्यांचा रुवेंस्वीं कोंडमारा झाला. व्हेनिसचे व्यापारी मात्र मुसलमानांशीं सख्य ठेवून आणि मुसलमान मागतील ती जकात देऊन, पूर्वेकडील माल अलेक्झांड्रिया येथून आणून कांहीं दिवस युरोपास पुरवीत असत. अशा स्थितींत पोर्तुगीझ लोकांस हिंदुस्थानास जाण्याचा स्वतंत्र जलमार्ग मिळाल्यापासून ते हिंदुस्थानचा हरएक माल प्रत्यक्ष तेथूनच गलबतांतून लिस्बन येथें आणून युरोपास पुरवूं लागले. जमिनीपेक्षां जलमार्गानें माल आणणें स्वस्त असल्यामुळें, व्हेनिशन व्यापाऱ्यांच्यानें पोर्तुगीझांची बरोबरी करवेना. युरोपास पुरेइतका हिंदुस्थानांतील माल लिस्बनास नेतां आल्याबरोबर, व्हेनिसचा व्यापार ठार बुडाला. व्हेनिशन व्यापाऱ्यांपेक्षां पोर्तुगीझ व्यापारी हिंदुस्थानांतील माल फारच स्वस्त विकूं लागले. मून ( Munn ) नांवाच्या एका इंग्रज व्यापारानें पूर्वींच्या व्यापाराची थोडीशी माहिती दिली आहे. हिंदुस्थानांतून युरोपांत येणाऱ्या जिनसांची किंमत पूर्वीं आलेप्पो येथें काय पडे व युरोपांत काय पडे ह्याचें एक कोष्टक त्यानें दिलें आहे, त्यावरून असें कळतें कीं, एकच जिन्नस आलेप्पो येथें ज्या किंमतीस विके त्याच्या निम्या किंमतीस तो इंग्लंडांत विकला जाई. इंग्लंडांत विकलेला माल लिस्बनहून आलेला असे. अर्थात आलेप्पो व आलेक्झांड्रिया यांजमध्यें किंमतीची तफावत विशेष नसल्यामुळें व्हेनिसच्या व्यापाऱ्यांनीं आलेक्झांड्रियाहून आणिलेला माल लिस्बनपेक्षां दुप्पट महाग विके; तेव्हां तो कोणी घेईनात, हें उघड आहे. पोर्तुगालच्या राजांनींही व्यापारांत स्वतः मन घालून सर्व मक्ता आपल्या हातांत ठेविला. मालाची किंमत त्यांनीं पुष्कळ उतरविल्यामुळें खप अतोनात वाढला; तेव्हां नवीन नवीन जिनसांची जरूर ज्यास्त लागूं लागली. विशेषतः हिंदुस्थानांतील मसाल्याचे जिन्नस युरोपांत फार खपूं लागले. ही पोर्तुगीझ लोकांची भरभराट सुमारें शंभर वर्षेपर्यंत म्हणजे

सोळाव्या शतकभर टिकली. पुढें त्यांचा व्यापार प्रथम डच लोकांनीं व पुढें इंग्रजांनीं बुडविला.

पोर्तुगीझ लोक हिंदुस्थानांत आले, तेव्हां येथें अनेक सुव्यवस्थित राज्यें त्यांस आढळलीं. ह्या राज्यांतील अधिकाऱ्यांस व व्यापाऱ्यांस आपला माल परदेशीं खपावा अशी उत्कट इच्छा असल्यामुळें, पोर्तुगीझ लोकांचा व्यापार ताबडतोब वाढला. पण स्पेनच्या लोकांस सांपडलेली अमेरिका निराळ्या प्रकारची होती. तेथील मुलूख बहुतेक ओसाड होता. राज्यें वगैरे व्यवस्थित नव्हतीं. तेथची संपत्ति उद्भिज व खनिज पदार्थांत लुप्त स्वरूपानें राहिली होती. ती बाहेर काढण्यास महाप्रयास पडणारे होते. बाकी खाण्यापिण्याससुद्धां अमेरिकेंत हवें तें मिळत नव्हतें. म्हणून शेती करण्यास व खाणी खोदण्यास आफ्रिकेंतून नीग्रो लोकांस गुलाम करून स्पेनच्या लोकांनीं अमेरिकेस नेलें. हे नीग्रो काम करण्यास मोठे काटक असत. एक नीग्रो चार अमेरिकन लोकां-इतकें काम करी. अशा ह्या प्रयासामुळें पोर्तुगीझ लोकांप्रमाणें स्पेनच्या लोकांस अमेरिकेंत आरंभीं कांहींच किफायत झाली नाहीं. त्यांस पहिलीं पन्नास वर्षें केवळ हालांत काढावीं लागलीं. पुढें पुढें मात्र त्यांस फायदा होऊं लागला. म्हणूनच पूर्वेकडे युरोपियनांच्या वखारी वाढल्या व पश्चिमेकडे वसाहती वाढल्या. वसाहतींच्या योगानें अमेरिका व वखारींच्या योगानें हिंदुस्थान इंग्रजांनीं गडप केलें. हा विरोध विशेष ध्यानांत ठेवण्याजोगा आहे.

पोर्तुगीझ लोकांस हिंदुस्थानचा निराळाच रस्ता सांपडला, ह्या गोष्टीचें सर्व मुसलमानांस अतिशय वैषम्य वाटलें. इजिप्टच्या मुसलमानांनींही पोर्तुगीझ लोकांस शह देण्याचा थोडा प्रयत्न केला नाहीं. रागावलेल्या व्हेनिशन लोकांनींही ह्या कामीं इजिप्टच्या मुसलमानांस मदत केली. व्हेनिशन लोकांचा डालमेशिया म्हणून जो प्रांत आड्रिएटिक किनाऱ्यावर होता, त्यांतील लांकडें तोडून त्यांचीं गलबतें बांधण्यास व्हेनिशन लोकांनीं इजिप्टच्या मुसल-मानांस परवानगी दिली. अशा रीतीनें मुसलमानांचें मोठें आरमार तयार झालें, पण पोर्तुगीझ गलबतांनीं त्यांचा संपूर्ण नाश करून टाकिला. मुसलमानीं

मुलखांत जे क्रिस्ती रहिवासी असतील त्या सर्वांस ठार मारण्याची इजिप्टच्या राजानें दहशतही घातली. पुढें इजिप्ट, सिरिया, व पॅलेस्टाईन हे प्रांत कांस्टांटिनोपलचा तुर्क बादशहा पहिला सलीम ह्यानें जिंकिलें आणि सर्व मुसलमानांचें मिळून एक राष्ट्र बनविलें. त्यानें व्हेनिशन लोकांशीं तह केला, त्यांस आपल्या राज्यांत व्यापाराच्या विशेष सवलती दिल्या आणि लिस्बनहून आलेल्या मालावर जबरदस्त जकात बसाविली. तथापि पोर्तुगालची सरशी कायम राहिली. व्हेनिसच्या सरकारानें पोर्तुगालला शरण जाऊन आश्रय मागितला, तो पोर्तुगालनें दिला नाहीं. एवंच व्हेनिसचा नाश होऊन पोर्तुगालचा उदय झाला.

**७. प्राच्य प्रश्नाची किल्ली.**—ह्या एवढ्या हकीकतीवरून हिंदुस्थानचा माल सर्व जगास आज हजारों वर्षें कसा पुरत होता व त्यामुळें सर्व राष्ट्रांस कशी किफायत होत होती हें ध्यानांत येईल. ज्याच्या ताब्यांत हा व्यापार असे, तें राष्ट्र शक्तीनें व वैभवानें सर्वांत मोठें असे. ह्या व्यापाराबद्दल जगांतील सर्व राष्ट्रांची एकसारखी धडपड चालली होती. पोर्तुगीझ, डच, इंग्रज वगैरे लोकांची अलीकडील तीनशें वर्षांतली धडपड आपणांस विशेष महत्वाची वाटते. पण एकंदर तीन हजार वर्षांच्या काळांत जर ही धडपड चालू होती आणि तींत शेंकडों राष्ट्रांचा उदय व नाश झाला, तर त्यापुढें ह्या तीनशें वर्षांचें महत्व विशेष राहतें असें नाहीं. आपण ज्या कालांत राहतों व ज्यांतील प्रत्येक क्षण अनुभवितों, तो कितीही अल्प असला, तरी आपणांस तो मोठा व महत्वाचा वाटतो; पण पाठीमागचा काल हजारों वर्षांचा असतांही त्याची आपणांस बरोबर कल्पना होत नाहीं. ह्या व्यापाराच्या संपत्तीवर शेंपन्नास वर्षांत जर इंग्लंडसारखीं अनेक राष्ट्रें वैभवास चढलीं आहेत, तर मागील हजारों वर्षांत किती राष्ट्रें उदयास आलीं असलीं पाहिजेत ह्याची केवळ कल्पनाच करावी. अशा रीतीनें विचार करितां हिंदुस्थान परदेशाच्या ताब्यांत जाण्याचें एक कारण असें दिसतें कीं, मुसलमानांनीं इजिप्ट, सिरिया, ग्रीस व कान्स्टांटिनोपल हीं राष्ट्रें जिंकून पश्चिमेकडील युरोपियन राष्ट्रांचा कोंडमारा

केला, आणि पूर्वेकडील माल नेण्यास वाटच ठेविली नाहीं. अर्थात् उपासमार झालेला वाघ चवताळून वाट फुटेल तिकडे निघून जातो, त्याप्रमाणें युरोपियन राष्ट्रांची स्थिति झाली. मुसलमानांनीं तांबड्या व काळया समुद्रांवरचा व्यापाराचा रस्ता युरोपियनांस खुला ठेविला असता तर कदाचित् पूर्वीचा व्यापाराचा क्रम तसाच चालू राहिला असता. तसेंच हजारों वर्षे ह्या हिंदुस्थान देशांतला माल बाहेर खपल्यानें ह्या देशांत किती संपत्ति जमली असेल ह्याची कल्पना होणें अशक्य आहे. व्हेनिस, फ्लॉरेन्स, लिस्बन त्यांची वर वर्णिलेली धनसंपन्नता हिंदुस्थानच्या पुढें कांहींच नव्हती.

युरोपच्या अर्वाचीन प्रगतीचा आरंभ ह्या वर सांगितलेल्या झटापटींत झाला आहे. पोर्तुगीझ लोकांस हिंदुस्थानचा जलमार्ग सांपडला ह्याबद्दल इतर राष्ट्रांस वाईट वाटून, त्यांचा सोळाव्या व सतराव्या शतकांत समुद्रावर निकराचा झगडा सुरू झाला. हा 'पूर्वेकडील प्रश्न', म्हणजे पूर्वेकडील राष्ट्रांवर आपलें वर्चस्व बसवून तेथच्या व्यापारावर आपण सधन होण्याचा मार्ग, ही चढाओढ व झटापट आज अनादिकालापासून अव्याहत चालली आहे. हिंदुस्थानास जाण्याचा जलमार्ग सांपडल्यावरही ती चढाओढ ज्यास्तच निकरानें चालली. तींत कित्येक पूर्वराष्ट्रें पाश्चात्यांच्या ताब्यांत गेलीं, तरी ही झटापट संपली नाहीं. ती चालू ठेवण्याविषयीं इंग्रज मुत्सद्दी व व्यापारी इंग्लंडांतून व हिंदुस्थानांतून, जपान पूर्वेकडून, जर्मनी उत्तरेकडून, आपापल्यापरी नवीन नवीन युक्त्या काढून झगडत आहेत. जगाच्या राजकीय इतिहासाची मुख्य किल्ली ही आहे. झगडा व झटापट एकच. मात्र त्यांत पडणारीं पात्रें निरनिराळ्या वेळीं निरनिराळीं होत आलीं आहेत. ही सगळी झटापट इराण, हिंदुस्थान चीन वगैरे सुपीक देशांतील जिनसांबद्दल व कारागिरीबद्दल आहे हें आपण विसरतां नये. आपल्याबद्दल लोकांची काय धडपड चालली आहे, किती लोक तलवार उपसून जिवावर उदार झाले आहेत, कितीकांनीं मगरमिठी मारिली आहे, इत्यादि प्रकार डोळ्यांत तेल घालून पाहणें हें आज आपलें काम आहे. कान्स्टांटिनोपल, कायरो, कंदाहार, काबूल, पेकिन, वाटेल तें ठिकाण घ्या;

ह्या ठिकाणीं चाललेलीं कारस्थानें व परराष्ट्रांच्या घडामोडी केवळ व्यापाराच्या किफायतीकरितां होत. हा व्यापार, हिंदी महासागरांतला व जलमार्गानें चालणारा होय. मसाले, सुगंधी द्रव्यें, रंग, तेलें, तैलबीजें, पटतंतु, औषधी, धान्यें, द्विदलें, लांकूड, व दुसरा अनेक प्रकारचा होणारा कच्चा माल, हिंदुस्थान, पूर्वेकडील द्वीपकल्प, पूर्वेकडील द्वीपसमूह, चीन व पूर्वआफ्रिका, इत्यादि प्रदेशांतून युरोपांत अतिस्वस्त दरानें आणून, त्यांचे नानातऱ्हेचे उपयोगी पदार्थ बनवून, ते सर्व जगास होईल तितके महाग विकावे आणि त्याच्या फायद्यावर आपल्या राष्ट्राचा निर्वाह उत्तम रीतीनें चालवावा, हा ह्या वेळच्या सर्व युरोपीय घडामोडींचा मूळ उद्देश आहे. प्रोफेसर रामसे म्हणतो, “ जगाच्या इतिहासाचा एकंदर ओघ पाहिला असतां, असें दिसून येईल कीं, आशिया व यूरोप ह्या दोहोंच्या संघट्टनापासून नेहमींच एक प्रकारची जबरदस्त विद्युच्छक्ति उत्पन्न होत असते; ह्या विद्युच्छक्तीपासून सर्व जगाच्या व्यवहारांस चलन मिळत आहे. जगाच्या प्रगतीचें ह्यासारखें दुसरें कोणतेंही कारण इतिहासांत आढळून येत नाहीं. ( Contemporary Review, July 1906. ) सर वॉल्टर रॅले म्हणतो, “ ज्याच्या ताब्यांत समुद्र, त्याच्या ताब्यांत व्यापार; ज्याच्या ताब्यांत जगाचा व्यापार, त्याच्या ताब्यांत जगाची संपत्ति, म्हणजे प्रत्यक्ष सर्व जग. ”*

---

*Whosoever commands the sea, commands the trade; whosoever commands the trade, commands the riches of the world, and cousequently the world itself.—Raleigh.

# प्रकरण तिसरें.

## मलबारची प्राचीन हकीकत.

| | |
|---|---|
| १. मलबारचें महत्व. | २. मलबारची पूर्वपीठिका. |
| ३. मलबारांतील लोक, ब्राह्मण व नायर. | ४. मलबारांतील मुसलमान. |
| ५. मलबारांतील क्रिस्ती. | ६. कालिकोटचे सामुरी. |

१. **मलबारचें महत्व.**—युरोपियन लोकांचा प्रवेश प्रथम पश्चिम किनाऱ्यावर मलबारांत झाला. सोळाव्या शतकांत पोर्तुगीझ लोकांनीं बहुतेक मलबार किनारा जिंकिला आणि तेथें आपलें राज्य स्थापिलें. मलबारप्रांत हिंदुस्थानांतील इतर भागांहून अलग होता. नुसत्या सृष्टरचनेनेंच तो अलग होता असें नाहीं, तर तेथची राज्यव्यवस्था व लोकांच्या रीतिभाती ह्यांतही तो प्रांत अगदीं भिन्न व तुटक होता. त्यामुळें परकीय सत्ता तेथें स्थापन होण्यास उशीर लागला नाहीं. पोर्तुगीझांच्या अगोदरच आरब मुसलमानांनीं व क्रिस्ती वगैरे इतर परकी लोकांनीं हा प्रांत घेरून टाकिलेला होता. हा सर्व प्रकार व तेथची तत्कालीन व प्राचीन अंतःस्थिति स्पष्टपणें समजल्याशिवाय हिंदुस्थानांतील युरोपियन राज्यस्थापनेची मीमांसा स्पष्ट होणार नाहीं. शिवाय मूळच्या संस्था चांगल्या असूनही, परकीय अंमलाखालीं त्यांची दुर्दशा कशी होते, हें मलबारच्या हकीकतीवरून चांगलें दिसून येणार आहे. ऐतिहासिक दृष्ट्या मलबारची पूर्वपीठिका विशेष मनोरंजक असून तेथच्या राज्यपद्धतींत प्रजासत्ताक तत्वें चालू होतीं, म्हणून विषयांतर करूनही मलबारचा प्राचीन इतिहास येथें थोडासा देणें इष्ट वाटतें.

हिंदुस्थान देश उत्तरेकडून हिमालयाच्या प्रचंड तटानें व इतर बाजूं-कडून समुद्रानें वेष्टित असल्यामुळें तो सर्वथैव दुर्भेद्य आहे असा सामान्य

समज होता. फक्त वायव्येकडून एक द्वार आहे, त्यांतूनच सर्व शत्रु हिंदुस्थानांत आले. पण युरोपीयन लोक इकडे येण्यापूर्वी समुद्रमार्गही दुर्भेद्य होता असें सामान्यतः पाश्चात्य ग्रंथकार लिहितात. त्यांच्या म्हणण्याचा भाव इतकाच कीं, समुद्रमार्गानें हिंदुस्थानांत प्रवेश करणें ही गोष्ट युरोपियन लोकांनींच साध्य केली. पण वस्तुस्थिति अशी नाहीं. मनुष्याच्या बुद्धिप्रभावास कोणतीच गोष्ट दुर्भेद्य नाहीं. वायव्येकडील कोंपऱ्याखेरीज हिमालयाच्या चंबीखोरींतून दुसरें एक द्वार आहे, त्यांतून नुकतीच इंग्रज फौज तिबेटांत गेली. ह्याच मध्यद्वारानें बुद्धधर्माचे यति धर्मप्रसाराकरितां तिबेटांत गेले होते. समुद्राविषयीं म्हटलें तर, हिंदुस्थान देश पोर्तुगीझ लोकांनीं विलक्षण साहस करून शोधून काढिला हा गर्व मिथ्या आहे. हिंदुस्थान देश कांहीं हरवला नव्हता; किंवा त्याची दुसऱ्या कोणास ओळख नव्हती असेंही नाहीं. पोर्तुगीझ लोकांचा पराक्रम इतकाच कीं, युरोपाचीं जहाजें युरोपाचा किनारा सोडून मध्यें कोठेंही अटकाव न होतां, थेट हिंदुस्थानच्या किनाऱ्यावर आलीं. नाविक विद्येंत त्या वेळीं युरोपियनांच्या बरोबरीचे, किंबहुना, त्यांहून सरस खलाशी इकडेही होते. प्राचीन ग्रीक किंवा फिनिशन खलाशांची गोष्ट सोडिली, तरी पोर्तुगीझांचा उदय होण्यापूर्वी तीन चारशें वर्षें आरब लोकांनीं दर्यावर्दी कामांत विलक्षण प्रावीण्य संपादिलें होतें. जपानच्या किनाऱ्यापासून तों भूमध्यसमुद्रापर्यंत आरबांचा संचार होता. जपानपासून ऑस्ट्रेलियापर्यंत याम्योत्तर प्रवासाची ज्यांना धास्ती वाटली नाहीं, ते आफ्रिकेला वळसा घालण्याला भ्याले असते असें नाहीं. मात्र आफ्रिकेच्या दक्षिणेस व्यापाराचें संधान नसल्यामुळें, व इजिप्टमधून भूमध्यसमुद्रांत आरबांचा संचार सहज होत असल्यामुळें, ते आफ्रिकेच्या दक्षिणेस वळसा घालण्याच्या भरीस पडले नाहींत. तथापि पोर्तुगीझ सुद्धां आरबांसारख्या दर्यावर्दी लोकांचेंच टप्याटप्यांनीं साह्य घेऊन इकडे येऊं शकले. सारांश, आरब किंवा दुसरे प्राच्य लोक खलाशाच्या कामांत प्रवीण होते, तरी हिंदुस्थान देशाची संपत्ति धुऊन स्वदेशास न्यावी, अशी स्वार्थमूल कल्पना पोर्तुगीझांच्या पूर्वी हिंदुस्थानांत येणाऱ्या कोणत्याही परकीय लोकांच्या

मनांत नव्हती. युरोपियनांनीं हिंदुस्थानांत येऊन निराळाच प्रकार आरंभिल्यामुळें, त्यांच्या कृतीस महत्व आलें; आणि इकडील लोकांच्या कृति त्यांपुढें लोपून गेल्या. पंधराव्या शतकांत युरोपियन व प्राच्य लोक नौकागमनांत सारखेच कुशल असतां, पुढें युरोपियनांची प्रगति व प्राच्यांची पिछेहाट कां झाली ह्याचा विचार तत्कालीन स्थितीच्या साह्यानें करूं लागलें तर असें दिसतें, कीं प्राच्य लोक संपन्न व सुव्यवस्थित असल्यामुळें, त्यांस लोकांच्या तोंडाकडे पाहण्याची जरूर कधीं भासली नाहीं. अर्थात् परधन व परदेश ह्यांजविषयीं अभिलाषबुद्धि त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न न झाल्यामुळें साहस करून त्यांस कांहीं ज्यास्त प्राप्त करून घ्यावयाचें नव्हतें. उलट पक्षीं आरब लोक मध्यें पडल्यानें युरोपियनांच्या किफायतीस जो चिमटा बसला, त्याचे योगानें जिवावर उदार होऊन ते बाहेर संचार करूं लागले; त्यामुळें त्यांची प्रगति होत गेली. पाश्चात्यांची ही धडपड कशाची आहे व हिचा पुढें परिणाम काय होईल ह्याची परवा इकडे कोणीं केली नाहीं. म्हणजे प्रगति होण्याची पात्रताच आमच्यांत नव्हती किंवा युरोपियन लोकांची बुद्धिमत्ताच अलौकिक होय, असा याचा निष्कर्ष काढणें वाजवी नाहीं.

हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यास मलबार किनारा असें नांव आहे. ह्या किनाऱ्यास समांतर, समुद्रापासून तीस एक मैल आंत सह्याद्रि पर्वताची लांबच लांब ओळ दक्षिणोत्तर असून, तिच्या योगानें ही समुद्रपट्टी मुख्य भूप्रदेशापासून अलग झाली आहे. सुरतेपासून सुरुवात केली तर ह्या पट्टींत उत्तरकोंकण म्हणजे ठाणें व कुलाबा जिल्हे, दक्षिणकोंकण म्हणजे रत्नागिरी जिल्हा, सांवतवाडी संस्थान, गोमंतक, उत्तरकानडा, दक्षिणकानडा, मलबार, कोचीन व त्रावणकोर हे प्रांत अनुक्रमें येतात. मलबारच्या पूर्वभागीं म्हैसूर व कूर्ग प्रांत आहेत. ह्या किनाऱ्यावरील मुख्य बंदरें अनुक्रमानें खालीं दिल्याप्रमाणें असून, त्यांचा संदर्भ पुढील हकीकतींत थोडा बहुत येणार आहे. सुरत, दमण, डाहाणू, तारापूर, माहीम, वसई, ठाणें, मुंबई, अलीबाग, जंजिरा, रत्नागिरि, विजयदुर्ग, मालवण, वेंगुर्लें, पणजी, मार्मागोवा, कारवार, कुमठा,

होनावर, भटकळ, मंगळूर, काननूर, तेलिचरी, माही, कालिकोट, पुनानी, कोचीन, कोलम ( म्हणजे क्विलोन ), अंजनगो, त्रिवेंद्रम, आणि कामोरीन.

२. **मलबारची पूर्वपीठिका.**—मलबारचें जुनें नांव केरल असें होतें. प्राचीन काळीं चेर, चोल व पांड्य अशीं तीन राज्यें हिंदच्या दक्षिण द्वीपकल्पांत होतीं. त्यांपैकीं चेर म्हणजेच केरल असें शोधकांनीं ठरविलें आहे. चेरनाड नांवाचा हल्लीं मलबारांत एक तालुका आहे, त्याचें नांव 'केरल' वरूनच आलें असावें. अशी एक आख्यायिका आहे कीं, पूर्वीं परशुरामानें समुद्र मागें हटवून मलबारची जमीन उत्पन्न केली; आणि तेथें चातुर्वर्ण्याची स्थापना केली. त्यानें चौसष्ट गांव वसवून चार चार गावांचा एक भाग असे सोळा भाग केले. दरएक भागांतील लोकांनीं आपणांपैकीं एक अंमलदार त्या भागाचा कारभार करण्यासाठीं नेमावा; त्यानें तीन वर्षेंपावेतों कारभार करावा; आणि त्याच्या खर्चास एकंदर जमिनीचा सहावा भाग लावून द्यावा, अशी आरंभीं वहिवाट होती. पण हे अंमलदार तीन वर्षांनीं बदलत असल्यामुळें तेवढ्या अवधींत ते वाटेल तसा जुलूम करीत. हा जुलूम बंद करण्याकरितां कित्येक लोक तिरुनावायी ह्या स्थळीं जमले. तेथें सर्वांनीं एक राजा पसंत केला. त्यास ते पेरुमाळ असें म्हणत. पेरुमाळ म्हणजे 'मोठा' किंवा 'परमेश्वर'. पेरुमाळानें बारा वर्षें राज्य करून आपलें राज्य सोडावें व पुनः मोठा समारंभ होऊन लोकांनीं नवीन राजा पसंत करावा, असा प्रघात होता. ही गोष्ट इ. स. २१६ त घडली असें समजतात. हा राजा कोडुंगलूर ऊर्फ क्रांगानूर येथें राज्य करी. ह्याप्रमाणें चेरच्या राजाचें नांव पेरुमाळ असें पडलें. हें नांव अशोकाच्या शिलालेखांत सांपडतें. तथापि ह्या गोष्टीस दंतकथेपलीकडे दुसरा आधार नाहीं.

ऐतिहासिक माहिती इतकीच मिळते कीं, ख्रिस्ताच्या पहिल्या दोनशें वर्षांत मलबार किनाऱ्यावर रोमन लोकांचा व्यापार चालत असे. मलबारांत व त्रावणकोरांत रोमन लोकांचीं पुष्कळ नाणीं सांपडलीं आहेत. त्यापुढें अलीकडील शोधांवरून कळतें कीं, इ. स. च्या चवथ्या शतकांत मलबारावर कांची येथील पल्लव राजांचा ताबा होता. तो थोड्याबहुत अंशानें चौदाव्या

शतकापर्यंत चालला. पल्लवांच्या वेळेस चिनी प्रवासी फाहियान मलबारांत आला होता, त्यानें त्या राज्याची हकीकत लिहिलेली आहे. इ. स. च्या सातव्या शतकांत वातापी ऊर्फ बादामी येथील चालुक्य राजांनीं मलबारावर स्वारी करून पल्लवांचा पराभव केला. पण त्यांची सत्ता मलबारांत चालू होण्यापूर्वींच त्यांस राष्ट्रकूटांनीं जिंकिलें. हे राष्ट्रकूट मलबारांत कांहीं दिवस प्रबळ होते. परंतु त्या प्रांतांत नायर लोकांचीं मजबूत ठाणीं व लहान लहान राज्यें बनलेलीं असल्यामुळें, राष्ट्रकूटांचा अंमल तेथें चांगला बसला नाहीं. हे नायर लोक मूळचे तामील असून पूर्वकिनाऱ्यावरून मलबारांत येऊन राहिले होते. ते तेथें कधीं आले हें निश्चित सांगतां येत नाहीं. मि. एलिसचें म्हणणें असें आहे कीं, इ. स. ३८९ च्या सुमारास हे लोक मलबारांत आले व त्यांनीं तो प्रांत आपसांत वांटून घेतला.

मलबारांत ‘ कोलम ’ नांवाची वर्षगणना चालते. ही ‘ कोलम ’ गणना ता. २५ ऑगस्ट सन ८२५ रोजीं सुरू झाली. ती शंकराचार्यानें केली असें म्हणतात. मलबारचा शेवटचा राजा चेरमाण पेरुमाळ स. ८२५ च्या सुमारास राज्य सोडून मक्केस गेला, त्या वेळीं कांहीं तरी घडामोड होऊन ही वर्षगणना चालू झाली असावी. या भागांत दर बारा वर्षांनीं नवीन राजा नेमण्याचा एक मोठा समारंभ पूर्वीपासून होत असे. त्यास ‘ ओनम् ’ किंवा ‘ महामख ’ असें म्हणत. हा समारंभ स. १७४३ पावेतों चालू होता. तेव्हांपासून तो बंद आहे. त्या समारंभास सर्व कुट्ट सभेचे सभासद व राज्यांतील सर्व लहानमोठे लोक हजर असत, आणि त्यांजमध्यें राज्यांतील सर्व गोष्टींचा खल होत असे.

**३. मलबारांतील लोक, ब्राह्मण व नायर.**—नंबुतिरी ब्राह्मण, नायर, मापला मुसलमान, व क्रिस्ती असे चार प्रकारचे लोक हल्लीं मलबारांत आहेत; आणि ह्या प्रत्येकांत अनेक पोटभेद आहेत. हिंदुस्थानच्या इतर भागांत आर्यांचें व त्यांच्या सुधारणेचें वजन जसें हरएक बाबतींत दिसून येतें, तसें तें मलबारांत दिसून येत नाहीं. आर्यांची चातुर्वर्ण्य संस्था हिंदु-

स्थानांतील इतर भागांप्रमाणें मलबारांत नाहीं. आर्यांच्या जातिव्यवस्थचा उगम कुटुंब होय. कुटुंब हा मूळ पाया समजून त्यावर पुढें त्यांनीं समाजरचना बसाविली. ह्यासाठीं त्यांनीं समाजाचे चार मुख्य भाग करून त्यांजकडे चार कामें वांटून दिलीं. ही कामाची वांटणी कालांतरानें इतकी स्पष्ट व विभक्त झाली कीं, दोन पक्षांचे क्षत्रिय लोक एकमेकांशीं लढत असतां, एकीकडे ब्राह्मण तपश्चर्या करीत असे, व दुसरे बाजूस कुणबी शेत नांगरीत असे, पण त्या झगड्यांत आपण पडावें असें या क्षत्रियेतर लोकांस वाटत नसे. ( लोगन ). ह्यामुळेंच परकीय लोकांचे हल्ले आले असतां, देशांतील सर्व लोक स्वदेशसंरक्षणार्थ शत्रूवर उठल्याचें उदाहरण आपल्या प्राचीन इतिहासांत बहुधा नाहीं. कारण देशरक्षणाचें काम क्षत्रियांचें, असें इतर जाती समजत. या व्यवस्थेनें समाजाची सुधारणा व देशाची भरभराट होऊन प्रत्येक कसब नांवारूपास आलें. पण मलबारांतील समाजव्यवस्था भिन्न आहे. तेथचे नंबुतिरी ब्राह्मण इसवी सनाच्या आठव्या शतकांत बाहेरून तेथें आले. त्यांच्या पूर्वीं तेथें जैन लोक मात्र उत्तरेंतून आले होते आणि त्यांनींच आर्यांची सुधारणा थोडीबहुत तेथें आणिली. त्यांनीं निरनिराळ्या धंदेवाल्या लोकांचे समाज, म्हणजे ज्यांस गिल्ड्स् असें इंग्रजींत म्हणतात, ते मलबारांत स्थापिले. ह्या संघांस आरंभीं धर्माचें स्वरूप नव्हतें. तें आठव्या शतकांत ब्राह्मणांनीं दिलें व जातींचीं बंधनें दृढ केलीं. प्रसिद्ध ब्राह्मण शंकराचार्य हा मूळचा मलबारांतील नंबुतिरी ब्राह्मण होय. मलबारांतील ब्राह्मण या शंकराचार्यांचेच अनुयायी आहेत. नंबुतिरी ब्राह्मणांचे दहा 'ग्राम' म्हणजे शाखा आहेत. प्रत्येक ग्रामावर सहा अधिकाऱ्यांची लोकनियुक्त सभा असे. तिच्या अध्यक्षास 'स्मार्त' म्हणत, व सभासदांस 'मीमांसक' ह्मणत. ह्या सभेकडे जातींतील तंटे तोडण्याचें काम होतें. मात्र तंट्यांचा तपास करण्यास प्रांताच्या राजाची परवानगी लागे.

मलबारांतील दुसरी मुख्य जात नायरांची होय. नायर म्हणजे लोकांचे नायक. हेच देशसंरक्षक होत. हे आर्य नव्हत. मलबारांत आर्यांची संख्या फारच थोडी आली व देशसंरक्षणाकरितां क्षत्रिय लोक पुरेसे नसल्यामुळें

नवीन क्षत्रिय जात त्यांस बनवावी लागली. ह्मणून नायर म्हणजे क्षत्रियांचें काम करणारा शूद्र. हा शब्द 'नी' धातूपासून आला असावा. राज्य-व्यवस्थेच्या सोयींसाठीं देशाचे निरनिराळे विभाग केलेले होते, त्यांस 'नाड' असें ह्मणत. 'नाड' म्हणजे नायरांच्या अधिकाराचा टापू. प्रत्येक नाडांत सहाशें कुटुंबें असत, आणि प्रत्येक कुटुंबांतील एकएक इसम घेऊन 'षट्-शत' ( म्ह० सहाशें ) ह्या नांवाची एक परिषद् असे. ह्या सभेकडे नाडाच्या सर्व व्यवस्थेचें काम होतें. सरकारचे कर वसूल करणें, लष्कर ठेवून प्रांताचें संरक्षण करणें, पोटशाखांकडून कामें करवून घेणें व लोकांच्या तंट्यांचा निकाल करणें, हीं कामें ह्या सभेकडे होतीं. अर्थात् नाड ह्मणजे प्राचीन ग्रीक लोकांसारखेंच स्वतंत्र प्रजासत्ताक राज्य होय. हल्लीं सुद्धां मलबारां-तील तालुक्यांचीं नांवें 'एरनाड' 'वल्लुवनाड' अशीं आहेत. नाडाच्या पोटभागास 'तर' असें ह्मणत. तेरु म्हणजे गल्ली हा शब्द 'तर' शब्दा-वरून आला आहे. आरंभीं चार कुटुंबांचा एक 'तर' असे, ह्मणजे एका नाडांत दीडशें 'तर' असत. तराच्या मुख्य व्यवस्थापकास कर्णवर ( karnavara ) असें नांव होतें. 'षट्शत' सभेंत कर्णवरांचा समावेश होता. मुख्यस्थ, मध्यस्थ व प्रमाणी असे ह्या कर्णवरांचे तीन विभाग असत. प्रत्येक नाडावर सर्वानुमतें निवडलेला एक अधिकारी असे व सर्व नाडांनीं मिळून एक सार्वभौम राजा नेमण्यांत येत असे.

ही मलबारांतील विशिष्ट राज्यपद्धति ध्यानांत ठेवण्याजोगी आहे. स्वराज्याचा पूर्ण अधिकार नाडांच्या सभांकडे असल्यामुळें राजांचा किंवा अधिकाऱ्यांचा लोकांवर जुलूम होण्यास सवड नसे. तेलिचरी येथील इंग्रज वखारीच्या दुभाष्यानें आपल्या रोजनिशींत, ता. २८ मे स.१७४६ रोजीं खालील मजकूर लिहिला आहे. 'हे नायर म्हणजे कालिकोटच्या प्रजेचे मुखत्यार होत. ह्या मुखत्यारांचा संघ म्हणजे आपलें केवळ पार्लमेंट होय. हे संघ राजांचे हुकूम निमूटपणें ऐकूण घेतात असें नाहीं. राजाचे अंमलदार अन्याय करूं लागले तर त्यांस शिक्षा करण्याचा अधिकार ह्या संघांकडे आहे.'

नाडांच्या ह्या सभेस 'कुट्ट' असें नांव होतें. ही कुट्ट सभा एक जुटीनें काम करी व तिचें वजन भारी असे. स्वारी, शिकार, युद्ध, पंचायत वगैरे हरएक महत्वाच्या प्रसंगीं ही सभा भरत असे. ह्या सभेस डोळा, हात व हुकूम (the eye, the hand, the command), अशा लाक्षणिक संज्ञा होत्या. म्हणजे लोकांकडून वसूल गोळा करणें, त्यांचे परस्पर हक्क शाबूद राखणें, आणि सर्वांचे आचार बरोबर चालविणें हीं कामें ह्या सभेचीं होतीं. कानड्याच्या दक्षिणेस सर्व किनाऱ्यावर व विशेषतः मलबरांत ही राज्यव्यवस्था चालू होती. स. १७९१ त मलबारांत ब्रिटिश राज्य सुरू झालें, तेव्हांच ही व्यवस्था मोडली. ती मोडली नसती तर, हें एक प्रकारचें स्वतंत्र स्वराज्य अद्यापि टिकलें असतें, असा अनेक पाश्चात्य ग्रंथकारांचा अभिप्राय आहे.

नायरांशिवाय गणक म्हणजे ज्योतिषी, शिक्षक, सुतार, लोहार, गवई, धोबी, वगैरे अनेक जातींचे लोक मलबारांत होते. ह्या सर्व धंद्यांच्या लोकांनीं ग्रामसंस्था पूर्ण झाली होती. अशाच प्रकारची ग्रामसंस्था थोड्या बहुत फरकानें हिंदुस्थानांत इतरत्र चालू होती. 'तीयर' नांवाची दुसरी एक शेतकऱ्यांची माळ्यासारखी जात असून ते मूळचे सीलोनांतून मलबारांत आले असें सांगतात. ह्या जातीचे बायकापुरुष स्वरूपानें सुंदर व स्वच्छ असून त्यांच्या बायका युरोपियन लोकांबरोबर राहिल्या असतां, त्यांस बहिष्कार नसतो, ह्या कारणास्तव त्यांच्यांत आतां युरोपियन रक्ताची बरीच भेसळ झाली आहे. त्यामुळें लोकांचा वर्णही बराच पालटला आहे. हजाम, बुरूड, छत्र्या करणारे, चेरुमार म्हणजे गुलामांसारखे लोक, बाटलेले मुसलमान आणि क्रिस्ती वगैरे आणखी कित्येक लोक मलबारांत आहेत.

बाहेरून जसजसे नवीन लोक मलबारांत आले, तसतसा त्यांचाही मूळच्या राज्यव्यवस्थेंत समावेश होऊन, त्यांस इतरांचे हक्क प्राप्त झाले. ज्यू व क्रिस्ती लोकांनीं मलबारांत वसाहती केल्या तेव्हां त्या लोकांसही राजांनीं कांहीं विशिष्ट हक्कांच्या सनदा करून दिल्या. अशा तीन सनदांचे कोरीव लेख मल्याळी भाषेंत लिहिलेले अलीकडेस उपलब्ध

झाले आहेत. त्यांजवरून तत्कालीन राज्यपद्धतीची बरीच माहिती मिळते. **सनद पहिली**, इ. स. ७०० ची. हींत भास्कर रविवर्मा नांवाच्या राजाचा उल्लेख आहे. **सनद दुसरी**, इ. स. ७७४ची. हींत वीरराघव चक्रवर्ती ह्याचा उल्लेख आहे. **सनद तिसरी**, इ. स. ८२४ ची हींत स्थाणुरविगुप्त राजाचा उल्लेख आहे. ह्या तीनही सनदांतील लेखांचा विद्वानांनीं उलगडा करून अर्थ बसविला आहे. पहिल्या सनदेंत ज्यू लोकांस, दुसरींत उत्तरेकडच्या क्रिस्ती लोकांस, आणि तिसरींत दक्षिणेकडील क्रिस्ती लोकांस विशिष्ट हक्क दिलेले आहेत.

' मार सोपार ' नांवाचा एक क्रिस्ती गृहस्थ इ. स. ८२२ त बाबिलोनहून हिंदुस्थानांत ' कोलम ' येथें आला, त्यानें तेथील अधिकाऱ्यांच्या मार्फत मलबारांतील आपल्या क्रिस्ती धर्मबांधवांची व्यवस्था लावून घेतली. वरील तिसऱ्या सनदेंत ' मरुवान सापीर इसो ' असें नांव आहे, तें व वरचें ' मार सोपार ' हीं नांवें एकच असावीं. ह्या लेखांवरून केरल देशाची मर्यादा सामान्यतः कालिकोटपासून कोलमपर्यंत होती असें दिसतें. वरील सनदांत राजांचीं नांवें आहेत तीं तेथच्या पेरुमाळ राजांचींच असावीं. शेवटचा स्थाणुरविगुप्त हाच पुढें सांगावयाचा चेरमान पेरुमाळ होय. त्याच्या नांवावरून तो बहुधा कोकणांतील मौर्यवंशाचा असावा. सनदांवर त्या त्या भागांतील मांडलिक राजांच्या व इतर साक्षी आहेत. नायरांच्या नाडांना जे राज्यांत हक्क होते, तेच ज्यू व क्रिस्ती लोकांस ह्या सनदांनीं दिले आहेत. ह्या लोकांचा एक पृथक् समाज म्ह० नाड बनवून त्यांजवर त्यांच्याच जातीचा एक अंमलदार नेमण्यांत आला. त्याचा अधिकार वंशपरंपरेनें चालावयाचा होता. त्यास छत्री, मशाल, पालखी, शिंग, नौबत वगैरे बहात्तर प्रकारचा इतमाम होता. ' मरुवान सापीर इसो ' ह्यानें जमिनींतील पाण्याचे हक्क विकत घेतल्याचा उल्लेख आहे. नायरांच्या नाडाप्रमाणें ज्यू व क्रिस्ती लोकांची ' षट्शत ' सभा बनविण्यांत आली. अर्थात् इतर जातींच्या संघांप्रमाणें ह्याही लोकांचे संघ निर्माण झाले. सर्वांच्या संमतीनें हे हक्क देण्यांत आले, म्हणून

सर्वांच्या साक्षी सनदांवर घातलेल्या आहेत. अशा प्रकारें क्रिस्ती व ज्यू लोकांवर सार्वजनिक संस्थांची जबाबदारी सोंपून त्यांच्या संघपतींस इतरांप्रमाणें सार्वजनिक उत्पन्नाचा हिस्सा वंशपरंपरा तोडून देणें, ह्या गोष्टीस सर्वांची संमति मिळविण्यांत आली होती. परके लोक आपल्या देशांत आले असतां त्यांस आपल्या स्वराज्यांत बेमालूम मिळवून घेण्याची आर्यांची पद्धत व पाश्चात्यांच्या वसाहतींत हिंदु वगैरे बाहेरच्या लोकांस वागविण्याची हल्लींची पद्धत, यांचा एकत्र विचार ज्याचा त्यानें करावा, म्हणून या सनदांची हकीकत मुद्दाम येथें दिली आहे.

सनदांतील मजकुरावरून असें दिसतें की, सार्वभौम सरकारानें आपल्या हातांत फारच थोडी सत्ता ठेविली होती. प्रांतोप्रांतीं निरनिराळ्या सभा नेमून त्यांजकडे राज्यकारभार सोंपविला होता. सर्वांवर मुख्य सार्वभौम राजा पेरुमाळ असून त्याच्या हाताखालीं संघपति म्हणजे प्रांतिक सभेचा मुख्य मांडलिक राजा होता. "ब्राह्मणांच्या दोनही संघांच्या संमतीनें हा लेख मंजूर केला आहे." असे शब्द सनदांचे शेवटीं आहेत. त्यावरून ब्राह्मणांचेही असे संघ होते व नवीन संघ बनवितांना ब्राह्मणसंघांची संमति घ्यावी लागे असें दिसतें. हिंदुस्थानच्या इतर भागांत ग्रामसंस्था होत्या, पण मलबारांतील ही राज्यपद्धति निराळी आहे. ह्या पद्धतीमुळें लोकांवर सार्वभौमाचा किंवा संघपतीचा जुलूम होण्यास सवड नव्हती. देशांत व्यापाराच्या किंवा अन्य कारणानें नवीन लोक येऊन राहिले व त्यांची भरभराट झाली, म्हणजे त्यांस राज्यकारभाराचे हक्क देणें, आणि त्यांची व्यवस्था त्यांच्याच हातांत सोपणें, हें आपलें कर्तव्य होय, असें तत्कालीन राज्यकर्ते समजत. क्रिस्ती, ज्यू वगैरे परकीय लोकांसही आपापल्या समाजापुरते व इतर समाजांच्या आड न येतील असे हक्क तोडून देऊन, सर्वांस स्वतंत्रतेनें व शांततेनें वागूं देण्याची सोय मलबारांत होती. जे हक्क लोकांस देण्यास क्रिस्ती सरकार आज तयार नाहीं, ते हक्क आमच्या पूर्वजांनीं क्रिस्ती व ज्यू लोकांस दिले होते. सन १८०४ तील लॉर्ड वुइल्यम बेंटिंकचा खालील उल्लेख स्मरणीय

आहे. ' मलबारच्या लोकांस स्वातंत्र्याची चाड फार आहे. ते कधीं जुलूम सहन करावयाचे नाहींत. चांगली वागणूक म्हणजे काय हें त्यांस उत्तम समजतें. न्यायासनाविषयीं व प्रचलित प्रघातांविषयीं त्यांस अतिशय पूज्यबुद्धि वाटते. शेतीचें काम ते मोठें सन्मान्य समजतात. शेतकऱ्यांपासून अंमलदारांनीं कर घेण्याचे नियम फार व्यवस्थेशीर ठरविलेले आहेत. '

वरील तीन सनदांपैकीं दुसरीवर मात्र ब्राह्मणांची संमति आहे; पहिलीवर व तिसरीवर नाहीं. पहिल्या दोहोंतील संघ कोडुंगलूरच्या जवळचे असून तिसरींतील संघ दक्षिण त्रावणकोरांतील कोलमच्या जवळचा आहे. त्रावणकोरांत वैदिक ब्राह्मण फारसे नाहींत व त्या वेळींही नव्हते. वैदिक ब्राह्मण नंबुतिरी ह्यांचा जमाव मलबारात विशेष आहे. पहिली सनद ७०० तली व दुसरी ७७४ तली असल्यामुळें, ह्या दोन सालांच्या दरम्यान नंबुतिरी ब्राह्मणांचा प्रवेश मलबारांत झाला असावा, असें अनुमान निघतें.

नायरांमध्येंही पोटभेद आहे. त्यांची राहणी स्वच्छ आहे. बायकांना स्वतंत्रता असून त्या समारंभांत पुरुषांप्रमाणेंच उघडपणें बाहेर येतात. त्यांच्यांत स्वयंवराची चाल असून स्त्रिया प्रौढ झाल्यावर त्या आपला पति पसंत करितात.* ' मलबारांतील लोक नेहमींच लढाऊ बाण्यानें राहतात. ते फार सभ्य आहेत. सातव्या वर्षी त्यास कसरतीच्या शाळेंत घालून हत्यारांचा उपयोग शिकवितात. कसरतीनें त्यांचें अंग इतकें लवचिक होऊन जातें कीं, जणूं काय त्यांस हाड असें नाहींच. हे लोक नेहमीं अंगास तेल लावितात. त्यांस हत्यारांचा अभिमान विशेष आहे. हत्यार घेतल्याशिवाय ते बाहेर पडत नाहींत. खून झाला तर मयताच्या मुलानें किंवा नातेवाइकानें शत्रूचा प्राण घेतलाच पाहिजे, असा त्यांचा संप्रदाय असे. '†

---

* Johnston's relations of the most famous kingdom in the word,—[ Ed. 1611 ].

† Mrs. Murdoch Brown to Francis Buchanan,–( beginning of 19th Cent ).

मुंबईच्या गव्हर्नर जोनाथन डंकन, सर हेक्टर मनरो, लॅबूर्डोने वगैरे अनेक गृहस्थांनीं नायर लोकांच्या शस्त्रप्रवीणतेची व शौर्याची तारीफ केली आहे. त्यांचा नायक लढाईंत पडला तर प्राण जाईपर्यंत शत्रूचा सूड घेण्यास ते मागेंपुढें पाहत नाहींत.

प्रेत जाळल्यावर त्याच्या अस्थि सुंदर दगडी पेटींत घालून पुरण्याची चाल नायरांत होती. अशा रीतीनें पुरलेल्या निरनिराळ्या आकारांच्या पुष्कळ जुन्या पेट्या सांपडल्या आहेत. त्यांजवर नकशी असून लेख कोरलेले आहेत. ही चाल पूर्वीं होती. अलीकडे अस्थि नदींत किंवा तीर्थांत टाकितात.

धर्मसंबंधानें पाहतां अशोकाच्या वेळेपासून मलबारांत बुद्ध व जैन या धर्मांचा प्रसार झाला. तेथें आरंभीं जैन धर्माचें प्राबल्य विशेष होतें. इसवी सनाच्या आठव्या शतकांत नंबुतिरी ब्राह्मण मलबारांत आल्यावर लोकांच्या धर्माचारांत पुष्कळ फरक पडला, आणि शंकराचार्यांचें नवीन प्रतिपादन जोरानें अंमलांत आलें.

मलबारचें वर्णन लिहिणारा मि. लोगन ह्मणतो, कीं मलबारच्या संबंधानें ध्यानांत ठेवण्यासारखी मुख्य गोष्ट ह्मणजे 'नायर लोकांचा प्रभाव होय. शेंकडों वर्षेंपावेतों त्यांचें लष्करी व इतर कामांत अतिशय प्राधान्य होतें. परकी लोक मध्यें आले नसते तर तें तसेंच कित्येक शतकेंपर्यंत पुढेंही टिकलें असतें. अजूनही नायर लोक मलबारांत राहतात, पण दुःखाची गोष्ट इतकीच कीं, लोकांचे नाहींसे होणारे हक्क शाबूद राखण्याचें सामर्थ्य त्यांच्या हातीं पूर्वीं होतें तें आतां राहिलें नाहीं. पूर्वीं राज्यकर्त्यांचा जुलूम त्यांजवर चालत नसे. त्यांच्या राज्यव्यवस्थेस ' पार्लमेंट ' हें नांव एका बहुश्रुत तत्रस्थ गृहस्थानें दिलें आहे. पूर्वीं मलबारच्या राजास रयतेवर अनियंत्रित अंमल चालवितां येत नसे. सर्व गोष्टी त्यास कुट्टं सभेच्या मार्फत कराव्या लागत. ही प्रजासत्ताक राज्यव्यवस्था प्रथम हैदरअलीनें मोडिली. ' एकंदरींत ह्या प्रांतांत पुष्कळ शतकेंपर्यंत सौख्य व सुबत्ता नांदत असून तेथचा व्यापार भरभराटींत होता.

**४. मलबारांतील मुसलमान.**—मलबारांत मुसलमानांचें महत्व फार आहे. मुसलमानांच्या उद्योगानें मलबारचा व्यापार वाढून त्याची ख्याति झाली. येथें मुसलमानांचा प्रवेश इ. स. ८५१ नंतर झाला. असें सांगतात कीं, मलबारांत चेरमाण पेरुमाळ नांवाचा पराक्रमी राजा क्रांगानूर येथें राज्य करीत होता. त्याच्या देशांत एकदां कांहीं आरब साधु आले. त्यांनीं राजाचें मन मुसलमानी धर्माकडे वळविलें. तेव्हां त्यानें एकवार मक्केस जाऊन येण्याचा निश्चय केला. त्यासाठीं एक जहाज त्यानें गुप्त रीतीनें तयार केलें. त्यांत बसून राजा पळून गेला, आणि आरबस्तानांत 'शहर' नांवाच्या ठिकाणीं उतरला. तेथें मलिक इब्नदिनार हा गृहस्थ आपल्या सर्व कुटुंबासह येऊन राजास भेटला. पुढें दोघांची चांगली दोस्ती होऊन राजानें मुसलमानी धर्म स्वीकारिला, आणि तेथेंच तो कांहीं वर्षें राहिला. तेथून परत हिंदुस्थानांत येऊन येथच्या लोकांस मुसलमानी धर्मांत आणावें अशी त्याची इच्छा होती. पण मध्येंच आजारी पडून तो आरबस्तानांत मरण पावला. मरणापूर्वी त्यानें मलिक-इब्न-दिनार व दुसरे स्नेही ह्यांस जवळ बोलावून, 'तुह्मी मलबारांत जाऊन तेथें मुसलमानी धर्म पसरा,' अशी आग्रहाची विनंति केली; आणि मलबारांतील राजास त्याबद्दल पत्रें देऊन मशिदी वगैरे बांधून त्यांस उत्पन्नें तोडून देण्याविषयीं सांगितलें. आरबस्तानांत शहर येथें या पेरुमाळ राजाची कबर आहे.

पुढें कांहीं काळानें मलीक-इब्न-दिनार हा कुटुंबसह पेरुमाळ राजाचीं पत्रें घेऊन मलबारांत आला. राजाच्या मरणाची बातमी त्यानें प्रथम गुप्त ठेविली. क्रांगानूरच्या राजानें त्याचा चांगला सत्कार केला, व चेरमाणानें लिहिल्याप्रमाणें त्यास मशिदीसाठीं जागा व उत्पन्नें करून दिलीं. मलीक-इब्न-दिनार हा तेथें मुख्य काजी झाला. पुढें त्रावणकोरांत जाऊन त्यानें कोलम येथें मशीद स्थापिली. तसेंच उत्तरेकडे जाऊन मंगळूर, कासारगोडें वगैरे ठिकाणीं मशिदी बांधिल्या. ह्याप्रमाणें पश्चिम किनाऱ्यावर मुसलमानी धर्माची स्थापना झाली. तेथील अधिकाऱ्यांकडून व्यापारोपयोगी ठिकाणें मुसल-

मानांनीं पसंत करून घेतली. ह्याप्रमाणें मलीक-इब्न-दिनार यानें मलबारांत उद्योग चालविला, त्यापूर्वींच किनाऱ्यावरील लोकांस आरब व्यापाऱ्यांची चांगली ओळख झाली होती. अगोदरपासूनच मलबारांत आरब व्यापारी येऊन राहिले होते; आणि तेथें हिंदु स्त्रियांशीं लग्नें केल्यानें त्यांची मिश्र प्रजा उत्पन्न झाली होती. ही प्रजा वाढत गेल्यामुळें व्यवस्थित धर्मबंधनांची जरूर उत्पन्न झाली, तेणेंकरून मलीक-इब्न-दिनारच्या प्रयत्नास यश आलें. ही जी नवीन मिश्र प्रजा उत्पन्न झाली तिला 'मापला' असें नांव पडलें. मापला हा शब्द मलबारांतील मुसलमानांस लावितात. 'महापिल्ला,' महा म्हणजे मोठा, व पिल्ला म्हणजे मूल, अर्थात् मोठ्या सन्मानाचा पुरुष, ह्यास मुलासारखें ममतेनें वागविलें पाहिजे, असा मापला शब्दाचा अर्थ आहे.

मापल्यांची मुख्य जागा काननूर. तेथें अद्यापि मापला मुसलमानांचा राजवंश आहे. इसवी सनाच्या बाराव्या शतकाच्या आरंभीं मलबारांत एका राजापाशीं 'आर्यन कुलंगार नायर' ह्या नावाचा एक पिढीजाद दिवाण होता. त्यानें मुसलमानी धर्म स्वीकारून महंमदअली असें नांव धारण केलें. हुशार व शहाणा असल्यामुळें मुसलमान झाला तरी त्याची दिवाणगिरी कायम राहिली. सारांश, मुसलमान होणें चांगलें अशीच मलबारांत त्या वेळीं लोकांची थोडी बहुत समजूत झालेली होती. मलबारांतील हें आरब मुसलमानांचें वजन व उत्तरहिंदुस्थानांत अफगाण व तुर्क वगैरेंनीं केलेले अनर्थ, ह्यांमध्यें एक प्रकारचा चमत्कारिक विरोध दिसतो. हिंदुलोकांवर जुलूम करून त्यांस मुसलमान करणें, लढाई, छळ, व कत्तली करणें इत्यादि प्रकार उत्तरेंत चालू असतां, मलबारांत शांततेनें व गोडीगुलाबीनें मुसलमानी धर्मप्रसाराचें काम चाललें होतें. क्रिस्ती धर्माचा सुद्धां तेथें पुष्कळ प्रसार झाला.

वास्तविक म्हटलें म्हणजे मलबारांत हिंदुधर्माचा पगडा चांगलासा बसला नव्हता. तेथें ब्राह्मणांचें प्राबल्य झालें नसल्यामुळें मुसलमानी धर्माची स्थापना सुकर झाली. मलबार व हिंदुस्थानचे इतर भाग ह्यांच्यामधील

हा फरक लक्षांत ठेवण्याजोगा आहे. ब्राह्मण संस्कृतीचें वर्चस्व इतर प्रांतांप्रमाणें ह्या प्रांतांत बसलेलें नसल्यामुळें परधर्माचा प्रवेश पश्चिमकिनाऱ्यावर जितक्या सुलभ रीतीनें झाला, तितका इतर प्रांतांत झाला नाहीं. मुसलमानांनीं व पोर्तुगीझांनीं मलबारांत पुष्कळ लोक बाटविले. ह्या बाटलेल्या लोकांची संख्या याच भागांत ज्यास्त आहे. मलबार किनाऱ्यावर पोर्तुगीझांस यश आल्यामुळें, सर्व देशांत क्रिस्ती धर्म सहज पसरेल अशी पोर्तुगीझांची कल्पना होऊन, त्यांनीं धर्म वाढविण्याचे मुद्दाम प्रयत्न केले. ह्यावरून धर्मसंरक्षणाच्या कामांत ब्राह्मणांची कामगिरी दिसून येते. ब्राह्मणांनीं इतर जातींवर आपला पगडा बसविल्यामुळें देशाची हानि झाली असें प्रतिपादन करणारांनीं मलबारांतील हा प्रकार ध्यानांत घेण्याजोगा आहे. कालिकोटचे सामुरी आपल्या जहाजांवर मुसलमान खलाशी पाहिजेत म्हणून हिंदुमुलांस मुसलमान करून वाढवीत असत. ह्या मुसलमानांनीं बहुतेक हिंदूंच्या चालीरिती घेतल्या आहेत. ते बहुधा सुनी आहेत.

५. **मलबारांतले क्रिस्ती.**—ह्यांशिवाय मलबारांतील महत्वाचे लोक क्रिस्ती होत. मलबारांत क्रिस्ती धर्म सेंट टॉमस नांवाच्या साधूनें स्थापिला, असा समज आहे, म्हणून त्यांस सेंट टॉमस क्रिश्चन्स् अथवा मूळचे सिरियांतले असल्यामुळें त्यांस सिरियन, असेंही म्हणतात. क्रिस्तारंभींच्या काळांत सिरियांतील क्रिस्ती व्यापारी हिंदुस्थानांत व्यापाराकरितां येत, तेव्हां त्यांनीं आपला धर्म येथें सुरू केला असावा. कोणत्या धर्माचे लोक प्रथम आले हें निश्चित नाहीं. तथापि इ. स. १००० पावेतों निरनिराळ्या पंथांचे क्रिस्ती लोक इकडे येऊन आपआपले पंथ स्थापीत होते. पोर्तुगीझ इकडे आल्यावर त्यांस ते सर्व क्रिस्ती मिळाले. सन १५९८त अलेक्झिस मेनेझिस ह्यास पोपनें गोव्याचा बिशप नेमून इकडे पाठविलें. हा त्या धर्माचा येथें व्यवस्थित आरंभ होय. पुढें सन १६४३ त डच लोकांनीं कोचीन शहर काबीज केलें, तेव्हांपासून त्यांचा प्रॉटेस्टंट पंथ तेजींत आला. एकंदरींत मलबारांतील क्रिस्ती लोकांस जें महत्व आलें तें इतरांस आलें नाहीं. हिंदु-

स्थानांतळे सर्व रोमन कॅथोलिक पोपच्या ताब्यांत आहेत. मंगळूर येथें बेसल मिशन म्हणून आहे तें जर्मन प्रॉटेस्टंट असून त्यांनीं बरेच उद्योगधंदे प्रचारांत आणिले आहेत.

**कालिकोटचे सामुरी.**—चेरमाण पेरुमाळ हा मुसलमान होऊन आरबस्तानांत गल्यावर त्यानें आपल्या राज्याचे दोन भाग केले. एक उत्तर कालर्त्तीरी ह्मणजे मलबार, व दुसरा, दक्षिणकोलत्तीरी ह्मणजे त्रावणकोर. हीं राज्यें कांहीं दिवस चाललीं. पण त्यांचा अंमल मांडलिक राज्यांवर चांगलासा बसला नाहीं. आठव्या शतकांत एरनाड नांवाच्या नायर परगण्याचा अधिपति सामुरी ह्मणून होता. सामुरी ह्मणजे सामुद्री, त्यास पाश्चात्य ग्रंथकारांना झामोरिन अशी संज्ञा दिली आहे. त्याच्या कुटुंबाचें आडनांव ‘ इरादी ’ असें होतें. राष्ट्रकूटांचे वगैरे हल्ले येत असतां पेरुमाळास मदत करून हा सामुरी बराच महत्वास चढला. पेरुमाळ गेल्यावर त्यानें राज्याचा विस्तार वाढविला व विशेषतः समुद्रावर त्याचा संचार सुरू झाल्यामुळें त्याचा दरारा वाढला. पुढें त्यानें आपल्या नांवापुढें ‘ कुन्नलकोन ’ ह्मणजे ‘ गिरिसागरपति ’ अशी संज्ञा घेतली. त्यानें पोलनाड परगणा जिंकून आपल्या राज्यास जोडला. पोलनाड ह्मणजे कालिकोटच्या आजूबाजूचा प्रदेश. ह्या प्रदेशांत कालिकोट येथें त्यानें आपली राजधानी करून सर्व प्रकारची मजबुदी केली, व विशेषतः परकीय व्यापाऱ्यांस चांगला आश्रय व उत्तेजन त्यानें दिल्यामुळें राज्याची भरभराट झाली. आरब मुसलमानांच्या हातांत पूर्वेकडील व्यापार कित्येक शें वर्षें राहिला. तेवढ्या अवधींत सामुरीनें आरबांस उत्तम साह्य करून आपला व्यापार वाढविला, एवढेंच नव्हे, तर आरबांनीं त्यास घोडे व फौज देऊन ज्यास्त मुलूख जिंकण्यासही मदत केली. ह्याच कारणास्तव पोर्तुगीज कालिकोटास आले, तेव्हां तेथें आरबांचें महत्व त्यांस विशेष दिसून आलें. पेरुमाळ निघून गेल्यावर महामखसमारंभाचा मुख्य मान कांहीं दिवस वल्लुवनाडच्या राजास मिळाला; आणि पुढें तो मान सामुरीस मिळूं लागला. सामुरीनें कोचीनच्या राजाचा बराच मुलूख जिंकिला. सन १२९२-९३ त

मार्कोपोलो फिरत फिरत मलबारांत आला, तेव्हां तेथें त्यास बारा राज्यें दिसलीं. त्यांपैकीं मोठ्याची फौज पन्नास हजार व लहानाची फौज पांच हजार होती. त्या वेळेस विजयनगरचें राज्य प्रबळ होतें. सामुरीचें प्रस्थ चौदाव्या शतकांत विशेष वाढलें. अब्दुल रझाक नांवाचा एक प्रवासी सन १४४२ त लिहतो, ‘ कालिकोट येथें न्याय चांगला होतो. सर्वांची मालमत्ता सुरक्षित राहते; इतकी कीं मोठमोठे व्यापारी अतिशय मोलवान माल दूर देशाहून ह्या शहरीं आणून बाजारांत उघड्या रस्त्यांवर ठेवून देतात. त्यांजवर कोणी सांभाळणारा नसला, तरी त्या मालास चोरीची भीति नसते. कोणी पाहराही ठेवीत नाहीं. जकातनाक्यांचे अधिकारी तो माल आपल्या ताब्यांत ठेवून घेतात. जर तो माल विकला, तर शेंकडा अडीच रुपये जकात घेतात; माल विकला नाहीं तर तो ते अधिकारी ज्याचा त्यास परत करितात.’ कालिकोट शहराचा मोठेपणाही अशा प्रामाणिकपणावरच वाढला अशी आख्यायिका आहे. पूर्वकिनाऱ्यावरील एक मोठा व्यापारी आपलें जहाजांत बरेंचसें सोनें भरून प्रवासास जात असतां, गलबतास वजन सहन न होऊन त्यानें तें जहाज कालिकोटास आणिलें; आणि कांहीं सोनें सामुरीच्या ताब्यांत ठेवून तो स्वदेशीं गेला; व पुनः परत कालिकोटास आल्यावर त्याचें सोनें सामुरीनें जसेंच्या तसेंच त्यास परत दिलें तेव्हां सर्व व्यापारी लोकांत सामुरीची मोठी ख्याति झाली.

पोर्तुगीझ लोक प्रथम मलबारांत आले, तेव्हां तेही आरब वगैरे व्यापाऱ्यांप्रमाणेंच साळसूद असतील, असा तेथील बहुतेक राजांचा समज होता. व्यापारवृद्धीच्या कामांत धर्मप्रसार व राज्यस्थापना असले अंतस्थ हेतु त्यांच्या मनांत असतील हा संशयच कोणास आला नाहीं. पूर्वी हजारों वर्षेपर्यंतां तसा प्रयत्नही कोणीं केला नव्हता. परंतु पोर्तुगीझ लोकांच्या आगमनप्रसंगीं जगांत कोणकोणत्या घडामोडी चालू आहेत हें पश्चिम किनाऱ्यावरील राजांनीं समजून घेतलें नाहीं. कोचीनच्या राजास सामुरीच्या वैभवाचा द्वेष वाटत होता. सामुरीस जें वैभव आरबांपासून मिळालें तेंच आपणांस

पोर्तुगीझांपासून प्राप्त होईल, अशी कोचीनच्या राजास आशा वाटत असावी, म्हणूनच पोर्तुगीझांशीं सख्य ठेवून सामुरीचा पाडाव करण्याचा विचार कोचीनच्या राजाच्या मनांत आला. अंतर्वैमनस्यें तर होतींच; तरी पण ह्या परकीय व्यापाऱ्यांपासून आपला फायदाच आहे, त्यांजपासून आपली भरभराटच होईल, असा मलबारांतील राजांचा समज असल्यामुळें, त्यांनीं कांहीं एक शंका न घेतां पोर्तुगीझ व इतर लोकांस आपल्या राज्यांत खुषीनें आश्रय दिला.

डच लोक व्यापारांत फार जुलूम करीत असत. अमुक माल अमुक दरानेंच विकला पाहिजे असें ते ठरवीत. इंग्रजांची पद्धत तशी नव्हती. ते स्वतःचे दर न ठरवितां चालू भावानें व्यापार करीत. मलबारांत इंग्रजांचा प्रवेश सन १६६४ त झाला. त्या वेळीं तेथें जे राजे होते त्यांजपासून थोडेथोडे व्यापाराचे हक्क इंग्रजांनीं मिळविले. विशेषतः मिरीं आपणासच सर्व विकावें, दुसऱ्या कोणास देऊं नये असा त्यांनीं तेथील राजापासून ठराव करून घेतला. ह्या राजाशीं इंग्रजांनीं आरंभीं वार्षिकी मक्तयाचे ठराव केले होते. पुढें इंग्रजांची सत्ता वाढत गेली, त्याप्रमाणें त्यांनीं त्यांस आपल्या ताब्यांत आणून नेमणुका करून दिल्या. कालिकोटचा शेवटचा राजा मनविक्रमसामुरी हा सन १८९६ त मरण पावला. त्यास ' महाराजा बहादुर ' ही पदवी इंग्रज सरकारानें दिली होती. हल्लीं त्यांस सालिना एकलक्ष चौतीस हजारांची नेमणूक आहे.

---

# प्रकरण चवथें.

## पोर्तुगीझ अमलाची स्थापना.

### सन १५१५ पावेतों.

१. युरोपांत पोर्तुगालचा उदय.

२. नौकाशास्त्रवेत्ता राजपुत्र हेन्री.

३. डिआझ व कोलंबस यांच्या सफरी, (१४८७ व १४९२).

४. गामाची पहिली सफर, ( स. १४९७–९८ ).

५. पेड्रो काब्रालची सफर, ( स. १५०० )

६. गामाची दुसरी सफर ( स. १५०२–३ )

७. फ्रान्सिस्को ड आल्मीडा ( स. १५०५–१५०९ ).

८. आल्बुकर्कची पहिली कामगिरी, ( स. १५०६–१५०९ ).

९. गोंव्यांचा पाडाव.

१०. मलाकाचा पाडाव, (स. १५११)

११. आलबुकर्कचा मृत्यु व त्याचीं धोरणें.

ह्या प्रकरणांतील हकीकत समजण्यास पोर्तुगालच्या राजांचीं खालील नांवें उपयोगी पडतील.

पहिला जॉन ( स. १३८५–१४३३ ).

डयुआर्ट | प्रिन्स हेन्री ( ज. १३९४; मृ. १४६० ).

पांचवा आल्फांझो ( स. १४३८–१४८१ ).

दुसरा जॉन ( स. १४८१–१४९५ ).

इमॅन्युएल ( स. १४९५–१५२१ )

तिसरा जॉन ( स. १५२१–१५५७ ).

सबॅश्शन ( स. १५५७–१५८० ).

स. १५८० त स्पेनपोर्तुगालचीं राज्यें एक झालीं.

**१. युरोपांत पोर्तुगालचा उदय.**—यूरोपच्या नैर्ऋत्य कोपऱ्यांत जो द्वीपकल्प आहे, त्यास आयबीरिया असें नांव असून त्यांत स्पेन व पोर्तुगाल ह्या दोन देशांचा समावेश होतो. ह्या द्वीपकल्पांत इ. स. पूर्वी ११०० च्या सुमारास टायर येथील फिनिशियन लोकांनीं येऊन आपल्या वसाहती केल्या; आणि त्या ठिकाणीं पूर्वेकडील जिन्नस नेऊन विकण्याचा व्यापार सुरू केला. आफ्रिकेच्या उत्तर किनाऱ्यावर कार्थेज येथें फिनिशियन लोकांनींच राज्य स्थापिलें होतें. त्यांतूनही कित्येक लोक आयबीरियांत जाऊन राहिले. कार्थेजचा सरदार हास्डुबाल ह्यानें न्यू कार्थेज म्हणजे हल्लींचें स्पेन देशांतील कार्थेजीना शहर स्थापिलें. पुढें रोमन लोक प्रबळ होऊन त्यांनीं हा देश इ. स. पू. १३३ च्या सुमारास कार्थेजिनियन व फिनिशियन लोकांपासून जिंकून घेतला. तेव्हांपासून इ. स. ४७० पावेतों तो रोमन लोकांच्या ताब्यांत असून त्यांनीं त्यास हिस्पानिया असें नांव दिलें होतें. पुढें रोमन लोकांचा पराजय करून विझिगॉथ लोकांनीं स्पेन देशांत आपलें राज्य स्थापिलें, तें स. ४१८—७११ पावेतों चाललें. त्याची राजधानी टोलेडो शहर होती.

हिंदुस्थानांत मुसलमानांनीं प्रथम प्रवेश केला त्याच सालीं म्हणजे इ. स. ७११ त आरब सरदार तरीक ह्यानें स्पेन देशचा बहुतेक भाग जिंकून तेथें मुसलमानांचा अंमल बसविला. हा मुसलमानी अंमल अकराव्या शतकाच्या मध्यापर्यंत चालून पुढें तो देश स्पेनच्या क्रिस्ती लोकांच्या ताब्यांत गेला. ह्या क्रिस्ती लोकांचीं दोन राज्यें स्थापन झालीं. एक कॅस्टाइलचें, व दुसरें आरेगॉनचें. मुसलमान लोकांचा थोडा बहुत अवशेष देशांत राहिला होता तो ह्या दोन राज्यांनीं हळूहळू नाहींसा केला. स १४६९ त आरेगॉनचा राजा फर्डिनंड व कॅस्टाइलची राणी इझाबेला ह्यांचें लग्न होऊन तीं दोन राज्यें एक झालीं. स. १६०९ त स्पेनचा राजा तिसरा फिलिप यानें देशांत वसती करून राहिलेल्या सर्व मुसलमान लोकांस एकदम सक्तीनें बाहेर घालवून दिलें. ह्या हुकुमानें वस्तुतः स्पेनचेंच नुकसान झालें. व्यापार व कसबाचीं कामें करण्यांत मुसलमान लोक कुशल होते, तसेच ते शेतकीच्या कामांतही विशेष

प्रवीण होते. साखर, कापूस, तांदूळ, व रेशीम ह्यांची पैदास त्यांनीं स्पेन-देशांत सुरू केली, आणि कालवे वगैरे बांधून त्यांनीं जमीन कमावली. त्यामुळें स्पेनदेशचा हुन्नर वाढून तेथील जिनसांचा खप बाहेर विशेष होऊं लागला. मुसलमान लोकांस घालवून दिल्यानें स्पेनच्या व्यापाराचें जें नुकसान झालें त्यांतून अद्यापि स्पेन देश वर निघाला नाहीं.

ही थोडक्यांत स्पेनची हकीकत झाली. हल्लीं ज्यास पोर्तुगाल म्हणतात, तो प्रांतही स्पेनबरोबरच मुसलमानांचे ताब्यांत गेला होता. त्यांजपासून कांहीं भाग आल्फांझो हेन्रीनें जिंकून तेथें स्वतंत्र राज्य स्थापिलें. स. ११४७त लिस्बन शहर काबीज करून तेथें हेन्रीनें आपली राजधानी केली. पुढें शंभर वर्षांवर सारखीं युद्धें चालून स. १२७९ त पोर्तुगाल देश हल्लीं आहे तेवढा स्वतंत्र झाला. इंग्लंडचा राजा पहिला एड्वर्ड व पोर्तुगालचा राजा डेनिझ यांचें मोठें सख्य असे. ह्यामुळें इंग्रज व पोर्तुगीझ हीं दोनही राष्ट्रें पुष्कळ दिवसपर्यंत एकोप्यानें वागून दर्यावर्दीपणांत व व्यापारांत पुढारी होतीं. स. १३८६ त ह्या दोन राष्ट्रांमध्यें तह झाला तो विंडसरचा तह म्हणून प्रसिद्ध आहे. ह्या तहानें ह्या दोन राष्ट्रांचा स्नेह कायमचा असावा असें ठरलें. पोर्तुगालचा राजा पहिला जॉन ह्यास जॉन धि ग्रेट म्हणतात. त्यान इंग्लंड व स्पेन ह्यांजबरोबर सख्य ठेवून फार वर्षें शहाणपणानें राज्य केलें. पंधराव्या शतकांत व तत्पूर्वी युरोपाच्या राष्ट्रांची अंतःस्थिति आजच्यासारखी नव्हती. त्या वेळीं तेथें अनेक लहान लहान राज्यें व त्यांचे अनेक पोटविभाग होते. जिनोआ, व्हेनिस, फ्लॉरेन्स वगैरे राज्यांचें महत्व सुद्धां त्या शहरांपलीकडे फारसें नव्हतें. पोर्तुगालची स्थितिही थोडीबहुत अशीच होती. तेराव्या शतकांत पोर्तुगीझ राष्ट्रास स्वातंत्र्य प्राप्त झालें, तेव्हांपासून म्ह० स. १३८५ पासून १५२१ पावेतों सुदैवानें एकापाठीमागून एक असे पांच हुशार राजे गादीवर आले. ह्या पांच कारकिर्दींत पोर्तुगाल देशाची मोठी भरभराट झाली. ह्या कालांत इंग्लंडशीं स्नेह, मुसलमानांचा द्वेष, व अज्ञात भूभागांचे शोध ह्या तीन मुख्य गोष्टींनीं त्या देशाचा इतिहास बनलेला आहे.

**२. नौकाशास्त्रवेत्ता राजपुत्र हेन्री** ( स. १३९४–१४६० ).— जॉन ऑफ् गॉंट्, ड्यूक ऑफ् लँकॅस्टरची मुलगी फिलिपा ही पोर्तुगालचा राजा पहिला जॉन यास दिलेली होती. ती फार साधी, शहाणी व धर्मनिष्ठ होती. निरनिराळ्या राष्ट्रांचें वैर मोडून शांतता व सख्य करण्यांत तिनें आपलें आयुष्य खर्च केलें. तिला आठ मुलें झालीं. त्या सर्वांस तिनें शिक्षण फार चांगलें दिलें. त्यांपैकीं डुआर्ट, पेड्रो, फर्नांडो व हेन्री हे चार मुलगे नामांकित झाले. त्यांत सर्वांत धाकटा हेन्री ह्यास इतिहासांत 'नौकानयनवेत्ता' हें टोपण नांव मिळालें आहे. त्याचे पराक्रम वीस वर्षांच्या वयापासूनच लोकांपुढें चमकूं लागले. बापाबरोबर युद्धास जाऊन विजय संपादिल्यामुळें त्यानें ह्या मुलास निरनिराळ्या ठिकाणीं ड्यूकच्या जहागिरी दिल्या होत्या. राजपुत्र हेन्रीचें लक्ष मूळपासून नौकानयनाकडे विशेष होतें. जिब्रॉल्टरच्या समोर आफ्रिकेच्या उत्तर किनाऱ्यावर स्यूटा नांवाचें एक शहर आहे, तेथें अलेकझांड्रिया वगैरे ठिकाणांहून मुसलमानांचा मोठा व्यापार चालत असे. सन १४१५ त पहिल्या जॉननें आरमार पाठवून तें शहर काबीज केलें. तेव्हां त्याच्या शौर्याबद्दल युरोपांत मोठी ख्याति झाली. स्पेन देशावर आरबांचा अंमल झाल्यापासून तेथें हिंदुस्थानांतील अनेक मौल्यवान जिनसांचा खप होऊं लागला होता. पण तेथून आरबांचा अंमल नष्ट झाल्यापासून ते जिन्नस युरोपास मिळण्याची मोठी पंचाईत पडूं लागली, तेव्हां हिंदुस्थानास जाण्याचा समुद्रमार्ग शोधून काढावा आणि तेणेंकरून मुसलमानांची सर्व संपत्ति आपण घ्यावी, अशा इराद्यानें हेन्रीनें समुद्रांत अनेक सफरी करविल्या. स. १४१८ त संसार सोडून यूरोपचें अगदीं नैर्ऋत्य टोंक केप सेगर येथें त्यानें एक वाडा बांधून वेधशाळा स्थापन केली, आणि तेथेंच आपण राहूं लागला. तेथून त्याची दृष्टि अफाट समुद्रावर पोंचत असे. या ठिकाणीं त्यानें युरोपांतून मोठमोठे पंडित आणविले, आणि बाह्य प्रदेशांच्या शोधासाठीं सफरी करविल्या. तो एका क्रिस्ती संस्थेचा अध्यक्ष असल्यामुळें त्यास जें उत्पन्न येई तें सर्व त्यानें या उद्योगांत खर्च केलें. व्यापार व क्रिस्ती धर्म या दोहोंची वृद्धि एकाच उद्योगानें त्यास करावयाची

होती. ज्योतिष व नौकाशास्त्र यांचा अभ्यास करून त्यानें जे शोध केले त्यायोगें आशिया, आफ्रिका व अमेरिका येथील अज्ञात प्रदेश युरोपियनांच्या हातास लागले. त्याचा भाऊ पेड्रो यानें सन १४१६ पासून सन १४२८ पावेतों यूरोपच्या सर्व देशांत प्रवेश करून व्यापाराची वगैरे विशेष माहिती मिळविली, तीही हेन्रीच्या फार उपयोगी पडली. त्या वेळीं आफ्रिकेच्या किनाऱ्यानें केप 'नंन्'च्या पुढें युरोपियन जहाजें जात नसत. 'नंन्' या शब्दाचा अर्थच 'पुढें जाण्याची हद्द बंद' असा आहे. हेन्रीनें त्याच्यापुढें केप बोजाडोरपर्यंतच्या किनाऱ्याचा शोध लाविला. त्याच्याच जवळील मदिरा बेटांचा शोध स. १४१९ त लागला. अझोर द्वीपसमूहांतील सेंट मेरी बेट स. १४३१–३२ चे दरम्यान अवगत झालें केप व्हर्ड बेटांपैकीं सेंट तियागोचा शोध १४६० त लागला. क्रिस्ती धर्माचा प्रसार करण्याच्या हेतूनें ही सर्व खटपट आपण चालविली आहे अशी हेन्रीनें पोपाची समजूत केली, आणि बोजाडोरच्यापुढें ज्या प्रदेशाचा आपण नवीन शोध लावूं, त्याजवर पोर्तुगालचा ताबा असावा, अशा आशयाचा त्यानें पोपाचा हुकूम मिळविला. ह्याप्रमाणें सन १४४१ त पोपाचा जो हुकूम सुटला, तो पुढील पोपांनीं वेळोवेळीं मंजूर केल्यामुळें, त्याजवरच प्रदेशवृद्धीच्या संबंधानें युरोपांतील राष्ट्रांची भिस्त असे.

मुसलमानांचा पाडाव करून क्रिस्ती धर्माचा प्रसार करणें हें ह्या उद्योगाचें एक अंग होतें. हातीं लागलेल्या नवीन प्रदेशांतील लोक आणितां येतील तितके हा राजपुत्र पोर्तुगाल देशास आणी, व त्यांस क्रिस्ती धर्माची दीक्षा देई. शिवाय त्यांच्या देशांतील व्यापारासंबंधीं माहिती तो त्यांजपासून काढून घेई. येणेंकरून गुलामांच्या व्यापाराचा म्हणजे मनुष्यांच्या क्रयविक्रयाचा आरंभ झाला. ह्या गुलामांच्या व्यापारांत पोर्तुगाल देशास फारच किफायत होत असे. शेतकीचीं व घरगुती कामें करण्यास पोर्तुगीझ लोकांनीं आपल्या पदरीं गुलामांचा मोठा संग्रह केला. फुकट काम करणारे लोक देशांत आल्यामुळें त्यांजवर शेतीचें वगैरे काम सोंपून, आपण परदेशीं

जाण्यास पोर्तुगीझ लोक मोकळे झाले. ह्याप्रमाणें लढाऊ लोकांचा भरणा देशांत कमी झाल्यामुळें राष्ट्राचें नुकसान झालें, व त्याचे वाईट परिणाम झाले, त्यांचें विवेचन पुढें येईल. सारांश, नवीन प्रदेशाचें स्वामित्व व तेथील सुवर्णादि संपत्ति युरोपियनांस प्राप्त झाली. पूर्वी गलबतांच्या सफरी दूर पावेतों करण्यास कोणी धजत नसे. ती भीति नाहींशी होऊन धनप्राप्तीच्या आशेनें यूरोपचे बरेच लोक पोर्तुगीझ छत्राखालीं समुद्रयात्रा करून अनेक संपन्न प्रदेशांवर झडप घालूं लागले. त्याचा परिणाम प्राच्य राष्ट्रांस अद्यापि भोगावा लागत आहे. हेन्रीच्या प्रयत्नानें उत्तम खलाशी तयार झाले, त्यांचा पोर्तुगीझ राष्ट्रास मोठा उपयोग झाला. अशीं कामें करून राजपुत्र हेन्री सन १४६० त मरण पावला. पश्चात् त्याचा पुतण्या पांचवा आल्फांझो व नंतर दुसरा जॉन ह्यांनीं हें शोधांचें काम तसेंच पुढें नेटानें चालविलें.

हेन्रीच्या उद्योगाबद्दल त्यास नॅव्हिगेटर म्हणजे 'नौकानयनवेत्ता' असें नांव इतिहासांत मिळालें आहे. त्याची महत्वाची कामगिरी ही कीं, पूर्वी हजारों वर्षे केप बोजाडोरच्या पुढें अटलांटिक महासागरांतून आफ्रिकेच्या किनाऱ्यानें समुद्रमार्गानें खालीं कोणी गेला नव्हता; व पुढें जाणें धोक्याचें व निष्फळ आहे, अटलांटिक महासागर दक्षिण बाजूनें तलावासारखा असून त्यांतून इतर महासागरांत उतरण्याचा जलमार्ग नाहीं, असें लोकास वाटत होतें तें चुकीचें होय; हिंमत करून पुढें आफ्रिकेच्या दक्षिण टोंकास वळसा घालून दुसऱ्या महासागरांत उतरणें शक्य आहे, असें हेन्रीनें सिद्ध केलें. त्यानें बेचाळीस वर्षे परिश्रम करून दक्षिणेस अठरा अंशापावेतों नवीन शोध लाविला आणि पुढील शोधांची दिशा दाखवून दिली.

पोर्तुगीझ लोकांस आज सुद्धां हिंदुस्थानच्या राज्याचा इतका अभिमान वाटतो ह्याचें कारण त्या वेळचें त्यांचें प्रत्येक कृत्य मोठ्या श्रमाचें, धाडसाचें, व खर्चाचें होतें. तें तडीस जाण्यास मोठाच कालावधि लागला. त्यांस अनेक अडचणी आल्या, त्यांचें विवेचन नौकाशास्त्राच्या इतिहासांत महत्वाचें

आहे. जर्सन डा कुन्हानें ' मुंबईच्या वर्णनांत ' राजपुत्र हेन्री यास नवीन शोध करण्याचीं जीं कारणें झालीं तीं येणेंप्रमाणें दिलीं आहेत. (पृ. १२०).

१ केप बोजाडोरच्या पुढील प्रदेश कसा आहे तें जाणणें;

२ तिकडील प्रदेशांत क्रिस्ती राष्ट्रें व उपयुक्त बंदरें आढळल्यास, त्यांचा व आपल्या देशाचा व्यापार वाढविणें;

३ आफ्रिकेंत मुसलमानांची शक्ति किती आहे हें शोधून काढणें;

४ तिकडे एकादा क्रिस्ती राजा मुसलमानांविरुद्ध आपणांस मदत करणारा असल्यास पाहणें; आणि ५, क्रिस्ती धर्माची वृद्धि करणें.

स. १४६३त म्हणजे राजपुत्र हेन्री मरण पावल्यावर तीन वर्षांनीं पोर्तुगीझ लोक ' सिएरा लिओन ' म्ह० ' सिंहाची रात्रीची आरोळी ' या प्रांताच्या किनाऱ्यापर्यंत गेले.+ स. १४७१ त भूमध्यवृत्तापर्यंत ते पोंचले. सन १४८४ त कांगो नदीपर्यंत त्यांचा प्रवेश झाला. नवीन प्रदेशांत गेल्यावर ते धर्मोत्सव करीत. ता. १९ जानेवारी १४८२ रोजीं ' ला मिना ' येथें ते उतरले. दुसरे दिवशीं सकाळीं एका उंच झाडाच्या फांदीवर त्यांनीं पोर्तुगालचें निशाण चढविलें; त्या झाडाखालीं एक मोठा होम केला, आणि सर्वांनीं मिळून स्तोत्रपाठ करून, तद्देशीय लोकांस क्रिस्ती धर्मांत येण्याची बुद्धि व्हावी व आपल्या धर्माची भरभराट असावी, अशी त्यांनीं प्रार्थना केली. सन १४८७त बार्थोलोमो डिआझ हा आफ्रिकेच्या दक्षिण टोकाचा तपास लावून परत आला. ता. ४ मे सन १४९३ रोजीं पोपनें एक लेखी हुकूम काढून स्पेन व पोर्तुगाल यांच्या उद्योगक्षेत्राची हद्द ठरवून दिली. असा हुकूम करण्यास पोपास अधिकार होता किंवा नाहीं हा प्रश्न वेगळा. त्या वेळीं क्रिस्ती राष्ट्रांतील तंटे तोडून त्यांचे स्नेह जुळवून देण्याचें काम पोपच करीत असे. पोर्तुगाल

+टीप.—कांहींच्या मतें हा शोध हेन्रीनेंच लाविला. फिरंगी भाषेंत ' सेर लिओव ' म्हणजे 'सिंहीण नांवाचा लांब पर्वत' असें रा. पिसुर्लेकर कळवितात.

देशाचें स्वातंत्र्य सन ११७९त पोपाच्याच हुकुमानें स्थापन झालें. नवीन प्रदेश शोधण्याच्या संबंधानें एकंदर तीन पोपांचे हुकूम आहेत. सन १४५४ तला पांचव्या निकोलसचा हुकूम असा होता कीं, वाटेल त्या विधर्मी लोकांस जिंकून क्रिस्ती धर्मांत आणावें. दुसरा, सन १४८१ तला चौथ्या सेक्स्टसचा हुकूम असा होता कीं, केप बोजाडोरच्या दक्षिणेस पोर्तुगालनें शोधलेल्या प्रदेशावर त्याचाच ताबा समजावा. तिसरा सन १४९३ तला सहाव्या अलेक्झांडरचा आणखी एक हुकूम आहे; त्यांत पोर्तुगाल व स्पेन ह्या दोन राज्यांच्या हद्दी ठरविण्यांत आल्या. सोळाव्या शतकाच्या अखेरीपर्यंत पोपाचे हे हुकूम तोडण्यास युरोपियन क्रिस्ती राष्ट्रें धजत नसत. पोर्तुगीझ सरकारच्या ताब्यांत हिंदुस्थानांत फारशी सत्ता नसतांही, ते लोक, सर्व हिंदुस्थान देश आपला आहे, अशी भाषा कागदोपत्रीं वापरीत :असत, ह्याचें कारण पोपांचे हे हुकुम होत.

राजपुत्र हेन्रीला पोर्तुगालचें राज्य मिळालें नाहीं. त्याच्या वडील भावाचा मुलगा पांचवा आल्फांझो हा स. १४३८–८१ पावेतों राज्यावर होता. त्यानें वरचेवर गलबतें पाठवून वर सांगितल्याप्रमाणें आफ्रिकेच्या किनाऱ्याचा बराच शोध लाविला. स. १४८१ त आल्फांझो मरण पावला व त्याचा मुलगा दुसरा जॉन हा गादीवर आला. तोही चाणाक्ष होता. त्याच्या कारकीर्दीत ह्या शोधांचें खरें फल पोर्तुगाल देशास प्राप्त झालें. जॉन राजा फक्त समुद्रावरच भिस्त ठेवून राहिला नाहीं. खुष्कीच्या मार्गानेंही त्यानें अनेक प्रयत्न केले. आफ्रिकेच्या पूर्व किनाऱ्यावर आफ्रिकन लोकांचें एक प्रबळ राज्य असून, तेथचा राजा प्रेस्टर जॉन नांवानें युरोपांत प्रसिद्ध होता. त्याच्या राज्यांत मसाले पिकत. ही गोष्ट पोर्तुगालच्या जॉन ह्यास कळल्यावर तो ह्या प्रेस्टर जॉनच्या तपासास लागला. त्यासाठीं भूमध्यसमुद्रांतून व पुढें पायरस्त्यानें जॉननें अनेक मंडळी तपासास पाठविली. त्यांतच स १४८७ त कोव्हिल्हो व पेव्हा हे दोन हुशार गृहस्थ त्यानें पूर्वेकडे रवाना केले. ते नेपल्स व अलेक्झांड्रियावरून कायरो येथें उतरले. तेथून मुसलमान लोकांकडून

पुढील प्रदेशाची माहिती मिळवीत ते एडन येथें आले. पुनः कायरो येथें उभयतांनीं भेटावयाचा करार करून कोव्हिल्हो एडनहून हिंदुस्तानाकडे निघाला आणि पेव्हा वायव्येस इथिओपिया ऊर्फ अबिसीनियाकडे गेला.

कोव्हिल्हो एका मुसलमानी गलबतांत बसून एडनहून मलबार किनाऱ्यावर काननूर व कालिकत येथें आला. कालिकत येथें सुंठ, मिरीं वगैरे जिन्नस विपुल आहेत असें त्यास दिसून आलें. पुढें गोवा व ऑर्मझ येथें जाऊन तेथून तो आफ्रिकेच्या किनाऱ्यावर सोफाला येथें उतरला. तेथें त्यास मादागास्कर बेटाची व किनाऱ्या किनाऱ्यानें खालीं दक्षिणेस जाऊन परत युरोपांत येण्याची माहिती मिळाली. ही माहिती घेऊन तो परत एडनवरून कायरो येथें आला. तेथें युरोपांतून जॉन राजाकडून आलेली आणखी कांहीं मंडळी त्यास भेटली, आणि पेव्हा मरण पावल्याचें वर्तमान कळलें. तेव्हां मिळालेली सर्व माहिती पोर्तुगाल देशास पाठवून तो ऑर्मझ येथें गेला, आणि तेथून एडनास येऊन इथिओपियांत उतरला. तेथें प्रेस्टर जॉन ऊर्फ अलेक्झांडर नामक राजाची व त्याची गांठ पडली. प्रेस्टर जॉननें पोर्तुगालच्या राजासंबंधानें अत्यंत स्नेहभाव व्यक्त केला. पुढें कोव्हिल्हो तेथेंच राहिला; पण त्यानें आपणास मिळालेली सर्व माहिती स्वदेशास पाठविली. अशी ह्या कोव्हिल्होच्या सफरीची हकीकत आहे.

**३. डिआझ व कोलंबस ह्यांच्या सफरी,** (स. १४८७ व ९२).–प्रेस्टर जॉनच्या देशाचा शोध लावण्यासाठीं जॉन राजानें दोन मंडळ्या पाठविल्या. एक भूमध्यसमुद्रांतून जमिनीच्या मार्गानें वर सांगितलेली, आणि दुसरी अटलांटिक महासागरांतून आफ्रिकेच्या दक्षिण किनाऱ्यानें. ह्या दुसऱ्या सफरीचें आधिपत्य बार्थोलोमो डिआझ याजकडे होतें. हा एक धाडशी खलाशी दर्यावर्दी कुटुंबांतच जन्मलेला होता. एक टन म्हणजे सुमारें तीन खंडी अशा पन्नास पन्नास टनांचीं दोन गलबतें घेऊन तो स. १४८६ त ऑगस्टचे अखेरीस लिस्बन सोडून निघाला. तो थेट लांबपर्यंत जाऊन आफ्रिकेच्या दक्षिणटोंकाशीं आला. तेथें हवा बरीच थंड वाटूं लागली, म्हणून

किनाऱ्यावर जाण्याच्या हेतूनें दक्षिणचा रोख सोडून त्यानें पश्चिमेकडे गलबतें हांकारिलीं, तरी किनारा सांपडेना, सबब तो परत उत्तरेस फिरला; तेव्हां त्यास किनारा लागला. ह्याचा अर्थ असा, कीं, न समजतां त्यानें आफ्रिकेच्या दक्षिण टोंकास वळसा घातला. पुढें तो तसाच उत्तरेस जाऊन आल्गोआच्या उपसागरांतील एका बेटावर आला. त्यास त्यानें सँटा क्रूझ हें नांव दिलें, तें अद्यापि चालत आहे. थोडासा पुढें गेल्यावर एक नदी लागली, तेथून खलाशांच्या आग्रहास्तव डिआझ यास परत फिरावें लागलें. परत येतांना त्यानें पुनः आफ्रिकेच्या दक्षिण टोंकास वळसा घातला. वळसा घालतांना टोंकाजवळ मोठें वादळ झालें म्हणून त्यास डिआझनें ' तुफानाचें भूशिर ' असें नांव दिलें. तेथून डिआझ स. १४८७ च्या डिसेंबरांत परत लिस्बनास आला. त्याची सर्व हकीकत ऐकून राजा जॉन ह्यास अत्यंत आनंद वाटला. कारण आफ्रिकेच्या दक्षिण टोंकाचा अंत लागून समुद्रमार्गानें हिंदुस्थानचा रस्ता मिळण्याची त्याची आशा या उद्योगानें दुणावली. त्या आनंदाच्या भरांत ' तुफानांचे भूशिर ' हें नांव बदलून, त्या राजानें 'केप ऑफ् गुड् होप' म्हणजे ' चांगल्या आशेचें भूशिर ' हें अन्वर्थक नांव आफ्रिकेच्या दक्षिण टोंकास दिलें.

याच वेळीं **कोलंबस** म्हणून दुसरा एक खलाशी काय उद्योग करीत होता, तें येथें सांगणें जरूर आहे. कोलंबस हा जिनोआचा राहणारा. जिनोआचें राज्य भरभराटींत असतांही तेथून कोलंबसास मदत मिळेना, तेव्हां पोर्तुगालच्या राजाची व लोकांची कीर्ति ऐकून तो त्या कामांत मदत मागण्याच्या हेतूनें लिस्बनास गेला. तेथें भूगोलशास्त्रासंबंधीं पुष्कळच नवीन माहिती त्यास मिळाली. तसेंच अटलांटिक महासागरांत पश्चिम बाजूनें वाहत आलेल्या मानवी कृतीच्या अनेक चिजा त्यास पाहण्यास मिळाल्या. तेव्हां थेट पश्चिम दिशेकडे गेलें असतां हिंदुस्थानचा पूर्व किनारा आपणांस लागेल असा त्याचा तर्क झाला. त्यानें त्या सफरीसाठीं पोर्तुगालच्या राजाकडे मदत मागितली. राजानें त्या कामांतील निष्णात पंडितांची एक सभा बसवून तिचा अभिप्राय मागितला. कोलंबसाचा खटाटोप वेडेपणाचा आहे, त्यांत कांहीं अर्थ नाहीं, असा दोन निर-

निराळ्या सभांनीं अभिप्राय दिल्यावर राजाचा निरुपाय झाला. पुढें कोलंबसास असलेली माहिती काढून घेऊन आपणच तो प्रयत्न करावा असा एक घाट राजानें रचला. पण त्याच्या माहितीचा दुसऱ्यास उपयोग काय ? ह्या दुष्ट उपक्रमानें हिरमोड होऊन कोलंबस स. १४८४ त गुप्तपणें लिस्बन सोडून परत जिनोआस गेला. लिस्बन येथें असतां त्यानें तेथच्या एका बाईशीं लग्न केलें. जिनोआ येथें त्याचा आदर झाला नाहीं, तेव्हां अनेक संकटें सोसून त्यानें स्पेनच्या राजाराणींकडे शिफारस लाविली. राणी इझाबेलानें त्यास मदत देऊन सफरीची व्यवस्था लावून दिली. तेव्हां कोलंबस स. १४९२ च्या ऑगस्टच्या तिसऱ्या तारखेस स्पेनच्या नैर्ऋत्य कोपऱ्यांतील पेलास बंदरांतून तीन गलबतें घेऊन निघाला. ता. १२ ऑक्टोबर रोजीं अमेरिकेजवळचें सेंट डोमिंगो ऊर्फ हेटी बेट त्यास लागलें. याप्रमाणें अमेरिकेचा शोध लावून परत आल्यावर, स्पेनच्या राजाला पोप सहावा अलेक्झांडर यानें नवीन सांपडलेल्या मुलखाची सनद दिली. 'पूर्वी स. १४५४ त पांचव्या निकोलस पोपानें आफ्रिकेच्या दक्षिणेकडील मुलखाच्या मालकीची सनद पोर्तुगालला दिलीच आहे. त्याचप्रमाणें हल्लीं शोध लाविलेल्या मुलखाची मालकी आपणांस मिळावी अशी स्पेनच्या राजाराणींची मागणी आहे. त्यावरून असें ठरविण्यांत येतें, कीं अझोर व केप व्हर्ड बेटांच्या पश्चिमेस ३०० मैलांवर एक समोर दक्षिणोत्तर मर्यादा कल्पून, त्या रेषेच्या पूर्वेस क्रिस्ती राष्ट्रांचा अंमल नाहीं असा जो प्रदेश असेल त्यावर यावच्चन्द्रदिवाकरौ पोर्तुगालचा ताबा समजावा, आणि त्या रेषेच्या पश्चिमेकडील प्रदेशावर स्पेनचा ताबा समजावा.' अशी ही नवी सनद होती. पण एक राष्ट्र पूर्वेकडे व एक पश्चिमेकडे वाढत गेल्यास, दोघांची दुसऱ्या बाजूस कोठें तरी भेट होऊन पुनः तिकडे दोघांचा तंटा लागेल ही गोष्ट पोपाच्या लक्षांत त्या वेळीं आली नाहीं. त्यावरून पुढें पुष्कळ तंटे उत्पन्न झाले.

ह्याप्रमाणें युरोपांतील क्रिस्ती राष्ट्रांनीं पृथ्वीवरील अज्ञात प्रदेशाची लूट आरंभिली. त्यांचा हा उपद्व्याप धनलोभानें उत्पन्न झाला, पण त्या लोभावर त्यांनीं धर्माचें पांघरूण घातलें. या अपहारबुद्धीचें समर्थन करण्यासाठीं बिचाऱ्या

क्रिस्ती धर्माची ओढाताण करण्यास प्रत्यक्ष तद्धर्मगुरूंनीं मार्गे पुढें पाहिलें नाहीं. पोपाच्या हुकुमांतील 'क्रिस्ती राष्ट्रांचा अंमल नसलेले नवीन प्रदेश' हे शब्द खोंचदार आहेत. वरील हुकमाप्रमाणें उभय राष्ट्रांत करार ठरून त्याजला पोपाची संमति पुढें स. १५०६ त मिळाली.

पूर्वसमुद्रांत पोर्तुगीझ लोकांचा एकवार प्रवेश झाल्यावर, इंग्रज खलाशी पोपाचा वरील हुकूम तोडून इकडे येण्यास फार दिवस कांकूं करीत होते, ह्याचें कारण ही पोपाची वांटणी होय. स्पेनचे व पोर्तुगालचे खलाशी इंग्रज खलाशांस चांचे व चोर असें म्हणत. डच लोकांनीं पूर्वसमुद्रांत प्रवेश करून स्पेनच्या वैराचा सूड घेतला. इंग्रजांनीं तसेंच करून पोपाच्या विरुद्ध प्रॉटेस्टंट पंथाचा पगडा स्थापन केला. इंग्रजांचे सोन्याचे पौंड पोर्तुगाल देशांत फार चालत असत, त्यास पोर्तुगीझ लोक आपल्या भाषेंत 'पायरेट' म्हणजे 'चांचे' असें म्हणत.

**४. वास्को ड गामाची पहिली सफर.**—डिआझ परत आल्यावर राजा जॉन लवकरच आजारी पडून स. १४९५ त मरण पावला, आणि त्याचा मुलगा इमॅन्युएल गादीवर आला. हाही शहाणा असून त्यानें पूर्वीच्या अनुभवाचा उपयोग करून हिंदुस्थानास जाण्याचा जलमार्ग शोधण्याचें काम नेटानें चालविलें. प्रसिद्ध ज्योतिषांकडून प्रश्न पाहवून ह्या उद्योगांत सिद्धि येईल असें त्यांचें अभिवचन त्यानें मिळविलें. ह्या कामासाठीं त्यानें तीन गलबतें मुद्दाम बांधविलीं, आणि त्यांची सर्व सिद्धता करून त्या सफरीवर वास्को ड गामा नामक एका हुशार दर्यावर्दी खलाशाची नेमणूक केली. त्या गलबतांचा आकार ५० पासून २०० टन पावेतोंचा होता. गामा बरोबर त्याचा भाऊ पोलोही होता. शिवाय डिआझच्या सफरींतील कांहीं खलाशी व त्याचा भाऊ डिओगो डिआझ हेही बरोबर होते. सर्व मिळून ह्या प्रवासांत सुमारें दोनशें लोक होते. त्यांची सर्व तयारी व सिद्धता राजानें स्वतः मेहनत घेऊन पुरी केली. शनिवार ता. ८ जुलै स. १४९७ रोजीं हीं गलबतें युरोपचा किनारा सोडून निघालीं. ऑक्टोबरनोव्हेंबरच्या सुमारास आफ्रिकेचें दक्षिण

टोंक त्यांनीं ओलांडिलें, तेथें त्यांस तुफानांचा इतका त्रास झाला, कीं लोक पुढें जाण्यास धजेनात व बंडावा करूं लागले. तेव्हां गामानें त्यांस दहशत घालून कित्येक पुढाऱ्यांस अटकेंत ठेविलें आणि बंदोबस्त केला. डिसेंबरच्या पंचवीस तारखेस क्रिस्तजयंतीच्या दिवशीं त्यांस किनाऱ्याची जमीन लागली, त्यास नाताळ म्ह० जन्म हें अन्वर्थक नांव त्यांनीं दिलें, तें अद्यापि चालत आहे. पुढें प्रवास सुरू करून सन १४९८ च्या मार्चांत ते मोझांबिक येथें आले. रस्त्यांत त्यांनीं मुसलमान लोकांची एक होडी पकडिली; त्यांत मुंबईकडचा एक मुसलमान दलाल त्यांस सांपडला. त्यास इकडील रस्त्यांची व व्यापाराची सर्व माहिती असल्यामुळें त्यास सोन्याचे ३ मेतिकाईस नाणीं देण्याचें कबूल करून गामानें आपल्या बरोबर हिंदुस्थानांत आणिलें. त्याचा गामास फार उपयोग झाला. इतिहासांत याचें नांव दवणे ( दमण, दमणचा ) असें दिलेलें आहे. अशा दलालांच्या स्वराष्ट्रद्रोहामुळें अनेक अडचणींच्या प्रसंगीं गामाचा निभाव लागला. आफ्रिकेच्या किनाऱ्यावरील आरब अधिकारी पोर्तुगीझ लोकांस पक्के ओळखून होते. हे लोक इकडे आल्यानें आपल्या हातचा व्यापार जाऊन आपलें सर्वस्वी नुकसान होईल हें त्यांस ठाऊक होतें. म्हणूनच गामाचा नाश करण्याचे त्यांनीं अनेक प्रयत्न केले; पण हिंदुस्थानांतील लोकांनीं गामास सावध केल्यामुळें त्याचा बचाव झाला.

ह्याप्रमाणे मोझांबिक, मोंबासा वगैरे ठिकाणांहून एप्रिल* १४९८ त गामा मलिंद ( ? ) येथें आला. मलिंदच्या राजानें त्याचा चांगला सत्कार केला. 'खंबायत येथें न जातां कालिकोट येथें जा,' असें त्यास ह्याच राजानें सांगितलें; आणि पोर्तुगीझ लोकांशीं इमानानें वागण्याविषयीं दवणे ह्यासही त्यानें उपदेश केला. मलिंद येथें तीन महिने राहून गामानें आपल्या जहाजांची दुरुस्ती केली; आणि पुढील समुद्राची माहिती असलेले कांहीं हुशार खलाशी बरोबर घेऊन तो ता. ६ ऑगस्ट रोजीं तेथून निघाला, आणि ता. २६–२७ ऑगस्ट रोजीं कालिकोट बंदराजवळ त्यानें आपलीं जहाजें नांगरिलीं.

* टीप—गामाच्या प्रवासांतील तारखांसंबंधानें पुष्कळ मतभेद आहे.

पोर्तुगीझ लोकांस हिंदुस्थानांत येण्याचा हा समुद्रमार्ग सांपडला, तेव्हां 'भुकेलेल्या लांडग्यांचे कळप उत्कृष्ट मेंढरांच्या कळपांवर जसे जाऊन पडतात,' तशी त्यांची स्थिति झाली. हजारों वर्षांच्या व्यापारावर धनसंपन्न झालेला प्रदेश त्यांच्या नजरेस पडला. त्या वेळीं कालिकोट, ओर्मझ, एडन व मलाक्का हीं व्यापाराचीं मोठीं बंदरें होतीं. ह्या बंदरांतून इकडचे जिन्नस आरब लोक आपल्या जहाजांतून नेऊन युरोपास पुरवीत. मोलक्कांतील मसाले व एबनी, टिमोरचें चंदन, बोर्निओचा कापूर, सुमात्रा व जावा येथील सुगंधी गोंद ( benzoin ), कोचीन चायनांतील कोरफडीचें लांकूड ( aloes wood ); चीन, जपान व सयाम येथील अत्तरें, डिंक, मसाले, रेशीम व खेळ; पेगूचीं रत्नें; कारोमांडल किनाऱ्यावरील तलम वस्त्रें, बंगाल्यांतील बहुमोल कापड, व भूतान येथील स्पिकेनार्डचा ( spikenard ? ) सुगंध, गोवळकोंड्याचे हिरे, निर्मूलचें पोलाद, सिलोनचे मसाले, पाच व मोत्यें; मलबारांतील मसाले व साग, खंबायतेंतील लाख, कलाबतू व जवाहिर, काश्मिरांतील शाली व नकशीचीं भांडीं; सिंधचा डिंक, ( bdellium ? ) तिबेटांतील कस्तुरी; खुरासानांतील वनस्पति ( galbanum ? ) आफगाणिस्तानांतील कात, इराणांतील औषधि, ( sagapenum ? ); झांजीबार, बर्बर, व शहर येथील अंबर, हस्तिदंत, पाच, सुगंधी द्रव्यें वगैरे नाना प्रकारच्या जिनसांची देवघेव कालिकोट बंदरांत चालत असे.

अलीकडच्या अनेक शोधांवरून हिंदुस्थानच्या प्राचीन सुधारणेची माहिती उपलब्ध होत असून, प्रजासत्ताक राज्यव्यवस्था, नौकायनकुशलता, परदेशांशीं व्यापार, इत्यादि अनेक महत्वाच्या कामांत हिंदुलोक प्राचीन काळापासून प्रवीण होते, ही गोष्ट ज्यास्त ज्यास्त निदर्शनास येत चालली आहे. येथचे लोक नौकानयनांत कुशल होते, त्यांजपाशीं मोठमोठीं गलबतें होतीं; त्या गलबतांतून ते दूरपर्यंत समुद्रांवर प्रवास करीत असत; वास्तविक दहाव्या शतकापर्यंत ह्या कामांत त्यांची बरोबरी करणारे दुसरे लोक नव्हते; पूर्वेकडे चीनजपानपावेतों व पश्चिमेकडे आफ्रिकेच्या सबंद पूर्वकिनाऱ्यावर हिंदु व्यापा-

त्यांचा संचार होता. जावा, बोर्निओ, सुमात्रा, इत्यादि बेटांत हिंदूंनीं मोठमोठ्या वसाहती स्थापिल्या होत्या; तसेंच एडन, सोकोत्रा, मोझांबीक इत्यादि अनेक ठिकाणीं त्यांचा प्रवेश होता. जावा वगैरे बेटांतील देवळें, जुन्या इमारती, तेथच्या लोकांचे धर्माचार व रीतरिवाज हे हिंदु लोकांसारखे असून पश्चिमेस आरबस्तानपासून, पूर्वेस चीनदेशापावेतों अर्ध्या अधिक आशियाखंडास सर्व प्रकारची सुधारणा हिंदुस्थानानें पुरविली होती, अशी माहिती अलीकडे उपलब्ध झाली आहे. [ बांबे गॅझेटियर, व्हा. १,-गुजराथचा इतिहास, जावा व कंबोडिया ]. गुजराथ, काठेवाड, सिंध, माळवा, पंजाब वगैरे प्रांतांतून पुष्कळ लोक जावा व इतर बेटांत जात आणि तेथें वसाहती करून राहत. हिंदुस्थानांतल्यासारखीं लेणीं जावा बेटांत सांपडलीं आहेत. दोनही लेण्यांतील मूर्तींचें व खोदीव काम अगदीं एकसारखें आहे. ऐतिहासिक माहितीवरून कळून येतें, कीं गेल्या दोन हजार वर्षांत गुजराथच्या किनाऱ्यावरील लोकांनीं दर्यावर्दीपणांत कौशल्य दाखवून हिंदुस्थानच्या वायव्येकडील लोकांस मॅलेद्वीपसमूहांत नेऊन तेथें त्यांच्या अनेक वसाहती बनविल्या. व्यापार, वसाहती व द्रव्यार्जन ह्या उद्देशांनीं हिंदुस्थानचे लोकही पूर्व काळीं समुद्रप्रवास करून दूरदेशीं जात असत. पाश्चात्यांच्या आगमनानें हा प्रकार बदलला.

गामा आला त्या वेळीं कालिकोट शहर मोठ्या भरभराटींत होतें. तेथच्या राजास झामोरिन म्ह० सामुद्री म्हणत. त्या ठिकाणचा व्यापार सुमारें सहाशें वर्षांपासून आरब मुसलमानांच्या ताब्यांत होता. मक्का व कायरो ह्या शहरांतील श्रीमान आरब व्यापाऱ्यांचीं मोठमोठीं गलबतें आरबी समुद्रांत एकसारखीं फिरत असत. हिंदुस्थानांतील जिन्नस इजिप्ट देशांतून युरोपास पुरविण्याचें संपूर्ण काम आरबांच्याच ताब्यांत असल्यामुळें ते व्यापारी सधन व वजनदार झाले होते. त्यांस ह्या पोर्तुगीझ लोकांचें इकडे येणें आवडलें नाहीं. पोर्तुगीझ लोकांस इकडे येऊं दिल्यानें काय अनर्थ उद्भवतील हें त्यांस चांगलें ठाऊक होतें; म्हणून त्यांचा येथून उच्छेद करण्यासाठीं त्यांनीं अतोनात प्रयत्न केले. पण वास्को ड गामाही मोठा वस्ताद असल्यामुळें, त्यानें मुसलमानांच्या सर्व युक्त्या हाणून

पाडिल्या. प्रथमच त्यानें अशी आफवा उठविली कीं पोर्तुगीझ लोकांचें एक मोठें आरमार सफरीस निघालें आहे आपलीं हीं गलबतें त्यांपैकींच असून त्यांची आपली चुकामूक झाल्यामुळें, बाकीच्या गलबतांचा शोध लावण्यासाठीं आपण येथें आलों आहों; बाकी हिंदुस्थानाकडे येण्याचा आपला मुळींच मनोदय नाहीं. गामाचे मनांत एकदम किनाऱ्यावर जाऊन कालिकोटच्या राजास भेटावें असें होतें. पण दवणे ह्यानें त्यास सावध करून सांगितलें कीं, राजाकडून ओलीस माणसें आणवून तीं आपल्या जहाजांवर कबजांत ठेविल्याशिवाय तुह्मीं बाहेर पडूं नये. ही गोष्ट गामास बरोबर पटली. जहाजांजवळ अनेक होड्या सामान विकण्याकरितां येत, त्या सामानाची किंमत लोक मागतील ती द्यावी, अशी ताकीद गामानें आपल्या लोकांस दिल्यामुळें, पोर्तुगीझ लोकांच्या औदार्याविषयीं शहरांत मोठा पुकारा झाला. तीन दिवसांनीं कालिकोटच्या राजानें मनुष्य पाठवून, 'तुह्मी काय उद्देशानें आलां आहां,' असा तपास केला. त्यावर दवणे यास राजाकडे पाठवून 'हरवलेल्या गलबतांचा शोध करण्यास आलों आहों; आतां मसाले वगैरे विकत घेऊन परत जाऊं,' असें गामानें राजास कळविलें. गामानें मलिंदच्या राजास अनेक मौल्यवान वस्तु नजर केल्या ही गोष्ट दवणे ह्यानें झामोरिन ह्यास कळविल्यावर, झामोरिनच्या तोंडास पाणी सुटून, त्यानें मिरीं वगैरे सामान वाटेल तितकें तेथें विकत घेण्याची परवानगी गामा ह्यास दिली.

झामोरिनचा हा हुकूम ऐकून आरब व्यापारी चपापून गेले. त्यांनीं ही गोष्ट पश्चिम किनाऱ्यावरील सर्व बंदरांच्या व्यापाऱ्यांस कळविली, आणि राजानें आपला हुकूम फिरवावा अशी त्याच्या कामगारांमार्फत खटपट चालविली. राजाच्या कामगारांस त्यांनीं असें कळविलें, कीं 'पोर्तुगीझ लोक सधन आहेत; ते केवळ व्यापाराकरितांच इतक्या दूर आलेले नाहींत; हा देश व येथची अंत:स्थिति निरखून पाहवी आणि मग परत जाऊन मोठमोठीं लढाऊ आरमारें आणून हा देश जिंकावा असा त्यांचा इरादा आहे.' ह्याप्रमाणें सांगून आरबांनीं नजरनजराणे देऊन कामगार लोक वश करून घेतले.

इकडे गामानेंही आपले हेर व दुभाष्ये पाठवून मुसलमानांच्या बेतांची इत्थंभूत माहिती काढून आणिली. परीझ नांवाचा एक स्पेनचा गृहस्थ मुसलमान होऊन कालिकोट येथें राहिला होता. त्यास दवणे ह्यानें गलबतांवर आणून गामास भेटविलें. हा परीझ शहरांत मुसलमानांशीं दोस्ती दाखवी; आणि आंतून त्यांच्या सर्व गुप्त बेतांची वर्दी गामास देई. एवंच दवणे व परीझ हे दोन राष्ट्रद्रोही इसम गामाच्या विशेष उपयोगी पडले. त्यांच्या शिकवणीनें गामाच्या वकिलांनीं राजाच्या मुलाकती घेतल्या; आणि दररोज कांहीं माल किनाऱ्यावर आणून विकावयाचा व कांहीं विकत घेऊन गलबतांवर न्यावयाचा क्रम चालविला. ह्या व्यापारांत घासाघीस करावयाची नाहीं, माल बरा वाईट पाहावयाचा नाहीं, वजनांची तक्रार करावयाची नाहीं, असा पोर्तुगीझ लोकांनीं ढोंगी उद्योग चालविला. हें पाहून मुसलमान व्यापाऱ्यांनीं राजास कळविलें, हे कोणी तरी दुष्ट हेतूनें आलेले गुप्त हेर आहेत. खरे व्यापारी असा आंतबट्ट्याचा व्यापार कधीं करणार नाहींत. ह्यांस ठार मारून ह्यांचीं गलबतें वगैरे जाळून टाकावीं.'

पुढें राजानें गलबतांवर आपले ओलीस पाठविले, त्यांस ठेवून घेऊन वास्को ड गामा राजाच्या भेटीस गेला. उत्तम प्रकारचा पोषाख करून तो राजाचे भेटीस गेला, आणि अनेक उत्तमोत्तम चिजा बरोबर नेऊन त्यानें राजास नजर केल्या. राजाची भेट घेऊन परत येत असतां अधिकारी लोकांनीं त्यास भलत्याच ठिकाणीं नेऊन अटकेत ठेविलें. कोणीकडून तरी गामास चिडवून त्यास भलतेंच कृत्य करावयास लावावयाचें असा कामगारांचा उद्देश होता. ही गोष्ट हेरांमार्फत अगोदरच गामास कळली असल्यामुळें तो अत्यंत शांतपणानें वर्तत होता. त्याजविरुद्ध कागाळ्या आल्यामुळें राजास तर राग आला होता; आणि त्यास मारून टाकावें असा राजानें हुकूमही सोडिला होता. तेव्हां गामाच्या भावानें गलबतावर असलेले ओलीस एकदम परत पाठवून दिलें. त्या लोकांनीं परत येऊन पोर्तुगीझ लोकांच्या चांगुलपणाबद्दल राजाची खात्री केली; आणि अशा शिताफीनें गामाची सुटका झाली. मध्यंतरीं त्याचा

सौदा संपलाच होता. तेव्हां 'आह्मांस इतका त्रास दिल्याबद्दल तुमचा सूड घेतल्याशिवाय राहणार नाहीं,' अशी धमकी परीझच्या मार्फत राजास व सर्व मुसलमान व्यापाऱ्यांस देऊन, गामा नोव्हेंबरच्या सुमारास परत निघाला. निघण्यापूर्वी राजानें त्याची क्षमा मागून त्यास कळविलें, कीं 'गुन्हेगार मंडळीस आह्मीं शिक्षा केलीच आहे, तेव्हां राग सोडून तुह्मीं पुनरपि आमच्या देशास येऊन व्यापार करावा.' परत जातेवेळीं झामोरीननें पोर्तुगालच्या राजास एक पत्र दिलें त्यांतील मतलब. 'आपल्या घराण्यांतील सरदार वास्को ड गामा हे आमच्या राज्यांत आल्यामुळें आम्हांस फार संतोष होत आहे. आमच्या राज्यांत दालचिनी, लवंग, सुंठ, मिरीं आणि जवाहीर यांची समृद्धि असून, त्यांच्या बदलीं आपल्याकडून सोनें, चांदी, पोवळीं, इत्यादि जिन्नस आम्हांस मिळावे, अशी आमची इच्छा आहे.'

कालिकोटहून निघून गामा काननूर येथें गेला. काननूरच्या राजाला कालिकोटची सर्व खबर लागली होती, व त्याजकडे दोनही पक्षांचे वशिले आले होते. त्यावरून पोर्तुगीझ लोकांशीं सख्य करण्याचाच त्यानें निश्चय करून, बदरांत येतांच गामा ह्यास त्यानें आपल्याकडे बोलावून घेतलें; त्याजबरोबर पोर्तुगालच्या राजाशीं दोस्तीचा व व्यापाराचा तह केला; आणि त्यास नजराणे वगैरे देऊन रजा दिली. गामानेंही राजाचा सत्कार चांगला केला. तेथें त्यास व्यापाराचे जिन्नस इतके मिळाले कीं, गलबतांत जागा नाहीं ह्मणून ते त्यास ठेवून द्यावे लागले. असें काम करून ता. २० नोव्हेंबर सन १४९८ रोजीं गामा परत युरोपास निघाला. रस्त्यांत वारा पडल्यामुळें, गोव्यानजीक अंजद्वीपाजवळ त्यास वरवा करावा लागला. पुढें तेथून निघून गामा तारीख ८ जानेवारी १४९९ रोजीं मलिंद येथें आला. तेथच्या राजानें त्याचा सत्कार उत्तम केला. त्यानें गामास जे दोन खलाशी दिले होते, ते त्यानें आपणासाठीं मागून घेऊन युरोपास नेले. ता. २० जानेवारी रोजीं गामा पुढें निघाला, तो ता. १८ सेप्टेंबर १४९९ रोजीं म्हणजे प्रथम निघाल्यापासून दोन वर्षें होऊन

गेल्यावर परत लिस्बन येथें येऊन पोंचला. रस्त्यांत त्याचा भाऊ पोलो गामा आजारी पडून मरण पावला. ह्या वेळीं युरोपांतून हिंदुस्थानास येण्यास ९ पासून १२ महिने लागत.

स्वदेशीं परत आल्यावर राजानें वास्को ड गामाचा अपूर्व सत्कार केला हें सांगणें नकोच. आज कित्येक शतकांचा व पिढ्यांचा प्रयत्न तडीस गेल्याबद्दल राजास मोठी धन्यता वाटली. तो समारंभानें सामोरा जाऊन गामास भेटला व त्याजला डॉम म्ह० ड्यूक ऊर्फ सरदार ही पदवी दिली. गामानें आणिलेले नजराणे पाहून राजा फारच संतुष्ट झाला. गामाच्या जहाजांतून आणलेला माल विकल्यावर असें आढळून आलें कीं, ह्या सर्व सफरीस जेवढा खर्च लागला होता, त्याच्या साठपट उत्पन्न हातीं आलें. त्या वेळीं युरोपांत मिरीं दर पौंडास १ शि. ५ पे., दालचिनी ३ शि. २ पे., सुंठ २ शि. १ पे, जायपत्री ५ शि. ३ पे, आणि जायफळ १ शि. ९ पे., ह्या भावानें मसाले विकले जात असत. गामा ह्यास राजानें मोठमोठीं बक्षिसें व नेमणुका करून दिल्या.

ह्याप्रमाणें हिंदुस्थानास जाण्याचा जलमार्ग पोर्तुगीझ लोकांस सांपडल्यामुळें एकंदर जगाच्या इतिहासांत मोठी क्रांति घडून आली. कालिकोटच्या मुसलमान व्यापाऱ्यांस जी भीति त्या वेळीं वाटली तीच पुढें खरी झाली, हें पुढील इतिहास सांगत आहेच. युरोपांत पोर्तुगालचें महत्व वाढलें; व्हेनिस, जिनोआ वगैरे जुन्या राष्ट्रांचा व्यापार बसला; आणि नौकानयनकलेंत प्रवीण असलेलीं नवीन राष्ट्रें उदयास आलीं. ‘ इथिओपिया,* आरेबिआ, पर्शिया व हिंद ह्या देशांतील जिंकलेल्या प्रदेशाचे, नौकानयनाचे व व्यापाराचे मालक,’ (‘ Lords of the Conquests, Navigation, and Commerce of Ethiopia, Arabia, Persia and China ’) ही भव्य पदवी पोर्तुगालच्या राजास मिळाली, आणि या प्रचंड उपक्रमानें जगाच्या भावी इतिहासाचा ओघ सर्वस्वी बदलून गेला.

* इथिओपिया म्ह० इजिप्तच्या दक्षिणेकडील नीग्रो लोकांचा देश.

५. **पेड्रो काब्रालची सफर.**—( स. १५०० ) वास्को ड गामा परत आल्यावर त्याच्या सांगणीनें एक गोष्ट सर्व पोर्तुगीझ दरबारच्या व लोकांच्या मनावर ठसली, ती ही कीं, हिंदुस्थानचा व्यापार ताब्यांत घ्याव-याचा असेल तर आरब मुसलमानांशीं निकराचें युद्ध चालविलें पाहिजे. ह्यास्तव मोठमोठीं तेरा गलबतें, तोफा, युद्धसामुग्री व उत्तमोत्तम खलाशी तयार करून, इ. स. १५०० ह्या सालीं पोर्तुगालच्या राजानें पेड्रो काब्राल ह्यास कालिकोटास पाठविलें. बरोबर कालिकोटच्या राजास देण्याकरितां अनेक चिजा होत्या व त्याजशीं व्यापाराचा तह करावा अशी काब्राल ह्यास ताकीद होती. बार्थोलोमो डिआझही ह्या स्वारीबरोबर होता. एकंदर ह्या स्वारींत १२०० मनुष्य होतें व पाद्री लोक बरेच होते. ही स्वारी ता. ९ मार्च सन १५०० रोजीं पोर्तुगाल देशाहून निघाली. केप व्हर्ड बेटास लाग-ल्यावर काब्रालचीं गलबतें वाऱ्याच्या जोरानें नैर्ऋत्येच्या बाजूस गेलीं. तिकडे त्यास दक्षिण अमेरिकेच्या पूर्व किनाऱ्यावरील ब्राझील देश लागला. ही खबर पोर्तुगाल देशास पाठवून काब्राल आग्नेयीस वळला. रस्त्यांत मोठें तुफान होऊन चार गलबतें बुडालीं आणि वरचे सर्व लोक मरण पावले. त्यांत बार्थोलोमो डिआझही मरण पावला. रस्त्यांत आणखी एक दोन गलबतें जाय-बंदी होऊन मंडळी दोन ऑगस्ट रोजीं मलिंद येथें आली. मलिंद येथून दोन गुजराथचे माहीतगार खलाशी बरोबर घेऊन काब्राल निघाला तो प्रथम घोघो बंदराजवळ आला; तेथून दक्षिणकिनाऱ्यानें अंजद्वीपास व पुढें ३० ऑगस्ट रोजीं कालिकोटच्या बंदरांत दाखल झाला. पोर्तुगालहून हिंदुस्थानास येण्यास काब्राल ह्यास सुमारें सहा महिने लागले.

कालिकोटच्या राजाकडून ओलीस मंडळी आणवून काब्रालनें किनाऱ्यावर जाऊन राजाची भेट घेतली. उभयतांमध्ये दोस्तीचा तह झाला; आणि पोर्तुगीझांनीं तेथें एक वखार घातली. इतकें सगळें झालें तरी मुसलमान व्यापारी त्यांस सामान मिळूं देईनात. दोन महिन्यांत दोन गलबतांची सुद्धां भरती झाली नाहीं. तेव्हां पोर्तुगीझ जहाजांची व मुसलमान जहाजांची

लहानशी लढाई होऊन पन्नास साठ पोर्तुगीझ मारले गेले. पुढें मुसलमानांची दहा जहाजें बुडवून काब्राल कालिकोट सोडून निघाला, तो डिसेंबरांत कोचीन येथे आला. रस्त्यांत आणखी दोन मुसलमानांचीं जहाजें त्यानें बुडविलीं. आरब व्यापारी व पोर्तुगीझ यांचा हा झगडा पुष्कळ दिवस चालू राहिला; आणि त्यांत निरनिराळ्या पक्षांचे लोक सामील झाले. व्हेनिशन लोकांचा आश्रय मुसलमानांस होता. कोचीनचा राजा त्रिमंपारा यानें काब्रालचा सत्कार करून त्यास व्यापाराचे जिन्नस विकत घेण्याची मोकळीक दिली. कोचीन शहर त्या वेळीं अगदीं भिकार होतें, आणि राजाचें वैभवही थोडेंच होतें. परंतु त्याच्या चांगुलपणाचें बक्षीस म्हणून ' कालिकोट जिंकून तुम्हांस देऊं ' असें काब्रालनें त्यास अभिवचन दिलें. कोचीन येथें वखार घालून त्यावर काब्रालनें बार्बोझा नांवाचा पोर्तुगीझ व्यापारी मुख्य नेमिला. अशा प्रकारें परक्या ठिकाणीं वखारी घालून तेथें आपले व्यापारी ठेवून देणें, आणि त्यांजकडून युरोपच्या मालाची विक्री करवून, सभोंवारच्या प्रदेशांत उत्पन्न झालेला कच्चा माल खरेदी करून युरोपास पाठविणें, हा प्रघात अजून चालू आहे, आणि यासच पाश्चात्य लोक हिंदुस्थानचा व्यापार असें म्हणतात. कोचीन सोडून काब्राल काननुरास गेला. तेथच्या राजानें त्याजबरोबर आपला एक वकील पोर्तुगाल देशास पाठविला. लगेच काब्राल ता. १६ जानेवारी रोजीं परत युरोपास निघाला. कोचीनच्या राजानें नायर लोक गलबतांवर ओलीस दिले होते, तेही तो बरोबर युरोपास घेऊन गेला. म्हणजे दोस्त असलेल्या कोचीनच्या राजाशीं त्यानें हा असा विश्वासघात केला. कोचीन येथें ठेविलेल्या युरोपियन व्यापाऱ्यांचीही त्यानें कांहीं योजना केली नाहीं. तथापि कोचीनच्या राजानें त्यांस फार चांगल्या रीतीनें वागवून पुढें सुरक्षित परत पाठविलें. काब्राल परत येतांना रस्त्यांत मलिंद येथें त्याचें एक गलबत खडकावर आपटून फुटलें. ह्याप्रमाणें संकटें सोशीत ता. २१ जुलई स. १५०१ रोजीं काब्राल लिस्बनास पोंचला. दालचिनी, आलें, सुंठ, मिरीं, लवंग, जायपत्री, जायफळ, कस्तुरी, civet, storax, benzoin, मातीचीं भांडीं,

cassia, mastic, जळाऊ सुगंध, पाच ( myrrh ) लाल व सफेत चंदन, कोरफड, कापूर, अंबर, caune, लाख, बाहुल्या, anib, tuzzia, अफू वगैरे जिन्नस त्यानें आपल्या बरोबर आणले.

काब्राल परत आल्यावर पोर्तुगालच्या राजानें चार गलबतें ड नोव्हों नामक कप्तानाच्या हाताखालीं हिंदुस्थानांत पाठविलीं. त्यांची व कालिकोटच्या गलबतांचा बरीच मोठी लढाई होऊन पोर्तुगीझ लोकांस जय मिळाला. ह्या लढाईंत कोचीनच्या राजानें युरोपियनांस मदत केली. कालिकोटच्या एका गलबतावर १५०० उत्तम मोत्यें, व कांहीं रत्नें व खलाशी लोकांस उपयोगी पडणारीं तीन चांदीचीं यंत्रें ड नोव्हास मिळालीं. हीं यंत्रें यूरोपच्या लोकांस माहीत नव्हतीं. हें सर्व सामान घेऊन व गलबतें मालानें भरून ड नोव्हा परत आला. परत येतांना ता. २१ मे. स. १५०२ रोजीं एक बेट त्यास लागलें त्या दिवशीं कान्स्टंटाईन धि ग्रेट बादशहाची आई हेलेना हिची पुण्यतिथि असल्यामुळें, त्या बेटास त्यानें सेंट हेलेना हें नांव दिलें त्या वेळीं तेथें वस्ती बिलकूल नव्हती; व ओळखीचीं जनावरेंही नव्हतीं. ड नोव्हानें बकरीं, गाढवें, डुकरें वगैरे जहाजांवर असलेलीं कित्येक जनावरें त्या बेटावर सोडून दिलीं. तेथें पाणी उत्तम असल्यामुळें जहाजांस ह्या बेटाचा उपयोग फार होऊं लागला.

**६. वास्को ड गामाची दुसरी सफर.**—* काब्रालच्या अनुभवावरून हिंदुस्थानच्या व्यापारासाठीं कालिकोटच्या राजाशीं खडाजंगीचें युद्ध करणें जरूर आहे, असें पोर्तुगालच्या राजास वाटून त्यानें एक मोठें लढाऊ आरमार तयार केलें आणि त्यावर वास्को ड गामा ह्यास मुख्य नेमिलें. ह्या आरमारांत वीस गलबतें व आठशें लढाऊ लोक होते. त्यांस प्रोत्साहन मिळ-

* **टीप**—सफरींतील तारखांसंबंधानें मतभेद आहे. Stanley's "the Three Voyages of Vasco de Gama" या ग्रंथाचें प्रमाण मानावें, असें मि. पिसुर्लेकर सुचवितात.

ण्याकरितां खासगी रीतीनें मसाले वगैरे आणून विकण्याची त्यांस परवानगी देण्यांत आली. हें आरमार मार्च १५०२ त निघालें. रस्त्यांत मोझांबीक, किल्वा वगैरे ठिकाणच्या राजांकडून करभार घेऊन आगष्टांत ते मलिंद येथें आले. किल्वा येथें कित्येक मुसलमानी बायका क्रिस्ती होण्याच्या हेतूनें पोर्तुगीझ जहाजांवर आल्या. त्यांपैकीं लग्न झालेल्या स्त्रियांस गामानें परत पाठविलें, व बाकीच्यांस ठेवून घेतलें. मलिंद सोडून ते प्रथम दाभोळ व तेथून अंजद्वीपावरून काननूरला येत असतां, होनावरच्या खाडींत त्यांची तिमय्या नामक एका दर्यावर्दी लुटारू नायकाची गांठ पडली. गामानें तिमय्याचा पाठलाग करून त्याचें गलबत जाळून टाकिलें. दुसऱ्या दिवशीं ते भटकळ येथें आले. भटकळ बंदरांत भरभराटीचा व्यापार चालत असून तें विजयनगरच्या राजाच्या ताब्यांत होतें. तेथच्या अधिकाऱ्याजवळून जबरदस्तीनें आपल्या फायद्याचा करार करून घेऊन, गामा काननुरास आला. रस्त्यांत मुसलमानांचें मौल्यवान मालाचें एक जहाज त्यानें जाळून टाकिलें. त्याजवरील लोक प्राण जाईपर्यंत पोर्तुगीझांशीं लढले. काननूरच्या राजाच्या व गामाच्या स्नेहपूर्वक भेटी झाल्या. परस्पर नजरनजराणे वगैरे झाले. नंतर व्यापाऱ्यांच्या संमतानें त्यांनीं मालाच्या खरेदीविक्रीचीं वजनें व दर कायम केले; आणि आणिलेला माल विकून नवीन घेण्याची व्यवस्था केल्यावर गामा कालिकोटच्या राजाची व आरबांची खोड मोडण्याच्या कामास लागला.

कालिकोटच्या बंदरांत गामा ह्यास एकही गलबत आढळलें नाहीं. पण गामा दाखल होतांच, राजानें आपण शरण आलों आहों असें दाखविण्याकरितां एक ब्राह्मण वकील त्याजकडे पाठविला. त्याजबरोबर राजानें असें सांगून पाठविलें कीं, ‘ तुम्हांस विशेष त्रास देणारे मुख्य मुख्य दहा आरब इसम तुमच्या ताब्यांत देतों, त्यांस आपण वाटेल ती शिक्षा करावी; शिवाय मालाच्या नुकसानीबद्दल वीस हजार रुपये भरून देतों. ’ हें म्हणणें गामानें कबूल केलें. मात्र आरब लोक अगदींच थोडे पाठविले हें त्यास आवडलें नाहीं. दुसरे दिवशीं त्या दहा आरबांनीं आपल्या मुक्ततेबद्दल वीस हजार

रुपये दंड देऊं केला. पण तें कांहींच न ऐकतां गामानें आपलें आरमार एकदम कालिकोटच्या नजीक आणिलें, आणि शहरावर तोफांचा भडिमार चालविला, त्यामुळें तेथें आकांत उडाला. इकडे दोन मोठीं जहाजें व बावीस लहान बोटी कारोमांडल किनाऱ्यावरून तांदूळ भरून बंदरात येत होत्या, त्या गामानें पकडिल्या; त्यांतील उपयोगी पडणारा सर्व माल व सामान त्यानें घेतलें; आणि वरील सर्व माणसांचे हात, कान व नाक कापून टाकिलीं. कालिकोटच्या राजाकडून वकील म्हणून आलेल्या ब्राह्मणाची त्यानें तशीच संभावना केली. नंतर त्या सर्वांचे पाय बांधून आणि दांतांनीं बंद तोडतां येऊं नयेत म्हणून सोट्यांनी सर्वांचे दांत पाडून ते घशांत भरविले. अशा आठशें भंडळींचा एका जहाजावर ढीग करून त्यावर पातेरा वगैरे पसरून, आग लाविली आणि शिडें पसरून जहाज वाऱ्याबरोबर किनाऱ्याकडे पाठविलें. तसेंच ब्राह्मण वकिलाला दुसऱ्या एका गलबतावर घातलें; त्याच्या ताब्यांत तोडलेले सर्व अवयव दिले, आणि राजास लिहून पाठविलें, कीं ' ह्यांची भाजी करून खा.' ह्या भयंकर कृत्यानें सर्व लोकांमध्यें पोर्तुगीझांबद्दल अत्यंत द्वेष उत्पन्न झाला आणि ते सूड घेण्याच्या विचारास लागले. अंबोयना बेटांत स. १६२३ त थोड्याशा इंग्रज लोकांची डच लोकांनीं पुढें कत्तल केली, किंवा सिराजुद्दौल्यानें कांहीं इंग्रजांस अंधारकोठडींत कोंडून मारिलें, ह्या कृत्यांचीं लांबलचक वर्णनें वाचतांना त्यांबरोबरच असल्या शेंकडों क्रूर कृत्यांची हकीकतही तुलनेस्तव माहीत पाहिजे.

पुढें वास्को ड गामा कोचीनकडे गेला असतां काननूरच्या राजाचा त्यास असा निरोप आला कीं, ' कांहीं आरब व्यापारी आठ जहाजें भरून चालले आहेत, त्यांनीं मालाची जकात किंवा किंमत दिलेली नाहीं. त्याचा बंदोबस्त करावा.' तेव्हां गामानें सोद्रे नांवाच्या इसमास लगेच काननुरास पाठविलें. त्यास तीं गलबतें तेथेंच नांगरलेलीं दिसलीं. त्यांचा मालक खाजा महंमद म्हणून होता, त्यास पकडून सोद्रेनें त्याजकडून राजाचा सर्व हिशेब चुकवून दिला; आणि त्यास हाल करून ठार मारिलें. ह्या कामगिरीबद्दल काननूरच्या राजानें

सोद्रे यास एक हजार सोन्याचे पर्दाव* ( Pardaos ) बक्षीस देऊन कोंबडी-करितां दररोज एक पर्दाव देण्याचें ठरविलें. बंदरांत पोर्तुगीझ जहाजें असलीं म्हणजे त्यांस दररोज एक पर्दाव देण्याची ही वहिवाट पुढें पुष्कळ दिवस चालू होती.

स्वतः गामा कोचीनला गेला असतां राजानें त्याला सन्मान करून मालानें जहाजें भरून दिलीं. पोर्तुगीझ लोक आल्यापासून त्या राजास व्यापाराची मोठीच किफायत होऊं लागली, त्यामुळें पुढील परिणामाकडे त्यानें लक्ष दिलें नाहीं. कोलम ऊर्फ क्विलोन म्हणून आणखी एक व्यापाराचें बंदर कालिकोटच्या दक्षिणेस होतें, तेथच्या राणीनें ह्या व्यापाराची किफायत ऐकून आपल्या बंदरांत माल भरण्यासाठीं दोन गलबतें पाठविण्याची गामास विनंति केली. त्याप्रमाणें कोचीनच्या राजाच्या संमतीनें त्यानें दोन गलबतें क्विलोन येथें पाठवून भरून आणिलीं. इतक्यांत त्यास कोचीनच्या राजाकडून बातमी आली, कीं कालिकोटाहून एक मोठें आरमार तयार होऊन लढण्यासाठीं आपणावर येत आहे. ह्या कामीं कालिकोटच्या राजानें अतोनात श्रम व पैसा खर्च केला होता, आणि एकवार पोर्तुगीझ व कोचीनचा राजा ह्यांची कायमची खोड मोडावी असा त्याचा विचार होता. पण झामोरीनच्या या बेतांची खडानखडा माहिती राजद्रोही माणसांच्या मार्फत गामास अगोदरच लागलेली असल्यामुळें, झामोरीनकडून निरोप घेऊन आलेल्या ब्राह्मणाचे हालहाल करून त्यानें ओंठ व कान कापिले, आणि त्याच्या कानांस कुत्र्यांचे कान शिवून त्यांस परत झामोरीनकडे पाठवून दिलें. नंतर दहा मोठालीं जहाजें सामानानें भरून गामा कोचीन सोडून परत जाण्यास निघाला. सोद्रे मात्र कांहीं गलबतें घेऊन मुसलमानांच्या टेहेळणीवर राहिला. इतक्यांत खोजा कासम नामक व्यापाऱ्याचीं जहाजें सोद्रे यास भेटलीं. उभयतांची लढाई होऊन मुसलमान लोक पराभव पावले आणि इलाज चालेना तेव्हां समुद्रांत

*पर्दाव ( सं. प्रताप ) हें गोव्यास पूर्वी एक नाणें असून त्याची किंमत सुमारें सवा रुपया होती.

उड्या टाकून पोहून किनाऱ्यावर गेले. एका जहाजांत सोद्रे यास भारी किंमतीचा माल सांपडला. तसेंच त्यांत कित्येक श्रीमान बायकामुलें होतीं तीं, व सोनेंरत्नांचा बनविलेला महंमदाचा एक पुतळा, सोद्रेस मिळाला. त्यांतील कांहीं सुंदर मुली पोर्तुगालच्या राणीला नजर ह्मणून घेऊन बाकीच्या सोद्रेनें खलाशांच्या स्वाधीन केल्या. तसेंच मुसलमानांचीं जीं जहाजें त्याच्या हातास लागलीं, त्यांना आग लावून तीं वाऱ्याबरोबर किनाऱ्याकडे पाठविलीं. ही कामगिरी बजावून सोद्रे काननुरास जाऊन गामास भेटला. गामानें काननूरच्या वखारीवर बार्बोझा ह्याची नेमणूक केली. तसेंच तेथील राजाच्या संमतीनें कांहीं तोफा व दारूसामान गुप्त रीतीनें पुरून ठेवून सभोंवार तटबंदी करविली. शिवाय तांबड्या समुद्रांतून पश्चिम किनाऱ्यावर आरबांचीं जहाजें आल्यास त्यांवर टेहेळणीकरितां सोद्रे यास ठेवून, वाटेल तें जहाज लुटावें व बुडवावें अशी त्यास ताकीद देऊन, गामा ता. २८ डिसेंबर स. १५०२ रोजीं परत निघाला, तो ता. १ सेप्टेंबर स. १५०३ रोजीं लिस्बनास पोंचला. ह्या खेपेस त्यानें अपार संपत्ति बरोबर आणिली. त्याजला व त्याच्या खलाशांना राजानें मोठमोठे सन्मान व बक्षिसें दिलीं.

गामा निघून गेल्यावर कोचीनच्या राजाशीं लढण्याकरितां झामोरीननें एक मोठी फौज तयार केली. तेव्हां कोचीन येथें असलेले पोर्तुगीझ लोक झामोरीनच्या स्वाधीन करून त्याजबरोबर तह करावा, अशी कोचीनचा राजा त्रिमंपारा यास त्याच्या मंत्रिमंडळानें सल्ला दिली. पण त्यानें तें न ऐकतां जें होईल तें सोसण्याचा निश्चय केला. कोचीनच्या वखारीचा मुख्य कोरिया यानें सोद्रे यास आपल्या मदतीस बोलाविलें. पण सोद्रे आला नाहीं. त्यानें खंबायतेकडे जाऊन आरबांचीं पांच जहाजें पकडून लुटलीं. पुढें एका वाऱ्याच्या ठिकाणीं तो वरवा करून राहिला. तेथें राहिल्यास धोका आहे असें सर्व लोक सांगत असतां तें न ऐकून तसाच आग्रहानें तो राहिला. इतक्यांत मोठें वादळ होऊन त्यांत त्याचा व त्याच्या गलबतांचा नाश झाला. इकडे कोचीनच्या राजानें झामोरीनशीं लढाई लढण्याची तयारी केली. त्याच्या

फौजेचा मुख्य युवराज नारायण हा होता. झामोरीनची फौज फारच मोठी होती. सन १५०३ त उभय फौजांची लढाई होऊन नारायण पडला व झामोरीन ह्यास जय मिळाला. पुढें झामोरीन ह्यानें कोचीन शहर काबीज केलें तेव्हां त्रिमंपारा पळून जाऊन लपून राहिला.

इकडे असा युद्धप्रसंग चालू असतां पोर्तुगालच्या राजानें एक मोठें आरमार तयार करून हिंदुस्थानात पाठविलें. त्यांत मोठालीं नऊ जहाजें असून त्यांचे तीन भाग होते. त्यांवर आल्फान्झो ड आल्बुकर्क, फान्सिस्को ड आल्बुकर्क व साल्डाना हे तीन मुख्य कामगार होते. त्यांपैकीं पहिला फार हुशार असून पोर्तुगीझ इतिहासांत त्याचें नांव चिरस्मरणीय झालें आहे. स. १५०३ च्या अखेरीस हीं जहाजें हिंदुस्थानास येऊन पोंचलीं; तेव्हां तेथें असलेल्या पोर्तुगीझ लोकांस धीर आला. लगेच झामोरीनची फौज कोचीन सोडून निघून गेली आणि त्रिमंपारा संकटांतून सुटला. अखेरपर्यंत पोर्तुगीझ लोकांशीं विश्वासानें वागल्याबद्दल त्याचा ह्या दोघां आल्बुकर्कनीं मोठा गौरव केला; आणि झामोरीनचा पराभव करून कोचीनच्या राजास त्याच्या गादीवर नेऊन स्थापिलें. पाचीको नांवाच्या एका हुशार खलाशास कांहीं जहाजांसह कोचीन येथें ठेवून, व कोलमच्या राणीशीं तह करून ते परत युरोपास गेले. मागें झामोरीननें कोचीनवर पुनः स्वारी केली, पण पाचीकोनें त्याचा चांगलाच पराभव केला. ह्या प्रसंगीं पाचीकोनें थोड्या लोकांनिशीं जे पराक्रम केले, त्यांमुळें पोर्तुगीझ लोकांचें युद्धकौशल्य व शौर्य इत्यादि गुणांबद्दल हिंदुस्थानांत त्यांची मोठी ख्याति झाली, त्यांच्या नांवाचा चहूंकडे वचक बसला, राजे व धनाढ्य लोक त्यांच्याशीं सलगी करण्यास उत्सुक झाले, आणि सुमारें शंभर वर्षेंपावेतों पोर्तुगीझ लोकांची हिंदुस्थानांत भरभराट झाली. स. १५०४ त पाचीको युरोपास परत आला, पण शाब्दिक गौरवापलीकडे राजानें त्यास देणगी वगैरे कांहीं दिलें नाहीं.

७. **फ्रान्सिस्को ड आल्मीडा**.—(स. १५०५–०९). पाचीको परत गेल्यावर हिंदुस्थानसंबंधीं पोर्तुगीझ राजाचे विचार बरेच बदलले.

अलीकडच्या सफरींनीं हिंदुस्थानच्या अंतःस्थितीची त्यास बरीच माहिती झाली, आणि आपणास पुढें काय करितां येईल ह्याचा त्यास अंदाज करितां आला. हिंदुस्थानचा व्यापार तर त्याच्या सहज आटोक्यांतला होता. पण प्रयत्न केला असतां तेथें आपलें राज्यही स्थापन करितां येईल अशी राजास आशा उत्पन्न झाली. निदान व्यापाराकरितां तरी मुसलमानांशीं निकराचें युद्ध केल्याशिवाय भागत नाहीं, त्यासाठीं एक मजबूद आरमार व फौज हिंदुस्थानांत कायमची ठेवून देणें प्राप्त आहे, आणि एकदां अशी तयारी ठेवून, करतां येईल तेवढा राज्योद्योग करावा, ह्या विचारानें इमान्युएल राजानें जंगी तयारी केली. एकंदर आरमारावर व सर्व व्यापारावर देखरेख ठेवण्याकरितां फ्रान्सिस्को ड आल्मीडा ह्या वजनदार मनुष्याची नेमणूक करून त्यास राजानें इकडे पाठविलें. स. १५०५ च्या सेप्टेंबरांत कानपूर येथें दाखल झाल्याबरोबर आल्मीडानें 'कोचीन, काननूर व किलोन ह्या ठिकाणचा पोर्तुगीझ 'व्हाइस्-रॉय' अशी भपकेदार पदवी धारण केली. हा अधिकार त्याजकडे तीन वर्षें चालणारा होता.

किल्ले, तट वगैरे बांधून आपल्या वसाहती मजबूद करून मुसलमानांचा उच्छेद करावयाचा, आणि आरबी समुद्रावर व एकंदर हिंदी महासागरावर दुसऱ्या कोणाचा शह राहूं द्यावयाचा नाहीं, हें मुख्य काम आल्मीडानें हातीं घेतलें. पोर्तुगालहून येतांना रस्त्यांत मजबूद जागा असावी म्हणून त्यानें आफ्रिकेच्या पूर्वकिनाऱ्यावर किल्वा येथें किल्ला बांधिला, आणि मोंबासा येथील अधिकाऱ्यास आपला मांडलिक बनविलें. तसेंच गलबतांच्या रस्त्याचे वाकबगार खलाशी पाहिजे तेव्हां मिळावे म्हणून त्यांसाठीं कायमची नेमणूक करून दिली. त्यामुळें पोर्तुगीझ जहाजांस परकीयांच्या मर्जीवर अवलंबून राहण्याची जरूर राहिली नाहीं. आल्मीडाबरोबर बावीस गलबतें व १५०० फौज आली होती. त्यानें होनावर व काननूर येथील राज्यें जिंकून कोचीन येथें मुख्य ठाणें वसविलें. आल्मीडाचा मुलगाही पराक्रमी होता. त्यानें क्किलोन येथें मोपला मुसलमानांचा पराभव केला, आणि सीलोन बेटास जाऊन तेथल्या अधिकाऱ्यास जिंकून त्याच्याशीं दालचिनी भरून विलायतेस पाठविण्याचा कायम

ठराव केला. सीलोनहून आल्मीडाच्या मुलानें एक हत्ती युरोपास पाठविला, तोच तिकडे गेलेला पहिला हत्ती होय. आल्मीडानें झामोरीनच्या जहाजांचा कालिकोट येथें पराभव केला. पोर्तुगीझ तोफांच्या माऱ्यापुढें हिंदी जहाजांचा इलाज चालत नसे. पाश्चात्यांचा प्रवेश इकडे सुलभ होण्याचें मुख्य कारण तोफा व बंदुका होत.

आरबांच्या हातांतला व्यापार नाहींसा झाल्यामुळें मुसलमानी देशांत सर्वत्र हाकाटी झाली. इजिप्टच्या सुलतानानें एक मोठें आरमार तयार करून त्यावर अमीर हुसेन नांवाच्या एका दर्यावर्दी पुरुषास मुख्य नेमिलें. हा अमीर हुसेन व त्याचे खलाशी समुद्रावरील युद्धकलेंत पोर्तुगीझांइतकेच प्रवीण होते. सन १५०८ त हें इजिप्टचें आरमार तांबड्या समुद्रांतून गुजराथच्या किनाऱ्यावर आलें. तेथें अहंमदाबादचा सुलतान व दीवचा नबाब मलीक अयाझ ह्यांनीं त्यास पुष्कळ मदत दिली. हें मोठें आरमार चौल बंदरांत आलें, तेव्हां त्यावर आल्मीडाच्या मुलानें निकराचा हल्ला केला. अमीर हुसेनास कालिकोटचें आरमार येऊन मिळणार होतें, परंतु त्यांची भेट होऊं देऊं नये असा आल्मीडाचा प्रयत्न होता. दोन दिवस सारखी धडपड चालली. आल्मीडाच्या जहाजांस मुसलमानांचा गराडा पडला, तोफेच्या गोळ्यानें त्याचा एक पाय जायबंदी झाला; तरी तो खुर्चीवर पडून हुकूम सोडीत होता. इतक्यांत आणखी एक गोळा येऊन त्यानें त्याचा प्राण घेतला. वीस वर्षांच्या मुलाचा हा प्रयत्न ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. मलीक अयाझ ह्यास जय मिळाला तरी त्यानें उदार अंतःकरणानें हातीं लागलेल्या पोर्तुगीझ लोकांस चांगलें वागविलें; आणि असा शूर पुत्र पोटीं निपजल्याबद्दल गौरवादाखल आल्मीडास त्यानें पत्र लिहिलें.

इतक्यांत आल्मीडाचीं तीन वर्षें भरून आल्बुकर्कची पुनः नेमणूक होऊन तो लिस्बनहून हिंदुस्थानांत आला. पुत्राच्या मरणाचा सूड उगविल्याशिवाय आल्मीडा काम सोडीना. आल्बुकर्कही त्याच्या आड आला नाहीं. आल्मीडा वेगानें मुसलमानांवर चालून आला. सन १५०९ त दीवनजीक उभय पक्षांची निकराची लढाई झाली, तींत तीन हजार मुसलमान व बावीस पोर्तुगीझ पडले.

अहंमदाबादचा सुलतान महंमद बेगडा यानें मलीक अयाझचा पराभव झालेला पाहून त्याचा पक्ष सोडून पोर्तुगीझ लोकांशीं तह केला. अशा प्रकारें काम करून आल्मीडा कोचीन येथें परत आला व सन १५०९ च्या नवंबर महिन्यांत परत जात असतां रस्त्यांत आफ्रिकेच्या किनाऱ्यावर मारामारी होऊन तींत तो मारला गेला. फ्रान्सिस्को ड आलमीडा हा हिंदुस्थानचा पहिला पोर्तुगीझ व्हाइस-रॉय होय. हिंदुस्थानांत पोर्तुगीझ लोकांचें राज्य स्थापन करणें शक्य नाहीं, फक्त आरमार ठेवून वखारींचें संरक्षण करावें म्हणजे झालें, असें आलमीडाचें मत होतें. ह्या बाबतींत तो व त्याचा अनुगामी आल्बुकर्क ह्या दोघांमध्यें मोठा विरोध होता. आल्बुकर्क हा दुसरा पोर्तुगीझ व्हाइस-रॉय होय. त्यानेंच पोर्तुगीझांचें कायमचें वास्तव्य हिंदुस्थानांत करून दिलें असल्या-मुळें त्याचें चरित्र विस्तारानें देणें जरूर आहे.

**८. आल्फान्झो ड आल्बुकर्क. पहिली कामगिरी** (१५०६-९) — आल्बुकर्कचा जन्म इ. स. १४५३ त† झाला. तो उच्च कुलांतला होता. पांचव्या आल्फान्झो राजानें त्याला आपल्या मुलांबरोबर विद्या देऊन वाढविलें. त्याला गणितशास्त्राचा विशेष नाद असे. तत्कालीन पद्धतीप्रमाणें युद्ध व साहस करून लौकिक मिळविण्याची त्यास हौस होती. स. १४७१त मोराक्को जिंकण्याकरितां गेलेल्या फौजेबरोबर तो होता, तेथें दहा वर्षें त्यास राहवें लागल्यामुळें बहु-मोल अनुभव मिळाला इ. स. १४८१ त स्वदेशीं परत आल्यावर त्यास घोड-दळाची मुख्य जागा मिळाली. दुसऱ्या जॉन राजाची त्याजवर मेहेरबानी होती, परंतु स. १५९५ त जॉन मरण पावल्यावर त्याचा मुलगा इमान्युएलची आल्बुकर्कवर इतराजी होऊन पुनः त्याची मोरोक्कोच्या कामगिरीवर नेमणूक झाली; तेथें असतांना मुसलमानांविषयीं त्याच्या मनांत अत्यंत वैर उत्पन्न झालें. तेथून परत आल्यावर राजानें त्यास इ. स. १५०३ तील सफरीबरोबर हिंदु-स्थानात पाठविलें. ह्या वेळीं त्याच्या हातून महत्वाचें कृत्य कांहीं झालें नाहीं,

† टीप—यासंबंधानें १४४४, १४५२, १४६१ व १४६२ असे सन निरनिराळ्या ग्रंथकारांनीं दिले आहेत.

मात्र पुढें उपयोगी पडणारा परिस्थितीचा अनुभव मिळवून तो स. १५०४ त परत लिस्बन येथें आला. तांबडा समुद्र व इराणी अखात ह्यांतून चालणारा मुसलमानांचा संचार कायमचा बंद केला पाहिजे, अशी त्यानें राजास सल्ला दिली, व तदनुसार सोकोट्राचें बेट जिंकण्याकरितां स. १५०६ त राजानें त्याची रवानगी केली. कान्स्टांटिनोपलच्या सुलतानानें पूर्वेकडील मुसलमानांस मदत करूं नये म्हणून इमान्युएल राजानें एक आरमार भूमध्यसमुद्रांतून तुर्कस्तानावर पाठविलें. तुर्कस्तान व इजिप्त ह्यांचें वैमनस्य होतें, ही गोष्ट पोर्तुगीझांस ठाऊक नसल्यामुळें, ते एक होऊन आपला नाश करतील अशी भीति पोर्तुगीझ राजांस वाटत होती. सोकोट्रा जिंकल्यावर आल्बुकर्कनें मलबारकिनाऱ्यावर जाऊन आल्मीडाची मुदत संपतांच प्रतिनिधीचें काम पाहवें असा त्यास राजाचा हुकूम होता.

मलबारकिनाऱ्याप्रमाणेंच आफ्रिकेच्या पूर्वकिनाऱ्यावर अनेक लहान राजे होते. मलिंदचा राजा पोर्तुगीझांस मिळाला होता, ह्मणून मोंबासा, अंगोजा वगैरे ठिकाणचे राजे मलिंदच्या राजास त्रास देत. ह्यासाठीं आल्बुकर्कनें प्रथम त्या सर्वांचा समाचार घेऊन त्यांजकडून खंडणी घेतली. नंतर तो सोकोट्रावर आला. तेथें कांहीं क्रिस्ती लोकांची वस्ती असून मुसलमानांचा एक मजबूद किल्ला होता, तो आल्बुकर्कनें तेव्हांच जिंकून घेतला, आणि त्यावर आपले अंमलदार नेमून नवीन व्यवस्था केली; तसेंच मुसलमानांच्या जमिनी व उत्पन्नें खालसा करून तीं त्यानें तेथच्या क्रिस्ती लोकांस दिलीं. सोकोट्राहून निघून आल्बुकर्क मस्कत येथें गेला. तेथच्या अधिकाऱ्यांस जिंकल्यावर इराणी आखातांतलें केवळ नाकें व व्यापाराचें उत्तम ठिकाण जें ओर्मझ तें जिंकण्यास तो आला. खोजा अत्तर नांवाचा ओर्मझच्या राजाचा दिवाण होता, त्याच्या मार्फत आल्बुकर्कनें ओर्मझ येथें किल्ला बांधण्याचा तह केला. पण हाताखालचे लोक त्याजवर उठल्यामुळें ओर्मझचें काम अर्धवट टाकून त्यास मलबाराकडे यावें लागलें. अशा त्याच्या कृत्यांवरून आलबुकर्कचें धोरण व्यक्त होण्यासारखें आहे. आफ्रिकेच्या दक्षिण टोंकापासून मलाकापर्यंतचा सर्व किनारा, बेटें व नाक्या-

चीं बंदरें पोर्तुगीझांच्या ताब्यांत राहवीं, ठिकठिकाणीं किल्ले बांधून तेथें पोर्तुगीझ फौज ठेवावी, ह्मणजे मुसलमानांचा व्यापार सर्वस्वी बंद पडून पोर्तुगीझांचा उद्योग निर्वेध चालेल, असें त्याचें मत होतें. उलट पक्षीं पुष्कळ किल्ले वगैरे बांधून आपल्या सत्तेचा पसारा करून ठेवणें अनुचित होय, अशी आल्मीडाची त्यास ताकीद होती. कोचीन येथें असतांच आल्बुकर्क व आल्मीडा ह्या दोघांचा बराच चकमक उडून आल्बुकर्क यास कांहीं दिवस कैदेंत कंठावे लागले. पुढें पोर्तुगालहून आणखी एक आरमार हिंदुस्थानांत आलें, तेव्हां आल्मीडा आपला कारभार सोडून स्वदेशास परत गेला. (नोव्हेंबर स. १५०९). तेव्हांपासून आल्बुकर्क हिंदुस्थानांतील पोर्तुगीझ राज्याचा मुख्य झाला.

९. **गोव्याचा पाडाव,–परिस्थिति** ( स. १५१०–१२ ).–आल्मीडाशीं चाललेल्या तंट्यांत आल्बुकर्कचे जे दिवस गेले, त्यांचा त्यास फार उपयोग झाला. त्या योगानें त्यास परिस्थितीचें सूक्ष्म निरीक्षण करितां आलें. मलबारांत व दक्षिण हिंदुस्थानांत हिंदु राज्यें होतीं. तसेंच ब्राह्मणी राज्याच्या मुसलमानी शाखाही प्रबल होत्या. ह्या हिंदूंचें व मुसलमानांचें वांकडें असून, हिंदु राज्यें नाहींशीं करून एकजात मुसलमानी अंमल स्थापण्याचा त्या राजांचा विचार चाललेला होता. स. १५६५ त तालिकोट येथें लढाई होऊन विजयनगरचें राज्य मोडलें, आणि मुसलमानांचा हेतु तडीस गेला. आफ्रिकेचा पूर्वकिनारा, मलबार-किनारा व आरबी समुद्र यांजवर आरब मुसलमानांचा संचार असून, त्यांजबरोबर पोर्तुगीझांची स्पर्धा चालू होती. हे आरब लोक किनाऱ्यावरील हिंदु रयतेस व राजांस अतिशय त्रास देत; त्यांस बाटवून मुसलमान करीत. ह्यास्तव परभारें एखादा शत्रु येऊन मुसलमानांचें पारिपत्य करील तर ती गोष्ट कोचीन, क्विलोन वगैरे ठिकाणच्या हिंदु राजांस इष्ट होती. पोर्तुगीझ लोकांचा खरा कावा झामोरीनला मात्र कळला होता, आणि तोच त्यांच्याशीं एकसारखा झगडत होता. पण इतर हिंदूंस पोर्तुगीझांपेक्षां आरबांचेंच शत्रुत्व ज्यास्त वाटत होतें. शिवाय व्यापाराच्या कामींही आरबांकडून हिंदूंस ह्मणण्यासारखी प्राप्ति होत नसे. पोर्तुगीझ व्यापारी एकदम घाऊक माल वाटेल ती किंमत देऊन थेट

युरोपांत घेऊन जाऊं लागल्यामुळें, मलबारच्या व्यापाऱ्यांस किफायत होऊं लागली, सबब हिंदु राजे व लोक पोर्तुगीझांचे हितचिंतक बनले. विजयनगरचा नरसिंगराय ह्या वेळीं प्रबळ होता; पण मुसलमानांच्या द्वेषास्तव त्यानें पोर्तुगीझांच्या विरुद्ध हालचाल केली नाहीं. शिवाय मुसलमानांचा अंमल स्पेन देशांत असून आफ्रिकेच्या उत्तर व पूर्वकिनाऱ्यावर आजपावेतों मुसलमानांशींच झगडे करण्याचा पोर्तुगीझांस प्रसंग आल्यामुळें, त्यांना मुसलमानांचा जसा द्वेष वाटे, तसा हिंदूंचा वाटत नसे; उलट हिंदूंबद्दल त्यांच्या मनांत सहानुभूतिच वागत होती. मलबारकिनाऱ्यावर क्रिस्त्यांची वस्ती फार पूर्वींपासून असून ते हिंदूंच्या अंमलाखालीं सुखी होते. ही स्थिति अवलोकन करून आल्बुकर्कनें, (१) हिंदु राजांशीं कायमचें सख्य करावयाचें, (२) मुसलमानांचा पाडाव करावयाचा, आणि (३) येणेंकरून पोर्तुगीझांचा व्यापार व अंमल दृढ करावयाचा हे तीन मुख्य उद्देश ठरविले. ओर्मझहून उत्तमोत्तम आरबी व इराणी घोडे मलबार किनाऱ्यावर येत, ते घोडे आपण आणून विजयनगरच्या राजास पुरवावे आणि त्या राजानें मुसलमानांशीं लढण्यास आपणांस मदत करावी, अशा प्रकारचा तह विजयनगरास आपला वकील पाठवून आल्बुकर्कनें सिद्धीस नेला. हिंदूंशीं सख्य व मुसलमानांचा पाडाव, हा त्याच्या कारभाराचा मुख्य हेतु होता. ह्याच पद्धतीचा अवलंब पुढें इंग्रजांनीं केला हें ध्यानांत ठेवण्याजोगें आहे.

कालिकोटचा राजा हिंदु असून त्याजबरोबर सख्य असावें अशी आल्बुकर्कची इच्छा होती. पण हाताखालील अधिकाऱ्यांनीं स. १५१० त कालिकोटच्या राजवाड्यावर एकाएकीं हल्ला केला, त्यांत आल्बुकर्कचे शंभर पोर्तुगीझ लोक व बारा मोठे अधिकारी मारले जाऊन राजास जय मिळाला. आल्बुकर्कलाही कांहीं जखमा लागल्या पण त्यांतून तो बरा झाला. पुढें सोकोट्रावर स्वारी करण्याकरितां तयारी करून निघाला असतां, गोव्याजवळ अंजद्वीप येथें तिमय्या नामक एका कावेबाज हिंदु गृहस्थानें गोवें जिंकण्याची आल्बुकर्कला सल्ला दिली, तो प्रकार असा.

तिमय्याचें नांव वर वास्को ड गामाच्या हकीकतींत आलें आहे. हा दर्यावर्दी पुरुष मोठा खटपटी होता. वास्को ड गामानें त्याचीं गलबतें जाळलीं होतीं. तथापि ती गोष्ट विसरून त्यानें आल्मीडाचा स्नेह संपादिला, आणि पोर्तुगीझ लोकांस मदत करून स्वतःचें वैभव वाढविलें. तिमय्यानें आल्बुकर्क यास गोवें हस्तगत करण्याची युक्ति सांगितली. गोवें हें पश्चिम किनाऱ्यावर व्यापाराचें मोठें ठिकाण असून तेथें दोन खाड्यांच्या मध्यें गलबतें राहण्यास सोयीचें बंदर आहे. दूरदूरचीं गलबतें येथें नेहमीं येत असतात; अशा प्रकारची उत्तम जागा आपल्या ताब्यांत असल्याशिवाय राज्य राखतां येणार नाहीं. कोचीन, कालिकोट व क्विलान येथें पोर्तुगीझांच्या तटबंदी वखारी होत्या खऱ्या, पण तिकडे अनेक स्वतंत्र राज्यें असल्यामुळें, पोर्तुगीझांस तेथील राजांच्या मर्जीवर अवलंबून राहणें भाग पडे. आफ्रिकेकडून येण्यास कोचीनपेक्षां गोवें जवळ व मध्यावर होतें. शिवाय तें विजापूरच्या सुलतानाच्या ताब्यांत असल्यानें, तें काबीज करण्यास हिंदूंशीं वैर संपादावें लागत नव्हतें. तेव्हां हिंदूंशीं सख्य ठेवून मुसलमानांचा उच्छेद करावयाचा, या धोरणास अनुसरून आल्बुकर्कनें तिमय्याचें म्हणणें मान्य करून, सोकोट्राचा नाद सोडून प्रथम गोवें काबीज करण्याचा निश्चय केला.

प्राचीन काळीं गोवें हिंदु राजांच्या ताब्यांत होतें. चौदाव्या शतकाच्या आरंभीं तें होनावरच्या मुसलमान नबाबानें जिंकिलें. पुढें स. १३६७ त तें विजयनगरच्या राजानें जिंकून आपल्या ताब्यांत घेतलें. सन १४४०त तेथच्या लोकांनीं स्वतंत्र होऊन जवळच नवें गोवें म्हणून दुसरें शहर स्थापिलें. या ठिकाणीं ओर्मझहून बहुमोल घोडे हिंदुस्थानांत विक्रीस येत. स. १४७० त पुढें अनेक वेळां बहामनी सुलतानानें गोवें शहर जिंकून घेतल्यावर हिंदु राजांनीं तें परत काबीज करण्याचा प्रयत्न केला, तो सिद्धीस गेला नाहीं. स. १४८९ त यूसुफ आदिलशहा विजापुरास स्वतंत्र झाला, त्याच्या ताब्यांत तें गेलें. तेथें मोठमोठे वाडे त्यानें बांधिले. तेथेंच राजधानी करावी असेंही शहाच्या मनांत होतें. यूसुफ आदिलशहा हिंदूंवर भारी जुलूम करी. आल्बु-

कर्क गोव्यास आला, तेव्हां मलीक यूसुफ गुर्गी नांवाचा आदिलशाही अधिकारी गोव्यास होता. त्यानें हिंदूंवर मोठा कहर केला. त्याचमुळें तिमय्यानें आल्बुकर्ककडे जाऊन मुसलमानांच्या जाचांतून हिंदूंस सोडविण्याची शक्कल काढिली. आदिलशहा दुसरीकडे गुंतला असून सर्व हिंदु प्रजा मुसलमानांस त्रासून पोर्तुगीझांस सामील होण्यास तयार आहे असें पाहून, बंदराच्या नाक्याशीं पणजीचा किल्ला होता, तो आल्बुकर्कनें ता. १ मार्च स. १५९० रोजीं काबीज केला. नंतर दोन दिवसांनीं शहरही त्याच्या हस्तगत झालें. मुसलमान अधिकारी पळून गेले. लोकांस जाचांतून आपली सुटका झालीशी वाटून परमानंद झाला आणि त्यांनीं आल्बुकर्कवर सुवर्णपुष्पांची वृष्टि केली. आल्बुकर्कनें लगेच शहराच्या तटबंदीचा बंदोबस्त चालविला.

गोव्याच्या पाडावाची बातमी हां हां म्हणतां चहूंकडे पसरली. मुसलमान व हिंदु राजांनीं आल्बुकर्ककडे आपले वकील पाठविले. विजयनगरच्या राजानें गोवें आपणांस परत मिळावें असें मागणें केलें. इराणचा शहा व ओर्मझचा राजा ह्यांनीं पोर्तुगीझांविरुद्ध अंतस्थ कारस्थानें चालविलीं. पण आल्बुकर्कनें मोठ्या धूर्ततेनें वागून सर्वांशीं सौम्योपचार योजिले. गोवें पोर्तुगीझांनीं घेतलें ही बातमी ऐकून यूसुफ आदिलशहा ६० हजार लोक घेऊन गोव्यावर आला. 'तुम्हांस दुसरें पाहिजे तें बंदर देतों, निदान तिमय्यास आमच्या हवालीं कराल तर गोवें सुद्धां देतों,' असें आदिलशहानें आल्बुकर्ककडे बोलणें लाविलें. पण तें त्यानें मान्य केलें नाहीं. तेव्हां आदिलशहानें एकदम शहरांत प्रवेश केला. त्या वेळीं आपणास लढण्याचें सामर्थ्य नाहीं असें पाहून आल्बुकर्क आपले सर्व लोक घेऊन जहाजांवर पळून गेला; मात्र जातांना त्यानें दारूखाना उडवून दिला व हातीं सांपडलेल्या दीडशें मुसलमानांची कत्तल केली. खाडींतून बाहेर जाण्याजोगी हवा नसल्यामुळें गोव्याच्या बंदरांतच त्यास तीन महिने मुक्काम करावा लागला. येथें रोज उभय पक्षांची चकमक थोडथोडी चालू होती. ह्या प्रसंगीं हाताखालचे लोकही आल्बुकर्कवर उठले होते; पण तो मोठ्या धैर्यानें वागला. पुढें युरोपांतून मदत

आल्यावर होनावरास जाऊन तो तिमय्यास भेटला. इकडे आदिलशहा गोवें सोडून गेला असल्यामुळें तेथचा बंदोबस्त कच्चा होता; तेव्हां पुनः गोव्यावर हल्ला करण्याविषयीं तिमय्यानें आल्बुकर्क यास भर दिली; आणि आपण स्वतः गरसप्पाच्या राजासह आल्बुकर्कच्या मदतीस आला. नोव्हेंबर महिन्यांत त्यांनीं पुनः गोव्यावर स्वारी केली. निकराचें युद्ध होऊन दोन हजार मुसलमान पडले; आणि गोवा शहर पुनः आल्बुकर्कच्या हस्तगत झालें. त्या वेळीं तेथचे जे मुसलमान रहिवाशी त्याच्या हातीं आले, त्या सर्वांची निरपराधी बायकामुलांसुद्धां त्यानें कत्तल उडवून दिली. तसेंच तीन दिवसपर्यंत शहरांत लूट करण्याची त्यानें आपल्या अनुयायांस परवानगी दिली. आल्बुकर्कनें लगेच गोव्याची सर्व तटबंदी मजबूद केली. त्याच संधीस यूसुफ आदिलशहा मरण पावला; आणि त्याचा मुलगा इस्माईल अल्पवयी असल्यामुळें, विजापूरच्या दरबाराकडून गोवें परत घेण्याचा कांहीं एक प्रयत्न झाला नाहीं. पाश्चात्यांच्या प्रभावापुढें हिंदी लोक कसे हरत गेले, त्याचें उदाहरण गोव्याचा पाडाव होय. सन १५३० पासून गोवा शहर पोर्तुगीझांची इकडील राजधानी झालें.

गोवा पोर्तुगीझ लोकांच्या हस्तगत झाल्यानें त्यांची सत्ता पश्चिम किनाऱ्यावर कायमची स्थापन झाली. विजापूर, अहंमदाबाद, विजयनगर वगैरे ठिकाणच्या राज्यकर्त्यांस पोर्तुगीझ लोकांचा वचक बसला; आणि हिंदुस्थानांत त्यांस एक शत्रु ज्यास्त उत्पन्न झाला. पुढें शंभर वर्षेपर्यंत पूर्वेकडून युरोपांत जाणाऱ्या सर्व मालाचा व्यापार एकट्या पोर्तुगीझांच्या ताब्यांत राहिल्यानें, गोवा शहर अत्यंत संपन्न व विख्यात झालें. त्या शंभर वर्षांत पृथ्वीवरील शहरांत गोव्याची गणना पहिल्या प्रतीची होती. गोव्यामुळेंच आल्बुकर्कचें नांव इतिहासांत प्रसिद्ध झालें आहे. मात्र ज्या हिंदूंनीं पोर्तुगीझ राज्य स्थापण्यास मदत केली, त्यांचे हाल पुढें आतोनात झाले.

**१०. मलाकाचा पाडाव** (स. १५११).—गोव्याची व्यवस्था केल्यावर होनावरच्या राजाचा भाऊ मल्हारराव त्यास आल्बुकर्कनें गोवा बेटाचा कारभार दरसाल तीन लक्ष वसूल घेण्याच्या करारानें दिला, आणि ब्रह्मदेशच्या दक्षिणेकडील

मलाका द्वीपकल्प जिंकण्याच्या इराद्यानें त्यानें आपलीं लढाऊ गलबतें पूर्वेकडे नेलीं. आल्बुकर्कच्या कारभाराची ही दुसरी गोष्ट होय. मलाका हें मसाल्यांच्या व्यापाराचें मुख्य नाकें होतें. मसाल्यांचीं बेटें व चीनजपानकडील सर्व व्यापार ह्या द्वीपकल्पाच्या आटोक्यांत होता. खुद्द मलाका शहर एका मुसलमान सुलतानाच्या ताब्यांत होतें. तेथचें अप्रतिम बंदर मसाल्यांच्या व्यापारानें सधन झालें होतें. बहुतेक सर्व प्राच्य राष्ट्रांतील व्यापारी तेथें राहत असत. व्यापारांतील तंट्यांचा निकाल लावण्याकरितां चार राष्ट्रांच्या चार प्रतिनिधींचें एक न्यायमंडळ तेथं नेमलेलें असे. मलाकाचा द्वीपकल्प 'गोल्डन कर्सोनीस' ह्या नांवानें युरोपियनांस माहीत होता. स. १५०९ त सेक्वीरा नांवाचा पोर्तुगीझ खलाशी पांच जहाजें घेऊन मलाका येथें आला. हाच तेथें गेलेला पहिला युरोपियन होय. सेक्वीरानें माल वगैरे भरण्याचा प्रयत्न करितांच आरबांनीं आपली विरुद्ध खटपट सुरू केली. तेव्हां सेक्वीरा पळून गेला, आणि वीस पोर्तुगीझ लोक मलाका येथील अधिकाऱ्यांच्या हातांत सांपडले. त्यांजवर मुसलमान होण्याकरितां आरबांनीं जुलूम सुरू केला. तेव्हां निनाचतू (Ninachatu) नांवाच्या एका हिंदु व्यापाऱ्यानें पोर्तुगीझांस अंतस्थ रीतीनें मदत करून त्यांस आल्बुकर्ककडे पावतें केलें. तेव्हां आल्बुकर्क आपलें आरमार घेऊन मलाका येथें आला. कांहीं दिवस बोलाचाली होऊन कैदी झालेले लोक आल्बुकर्क यास परत मिळाले. तथापि त्यानें शहरावर दोन हल्ले करून तें काबीज केलें. सुलतान पळून गेला. शहरांत असलेल्या हिंदु, जावानीझ, चिनी व ब्रह्मी व्यापाऱ्यांस आश्रय देऊन आल्बुकर्कनें त्यांचे प्रतिनिधि नेमून दिले; निनाचतू याजवर विशेष मेहेरबानी करून त्यास हिंदूंचा पुढारी केलें. जावानीझ लोकांचा एक मुख्य पुढारी विरुद्ध वागत आहे अशी बातमी लागल्यावरून आल्बुकर्कनें त्यास व त्याच्या नातेवाइकांस ठार केलें. अशा क्रूर कृत्यांनीं त्याचा तिकडे वचक बसला. मलाका पोर्तुगीझांच्या ताब्यांत आल्यानें आरबांच्या हातांतील व्यापार साफ नाहींसा झाला. यूरोपच्या पश्चिम किनाऱ्यापासून तों चीनजपानपावेतों कोठेंच आरबांचा रिघाव राहिला नाहीं. पुढें

सुमात्रा, पेगू, सयाम, कोचीन-चायना वगैरे ठिकाणच्या अधिकाऱ्यांशीं आल्बुकर्कनें स्नेह जोडून आणि मलाका येथें मजबूद किल्ला बांधून व बंदोबस्त करून तो स. १५११ त परत आला. तों गोव्यास वेढा पडून तें हातांतून जाण्याच्या बेतांत आलें होतें. आल्बुकर्क दूर गेला असें विजापुरीं कळतांच, तेथच्या वजिरानें पोलादखान नामक सेनापतीस गोवें काबीज करण्यास पाठविलें. त्यानें तिमय्या व मल्हारराव ह्यांचा पराभव करून गोव्याचें बेट घेतलें. ते दोघे पळून विजयनगरास गेले. तेथें तिमय्याचा खून झाला, व मल्हाररावास होनावरची गादी मिळाली. पुढें गोव्याच्या किल्यांतील पोर्तुगीझ अंमलदारानें पोलादखानावर हल्ला केला; पण त्यांत त्याचाच पराभव होऊन तो मारला गेला. इकडे पोलादखानाच्या हातून गोवें काबीज होत नाहीं असें पाहून, दरबारनें रसूलखान नामक दुसरा एक शूर सरदार गोव्यावर पाठविला. तेव्हां पोलादखान व रसूलखान ह्या दोघांचें भांडण जूंपून, रसूलखानानें पोर्तुगीझांची मदत घेऊन पोलादखानास हटवून परत लाविलें. पोलादखान निघून गेल्यावर रसूलखान पोर्तुगीझ लोकांवर उठला. त्यानें किल्यास वेढा घातला असतां आल्बुकर्क परत आला. त्याच संधीस पोर्तुगालहूनही नवीन मदत आली. तेव्हां सर्व जमवाजमव करून आल्बुकर्कनें रसूलखानाशीं लढून गोवा बेट काबीज केलें. रसूलखान सर्व जागा सोडून विजापुरास गेला. गोव्यांतील जे लोक रसूलखानास जाऊन मिळाले होते, त्यांची आल्बुकर्कनें फारच भयंकर दशा केली. हें वर्तमान स. १५१२ त घडलें.

गोव्याच्या पायीं अनेक संकटें पोर्तुगीझांवर येत असल्यामुळें, तें सोडून द्यावें व केवळ व्यापारापुरतीच आपण तजवीज ठेवावी, असें पोर्तुगालच्या राजाकडून आल्बुकर्क यास लिहून आलें. त्याजवर त्यानें जें उत्तर लिहून पाठविलें, त्यांत त्याचीं धूर्त धोरणें स्पष्ट दिसतात. त्यांचा मतलब असा कीं, एका गोव्याच्या विजयानें पोर्तुगीझ अंमल इकडे जितका दृढ झाला आहे, तितका कितीही आरमारें आणिलीं असतीं तरी झाला नसता. समुद्रावर पोर्तुगीझ लोकांचें वर्चस्व असणें अत्यंत अवश्य आहे. जर

का एक पराभव समुद्रावर झाला, तर हिंदुस्थानांत आपणास क्षणभरही कोणी राहूं देणार नाहीं. आज गोवा आहे म्हणून वाटेल ती सत्ता आपल्या हातांत आहे. इतक्या दिवस आम्हीं गोव्याचें संरक्षण करून टिकाव धरिला, ह्यांतच आमचें पाणी लोकांस दिसून आलें आहे. गुजराथ, कालिकोट वगैरे ठिकाणचे राजे आमची दोस्ती संपादण्यास उत्सुक झाले आहेत. समुद्रकांठीं मजबूद किल्यांचीं ठाणीं आपल्या ताब्यांत असल्याशिवाय नुसत्या आरमारानें व्यापाराचें संरक्षण होणारें नाहीं. गोव्याप्रमाणेंच दीव व कालिकोट येथें आपण किल्ले बांधून आपली मजबुदी केली पाहिजे. इतका सगळा प्रकार समजूनही, जर आपणांस गोवा सोडून देण्याची दुर्बुद्धि परमेश्वर देईल, तर पोर्तुगीझ लोकांचें राज्य इकडे होऊं नये असेंच त्याच्या मनांत आहे असें मी समजेन. माझ्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत स्वराष्ट्राकरितां झगडण्यास मी तयार आहें, मात्र नसते कुतर्क काढून माझा उत्साहभंग आपण करूं नये.' अशाच प्रकारचा वाद पुढें तीनशे वर्षांनीं इंग्रजांचाही चालला होता हें पुढें दिसून येईल.

१०. **आल्बुकर्कचा मृत्यु व धोरणें** (स. १५१५).—एडन आपल्या ताब्यांत घेऊन तांबड्या समुद्रांतील मुसलमानांच्या व्यापाराचे रस्ते कायमचे बंद करून टाकावे हें आणखी एक मोठें काम आल्बुकर्क यास करावयाचें होतें, पण तें त्याच्या हातून तडीस गेलें नाहीं. गोवा, गोव्याचें बेट व पणजी ह्या सर्वांस मिळून एक मोठा मजबूद तट बांधिला. तसेंच कालिकोटचा झामोरीन मरण पावला व त्याच्या मुलानें कालिकोट येथें पोर्तुगीझांस किल्ला बांधूं दिला. हा किल्ला विशेष मजबूद झाला. स. १५१४ साल आल्बुकर्कनें अंतर्व्यवस्था करण्यांत घालविलें. स. १५१५ त ओर्मझवर स्वारी करून तें त्यानें काबीज केलें. हेंच त्याच्या कारकिर्दीचें शेवटचें कृत्य होय. ओर्मझहून परत येत असतां त्याची प्रकृति बिघडली आणि तो सन १५१५ च्या डिसेंबरांत गोव्याच्या बंदरांत येत असतां जहाजावर मरण पावला. त्या वेळीं त्याचा प्रेतसंस्कार गोवा येथें झाला, पण पुढें स. १५६६ त त्याचे अवशेष लिस्बन येथें नेऊन पुरण्यांत आले. त्यानें ६ वर्षें कारभार केला. शौर्य,

मुत्सद्दी चातुर्य, व स्वराष्ट्रसेवा इत्यादि गुणांनीं आल्बुकर्कचें नांव पोर्तुगीझ इतिहासांत स्मरणीय आहे. त्यांचा इकडील सर्वांत मोठा अंमलदार हाच झाला.

हिंदुस्थानांतील पोर्तुगीझ इतिहासाचीं तीन मुख्य अंगें आहेत; व्यापारवृद्धि, राज्यविस्तार, व धर्मप्रसार. ह्या तीन अंगांचा उद्भव निरनिराळ्या वेळीं निरनिराळ्या प्रकारें झाला. व्यापाराची कल्पना वास्को ड गामाची व तत्पूर्वीच्या खलाशांची. राज्यविस्ताराची कल्पना आल्बुकर्कची. धर्मप्रसाराची कल्पना पुढें निघाली व तिच्याचमुळें विशेषतः पोर्तुगीझांचा इकडे ऱ्हास झाला. डच, इंग्रज वगैरे राष्ट्रांच्या पुढील उद्योगांत पहिलीं दोन अंगें होतीं, तिसरें नव्हतें. आल्मीडाच्या वेळेपर्यंत केवळ व्यापार व वखारी वाढविण्याची पोर्तुगीझांची खटपट चालली. पण किनाऱ्यावर नाक्यांचीं ठाणीं ताब्यांत घेऊन तेथें किल्ले वगैरे बांधून हिंदुस्थानांत पोर्तुगीझ राज्य कायम केल्या-शिवाय व्यापार सुरळीत चालणार नाहीं, ही योजना मनांत आणून राज्याचा पाया घालण्याचें काम आल्बुकर्कनें केलें. तें राज्य अनेक राज्यक्रान्तींतून अद्यापि टिकलें आहे. ख्रिस्ती धर्माचा इकडे फैलाव करावयाचा ही कल्पना मात्र केवळ पोर्तुगीझांची होय. सोळाव्या शतकांतील इंग्रज व डच राष्ट्रांनीं आपल्या पुढील उद्योगांत धर्माचा समावेश केला नाहीं. पोर्तुगीझांचाही तो हेतु आरंभीं नव्हता. कालिकोट वगैरे ठिकाणीं त्यांच्या व्यापारास प्रतिबंध झाला नसता, तर राज्यस्थापनेचीही जरूर त्यांस कदाचित् पडली नसती. पण आल्बुकर्कची अशी खात्री झाली, कीं व्यापारास जीं ठिकाणें योग्य आहेत, तीं पूर्णपणें आपल्या ताब्यांत असल्याशिवाय व्यापार चालावयाचा नाहीं. आपला व्यापार वाढावा म्हणून पोर्तुगीझांनीं मुसलमानांचा व्यापार बुडविला. हें काम विशेष अवघड होतें. कारण तात्कालीन तुटपुंज्या साहित्यानें हिंदुस्थानास येण्याचा मार्ग शोधून काढून, पुढें आफ्रिकेपासून सुमात्रापर्यंतच्या प्रदेशांत मुसलमानांचा उच्छेद करणें ही गोष्ट सामान्य नव्हती. पोर्तुगालच्या राजानेंच तें काम हातीं घेतलें, म्हणून तडीस गेलें. डच व इंग्रजांनीं पुढें हातीं घेतलेले उद्योग केवळ व्यक्तिविषयक खासगी कंपन्यांचे होते, त्यांत राजाचें किंवा

राष्ट्राचें अंग नव्हतें. पण पोर्तुगीझ राजा इमॅन्युएल ह्याच्या लक्षांत खरी स्थिति नीट उतरली. मुसलमानांचा व्यापार बंद करण्यासाठीं एडन, सोकोट्रा, ओर्मझ, गोवा, सीलोन, मलाका इत्यादि ठिकाणें नाक्यांचीं आपल्या ताब्यांत ठेवण्याचा त्यानें आग्रह धरिला. पोर्तुगीझांच्या सुदैवानें त्या वेळचे हिंदी राजे, रूमशामचा सुलतान पहिला सलीम, इजिप्टचा सुलतान, व इराणचा शहा इस्माईल हे सर्व आपसांत लढत होते. ते एकमतानें वागते, तर पोर्तुगीझांची इकडे सरशी झाली नसती. मुसलमान तरी पोर्तुगीझांशीं एका धोरणानें कधींच वागले नाहींत. म्हणूनच आल्बुकर्कनें त्यांस अनेक प्रसंगीं क्रूरपणानें वागविलें असें त्याचे चरित्रकार म्हणतात. मुसलमानांचा व्यापार बुडविण्यासाठीं पोर्तुगीझांनीं त्यांजशीं क्रमाक्रमानें अनेक युक्त्या लढविल्या. पोर्तुगीझ अंमलदारांचा लेखी परवाना घेतल्याशिवाय जीं मुसलमानी गलबतें तांबड्या समुद्राकडे व्यापाराकरितां जातां येतानां आढळतील, तीं एकदम पकडून लुटावीं किंवा जाळावीं असा क्रम थोडीं वर्षे चालल्यावर, त्याच्या पुढची पायरी मुळीं परवानेच द्यावयाचे नाहींत ही होय. परवान्याशिवाय गलबतांनीं फिरूं नये व परवाने तर द्यावयाचे नाहींत, असा प्रकार कांहीं दिवस चालला. तिसरी युक्ति नाक्याच्या ठिकाणीं किल्ले बांधण्याची. अशा युक्त्यांनीं त्यांनीं मुसलमानांचा व्यापार बुडविला. येथपावेतों राजा इमॅन्युएल, आल्मीडा व आल्बुकर्क ह्यांचें एकमत होतें. पण ह्याच्या पुढें हिंदुस्थानांत पोर्तुगीझांचा कायमचा अंमल असला पाहिजे, असा आग्रह धरणारा पुरुष आल्बुकर्कच होय. हा अंमल कायम करण्यास त्यानें चार भिन्न उपायांची योजना सांगितली:—१ नाक्याचीं ठिकाणें जिंकून घेणें; व २ तेथें मजबूद किल्ले बांधणें; एतद्देशीय स्त्रियांशीं पोर्तुगीझ पुरुषांचीं लग्नें लावून कांहीं ठरीव प्रदेशांत आपल्या लोकांची वसाहत करणें; आणि ४ कित्येक हिंदी राजांशीं तह जोडून त्यांस पोर्तुगालचे मांडलिक बनविणें. ह्यांपैकीं तिसरा उपाय थोडासा विचित्र असून त्याचे परिणामही तसेच झालेले आज दृष्टीस पडतात. पोर्तुगीझ व इंडियन ह्या दोन भिन्न राष्ट्रांमध्यें लग्न लावण्याचा प्रघात पडून बाटगी क्रिस्ती प्रजा सर्वत्र उत्पन्न झाली तिची सुरुवात आल्बु-

कर्कनें केली. ही गोष्ट दुसऱ्या कोणत्याही युरोपियन राष्ट्रानें इकडे केली नाहीं. गोवा जिंकल्यावर आल्बुकर्कनें मुसलमानांची कत्तल केली, तेव्हां त्यांच्या अनाथ विधवांचीं लग्नें पोर्तुगीझ पुरुषांबरोबर त्यानें लावून दिलीं. अशा लग्नांस तो स्वतः हजर राहून देणग्यांनीं वगैरे उत्तेजन देत असे. सुमारें साडेचारशें लग्नें त्यानें स्वतः लाविलीं. ह्याप्रमाणें हिंदुस्थानांत राहणारी क्रिस्ती प्रजा उत्पन्न करून क्रिस्ती धर्माचा प्रसार हा एक विशेष प्रकार आल्बुकर्कनें निर्माण केला. पण पुढील अधिकाऱ्यांस ही गोष्ट पसंत पडली नाहीं. आल्बुकर्कनें अशा विवाहितांस ज्यास्त सवलती व उत्पन्नें करून दिलीं तरी क्रिस्ती धर्माचा प्रसार इकडे ह्मणण्यासारखा झाला नाहीं. एतद्देशीयांची चलाखी व तीव्र बुद्धि आल्बुकर्कनें तेव्हांच ताडिली; आणि आपल्या नोकरींत त्यांचाच भरणा त्यानें विशेष केला. आणि त्यांजकरितां शाळा घातल्या. एतद्देशीय लोकांची त्यानें एक फौजही तयार केली. हिंदुस्थानांतील राज्यकारभाराचा खर्च येथच्या उत्पन्नां-तून भागवावा अशी त्याची व्यवस्था असून, येथें प्रचलित असलेली ग्रामव्य-वस्था त्यानें कायम ठेविली. गोवा व मलाका येथें टांकसाळी घालून त्यानें पोर्तुगीझ राजाच्या नांवाचीं नवीं नाणीं सुरू केलीं. क्रिस्तीधर्मप्रसाराकरितां त्यानें पुष्कळ खटपट केली, तरी केवळ जुलमानें लोकांस बाटविण्याचें क्रूर काम पुढें पोर्तुगीझ अंमलांत चाललें, तें मात्र ह्यानें सुरू केलें नाहीं. एतद्देशीय राजांचीं आपसांतील वैमनस्यें, पोर्तुगीझ लोकांचीं उत्कृष्ट जहाजें व तोफा, त्यांचें शौर्य, आणि आल्बुकर्कचें धाडसी पण उदार व न्यायी धोरण, ह्या कार-णांनींच पोर्तुगीझांचें राज्य हिंदुस्थानांत कायम झालें. आल्बुकर्कबद्दल एत-द्देशीयांस एवढा आदर वाटे कीं, तो मेल्यावर सुद्धां हिंदु व मुसलमान प्रजा पोर्तुगीझांच्या जाचानें त्रस्त झाली म्हणजे त्याचे कबरीजवळ येऊन प्रार्थना करीत, कीं ‘ देवा या जाचांतून आह्मांस सोडीव. ’

आल्बुकर्क मरण पावला तेव्हां ओर्मझपासून सीलोनपावेतों शांतता होती. खंबायत, चौल, दाभोळ, गोवा, होनावर, भटकळ, काननूर, कोचीन वगैरे ठिकाणें व ह्या हद्दींतले राजे व जमीनदार हे सर्व पोर्तुगीझांचे अंकित होऊन,

आरबी समुद्रावर पोर्तुगीझ जहाजांचा संचार निर्वेध चालू झाला. सीलोनपासून मलाकापर्यंतच्या किनाऱ्यावरील मोठमोठ्या राजांनीं पोर्तुगीझांशीं स्नेह जोडून तह केले. चीन, जावा, व पेगू येथील राजेही त्यांचे स्नेही झाले. सारांश, एकंदर पोर्तुगीझ रियासतींत आल्बुकर्क हाच त्यांचा मोठा मुत्सद्दी पुरुष होऊन गेला, अशी त्याची ख्याति असून त्याचीं चरित्रेंही पुष्कळ झालीं आहेत.

---

# प्रकरण पांचवें.

## पोर्तुगीझ राज्याची अमदानी.

### स. १५१०–१६४०.

| | |
|---|---|
| १. आल्बुकर्कनंतरचे अधिकारी. | २. न्यूनो डा कुन्हा, (१५२९–३८). |
| ३. जॉन कॅस्ट्रो व दीवचा बचाव. | ४ स. १५४८–८० चे कामगार. |
| ५. स. १५८०–१६१२ पावेतों. | ६. उतरती कळा, स. १६१२–४०. |

१. **आल्बुकर्कनंतरचे अधिकारी** ( १५१५–१५२८ ).—हिंदुस्थानाच्या इतिहासांत पोर्तुगीझ राज्याचा तपशील किती द्यावा, या संबंधानें पुष्कळ मतभेद आहे. तपशील जितका थोडा बहुत कंटाळवाणा वाटणारच, परंतु मोठमोठ्या घडामोडी समजण्यास तपशिलाची जरूर असल्यामुळें प्रथम पुढील प्रकरणांत पोर्तुगीझांचा इकडील कारभार कसा चालला तें थोडक्यांत सांगून झाल्यावर मग त्याजबद्दल सामान्य चर्चा करण्याचा विचार आहे.

आल्बुकर्क जिवंत असतांच आल्बर्गारियाची नेमणूक होऊन तो इकडे आला. तो मोठ्या कुलांतला होता; पण स्वभावानें आल्बुकर्कच्या अगदीं विरुद्ध असल्यामुळें, तो लवकरच सर्व लोकांस अप्रिय झाला. आल्बुकर्कची

पद्धति मोडून नवीनच व्यवस्था करण्याची त्याची इच्छा होती; पण त्यास तसें करितां येईना. आल्बुकर्कचीच राज्यव्यवस्था राजा इमॅन्युएल ह्यास शेवटीं पसंत पडली. तांबड्या समुद्रांतील मुसलमानांचा संचार बंद करणें एवढेंच मुख्य काम आल्बर्गारियास राजानें सांगितलें. तदनुसार स. १५१७त सुमारें चाळीस गलबतें व १००० लढाऊ लोक बरोबर घेऊन तो एडनास गेला. पूर्वी एवढें मोठें पोर्तुगीझ आरमार कधींच बाहेर पडलें नव्हतें. पण हलगर्जीपणामुळें व हाताखालील मंडळींच्या नाखुषीस्तव, ह्या स्वारीचा कांहीं उपयोग न होतां, वादळांनीं वगैरे बहुत नुकसान होऊन तो परत आला. पुढें तो सिलोनास गेला; आणि तेथच्या राजाकडून जबर खंडणी घेऊन तेथें स. १५१८ त त्यानें एक किल्ला बांधिला. पोर्तुगीझांचा सीलोन जिंकण्याचा हा आरंभ होय. स. १५१८ च्या अखेरीस लोपेझ सेक्वीरा ह्याची गव्हर्नरच्या जाग्यावर नेमणूक होऊन आल्बर्गारिया युरोपास परत गेला. सेक्वीरानें स. १५२१–१५२४ पावेतों काम केलें. ह्या दोनही कारकिर्दीत महत्त्वाची गोष्ट घडली नाहीं. मात्र युरोपांत राजा इमॅन्युएल स. १५२१ त मरण पावला. हिंदुस्थानांत पोर्तुगीझांचा अंमल कायमचा बसण्यास ह्या राजाचा शहाणपणाच फार उपयोगी पडला. योग्य माणसांची निवड करून, त्यांच्या अडचणी लगेच दूर करणें, हातीं धरलेल्या कामांत पैसा, माणसें व गलबतें ह्यांचा मुबलक पुरवठा करणें, या गोष्टी उत्तम प्रकारें करून धरलेल्या उद्योगाची त्यानें भरभराट केली. तथापि ह्या यशाचें मुख्य श्रेय त्याचा बाप दुसरा जॉन ह्यासच दिलें पाहिजे. कारण दूरचे प्रदेश शोधून काढण्याचें अवघड काम त्यानें तडीस नेलें; आणि त्यानें माणसें तयार केलीं, त्यांच्याच हस्तें पुढील पराक्रम घडून आले. इमॅन्युएल पोर्तुगालच्या राष्ट्रास फारसा प्रिय नव्हता. तो संशयी व अनुपकारी असून पैशाचाही लोभी होता. हिंदुस्थानच्या व्यापारापासून होणारा सर्व फायदा त्यानें घेतला. इमॅन्युएलनंतर त्याचा तिसरा मुलगा जॉन पोर्तुगालच्या गादीवर बसला. तो इमॅन्युएलपेक्षां पुष्कळ चांगला असून, त्यास गुणाची पारख असे; आणि गुणांचें चीज केल्याशिवाय तो राहत नसे. तथापि धर्माच्या

कामांत मात्र तो दुराग्रही होता. हिंदुस्थानांत राज्य स्थापून व्यापार व ऐहिक संपत्ति वाढवावी एवढाच त्याचा उद्देश नसून, येथच्या लोकांस क्रिस्ती करून धर्माची भर करावी अशी त्यास जबरदस्त इच्छा होती. पोर्तुगाल देशांत ' पवित्र न्यायासन ' म्ह० Inquisition स्थापून, तद्द्वारा लोकांवर धर्माची जाचणूक त्यानें लादली त्यामुळें राष्ट्राचा उत्साह व बुद्धिमत्ता खुरटून गेली. इकडे हिंदुस्थानांतही लोकांस बाटविण्याचा दुष्ट क्रम त्यानें सुरू केल्यामुळें, त्याचें राज्य बलहीन होत गेलें.

जॉन राजानें वास्को ड गामा ह्यासच व्हाइसरॉय नेमून पुनरपि सन १५२४त हिंदुस्थानांत पाठविलें. ह्या पूर्वीच गामाचा गौरव व्हावयाचा, पण इमॅन्युएल राजाची त्याजवर मर्जी नव्हती. हिंदुस्थानांतील पोर्तुगीझ अधिकारी बरेच स्वेच्छाचारी व वरिष्ठांचा हुकूम मानीतनासे झाले होते. त्यांस पैसे खाण्याची संवय लागून, ते कामें बरोबर करीत नसत. त्यांचा बंदोबस्त करण्याचें काम राजानें गामा ह्यास सांगितलें. तो इकडे येऊन दाखल झाल्यावर प्रथम चौलचा किल्ला पाहून मग गोव्यास गेला गोव्याचा अधिकारी पेस्ताना ह्याजविरुद्ध पुष्कळ तकरारी आल्या होत्या, सबब त्यास गामानें नोकरींतून एकदम कमी केलें. पुढें कोचीन येथें जाऊन तेथच्या पोर्तुगीझ अधिकाऱ्याजवळून नोकरीचा राजीनामा घेतला. येणेंकरून गामाचा दरारा चांगला बसला. पण असा अंमल गाजविण्यास तो फार दिवस जगला नाहीं. तो अगदींच वयोवृद्ध झाला असून स. १५२४च्या डिसेंबरांत इकडेच मरण पावला. त्याचें दफन कोचीन येथें झालें, पण पुढें स. १५३८ त त्याच्या अस्थि पोर्तुगाल देशांत नेण्यांत आल्या.

गामाच्या पश्चात् दोन वर्षेपावेतों डॉम हेन्री ड मेनेझिस ह्यानें गव्हर्नरचें काम केलें तो मरण पावल्यावर लोपो व्हाझ ड सांपेयो ह्याची नेमणूक झाली. पण त्याचा कारभार चांगला झाला नाहीं. किल्यांची वगैरे व्यवस्था ठीक नव्हती. अलीकडे पोर्तुगीझ लोकांचा समुद्रमार्गानें हिंदुस्थानांत संचार झाल्यापासून व्हेनिशन व्यापाऱ्यांची किफायत बुडाली, तेव्हां मुसलमानांशीं

सख्य जोडून पोर्तुगीझांस शह देण्याचा त्यांनीं उपक्रम चालविला. ही गोष्ट पूर्वींच व्हावयाची; पण तुर्कांचें इजिप्टशीं युद्ध चाललें होतें, ते स. १५१७ त संपून इजिप्ट देश तुर्कांचे ताब्यांत गेला. तसेंच सिरिया व आरेबिया हेही देश तुर्कांनीं जिंकिले. तुर्कांचा सुलतान सलीम स. १५२० त मरण पावला, आणि त्याचा मुलगा सुलेमान तख्तनशीन झाला. हिंदुस्थानामुळें पोर्तुगीझांचें वजन कसें वाढलें हें त्यास पूर्णपणें कळत असून, त्यांचा प्रतिकार करण्यासाठीं सुवेझ येथें त्यानें एक मोठें आरमार तयार करून त्याजवर सुलेमान पाच्छा याची नेमणूक केली. ह्या आरमारांत व्हेनिसचे क्रिस्ती खलाशी आणि तुर्क व इजिप्टचे खलाशी कामावर होते.

२. न्यनो डा कुन्हा (स. १५२९–१५३८).—अशा बिकट प्रसंगीं हिंदुस्थानांत कोणी तरी अक्कलवान पुरुष असावा अशा हेतूनें पोर्तुगीझ राजा तिसरा जॉन ह्यानें न्यूनो डा कुन्हा ह्यास स १५२८ त गव्हर्नर नेमून इकडे पाठविलें. आल्बुकर्कनंतर इकडे आलेला विशेष पराक्रमी पुरुष हाच होय. त्यानें पूर्वी-बंगाल समुद्रांत अनेक पराक्रम केले होते. स. १५२५त मोंबासा येथील राजास जिंकून त्यानें ओर्मझच्या राजाकडून खंडणी मिळविली होती. डा कुन्हा स. १५२९त इकडे आला, आणि लगेच त्यानें सांपेयो ह्यास कैद करून पोर्तुगाल देशास परत पाठविलें. परत गेल्यावर कांहीं दिवस कैद भोगून पुढें तो हद्दपार झाला. डा कुन्हानें सर्व ठिकाणे, किल्ले, व वखारी तपासून पाहिल्या; आणि अधिकाऱ्यांच्या लुच्चेगिऱ्या हुडकून काढून त्यांस शासन केलं. ह्याशिवाय व्यापार व राज्य वाढविण्याचेंही त्यानें पुष्कळ प्रयत्न केले. कारोमांडल किनाऱ्यानें सेंट टॉमेच्या पुढें पोर्तुगीझ व्यापार चालू नव्हता, पण बंगालची सुबत्ता ऐकून तेथें आपलें व्यापाराचें ठाणें असावें अशी डा कुन्हास इच्छा झाली. बंगालचा सुलतान स. १५३४ त शेरशहाशीं लढत असतां त्यास ४०० पो० लष्कराची मदत डा कुन्हानें पाठविली. त्यांनींच पुढें हुबळीस पो० वसाहत केली; तेणेंकरून कांहीं काळानें हुगळी शहर मोठ्या भरभराटीस चढलें. तरी बंगाल्यांत पो० सत्ता वाढली नाहीं. हुगळीच्या पो० स मदतीसाठीं सीलोनवर

अवलंबून राहवें लागे. स. १६३२ त शहाजहान बादशहानें पो०चा उच्छेद केला. ( मु. रि. पृ. ६२१ ). नंतर जी कांहीं थोडी सत्ता त्यांची त्या बाजूस राहिली, तिचा शेवट पुढें औरंगजेबाचे वेळेस शाएस्तेखानानें केला. गुजराथच्या किनाऱ्यावर पोर्तुगीझांचें बंदर नव्हतें. इकडे पश्चिम किनाऱ्यावर अलीबागेजवळचें चौल त्यांचे ताब्यांत असून त्याच्या उत्तरेस पोर्तुगीझ सत्ता चालत नव्हती. तुर्कस्तानांतून सुलेमानचें आरमार गुजराथच्या किनाऱ्यावर आल्यास, त्यास तेथच्या मुसलमान राजाचा आश्रय मिळेल व मग पोर्तुगीझांस तें जड जाईल, ह्या हेतूनें डा कुन्हानें गुजराथेंत ह्या किनाऱ्यावर एक बंदर मिळविण्याची खटपट चालविली. इतक्यांत अनुकूल संधिही आली. गुजराथचा सुलतान बहादूरशहा व दिल्लीचा मोगल बादशहा हुमायून यांचें युद्ध चाललें होतें; त्यांत बहादूरशहानें पोर्तुगीझांची मदत मागितली. त्याबद्दल वसई बेट त्यानें पोर्तुगीझांस दिलें. तें ताब्यांत घेऊन तेथें पोर्तुगीझांनीं मजबूद किल्ला बांधिला, ( स. १५३४ ). तेव्हांपासून वसई हें पोर्तुगीझांचें उत्तरेकडील मोठें ठाणे होऊन तें गोव्याप्रमाणेंच भरभराटीस आलें. पुढें दमण, ठाणें, तारापूर, वांद्रा, माहीम, मुंबई वगैरे ठिकाणें त्यांनीं काबीज केलीं. स. १५३५ त बहादूरशहानें पोर्तुगीझांच्या मदतीखातर त्यांस काठेवाडच्या दक्षिणचें दीवबेट दिलें. तेथें लगेच त्यांनीं एक फार मजबूद किल्ला बांधिला ( १५३५ ). बहादूरशहा व डा कुन्हा यांचा तह झाला होता; पण एके दिवशीं डा कुन्हास भेटून बहादूरशहा जहाजावरून परत येत असतां त्याचा खून झाला, आणि त्याचा पुतण्या तिसरा महंमदशहा ह्यानें तुर्कस्तानचा सुलतान सुलेमान याजशीं सख्य करून पोर्तुगीझांवर शस्त्र धरिलें. तेव्हां सुलेमानानें पाण्यांतून व महंमदशहानें जमिनीवरून दीव बेटास वेढा घातला. तत्पूर्वीच किल्ल्याचें काम पुरें झालें होतें; तें पोर्तुगीझांच्या फार उपयोगास आलें.

सिल्व्हेरा नांवाच्या पोर्तुगीझ अधिकाऱ्यानें दीवचा बचाव उत्कृष्ट केला. वेढा पुष्कळ महिने चालून शेवटीं मुसलमानांच्या आपसांतील भांडणामुळें

तो उठला. एवंच दीव बेट मुसलमानांस मिळालें नाहीं. इकडे डा कुन्हाच्या जागेवर गार्शिया ड नोरोन्हा ह्याची नेमणूक झाली (सन १५३८). डा कुन्हाच्या कडकपणामुळें त्यास अनेक शत्रू उत्पन्न झाले, व त्याजबद्दल भलभलत्याच कंड्या राजाच्या कानीं गेल्या. त्यांवरून त्यास कैद करून परत पाठवावें. असा हुकूम राजानें सोडिला. त्याप्रमाणें परत जात असतां सन १५३९ त तो रस्त्यांतच मरण पावला. दीव बेट काबीज करणें ही त्याच्या कारभाराची मोठी गोष्ट होय. तो आल्बुकर्कसारखाच हुशार होता.

**३. जॉन कॅस्ट्रो व दीवचा बचाव** (स. १५४६).—गार्शिया नोरोन्हा सन १५४०त गोवा येथें मरण पावला. नंतर वास्को ड गामाचा दुसरा मुलगा स्टीफो ड गामा गव्हर्नर झाला. त्यानें तांबड्या समुद्रांत एक सफर केली. सन १५४२ त त्याच्या जाग्यावर अफॉन्झो ड सूझा ह्याची नेमणूक झाली. हा गृहस्थ सभ्य व प्रामाणिक म्हणून इकडे पाठविलेला होता. अलीकडे हिंदुस्थानांत येणारे पोर्तुगीझ कामगार येन केन प्रकारेण स्वतःची भर करीत. सरकारी कामांत लांचखाऊपणा व खासगी वर्तनांत जुवा वगैरे व्यसनें, ह्यांनी जिकडे तिकडे गोंधळ माजला. तो मिटविण्याकरितां, कॅस्ट्रो हा मोठ्या तयारीनें इकडे आला. हिंदुस्थानांत नऊ वर्षें लष्करांत नोकरी केल्यावर लोकांस वाटेल तितका खासगी व्यापार करण्याची परवानगी मिळेल, असें वचन पोर्तुगालच्या राजानें आरंभापासूनच दिल्यामुळें, त्या लालुचीनें पोर्तुगालचे पुष्कळ लोक इकडे येत. अर्थात् ह्या व्यापाराची मुभा ह्मणजे जिवंत अन्यायाचा सुकाळ. अंमलदारांचे पगार वगैरे ठरवून हा अन्याय दूर करण्याचा कॅस्ट्रोनें प्रयत्न केला. पण त्यास विशेष यश आलें नाहीं.

कॅस्ट्रो आला तेव्हां पोर्तुगीझ लोकांवर सर्व मुसलमानांनीं शस्त्र उचललें होतें. खंबायतचा सुलतान महंमूद व त्याचा मुख्य कामगार खोजा जाफर हे दीव परत घेण्याच्या उद्योगास लागले. खोजा जाफर हा मोठा अभिमानी व चतुर होता. त्यानें बाहेरून पोर्तुगीझांशीं स्नेह राखून अंतस्थ रीतीनें दीव परत घेण्यासाठीं सर्व मुसलमानांची जूट केली एका पोर्तुगीझ इसमास फित-

वून त्याजकरवीं दीवचें पिण्याचें सर्व पाणी त्यानें विषारून टाकण्याची तजवीज केली, परंतु हा बेत एका मुसलमान स्त्रीच्या मार्फत पोर्तुगीझांस कळून त्यांनीं त्याचा आगाऊच बंदोबस्त करून ठेविला. मास्करीन्हा म्हणून दीवचा मुख्य अंमलदार होता. त्यानेंही लढण्याची पूर्ण तयारी केली. प्रत्येक बुरुजावर आपल्या भरंवशाचा एक एक कामगार नेमून प्रत्येकाच्या हाताखालीं तीस मनुष्य देऊन ठेविले. खोजा जाफरनें प्रथम समुद्रांतून दीववर हल्ला केला; पण त्याचीं पुढें पाठविलेलीं तीन जहाजें पोर्तुगीझांनीं पकडून फोडिलीं. त्यांत पुष्कळ अन्नसामुग्री त्यांस सांपडली. समोरच्या बाजूस जमिनीवर खोजा जाफरनें एक उंच तट बांधून त्यावरून किल्ल्यावर मारा चालविला. ह्या माऱ्यानें किल्ल्यांत पोर्तुगीझांची फार खराबी झाली. पण ते मोठ्या नेटानें लढत होते. बायकामुलें सुद्धां मरण्यास सिद्ध होऊन लढत होतीं. म्हणून मुसलमानांच्या तोफांनीं दिवसभर जो भाग तुटे, तो पुनः रात्रींत ते भरून काढीत. आपल्या माऱ्याचा परिणाम होत नाहीं असें पाहून जाफरनें दुसरा एक उंच तट बांधिला आणि त्यावरून त्यानें दीववर मारा सुरू केला एके दिवशीं ह्या किल्ल्यास पडलेलें एक भोंक तपासीत असतां पोर्तुगीझ तोफांतला एक गोळा सहजगत्या त्याजकडे आला, त्यायोगें तो शूर पुरुष ताबडतोब मरण पावला, (ता. २६ जून, सन १५५६). जाफरचा मुलगा रूमीखान हाही बापासारखाच शूर होता. त्यानें लगेच वेढ्याचें काम हातीं घेतलें. दोहों पक्षांकडील इसम जिवावर उदार होऊन लढत होते. हजार हजार लोकांच्या टोळ्या घेऊन रूमीखान एक एक बुरुजावर जाई व तितके वेळां आंतले लोक त्वेषानें लढून त्यांस परत फिरवीत. पण अन्नसामुग्री संपून आंतल्या लोकांची स्थिति दुःसह झाली. तशाच स्थितींत लढत असतां अनेक वेळां किल्ला पडण्याचा प्रसंग आला. मुसलमानांनीं सुरुंग व तोफा ह्यांचा कहर करून सोडिला पोर्तुगीझांचे मूळ ४०० लोक किल्ल्यावर होते, त्यांपैकीं दोनशें अगोदरच मे होते; आणि बाकीच्या दोनशांतील बहुतेक घायाळ झाले होते. इकडे मुसलमानांचे पांच हजारांवर लोक पडले. पुढें ऐनप्रसंगीं पोर्तुगीझांस चार

लोकांची मदत येऊन पोंचली; आणि कांहीं अन्नसामुग्रीचीं मुसलमानांचीं जहाजेंही त्यांच्या हातांत पडलीं. त्यामुळें पोर्तुगीझांस नवीन दम आला. ह्याप्रमाणें आठ महिने वेढा चालला. सन १५४६ च्या नोव्हेंबरांत डॉम कॅस्ट्रोनें मोठें आरमार तयार करून दीवच्या मदतीस पाठविलें. त्या आरमाराचा मुख्य डॉम लिमा हा फार क्रूर मनुष्य होता. त्याच्या हाताखालीं सुमारें शंभर जहाजें होतीं. वसई, दमण, सुरत, हंसोट वगैरे किनाऱ्यावरील मुलूख जाळून लुटून उद्ध्वस्त करीत लिमा दीव येथें आला. आरमाराबरोबर गव्हर्नर कॅस्ट्रोही होता. ही मदत येतांच पोर्तुगीझांनीं किल्याबाहेर येऊन निरनिराळ्या तुकड्यांनीं मैदानांत मुसलमानांवर हल्ला केला. तेव्हां मोठ्या निकराचा रणसंग्राम होऊन शेवटीं पोर्तुगीझांस जय प्राप्त झाला. असे रणसंग्राम लागोपाठ तीन चार झाले. दोनही पक्षांनीं आपापली शिकस्त केली. शेवटीं रूमीखान व त्याचे अनेक शूर साथीदार पडले, तेव्हां मुसलमान लोक दीव सोडून चालते झाले. त्यांच्या तोफा व पुष्कळ सामुग्री पोर्तुगीझांस मिळाली. खंबायतच्या राजास ही पराजयाची बातमी कळतांच त्याच्या ताब्यांत अठ्ठावीस पोर्तुगीझ कैदी होते, त्यांचा त्यानें शिरच्छेद केला. पुढें पोर्तुगीझांनीं खंबायत, घोघो वगैरे शहरें जाळून सुरत शहर लुटलें आणि निरपराधी रयतेची कत्तल करून आपल्या क्रूरपणाची शिकस्त करून दाखविली.

कॅस्ट्रोनें विजापूरच्या आदिलशहाशींही युद्ध सुरू केलें होतें. त्यांत आदिलशहाचा पराभव करून पोर्तुगीझांनीं दाभोळ बंदर काबीज केलें. नंतर दोघांचा तह ठरला ( स. १५४७ ). दीवच्या विजयाची बातमी युरोपास पोंचून राजाकडून कॅस्ट्रोस शाबासकी व व्हाइस रॉयचा हुद्दा मिळाला. इकडे येणारे कित्येक इसम नुसते गव्हर्नर असत; व कित्येक व्हाइस रॉय असत; आणि दोघांचे अधिकार भिन्न असत. कॅस्ट्रो स. १५४८ मरण पावला. व गोवा काबीज करून आल्बुकर्कनें आपली कीर्ति पोर्तुगीझ इतिहासांत कायम केली, त्याचप्रमाणें दीवचा बचाव केल्याबद्दल कॅस्ट्रोची कीर्ति आहे.

**४. स. १५४८—८० चे कामगार.**—कॅस्ट्रो नंतर गव्हर्नरची जागा गार्शिया ड सा ह्यास मिळाली. त्यानें गुजराथचा सुलतान तिसरा महंमदशहा ह्याजबरोबर तह करून दीवचा किल्ला कायमचा पोर्तुगीझांकडे घेतला. मात्र किल्ल्याबाहेरचा सर्व मुलूख सुलतानाचा ठरला. गार्शिया ड सा स. १५४९ त मरण पावला. नंतर वसईचा अधिकारी जॉर्ज काब्राल ह्यास गव्हर्नरची जागा थोडे दिवस मिळाली; पण पोर्तुगालहून अफॉन्झो ड नोरोन्हा हा व्हाइस रॉय म्हणून आला. त्यानें स. १५६५ पावेतों काम करून सीलोन बेटांत पोर्तुगीझ लोकांची सत्ता वाढविली. पुढें पेद्रो मास्कारेना व फ्रान्सिस्को बारेटो हे गव्हर्नर झाले. बारेटोनें सर्व पोर्तुगीझ किल्ले तपासून त्यांचा बंदोबस्त केला; आणि पोर्तुगीझांचा दरारा कायम राखिला. ह्याच्या कारकीर्दीत प्रसिद्ध पोर्तुगीझ कवि कमोन्स ( Comoens ) ह्यानें गोव्यांतील पोर्तुगीझ अधिकाऱ्यांच्या उन्मत्तपणावर एक टीकात्मक कविता प्रसिद्ध केली, त्याबद्दल शिक्षा म्हणून त्या कवीस हद्दपार करून मोलक्का येथें पाठविलें. तेथून तो स. १५८१ त परत गोव्यास आला, आणि कांहीं दिवस चौल येथें पब्लिक वर्क्स खात्याचा तो मुख्य होता. सोळा वर्षें काम करून तो स्वदेशीं परत गेला. या कवीचे ग्रंथ युरोपांत सुप्रसिद्ध आहेत. तिकडे युरोपांत राजा तिसरा जॉन मरण पावला; आणि त्याचा दुर्दैवी नातू सबाश्चन गादीवर बसला. तो अल्पवयी असल्यामुळे राज्याचा कारभार मयत राजाची राणी कॅथरीन पाहात असे. तिनें स. १५५८ त कान्स्टांटिनो ड ब्रागांझा ह्यास व्हाइस रॉय नेमून गोव्यास पाठविलें. ह्यानें दमण काबीज करून तेथें एक मजबूद किल्ला बांधिला. तसेंच मलाका, ओर्मझ, सीलोन वगैरे ठिकाणीं गलबतें पाठवून आपल्या अंमलाची मजबुदी केली. सीलोनांत स्वतः जाऊन जाफनापट्टण नांवाचें ठिकाण त्यानें घेतलें, तेंच पोर्तुगीझांचें सीलोनांतलें मुख्य ठिकाण होय. त्यानें हाताखालच्या अंमलदारांची गैरशिस्त वर्तणूक मोडण्याचीही बरीच खटपट केली. स. १५६१त फ्रान्सिस्को कूटिन्हो हा व्हाइस रॉय झाला. त्यानें तीन वर्षें कारभार केल्यावर ऍन्टो ड नोरोन्हा व्हाइस रॉय झाला

( १५६४ ). या वेळीं दक्षिणेंत सर्व मुसलमान राजे विजयनगरचें राज्य जिंकण्यांत गुंतल्यामुळें, पोर्तुगीझांचें चांगलें फावलें. त्यांनीं सीलोन बेट सर्व काबीज करून अनेक लहान ठिकाणीं आपली सत्ता कायम केली. मुसलमानांनीं तालिकोटच्या समरभूमीवर विजयनगरच्या नरसिंहरायास जिंकिलें ( १५६४ ), ही गोष्ट पोर्तुगीझ दुरून शांतपणें पाहत होते. अशा प्रसंगीं आल्बुकर्क असता तर हिंदु राजांस मदत करून, त्यानें मुसलमानांस शिरजोर होऊं दिलें नसतें. हिंदु राजांचें संरक्षण करणें जरूर आहे असें आल्बुकर्क समजत असे. विजयनगरच्या राजानें पूर्व किनाऱ्यावरील सेंट टॉमे नामक पोर्तुगीझ ठिकाणावर एकदां हल्ला केला होता, तेव्हांपासून त्याजबद्दल पोर्तुगीझांच्या मनांत स्नेहभाव नव्हता; ह्मणून त्यांनीं त्यास मदत केली नाहीं.

स. १५६८त लुई आथेड ( Athaide ) व्हाइस रॉय झाला. तो येतांच तालिकोटच्या लढाईचा पहिला परिणाम त्यास सहन करावा लागला. ह्मणजे विजापुरच्या आदिलशहानें गोव्यावर स्वारी केली, त्याजबरोबर एक लाख फौज व दोन हजारांवर हत्ती होते. ह्या प्रसंगीं पोर्तुगीझांविरुद्ध बहुतेक राजांनीं जूट करून त्यांस येथून हांकून देण्याचा विचार केला होता. सन १५७० त गोव्यास वेढा पडला, तेव्हां आंत फक्त ७०० लोक लढाईच्या कामाचे होते. अशा स्थितींत पाद्री व एतद्देशीय वगैरे लोक मदतीस घेऊन आथेडनें सर्व मिळून दोन हजारांची भरती केली. ह्या लोकांनीं दहा महिने पावेतों आदिलशहास दाद दिली नाहीं. ह्यावरून पोर्तुगीझ लोकांच्या शौर्याची व निश्चयाची साक्ष पटते. शेवटीं आदिलशहाची पुष्कळ खराबी होऊन तो वेढा उठवून चालता झाला. ह्याच वेळेस मलाका, चौल आणि कालिकोट जवळील शाले ह्या ठिकाणीं पोर्तुगीझांनीं आपल्या शत्रूंस लढून मागें हटविलें. पो० तोफांचा मारा व त्यांची कवाइती शिस्त यांपुढें एतद्देशीय फौजा कितीही मोठ्या असल्या तरी त्यांचा टिकाव लागत नसे. मलाका येथें २०० पो० नीं पंधरा हजार एतद्देशीयांचा फन्ना उडविला. नंतर आथेडनें मलबार किनाऱ्यानें स्वारी करून सर्व शत्रूंचें पारिपत्य केलें; विशेषतः

होनावरचा राजा गोव्याच्या वेढ्यांत आदिलशहास मिळाला होता, ह्मणून होनावर शहर जाळून तेथे आथेडनें कहर उसळून दिला. स. १५७१त आंटोनियो ड नोरोन्हा व्हाइस रॉय होऊन आला. हा फारसा हुशार नव्हता. आफ्रिकेच्या किनाऱ्यापासून तों मलाकापयर्तचा सर्व प्रदेश एका अधिकाऱ्याच्या आटोक्यांत राहण्यास अडचण पडूं लागल्यामुळें, पोर्तुगालच्या दरबाराकडून इकडील अधिकाराचे तीन टप्पे करण्यांत आले. एडनपासून सीलोनपर्यंतचा मधला मुख्य पट्टा गोव्याचे ताब्यांत राहून तेथच्या अधिकाऱ्यास व्हाइसरॉय ही पदवी; सीलोनपासून मलाकापर्यंतचा पूर्वेकडील भाग एका अधिकाऱ्याचे हाताखालीं; आणि आफ्रिकेच्या पूर्वकिनाऱ्यावर तिसरा अधिकारी, अशी व्यवस्था झाली. दुसऱ्याचें मुख्य ठिकाण मलाका व तिसऱ्याचें मोझांबिक होतें. मोझांबिकच्या अधिकाऱ्यानें आफ्रिकेच्या पूर्वेकडील मुलुखाची तपासणी करून नवीन शोध लाविला. स. १५७३त आंटोनियो बारेटो हा गोव्याचा अधिकारी झाला. पुढें स. १५७६ पासून १५७८ पावेतों डिओगो ड मेनेझिस हा गव्हर्नर होऊन स. १५७८ पासून १५८२ पावेतों डॉम आथेड ह्यानें दुसऱ्यांदा तें काम केलें. सुमात्राच्या वायव्य कोपऱ्यावर आचिन नांवाचें नाक्याचें ठिकाण होतें. स. १५७८त आचिनच्या सुलतानानें मलाकास वेढा घातला, तेव्हां अगदीं थोड्या पो०नीं दहा हजार एतद्देशीयांस सर्वस्वी हरविलें. पुनः स. १६१५ व १६२८ सालीं आचिनच्या सुलतानानें पो०चे हातून मलाका सोडविण्याचा झटून प्रयत्न केला, परंतु तो पो०नीं चालूं दिला नाहीं. हा सर्व प्रभाव पाश्चात्य तोफा व कवाईत यांचा होय. लुई आथेड स.१५८१त गोव्यास मरण पावला. स १५८०त युरोपांत पोर्तुगाल व स्पेन हे दोन देश कौटुंबिक संबंधानें एका राजाच्या अंमलाखालीं गेले, तेव्हांपासून हिंदुस्थानांतील पोर्तुगीझ कारभारास निराळें वळण लागलें आणि त्यांचा इकडील इतिहासाचा पहिला भाग संपला.

५ **स. १५८० पासून १६१२.**—या संयुक्त राज्यांचा पहिला राजा फिलिप होय. स. १५८८ त इंग्लंडवर मोठें आरमार पाठवून एलिझाबेथ राणीशीं

लढणारा पुरुष हाच होय. त्यानें हिंदुस्थानांतील सर्व पोर्तुगीझ अधिकाऱ्यांकडून आपल्या राज्यपदाच्या कबुलीची शपथ घेवविली. मास्करीन्हा यास त्यानें गोव्याचा व्हाइस रॉय नेमिलें. ह्यानेंच चौलचें संरक्षण केलें होतें. मास्करीन्हानें सन १५८१ पासून १५८४ पर्यंत गोव्याचा कारभार केला. ह्या व पुढील कारकिर्दींत हिंदुस्थनासंबंधीं महत्त्वाच्या गोष्टी फारच थोड्या घडल्या आहेत. दमण, दीव, वसई वगैरे किनाऱ्यावरील बंदरांचें संरक्षण करणें, सीलोन, मलाकाकडील वसाहतींस मदत करणें, असल्या कामांतच त्यांचा बहुतेक वेळ जाई. या समयास डच व्यापारी पुढें सरसावल्यामुळें पोर्तुगीझांचा व्यापार मागें पडला. सारांश, युद्धाच्या भानगडींपेक्षां दुसरे ऐतिहासिक महत्त्वाचे प्रकार पुढें विशेष घडले नाहींत. इ स. १५६४ अँटोनियो नोरोन्हा व्हाइस रॉय झाला, तेव्हांपासून एतद्देशीय लोकांस जुलुमानें क्रिस्ती करण्याचा सपाटा चालू झाला. गोव्याहून जेझुइट पाद्री साष्टी बेटांत गेले. त्यांनीं लष्कराची मदत घेऊन हिंदु लोकांच्या देवालयांचा विध्वंस केला. तेव्हां लोकही शस्त्रें घेऊन उठले. हिंदूंनीं क्रिस्ती देवालयांचा नाश केला. कित्येकांनीं क्रिस्ती उपदेशकांवर हल्ले करून त्यांचे प्राण घेतले. ह्याचा सूड घेण्याकरितां नोरोन्हानें साष्टीवर फौज पाठविली; आणि त्यांतील सर्व लोकांची कत्तल करून व घरेंदारें जाळून देवळें जमीनदोस्त केलीं. तेव्हां पोर्तुगीझ लोकांचा तिकडे वचक बसला. त्यांनीं सर्व प्रांतांत आपलीं मंदिरें स्थापिलीं आणि प्रत्येक टेकडीवर क्रूस उभारून दिला. सन १५८४ त डॉम ड्युआर्ट मेनेझिस ह्याची व्हाइस रॉयच्या जागेवर नेमणूक झाली. त्याची सर्व कारकीर्द लढण्यांत गेली. तुर्क लोक आपल्या हातचा गेलेला व्यापार परत घेण्यासाठीं प्रयत्न करीत होते. त्यांचे व पोर्तुगीझांचे अनेक झगडे झाले. मेनेझिसनें सन १५८८ पर्यंत कारभार केला. त्याच्या कारकिर्दींत इंग्लंड व स्पेन ह्यांचें वांकडें येऊन आरमारांचें युद्ध झालें. सन १५६८ त एक पोर्तुगीझ जहाज उत्कृष्ट मालानें भरलेलें युरोपास जात असतां प्रसिद्ध इंग्रज खलाशी ड्रेक ह्याच्या सहज हातास लागलें. त्यामुळें पोर्तुगीझ जहाजांत विशेष दम नाहीं, आणि हिंदुस्थानांत

पोर्तुगीझ लोकांचें प्राबल्य वाटलें होतें तितकें नाहीं, असें इंग्रजांस कळून आलें. तसेंच हिंदुस्थानांतील संपत्तीचाही त्यांस अंदाज कळून आला. अशाच प्रकारची चळवळ सन १५८९ झाली. त्या वेळेस एक जहाज इंग्रजांचे हातास लागलें. त्यांतील माल इंग्लंडांत नेऊन विकल्यावर दीड लाख पौंडाचें उत्पन्न आलें. शिवाय जहाजावर मौल्यवान जवाहीर होतें तें निराळेंच. अशा उदाहरणांनीं इंग्रजांच्या तोंडास पाणी सुटलें. डच्युआर्ट सन १५८८ त मरण पावला.

सन १५८९ त डी सूजा कूटींनो गव्हर्नर झाला. त्यानें सन १५९१ पर्यंत कारभार केला. त्याच्यानंतर माढियास ड आल्बुकर्क १५९७ पर्यंत त्या कामावर होता. सन १५९७ त फ्रान्सिस्को ड गामा व्हाइस रॉय झाला. हा सर्व लोकांशीं फार उद्दामपणानें वागत असे. शिवाय त्याच्या हातांत असलेल्या नोकऱ्या त्यानें आपल्या ओळखीच्या लोकांस दिल्या, त्यामुळें त्याच्या विरुद्ध फार गवगवा झाला. त्याच्या कारकिर्दींत डच व पोर्तुगीझ ह्यांजमध्यें मलाक्का-नजीक एक लढाई झाली, तींत डच लोकांचा पराजय झाला. सन१६०० मध्यें सालढाना नांवाचा इसम पोर्तुगाल देशाहून व्हाइस रॉयच्या कामावर आला. तेव्हां ड गामा काम सोडून परत गेला. परत जातेवेळीं त्याची गोव्याचे लोकांनीं फारच मानखंडना केली. त्यास स्वदेशीं पोहोंचण्यास पांच महिने लागले. त्या वेळीं हा प्रवास फार जलद झाला असें समजत.

सालढानाच्या कारकिर्दींतील मुख्य गोष्ट म्हणजे चीन देशामध्यें क्रिस्ती धर्म सुरू करण्याकरितां गोव्याहून मंडळी पाठविली ही होय. खैबर घांटांतून मध्यआशियाच्या रस्त्यानें ही मंडळी अनेक संकटें सोसून पेकीन येथें गेली. त्याच वेळेपासून चीन देशाची खरी माहिती युरोपियन लोकांस कळूं लागली. सालढानानंतर सन १६०४ त मार्टिन अफांझो कॅस्ट्रो व्हाइस रॉय झाला. त्या वेळीं डचलोक फार प्रबळ झाले होते. मलाक्कानजीक त्यांच्या व पोर्तुगीझांच्या समुद्रांत लढाया झाल्या, त्यांत पोर्तुगीझ लोकांचा पराजय झाला. कॅस्ट्रो हा मलाक्का येथें सन १६०६ त मरण पावला. नंतर गोव्याचा आर्चबिशप मेन्झिस ह्यानें दोन वर्षें गव्हर्नरचें काम केलें. त्याच्या वेळेस डच व पोर्तुगीझ

ह्यांची मोझांबिक येथें लढाई झाली. १६०९ पासून मेंडोसा ह्यानें कांहीं वर्षे गव्हर्नरचें काम केल्यावर ताव्होरा नांवाचा इसम गव्हर्नर होऊन आला. त्याच्या कारकिर्दीत पोर्तुगीझ व इंग्रज यांची सुरतच्या बंदरांत लढाई झाली. त्याची हकीकत इंग्रजांच्या प्रकरणांत येईल.

**६. स. १६१२–१६४०, उतरती कळा.**—सन १६१२ त अजव्हीडो व्हाइस रॉय झाला. ह्याच्या कारकिर्दीत मोगल बादशहाचें एक मक्केस जाणारें जहाज सुरतेच्या बंदरांत पोर्तुगीझ लोकांनीं पकडिलें. त्यामुळें बादशहानें दमणास वेढा घालून पुष्कळ नासधूस केली. त्याचप्रमाणें बादशहानें वसईस वेढा घातला. तेव्हा पोर्तुगीझांनीं बादशहाशीं तह केला, (सन १६१५). इंग्रज व डच ह्यांस बादशहानें थारा देऊं नये अशी ह्या तहांत अट होती, पण ती पाळली गेली नाहीं.

ह्या वेळीं पोर्तुगीझ अंमलाची फार निकृष्ट दशा होती. त्यांस चहूंकडून शत्रु उत्पन्न झाले. राज्यव्यवस्थाही बिघडली होती. व्यापाराचा माल खरेदी करण्याकरितां जो पैसा युरोपांत जाई तो तेथील अधिकारी राज्याच्या कामास खर्चून टाकीत. इकडे बहुतेक अधिकारी सरकारचे कर्जदार असत तिजोरींत पैसा मुळींच नव्हता. मंदिरांतील संपत्ति सुद्धां सरकारी कामांत वापरली जाई. त्याच वेळेस लढाईचें तोंड ज्यास्ती लागलें. तेव्हां सन १६१४ त युरोपांतून हुकूम आला, कीं मोठमोठ्या हुद्यांच्या सर्व जागा लिलांव करून विकाव्या, आणि उत्पन्न होईल त्यांतून खर्च भागवावा. या हुकमाप्रमाणें जुने नोकर एकदम कमी करण्यांत येऊन, जो ज्यास्ती पैसा भरील त्यास त्या जागा देण्यांत आल्या. किल्ल्यांवरील मुख्य अंमलदारांच्या जागाही याचप्रमाणें विकण्यांत येऊं लागल्या. सारांश, पोर्तुगीझ लोकांची भरभराट संपून गेली. सन १६१८त जॉन कूटिनो हा व्हाइस रॉय होऊन आला आणि अजव्हीडो परत गेला. तो फार दुष्ट होता. परत गेल्यावर त्यास पोर्तुगीझ सरकारानें कैद करून अंधारकोठडींत ठेवून दिलें. कांहीं दिवसांनीं त्याची चौकशी झाली; पण चौकशीनंतर त्याची ज्यास्त नाचक्की झाली. हिंदुस्थानांत त्यानें केलेला दुष्टपणा

अवर्णनीय आहे. सिलोनांत जय मिळविल्यावर त्यानें आयांकडून त्यांचीं मुलें जात्यांत घालवून दळविलीं. शिपायांकडून कांहीं मुलें भाल्याचे टोंकावर नाचवून, त्यांचे हाल पाहून तो आनंद मानी. कित्येकांस समुद्रांत लोटून त्यांस मगरांच्या भक्ष्यस्थानीं घालवी.

कूटिनोच्या वेळेस इराण व चीन येथें पोर्तुगीझांचे पुष्कळ व्यवहार घडले. स. १६१९–२२ पावेतों आल्बुकर्क गव्हर्नरच्या व स. १६२२–२७ पावेतों फ्रॅन्सिस्को ड गामा व्हाइस रॉयच्या कामावर होता. स. १६२१त तिसरा फिलिप राजा मरण पावला; आणि चवथा फिलिप गादीवर बसला. ह्या वेळेपासून स्पेन देशासही उतरती कळा लागली. पोर्तुगीझांचें नशीब सर्व बाजूंनीं खालावलें. अलीकडे पुष्कळ जहाजें, माणसें व माल तुफानांत बुडाला. गामानें तपास करून खरी हकीकत युरोपांत कळविली. पण पुन: वर येण्याचा मार्ग कोणासच सांपडला नाहीं. धर्माधिकारी लोकांची संख्या गोव्यास व इतर ठिकाणीं गृहस्थ लोकांच्या दुप्पट झाल्यामुळें ह्यापुढे नवीन मठ बांधूं नयेत असा हुकूम सुटला. डच व इंग्रज तर मारखे पाठीस लागलेच होते. सर्वांत ज्यास्त प्राप्तीचें ओर्मझ बंदर पोर्तुगीझांच्या हातांतून गेले; अशा कठिण प्रसंगीं सुद्धां लोकांची खासगी व्यापाराची खोड चालूच होती. स्वजातीय लोकसंख्या भराभर वाढविण्याकरितां लिस्बनहून पोरक्या मुली इकडे पाठवीत, त्यांच्या नवऱ्यांस सरकारी नोकऱ्या देण्याचा ठराव असे. अमकीच्या नवऱ्यास अमक्या ठिकाणच्या गव्हर्नरची जागा द्यावयाची अशी व्यवस्था ठरलेली असल्यामुळें, त्या जागेकरितां अनेकांच्या उड्या पडत.

स. १६२८त कूटिनो जाऊन कोचीनचा बिशप ब्रिटो ह्यानें कांहीं दिवस गव्हर्नरचें काम केलें. तो १६२९त मरण पावला. नंतर मायकेल नोरोन्हा हा त्या जाग्यावर आला. डच व इंग्रज हिंदुस्थानांत वावरूं लागल्यामुळें पोर्तुगीझ व्यापार अगदीं बसला, तो वाढविण्याच्या हेतूनें राजानें एक कंपनी स्थापन केली, ह्यांत स्वतः त्यानें पुष्कळ रकम भरून शिवाय मोठमोठ्या लोकांकडून आग्रहानें रकमा घालविल्या. तसेंच हिंदुस्थानांतील गांवें वगैरे ठिकाणच्या

लोकांनीं व्यापारांत रकमा भराव्या ह्मणून हकूम केले. पण इकडे त्या कंपनींत कोणींच भांडवल घातलें नाहीं, तेव्हां ती लवकरच बुडाली. नोरोन्हाच्या खटपटीनें इंग्रजांशीं पोर्तुगीझांचें बरेंच सख्य राहिलें. डच लोकांशीं मात्र तें राहिलें नाहीं. नोरोन्हा बराच हुशार होता. परक्या शत्रूपेक्षां आपल्या लोकांकडूनच आपला नाश होत आहे हें पूर्णपणें समजून, त्याप्रमाणें तो आपल्या राजास लिहून पाठवीत असे. विशेषतः धर्मखात्याच्या जेझुइट व इतर लोकांकडून त्यास फार त्रास झाला. ते त्याचा हुकूम मानीत नसत, सरकारी पैसा उधळीत, शत्रूंशीं कारस्थानें करीत; आणि पोर्तुगालच्या राजाचे आपण अंकित नाहीं असें उघडपणें सांगत. येथें आल्यावर पुष्कळ पोर्तुगीझ लोक साधु होऊन राहात, तेणेंकरून वाटेल तीं कृष्ण कृत्यें त्यांस करतां येत. सन १६३३त फ्रेंच लोक इकडे व्यापाराकरितां आले, त्यामुळें पोर्तुगीझ सत्तेस ज्यास्तच धक्का बसला. ह्याच सुमारास मोगल बादशहा शहाजहान ह्यानें पोर्तुगीझांवर शस्त्र धरिलें. बादशहा आदिलशहाशीं लढत असतां त्यांत पोर्तुगीझांनीं आदिलशहास मदत केली, म्हणून बादशहास राग येऊन त्यानें मोठी फौज पाठवून बंगाल प्रांतांतून सर्व पोर्तुगीझांस हांकून दिलें.

स. १६३५त इंग्रजांचें लंडन नांवाचें जहाज भाड्यानें घेऊन पोर्तुगीझांनीं चीन देशास सफर केली. उद्देश हा कीं, इंग्रजांच्या नांवाखालीं तरी आपला व्यापार चांगला होईल. पण चीन देशांत अनायासें इंग्रजांनींच आपल्या वखारी घातल्या, त्या योगें वरील उपायानें उलट इंग्रजांस मदत केल्यासारखेंच झालें. स. १६३५त नोरोन्हा काम सोडून गेला आणि त्याच्याजागीं पेरू ड सिल्व्हा याची नेमणूक झाली. ह्या वेळेस तिजोरींत पैसा नसल्यामुळें राज्यावर मोठें संकट आलें होतें. सर्व व्यापार डच लोकांच्या हातांत गेला होता. सिल्व्हा स्वभावानें गरीब व साधा होता. त्याच्या हातून कांहीं बंदोबस्त न होतां डच व इंग्रज यांची सत्ता वाढतच गेली. सिल्व्हा स. १६३९त मरण पावला, तेव्हां जॉन मेंझिस हा लिस्बनाहून व्हाइस रॉयच्या जागेवर आला.

स. १६४० च्या डिसेंबरांत पोर्तुगीझ लोकांनीं स्पेनच्या विरुद्ध बंड करून फिरून आपलें राज्य स्वतंत्र केलें, आणि ब्रॅगॅन्झाचा ड्यूक चवथा जॉन ह्या नांवानें पोर्तुगालचा राजा झाला. पोर्तुगाल देशास स्वतंत्रता मिळाल्यावर तेथील राजानें डच लोकांशीं सख्य करून आपलें वर्चस्व राखण्याचा प्रयत्न केला, पण त्यांत त्यास यश न येतां पूर्वीचें सर्व वैभव गेलें. सिलोन, मलाका, मकाव हीं ठिकाणेंही त्यांच्या हातांतून गेलीं. अशा रीतीनें पोर्तुगीझांची सत्ता संपुष्टांत आली ती अद्यापि बहुधा तशीच खालावलेली आहे. सबब या पुढची त्यांची निराळी हकीकत देण्याचें प्रयोजन नाहीं. ती जरुरीपुरती इंग्रजांच्या प्रकरणांत येईल. सुमारें दीडशें वर्षेपर्यंत हिंदुस्थानांत पोर्तुगीझांचें महत्त्व राहिल्यानें या देशावर अनेक परिणाम घडून आले, त्यांची चर्चा आतां पुढील प्रकरणांत करावयाची आहे.

---

# प्रकरण सहावें.

## पोर्तुगीझ राज्याची गुणदोषचर्चा.

१. पोर्तुगीझ कारभाराचीं धोरणें. २. आरबांचा पाडाव, व्यापारवृद्धि.
३. पोर्तुगीझ व्यापाराची किफायत. ४. पोर्तुगीझांचा ऐषआराम.
५. पोर्तुगीझ लोकांचें क्रौर्य. ६. धर्मशासन–मंडळ (इन्क्विझिशन).
७. क्रिस्तीधर्मप्रसाराचे प्रयत्न. ८. या चुकांचा इतरांस झालेला फायदा.

**१. पोर्तुगीझ कारभाराचीं धोरणें.**—आरंभीं पोर्तुगीझ लोकांनीं अनेक संकटें सोशिलीं; आणि अनेक विजय संपादन केले. त्या योगानें त्यांचा व्यापार वाढून त्यांस अतिशय किफायत होऊं लागली. जहाजाचा नियमित प्रवास,

कोठें काय जिन्नस मिळतो ह्याचा निश्चय आणि पोर्तुगीझ शस्त्रांचा प्रभाव, ह्या कारणांनीं थोड्या अवकाशांत लिस्बन शहर व पोर्तुगाल देश अतिशय सधन झाला. सं. १५९५त डच लोकांनीं इकडे व्यापार सुरू केला तोंपावेतों ही भरभराट टिकली. व्यापाराकडे व पैशाकडे राष्ट्राचें लक्ष लागलें, तेव्हां राज्यकारभाराकडे दुर्लक्ष होऊं लागलें. धनलोभाच्या गुंगींत राज्यविस्ताराचे मनोरथ ढांसळून गेले.

आशियाचा व्यापार पोर्तुगालच्या ताब्यांत जाण्याचें कारण त्याचें आरमार होय. सन १४९७ पासून १६१२ चे दरम्यान हिंदुस्थानच्या व्यापाराकरितां त्यांचीं एकंदर ८०६ गलबतें उपयोगांत आलीं. त्यांपैकीं १५८० पासून १६१२ पावेतों १८६ होतीं. एकंदर जहाजांपैकीं ४२५ युरोपांत परत गेलीं; २८५ इकडे निरनिराळ्या ठिकाणीं राहिलीं; आणि ९६ तुटून व बुडून नाहींशीं झालीं. त्यांचा आकार सरासरीनें १०० पासून ५५० टन पावेतों असे. त्यांजवर तोफा असत. तोफांचा उपयोग युद्धाचे कामीं व गलबतांत वजन म्हणून होत असे. पोर्तुगालचे कारागीर आपलें कसब दाखविण्याकरितां म्हणून अवजड तारवें बांधीत, पण तीं इकडच्या सफरींत टिकत नसत. स. १५९१ पावेतों बारा वर्षांत असलीं बावीस राक्षसी जहाजें बुडून नाहींशीं झालीं. शिवाय गोवा व दमण ह्या ठिकाणच्या उत्तम सागाचीं गलबतें ते लोक बांधीत. त्यांतील कॉन्स्टांटिना नांवाचें एक जहाज १५५० त बांधिलें, त्यानें आफ्रिकेस वळसा घालून युरोपास सतरा खेपा केल्या; आणि तें पंचवीस वर्षें टिकलें.

एवढ्याशा आरमारानें १५००० मैलांचा किनारा पोर्तुगीझ लोक ताब्यांत ठेवीत ही गोष्ट अजब दिसते. परंतु या आरमारास प्रतिस्पर्धी कोणी नव्हता. सोयीस वाटेल अशाच ठिकाणावर व सोयीस वाटेल तेव्हांच, सगळ्या आरमारानिशीं ते हल्ला करीत. जय झाला तर त्या ठिकाणाचा कबजा घेऊन तेथें फौज ठेवीत; पराजय झाला तर क्रूर कृत्यांनीं दहशत बसवून ते लागेच पळून जाऊन क्षितिजाखालीं समुद्रांत दडी मारीत. आशियाच्या किनाऱ्यावरील लोकांस अचंबा वाटे, कीं हा शत्रु समुद्रांतून गुप्तपणें येतो केव्हां, व नाहींसा

होतो केव्हां. त्याच्या संचाराचा त्यांस अंदाज करितां येत नसे. असा भयंकर सूड घेणारा व शूर शत्रु आशियांतील लोकांस पूर्वी कधीं ठाऊक नव्हता. किनाऱ्याकिनाऱ्यानेंच त्यांनीं आपलीं ठाणीं बसविल्यामुळें पोर्तुगालचा ऱ्हास झाल्यावरही राज्याचें संरक्षण करण्यास वरील थोडीशी तयारी पुरे होती. जोंपर्यंत त्यांच्याच तोडीच्या दुसऱ्या आरमाराचा इकडे संचार झाला नव्हता, तोंपर्यंत त्यांची सरशी होती. परंतु युरोपियन राष्ट्रें इकडे येऊं लागतांच, पोर्तुगीझ सत्ता लयास गेली; तथापि एवढ्यावरून पोर्तुगीझांचें शौर्य व कसब कमी होतें असें समजावयाचें नाहीं. सन १५१४ त इमॅन्युएल राजानें तांबडा-समुद्र व इराणचें आखात येथील बंदरें, त्यांतील अंतरें, व वरच्याच्या जागा ह्यांची तपासणी करण्यास हुकूम दिला, तेव्हांपासून सामुद्रिक शोध सुरू झाले; आणि पुढील शंभर वर्षांत पोर्तुगीझ लोकांनीं नाना प्रकारची अत्यंत उपयुक्त माहिती जमा केली. ह्या माहितीचा त्यांस युद्धाचे कामीं फारच उपयोग झाला. तांबड्या समुद्राचें नाकें, सीलोनचा कांठ व मलाकाची सामुद्रधुनी ह्या तीन ठिकाणीं मजबुदी केल्यानें सर्व किनाऱ्यावर त्यांस देखरेख ठेवतां येऊं लागली. एडन ताब्यांत येईना म्हणून त्यांनीं दीव बेट काबीज केलें. त्याचा त्यांस उत्कृष्ट उपयोग झाला. कारण तांबडासमुद्र व इराणचें अखात ह्या बाजूनें कोणतेंही गलबत हिंदुस्थानाकडे येऊं लागलें तर त्याजवर दीव येथून शह ठेवितां येत असे. ह्याप्रमाणें दीव, सीलोन व मलाका ह्या तीन ठिकाणांच्या कबजानें मसाल्याचा सर्व व्यापार त्यांच्या ताब्यांत आला. एवढी कमाई करितांना पोर्तुगीझ वीरांनीं अप्रतिम शौर्य दाखविलें असून त्यांच्या अनेक शूर पुरुषांची युद्धकरामत कोणत्याही इतिहासांत वाखाणण्यासारखीच समजली जाईल.

पण त्यांची भिस्त केवळ शौर्यावरच नव्हती. मागील हकीगतींवरून हे उघड आहे कीं, किनाऱ्यावरील हिंदी राजांचीं भांडणें व गोंधळ चालत, त्यांत हात घालून कोणास मदत, कोणाशीं युद्ध किंवा सख्य वगैरे करून पो० लोक आपला कार्यभाग साधीत. दुसऱ्याचे भांडणांत शिरून आपला फायदा करून घेण्याची ही युक्ति पुढें इतरांनीं उचलिली. एतद्देशीय लोकांची फौज तयार

करून व एतद्देशीय राजांच्या भांडणांचा फायदा घेऊन उद्योग केला असतां हिंदुस्थानांत राज्य स्थापन करितां येईल, ही कल्पना डुप्ले यास सुचली असें इतिहासकार लिहितात. पण डुप्लेच्या पूर्वी दोनशें वर्षे हा प्रयोग पोर्तुगीझ लोकांनीं प्रत्यक्ष करून दाखविला. वास्तविक हा प्रयोग प्रथम आल्बुकर्कनेंच केला असें ह्मणतां येईल. ही गुरुकिल्ली शोधून काढण्याचें कारणच नव्हतें. युरोपियन लोकांनीं आशिया खंडांत पाऊल ठेवल्याबरोबर हा प्रकार अपरिहार्य होता. हिंदुस्थानांत एकछत्री अंमल असा मोगलांचा झाला. मोगलांचे पूर्वी पन्नास वर्षे पोर्तुगीझ लोक हिंदुस्थानांत आले, त्या वेळीं ह्या देशांत जिकडे तिकडे अंदाधुंदी असल्यामुळें, त्यांजशीं टक्कर देण्यास सामर्थ्यवान व मध्यवर्ती सत्ता हिंदुस्थानांत नव्हती. यामुळ पोर्तुगीझांचें साधलें. परंतु मोगलांचें प्रबळ राज्य इकडे दोनशें वर्षे होतें, त्या अवधींत परकीयांचा जोर चालला नाहीं. तें राज्य मोडकळीस येतांच इंग्रज लोक राज्यप्राप्तीच्या उद्योगास लागले, तेव्हां पोर्तुगीझांप्रमाणें त्यांचाही जय होत गेला. कोणत्याही राष्ट्रास स्थायिक राज्यव्यवस्थेची केवढी आवश्यकता आहे हें यावरून कळून येतें.

२. **व्यापारवृद्धि व आरबांचा पाडाव** —पोर्तुगीझ लोक हिंदुस्थानांत आले, ती वेळ त्यांस अतिशय फायदेशीर होती. त्या वेळीं देशांत अस्वस्थता व दांडगाई चालू होती. तसेंच ज्या मलबार किनाऱ्यावर ते उतरले, ती जागाही त्यांस फार सोयीची होती. मलबारचा प्रदेश तुटक असल्यामुळें हिंदुस्थानांतील इतर भागांचें त्यास साह्य नव्हतें, आणि तेथें काय चाललें आहे याची बाहेर कोणास परवाही नव्हती. हजारों वर्षे परकीय व्यापाऱ्यांची हालचाल व देवघेव या किनाऱ्यावरून चालू असल्यामुळें, नवीन आलेले पोर्तुगीझ व्यापारी येथें राज्य कमावण्याच्या व स्वधर्मस्थापनेच्या उद्योगास लागतील असें येथील लोकांस वाटलें नाहीं. क्रिस्ती, ज्यू, मुसलमान वगैरे अनेक परकीय व्यापाऱ्यांस आपल्या येथें नांदूं दिल्यापासून आपला फायदाच आहे अशी त्यांची समजूत होती. हा समज पोर्तुगीझांच्या फार उपयोगी पडला. मलबार किनाऱ्यावरील सर्व हिंदी राजे परकीयांस ममतेनें वागवीत असत.

त्यांच्या धर्माचारांत हात न घालतां उलट ते त्यांस पूर्णपणें पाळूं देत. ख्रिस्ती शकाच्या तिसऱ्या शतकांत रोमन बादशहानें आपले दोन वकील मलबारांत कायमचे ठेवून दिले होते.

सेंट टॉमस नांवाचा सिरियांतील एक ख्रिस्ती साधु आपला धर्म शिकवीत हिंदुस्थानांत फिरत होता. इ० स० ६८ त मद्रासेजवळ त्याचा वध झाला. त्या वेळीं त्याचे अनुयायी पूर्व व पश्चिम किनाऱ्यांवर पुष्कळ झालेले होते. कैक शतकें मलबारांत ख्रिस्ती लोकांचें कायमचें वास्तव्य होतें. याच ख्रिस्ती लोकांस येथील राजांनीं राजकीय हक्कांचे लेख करून दिले त्यांचा उल्लेख मागें आला आहे. मलबारांतील नायर लोकांच्या बरोबरीनें या सेंट टॉमसच्या शिष्यांस मान मिळत असे. मलबारच्या हिंदी लष्करांतही ख्रिस्ती लोक असत. विजयनगरच्या नोकरींत ख्रिस्त्यांचा भरणा मोठा होता. सन १४४२त एक ख्रिस्ती गृहस्थ विजयनगरच्या राजाचा मुख्य प्रधान होता. ख्रिस्त्यांप्रमाणेंच मलबारांत मुसलमानांचेंही प्राबल्य होतें हें मागें सांगितलेंच आहे.

ह्या कारणांमुळें पोर्तुगीझ लोकांचा मलबारांत सहज प्रवेश होऊन त्यांची व्यापारांत मोठी भरभराट झाली. पहिल्याच खेपेस त्यांनीं जो माल युरोपांत आणिला, त्याचें उत्पन्न खर्चाच्या साठपट आलें. हें पाहून पोर्तुगालचा राजा व लोक ह्यांचें एवढें मोठें नशीब एकदम उघडल्याबद्दल युरोपचीं राष्ट्रें आश्चर्यचकित झालीं. पोर्तुगीझ सरकारानें हा व्यापार आपल्याच ताब्यांत ठेविला खरा, तथापि कांहीं शरतींवर वाटेल त्या ख्रिस्ती राष्ट्रास लिस्बन येथें, आपलीं गलबतें पाठवून व्यापार करण्याची सवलत ते देत असत. ह्या सवलतीचा फायदा पहिल्या पन्नास वर्षांत इंग्रज व्यापाऱ्यांनीं पुष्कळ करून घेतला. पोर्तुगालच्या राजानें दोन चार वेळ हिंदुस्थानास आरमारें पाठविल्यावर त्याची अशी खात्री झाली, कीं मलबार किनाऱ्यावरील पांच सहा बंदरांत माल भरून युरोपांत आणल्यास आपला व्यापार शांतपणें चालेल. परंतु असें न करितां मुख्य बंदर जें कालिकोट तेथेंच सर्व व्यापार करावयाचा असेल, तर आरब लोकांवर शस्त्र धरून त्यांचें प्राबल्य नाहींसें केलें पाहिजे.

ह्यांपैकीं दुसरा मार्ग इमॅन्युएल राजानें स्वीकारिला. पोर्तुगीझ सरदार काब्रालनें कोचीन येथें पहिली वखार स्थापन केली. तिच्या संरक्षणार्थ वास्को ड गामाच्या हाताखालीं राजानें एक मोठें आरमार पाठविलें. वास्को ड गामाची पहिली सफर नवीन प्रदेश शोधून काढण्यापुरतीच होती. पण ह्या दुसऱ्या सफरींत त्याला मलबारकिनाऱ्यावर व्यापाराची कायमची स्थापना करावयाची होती. दोनहीं कामें गामानें चांगलीं तडीस नेलीं. इ. स. १५०२त त्यानें कालिकोटचा पाडाव करून आरबांचें एक आरमार नाहींसें केलें; आणि कोचीन, काननूर, कोलम व भटकळ ह्या चार बंदरांत व्यापार सुरू करून, पैकीं दोन ठिकाणीं वखारी ठेविल्या. त्या वखारींच्या संरक्षणाकरितां कांहीं जहाजें त्यानें ठेवून दिलीं. काननूरच्या वखारींत त्यानें कांहीं तोफा व दारूगोळा ठेवून दिला होता. परंतु हें त्याचें कर्तृत्व त्याच्या दुष्ट व क्रूर कृत्यांनीं पूर्ण झांकून गेलें आहे. पुढील दोन तीन वर्षांत पोर्तुगीझ लोकांनीं उघडपणें युद्धाची तयारी करून आरबांचा नाश केला आणि मलबार किनाऱ्यावर आपली मजबुदी केली.

अल्पावधींत एवढा प्रचंड विजय प्राप्त झाल्याचें उदाहरण इतिहासांत फारसें नाहीं. नवीन प्रदेश शोधून काढण्यांत पोर्तुगीझ राष्ट्राची विलक्षण शक्ति जगाच्या निदर्शनास आली. त्या योगानें मुसलमानांचाच व्यापार बुडाला असें नाहीं, तर व्हेनिस, जिनोआ वगैरे भूमध्यसमुद्रावरील राष्ट्रांचाही व्यापार बुडाला. हिंदुस्थानांत पोर्तुगीझांचें राज्य स्थापन झाल्यानें मोठीच जबाबदारी इमॅन्युएल राजाच्या अंगावर येऊन पडली. हें राज्य कायमचें राखण्यास दरएक गव्हर्नरास मर्जीप्रमाणें वागूं देणें उपयोगी नाहीं, कायमची व्यवस्था ठरविली पाहिजे, असें राजास कळून आल्यावरून त्यानें आल्मीडा यास गव्हर्नर नेमून पाठविलें. त्याचा झगडा आरबांशीं सुरू झाला. ह्या झगड्यांत पोर्तुगीझांचा टिकाव लागावयाचा नाहीं असें पोप व कित्येक क्रिस्ती राष्ट्रांस वाटत होतें. पण इमॅन्युएल राजाला मात्र तसें वाटलें नाहीं. त्यानें धिटाईनें प्रयत्न चालविले व अखेरीस त्यास यश आलें. आल्मीडा व

त्याचा पराक्रमी मुलगा ह्यांनीं आरबी समुद्रांत मुसलमानांचा चांगलाच पराभव केला, त्यामुळें शंभर वर्षेपावेतों त्या समुद्रावर पोर्तुगीझांचाच ताबा होता. मुसलमानही इजिप्ट जिंकण्याच्या कामास लागल्यामुळें, त्यांस आरबी समुद्राकडे लक्ष देण्यास फावलें नाहीं.

ह्या कामांत इमॅन्युएल राजानें मोठी धूर्तता दाखविली. सुदैवानें त्याची कारकीर्द बरींच वर्षे टिकली. इ. स. १५०० पासून १५०५ पर्यंत पहिल्या पांच वर्षांत मलबार किनाऱ्यावरील व्यापार त्याच्या ताब्यांत आला; पुढील पांच वर्षांत आरबी समुद्रावर त्याची सत्ता कायम झाली, आणि त्यापुढील पांच वर्षांत आल्बुकर्कच्या हस्तें पश्चिम किनाऱ्यावर लहानसें राज्य स्थापन झालें.

आल्बकर्कनें स. १५०३–४ त इकडे पहिला सफर करून परत गेल्यावर सर्व हकीगत राजास सांगितली. पुनः स. १५०७त तो तांबड्या समुद्राचें नाकें मुसलमानांचे ताब्यांतून घेण्यासाठीं एक आरमार घेऊन इकडे आला. प्रथम त्यानें सोकोट्रा काबीज केलें. तेथें मुख्य वस्ती मुसलमानांची असून थोडेसे क्रिस्तीही होते. बेट काबीज केल्यावर मुसलमानांच्या जमिनी घेऊन त्यानें क्रिस्ती रहिवाश्यांस दिल्या; आणि त्यांस रोमन कॅथोलिक पंथाची दीक्षा दिली. पुढें ओर्मझ येथें आपला शह बसवून आल्यावर १५०९त त्यास गव्हर्नरची जागा मिळाली. हा कारभार सहा वर्षे करून त्यानें पोर्तुगीझ सत्ता कायम केली. मुसलमानांचा द्वेष आल्बुकर्कच्या मनांत इतका बिंबला होता कीं, इजिप्टच्या सुलतानाचा प्रदेश नापीक व्हावा ह्मणून नील नदीचा प्रवाह फिरवून तांबड्या समुद्रांत आणावयाचा, आणि मक्का येथील महंमदाची कबर खोदून मुसलमानांचा पाया नाहींसा करावयाचा, अशा खुळ्या कल्पनाही त्याच्या मनांत घोळत होत्या. गोवा, ओर्मझ व मलाका काबीज केल्यानें मुसलमानांस इकडे येण्यास वावच राहिला नाहीं. पोर्तुगालसारख्या सुमारें दहा लाख वस्तीच्या लहानशा राष्ट्रानें आफ्रिकेपासून मलाकापावेतोंचा सात आठ हजार कोस लांबीचा किनारा ताब्यांत घेऊन शंभर वर्षे सर्व मुसलमानांशीं टक्कर मारली हें कृत्य लहान नव्हे.

हा झगडा दोन धर्मांचा होता. आल्बुकर्कच्या मनांत मुसलमानी धर्म नाहींसा करून कॅथोलिक धर्म वाढवावयाचा होता. मुसलमानांच्या मनांतही क्रिस्त्यांचा द्वेष पूर्ण वागत होता. हिंदुस्थानांतील व इजिप्टमधील मुसलमान व सर्व तुर्क लोक ह्या मोठ्या झगड्यांत सामील झाले होते. आल्बुकर्क मरण पावल्यावर कित्येक वर्षेपर्यंत तुर्क लोकांनीं पोर्तुगीझांचा चांगलाच समाचार घेतला. दीव, मस्कत, मलाका, वगैरे ठिकाणीं तुर्क आरमारें एकसारखीं पोर्तुगीझ लोकांशीं झगडत होतीं. व्हेनिशन लोकांची मदत आरबांस होती. स्वार्थाची गोष्ट आली म्हणजे स्वजाति व स्वधर्म कसा बाजूस राहतो, ह्याचें हें एक उदाहरण आहे. स. १५८०त स्पेन व पोर्तुगाल देश एकत्र झाले, तेव्हांच क्रिस्ती लोकांची इकडे थोडीशी सरशी झाली. 'माझ्याजवळ मागा, म्हणजे मी तुम्हांस सर्व भिन्न धर्मी लोक व पृथ्वीवरील दूरदूरचे प्रदेश तुमच्या ताब्यांत आणून देईन,' असे जे बायबलांत येशू क्रिस्ताचे शब्द आहेत ते आतां खरे झाले, असें सोळाव्या शतकांतील लोकांस वाटलें. धर्माच्या कामांत मुसलमान लोक जुलूम करणारे असून क्रिस्ती तसे नाहींत, असें कोणास वाटत असेल, तर तो इतिहास आपणांस समजला नाहीं असें म्हणावें लागेल. धर्माचा पडदा मध्यें ठेवून व्यापार व संपत्ति मिळविण्याचा हेतु क्रिस्ती राष्ट्रांच्या मनांत होता. इमॅनुएल राजानें स. १५०० त काब्रालच्या आरमाराबरोबर कित्येक पाद्री इकडे पाठविले तेव्हां त्यांस खालील ताकीद त्यानें दिली होती. 'मुसलमानांवर व परधर्मीयांवर तलवारीचा हल्ला करण्यापूर्वी, ह्या पाद्र्यांनीं आपली धर्माची गोळी त्यांजवर प्रथम चालवून पाहवी, म्हणजे त्यांनीं त्यांस बायबलाचा उपदेश करून, त्यांस क्रिस्ती धर्म स्वीकारण्यास सांगावें; आणि ही गोष्ट ते नाकबूल करतील तर, व व्यापाराची देवघेव करण्यास ते उत्सुक नसतील, तर त्यांजवर तलवार व बंदुकीची गोळी यांचा प्रयोग करून त्यांचा पाडाव करावा'. धर्माचें व सुधारणेचें नांव पुढें करून युरोपियन राष्ट्रें पृथ्वीवर दिग्विजय गाजवीत आहेत, त्याच्या मुळाशीं स्वार्थ आहे हें हंटरसारखे इतिहासकारही कबूल करितात.

एकाद्या राजास किंवा अधिकाऱ्यास जिंकल्यावर त्यानें पोर्तुगाळच्या राजास शरण जाऊन वखार व किल्ला बांधण्यास जागा द्यावी, व सालीना खंडणी देऊन शिवाय फौजेचा खर्च द्यावा, अशा प्रकारचे तह सामान्यतः जिंकलेल्या राजापासून पोर्तुगीझ अधिकारी करून घेत असत. तांबड्या समुद्रापासून तों मोलक्कापर्यंतच्या किनाऱ्यावरील सर्व अधिकाऱ्यांशीं अशा प्रकारचे तह त्यांनीं केलेले आहेत. ह्या तहांचा परिणाम असा होई, कीं बंदरांत येणाऱ्या पोर्तुगीझ जहाजांवर करांची माफी असून जकातीचा वसूल पोर्तुगालच्या राजाकरितां घेण्यांत येई. कालिकोटचा सामुरी विशेष प्रबळ असल्यामुळें त्यास ताब्यांत आणण्यास पुष्कळ वेळ लागला. कोचीनच्या राजास आरंभीं गोड गोड वचनें देऊन शेवटीं त्यांनीं त्यास तोंडघशीं पाडिलें. कोलम येथें तर त्यांस मुळींच प्रयास पडले नाहींत. इराणच्या अखातांतील ओर्मझ असेंच त्यांच्या ताब्यांत आलें. एडनवरही थोडाबहुत शह बसला. पश्चिमेकडे मुसलमानांचें थोडेंबहुत प्राबल्य होतें. पण पूर्वेकडे पोर्तुगीझ प्रबळ झाले. मलबारकिनाऱ्यावरील मिरीं व सुंठ, सिलोनची दालचिनी व पूर्वद्वीपकल्पांतील लवंग व जायपत्री हे जिन्नस सर्वस्वी त्यांच्या मालकीचे झाले. सन १५६४त सर्व मोलक्का प्रांत पोर्तुगीझ राज्याखालीं आला.

पोर्तुगीझांनीं इकडील राजाशीं केलेले तह पुढें इंग्रज ईस्ट इं. कंपनीस बरेच नडले. कारण पोर्तुगीझांस दुखविल्याशिवाय कंपनीस आपले व्यवहार तडीस नेतां येईनात. पोर्तुगीझांची सगळी भिस्त आरमारावर असल्यामुळें, इकडील राजांनीं लढाऊ जहाजें व दारुगोळा बाळगूं नये, असें त्यांच्या तहांत नेहमीं एक कलम असे.

**३. पोर्तुगीझ व्यापाराची किफायत.**—हिंदुस्थानांत राज्य स्थापन करून तें राखण्याच्या उद्योगास लागणारा खर्च भागविण्याचें सामर्थ्य पोर्तुगीझ राष्ट्रास नव्हतें. पण व्यापारांत त्यास विलक्षण किफायत होत असल्यामुळें त्यास अशीं कामें करतां आलीं. ह्या किफायतीचा अंदाज करणें कठीण आहे. आरमाराचा खर्च तरी केवढा होता पहा. शंभर वर्षं ८०६ गलबतें या कामांत

खपत होतीं. एक गलबत बांधण्याचा व त्यांवरील कप्तान व खलासी ह्यांचा एका सफरीचा खर्च सुमारें ४०७६ पौंड म्हणजे पन्नास हजार रुपये असे. वरील संख्येंत हिंदुस्थानांत बांधिलेल्या व शत्रूंपासून काबीज केलेल्या गलबतांचा समावेश नाहीं. तीं धरल्यास पोर्तुगीझ व्यापाराच्या ह्या शंभर वर्षांत एक हजार गलबतें खपत होतीं असें म्हणतां येईल. दरसाल वीस गलबतें भरून माल पोर्तुगाल देशास जात असे. वास्को ड गामाच्या पहिल्याच सफरीचें उत्पन्न खर्चाच्या साठपट आलें असें लिहिलेलें आहे. काब्रालनें स. १५०१ त मसाले, सुगंधी द्रव्यें, चिनी भांडीं, मोतीं व जडजवाहीर वगैरे माल भरून स्वदेशीं नेला. अशा प्रकारचा मौल्यवान माल दरखेपेस किती जात असे ह्याची गणतीच नाहीं त्याचें थोडें बहुत वर्णन दरसफरींत आलें आहे. ह्याशिवाय हिंदुस्थानांत बंदरोबंदरीं व्यापार चाले तो वेगळाच; त्यांत किफायतीचा मुख्य जिन्नस अफू असे. एका गलबतांतून युरोपांत जो माल जाई, त्याचें उत्पन्न सरासरी अदमासानें एक लक्ष पौंड म्हणजे पंधरा लक्ष रुपये असे. ह्यांत मोती किंवा जवाहीर धरलेलें नाहीं; कारण अस्सल यादीशिवाय जडजवाहिराची किंमत गणतां येणें शक्य नाहीं. तसेंच गोव्यापासून चीनजपानपावेतों माल नेण्याचें एका गलबताचें भाडेंच २२॥ हजार पौंड म्हणजे सव्वादोन लक्ष रुपये होई आणि गोव्यापासून मोझांबीक पावेतों ५४ हजार रुपये होई. ह्या शिवाय प्रत्येकाचें खासगी व्यापाराचें उत्पन्न येई तें निराळेंच. चांचेपणाचें उत्पन्न आणि परकीयांचीं पकडलेलीं गलबतें व माल लिलांवानें विकल्याचें उत्पन्न सांगतां येण्याजोगें नाहीं. पण एका कप्तानानें दोन वर्षांच्या अवधींत अशा धंद्यावर ११ लक्ष रुपयांची कमाई केल्याचा दाखला आहे. किनाऱ्यावरच्या रजवाड्यांकडील खंडण्या, आणि गोवा, दीव व मलाका येथील जकातीचें उत्पन्न दरसाल १२ लक्ष रुपये असे. खंडणी, जकात व सरकारी जहाजांनीं मिळविलेली लूट ह्यांत पोर्तुगालच्या राजाचा सालिना हिस्सा २२॥ लक्ष रुपये असे; ह्यापेक्षां तो ज्यास्त असला पाहिजे होता, पण अधिकारी मध्येंच पुष्कळसें उत्पन्न लांबवीत. शिवाय पोर्तुगालच्या राजास हिंदुस्थानां-

तून दरसाल सुमारें साडेपंधरा लक्ष रुपये वसूल येत असे.* ह्यापेक्षां ज्यास्त रक्कम पोर्तुगीझ सरकारास मिळाली असती, पण अनेकांच्या हातून तो व्यवहार घडावयाचा असल्यामुळें, त्यांत प्रत्येकाचा हिस्सा असे. आपल्या लोकानीं व्यापार वगैरे करून फायदा मिळवावा अशी पोर्तुगीझ सरकारचीही इच्छा होती. परंतु अशा व्यापारांत अनेक संकटें असल्यामुळें सरकारच्या मदतीशिवाय एखाद्या नवीन ठिकाणी एकट्या दुकट्यास खासगी व्यापार सुरू करणें शक्य नव्हतें. मसाल्याच्या व्यापाराचा मक्ता, दरसाल साडेचार लक्ष रुपये घेण्याच्या करारानें व इतर जिन्नसांचा १५ लक्ष घेण्याच्या करारानें, पोर्तुगालच्या राजानें व्यापाऱ्यांस दिलेला होता. ह्या रकमा वरील २२॥ लक्षांत मिळविल्या असतां राजाची सालिना प्राप्ति ४२ लक्ष रु० होत असे. इतका फायदा होई तो सर्व लष्कराकडे खर्च होई. शिवाय खासगी व्यापाऱ्यांस सरकारांतून उत्तेजन मिळाल्यामुळें, त्यांजवर सरकारची देखरेख न राहतां, स्वतःच्या फायद्याकरितां ते सरकाराचें व लोकांचें वाटेल तें नुकसान करीत असत. सरकाराकरितां बंदरोबंदरीं माल खरेदी करणें तो ते लोक वाटेल तितका महाग घेत, आणि स्वतःचा माल मात्र लोकांवर जुलूम करून स्वस्ताईनें घेत. 'जोंपर्यंत कप्तान व इतर अधिकारी यांस खासगी व्यापार करण्याची मुभा आहे, तोंपर्यंत तुमच्या फायद्याकडे कोणीच लक्ष देणार नाहीं,' अशा आशयाचीं पत्रें इकडून पोर्तुगालच्या राजास वारंवार जात असत. कोणत्याही दरबारांत पोर्तुगीझ वकील ठेविला असतां तो सदा आपली पिशवी भरण्याचे नादांत असल्यामुळें पोर्तुगीझ सरकाराचें वजन राहत नसे. गलबतांचे अधिकारी प्रथम आपला माल विकून मग सरकारी मालाची व्यवस्था करीत. सन १५३० त एका कप्तानानें मलबारांतून बंगाल्यांत सफर केली, तींत त्याचें स्वतःचें उत्पन्न २४,५०० रु० व सरकाराचें उत्पन्न फक्त ७८० रुपये झालें. अशीं उदाहरणें पुष्कळ आहेत. सहज एकाद्या सफरींत नशिबानें कोणास इतका फायदा होई कीं त्याचें जन्माचें दारिद्र्य जाई. केव्हां केव्हां कसुरीबद्दल कोणाचा पगार अटकावला

* **टीप.**—हे आंकडे दहा रुपयांस एक पौंड ह्या भावानें धरले आहेत.

गेल्यास, तो पुढील सफरींत आपलें नुकसान इतकें भरून काढी, कीं पगार अटकाविल्याबद्दल त्यास खंती वाटत नसे. एकाद्या भांडखोर्‍या नातेवाइकानें अगर राखेनें मागणी केली असतां, त्याचें तोंड बंद करण्यास पोर्तुगालच्या राजास असली एकादी सफर पुरे होत असे. अशा गोष्टींनीं राज्याचा नाश मात्र लवकर झाला. व्यापारांत फायदा होतो, लढाईत विनाकारण खर्च होऊन जीव जाण्याचा संभव आहे, असे विचार प्रत्येकाच्या मनांत आल्यामुळें शत्रु आला असतां राज्याचा बंदोबस्त करण्यास कोणी तयार नसे. अशा स्थितींत आरंभाचा भपका संपल्यावर प्रत्यक्ष गव्हर्नरचेंही काम करण्यास कोणी धजत नसे. खासगी व्यापार बंद करण्याचे पोर्तुगीझ सरकारानें थोडे प्रयत्न केले असें नाहीं, पण वाळूच्या बांधाचें एक भोंक बंद करावे, तों दुसरें पडतें, तशांतला प्रकार झाला. प्रत्यक्ष लिस्बन येथील इंडियन कचेरींत जो अन्याय चाले तो सुद्धां पोर्तुगीझ सरकारास बंद होईना, मग हिंदुस्थानांतला कोठून होणार !

स्पेन व पोर्तुगाल हे दोन देश एकत्र झाल्यापासून किंवा स. १५४८ त डॉन कॅस्ट्रो मरण पावला तेव्हांपासून हिंदुस्थानच्या पोर्तुगीझ लोकांची भरभराट खुंटली. आल्बुकर्कसारखा धोरणी व पराक्रमी पुरुष पुनः इकडे कोणी आला नाहीं; किंवा त्याच्या भव्य कल्पना अंमलांत आणून त्यानें घातलेल्या पायावर मोठी इमारत उभारण्याचें कामही कोणीं केलें नाहीं. स. १५९५ पर्यंत व्यापारामध्यें त्यांची सरशी होती. त्या सालीं डच लोक मध्यें आले, आणि पोपानें जी मर्यादा पोर्तुगीझांस घालून दिली होती, ती त्यांनीं मोडली, तेव्हांपासून व्यापारांतही पोर्तुगीझ लोक खालावले.

पोर्तुगीझांचा व्यापार मोडण्याचीं कारणें अनेक झालीं. पहिलें, स्पेन व पोर्तुगाल हीं दोन राष्ट्रें स. १५८०त एका राजाच्या ताब्यांत गेलीं, तरी दोहोंचा कारभार पृथक् ठेवावा असें ठरलें होतें. स. १६०४ त इंग्लंड व फ्रान्स ह्यांचा तह झाल्यावर हॉलंड व स्पेन ह्यांचें युद्ध चालू झालें, त्यांत हिंदुस्थानांतील व्यापाराची पोर्तुगालची सर्व किफायत स्पेनकडून खर्च होऊं लागली; आणि मालाची खरेदी करण्यास पैसा उरेनासा झाला. दुसरें, डच व

इंग्रज पूर्वेकडील समुद्रांत संचार करूं लागल्यामुळें पोर्तुगीझांचें नुकसान होऊं लागलें. तें बंद करण्यासाठीं इंग्रज व डच ह्यांजप्रमाणें पोर्तुगीझांनींही कंपनी स्थापण्याचा स. १६३०त प्रयत्न केला; पण तो सिद्धिस गेला नाहीं. स. १६३५त पुनः एक असाच प्रयत्न विफल झाला. ह्याप्रमाणें सरकाराचे प्रयत्न विफल होऊं लागले, म्हणून खासगी व्यापार तरी वाढावा ह्या हेतूनें दालचिनीशिवाय इतर जिनसांचा व्यापार पाहिजे त्यानें करावा असा हुकूम स. १६४२त पोर्तुगीझ सरकारानें काढिला; आणि धर्मसंबंधांत लोकांवर जुलूम झाला तर, पो०ची मिळकत जप्त करूं नये असाही हुकूम फरमाविण्यांत आला. पण ह्या युक्त्यांचा कांहीं एक उपयोग झाला नाहीं. स. १६५३तील एका लेखावरून गोव्यास जकातीचें उत्पन्न मुळींच नव्हतें असें दिसतें

पुढें स. १६९९त गोव्यास एक कंपनी स्थापण्यांत आली; पण स. १७०१त मोंबासा पोर्तुगीझ लोकांच्या ताब्यांतून गेल्यामुळें, ती मोडली. असेच आणखी कांहीं प्रयत्न झाले. काउंट एगा हा इ. स. १७५६ पासून स. १७६७ पर्यंत हिंदुस्थानांत पोर्तुगीझ व्हाइस रॉय होता, त्यानें ह्या व्यापाराचें नुकसान भरून काढण्याचे अनेक प्रयत्न केले.

**४. पोर्तुगीझ लोकांचा ऐषआराम.**—पोर्तुगीझांचें हिंदुस्थानांतील वैभव क्षणभंगुर होण्यास अनेक कारणें घडून आलीं, तीं समजून घेण्यासारखीं आहेत. त्यांत गोव्यास व इतर ठिकाणीं त्यांची जी राहणी होती तीच त्यांच्या नाशास कारण झाली.

पोर्तुगीझ लोकांच्या वेळचें गोव्याचें वैभव हल्लीं नाहींसें झालें आहे. हल्लींचें शहर हें नवीन आहे, त्यासच पणजी असें म्हणतात. ह्या नव्या शहरांत गव्हर्नराची वस्ती स. १७५९ त झाली. जुन्या शहराचें बंदर नदीच्या गाळानें भरून गेल्यामुळें हें नवें वसविण्यांत आलें. त्या जुन्या गोव्याचें वैभव पोर्तुगीझांच्या ऐन अमदानींत अप्रतिम होतें. एलिझाबेथ राणीच्या वेळेस लंडनच्या व्यापारांस तें ' सोन्याचें गोवा ' ह्या नांवानें माहीत होतें. " ज्यानें गोवा पाहिलें, त्यानें लिस्बन पाहण्याची जरूर नाहीं " अशी पोर्तुगीझ भाषेंत

म्हण आहे. व्यापारानें तें धनाढ्य झालें असून शिवाय लष्करी भपका व धर्माधिकाऱ्यांचा डामडौल तेथें अतोनात माजला होता. लोक आपलीं सर्व कामें गुलामांकडून करून घेत. तसेंच घरंदाज पोर्तुगीझानें कोणताही धंदा करणें प्रतिष्ठित समजलें जात नसे. त्यांच्या बायकांनींही घरांतील कामें करणें प्रशस्त नसे. लष्कर, धर्मखातें, सरकारी नोकरी व थोडा बहुत समुद्रावरील व्यापार, ह्यांशिवाय इतर कोणताही धंदा पोर्तुगीझ लोक स्वतः करीत नसत. लष्करी डामडौलाच्या भरांत त्या लोकांस अनेक उपयुक्त धंद्यांचा तिरस्कार वाटूं लागल्यामुळें, ते आळशी व व्यसनाधीन झाले. आळशी पुरुषांच्या झुंडी रस्त्यांतून व जुगारीच्या अड्ड्यांत हिंडतांना दिसत आळशी बायकांचे समाज पडद्यांत बसून खुशालचंद बनले होते. जुगाराच्या अड्ड्यांपासून सरकारास कर मिळत असून तेथें सर्व प्रकारची चैन चाले. नाच, गाणें, जादुगिरी, नट, खुषमस्करे इत्यादिकांचा तेथें सुकाळ असे. बायकांस पुरुषांत जाण्याची मनाई असल्यामुळें, त्या पडद्यांत बसून, गाणें, खेळणें, भांडणें, गप्पा मारणें, खुष-मस्कऱ्यांची व गुलामांची थट्टा करणें, इत्यादि प्रकारच्या चैनींत कालक्रमणा करीत, आणि उष्णतेच्या दुःसहतेमुळें केवळ अर्धनग्न राहत असत. अर्थात् एक युरोपियन जनानखानाच इकडे निर्माण झाला. त्या स्त्रिया कपटविद्येंत निष्णात बनल्या. नवऱ्यांशीं कपट लढवून अगर त्यांस गुंगीचें औषध पाजून आपला प्रीतिव्यवहार यथेच्छ चालविण्यांत त्या स्त्रियांची मजल इतकी वाढली कीं, ‘गोवेकरीण’ हा शब्दच त्याची साक्ष अद्यापि देतो. प्रार्थनेकरितां मंदिरांत वगैरे जाणें झाल्यास ह्या बाया मोठा थाट करीत असत. त्यांचा पोषाख भरगच्चीचा असून, मोत्यें, हिरे, माणकें वगैरेंनीं मढविलेला असे. डोक्यांत, दंडांत, हातांत व कमरेंत नाना प्रकारचे मोलवान दागिने त्या घालीत; आणि डोक्यावरून पायांपर्यंत अत्यंत पातळ वस्त्राचा बुरखा घेत. अशा थाटानें त्या भरगच्चीच्या म्यान्यांत बसून व बरोबर पाहरा घेऊन मंदिरांत जात. पायांत मोजे न घालतां मोत्यांनीं मढविलेले सपाट ( स्लिपर्स ) घालीत, त्यांची मागची टांच सुमारें सहा इंच

तरी उंच असे. त्या गालांस रंग लावीत. मंदिरांत पोंचल्यावर एक दोन नोकर त्यांस धरून आंत नेत, कारण उंच टांचामुळें त्यांस मुळीं चालतांच येत नसे. ह्याप्रमाणें मंदिरांतलीं दहा चाळीस पावलें चालण्यास त्यांस निदान पंधरा मिनिटें तरी लागत; अशा मंदगतीनें चालणें हें मोठ्या सभ्यपणाचें लक्षण समजत.

पुरुषांचा थाटही असाच विलक्षण असे. त्यांच्या गळ्यांत रुद्राक्षांच्या वगैरे माळा असत. सुंदर पोषाख केलेल्या गुलामांचा तांडा, छत्री, हत्यारें वगैरे घेऊन त्यांचे बरोबर चाले. सोन्याचांदीनें मढविलेले खोगीर, चांदीच्या हिरेजडित लगामी, घंटा, चित्रविचित्र रंगीत रिकाबी, असा त्यांच्या घोड्यांचा साज असे. गरीब लोकही नाना युक्त्या करून श्रीमंतीचा थाट करण्यास झटत असत. असे गरीब एकत्र राहत असल्यास सर्वांत मिळून एकच उंची पोषाख असे; हा पोषाख ते प्रसंग पडेल तसा आळीपाळीनें वापरीत, आणि रस्त्यांतून जातांना छत्री धरण्यापुरता एकादा नोकर मजुरी देऊन तरी बरोबर ठेवीत.

असा ऐषआराम वाढल्यामुळें, गोव्यास उतरती कळा लागल्यावर तथील लोकांचे जे हाल होऊं लागले ते लिहितां पुरवत नाहींत. टॅव्हर्नियर स. १६४८त लिहितो कीं, "पूर्वीचीं श्रीमंत कुटुंबें हल्लीं भिक्षा मागूं लागलीं आहेत, तरी त्यांनीं आपला थाट टाकून दिलेला नाहीं. पोर्तुगीझ बाया पालखींत बसून भिक्षा मागण्यास जातात आणि बरोबरचे नोकर आंत जाऊन भिक्षा गोळा करितात. ज्या ज्या ठिकाणीं पोर्तुगीझांनीं राज्य कमाविलें, तेथें सर्वत्र असाच थाट उत्पन्न झाला. आणि त्याचा परिणामही तोच झाला." एकंदरींत पोर्तुगीझ राष्ट्र लहान असल्यामुळें तिकडून इकडे पुरेसे लोक येत नसत. पहिल्या शें दोनशें वर्षांत फार तर आठ हजार पोर्तुगीझ लोक इकडे आले असतील. एवढ्याशा लोकांनीं इकडे राहून आपला राष्ट्रीय बाणा कायम ठेवणें शक्य नव्हतें. एतद्देशीय लोकांस फौजेंत ठेवण्याची जरूर त्यांस पहिल्यापासूनच भासूं लागली. ह्या लोकांस ते थोडी बहुत कवाईत शिकवून तयार करीत. आरंभींच्या मोठमोठ्या लढायांत एतद्देशीय फौज हजार दोन हजारांपेक्षां ज्यास्त कधींच नव्हती. हळूहळू ही संख्या त्यांनीं पुष्कळ वाढविली. घोडेस्वारांत युरोपियन

लोक असत आणि पायदळ बहुतेक इकडचें असे. त्या वेळीं गुलामांची किंमत फार कमी पडे. बंगाल्यांत एका पुरुषास ७ रुपये ( =१४ शिलिंग ) पडत आणि स्त्री सुंदर असल्यास ह्याच्या दुप्पट किंमत पडे. काय ही मानवी प्राण्याची किंमत ! न्यूनो डा कुन्हा ह्यानें सन १५३०त एडनवर स्वारी केली, तेव्हां त्याजबरोबर ४०० जहाजें असून, तीं बहुतेक लहान व इकडे तयार झालेलीं होतीं, आणि ३६०० पोर्तुगीझ शिपाई, १४६० पोर्तुगीझ खलाशी, २००० एतद्देशीय शिपाई, ५००० एतद्देशीय खलाशी व ८००० गुलाम एवढी फौज त्यांत होती. एवढी मोठी पोर्तुगीझ फौज पूर्वी कधींच बाहेर पडली नव्हती. पोर्तुगीझ लोक पायदळांत नोकरी करण्यास नाखूष असत. ह्मणून आपल्या भरंवशाची लोकसंख्या वाढविण्याकरितां अल्बुकर्कनें युरोपियन पुरुषांचीं एतद्देशीय स्त्रियांबरोबर लग्नें लावण्याची युक्ति काढिली. अशीं लग्नें लावणारांस बक्षिस मिळे व पुरुषांस नोकरी मिळे. ह्यामुळें अर्धबाटगी प्रजा पुष्कळ वाढली. परंतु तेणेंकरून उत्पन्नापेक्षां खर्च ज्यास्त येऊं लागला. तरी ही व्यवस्था कायम ठेवण्याबद्दल धर्माधिकाऱ्यांचा फार आग्रह असे. हे बाटगे लोक घमेंडखोर व आळशी असत आणि त्यांस नोकऱ्या देऊन पोषण्याचा खर्च सरकारावर पडे. पुढें पुढें सरकारांत पैशाची तूट पडूं लागली; आणि पोर्तुगीझ लोक व त्यांची बाटगी प्रजा ह्मणजे एक बंडखोर लष्करच होऊन बसलें. ते आपल्या बंदुकी राजे लोकांस विकीत; आणि पोट भरण्याकरितां वाटेल तें नीच कृत्य करीत. ‘ हे लोक रात्रंदिवस दाराशीं येऊन भिक्षा मागतात; एवढेंच असतें तर हरकत नव्हती, पण हे आमच्या दाराशीं न येतां मुसलमानांच्या दाराशीं जाऊन भिक्षा मागतात; तर कसेंही करून अशा लोकांस लष्करी नोकर समजून पगार चालू करावा.’ अशी शिफारस सन १५४८त गोव्याच्या सरकाराकडून पोर्तुगालच्या राजाकडे गेली होती. पण त्यांच्या हातांत पैसा पडल्याबरोबर तो ते लगेच जुगारांत उडवून टाकीत. लष्करांतील अंमलदार पोर्तुगीझ असत. पण एतद्देशीय क्रिस्ती लोकांसही लष्करांत मोठ्या जागा मिळत. त्या वेळीं कवाईत शिकून शस्त्रास्त्रें वापरण्यांत एतद्देशीय लोक युरोपियनांपेक्षां कमी नव्हते.

हा प्रकार सन १५८० च्या पूर्वीचा आहे. त्या वर्षी स्पेन व पोर्तुगाल हीं दोन राज्यें एक झालीं. त्याचा परिणाम पोर्तुगीझ राज्याला बाधक झाला. स्पेनच्या युरोपांतील भानगडींमुळें हिंदुस्थानांतील पोर्तुगीझ राज्याची व्यवस्था नीट राहिली नाहीं. आफ्रिकेंतून गुलाम आणून देशांत भरण्याचा प्रचार सुरू झाल्यामुळें सर्व प्रकारची भिस्त ह्या गुलामांवर राहूं लागली. पोर्तुगीझ लोक स्वतः कोणतेंही काम करण्यास नालायक झाले, आणि राज्याच्या बंदोबस्ताचा बोजा एतद्देशीय शिपायांवर येऊन पडला. लिस्बन व गोवा येथील लष्करी खात्यांतील अंमलदार सतरा हजार फौजेचा खर्च कागदोपत्रीं दाखवून, प्रत्यक्ष फौज चार हजारच नोकरींत ठेवीत. अशी अव्यवस्था सुरू होती. अर्थात् एतद्देशीय शिपायांच्या हातांत सर्व सत्ता गेली, ती त्यांच्या हातून काढून घेण्याला महा प्रयास पडूं लागले.

५. **पोर्तुगीझ लोकांचें क्रौर्य.**—परधर्मीयांवर क्रूरपणा करण्यास पोर्तुगीझ लोकांच्या मनास मुळींच शंका वाटत नसे. ' आम्ही तुमच्याशीं क्रूरपणानें वागणार नाहीं, असा तुमचा आमचा ठराव कोठें झाला आहे ! ' अशा प्रकारची सबब ते सांगत. असा क्रूरपणा करण्यास त्यांस कोणतींही कारणें असलीं तरी तो न्यायाचा होईल काय ? पण ते ह्मणत, पोर्तुगीझ राष्ट्र लहान, त्यांच्यापाशीं लोक थोडे, मग त्यांनीं क्रूरपणानें आपला शह लोकांवर बसवूं नये तर काय करावें ? वास्को ड गामाच्या दुसऱ्या सफरीपासून लोकांशीं क्रूरपणा दाखविणे हें त्यांच्या राज्यपद्धतीचें एक अंगच होऊन बसलें. दीवच्या लढाईनंतर आल्मीडानें हातीं सांपडलेले कैदी हालहाल करून ठार मारिले. दुसऱ्या एका अधिकाऱ्यानें एका आरब गलबतावरील खलाशांस शिडांमध्यें शिवून समुद्रांत बुडविलें. आल्मीडानें काननूरच्या बंदरांत सांपडलेले कैदी तोफेच्या तोंडांतून जमिनीवर उडवून दिले. दुसऱ्या एका प्रसंगीं बायकांचे दागिने काढून घेण्याकरितां पोर्तुगीझ शिपायांनीं त्यांचे हात व कान कापून घेतले. असे प्रकार क्वचित् काळीं झाले असें नाहीं. आशियांतील लोकांशीं वागण्याची ह्या पोर्तुगीझांची नेहमींचीच ती पद्धत होती. प्रत्येक प्रसंगाचें वर्णन करीत बसण्यांत

पुनरुक्तिच होणार आहे. सूड घेण्याच्या इच्छेनें हीं घोर कृत्यें केलेलीं नसून, तीं केवळ राज्य राखण्याला जरूर म्हणून ते करीत. आल्बुकर्क म्हणे कीं, परधर्मी लोकांस दया माया न दाखविणें हेंच येशु ख्रिस्तास प्रिय असून अंतीं त्यांजवर उपकार करण्यासारखेंच आहे. पकडलेल्या कैद्यांचे नाक कान कापणें, जीव जाण्याकरितां पाण्यांत उडी घेतलेल्या गरीब लोकांच्या पाठीमागें धांवत जाऊन त्यांचे तुकडे करणें, आणि ताब्यांत आलेल्या शहरांतील बायकामुलांची कत्तल करणें, असलीं कृत्यें करणारा आल्बुकर्क केवळ दयेचा पुतळा असा लोकांस वाटे; कारण त्याच्या पश्चात् झालेले अधिकारी जो क्रूर पणा करीत तो शब्दांनीं वर्णन करण्यासारखा नाहीं. अशा अधिकाऱ्यांच्या जाचांतून, देवा, आपणास सोडीव, अशी करुणा भाकण्याकरितां आल्बुकर्कच्या थडग्यापुढें हिंदु व मुसलमान दोनही धर्मांचे लोक जात असत. पोर्तुगीज लोकांस राज्य कमवावयाचें होतें. त्या कामास लागणारी फौज व पैसा त्यांजपाशीं नव्हता. तेव्हां आपली उणीव भरून काढण्याकरितां अशा क्रूरपणाचें त्यांस साह्य घ्यावें लागे.

६. **धर्मशासनमंडळ.**—स्पेन व पोर्तुगाल देशांत भयंकर धर्मच्छल चालू होता. लोकांचीं धर्माविषयीं मतें काय आहेत याचा तपास करून त्यांस शासन करण्याकरितां एक स्वतंत्र मंडळ नेमलेलें होतें, त्यास धर्मशासनमंडळ ( Inquisition ) असें म्हणत. सोळाव्या शतकांत सर्व युरोपभर धर्मसुधारणा सुरू होऊन रोमनकॅथोलिक पंथ मागें पडूं लागला, तेव्हां राजे व धर्माधिकारी रोमनकॅथोलिक पंथाचे असल्यामुळें नवीन पंथांचा उच्छेद करण्यासाठीं हें न्यायमंडल स्थापन केलेलें होतें. वास्तविक याचा मूळ उद्देश विधर्मी लोकांस शासन करण्याचा होता. पण त्याचा प्रयोग युरोपांत भिन्न पंथांच्या लोकांवर झाला. हीच शासनमंडलाची संस्था पोर्तुगीज लोकांनीं हिंदुस्थानांतील आपल्या राज्यांत सुरू केल्यामुळें, येथें किती घोर अनर्थ उद्भवले हें समजण्यासाठीं युरोपांत या मंडलाचें वर्तन कसें असे, तें थोडक्यांत सांगितलें पाहिजे. ह्या अपूर्व न्यायपीठावर कोणाचेंही अपील चालत नसे. त्यांचे हेर

गुप्तपणें प्रत्येक कुटुंबांत राहून कोणाचीं काय मतें आहेत याची बातमी काढीत; आणि ती बातमी मिळविल्यावर न्यायाधीश मंडळी लोकांस त्यांच्या मतांबद्दल शासन करीत. प्रत्यक्ष कृत्यांबद्दल शासन करायचें, मतांबद्दल शासन करायचें नाहीं, हा कायद्याचा मुख्य उद्देश या मंडलानें दूरच ठेविला होता. केवळ संशयावरून कोणासही पकडून, तो आपला धर्म स्वीकारण्याचे कबूल करीपर्यंत, त्यास ते नानातऱ्हेच्या यातना करीत आणि केव्हां केव्हां जिवंतही जाळीत. दोन साक्षीदार मिळाले कीं अंधारकोठडी, उपासमार, वगैरे शिक्षा करण्यास हरकत नसे. यातना सोसल्यावर मनुष्य कबुली देण्यास तयार झाला तर त्याची मालमत्ता हिरावून घेऊन व अंगांत कफनी चढवून त्यास सोडून देत. अंधारकोठडीचा परिणाम त्याजवर न झाल्यास, त्यास अग्निकुंडांत टाकीत. एकच साक्षीदार मिळाल्यास त्याच्या पायांत खिळ्यांचे खोडे घालीत. या खोड्यांचा प्रयोग मध्यरात्रीं अंधारकोठडींत चालत असे. आरोपीस वकील देत नसत, किंवा साक्षींची साक्ष त्याच्या देखत घेत नसत. स्त्री असो, पुरुष असो, किंवा कुमारिका असो, आरोपीला नग्न करून, लांकडी माचावर निजवून पाणी, अग्नि, खिळे व नानातऱ्हेचीं यंत्रें इत्यादिकांनीं त्याच्या शिरा ताणवतील तितक्या ताणणें, हाडें ठेंचणें व जीव न जाईल अशा बेतानें शरीरास यातना देणें, असले प्रकार चालत. सतत पंधरा वर्षें अशा यातना सोसायला लावून शेवटीं अग्निकुंडांत त्यांची आहुती दिल्याचीं उदाहरणें आहेत. कित्येक प्रसंगीं शिक्षा झालेल्या अनेक कैद्यांस तसेच पुष्कळ दिवस खितपत ठेवून मग एकदम त्यांची धिंड काढून अग्निकुंडांत अर्पण करीत. अशा प्रसंगीं, राजा, सरदार व धर्माधिकारी वगैरे लोक हा देखावा पाहण्यास मुद्दाम येत असत. कित्येक वेळां आरोपीची जीभ, तोंड उघडतां मिटतां येऊं नये अशा रीतीनें, बांधून, त्यांजपुढें उत्तम पक्वान्नें खाण्यासाठीं आणून ठेवीत व त्यांचे हाल पाहून जमलेले अधिकारी आनंद मानीत. स्पेन देशांतील या मंडळाचा पहिला अध्यक्ष टार्किमाडा या एकट्यानें आपल्या अठरा वर्षांच्या कारकिर्दीत ११४४०१ लोकांस नाना प्रकारच्या शिक्षा देऊन त्यांच्या कुटुंबांची वाताहत

केली, असा दाखला सांपडतो. हीच पद्धत हिंदुस्थानांतील लोकांस बाट-विण्याकरितां पोर्तुगीझ लोकांनीं इकडे आपल्या राज्यांत सुरू केली होती.

**७. क्रिस्ती धर्मप्रसाराचे प्रयत्न.**–वास्को ड गामा हिंदुस्थानांत आला त्या वेळीं हिंदुस्थानांतील लोकांस आपण क्रिस्ती बनवूं अशी पोर्तुगीझ लोकांस मोठी उमेद होती. हिंदुस्थानचे लोक बहुतेक क्रिस्तीच आहेत अशी त्यांची आरंभीं समज होती. मलबार किनाऱ्यावर सिरिअन क्रिस्ती फार वर्षांपूर्वी येऊन राहिले होते हें मागें सांगितलेंच आहे. पुढें पोर्तुगीझ आले, तेव्हां त्यांनीं येथील सर्व क्रिस्ती लोकांस कॅथोलिक धर्माची दीक्षा देण्याचा निश्चय केला. सन १५६०त वर सांगितलेलें धर्मशासनमंडळ म्हणजे इन्क्विझिशनची गोवें येथें स्थापना झाली, त्यामुळें नानातऱ्हेचा क्रूरपणा व जुलूम सुरू झाला. त्यांत त्यांनीं इकडे असलेले मूळचे सिरियन क्रिश्चन्स सर्व नाहींसे करून टाकिले.

पोर्तुगीझ लोकांनीं मुंबई, वसई वगैरे ठिकाणें काबीज केलीं, तेव्हां इकडील पुष्कळ लोकांस त्यांनीं बाटवून क्रिस्ती केलें. विशेषतः ब्राह्मण, प्रभु वगैरे वरच्या जातींचे लोकांवर त्यांनीं कहर केला. ह्या धर्मच्छलाचीं कारणें अनेक होतीं. क्रिस्ती धर्माची हिंदुस्थानांत स्थापना करावयाची हा त्यांचा एक मोठा हेतु होता. ह्या गोष्टीचा मूळ उत्पादक राजपुत्र हेन्री होय. वास्को ड गामा ह्यानें आपल्या पहिल्या व दुसऱ्या सफरींत कांहीं पाद्री बरोबर आणिले होते. पण स. १५०१ त काब्राल इकडे आला, तेव्हां त्यानें आठ पाद्री इकडे आणिले, त्यांजकरवीं हिंदुस्थानांतील लोकांस एकदम बाटविण्याचा त्याचा विचार होता. हे पाद्री फ्रॅन्सिस्कन पंथाचे होते. त्यांचा मुख्य बिशप स्यूटाचा कोइम्ब्रा हा होता. त्यांपैकीं सात असामी लवकरच मरण पावले. त्यानंतर आल्बुकर्कबरोबर पांच पाद्री इकडे आले. स. १५०३त कोचीनचा किल्ला बांधला तेव्हां व पुढें गोवें काबीज केलें तेव्हांपासून धर्मप्रसाराचें काम जारीनें सुरू झालें. गोव्यांतील मशिदींचीं त्यांनीं मंदिरें बनविलीं. स. १५१७त लोरे नांवाचा पाद्री इकडे आला, त्यानें एक नवीन मंदिर बांधिलें. स. १५३४त गोवा येथें बिशप नांवाचा एक मुख्य अधिकारी पोपानें नेमिला; त्यापूर्वी मदीरा बेटांतील बिशपाच्या हाताखालीं

हिंदुस्थानांतील धर्मव्यवस्थेचें काम होतें. गोव्यास बिशपाची नेमणूक झाल्यावर केप आफ् गुडहोपपासून चीनपर्यंतचा विस्तृत प्रदेश त्याच्या ताब्यांत आला, ह्यामुळें त्यानें महत्व वाढलें. युरोपांत जेसुइट पंथ स्थापन होऊन त्यानें विद्याप्रसाराचें काम जोरानें चालविलें होतें. त्या पंथाचा मोठा प्रसारक फ्रॅन्सिस झेवियर ( १५०६–१५५२ ) यानें हिंदुस्थान पासून जपानपावेतों हिंडून ठिकठिकाणीं त्या पंथाचा प्रसार केला. हा झेवियर अत्यंत परोपकारी व धर्मनिष्ठ असल्यामुळें त्याची छाप इकडे सर्वत्र बसली. अद्यापि झेवियरचीं विद्यापीठें ठिकठिकाणीं चालू आहेत. त्यानंतर स. १५५७ त सबॅशन राजानें गोवा येथें आर्चबिशपाची नेमणूक केली, व त्याच्या हाताखालीं तीन बिशप गोवा, मलाका व कोचीन येथें नेमून दिले. स. १६०६ त ह्या आर्चबिशपानें पूर्वेकडील प्रायमेट असा किताब धारण केला.

भूगोलशास्त्र व व्यापार ह्या विषयांतील पोर्तुगीझ लोकांचे उद्योग जितके महत्त्वाचे होते, त्यांहून ज्यास्त महत्वाचे उद्योग धर्मविषयांत त्यांनीं केले आहेत. त्यांत परधर्मी लोकांस बाटवून क्रिस्ती करण्यांत त्यांनीं आपली शिकस्त केली. मुंबई बेट पोर्तुगीझांच्या ताब्यांत गेलें, तेव्हां फ्रॅन्सिस्कन मिशनरींनीं तेथें असलेल्या सर्व योगी व बैरागी लोकांस बाटवून क्रिस्ती केलें; तसेंच मुंबईनजीक कान्हेरी व मंडपेश्वर येथें जीं बौद्धांचीं लेणीं होतीं, त्यांतही त्यांनीं क्रिस्ती प्रार्थना सुरू केल्या. हें काम करणारा मुख्य पाद्री एँटोनियो पोर्टो होय. एका वसई प्रांतांत दोन वर्षांच्या अवधींत त्यानें हजारों लोक बाटविले. ह्या पोर्टोची आठवण फार काळपर्यंत लोकांस चांगली होती.

एँटोनिओ ह्यास कान्हेरीच्या लेण्यांत जे बैरागी व साधु सांपडले त्यांस बाटवून त्या लेण्यांत क्रिस्ती प्रार्थना करण्याची त्यानें सुरुवात केली. सरकारचें व फौजचें पाठबळ घेऊन हें काम त्यानें जबरदस्तीनें केलें. अडथळा करणारास ह्या फौजा ठोकून काढीत. ह्या लेण्यांत मुख्य चैत्य जेथें आहे, तेथें सेंट मायकेलचें मंदीर स्थापण्यांत आलें. हल्लीं त्या लेण्यांत क्रिस्ती धर्माची खूण कांहींच राहिलेली नाहीं. मराठ्यांनीं वसई काबीज केली, तेव्हां त्या लेण्यांतील व सभों-

बारच्या प्रांतांतील क्रिस्ती धर्माच्या खुणा त्यांनीं मोडून टाकिल्या. क्रिस्ती लोकांनीं फोडलेल्या मूर्तींचे अवशेष अद्यापि दृष्टीस पडतात. फादर पोर्टो मंडपेश्वर येथें आला, तव्हां तेथें सुमारें पन्नास योगी होते, ते एकदम पळून गेले. नंतर देवालयांत जाऊन त्याचें त्यानें क्रिस्ती मंदीर बनविलें. पुढें ह्याच ठिकाणीं पोर्तुगीझ राजा तिसरा जॉन ह्यानें बाटलेल्या लोकांच्या मुलांकरितां एक विद्यापीठ स्थापिलें; आणि त्याच्या खर्चास पूर्वीच्या हिंदु मंदिराचें सर्व उत्पन्न लावून दिलें. ह्या मंदिराचें सभागृह फार मोठें म्हणजे १०० व ३० हात लांबरुंद होतें. तेथें पांच क्रिस्ती धर्मगुरु राहत असून त्यांस सालिना दीडशें खंडी तांदुळांची नेमणूक होती. ह्यापैकीं बरेंच धान्य ते गरिबांस वांटीत. पुढें मराठ्यांनीं हें विद्यापीठ मोडून तेथील इमारतीचीं लांकडें ठाण्यास नेलीं, आणि हिंदु देवतांच्या मूर्ती क्रिस्ती लोकांनीं चुन्यानें बुजविल्या होत्या, त्या पुनः उघड्या करून पूर्ववत् त्यांची पूजा चालू केली.

क्रिस्त धर्मप्रसाराच्या कामांत विशेष पुढाकार घेऊन काम करणारा पहिला बिशप जॉन आल्बुकर्क हा स. १५३८त इकडे आला. त्याजबरोबर बार्बा व लागोस ह्या नांवाचे दोन फ्रॅन्सिस्कन पाद्री होते. हेच पाद्री इकडील लोकांचा प्रथम छल करूं लागले. आल्बुकर्कनें पंधरा वर्षें काम करून ( स. १५३८–५३ ) फक्त एक गोवा शहरांत १५ मंदिरें स्थापन केलीं. तेथें आदिलशहाच्या मशिदींत त्यांनीं आपलें मुख्य मंदीर केलें. इतर ठिकाणींही हाच प्रकार केला. युरोपांत या पूर्वीच जेझुइट पंथाचे साधु भिक्षा–वृत्तीनें गांवोगांव हिंडून लोकांस मोक्षप्राप्तीचा मार्ग शिकवीत असत. त्यांचा मूळ संस्थापक सेंट फ्रॅन्सिस झेवियर ( ११८२–१२२६ ) होय. त्या पंथाचा मोठा प्रवर्तक झेवियर स. १५४२ त पुष्कळ पाद्री बरोबर घेऊन गोव्यास आला. त्याचा व गव्हर्नर कॅस्ट्रोचा मोठा स्नेह होता. तेव्हां दोघांनीं मिळून धर्मप्रसाराचें काम इकडे मोठ्या निकरानें सुरू केलें; आणि पुढें एतद्देशीयांस बाटवून क्रिस्ती करणें हें पो० राज्याचें एक मुख्य कर्तव्यच झालें. हिंदुस्थानांत अनेक क्रिस्ती पंथ आले, परंतु गोव्यास मुख्य भरणा या फ्रॅन्सिस्कन पंथी जेझुइट लोकांचाच होता.

पोर्तुगीझांच्या मनांत धर्मशिक्षणाचे हेतु तीन होते; क्रिस्ती धर्म वाढविणें, मूर्तिपूजकांचा उच्छेद करणें, व बाटलेल्या क्रिस्ती लोकांचा उत्कर्ष करणें. ह्या उद्देशांत कित्येक व्यक्तींच्या कडक व फाजील धर्मश्रद्धेची भर पडल्यामुळें लोकांवर कहर गुदरला व मूळचा धर्मोद्देशही तडीस गेला नाहीं. वरील उद्देश तडीस नेण्यास सामुग्री आयतीच तयार होती. इमारती पाहिजेत तर हिंदु देवळें मुबलक होतीं. त्यांचीं उत्पन्नें इकडेच तोडून घेतलीं कीं चालू खर्च भागणारा होता. तोटा आल्यास हिंदूंचा पैसा लुटून आणण्यास हरकत नव्हती. ह्याप्रमाणें सेंट पॉल कॉलेज नांवाची पहिली संस्था स. १५४१त गोव्यास स्थापन झाली. तींत कानडी, दक्षणी, मल्याळी, सिंहली, बंगाली, पेगू, चिनी, जपानी वगैरे सर्व जातींचे विद्यार्थी होते. अशा लोकांचा भरणा आरंभीं सुमारें तीन हजार होता. ह्या विद्यापीठावर सन १५४८त कामार्ट ह्याची नेमणूक झाली, तेव्हां त्यास असें होऊन गेलें, कीं एकदम सर्व हिंदुस्थान खाऊं का गिळून टाकूं. पण परधर्मी लोकांवर एकदम मोठा जुलूम करण्यास राजाची परवानगी नव्हती. तेव्हां तशी परवानगी मिळवून आणण्याकरितां कॉलेजच्या व्यवस्थापकांनीं मुद्दाम एक गृहस्थ युरोपास राजाकडे पाठविला. त्यानें ह्या कामासाठीं भरपूर अधिकार राजापासून मागून आणिला. ह्मणजे लोक जर खुशीनें क्रिस्ती धर्म न स्वीकारतील, तर त्यांजला जबरदस्तीनें क्रिस्ती करावें, असा अधिकार त्यानें मिळविला. या खटाटोपाची बातमी गोव्यांतील लोकांस कळल्याबरोबर बहुतेक हिंदु शहर सोडून गेले. तेव्हां त्याबद्दल पोर्तुगीझ व्यापाऱ्यांस फार वाईट वाटलें. कारण हिंदु लोक गेल्यामुळें त्यांचा व्यापार बसला. त्या वेळीं गोव्याची सेनेट ह्मणजे नगरसभा होती, तिनें स. १५४६त एक पत्र व्हाइस रॉय यास लिहिलें त्यांत खालील मजकूर आहे. " आह्मी माफी मागून असें कळवूं इच्छितों, कीं परधर्मी व्यापारी व ग्रामस्थ वगैरे लोकांनीं हें कर्ज दिलेलें आहे. असें असतां आपले सल्लागार धर्माचें फाजील स्तोम माजवून हिंदूंचा उच्छेद करितात. हिंदुस्थानचे लोक कुचकामाचे आहेत,

त्यांस आपल्या राज्यांत राहूं देणें गैर होय, त्यांस हद्दपारच केलें पाहिजे, अशा प्रकारची समजूत त्यांनीं आपली पाडिली आहे, ह्यामुळें मोठा अपाय होण्याचा संभव आहे. परंतु ह्या बाबतींत धर्माधिकाऱ्यांच्या आग्रहापुढें प्रत्यक्ष व्हाइस रॉयाचेंही कांहीं चाललें नाहीं. राजाकडून आलेला कठोर हुकूम त्यास प्रसिद्ध करावा लागला. त्या हुकुमाचें तात्पर्य ता. ८ मार्च, स. १५४६च्या पत्रांत खालीलप्रमाणें आहे.

१. आपल्या राज्यांत मूर्तिपूजा बंद करणें क्रिस्ती राजांचें कर्तव्य आहे. २ मूर्तिपूजकांस यथेच्छ धर्माचार करण्याची मुभा ठेवल्याबद्दल आम्हांस अत्यंत खेद होतो. ३ आमचें असें फर्मान आहे, कीं सर्व मूर्ति फोडून टाकाव्या आणि मूर्ति करणाऱ्या कारागिरांस शिक्षा कराव्या. ४ क्रिस्ती धर्म स्वीकारिलेल्या लोकांस विशेष हक्क द्यावे व त्यांजपासून वेठबिगार वगैरे घेऊं नये. ५ जकातीच्या उत्पन्नापैकीं कांहीं भागांतून बाटलेल्या लोकांस तांदूळ वांटावे. ६ परधर्मी लोक क्रिस्ताच्या मूर्ति करितील तर त्यांस शिक्षा कराव्या. ७ बाटलेल्या लोकांस धर्माचें व इतर शिक्षण देण्याकरितां विद्यापीठें घालावीं आणि विधर्मी लोकांसही क्रिस्ती धर्माचें शिक्षण द्यावें. ८ बाटलेल्या लोकांस विशेष ममतेनें वागवावें.

ह्या हुकमानें बिशपाचें काम सुकर झालें. लगेच हुकमाची बजावणी त्यानें राज्यांत जिकडे तिकडे चालू केली. हाताखालच्या लोकांस त्यानें खालील जाहीरनामा काढिला. ' राजाचा हुकूम सामील ठेवून धर्मखात्यांतील सर्व अधिकाऱ्यांस असें फर्माविण्यांत येत आहे, कीं हिंदु लोकांचीं मंदिरें बांधून तयार असतील किंवा तयार होत असतील, तीं सर्व पाडून टाकण्यास तुम्हांस पूर्ण अखत्यार व फरज आहे. इतउत्तर जे कामदार इकडे येतील त्यांनींही या हुकमाची अंमलबजावणी करावी, असें परमेश्वराच्या नांवानें माझें त्यांस सांगणें आहे. ' हिंदूंचीं मंदिरें जमीनदोस्त करण्याचा सपाटा चालू झाला. ब्राह्मण लोक अडथळा करीत ह्मणून त्यांस देशांतून घालवून दिलें. राजा, बिशप व व्हाइस रॉय या त्रिवर्गांनीं धर्मप्रसाराचे

कामास लेखी हुकूम दिल्यामुळें जी गोष्ट पूर्वी व्यक्तिशः कोणी एकादा करी, ती आतां राज्याची मुख्य कामगिरी होऊन बसली.

मुंबईत फ्रॅन्सिस्कन् पाद्र्यांचेंच वर्चस्व होतें. मुंबईपासून वसईपावेतों ह्या मंडळींनीं अनेक मंदिरें बांधिलीं. चौल, साष्टी, ठाणें येथेंही पोर्तुगीझ पाद्र्यांनीं आपल्या संस्था स्थापिल्या. मंदिर बांधणें, त्यास उत्पन्न करून देणें व मंदिराचा व बाटलेल्या लोकांचा खर्च चालविणें, अशी त्यांची सामान्य योजना असे. तसेंच गरीब लहान मुलांच्या पोषणासाठीं धर्मादाय असत, त्यांतून हजारों मुलांस बाटविण्याची व्यवस्था चाले. कित्येक दुष्काळांचे वगैरे प्रसंगीं ते गरीब मुलें विकत घेत. अशा विक्रीची किंमत वयावर असे. वर्षाच्या आंतलें मूल पोर्तुगालमधील एका कोंकराच्या किंमतीस मिळे. अशीं मुलें पैदा करण्यासाठीं गांवोगांवीं फिरते पाद्री असत. एका ठाणें शहरांत तीन वर्षांच्या अवधींत सुमारें सहा हजार मुलें पैदा झाल्याचा दाखला मिळतो. ऑगस्ट स. १५६४त गोकुळअष्टमीच्या दिवशीं वरूईच्या खाडींत हिंदु लोक स्नानास गेले असतां त्यांजवर जेझुइट पाद्र्यांनीं हल्ला करून मारामारी केली. असे प्रकार वारंवार होऊं लागल्यामुळें हिंदूंस आपले आचार राखण्याची मोठी पंचाईत पडली. इकडे क्रिस्ती पाद्री ऐषआरामांत व चैनींत दंग होऊन राहत, त्यांस कशाची गुमान वाटत नसे. अनेक सधन पोर्तुगीझ पुरुष व बाया मरणसमयीं आपली दौलत एकाद्या मंदिरास देऊन टाकीत.

बाटलेल्या लोकांस परत स्वधर्मांत घेण्याचे अनेक प्रयत्न तत्कालीन ब्राह्मणांनीं केले. अशा लोकांस आपल्या पिढीजाद धर्मांत परत येण्याबद्दल ते उपदेश करीत, इतकेंच नाहीं तर गोकुळअष्टमी वगैरे सारख्या मोठ्या मेळ्यांचे दिवशीं बाटलेल्या लोकांस समुद्रस्नान अगर गंगास्नान घालून शुद्ध करून घेत. अशा पवित्र दिवशीं गंगास्नान केल्यानें सर्व पातकांचें जसें क्षालन होतें, तसें क्रिस्ती धर्म स्वीकारून व्हावयाचें नाहीं, असा शास्त्राधार ते लोकांस दाखवीत. त्यामुळें पाद्र्यांचें पित्त खवळून जाई. ब्राह्मणांची ही युक्ति पाहून त्यांचा उद्योग बंद पाडण्याकरितां ठाणें, वसई, मुंबई वगैरे ठिकाणच्या खाड्यांच्या व

समुद्राच्या कांठीं क्रिस्त्यांनीं खांबांवर सर्वत्र क्रूस रोवून ठेविले होते. तेव्हां क्रूस रोविलेला नसेल अशा ठिकाणीं जाऊन ब्राह्मण आपला मेळा भरवीत. शेवटीं क्रिस्त्यांचे जाचास त्रासून ब्राह्मणांनीं वसईनजीक रानांत एक तलाव पाहिला, आणि तेथें कांहीं दिवस शुद्धीकरण गुप्तपणें चालविलें हें ठिकाण उघडकीस आल्यावर पोर्तुगीझ शिपायांनीं ब्राह्मणांवर हल्ला करून त्यांस तेथून हुसकून दिलें. त्या वेळीं एक बैरागी एकदां क्रिस्ती होऊन पुनः हिंदु झालेला निर्भयपणें फौजेच्या समोर एकटा उभा राहिला. तेव्हां तर त्या क्रिस्त्यांचें पित्त ज्यास्तच खवळून त्यांनीं त्या जागेचा विध्वंस केला; आणि गाई मारून त्यांचें मांस व रक्त तलावांत व बाजूस शिंपडून ती जागा बाटवून टाकली, (ऑगस्ट स. १५६४). सन १५७८त जेझुइट लोकांनीं साष्टी बेटांतील दोन गांव सबंध बाटविले; त्यांत एकंदर दहा हजार लोक क्रिस्ती झाले दुसऱ्या वर्षी वांद्रा येथें दोन हजार कोळी लोक बाटले. अशी सालोसालची यादी व संख्या देऊं लागल्यास पल्ला येणार नाहीं. डॉमिनिकन, फ्रॅन्सिस्कन, जेजुइट व सेंट ऑगस्टाईन हे इकडील क्रिस्त्यांचे चार मुख्य पंथ होते.

**८. पोर्तुगीझांच्या चुकांचा इतरांस झालेला फायदा.**–पोर्तुगीझ लोकांची विशेष भरभराट सोळाव्या शतकच्या पहिल्या पन्नास वर्षांत होती. आफ्रिकेच्या दक्षिण टाकापासून जपानपर्यंतचा सर्व किनारा त्यांच्या ताब्यांत होता. वास्तविक त्यांचें स्वामित्व व्यापारावर होतें, भूप्रदेशावर नव्हतें. मोठा भूप्रदेश ताब्यांत ठेवण्याइतकी त्यांची शक्ति नव्हती आणि व्यापार ताब्यांत ठेवण्याची त्यांच्या अंगीं योग्यता नव्हती; हें इतिहास स्पष्टपणें दाखवीतच आहे. अंगीं धर्माचें वारें प्रखर असल्यामुळें वाटेल तें साहस ते करीत. परधर्मीयांस ते आपले शत्रु समजत. त्यांच्यांत धर्मभोळेपणा, क्रौर्य व अनीति हे दुर्गुण कल्पनातीत होते. हिंदु लोकांशीं गोडीनें वागण्याचा थोडा बहुत प्रयत्न आल्बुकर्कनेंच काय तो केला. गामा, सोरेस, सेक्वेरा, मेन्झिस, यांच्या क्रूर कृत्यांनीं सर्व लोक बेहोष झाले, तेणेंकरून स. १५६७ त पोर्तुगीझ लोकांविरुद्ध येथील राजांचा एक मोठा कट झाला. पो० च्या अंगीं शौर्य नसतें तर त्यांचा

तेव्हांच नायनाट झाला असता. त्यांचें विलक्षण शौर्य एवढाच काय तो त्यांचा तारीफ करण्याजोगा गुण दिसून येतो. सन १५५७त पोर्तुगालचा राजा तिसरा जॉन मरण पावला व सेबॅशन गादीवर बसला. या सेबॅशननें आपलें वैभव परत मिळविण्याकरितां ब्रॅगॅन्झा यास पूर्ण अधिकार देऊन हिंदुस्थानांत पाठविलें. पण त्याच्या हातून फारसें काम झालें नाहीं. एका इसमानें चांगलें काम केलें तर त्याच्या पश्चात् पांच इसम वाईट येऊन पुनः सर्व घोटाळा करीत. चोविसावा गव्हर्नर आथेड (इ. स. १५३७--१५७१) यानें फार चांगला कारभार केला. पण पुढील पांच वर्षांत पांच नालायक अंमलदार आले. तेव्हां सर्व राज्य आतांच बुडतें कीं काय, अशा भीतीनें आथेड यास १५७९ त राजानें पुनः इकडे पाठविलें. तो एक वर्षानें इकडे मरण पावला व पोर्तुगालचें राज्य इ. १५८० त स्पेनचा राजा दुसरा फिलिप याचे ताब्यांत गेलें. यामुळें पोर्तुगालचें हिताहित कोणीच पाहिनासें झालें व स्पेनचा पगडा वर राहिला. स. १६४० त पोर्तुगाल देश पुनः स्वतंत्र झाला खरा, पण त्या वेळीं त्यास डच व इंग्रज हे प्रतिस्पर्धी झाल्यामुळें त्यांच्याशीं स्पर्धा करण्यांत त्यांचें लहानसें राज्य लयास गेलें.

स. १५९० पासून १६१० च्या वीस वर्षांत पोर्तुगीझांच्या व्यापाराची अत्यंत भरभराट होती. त्या वेळीं दर सफरींत त्यांचीं दीडशेंपासून अडीचशें गलबतें वावरत असत. परंतु हल्लीं लिस्बनहून गोव्यापर्यंत दरसाल एका आगबोटीची एक सफर मोठ्या मारामारीनें होते, आणि गुड होपपासून जपानपर्यंतच्या अफाट राज्यापैकीं गोवा, दमण व दीव हीं तीनच ठिकाणें काय तीं त्यांच्या ताब्यांत राहिलीं आहेत. ह्यावरून त्या राज्याचा केवढा ऱ्हास झाला ह्याची कल्पना होईल.

सन १५८०त स्पेन व पोर्तुगाल एक झाले, तेव्हां स्पेनचें व इंग्लंडचें वैर असून पुढें आठ वर्षांनींच स्पॅनिश आरमाराचा इंग्रजांकडून चूर झाला. अशा प्रकारें स्पेनच्या युद्धांत पोर्तुगालचें सर्व उत्पन्न खर्च झाल्यामुळें, हिंदुस्थानच्या व्यापारांत घालण्यास भांडवलच राहिलें नाहीं. स. १५८७त पोर्तुगालच्या व्या-

पाराचा सर्व हक्क एका कंपनीस विकण्यांत आला, त्याचें उत्पन्न स्पेनच्या युद्धांत खर्च झालें. ह्या कंपनीच्या विरुद्ध सर्व अधिकाऱ्यांनीं तक्रार केल्यामुळें कंपनीचा व्यापार नीट चालला नाहीं. मात्र ह्या पो० कंपनीच्या व्यवहारांवरून पुढें इंग्रज व डच कंपन्यांस आपला क्रम सुधारतां आला. आरंभीं पोर्तुगीझ कामगारांचे पगार फार थोडे होते. वास्को ड गामा, आल्बुकर्क वगैरे इसम तर केवळ कीर्तीच्या आशेनें बाहेर पडले होते, म्हणून त्यांस पैशाची परवा नव्हती. पण पहिल्या भरांतील ही कीर्तीची हांव लवकरच खलास झाली. पुढें पैसा मिळाल्याशिवाय काम करण्यास कोणी तयार होईना. आरंभीं समुद्रावर किंवा जिंकलेल्या शहरांत लूट करून, आणि एतद्देशीय राजांपासून खुशीचीं किंवा सक्तीचीं बक्षिसें घेऊन, ते आपले खिसे भरीत. वास्तविक अशा प्रकारें मिळविलेल्या पैशावर राजाचा हक्क असावयाचा. पण राजानें लोकांचे पगार वाढविण्यास कबुली न दिल्यामुळें, तो पैसा लोकांच्याच पदरांत पडूं लागला. पोर्तुगीझ शिपायांची तर अत्यंत दुर्दशा असे. त्यांच्या अंमलदारांस म्हणजे कप्तानास दरमहा १२ शिलिंग म्हणजे सहा रुपये पगार असे, यामुळें त्यांस केवळ तांदूळ व मासे ह्यांहून ज्यास्त कांहीं खाण्यास मिळत नसे. पण त्या वेळच्या पराक्रमास बक्षीसही तसेंच मिळे. अनेक नवीन प्रदेश व बेटें ओसाड पडलेलीं असत, वाटेल त्यानें जाऊन लढावें व प्रदेश काबीज करावा. पूर्वेकडील द्वीपसमूहांत हा प्रकार विशेष जारीनें चालला. हे अन्यायाचे प्रकार पोर्तुगीझ राजास बंद करतां येईनात. कारण आपणांस पोसावे लागणाऱ्या खुशालचंद इसमांस चरण्यास पाठविण्याची हिंदुस्थान ही एक उत्कृष्ट जागा पोर्तुगीझ सरकारास मिळाली होती. पोर्तुगालची शेती गुलामांकडून होत असल्यामुळें, अनेक गरीब लोक अन्नास मोताद झाले. अशा लोकांस हिंदुस्थानास पाठवून देणें एवढाच मार्ग होता. इकडे त्यांस मृत्यु आला तर सुटले बिचारे; आणि नशिबानें श्रीमंती आली तर बरेंच झालें. हिंदुस्थानांत जाऊन एतद्देशीय स्त्रीशीं लग्न केलें, कीं नोकरी ठेवलेली. अशा नोकऱ्या तरी प्रत्येकास कोठच्या मिळणार! कामाच्या जरुरीपेक्षां फारच ज्यास्त जागा पोर्तुगीझ

राज्यांत होत्या. अशा गिधाडांच्या झडपेनें फिरंगी म्ह० क्रिस्ती हा शब्द त्या वेळीं किती भीतिप्रद झाला होता हें सांगण्याची जरूर नाहीं. हातास लागेल तें ते पळवीत, वाटेल तो अनाचार व क्रूरपणा करीत. स. १५५०च्या सुमारास हा अनाचार कळसास पोंचला, तेव्हां 'कसें तरी करून आम्हांस सोडवा, नाहीं तर पुढें आमची धडगत नाहीं,' अशा प्रकारच्या विनवण्या एतद्देशीय लोकांकडून पोर्तुगालच्या राजाकडे गेलेल्या आहेत.

आजपावेतों हिंदुस्थानांत युरोपियनांनीं राज्यें कमाविलीं, त्यांत पोर्तुगीझ लोकांचें नांव पहिलें आहे. इतक्या दूर देशच्या लोकांनीं येथें येऊन राज्य स्थापन करणें ही गोष्ट आरंभीं आश्चर्यकारक दिसते. पण ऐतिहासिक रीत्या हे प्रकार कसे घडले हें समजलें म्हणजे आश्चर्य वाटण्याचें कारण राहत नाहीं. राज्य स्थापन करणें हा एक प्रकारचा प्रयोग आहे. त्यांत अनेक व्यवहारांचा समावेश होतो. पैकीं पोर्तुगीझांस आरंभीं जे प्रकार बरे वाटले, ते त्यांनीं आपल्या शक्त्यनुसार करून पाहिले. त्यांत त्यांच्या कित्येक चुका झाल्या; व कित्येकांत त्यांस यश आलें. त्यांच्यानंतर इंग्रजांनीं जेव्हां आपला राज्य-स्थापनेचा प्रयोग सुरू केला, तेव्हां त्यांस ह्या पोर्तुगीझांच्या अनुभवाचा फारच उपयोग झाला. जे प्रकार अयोग्य ठरले, ते त्यांनीं वर्ज्य केले; व जे उपयुक्त वाटले ते त्यांनीं स्वीकारले. ह्या दोन राष्ट्रांच्या प्रयोगांमधील अंतर समजून घेण्यासारखें आहे. यासाठीं पोर्तुगीझ राज्यस्थापनेची ही हकीकत विस्तारानें दिली आहे; तिची इंग्रज राज्यस्थापनेशीं तुलना करून पाहिली असतां, ऐतिहासिक विवेचनास मदत होईल. पोर्तुगीझांच्या राज्यांत धर्माचें प्राबल्य होतें, त्यामुळें पोर्तुगीझांचा ऱ्हास झाला, तेव्हां इंग्रज राज्यकर्ते धर्माच्या नादास लागले नाहींत. तसेंच युरोपियन पुरुष व एतद्देशीय स्त्रिया यांचे लग्नसंबंध करून बाटगी प्रजा वाढविण्याचा प्रकार इंग्रजांनीं टाळला. इंग्रजांनीं इकडचा कारभार सर्वस्वी कंपनीच्या हातांत देऊन मुख्य इंग्रज सरकार इकडील भानगडींपासून अलिप्त राहिलें, म्हणून तिकडील अव्यवस्थेचे परिणाम हिंदुस्थानांतील व्यवस्थेवर घडून आले नाहींत. खासगी व्यापाराचें बंडही

इंग्रजांनीं लवकरच मोडिलें. पोर्तुगीझांचा ऐषआराम इंग्रजांनीं इकडे कधींच चालूं दिला नाहीं. आपलीं कामे करण्यास गुलाम मिळाले त्याबद्दल पोर्तुगीझांस आरंभीं अतिशय फायदा झाला असें वाटलें. पण त्यामुळें ते स्वतः कोणतेंही काम करण्यास नालायक होऊन दरिद्री बनले. हे प्रकार इंग्रजांनीं टाळिले यांत त्यांचा शहाणपणा दिसून येतो.

---

# प्रकरण सातवें.

## डच लोकांची हकीकत.

| | |
|---|---|
| १. डच लोकांचा पूर्वक्रम. | २. पूर्व द्वीपसमूहाचा पाडाव. |
| ३. डच लोकांचा इंग्रजांशीं झगडा. | ४. तंव्याचा आतिरेक,-आंबोयनांतील इंग्रजांची कत्तल. |
| ५, सुडाची अनास्था. | |
| ६. डच लोकांच्या जुलमाची कमाल. | ७. डच लोकांच्या ऱ्हासाचीं कारणें. |

८. डच लोकांचे पगार.

१ **डच लोकांचा पूर्वक्रम.**—डच म्हणजे नेदर्लंडचे लोक त्यांचा देश युरोपाच्या वायव्येस समुद्रकांठीं आहे. हा देश फार दिवस स्पेनच्या ताब्यांत होता. तो ताबा लोकांनीं मोठ्या शिकस्तीनें झुगारून दिला. दर्यावर्दी कामांत ते फार निपुण होते. वास्तविक पूर्वेकडील समुद्रांत त्यांचा प्रवेश इंग्रजांच्या मागून झाला. तथापि त्यांनीं व्यापाराच्या कामांत इंग्रजांच्या पुढें फारच आघाडी मारली. व्हेनिस व जिनोआ येथील व्यापार बंद पडून लिस्बन शहर भरभराटीस आलें, तेव्हां हिंदुस्थानांतून लिस्बनास येणारा माल प्रथम डच लोक आपल्या जहाजांतून उत्तर युरोप खंडास पुरवूं लागले. स. १५८०त नेदर्लंड देश स्पेनपासून स्वतंत्र झाला व पोर्तुगाल देश स्पेनच्या राज्यांत

सामील झाला. तेव्हां डच लोकांचा सूड घेण्याकरितां स्पेनचा राजा दुसरा फिलिप यानें लिस्बन येथें येण्याची त्यांस बंदी केली, परंतु या बंदीनें त्यांच्या अंगचे खरें तेज ज्यास्तच चमकूं लागलें. पोर्तुगीझांचा एकतंत्री व्यापार बुडविणारें पहिलें पाश्चात्य राष्ट्र डच लोकांचें होय.

सन १५८८त इंग्लंडावर गेलेल्या स्पॅनिश आरमाराचा पराजय झाला ही संधि पाहून, डच व्यापरी जहाजें घेऊन हिंदुस्थानास येण्याचा दुसरा मार्ग शोधून काढावयास लागले. सन १४९३तील हुकमानें पोपनें पोर्तुगाल देशास जे हक्क दिले होते त्यांस बाध न आणावा म्हणून युरोपच्या उत्तरेकडून हिंदुस्थानास येण्याचा निराळा मार्ग ते पाहूं लागले. स. १५९४–९५ व ९६ या वर्षी विल्यम बॅरेंट ( Barent ) यानें उत्तरेकडून हिंदुस्थानास जाण्याचे तीन प्रयत्न केले. पण ते विफल होऊन त्यांतच बॅरेंट मरण पावला. लिन्सकोटेन नांवाचा एक डच व्यापारी सतरा वर्षांचा असतांना लिस्बनास गेला. तेथें सुमारें दोन वर्षें राहून तेथून पुढें तो गोव्यास आला. येथें तेरा वर्षें राहून त्यानें व्यापारसंबंधीं पुष्कळ माहिती गोळा केली. सन १५९२त परत जाऊन त्यानें ती माहिती १५९६त प्रसिद्ध केली. ह्या पुस्तकांचीं भाषांतरें युरोपियन भाषांत लगेच झालीं. लिन्सकोटेनचें पुस्तक व्यापाऱ्यांच्या व खलाशांच्या फार उपयोगी पडलें. त्याच्या सल्ल्यानें आम्स्टर्डॅमच्या व्यापाऱ्यांनीं एक सभा भरवून हिंदुस्थानांत एक व्यापारी सफर पाठविण्याचें ठरविलें. त्याप्रमाणे कार्नेलियस हौटमन याच्या हाताखालीं, सन १५९५त चार गलबतें आफ्रिकेच्या रस्त्यानें हिंदुस्थानास आलीं, तीं अडीच वर्षांनीं परत युरोपास गेलीं. ह्या सफरींत व्यापारासंबंधीं फारसा फायदा झाला नाहीं, तथापि त्या योगानें त्यांचा पुढील मार्ग निश्चित ठरला

ह्याप्रमाणें इकडचा व्यापार एकट्या पोर्तुगीझ लोकांच्या हातांत होता, त्यांत आतां डच लोक वांटेकरी झाले व्हेनिस, जिनोईझ, तुर्क वगैरे राष्ट्रें आपल्या व्यापाराचे मार्ग अगदीं गुप्त ठेवीत असत; एकास सांपडलेल्या मार्गांत दुसऱ्या कोणाचा रिघाव ते होऊं देत नसत. ह्याच धोरणावर पोपनें हुकूम

देऊन पृथ्वीवरील नवीन प्रदेश स्पेन व पोर्तुगाल त्यांस वांटून दिले होते. सोळाव्या शतकाच्या अखेरीस हा प्रकार सर्वांसच माहीत होऊन त्यांतला गुप्तपणा निघून गेला. पोर्तुगालच्या राजपुत्र हेन्रीचे शोध युरोपच्या लोकांत प्रसिद्ध झाले होते. डच लोकांनीं छापण्याची कला शोधून काढिली, त्यायोगानें नाना प्रकारचे भूगोल व नकाशे छापून प्रसिद्ध झाले. त्यावरून लोकांच्या तोंडास व्यापाराचें पाणी सुटून इंग्लंडांत व हॉलंडांत मोठमोठ्या कंपन्या स्थापन होऊं लागल्या. गुप्तपणाचें तत्त्व नाहींसें झाल्यावर, प्रथम येणाऱ्याची मालकी कायम समजावी, हें तत्त्व कांहीं दिवस अमलांत आलें. त्यासही पोपच्या हुकुमाची पुष्टि मिळाली. पण असे हुकूम कायम राहणें शक्य नव्हतें. तेव्हां ज्यानें प्रदेशाचा शोध लावला असेल त्यास तो प्रदेश स्वतःच्या बळावर आपल्या ताब्यांत ठेवतां येईल तरच तो त्याचा समजावा, असा ग्रह उत्पन्न झाला. अर्थात् ‘ बळी तो कान पिळी, ’ हा न्याय अंमलांत येऊन त्याच न्यायानें इंग्रज व डच यांनीं प्रथम आपले प्रयत्न चालविले.

पोर्तुगीझ लोकांच्या शंभर वर्षांच्या व्यापारांत लिस्बन शहर फार भरभराटीस आलें. हिंदुस्थानांतून लिस्बनास आणिलेला माल इतर देशांत नेऊन विकण्याकरितां पोर्तुगीझ व्यापाऱ्यांस डच व्यापाऱ्यांची मदत घ्यावी लागे. डच गलबतें लिस्बनहून नाना प्रकारचा माल उत्तर युरोपास पुरवीत असत. त्यामुळे एकीकडे पूर्वेकडील देश व एकीकडे हॉलंड यांजमध्यें लिस्बन ही मोठी उतार पेठ होऊन त्याची फारच भरभराट झाली. हॉलंडांतून तो माल जर्मनींत व लंडनास जाई. हॉलंडच्या शेल्ट नदींत दररोज पांचशें जहाजें जात येत असत.

हौटमन परत आल्यावर सन १५९८त पांच डच जहाजें पूर्वेकडे आलीं. त्यांत भरून आणलेल्या मालाचें उत्पन्न पाहून सर्व राष्ट्र धनलोभानें उन्मत्त होऊन गेलें. हौटमन पुनः एकदां पूर्वेकडे गेला; पण तिकडे त्याचा खून झाला. सन १६०१ पर्यंत डच लोकांनीं एकंदर पंधरा सफरी केल्या; आणि त्यांच्या अनेक कंपन्या निर्माण झाल्या. ह्या सर्व कंपन्यांस एकवट करून डच

पार्लमेंटानें पुढें डच ईस्ट इंडिया कंपनी नांवाची एकच मोठी कंपनी बनविली, ( सन १६०२ ). डच सरकारानें ही गोष्ट फार शहाणपणाची केली. कारण ह्या कंपन्या निराळ्या राहिल्या असत्या तर, त्यांस मोठमोठ्या राष्ट्रांशीं झगडा करितां आला नसता. ही जी कंपनी स्थापन झाली तिला हिंदुस्थानांतील व्यापाराचा संपूर्ण मक्ता एकवीस वर्षेपर्यंत देण्यांत आला. ह्या व्यापाराकरितां आणखी निराळी कंपनी कोणीं काढूं नये असेंही डच सरकारानें फर्माविलें. मुख्य कंपनीवर डच पार्लमेंटाची सक्त देखरेख होती. कंपनीचे हिशेब तपासणें व तिच्या कामगारांनीं सोडलेले हुकूम बरे वाईट कसे आहेत तें पाहणें हीं कामें सरकार करी. कंपनीच्या लोकांनीं फार त्वरेनें मोठें भांडवल जमविलें. तिचें पहिलें भांडवल चौपन्न लक्ष रुपये होतें. डच सरकाराच्या नांवानें युद्ध करून स्पेनची खोड मोडण्याचा डच सरकाराचा मोठा हव्यास होता. स्पेननें हॉलंडांतील लाखों लोकांचे प्राण घेतले होते, त्याची आठवण बुजली नव्हती. त्याचा सूड ह्या कंपनीच्या मार्फत घ्यावयाचा होता. सन १६०२त डच कंपनीनें बँटम् नजीक पोर्तुगीझांचा पराभव करून मसाल्याच्या बेटांस जाण्याचा मार्ग खुला केला. सन १६०३त ते गोव्यावर आले, आणि १६०६त त्यांनीं टगस नदींतून लिस्बनवर मारा चालविला. त्याच वर्षीं जिब्रॉलटरच्या अखातांत त्यांनीं स्पॅनिश आरमारचा संपूर्ण नाश केला. इकडे पूर्वसमुद्रांतील पोर्तुगीझांचीं मोलक्का बेटें त्यांनीं घेतलीं, आणि जपानपर्यंत त्यांनीं आपला अंमल बसविला. डच लोकांचा भिस्त मसाल्याच्या किफायतीवर होती. मसाल्याचा व्यापार दुसऱ्या कोणासही करूं देऊं नये व मोलक्का, अंबोयना, बांडा वगैरे मसाल्याच्या बेटांत दुसऱ्या कोणाचा प्रवेश होऊं देऊं नये, अशी डच सरकाराची आपल्या अधिकाऱ्यांस सक्त ताकीद होती.

२. **पूर्वद्वीपांचा पाडाव.**—लिस्बन व मोलक्का हीं दोन टोकें हस्तगत करून त्यांचे दरम्यान डच लोकांनीं आपलीं मुख्य ठाणीं बसविलीं. सन १६१९ चे सुमारास त्यांनीं जावा बेट काबीज करून तेथचें बंदर बटेविया येथें आपलें मुख्य ठाणें बसविलें. सन १६४१त मलाक्काची सामुद्रधुनी व तो

द्वीपकल्प त्यांचे कबजांत गेला. सन १६३८ ते सन १६५८ पर्यंत पोर्तुगीझ लोकांशीं वीस वर्षे झगडा करून त्यांनीं सीलोन बेट घेतलें. सन १६५२त केप आफ् गुड् होप् येथें त्यांनीं आपली वसाहत केली. सारांश, सन १६४०त पोर्तुगीझ देश स्पेनपासून स्वतंत्र झाला, त्यापूर्वी त्या राष्ट्राची पूर्वेकडील सत्ता डच लोकांनीं सर्व हिरावून घेतली होती. १६४१त त्या दोन राष्ट्रांमध्ये तह होऊन डच लोकांनीं काबीज केलेले प्रदेश त्यांजकडेस कायम झाले आणि पूर्वेकडील समुद्रांत दोनही राष्ट्रांचा संचार निर्वेध चालावा असें ठरलें.

या कामीं डच राष्ट्राचा उद्देश पोर्तुगीझांच्या उद्देशाहून वेगळा होता. आरबांचा व्यापार बुडवून क्रिस्ती धर्माची वृद्धि करावी, आणि नवीन प्रदेश जिंकून पोर्तुगीझ राज्य वाढवावें, हा पोर्तुगीझ लोकांचा उद्देश डच लोकांनीं स्वीकारिला नाहीं. त्यांचा हेतु केवळ व्यापारापुरता होता. त्यांची दृष्टि द्रव्यप्राप्तीकडे असे. व्यापाराचे जिन्नस आपल्याच हातांत राहवे व दुसऱ्या युरोपियन राष्ट्रांस ते मिळूं नयेत, एवढ्यापुरताच ते एकाद्या प्रदेशावर आपला अंमल ठेवीत. कोणत्याही प्रदेशाच्या राज्याच्या अंतर्व्यवस्थेंत ते हात घालीत नसत. त्यांचें मुख्य धोरण असें होतें, कीं पूर्वद्वीपसमूहांतील राजांनीं हॉलंडचें वर्चस्व कबूल करावें; आणि कोणत्याही युरोपियन व्यापाऱ्यांस व विशेषतः इंग्रजांस आपल्या टापूंत येऊं देऊं नये. जसजसा त्या द्वीपसमूहांवर त्यांचा ताबा दृढ होत चालला, तसतसा त्यांचा व्यापार एकहातीं आला. उदाहरणार्थ, एतद्देशीय व्यापाऱ्यांनीं मालाची खरेदी विक्री करणें ती ठरवून दिलेल्या जागांतच करावी; त्यांनीं दुसऱ्या कोणत्याही प्रदेशांशीं मालाची नेआण करूं नये, असें त्यांनीं ठरविलें. डच व्यापारास धक्का बसेल अशीं मसाल्याचीं झाडें कोणीं नवीन लाविल्यास तीं ते टिकूं देत नसत. या पूर्व-समुद्रांत मसाले पिकणाऱ्या द्वीपांचा समूह मोठा आहे. ह्या समूहांत बोर्निओ नांवाचें मोठें बेट असून पश्चिमेकडील बाजूनें सुमात्रा, जावा, फ्लोरिस, तिमोर, या बेटांची रांग आहे. बोर्निओच्या पूर्वेस सेलिबीज बेटें व त्यांच्या पलीकडे मोलक्का म्हणजे मसाल्यांची बेटें असून त्यांत टर्नेट, टायडोर, बांडा, आंबो-

सना, पुलवे, पुलारून, रोझंजीन हीं प्रमुख होत. त्याच्याही पूर्वेस न्यू गिनी नांवाचें मोठें बेट असून पलीकडून फिलिपाईन .बेटांची रांग उत्तरेकडे गेली आहे. सुमात्राच्या वायव्य कोंपऱ्यावर आचिन ( Achin ) नांवाचें बंदर आहे, तें मलाक्का सामुद्रधुनीचें नाकेंच होय. तेथचा सुलतान पोर्तुगीझ लोकांशीं पुष्कळ दिवस लढत होता; आणि त्यासाठीं सन १६००त त्यानें डच लोकांची मदत घेतली. तेव्हांपासून सुमात्रा बेटांतील सर्व लहान थोर राजांस डच लोकांनीं हळूहळू ग्रासून टाकिलें. मलाक्का द्वीपकल्पाच्या पश्चिम किनाऱ्यावर पोर्तुगीझ लोकांचें मलाक्का नांवाचें शहर होतें; आणि त्याच्याच दक्षिणेस पूर्वकिनाऱ्यावर जोहोर नांवाचें शहर असून तेथचा राजा स्वतंत्र होता. सन १६०६त डच लोकांनीं जोहोरच्या राजाशीं संगनमत करून मलाक्का काबीज करण्याचा उद्योग आरंभिला. तो १६४१त सिद्धीस जाऊन मलाक्का डच लोकांच्या स्वाधीन झालें. मलाक्का सामुद्रधुनीप्रमाणेंच सुमात्रा व जावा या दोन बेटांमधील सुंडा नांवाची सामुद्रधुनी फार उपयोगाची आहे. जावाच्या ईशान्य किनाऱ्यावर बँटम येथें एका लहानशा राजाचा अंमल होता. त्या राजाशीं स. १६०९त डच लोकांनीं तह करून हळूहळू जावा बेट व्यापिलें. बँटमच्या पूर्वेस एका खाडीच्या कांठीं जकात्रा नांवाचें एक लहानसें ठिकाण होतें, तें बँटमपेक्षा व्यापाराला ज्यास्त सोयकर आहे असें पाहून, डच लोकांनीं जुनें जकात्रा शहर मोडून तेथेंच बटेविया नांवाचें आपलें नवीन ठाणें बसविलें ( १६१९ ). येणेंप्रमाणें पूर्वेकडील द्वीपसमूहांत प्रवेश करण्याची नाकीं ताब्यांत आल्यावर त्यांनीं आंतल्या द्वीपसमूहांतही अनेक ठाणीं बसविलीं. तेथचे लोक पोर्तुगीझ अंमलास त्रासून गेल्यामुळे ते मोठ्या खुषीनें डच लोकांस सामील झाले, म्हणजे पोर्तुगीझ लोकांपासून बचाव करण्याकरितां तद्देशीय अधिकाऱ्यांनीं डच लोकांचा आश्रय करणें ही डच सत्तेची पहिली पायरी होय. टर्नेटचे राजानें ही गोष्ट प्रथम केली. पहिला तह झाल्यावर पुढें नवीन किल्ले बांधणें व जुने मोडणें हीं कामें डच लोकांनीं केलीं. नंतर आंबोयना बेटांतील लवंगा आपणांस वाटेल त्या दरानें विकतां

याव्या, म्हणून टर्नेट बेटांतील लवंगांची झाडें त्यांनीं उपटून टाकविलीं. अखेरीस सन १६४९त टर्नेटच्या सुलतानानें डच गव्हर्नरास आपला मुख्य प्रतिनिधि नेमिलें. आंबोयनाचा इतिहासही असाच आहे. स. १६००त आंबोयनाचा राजा व डच व्यापारी ह्यांजमध्यें स्नेहभावाचा तह झाला. १६०५त त्यांस किल्ला बांधण्याची परवानगी मिळाली. त्याबरोबर हॉलंडचें वर्चस्व कायम झालें. पुढें आपल्या प्रांतांतील लवंगा दुसऱ्या कोणास विकणार नाहीं असा करार राजानें कबूल करून दिला. असें होतां होतां स. १६१८त डच लोकांनीं आंबोयनावर आपली सत्ता कायम करून तेथील संपूर्ण व्यापार बळकाविला. नंतर तेथें प्रॉटेस्टंट धर्म चालू करण्याची व वेठबिगार घेण्याची परवानगी त्यांनीं तहानें मिळविली.

आरंभीं डच लोकांचा अंमल लोकांस बराच सुखावह होता. त्यांच्या मदतीनें पोर्तुगीझ लोकांनीं चालविलेला कहर आपण दूर केला असें तिकडील लोकांस कांहीं काळ वाटलें. परंतु हा नरम प्रकार फार दिवस टिकला नाहीं. तिकडील लोकांस बळजबरीनें धरून प्रतिबंधांत ठेवणें, तद्देशीय अधिकाऱ्यांस हिंदुस्थानशीं किंवा आशियांतील इतर देशांशीं कोणत्याही प्रकारचें दळणवळण करूं न देणें; धट्याकट्या लोकांस जुलमानें गुलाम करणें, इत्यादि अनन्वित प्रकार डच लोकांनीं पुढें तिकडे चालू केले. आरंभीं फक्त व्यापारापुरतीच त्यांची दृष्टि होती. इंग्रजांशीं त्यांचा झगडा सुरू झाला, तेव्हां त्यांनीं आपला क्रम बदलिला.

**३. डच लोकांचा इंग्रजांशीं झगडा.**—डच लोक म्हणत, कीं आपण य द्वीपसमूहांत प्रथम प्रवेश केला, तद्देशीय लोकांस मदत केली आणि त्यांजबरोबर कायमची व्यवस्था तहानें करून घेतली. सबब त्यांत आपण इंग्रजांचा प्रवेश होऊं देणार नाहीं इंग्रज म्हणत, हीं बेटें स. १५७९त प्रथम इंग्रज खलाशीं ड्रेक ह्यानें शोधून काढिलीं. इकडे तिकडे चार दोन किल्ले बांधिल्यानें तीं संपूर्णपणें डच लोकांचीं झालीं असें होत नाहीं. म्हणून तेथें दोघांचाही हक्क सारखा असावा. ड्रेकच्या संबंधाची इंग्रजांची सबब लंगडी होती. अमुक

प्रदेशांत अमक्यानें प्रथम प्रवेश केला म्हणून त्यावर त्याची मालकी असावी हें तत्त्व इंग्रजांसच पुढें कबूल नव्हतें, आणि हें तत्त्व मोडूनच ते पोर्तुगीझ व इतर लोकांशीं झगडत होते. प्रसंग पडेल त्याप्रमाणें वाटेल तें तत्त्व इंग्रज पुढें करीत. वरील दोन विरुद्ध तत्त्वांचा उपयोग त्यांनीं सोयीप्रमाणें कैकदां केलेला आहे. हीच धरसोड इंग्रज व डच यांजमधील वैराचें मूळ कारण होय. युरोपांत या दोनही राष्ट्रांमध्यें सख्य होतें. दोनही राष्ट्रें प्रॉटेस्टंट पंथांचीं अभिमानी होतीं. स. १६०२त या दोनही राष्ट्रांच्या आरमारांनीं एक-मेकांस मदत करून पोर्तुगीझ लोकांचा पराभव केला होता. या सर्व गोष्टी खऱ्या असल्या, तरी पूर्वद्वीपसमूहांत इंग्रजांचा शिरकाव झाल्यानें डच लो-कांची किफायत टिकणारी नव्हती. इंग्रज थोडथोडें भांडवल जमवून सफरी करीत; आणि बंदरोबंदरीं जाऊन चढाओढीनें वाटेल ती किंमत देऊन माल खरेदी करीत. हें पाहून डच लोक एतद्देशीय लोकांस सांगूं लागले, कीं ' इंग्रज केवळ लुटारू आहेत. हे व्यापाराच्या उद्देशानें इकडे आलेले नाहींत. यांस माल विकूं नका.' परंतु ही फसवणूक फार वेळ टिकली नाहीं. इंग्रज लोक नियमितपणें येऊन योग्य किंमत देऊन माल खरेदी करितात हें एतद्देशीय लोकांस उघड उघड दिसे. पुढें कांहीं काळ एतद्देशीय व्यापाऱ्यांस डच लोकांनीं लांच देऊन पाहिला, तरी इंग्रजांचा व्यापार बंद पडेना. राणी एलिझा-बेथचें स्पेनशीं वैर होतें, परंतु स. १६०३त ती मरण पावल्यावर जेम्स राजा गादीवर येऊन त्यानें स्पेनशीं दोस्तीचा तह केला. हा तह त्या दोन राष्ट्रांतील लोकांस न आवडून यांजमधील प्रेमभाव कमी झाला; धर्माचें नातें ढिलें पडलें; आणि व्यापार व किफायत यांशिवाय त्यांस दुसरें कांहीं दिसेना.

आरंभीं इंग्रज कंपनी दुर्बल होती. एलिझाबेथ राणी मरून गेली. राजा जेम्सचें धोरण तिच्यासारखें निश्चयाचें नव्हतें. डच लोक नुकतेच स्वतंत्र होऊन ताज्या दमांत होते. इंग्रज कंपनी थोडथोडें भांडवल जमवून सवडी-प्रमाणें एखादी सफर करून त्याचा निकाल झाल्यावर मग दुसरी सफर अंगावर घेई, एकसारखा सतत तो उद्योग चालवीत नसे. परंतु डच लोकांनीं १६०२त

एकच मोठी खंबीर राष्ट्रीय कंपनी स्थापन केली. पृथक् सफरींचा आपला प्रघात सोडून देण्यास इंग्रजांस आणखी १० वर्षे लागलीं. तरी इंग्रज लोक पूर्व द्वीपांतील तद्देशीय राजांच्या भांडणांत डच लोकांच्या विरुद्ध वागूं लागले. सुमात्राच्या राजास इंग्रज बायको हवी होती ती आणून देण्याचें इंग्रजांनीं अभिवचन दिलें. त्याप्रमाणें एक मुलगी पसंत करण्यांत आली. पण तिचें पुढें काय झालें तें कळत नाहीं. युरोपियन राज्यकारणांमुळेंही इंग्लंड व हॉलंड यांमध्यें वैमनस्य पडत चाललें होतें. भावी चिन्ह ओळखून डच सरकारानें पीटर बोथ ( Pieter Both ) नांवाचा एक हुशार गृहस्थ आपल्या प्रदेशांचा गव्हर्नर जनरल नेमून इकडे पाठविला. तो आठ जहाजें बरोबर घेऊन स. १६११त बँटम येथें आला. पुढील चार वर्षांत त्यानें सर्व बेटें तहांच्या जाळयांत गुंतवून घेतलीं. एवंच जावापासून मोलक्का पावेतोंच्या टापूंत आपला व्यापार व सत्ता त्यानें कायम केली. पूर्वेकडील समुद्रांत डच सत्ता स्थापन करणारा हाच पहिला पुरुष होय. स. १६१५त तो परत येत असतां मॉरिशस बेटानजीक वादळांत सांपडून मरण पावला. पोर्तुगीझ लोकांस मलबार किनाऱ्यावर त्रास पडला तसा डच लोकांस पूर्वद्वीपसमुद्रांत पडला नाहीं, त्याचें कारण तेथील राजे अगदींच लहान व एकमेकांपासून अलग होते. इंग्रज लोकांनीं प्रथम तिकडे जोराचा प्रयत्न केलाच नाहीं. स. १६१० पर्यंत सगळीं सतरा जहाजें काय तीं इंग्रजांनीं तिकडे पाठविलीं. त्यांत सुद्धां एका वेळीं अशीं थोडींच तिकडे होतीं. डच लोकांचीं सन १६०२ पावेतों इकडे ६५ जहाजें आलीं, आणि स. १६०२ पासून १६१० पर्यंत ६९ आलीं. शिवाय इंग्रजांकडे लढाऊ लोक व हत्यारें फारच कमी होतीं; डच लोकांच्या कंपूंत शिस्त व नीति इंग्रजांपेक्षां चांगली होती. इंग्रज कंपनीनें हॉलंडांतील सरकारापुढें आपल्या तक्रारी ठेवून पाहिलें, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. पुढें जेम्स राजानें ह्या तक्रारी आपसांत मिटविण्याचा प्रयत्न चालविला. त्यामुळें दोन विरुद्ध प्रकार उपस्थित झाले. युरोपांत हॉलंडच्या व इंग्लंडच्या सरकारांमध्यें तहाची बोलाचाली, व पूर्वेकडील समुद्रांत उभयतांत युद्धप्रसंग. दोनही सरकारांनीं

वाटेल तितकी खटपट करून स्नेह जोडिला, तरी तो कागदावरच राहत असे. ह्याचें मुख्य कारण, स्पेनशीं जेम्सचा स्नेहभाव होता, तो हॉलंडास खपत नव्हता. स्पेनपोर्तुगालशीं लढण्याकरतां हॉलंडचे लोक अतोनात पैसा खर्च करीत होते, तसा खर्च करण्यास इंग्रज तयार नव्हते. स. १६१३–१४–१५ साली लंडन व आम्स्टर्डाम येथें दोनही राष्ट्रांचे वकील तहाची वाटाघाट करीत होते. पण त्याजपासून कांहीं निष्पत्ति झाली नाहीं. ह्याच सालांत मसाल्याच्या बेटांत बांडा, आंबोयना, जावा इत्यादि ठिकाणीं, दोनही राष्ट्रांचे लोक अगदीं वर्दळीस आले होते. इंग्रज म्हणत 'आमचा एक डोळा फोडण्यासाठीं हे डच आपले दोनही डोळे फोडून घेतील.' शिव्यागाळी भांडाभांडी वगैरे प्रकार तर हरहंमेशचे होते. स. १६१४ व १५ ह्या दोन वर्षीं जेरार्ड रेन्स्ट् हा डच गव्हर्नर जनरल होता. तोही बोथसारखाच हुशार व अधिकार गाजविणारा होता. तो इकडेच मरण पावल्यावर लॉरेन्स रिआल नांवाचा तिसरा ग० ज० झाला. त्याने किल्ले वगैरे बांधून डच लोकांची सत्ता पुष्कळ मजबूद केली.

इकडे इंग्रजांचेंही प्राबल्य हळूहळू वाढत होतें. स. १६१३–१६ च्या समाईक भांडवलाच्या ( Joint-Stock ) व्यापारांत त्यांस चांगलीच किफायत होऊन स. १६१७त त्यांच्या भांडवलाचा भाव शेंकडा २०७ होता. मात्र त्यांचें महत्त्व पूर्वेकडे मसाल्यांच्या बेटांत मोठेंसें नव्हतें. सर टॉमस रोच्या वकिलातीनें हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यावर त्यांचें बस्तान चांगलें बसत चाललें होतें. म्हणून स. १६१७–२० पावेतोंच्या चार वर्षांकरतां दुसरें समाईक भांडवल जमविण्यांत आलें, तेव्हां मोठमोठ्या इंग्रज लोकांनी हांहां म्हणतां दीडकोटि रुपयांच्या वर भांडवल जमविलें. पण इतक्या पैशानेंही डच लोकांचा नकशा उतरणारा नव्हता. डच लोकांच्या कंपनीची व्यवस्था तेथील सरकाराच्या ताब्यांत असल्यामुळें, तिच्या कृत्यांस सर्व डच राष्ट्राचें पाठबळ असे. इंग्रज कंपनीस सरकाराचें पाठबळ तर नव्हतेंच, पण शिवाय आरंभाच्या निरनिराळ्या सफरी व अलीकडच्या चार चार वर्षांच्या समाईक भांडवलाच्या सफरी ह्यांच्या योगानें त्यांच्या व्यवस्थेंत एक धरबंध राहत नसे.

हा इंग्रज कंपनीच्या व्यवस्थेंतील दोष तिला फार दिवस नडला. ठरीव मुदतींत होईल तितका नफा करून घ्यावा हें इंग्रज व्यापाऱ्यांचें आरंभीं धोरण असून किल्ले वगैरे कायमचा बंदोबस्त करण्यास ते धजत नसत. दरबारांतील निरनिराळया पक्षांचा त्यांस जाच सोसावा लागे. जेम्स राजा स्कॉटलंड व इंग्लंड दोनही देशांचा कारभार पाहत होता. स्कॉटलंडांत एक कंपनी स्थापन झाली तिला सन १६१७त राजानें व्यापाराची सनद करून दिली, त्यामुळें पहिल्या कंपनीचें धाबें दणाणलें. स्कॉट लोकांचें इंग्रजांशीं चांगले नव्हतें आणि धर्मसंबंधांत ते डच लोकांस सामील होण्यास तत्पर होते. सन १६१८त लंडन कंपनीनें स्कॉच कंपनीचें नुकसान भरून दिलें, तेव्हां त्या स्कॉच कंपनीची सनद राजानें रद्द केली.

इकडे १६१८त डच व इंग्रज यांजमध्यें मोठाच तंटा सुरू झाला. आदल्या वर्षी इंग्लंडांत बातमी आली कीं आंबोयनांत चाळीस पन्नास इंग्रज लोकांस डचांनीं पकडून कैदेंत उपाशीं ठेविलें आहे; इंग्रजांचीं ठाणीं त्यांनीं काबीज केलीं आहेत; त्यांचीं दोन जहाजें हल्ला करून पकडून त्यांजवरील खलाशांस कैद केलें आहे, इत्यादि तक्रारी इंग्रज कंपनीनें आपल्या राजापुढें ठेविल्या. तेव्हां सन १६१८त पुनरपि तडजोड सुरू होऊन हॉलंडचे दहा वकील लंडनास आले. सन १६१९च्या जुलईंत तह कायम झाला, त्यांत डच लोकांचीच बहुतेक सरशी झाली. डच लोकांकडून इंग्रज कंपनीचें सालिना सुमारें दहा लाख रुपये नुकसान होत असे, तें भरून न मिळतां उलट पूर्वेकडील द्वीपसमूहांत इंग्रजांचा कांहींच हक्क त्या तहानें राहिला नाहीं. एकमेकांचीं जप्त केलेलीं जहाजें व माल मात्र एकमेकांस परत मिळून दोघांचाही व्यापार पूर्वसमुद्रांत चालावा, आणि दोघांनीं आपापलीं दहा लढाऊ जहाजें तिकडे कायमचीं ठेवून द्यावीं असें ठरलें. हा तह वीस वर्षेपर्यंत चालावयाचा होता; आणि त्याच्या बजावणीकरितां प्रत्येक राष्ट्राचे चार चार पंच नेमिलेले होते. हा तह इंग्रज व्यापाऱ्यांस बिलकुल पसंत पडला नाहीं, आणि त्याचा उपयोगही झाला नाहीं. बांडा व आंबोयना येथील लवंगांच्या व्यापारांत आपणांस

भाग असावा आणि बटेवियानजीक आपलेंही एक मजबुदीचें ठिकाण असावें, अशा इंग्रजांच्या दोन मोठ्या मागण्या होत्या. जावा बेटाच्या मसाल्यांत वरील तहानें इंग्रजांस सारखा हक्क दिलेला होता. पण आंबोयना व बांडा या महत्त्वाच्या ठिकाणीं त्यांचा हिस्सा फक्त एक तृतीयांशच होता ह्या बेटास जाण्याचा रस्ता अगदीं दक्षिणेकडूनही होता, म्हणून तीं इंग्रजांच्या स्वाधीन झालीं तर जावा, सुमात्रा वगैरे ठिकाणच्या आपल्या व्यापारास धक्का पोंचेल अशी डच लोकांस भीति पडली. तेव्हां बांडा, आंबोयना वगैरे बेटें इंग्रजांस मिळूं नयेत, अशी त्यांची खटपट चालली. ह्या द्वीपसमूहांत त्या वेळीं दोनही राष्ट्रांचीं आरमारें होतीं. दोघांच्याही फौजा बहुतेक सारख्याच होत्या.

त्या वेळीं तत्कालीन घडामोडींत प्रसिद्धीस आलेला कोन ( Coen ) नांवाचा एक फार हुशार डच गृहस्थ इकडे त्यांचा अधिकारी होता. त्याचा जन्म सन १५८७तला असून त्याचें लहानपणचें शिक्षण रोम येथें एका प्रसिद्ध व्यापारी पेढींत झालें होतें. पुढें सन १६०७त तो पूर्वेकडील डच वसाहतींत आला. १६१३त बँटमचा प्रेसिडेंट होऊन १६१७त त्यास गव्हर्नर जनरलची जागा व संपूर्ण अधिकार मिळाले. पोर्तुगीझांचा आल्बुकर्क, फ्रेंचांचा डुप्ले, व डचांचा कोन हे त्या त्या राष्ट्रांचे पुरुष इकडील उद्योगांत प्रमुख समजले जातात. डच लोकांचें राज्य इकडे स्थापन करावें अशीच कोनची महत्त्वाकांक्षा असून त्यास कंपनीचें व सर्व राष्ट्राचेंही पाठबळ होतें. त्यानें १६१८ ते १६२३ व १६२७ पासून १६२९ पावेतों इकडे कारभार केला; आणि जावा बेटांत बटेवियाची स्थापना करून तेथें मजबूद तटबंदी केली. इतक्यांत उभयतांचा विलायतेंत तह झाल्याची बातमी आली. त्या तहांतील संदिग्धपणाचा फायदा घेऊन कोननें नानातऱ्हेचे बेत चालविले. कंपनीच्या संरक्षणार्थ दोघांचींही जहाजें असावींत असें ठरलेलें होतें. पण कोन दोनही आरमारांचा उपयोग डच सत्ता वाढविण्याकडे करूं लागला. तथापि सर्वांत तंट्याचें मुख्य बीज असें उत्पन्न झालें, कीं ह्या मुलखांत सार्वभौम सत्ता कोणाची चालावी, आणि कायदे कोणत्या राष्ट्राचे चालावे ? कोननें डच सत्ता प्रमुख समजून हॉलंडचे कायदे

सुरू केलें, त्यामुळें इंग्रजांस जाच होऊं लागला. सारांश, १६१९चा तह फायदेशीर न होतां उलट त्यानें पूर्वींच्या भांडणांत भरच घातली. ही गोष्ट इंग्रज सरकारासही लवकरच कळून आली.

**४. तंट्याचा अतिरेक, आंबोयनांतील कत्तल.**—वरील तह झाला नसता तर त्यापूर्वींच इंग्रजांस डच लोकांनीं पूर्वद्वीपांतून कायमचें काढून लाविलें असतें. कोननें आपल्या सरकारास कळविलें, कीं 'इंग्रज लोक ह्या द्वीपांतून स्वेच्छेनेंच निधून जाण्याच्या अगदीं बेतांत आले होते, पण या तहानें तुम्हीं त्यांस पुनः आश्रय दिल्याबद्दल त्यांनीं तुमचे आभारच मानिले पाहिजेत.' इंग्रज लोकांची वसती बँटम येथें होती, पण कोननें बटेविया येथें त्यांस आपल्या नजरेखालीं आणिलें. तेथें इंग्रजांस इतका त्रास पोंचूं लागला, कीं बहुतेक इंग्रज हळूहळू जावा बेट सोडून हिंदुस्थानांत येऊं लागले. तद्देशीय रहिवाशांपेक्षांही इंग्रजांची स्थिति निकृष्ट झाली. इंग्रज वखारींतील कारभारी क्लार्क ह्यास त्यांनीं भर बाजारांत चाबकांनीं मारिलें आणि त्याचें मांस तोडून त्याच्या जखमांत मीठ व आंब भरली. इंग्रज पहारेकऱ्यांस त्यांनीं आठ दिवस अटकेंत ठेविलें. ज्या गोष्टींत डच लोक कायदा म्हणून बजावीत, तीच गोष्ट इंग्रजांस जुलमासारखी वाटे. 'ह्या दुःसह जाचांतून आम्हांस सोडवा', अशा तऱ्हेच्या विनवण्या इकडील इंग्रजांकडून इंग्लंडास जाऊं लागल्या. इंग्रजांविरुद्ध पुरावा देण्यासाठीं डच लोक तद्देशीय लोकांना जाच करूं लागले. बांडा, आंबोयना इत्यादि बेटांवर दोनही राष्ट्रांचे अधिकारी आपले हक्क सांगत होते. स. १६२१त डच लोकांनीं पुलारून बेटांतून इंग्रजांस घालवून दिलें. आंबोयना बेटांत इंग्रजांची एक वखार होती. हर्मन व्हान स्प्युल्ट् (Herman Van Speult) हा तेथचा डच गव्हर्नर निष्पक्षपाती म्हणून नांवाजलेला होता. सन १६२३ च्या जानेवारींत गव्हर्नर जनरल कोन युरोपास गेला, तेव्हां त्यानें असें फर्माविलें कीं, 'आंबोयना येथें इंग्रजांचा मुळींच शिरकाव होऊं देऊं नका. त्यांना शत्रूंसारखें वागवा. त्यामुळें कसाही बनाव बनला तरी त्याविषयीं मुळींच फिकीर बाळगूं नका'.

वास्तविक कोनच्या कारभाराचें धोरण या वाक्यांतच स्पष्ट होत आहे. स. १६२३च्या आरंभीं आंबोयना वगैरे सर्व बेटें डच लोकांच्या ताब्यांत आलीं. त्या वेळीं आंबोयना येथें दोनशें डच व तीन चारशें जपानी वगैरे एतद्देशीय एवढेंच लष्कर होतें. शिवाय बंदरांत त्यांचीं आठ जहाजें होतीं. इंग्रजांच्या वखारींत अठरा इंग्रज लोक होते. त्यांच्या ताब्यांत तीन तलवारी, दोन बंदुका व अदशेर दारू होती. त्यांना मदत म्हटली तर जवळच्या बांडा बेटांत असलेल्या नऊ इंग्रजांची असून इंग्रजांचा मुख्य प्रेसिडेंट जावा येथें होता. त्यानें बांडा व आंबोयना येथील सर्व इंग्रजांस आपल्याकडे निघून येण्याविषयीं हुकूमहि पाठविले होते, परंतु ते वेळेवर येऊन पोंचले नाहींत फेब्रुवारी तारीख १० सन १६२३ रोजीं रात्रीं डच लष्करांतील एका जपानी शिपायानें एकंदर संत्री किती आहेत, पहारे केव्हां बदलावयाचे, वगैरे विचारपूस केली. दुसऱ्या दिवशीं गव्हर्नरानें त्यास याबद्दल विचारिलें, तेव्हां तो म्हणाला, 'मीं हे प्रश्न सहजगत्या विचारिले, त्यांत विशेष कांहीं हेतु नव्हता.' एकेकाला पहारा किती वेळ करावा लागेल हें समजण्याकरितां असली विचारपूस पहारेकरी सहज करीत असतात. पण गव्हर्नर स्प्युल्ट यास आपल्यावरील निष्पक्षपाताचा कलंक धुऊन काढावयाचा होता, त्यास ही संधि आयतीच सांपडली. त्यानें त्या जपानी पहारेकऱ्याचे हाल करून त्याजपासून इंग्रजांविरुद्ध पुरावा लिहून घेतला. डच कायदा असा आहे, कीं कोणापासून जबरदस्तीनें पुरावा घेण्यांत आल्यास तो पुरावा निदान चोवीस तासांनंतर त्यास पुनरपि वाचून दाखवून मग त्यावर त्याची सही घ्यावी. त्या जपानी शिपायानें आणखी दुसऱ्या आठ नऊ जपान्यांचीं नांवें पहिल्यानें सांगितलीं होतीं. त्यांजवरही जुलूम करून इंग्रजांविरुद्ध गव्हर्नरानें पुरावा घेतला. त्यांना डागल्यामुळें ते रडत ओरडत होते, तशाच स्थितींत त्यांस उचलून तुरुंगांत नेलें. ह्या पुराव्यावरून असा प्रकार जुळविण्यांत आला, कीं एखादें इंग्रज जहाज येतांच किंवा गव्हर्नर दुसरीकडे जाईल तेव्हां, आंबोयनाच्या किल्ल्यावर हल्ला करून तो कार्बीज करावयाचा, असा त्या अठरा इंग्रज लोकांनीं वर्षारंभाच्या दिवशीं

शपथा घेऊन बेत केला होता, आणि त्यासाठीं जपानी शिपायांस फितूर करण्याचें प्राइस नांवाच्या एका इंग्रज हजामापासून त्यांनीं वचन घेतलें होतें. दारूच्या नादांत या हजामानें गैरकायदा वर्तन केल्यामुळें तो या वेळीं तुरुंगांत होता. ता. १५ फेब्रुवारी रोजीं त्याची जबानी घेऊन जबरदस्तीनें त्यास वरील प्रकार कबूल करण्यास लाविलें. हा प्रकार त्या इंग्रज लोकांस कळला. परंतु ५०० लष्कर व ८ जहाजें यांच्यासमोर १८ असाम्यांनीं लढून किल्ला घेणं ही गोष्ट असंभाव्य असल्यामुळें ते बेफिकीर होते. तथापि घेतलेल्या पुराव्याचा उपयोग करून त्या गव्हर्नरानें इंग्रजांचा कारभारी टॉवरसन व बाकीचे सतरा असामी यांस बिड्या घालून कैदेंत ठेविलें. पुढें चौकशी सुरू झाली. वखारींत किंवा कोणापाशीं एका ओळीचाही पुरावा मिळाला नाहीं. प्रथम बोमंट व जॉन्सन या दोन इसमांस पुढें आणिलें. बोमंट ह्यास बाहेरील दालनांत ठेवून जॉन्सन ह्यास आंतल्या खोलींत नेलें. लगेच जॉन्सन केविलवाणी रडत आहे असें बोमंट यास ऐकूं आलें. एक तासानें जॉन्सन सर्वांगावर भाजलेला ओलाचिंब असा बाहेर आला. हें पाहून एडवर्ड कॉलिन्स नांवाच्या इसमानें एकदम सर्व गोष्टी कबूल केल्या, ह्मणून त्यास जाच झाला नाहीं. तथापि त्यासही प्रथम दुःख सहन करावें लागलें, आणि तें चुकविण्याकरितां त्यानें सर्व कबूल केलें. हा क्रूरपणाचा प्रकार ता. १५ फे० पासून ता. २३ पावेतों चालला होता. यातना चुकाव्या ह्मणून बापडे एका तोंडानें सर्व बेत कबूल करीत व लगेच दुसऱ्या तोंडीं आह्मी खोटें बोललों असें ह्मणत. जॉन वेट्रल ह्यास चार वेळां उलटें टांगलें. आपण काय बोलावें हेंही त्यास कळेना. कारण डच लोकांचे मनांत काय पकार सिद्ध करावयाचा आहे ह्याची त्यास खबरच नव्हती. शेवटीं पहिल्या साक्षीदारांच्या जबान्या त्यास वाचून दाखविल्या, तेव्हां त्यानें सर्व गोष्टींस 'होकार' दिला. 'मला सांगा काय लिहूं तें व काय बोलूं तें, ह्मणजे एकदम तसें करितों,' असें प्रत्येक इसम सांगे. जॉन क्लार्कनें इतक्या यातना सहन केल्या, कीं 'हा कोणी भूत आहे किंवा चेटकी आहे' असेंच डच लोकांस वाटून त्यांनीं त्याची हजामत केली, जणूं काय त्याच्या केसांत

चेटक भरलेलें होतें. नंतर पुनः त्याजवर प्रयोग चालविला. पायांस, हातांस कोंपरावर व काखेंत मेणबत्त्यांचे चटक्यांनीं भाजून आंतील मांस बाहेर काढिलें. ह्या जखमा धुऊं देत नसत, किंवा त्यांस औषधपाणी करीत नसत. शेवटीं त्यांत किडे पडून ते सर्वांगावर चालून दुर्गंधी सुटली. अशा प्रकारचा क्रूरपणा केल्याचें डच न्यायाधीश कबूल करीत नाहींत, मात्र थोडा ब . केला असें ते मोघम म्हणतात. पण प्रत्यक्ष हजर असलेल्यांच्या तोंडून खरा प्रकार बाहेर आला आहे. प्रथम ते गुन्हेगारास हात उलटे वर करून दरवाज्यांत पक्ष्यासारखा लोंबत टांगीत. नंतर सर्व डोक्यावरून मानेपर्यंत रुमाल बांधीत. मग त्या रुमालावर हळूहळू पाणी ओतीत; त्यायोगें त्याचें अंग सुजून पहिल्याहून दुप्पट तिप्पट मोठें होई; आणि डोळे पुढें गळून पडल्यासारखे होत. शेवटीं जीव गुदमरून शरीर फुटण्याचे बेतांत येई. हा पाण्याचा प्रकार झाला. विस्तवाचा प्रकार असा, कीं मनुष्यास टांगल्यावर त्याच्या नाजूक भागांस विस्तव लावावयाचा. अशा प्रकारच्या यातनांमुळें त्यांपैकीं कोणांतच त्राण राहिलें नाहीं. या भयंकर प्रसंगांत इंग्रज लोक असतां, त्या सर्वांस इकडे पाठवून द्यावें म्हणून जावाच्या प्रेसिडेंडाचें पत्र आलें. गव्हर्नर स्प्युल्ट्नेंच कबूल केलें आहे, कीं हें पत्र आपण वाचलें. असें असून त्यानें पुढील कृष्ण कृत्य केलें. त्यांत डच कायदाही त्यानें तोडिला. ह्या सर्वांस फांशीची शिक्षा द्यावी म्हणून डच वकिलानें जज्जापाशीं मागणी केली, त्याप्रमाणें ता. २३ फेब्रुवारी रोजीं थोडी मंडळी खेरीज करून बाकीच्या सर्वांस फांशीची शिक्षा सांगण्यांत आली. वरील गुप्त कट झाला त्या वेळेस जे इंग्रज आंबोनिया येथें नव्हते, त्यांस सोडून देण्यांत आलें. दुसऱ्या तिघांपैकीं प्रत्येकाच्या नांवानें चिठ्या टाकून बटेवियाच्या गव्हर्नर जनरलाकडे वाटेल ती शिक्षा करण्यास रवाना करण्यांत आलें. टॉवरसननें आपल्याला झालेल्या अन्यायाबद्दल एक वाक्य एका बिलावर हळूच एका बाजूस लिहिलेलें उपलब्ध झालें आहे. ‘मी सर्वथैव निरपराधी आहें. परमेश्वर माझ्या शत्रूंना क्षमा करो आणि मला आपल्या कृपाछत्राखालीं घेवो.’ अशाच तऱ्हेचा आणखी पुरावा गुप्त रीतीनें ठेवलेला उघडकीस आला

आहे. तारीख २६ फेब्रुवारी रोजीं किल्ल्याच्या दालनांत शिक्षा भोगण्यासाठीं त्यांना आणिलें. तेथून टॉवरसनला माराच्या खोलींत नेऊन दोन घागरी पाणीही आंत नेलें. तेथें त्याचा पुष्कळ छळ झाला. कारण टॉवरसन मुळींच कबूल होईना. इतरांचीही तीच अवस्था झाली. पुढें ती रात्र त्यांनीं प्रार्थना करण्यांत घालविली. ता. २७ रोजीं दहा इंग्रज, नऊ जपानी व एक पोर्तुगीझ यांस शहरांतून मिरवीत वधस्थळीं आणिलें. तेथें दवंडी पिटवून लोक जमविले होते, त्यांच्या देखत त्या सर्वांचा शिरच्छेद करण्यांत आला. राहिलेल्या लोकांस बटेविया येथें रवाना केलें. अशा रीतीनें मसाल्याच्या बेटांतील इंग्रजांची कारकीर्द संपली.

**५. सुडाची अनास्था.**—आंबोयनांतील ही कत्तल व तिच्यापासून उत्पन्न होणारे राजकीय प्रश्न ह्यांविषयीं इंग्रजी भाषेंत इतके ग्रंथ व लेख लिहिलेले आहेत, कीं यूरोपच्या राजकीय व्यवहारांत ह्या गोष्टीस एवढें महत्व मिळाल्याबद्दल आश्चर्य वाटतें. आंबोयनांतील अठरा इंग्रजांच्या कत्तलीपेक्षां ज्यास्त भयंकर प्रकार इंग्रजांनीं व इतर युरोपियनांनीं इकडे थोडेथोडके केले आहेत असे नाहीं. पण कातडीच्या वर्णभेदामुळें त्यांचें महत्त्व कमी झालें आहे. आंबोयनांतील भयंकर अनर्थाचा सूड अनेक कारणांमुळे मागें पडला. आधींच इंग्लंडास ही बातमी पोंचण्यास पंधरा महिने लागले ( मे १६२४ ). प्रथम हा प्रकार कोणास खराच वाटला नाहीं. पण पुढें जेव्हां पुराव्यानिशीं सर्व गोष्टी बाहेर आल्या, तेव्हां हें प्रकरण इंग्रज कंपनीनें आपल्या राजापुढें मांडिलें. राजानें एकदम सूड घेण्याचा निश्चय केला. पण त्याच संधीस स्पेनच्या राजाशीं जेम्सचें फाटलें होतें, आणि हॉलंडचे वकील तह करण्याकरितां लंडनास आले होते. अशा संधीस राजा जेम्स व त्याचे प्रधान व सल्लागार यांनीं लगेच आपले अश्रु पुसून डच वकिलांच्या हातांत हात घातले व त्यांचा स्नेह संपादिला. डच वकील सुद्धां, ‘ राजा किती थोर मनाचा आहे, त्यानें आंबोयना येथील क्रूरपणाविषयीं एक ब्र सुद्धां काढिला नाहीं, ’ अशी जेम्सची स्तुति करीत स्वदेशीं परत गेले. परंतु इंग्रज राष्ट्र मात्र डच लोकांविरुद्ध अत्यंत खवळून गेलें.

कंपनीनें सूड घेण्याकरितां राजाला एक अर्ज केला आणि कांहीं मंडळी मुद्दाम जाऊन राजाला भेटली. तेव्हां राजाचाही इलाज चालेना. राजानें आपल्या हॉलंडच्या वकिलास लिहिलें, कीं डच सरकारापासून जाब मागवावा; नाहीं तर आम्ही वाटेल त्या डच लोकांचा शिरच्छेद करूं किंवा युद्ध सुरू करूं.' ह्या शब्दांनीं डच सरकाराची अगदीं तारांबळ उडून गेली. गव्हर्नर स्प्युल्टनें राष्ट्रावर नसतें संकट ओढून घेतलें म्हणून त्याजला डच सरकारानें ठपकाही दिला. परंतु जेम्सचें शौर्य डच लोकांस माहीत होतें. तो बोलण्यांत मोठा शूर, पण कृतींत अगदीं नेभळा होता हें ते जाणून होते. म्हणून 'आज जबाब देतों, उद्यां देतों,' अशा खालीं त्यांनीं वेळ काढिला, आणि बटेविया येथें असलेल्या इंग्रजांस सुरक्षितपणें बाहेर पोंचवून दिलें. अशा वाटाघाटींत पांच सात महिने निघून गेले; जेम्स राजा मरण पावला, (मार्च १६२५). इतक्या अवधींत आंबोयनांतील खडानखडा हकीकत इंग्लंडांत सर्वतोमुखीं झाली. टॉवरसनची गोष्ट ऐकून तर लोकांस मोठाच कळवळा आला. इ. स. १६०४त टॉवरसन इंग्लंड सोडून बाहेर पडला तो निरनिराळ्या ठिकाणीं अठरा वर्षें उत्तम प्रकारें काम केल्यावर, आंबोयना येथें मुख्य एजंट झाला. त्यास दरमहा १५० रुपये पगार होता. पण भोळेपणानें वागून त्यानें डच गव्हर्नर स्प्युल्ट्शीं दोस्ती संपादन केली, आणि आपलें सर्व हितगूज त्यास सांगितलें. इतकेंच नव्हे तर स्प्युल्ट्च्या सुस्वभावाची तारीफ तो बटेव्हिया येथील इंग्रज प्रेसिडेंटास वारंवार लिहून पाठवीत असे. 'आपण स्प्युल्ट् ह्यास एक सलामालकीचें पत्र पाठवा व कांहीं दारूच्या बाटल्या नजर करा,' असें त्यानें इंग्रज प्रेसिडेंटास लिहिलें होतें. प्रेसिडेंटानें टॉवरसन यास जबाब पाठविला, कीं 'अशा बाबतींत स्प्युल्ट् चांगला दिसतो, पण तो आंतल्या गांठीचा आहे. त्यास आम्ही कांहीं नजर पाठविण्याची जरूरच नाहीं. पण तुम्ही मात्र त्याच्या गोड शब्दांनीं फसूं नका म्हणजे झालें.' पुढच्या महिन्यास त्यास प्रेसिडेंटचा हुकूम गेला कीं 'तुम्ही आंबोयना सोडून निघून यावें.' इकडे टॉवरसनचा भोळेपणा चालूच होता. अशा या सुस्वभावी गृहस्थाचा घात केल्याबद्दल लोकांस मोठी चीड आली.

इकडे इंग्लंडांत आंबोयनाच्या कत्तलीचीं नाटकें सुरू झालीं, आणि लंडनांतील डच लोकांस बाहेर पडण्याची भीति वाटूं लागली. अशा स्थितींत पहिला चार्लस् गादीवर आला. स्पेनशीं वांकडें असल्यामुळें त्यास हॉलंडशीं स्नेह पाहिजे होता. म्हणून हॉलंडांतील इंग्रजांचा वकील सर डड्ले कार्ल्टन ह्याजपुढें दोन विरुद्ध कामांची मोठी पंचाईत येऊन पडली. तेव्हां राजानें डच सरकारास आंबोयनाबद्दल जबाब देण्यास दीड वर्षांची मुदत दिली; आणि कशी तरी कंपनीची समजूत केली. ह्या दीड वर्षांत चार्लस्चें पार्लमेंटाशीं भांडण लागून फ्रान्सशीं युद्ध सुरू झालें. अर्थात् आंबोयनाचें काम मागें पडलें. डच सरकारानें कोन थास पुनरपि गव्हर्नर जनरल नेमून पूर्वेकडे पाठविलें. तेथें इंग्रजांनीं त्यास आंबोयनाचें स्मरण दिल्यावर 'आम्ही तें सर्वच काम न्यायाच्या कोर्टांत पाठविलें आहे' असा त्यांस जबाब मिळाला. राजा व पार्लमेंट यांचें इंग्लंडांत भांडण वाढत चाललें तेव्हां कंपनीची दाद कोण घेतो! क्षुल्लक प्रश्नांच्या वाटाघाटींत वर्षेंच्या वर्षें गेलीं. आंबोयनांतील मुख्य गुन्हेगार अधिकारी हॉलंडांत परत आले आणि त्यांचा त्या राष्ट्रानें बहुमान केला.

आंबोयनाच्या या घोर प्रकरणाबद्दल इंग्रजांस न्याय न मिळण्याचें मुख्य कारण स. १६१९ तला घोटाळ्याचा तह होय. दिवाणी फौजदारी गुन्ह्यां-संबंधीं त्यांत एक अक्षरही नव्हतें. आणि दुसरें कारण, इंग्रजांची माहिती नेहमीं अपुरी असे, आणि डच लोक प्रत्येक कामांत पुरे वाकब असत. कोणाचा स्वभाव कसा आहे, कोणाची काय अडचण आहे, कोणता जबाब दिला असतां निसटून जातां येईल, हें सर्व त्यांस यथास्थित समजे. शिवाय डच लोकांची कंपनी म्हणजे सर्व डच सरकार, व डच सरकार म्हणजे डच राष्ट्र असा प्रकार होता, तसा इंग्रजांचा नव्हता. इंग्लंडांत इंग्रज कंपनीची तरफदारी कोणी करीत नसे. हा आंबोयनाचा प्रकार वाचून, राजकीय बाबतींत कसे घोटाळे होतात हें चांगलें कळून येईल. शिवाय त्या वेळचा युरोपचा कायदा व त्याची बजावणी ह्यांचा सुद्धां ह्या प्रकरणांत पुष्कळ संपर्क पोंचतो. लोकांचे हाल करून त्यांची कबुली घेणें हा प्रकार युरोपियन कायद्यांत त्या वेळीं प्रच-

लित होता. इंग्लंडांतही असे हाल करीत असत. राजा जेम्सनें तर अनेक प्रसंगीं अशा प्रकारांचा उपयोग केला आहे. शिवाय त्या वेळच्या व्यापाराच्या पद्धतींत एकाच इसमास व्यापार, युद्ध, न्याय वगैरे निरनिराळीं कामें एकाच वेळीं करावीं लागत; त्यामुळें एका कामांतले रागद्वेष दुसऱ्या कामांत बाजूस ठेवणें संभवनीय नव्हतें. मुख्य मुद्दा असा, कीं इंग्रज लोक पूर्णपणें निरपराधी आहेत हें सर्व डच मंडळीस ठाऊक होतें. डच दप्तरांतील कागदांतूनच ही गोष्ट सिद्ध होत आहे.ऐब्रॅक ब्रून नांवाचा डच अकाउंटंट आंबोयना येथें होता,त्याचें हें सर्व कृष्ण कृत्य होतें. व्हॅन स्प्युल्ट्ला आरंभीं जरी इंग्रजांचा संशय आला असला, तरी सर्व प्रकाराचा तपास झाल्यावर त्याच्या मनांत इंग्रजांबद्दल कांहींच संशय उरला नव्हता. परंतु एकदां केलेला उपक्रम मागें घेण्याइतकें त्याच्यांत धाडस नव्हतें. सर्व इंग्रजांस बटेव्हिया येथें पाठवून द्यावें, ते आपखुशीनेंच आंबोयना सोडण्यास तयार आहेत, असें बटेव्हियाच्या प्रेसिडेंटानें स्प्युल्ट् ह्यास पाठविलेलें पत्र त्यानें छपवून ठेविलें, एवढीच गोष्ट त्याच्या दुष्ट स्वभावाची खात्री देण्यास पुरेशी आहे. ह्या प्रकरणाचा तपास होऊन इंग्रज न्यायासनासमोर आपणास साक्ष द्यावी लागेल अशी त्यास एकसारखी भीति वाटत होती, त्यामुळें आंबोयनांतील काम संपल्यावर तो गुप्तपणें युरोपांत येत होता पण प्रवासांतच तांबड्या समुद्रांत तो मरण पावला. आपल्या सरकारामार्फत ह्या घोर कृत्याचा सूड घेण्यांत येईल अशी वाट पहात इंग्रज लोक बटेव्हिया येथें बसले; आणि शेवटीं निराशेनें त्यांनीं ह्या दुष्ट लोकांची संगत कायमची सोडिली.

६. **डच लोकांच्या जुलमाची कमाल.**—येणेंप्रमाणें डच लोकांचे दोन मुख्य हेतु तडीस गेले. मसाल्याच्या बेटांतून इंग्रजांचा पाय निघाला, आणि बटेव्हिया येथें त्यांचें वर्चस्व राहिलें नाहीं. हे हेतु तडीस नेण्यापुरताच त्यांचा दुष्टपणा होता. आंबोयना खेरीज करून डच लोकांनीं दुसरा कोणताही अत्याचार इंग्रजांशीं केलेला नाहीं. पुढेंही ते इंग्रजांशीं पूर्वीप्रमाणेंच सरळ वागूं लागले तथापि व्यापाराचे संबंधानें दोन राष्ट्रांची स्पर्धा एवढ्यानें

तुटणारी नव्हती. स. १६२६त इंग्रज कंपनीनें बटेविया येथील आपली वखार बंद केली तरी आंबोयनाच्या प्रकरणाचा सूड घेण्याचा विचार इंग्रजांच्या मनांत मधून मधून उसळत असे. पहिल्या जेम्सला युद्ध करण्याची इच्छा नव्हती व पहिल्या चार्ल्सला सामर्थ्य नव्हतें. चार्ल्सचा शिरच्छेद झाल्यावर इंग्लंडचीं राज्यसूत्रें जेव्हां क्रॉम्वेलसारख्या जबरदस्त पुरुषाचे हातीं गेलीं तेव्हांच डच लोक नरम आले सन १६५४त तडकाफडकी युद्ध करून पांच महिन्यांचे आंत क्रॉम्वेलनें सर्व प्रकरणाचा निकाल लावून घेतला. डच लोकांनीं नुकसानी-बद्दल साडेआठ लाख रुपये इंग्रज कंपनीस दिले; छत्तीस हजार रुपये मृतांच्या वारसांस दिले; आणि पुलारून बट इंग्रजांस मिळालें. तरी इंग्रजांच्या मनांतील दंश न जातां केक वर्षे या दोन प्रॉटेस्टंट राष्ट्रांचा बिघाड कायम होता. त्यामुळें यूरोपच्या घडामोडीस निराळें वळण लागलें. त्यांचा स्नेह जुळता तर फ्रान्सचा चौदावा लुई इतका शिरजोर झाला नसता, इंग्लंडच्या दुसऱ्या चार्ल्सला फ्रान्सचा मिंधा होऊन राहवें लागलें नसतें, आणि दुसऱ्या जेम्सला इंग्लंडांत जुलूम करण्याची छाती झाली नसती. इकडे व्यापाराच्या बाबतींत डच लोकांची हांव इतकी अनावर झाली कीं, त्या योगानें त्यांनीं पूर्वेकडील समुद्रांत केलेल्या क्रूर कृत्यांपुढें मलबार किनाऱ्यावरील पोर्तुगीझ किस्त्यांचे जुलूम कांहींच नव्हत असें म्हटलें पाहिजे स्पेन, पोर्तुगाल, व इंग्लंड या सर्वांनींच इकडे थोडें बहुत क्रूर आचरण केलेलें आहे. तथापि पूर्वद्वीपसमूहाचा गड्डा आयताचा डच लोकांच्या हातास लागल्यामुळें, आणि हिंदुस्थानांतील मोगल बादशाहीप्रमाणें तिकडे कोणाचेंही मजबूद राज्य नसल्यामुळें, डच लोकांनीं भयंकर अत्याचार केले. व्यापार करण्यास पैसा पाहिजे व पैशासाठीं राज्य पाहिजे, ही गोष्ट पोर्तुगीज लोकांप्रमाणेंच डच लोकांस जरूर वाटली. आल्बुकर्कनें ती जरूर भागविण्याचा प्रयत्न केला; पण त्यास युरोपांतील सरकाराचें पाठबळ नसल्या-मुळें यश आलें नाहीं. तीच गोष्ट डच गव्हर्नर कोन यानें तडीस नेली. त्यास संपूर्ण डच राष्ट्राचें पाठबळ मिळालें. युरोपांतील बायकापुरुष आणून इकडे स्वतःच्या वसाहती तयार करावयाच्या, ही कल्पना कितीही मोहक असली

तरी शक्य नाहीं असें अलीकडे सिद्ध झालें आहे. पण कोनला हें त्या वेळेसच कळून चुकलें होतें. या हेतूनें जितके मिळतील तितके मजूर लोक इकडेच मिळविण्याचा त्यानें यत्न केला. ह्यासाठीं (१) बेटांत सांपडलेल्या लोकांस त्यानें गुलाम केलें; (२) आफ्रिका व आशिया खंडांतील देशांतून मिळतील तितके गुलाम आणविण्याची त्यानें तजवीज केली; आणि (३) रस्त्यांत सांपडतील तितके लोक आणून तो ह्या बेटांत भरूं लागला. ह्या तीन गोष्टींवरून पोर्तुगीझ लोकांचा जुलूम व डच लोकांचा जुलूम यांजमधील अंतर कळण्याजोगें आहे. पोर्तुगीझ लोकांनीं नुसते देश जिंकिले; पण डच लोकांनीं देश जिंकून असंख्य लोकांस गुलाम बनाविलें. पोर्तुगीझ लोक दुसऱ्यांनीं आणिलेले गुलाम विकत घेत. पण डच लोकांनीं या कामाकरितां सर्व समुद्रांत फिरतीं आरमारें ठेवून गुलामांचा व्यापारच आरंभिला. अशा रीतीनें त्यांनीं असंख्य लोक गोळा केले. तिसरा प्रकार तर विशेष चमत्कारिक आहे. पूर्वेकडील चीन वगैरेंच्या किनाऱ्यावर हत्यारबंद माणसें पाठवून वाटेल त्या लोकांस पकडून आणण्याचा क्रम किती निंद्य आहे याची कल्पनाच केली पाहिजे! इतक्या लोकांची मजुरी व वाटेल तितकी जमीन फुकट मिळाल्यामुळें मसाल्यांचीं झाडें लावून त्यांत डच राष्ट्रास अपरिमित फायदा करून घेतां आला. उगाच थोड्याशा इंग्रजांची आडकाठी असे, तीही आंबोयनाच्या प्रकारानें बंद झाली. कोणाही तद्देशीयास ते लहानसा रोपटाही लावूं देत नसत. अशा रीतीनें सर्व लोकांपासून कसोशीनें श्रम घेऊन उष्ण कटिबंधांतील अतिसुपीक जमीन या राष्ट्रानें शेंकडों वर्षे पिकवून खाल्ली, हा केवढा फायदा, आणि लोकांवर केवढा नाहक जुलूम !!!

एवढ्यावरच कोनच्या युक्त्या संपल्या नाहींत. त्यानें तिकडे सुव्यवस्थित राज्यपद्धत सुरू केली; आणि किनाऱ्याकिनाऱ्याचा सर्व व्यापार आपल्या ताब्यांत घेतला. तसेंच ठिकठिकाणीं पद्धतशीर जकाती व कर बसवून आफ्रिका, यूरोप आणि आशिया यांतील सर्व मालाची नेआण त्यानें आपल्या हस्तगत करून घेतली. पूर्वद्वीपसमूहाचें हातीं लागलेलें राज्य थोड्या खर्चांत

किल्ले वगैरे बांधून त्यानें मजबूद केलें. येणेंकरून इकडे आलेल्या तत्कालीन युरोपीय मुत्सद्यांमध्यें, आरंभीं पोर्तुगीझांचा आल्बुकर्क व शेवटास फ्रेंचांचा डुप्ले यांच्या मध्यभागीं कोन हा विलक्षण धूर्त, हुशार व दूरदृष्टि पुरुष दिसून येतो. तसेंच अत्यंत पाषाणहृदयी असेंही विशेषण त्यास लाविलें पाहिजे. कारण मानवी दुःखाविषयीं इतका बेफिकीरपणा कोननें कायदेशीर केला, आणि तो जो एकदां डच राष्ट्रांत शिरला त्या योगानें बहुतेक युरोपियन राष्ट्रें प्राच्य लोकांसंबंधानें अगदीं अंध होऊन गेलीं. याचा दाखला युरोपांतील तीस वर्षांच्या युद्धांत पुढें दिसून आला.

पूर्वसमुद्रांत ज्या युरोपियन राष्ट्रांनीं पाय ठेविला त्यांपैकीं एका विशिष्ट व व्यवस्थित पद्धतीनें काम चालविणारें हें एक डच राष्ट्र होय. पूर्वेकडील व्यापार ही सर्व राष्ट्राची किफायत होय असें ह्या राष्ट्रास वाटत होतें. त्यासाठीं वाटेल तो स्वार्थत्याग करण्यास व वाटेल तो अन्याय करून त्याजवर पांघरूण घालण्यास तें राष्ट्र तयार होतें. तो प्रकार इंग्रज राष्ट्रानें त्या वेळीं उचलला नव्हता. इंग्रज कंपनी मेली कीं जिवंत आहे याची पार्लमेंटास पर्वा नव्हती. म्हणून कोनसारखा उपद्व्यापीपणा करण्यास क्लाइव्ह, हेस्टिंग्जसारखे इंग्रज कामगार पुढें आले नव्हते, तोंपर्यंत इंग्रजांचें पाऊल पुढें पडलें नाहीं. अर्थात् राज्य व व्यापार यांची प्राप्ति म्हणजे अकल्प्य उपद्व्याप,व मोठा पाषाणहृयी खटाटोप होय. एकमेकांपासून अलग असल्यामुळें, लोकांत राष्ट्रीयत्व व समुदायशक्ति नसल्यामुळें व त्यांच्या अज्ञानामुळें, त्यांजवर डच लोकांच्या असदानींत जे दुर्धर प्रसंग ओढवले असतील त्यांची हकीकत कागदावर लिहिलेली असणेंच अशक्य आहे.

**७. डच लोकांच्या ऱ्हासाचीं कारणें.**—आस्ट्रेलियाचें मोठें द्वीप डच लोकांनींच शोधून काढिलें; आणि त्यास त्यांनीं न्युहॉलंड असें नांव दिलें. स. १६३५त डच लोकांनीं फोर्मोसा बेट पोर्तुगीझ लोकांपासून काबीज केलें; आणि स. १६३८त सीलोन बेटांत ह्या दोन राष्ट्रांचा संग्राम सुरू होऊन स. १६५८त तें बेट डच लोकांस मिळालें. सन १६६१ पासून ६४ पावेतों

मलबार किनाऱ्यावरील कोलम, कोचिन, काननूर व क्रांगानूर हीं स्थळें डच लोकांस मिळालीं. सन १६६९त सेंट टॉमे व सेलिबीझ बेटाच्या पश्चिम किनाऱ्यावरील मॅकासर हीं ठिकाणं त्यांस मिळालीं. स १६८२त इंग्रजांपासून बँटम त्यांस मिळाल्यापासून सयाम, टांकिन, अमोय वगैरे पूर्वेकडील ठिकाणांच्या आपल्या सर्व वखारी इंग्रजांस उठवाव्या लागल्या. स. १७५९त डच लोकांनीं बंगाल्यांतून इंग्रजांस घालविण्याचा जबर प्रयत्न केला; पण कर्नल फोर्ड यानें त्यांचा चांगलाच समाचार घेतल्यावर, बंगाल्यांत डच लोकांचे १२५ पेक्षां ज्यास्त लष्करी लोक राहूं नयेत असें ठरलें. पुढें डच व इंग्रज ह्यांमध्यें अनेक भानगडी झाल्या, त्या येथें सांगण्याचें प्रयोजन नाहीं. हल्लीं जावा, सुमात्रा, बांका, बोर्निओ, सेलिबीझ, मोलक्का उर्फ मसाल्याचीं बेटें, तिमोर, न्युगिनी इत्यादि ठिकाणें पूर्वप्रदेशांत डच लोकांचे ताब्यांत आहेत.

हळू हळू इतर दर्यावर्दी राष्ट्रें व्यापारांत पुढें सरसावलीं. पूर्वीचा व्यापार सत्तेच्या व बळजबरीच्या तत्त्वांवर चालू होता. पण अर्थशास्त्राची वृद्धि होऊन व्यापराचीं तत्त्वें बदललीं तरी डच लोकांनीं नवीन स्थित्यनुरूप आपली व्यापार-पद्धति बदलली नाहीं, त्यामुळें त्यांच्या हातचा व्यापार गेला व त्याबरोबरच बरेचसें राज्यही गेलें. मसाल्याच्या व्यापाराकरितां त्यांनीं आपलें मुख्य ठिकाण दूरच्या आंबोयना बेटांत केलें, तें कोननें बदलून बटेव्हिया येथें आणिलें. तरी मसाल्याच्या व्यापारांत त्यांचा दुर्लौकिक झाला. नुसत्या मसाल्यावर उप-जीविका होण्याचे दिवस गेले. युरोपांत फ्रेंच, जर्मन, इंग्रज वगैरे राष्ट्रें कालां-तरानें राजकीय व व्यापाराच्या वगैरे बाबतींत पुढें सरसावत असतां, डच लोकांनीं आपला पूर्वीचा क्रम सोडिला नाहीं. इतरांबरोबर आपणही पुढें सर-ण्याची पर्वा त्यांनीं केली नाहीं. अर्थात् ते युरोपांत एकलकोंड्यासारखेमागें राहिले; त्यांनीं आपल्या राज्यांत परदेशांच्या जहाजांस रिघाव दिला नाहीं; आपल्या नद्यांतून व कालव्यांतून अन्य लोकांस येऊं दिलें नाहीं; यामुळें त्यांचें अतोनात नुकसान झालें. त्यांचें व जर्मनांचें ऐक्य होणें सुलभ होतें. तें झालें असतें तर इंग्रजांस आशिया खंडांत थारा झाला नसता. शिवाय डच राष्ट्रांत लोक फार थोडे होते व त्यांच्या पूर्वेकडील राज्याचा पाया आकुंचित

होता. यामुळें अखेरीस ते इंग्लंडशीं टिकाव धरूं शकले नाहींत. तसेंच त्यांचा व इंग्रजांचा शें पन्नास वर्षे झगडा झाला, त्यांत त्या वेळीं इंग्लंडास कितीही त्रास पोंचला तरी अंतीं इंग्रजांचा फायदाच झाला. कारण डच लोकांचा जाच चुकविण्याकरितां त्यांनीं या पूर्वद्वीपसमूहांतून पळ काढिला, म्हणूनच हिंदुस्थानांत त्यांची राज्यस्थापना शक्य झाली. हिंदुस्थान हातीं आल्यामुळें पूर्वेकडील सर्वच व्यापार इंग्रजांच्या ताब्यांत गेला. कोणींही विपत्तींत डगमगूं नये; धैर्य धरून वागलें असतां शेवटीं यशःप्राप्ति झाल्यावांचून राहत नाहीं हें इंग्रज व डच ह्यांच्या या झगड्यापासून शिकतां येण्यासारखें आहे.

**८. डच नोकरांचे पगार.**—डच लोकांनीं पूर्वेकडील बेटांत आपल्या व्यापाराची व राज्याचा व्यवस्था केली, तीच पुढें बहुतेक इंग्रज कंपनीनें हिंदुस्थानांत उचलली. ती व्यवस्था येणेंप्रमाणें:—

डच लोकांच्या कारभारांत १३ प्रकारचे नोकर होते:—

| प्रकार. | नांव. | पगार दरमहा †गिल्डर्स. | भोजनाबद्दल †डॉलर्स. |
|---|---|---|---|
| पहिला. | कारकून रायटर, लष्करापैकीं. ... | ९ ते १४ | |
| दुसरा. | †अंडर असिस्टंट. ... ... | २८ | ४ |
| तिसरा. | †अपर असिस्टंट. ... ... | २८ ते ३६ | ४ |
| चवथा. | अंडरमर्चंट. ... ... ... | ३६ ते ४५ | ८ |
| पांचवा. | मर्चंट ( व्यापारी ) ... ... | ५० ते ६५ | ८ |
| सहावा. | अपर मर्चंट.... ... .. | ८० ते १२० | १२ |
| सातवा. | कामोडोर ( स्टेट सेक्रेटरी ) ... | १५० | २० |
| आठवा | डायरेक्टर. ... ... ... | २०० | ३० |
| नववा | गव्हर्नर ... ... ... | | ३० |
| दहावा. | मेंबर्स एकस्ट्रा ऑर्डिनरी काऊ०... | २०० | |
| ११ वा. | बटाव्हयाचे काउन्सिल-मेंबर्स. ... | ३५० | १०० |
| बारावा. | डायरेक्टरजनरल बटे० चा दुय्यम... | ६०० | १०० |
| तेरावा. | गव्हर्नरजनरल ऑफ् बटाव्हिया ... | १२०० | २०० |

†गिल्डर=सवा रुपया, व डॉलर=तीन रुपये, अंडर म्ह० खालचा, अपर वरचा.

डच लोकांच्या लष्करी नोकरींत खालील प्रकार असत.

| प्रकार. | नांव. | पगार दरमहा गिल्डर्स. | भोजनाबद्दल डॉलर्स. |
|---|---|---|---|
| पहिला. | प्रायव्हेट, अंडर असिस्टंट ... | २० | ४ |
| दुसरा. | सार्जंट ... ... ... | २८ ते ३६ | ४ |
| तिसरा. | एनसाइन ( अंडर मर्चंट ) ... | ३६ ते ४५ | ८ |
| चवथा. | लेफ्टेनंट ( मर्चंट प्रमाणें ) ... | ५० ते ६५ | ८ |
| पांचवा. | कॅप्टन ( अपर मर्चंट ) ... ... | ८०---१२० | १२ |
| सहावा. | मेजर ( कमोडर प्रमाणें ) ... | १५० | २० |

ह्यांशिवाय गव्हर्नर जनरल ह्यास सर्व कच्चा खर्च मिळत असे. तसेंच सर्व नोकरांस दरमहा दारू, मसाले, तेल, लांकडें, तांदूळ, आंब, मेणबत्त्या, ह्या जिनसा दरज्जाप्रमाणें कमीजास्त देण्याची वहिवाट असे. विलायतेहून नवीन दारू येण्याची सर्व लोक वाट पाहत असत. ह्याप्रमाणें कच्चा शिधा देऊन शिवाय प्रत्येकास स्वतःच्या सोईसाठीं वर लिहिलेला भोजनाचा खर्च म्हणून आणखी रक्कम ठरवून दिलेली असे. वसाहतींच्या आरमारांतील नोकरांचे प्रकारही सहा होते; व ते जवळजवळ वरच्यासारखेच होते.

पाद्री दोन प्रकारचे होते. एक आजारी माणसांचे शुश्रूषक,-त्यांस पगार वरच्या असिस्टंट सारखा, आणि प्रार्थक म्ह० प्रार्थना करणारे, त्यांस पगार अपरमर्चंट प्रमाणें. शस्त्रवैद्य म्ह० सर्जन ह्यांसही अपरमर्चंटप्रमाणें पगार असे.

हिंदुस्थानच्या सिव्हिल सर्विसमधील नोकरांची व्यवस्था ह्याच पायावर रचलेली आहे असें दिसून येईल. नोकरी झाल्यावर पेन्शन देणें किंवा मयत नोकरांच्या बायकामुलांस तनखा करून देणें ही व्यवस्था इंग्रजांनीं डच लोकांपासूनच घेतलेली आहे. नोकरांच्या मनांत राजनिष्ठा उत्पन्न करण्यास हें चांगलें साधन असून, तिच्यावर हल्लींही राजकर्त्यांची पुष्कळ भिस्त आहे.

# प्रकरण आठवें.



## ईस्ट-इंडिया-कंपनीची स्थापना.



### सन १६००.

१. अमेरिका व पॅसिफिक महासागर ह्यांचे शोध. २. पहिली पृथ्वीप्रदक्षिणा.
३. एलिझाबेथ राणीचे धाडशी खलाशी. ४. फादर स्टीफन व रॉल्फ् फिच.
५. कंपनी स्थापण्याचा उपक्रम. ६. पहिली बैठक.
७. पहिली सनद. ८. कंपनीची रचना व कामाचें स्वरूप.

**१. अमेरिका व पॅसिफिक महासागर ह्यांचे शोध.**—पंधराव्या शतकांत युरोपांत अनेक महत्त्वाच्या गोष्टी घडून आल्या. छापण्याची कला निघाली. कांस्टांटिनोपल तुर्कांच्या हातांत पडल्यामुळें, तेथचे ग्रीक व लॅटिन पंडित पश्चिमेकडील देशांत आले, तेणेंकरून प्राचीन विद्यांस पुनरुज्जीवन मिळून युरोपांत नवीन जागृति उत्पन्न झाली. हरएक विषयांत नवीन विचार व नवीन शोध सुरू झाले. त्यांत नौकाशास्त्रांत पोर्तुगालच्या राष्ट्रानें कशी आघाडी मारिली हें मागें सांगितलेंच आहे. कोलंबसानें अटलांटिक महासागरांत अनेक सफरी केल्या, पण त्यास अमेरिकेच्या किनाऱ्याजवळचीं बेटें मात्र सांपडलीं, मुख्य महाद्वीपास त्याचा पाय लागला नाहीं. कोपर्निकस वगैरे अनेक विद्वान शोधकांचें मत पृथ्वी गोलाकार आहे असेंच होतें. पण ही गोष्ट सामान्य जनसमूहास खरी वाटत नव्हती. इकडे वास्को ड गामा ह्यास हिंदुस्थानास येण्याचा समुद्रमार्ग सांपडला, तरी पृथ्वी गोल आहे हें सिद्ध झालें नाहीं. मात्र पूर्वेकडे मसाल्याचीं बेटें आहेत, तीं आपल्या ताब्यांत असावीं असें पुष्कळांस वाटूं लागलें. स. १५०५ त हीं बेटें शोधून

काढण्याचा निश्चय स्पेनच्या दरबारांत झाला. तदनुसार स्पेनचीं जहाजें बाहेर जाऊन दक्षिण अमेरिकेचा कांहीं किनारा शोधून परत आलीं. इंग्लंडचेही प्रयत्न चालूच होते. राजा सातवा हेन्री यानें आपल्या खलाशांस सनदा दिल्या, त्यांत पोर्तुगीझ लोकांशीं तंटा करूं नये असें त्यानें फर्माविलें होतें. प्रथम हिंदुस्थानास जाण्याचा वायव्य दिशेकडून दुसराच समुद्रमार्ग शोधून काढण्याची इंग्रजांनीं खटपट चालविली. कोलंबसानें शोधून काढिलेलें क्यूबा बेट हेंच जपानचा पूर्वकिनारा होय असें इंग्रजांस वाटे. पोपाच्या हुकमांत पूर्व व पश्चिम हे शब्द अनेक वेळां वापरलेले असून त्यांत उत्तर हा शब्द नव्हता; तेव्हां उत्तरेकडून आपण हिंदुस्थानास गेल्यास पोपाचा हुकूम न मोडतां आपलें काम होईल असें इंग्रज खलाशांस वाटलें. त्या वेळीं ब्रिस्टल शहर भरभराटींत असून दर्यावर्दी कामांत तेथचे व्यापारी व खलाशी विशेष प्रमुख होते. केबो ( Cabot ) नांवाच्या दोन व्यापाऱ्यांस सन १४९७त सातव्या हेन्रीनें मदत देऊन हिंदुस्थानचा मार्ग शोधून काढण्यास पाठविलें. जॉन केबो हा जिनोआचा व्यापारी लिस्बन पासून मक्केपर्यंत प्रवास करून इंग्लंडांत वास्तव्य करून राहिला होता. सन १४९७त आपला मुलगा सबाश्चन यास बरोबर घेऊन तो ब्रिस्टल सोडून निघाला. त्याजबरोबर एक जहाज व अठरा खलाशी होते. एक महिन्यानें ते न्यूफाउन्डलन्डच्या किनाऱ्यावर आले. तेव्हां त्यांस वाटलें, कीं आपणांस चीनचा किनारा सांपडला. परत येऊन ही गोष्ट त्यांनीं राजास निवेदन केली. तेव्हां जॉन केबोचा मोठा सन्मान करण्यांत आला. त्यानंतर सबाश्चन केबोनें अमेरिकेपर्यंत तीन सफरी केल्या; आणि दरखेपेस कांहीं तरी नवीन प्रदेशाचा शोध लावून तो परत आला. लाब्राडोरच्या किनाऱ्यावर त्याची बरीच वाताहत झाली. केबोच्या शोधाचा उपयोग इंग्लंडला फारसा झाला नाहीं.

**अमेरिगो व्हेस्पुची** (Amerigo Vespucci) नांवाचा एक इटालियन गृहस्थ कोलंबसाच्या सफरींत नवीन प्रदेशांचा शोध लावीत होता. कोलंबसाबरोबर तो परत न येतां नवीन सांपडलेल्या बेटांत राहून किनाऱ्या-

किनाऱ्यानें तो तिकडील भूभाग तपासीत असतां किनाऱ्यावर एक ठिकाणीं मोठमोठ्या झाडांवर पूल करून त्याजवर घरें बांधलेलीं, असें एक गांव त्यास आढळलें. तीं झाडें पाण्यांत उगवलेलीं असल्यामुळें, एका घरांतून दुसऱ्या घरास जाण्यास, युरोपांतील व्हेनिस शहराप्रमाणें जलमार्ग होते. हें एक लहानसें व्हेनिसच आहे असें समजून त्यास अमेरिगोनें व्हेनिझूला म्ह० लहान व्हेनिस असें नांव दिलें, तें अद्यापि चालत आहे. कोलंबस मरण पावल्यावर अमेरिगोनें व इतर गृहस्थांनीं तिकडील नवीन भूप्रदेशांत सफरी केल्या व शोध लाविले, त्यांवरून त्यांची अशी खात्री झाली, कीं आपणास सांपडलेली भूमि ही कांहीं मार्को पोलोचा चीन देश नव्हे, आणि वास्को ड गामाचा हिंदुस्थानही नव्हे, हें एक नवीनच खंड असावें. हा आपला तर्क अनेक प्रमाणांनीं सिद्ध करून अमेरिगोनें युरोपांत लिहून पाठविला. त्यानें पाठविलेलें पत्र इटालियन भाषेंत होतें. त्याचीं लगेच लॅटिन व इतर भाषांत भाषांतरें झालीं, व अमेरिगो म्हणतो ही गोष्ट खरी आहे अशी लोकांची खात्री होऊन, पूर्वीच्या लोकांस माहीत नसलेलें एक नवीन खंड उपलब्ध झालें व तें अमेरिगोच्या माहितीनें लोकांस कळलें, म्हणून त्याच्याच नांवावरून अमेरिका हें नांव त्या खंडास पडलें. तथापि कोलंबस, केबो व अमेरिगो ह्यांनीं शोधून काढलेले प्रदेश एकच महाद्वीप होत, हें सिद्ध होण्यास आणखी बरेच दिवस लागले.

त्या वेळच्या एक एक शोधांच्या हकीकती वाचल्या म्हणजे आश्चर्य वाटतें. पॅसिफिक महासागर युरोपियनांस ठाऊक नव्हता, तो मोठ्या चमत्कारिक रीतीनें ठाऊक झाला. पंधराव्या शतकाच्या आरंभापासून अमेरिकेकडील भूदेशांसंबंधानें युरोपीय लोकांत चर्चा सुरू होऊन एकामागून एक हजारों जहाजें तिकडे जाऊं लागलीं. एकदां स्पेन देशाहून कांहीं लोक हेटी बेटांत वसाहत करण्यासाठीं गेले. त्यांत बालबोआ नांवाचा गृहस्थ होता. तेथें लवकरच तो कर्जबाजारी झाला. कर्ज झालेल्या मनुष्यास बाहेर जाऊं द्यावयाचें नाहीं असा स्पेनचा कायदा असल्यामुळें त्यास हेटी बेटांतून बाहेर

निघतां येईना. तेव्हां तो एका गलबतावरील रिकाम्या पिपांत लपून बसला आणि बाहेर पडला. गलबत बरेंच समुद्रांत आल्यावर तो लोकांस आढळला. कांहीं वेळानें तें गलबत एका खडकावर आपटून फुटलें. ह्या कठीण प्रसंगीं बाल्बोआचा धूड स्वभाव कामास आला. वांचलेल्या लोकांस त्यानें डारियननजीक एका रानटी लोकांच्या खेड्यांत आणिलें. हें गांव पनामा संयोगिभूमीच्या अरुंद पट्टीवर होतें. तेथें ते सर्व लोक वसाहत करून राहिले व बाल्बोआ त्यांचा मुख्य झाला. तेथल्या रहिवाशी लोकांशीं सख्य संपादून व सोन्याच्या खाणीचें वगैरे काम करून बाल्बोआ आसपासच्या प्रदेशाचा तपास लावूं लागला. एके दिवशीं त्याजबरोबरचे दोन स्पॅनिश गृहस्थ सोनें विभागून घेत असतां भांडूं लागले. त्या वेळीं तेथें तद्देशीय लोकांचा सरदार होता तो सहज ह्मणाला, 'बाबांनो एवढ्याशा सोन्यासाठीं भांडतां कां ? तुम्हाला सोनेंच पाहिजे असेल तर येथून दक्षिणेस एक मोठा देश आहे तेथें वाटेल तितकें सोनें आहे, जा आणि पाहिजे तितकें घ्या. येथून दक्षिणच्या बाजूस जवळच मोठा समुद्र आहे, तेथें जहाजांत बसून त्या सुवर्णमय ( पेरु ) देशास तुम्हांला जातां येईल.' दक्षिणेस समुद्र आहे हें ऐकून बाल्बोआस अचंबा वाटला. लगेच कांहीं लोक बरोबर घेऊन तो निघाला. मध्यें उंच पर्वताची रांग लागली तिजवर तो मोठ्या प्रयासानें चढला. शिखरावर गेल्यावर त्यास तोंडासमोर एक मोठा प्रचंड महासागर दिसला. त्या वेळीं त्यास जो अचंबा वाटला त्याचें काय वर्णन करावें ? लगेच त्यानें गुडघे टेकून प्रार्थना केली. ह्या जागीं त्यानें एक दगडाचा क्रूस उभारला आणि स्पेनच्या राजाच्या नांवानें त्या प्रदेशाचा ताबा घेतला. नंतर पलीकडच्या बाजूस खालीं उतरून नागव्या तलवारीनिशीं कमरेइतक्या पाण्यांत जाऊन त्यानें महासागराचा ताबा घेतला. ही गोष्ट ता. १३ सेप्टेंबर, सन १५१३ रोजीं घडली. ह्या शोधानें अमेरिका हें एक स्वतंत्र खंड आहे व त्याच्या पश्चिमेस मोठा महासागर असून त्याच्या पलीकडे आशिया खंड आहे हें सिद्ध झालें. त्याच वर्षी सोलिस नांवाचा एक खलाशी शोधास गेला असतां रिओ प्लॅटा

नदीच्या मुखांतून आंत शिरला. तेथें तो व त्याचे आठ साथीदार यांस किनाऱ्यावरील तद्देशीय लोकांनीं कापून भाजून खाल्लें. तेव्हां पुढें जाण्याचें कोणास धैर्य होईना.

२. **पहिली पृथ्वीप्रदक्षिणा.**--मॅगेलन नांवाचा एक पोर्तुगीझ खलासी होता. तो आल्बुकर्कबरोबर गोव्यास जाऊन तेथून पूर्वेकडील द्वीपसमूहांत प्रवास करीत गेला. तेथें तद्देशीयांशीं लढण्यांत त्याचा हूंड स्वभाव व्यक्त झाला. तेथून पोर्तुगाल देशास परत आल्यावर बाल्बोआनें कळविलेली हकीकत ऐकून त्यास असें वाटलें, कीं आपण पश्चिम दिशेनें थेट पुढें गेलों तर त्याच पूर्वेकडील बेटांस पोंचूं; कारण अटलांटिक महासागरांतून हिंदी महासागरांत उतरण्यास कोठें तरी जलमार्ग असला पाहिजे. हा शोध तडीस नेण्यास पोर्तुगालच्या राजानें त्यास मदत केली नाहीं. तेव्हां तो स्पेनच्या राजाकडे गेला. तेथें त्यास मदत मिळाली. ता. २० सेप्टेंबर १५१९ रोजीं मोडकीं तोडकीं पांच गलबतें घेऊन मॅगेलन निघाला. त्याजबरोबर दोनशें ऐशीं.लोक होते. तीन महिन्यांनीं ते ब्राझील देशास पोंहोंचले. तेथें बरोबरच्या लोकांनीं बंड केलें. तें मोठ्या धैर्यानें मोडून मॅगेलन पुढें निघाला. पुढें त्यास लप्लॅटा नदीचें मुख लागलें. तेव्हां पलीकडे पार जाण्यास येथून रस्ता आहे असें त्यास वाटलें. थोडेसें आंत गेल्यावर ही नदी असून समुद्र नव्हे असें त्यास आढळून आलें. तेव्हां परत येऊन पुनः तो दक्षिणेकडे गेला. बाल्बोआस सांपडलेल्या पूर्वसमुद्रांत उतरण्याचा समुद्रमार्ग तो शोधीत होता. जातां जातां थंडी फार लागूं लागली. पुढें जाण्यास कोणी धजेना. अन्नसामुग्री संपली. कातड्याचीं दोरखंडें कुरतडून खाण्याचा प्रसंग आला. अशा रीतीनें जातां जातां ते एका चिंचोळ्या सामुद्रधुनींत शिरले. उजव्या हातच्या जमिनीचें टोक ओलांडून पुढें जातात तों एका मोठ्या शांत समुद्रांत त्यांचा प्रवेश झाला. ( ता. २८ नोव्हेंबर सन १५२० ). इतके दिवस वादळें वगैरे सहन करून आतां शांत समुद्र त्यास लागला, ह्मणून त्यास त्यांनीं पॅसिफिक महासागर असें नांव दिलें. मॅगेलनजवळ आतां फक्त तीन जहाजें राहिलीं होतीं. तीं घेऊन थोडेसें उत्तरेकडे

आऊन पुनः त्यानें पश्चिमेकडे कूच केलें. आठवड्याचे आठवडे, महिन्याचे महिने गेले, तरी जमिनीचा ठिकाण लागेना, चामड्याचीं दोरखंडें पाण्यांत भिजवून ते खाऊं लागले, त्यामुळें पुष्कळ लोक मरण पावले. कांहीं झालें तरी मॅगेलन परत फिरेना. अठ्याण्णव दिवसांनीं त्यास कांहीं बेटें लागलीं. तेथें त्यास कांहीं ताजीं फळें व भाज्या मिळून थोडासा दम आला. तेथें दहा दिवस विश्रांति घेऊन ते पुढें निघाले. लौकरच त्यांस आणखी पुष्कळ बेटें लागलीं. तीं स्पेनच्या नांवानें मॅगेलननें ताब्यांत घेतलीं. पुढें सहा वर्षांनीं जन्मास आलेला स्पेनचा राजा फिलिप ह्याच्या नांवावरून त्या बेटांस फिलिपाईन आयलन्डस् असें नांव मिळालें. ह्या बेटांत मॅगेलन यास चिनी व्यापारी मसाले वगैरे घेऊन आलेले आढळले. त्यावरून मसाल्यांचीं बेटें आतां जवळच असलीं पाहिजेत अशी मॅगेलनची खात्री झाली. स्वतः मॅगेलन कांहीं कमी उपद्व्यापी नव्हता. असल्या सफरींतही लोकांचीं राज्यें घेणें, त्यांस बाटवून क्रिस्ती करणें, हीं कामें तो करूं लागला. एका राजापाशीं त्यानें स्पेनकरितां खंडणी मागितली. ती राजानें नाकबूल केल्यामुळें अठ्ठेचाळीस लोक बरोबर घेऊन मॅगलन जमिनीवर उतरला. तेव्हां त्याजवर हजारों लोक हातांत भाले घेऊन चालून आले. त्यांजबरोबर लढतांना मॅगेलन मरण पावला, ( ता. २७ एप्रिल सन १५२१ ). ती भानगड निसटून त्याचे दोघे साथीदार सेरानो व बार्बोझा हे तसेच पुढें गेले. तेव्हां त्यांस बोर्निओ बेट लागलें आणि सन १५२१ च्या नोव्हेंबरांत मोलुका नांवाचीं मसाल्यांचीं बेटें त्यांस सांपडलीं. तेथून पुढें यूरोपचा मार्ग अगोदरच महशूर झाला होता, तेव्हां पुढें हिंदुस्थानच्या व आफ्रिकेच्या दक्षिण टोंकांस वळसा घालून सन १५२२ ता. ८ सेप्टेंबर रोजीं ते स्पेन देशास येऊन पोंचले. पांच जहाजांपैकीं व्हिक्टोरिया नांवाचें एक जहाज मात्र ही पहिली पृथ्वीप्रदक्षिणा करून परत आलें, तें अद्यापि प्रदर्शनांत ठेविलेलें आहे. २८० इसमांपैकीं फक्त १८ इसम स्वदेशास परत आले. पृथ्वीचा गोल आकार व तिचा एकंदर विस्तार ह्यांविषयीं खरी कल्पना युरोपच्या लोकांस प्रथमतः या मॅगेलनच्या

सफरीनें कळून आली; आणि प्रिन्स हेन्रीचा उपक्रम सिद्धीस जाण्यास वरप्रमाणें ६० वर्षें लागलीं. दक्षिण अमेरिकेच्या टोकाशीं जी सामुद्रधुनी आहे तिला मॅगेलनची सामुद्रधुनी असें नांव अद्यापि चालत आहे. पोपच्या हुकुमानें पोर्तुगीझ लोकांस नवीन सांपडलेल्या प्रदेशाचें स्वामित्व मिळालें, तें सुमारें शंभर वर्षेंपावेतों टिकलें. त्या शंभर वर्षांत ह्मणजे बहुतेक सोळावें शतक संपेपर्यंत पोपाच्याविरुद्ध वर्तन करण्यास युरोपियन राष्ट्रांची छाती झाली नाहीं. प्रॉटेस्टंट धर्माची स्थापना कायम झाली नव्हती आणि स्पेनची सत्ता अव्याहत होती, तोंपर्यंत असें धाडस कोण करणार ? अर्थात् पोपाचा हुकूम कायम समजून, म्हणजे त्याजविरुद्ध आचरण न करितां, व्यापार वाढविण्याचे मार्ग शोधून काढण्याचेच इंग्रजांनीं प्रथम प्रयत्न चालविले. व्हेनिशन व्यापारी मुसलमानांस मदत करून खुष्कीच्या मार्गानेंच पोर्तुगीझ लोकांच्या व्यापारास आडकाठी घालीत होते, हें वर आलेंच आहे. पुढें सन १५२१त स्पेनच्या तर्फेनें मॅगेलननें पृथ्वीप्रदक्षिणा करून, पृथ्वी गोल आहे असा खात्रीचा शोध लाविला, त्यामुळें पोपाच्या हुकुमाबरहुकूम वर्तन ठेवूनही, म्हणजे एका पश्चिम दिशेनेंच प्रवास करून वाटेल त्या पूर्वेकडील प्रदेशांत स्पेनच्या लोकांस येतां आलें. अर्थात् स्पेन व पोर्तुगाल ह्यांचा मसाल्यांच्या बेटांबद्दल जबरदस्त तंटा लागला. तो मिटविण्यासाठीं त्या राष्ट्रांचा सन १५२९त सारागोझा येथें तह झाला. त्यांत पोर्तुगालनें स्पेनच्या राजास सतरा लक्ष रुपये दिले, तेव्हां स्पेननें मसाल्यांच्या बेटांवरील आपला हक्क सोडिला. युरोपांत कलह उत्पन्न होऊं नये म्हणून इंग्लंडचा राजा आठवा हेन्री या तहांत सामील होता.

मॅगेलननें केलेल्या प्रदक्षिणेचें महत्व जगाच्या इतिहासांत फारच आहे. ड्रेपर लिहितो, ' भूतलावर मनुष्यानें जे पराक्रम गाजविले आहेत, त्यांत मॅगेलनच्या या शोधाची बरोबरी करणारें दुसरें कृत्य नाहीं, मग त्याच्याहून वरचढ तर नाहींच नाहीं, हें सांगणें नको. कोलंबसाचा उद्योगही मॅगेलनच्या शोधाहून फार कमी योग्यतेचा ठरतो. ' या शोधानें पृथ्वी वाटोळी आहे ही गोष्ट पूर्णपणें सिद्ध होऊन भूगोलशास्त्रांत मोठी क्रान्ति घडून आली. कोपर्निकस

म्हणून ज्योतिषज्ञ झाला, (१४७३-१५४३), त्यानें इतर प्रमाणांवरून ही गोष्ट याच वेळीं सिद्ध केली, पण मॅगेलनच्या प्रत्यक्ष शोधानें ती लोकांस पटली.*

सन १५२७त रॉबर्ट थॉर्न यानें पुष्कळ खटपट करून पुनरपि वायव्येकडून हिंदुस्थानाचा मार्ग शोधण्याखातीं गलबतें पाठविलीं. पण त्यांचा उपयोग झाला नाहीं. १५३६त होअर व दुसरे साठ लोक दोन गलबतें घेऊन न्यूफॉउन्डलन्डपर्यंत गेले, पण अन्नसामुग्री संपून एकमेकांस खाण्याची पाळी आल्यामुळें परत आले. पुढें सन १५५३त सर ह्यू विलोबी (Willoughby) यानें एक सफर केली, ती विशेष महत्वाची आहे. या सफरींत सबॅश्शन केबो हा होता. सफरीच्या खर्चाकरितां पंचवीस पौंडाचा एक, असे भाग करून सहा हजार पौंड जमविले होते. या सफरींत तीन जहाजें होतीं व सहाव्या एड्वर्ड राजाच्या नांवचीं इकडील राजे लोकांस पत्रें दिलेलीं होतीं. नोव्हा झेंब्ला येथें पोंचल्यावर रशियाच्या उत्तर समुद्रांत हीं गलबतें सांपडून सर्व लोक मरण पावले. पुढें सुमारें दोन वर्षांनीं दुसरे लोक त्याच भागीं गेले तेव्हां विलोबी व त्याचे सत्तर लोक आपापल्या गलबतांत बर्फानें गोठून मेलेले त्यांस दिसले. विलोबी तर कागदपत्र व डायरी उघडून गलबतावरील खोलींत वाचीत बसल्या

---

*टीप.—हिंदुस्थानांतील ज्योतिषांनीं व नौका-चालकांनीं हे प्रकार मॅगेलन व कोलंबस यांच्या पूर्वीं शेंकडों वर्षें सिद्ध केले होते, ही गोष्ट तुलनेसाठीं येथें ध्यानांत ठेविली पाहिजे. पाश्चात्य ज्योतिषांस ही शास्त्रीय माहिती प्रथम पूर्वेकडूनच मिळाली. दुसरें असेंही ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं अमेरिका खंड हिंदु लोकांस माहीत होतें असे पुरावे अलीकडे उपलब्ध होत आहेत. पूर्वद्वीपसमूहांत तर आर्यधर्माचा प्रसार झाल्याच्या पुष्कळच गोष्टी, ग्रंथ, मूर्ति, वगैरे सांपडल्या आहेत. हल्लीं इतर विषयांप्रमाणें इतिहासरचनेंतही आपण पाश्चात्यांच्या तोंडानें पाणी पीत आहों. ही गुलामगिरी झुगारून देऊन प्राच्य विद्वानांनीं स्वतंत्रपणें आपला इतिहास लिहून पाश्चात्यांच्या वल्गना सप्रमाण खोडून काढणें जरूर आहे. प्राच्य लोकांकडून असा स्वतंत्र इतिहास लिहिला जाईपर्यंत पाश्चात्य कृतींनींच आपली तहान भागविणें अपरिहार्य आहे.

ठिकाणींच मेलेला आढळला. विलोबीच्या हाताखालीं रिचर्ड चॅन्सेलर नांवाचा एक खलासी होता. त्याचें गलबत विलोबीच्या दोन गलबतांपासून वेगळें होऊन परत इंग्लंडास आलें. या चॅन्सेलरनें पुढें रशियाच्या उत्तरभागांतून आशिया-खंडाशीं व्यापार करणारी एक कंपनी स्थापन केली. ह्या कंपनीस राणी मेरी-कडून स. १५५४त व्यापाराची सनद मिळाली. ती अठराव्या शतकाच्या अखेर-पर्यंत कायम होती. ती मस्कोव्ही कंपनी म्हणून प्रसिद्ध आहे. या कंपनीचा एक व्यापारी जेकिन्सन हा सन १५५७त मास्को येथें गेला. तेथें झारनें त्यास मेजवानी दिली. तेथून पुढें तो बुखारा येथें गेला असतां तेथें त्यास हिंदुस्थानचे व्यापारी भेटले. हा जेकिन्सन अनेक वेळां इंग्लंडास परत येऊन पुनः मास्कोस गेला. त्याच्या प्रयत्नानें रशियाच्या आरमाराची स्थापना होऊन रशियाचा सामुद्रिक व्यापार वाढला. तथापि जेकिन्सननें काढिलेला मार्ग खुष्कीचा असल्यामुळें त्यापासून इंग्रजांच्यानें पोर्तुगीझांशीं टिकाव धरवेना; शिवाय कास्पियन समुद्रावरील चांचे व व्होल्गा नदीवरील लुटारू तार्तार त्यांस फार त्रास देत असत. एकंदरींत वायव्येकडील मार्गाच्या प्रयत्नापासून इंग्रजांस कांहीं एक निष्पत्ति झाली नाहीं.

कोलंबस, मॅगेलन, वास्को ड गामा वगैरे पुरुषांच्या धाडशी उद्योगांनीं स्पेन व पोर्तुगाल देश संपन्न व बलवान झाले. स्पेनच्या राष्ट्रास पश्चिमेकडील अमेरिका वगैरे प्रदेशांची मालकी मिळाली, आणि पोर्तुगालचें महत्त्व पूर्वेकडे वाढलें. पूर्वेकडील व्यापारावर पोर्तुगालची संपत्ति एकदम वाढली, परंतु पश्चिमेकडचे प्रदेश वन्य स्थितींत असल्यामुळें त्यांतून प्रत्यक्ष संपत्ति उत्पन्न करण्यास स्पेनच्या राष्ट्रास मोठे प्रयास पडले. हा स्पेनचा उद्योग जगाच्या इतिहासांत महत्त्वाचा आहे, परंतु त्याचा हिंदुस्थानाशीं संबंध नाहीं. मात्र त्या वेळीं युरोपांत इंग्रज राष्ट्र खिजगणतींत नसून स्पेन, पोर्तुगाल व हॉलंड यांचीच चलती होती, हें ध्यानांत ठेविलें पाहिजे.

**३. एलिझाबेथ राणीचे धाडशी खलाशी.**—सन १५५३ पासून १५५८ पर्यंत राणी मेरी इंग्लंडच्या गादीवर होती. ती कॅथोलिक पंथाची

असून, तिचें लग्न स्पेनच्या फिलिप राजाशीं झालें होतें. त्याच्या मदतीनें इंग्लंडांत कॅथोलिक धर्म पुनः स्थापण्याचा तिचा विचार होता. परंतु ती सन १५५८त मरण पावली. नंतर राणी एलिझाबेथ गादीवर आली, आणि इंग्लंडच्या इतिहासास निराळें वळण लागलें. इलिझाबेथला प्रॉटेस्टंट धर्माचा कट्टा अभिमान होता. स्पेनचें ऐश्वर्य पाहून तिला अतिशय हेवा वाटे. धर्माच्या बचावाकरितां व व्यापार वाढवून संपत्ति मिळविण्याकरितां स्पेनबरोबर उघड सामना करणें अपरिहार्य आहे अशी तिची खात्री झाली; आणि स्वतः होऊन तिनें स्वावलंबनाचा मार्ग आपल्या लोकांस दाखविला. राणीचें प्रोत्साहन मिळतांच, ड्रेक, हॉकिन्स, फ्रॉबिशर, गिल्बर्ट, रॅले वगैरे अनेक नामांकित खलाशी हांहां म्हणतां पुढें येऊन समुद्रावर अनेक धाडसाचीं कृत्यें करूं लागले. इंग्लंडच्या एकंदर सामुद्रिक शक्तीचा आरंभ ह्या वेळेपासून झाला आहे, सबब वरील धाडशी खलाशांचे उद्योग समजून घेतले पाहिजेत.

**ड्रेक.**—सर फ्रॅन्सिस ड्रेक ह्याचें नांव इंग्लंडच्या खलाशांत अग्रगण्य आहे. हा व दुसरे प्रसिद्ध खलाशी डेव्हनशायर प्रांतांतले होते. लहानपणापासून ड्रेक हा हॉलन्ड देशांत सफरी करीत असे. त्या देशांत स्पेननें उडवून दिलेले कहर पाहून स्पेनचा व्यापार हिसकून घेण्याचा त्यानें निश्चय केला. सन १५६७त जॉन हॉकिन्स व ड्रेक यांनीं थोडीशीं जहाजें घेऊन अमेरिकेकडे सफर केली. तिकडे सोनें, चांदी, रत्नें, वगैरे जमा करून परत येत असतां त्यांस स्पॅनिश जहाजांनीं लुटलें, त्यांतून ते दोघे जीव बचावून कसेबसे स्वदेशीं परत आले. स्पॅनिश लोकांशीं दोन हात केल्याबद्दल त्यांचा इंग्लंडांत मोठा गौरव झाला. पुनः स. १५७४त ड्रेक ७३ लोक बरोबर घेऊन गुप्तपणें अमेरिकेस गेला. पनामा संयोगिभूमीच्या पश्चिम किनाऱ्यावर स्पेननें पेरूदेशाहून अपरिमित सोनें आणलें आहे अशी त्यास बातमी लागली. तें सोनें पायवाटेनें ॲटलांटिक किनाऱ्यावर येऊन पुढें स्पेनदेशास जावयाचें होतें. त्याजवर ड्रेकनें हल्ला केला; पण त्याचे लोक थोडे असल्यामुळें स्पॅनिश लोकांनीं त्यास हांकून लाविलें. ह्या वेळीं ड्रेक भयंकर कचाट्यांत आला होता. त्या वेळचीं त्याच्या

हालअपेष्टेचीं वर्णनें हृदयद्रावक आहेत. आजारानें त्याचे पुष्कळ लोक मेले. त्याचा भाऊ मरण पावला. तरी न डगमगतां तो संयोगिभुमीवरची डोंगरांची ओळ चढला; आणि तेथून पॅसिफिक महासागराचें दर्शन घेऊन प्रार्थना करून म्हणाला, ' देवा ह्या समुद्रावर सफर करण्याचें मला सामर्थ्य दे. ' यापूर्वी स्पेनची अमेरिकेंतील सत्ता व संपत्ति गुप्त होती, ती आतां जगजाहीर झाली.

इंग्लंडास परत येऊन स. १५७७ त राणीच्या परवानगीनें ड्रेक पृथ्वी-प्रदक्षिणेस निघाला. तेव्हां त्याचें वय ३२ वर्षांचे असून त्याचे अंगीं तारुण्याची हिंमत होती. त्याच्या गलबताचें नांव पेलिकन असून, बरोबर दीडशें खलासी होते. रस्त्यांत, युद्धप्रसंग, फितुरी वगैरे कारणांनीं त्यांचे पुष्कल हाल झाले. व्हाल्पारेझोच्या बंदरांत त्यांस स्पॅनिश जहाजांवरील अपार संपत्ति लुटण्यास मिळाली. पुढें तसाच अमेरिकेच्या पश्चिम किनाऱ्यानें तो सॅन्फ्रॅन्सिस्कोपावेतों गेला; तेथून पश्चिमेस वळून त्यानें फिलिपाइन बेटें गांठलीं. तदुत्तर अनेक संकटें सहन करीत मसाल्यांच्या बेटांत आला. टर्नेटच्या राजानें सर्व लवंगा इंग्रज व्यापाऱ्यांस देण्याचें कबूल केलें. पुढें ड्रेक हिंदी महासागरांतून आफ्रिकेस वळसा घालून, इंग्लंड सोडल्यापासून बरोबर तीन वर्षांनीं प्लिमथ बंदरीं दाखल झाला. ह्याप्रमाणें पॅसिफिक महासागरावर सफर करण्याची त्याची हौस देवानें पुरविली; आणि बरोबर आणिलेली सामुग्री ड्रेकनें राणीच्या पायांशीं अर्पण केली. मॅगलनच्या ' व्हिक्टोरिया ' प्रमाणें ड्रेकचें ' पेलिकन ' जहाज अद्यापि प्रदर्शनांत ठेविलेलें आहे. 'अज्ञात भूभागांवरील ह्या अट्टल चोरास' राणीनें 'सर' हा किताब दिला. ड्रेकच्या साहसानें स्पेनचा ऐश्वर्यभानु अस्ताचलाकडे उतरला.

आपल्या मालकीच्या क्षेत्रांतील परक्यांचा हा उपद्व्याप स्पेनचा फिलिप राजा निमूटपणें सहन करणारा नव्हता. एलिझाबेथ राणीनें त्याजबरोबर असा वाद चालविला, कीं हवा व समुद्र हीं परमेश्वरानें सर्व मनुष्यांच्या उपयोगाकरितां निर्माण केलीं आहेत. तीं बंद करण्याचा हक्क कोणासही नाहीं. हा युक्तिवाद फिलिप यास रुचला नाहीं. त्यानें आपलें सर्व सामर्थ्य खर्चून इंग्लंड देश जिंकण्यासाठीं एक प्रचंड आरमार तयार केलें. त्याच्या कडेकोट तयारीवरून

त्यास 'अजिंक्य' ही संज्ञा होती. स० १५८८ च्या जुलई महिन्यांत हें प्रचंड आरमार इंग्लिश खाडींतून आंत आल्यावर, इंग्रज खलाशांच्या युक्तीनें व प्रचंड वादळाच्या जोरानें त्याचा संपूर्ण नाश झाला, आणि स्पेनचे हजारों लोक मृत्युमुखीं पडून त्या अवाढव्य आरमाराचा चुराडा झाला. स्पेनच्या नाशाचा हा आरंभ होय.

**मार्टिन फ्रॉबिशर.**—हाहीं एक इंग्लंडचा प्रसिद्ध खलाशी होता. ह्याचा जन्म स० १५३५त झाला. त्याचें सर्व आयुष्य समुद्रावरच खर्च झालें. कॅबो व विलोबी ह्यांजप्रमाणें वायव्येकडील मार्गाच्या वेडानें फ्रॉबिशर ह्यासही पछाडलें होतें. स्पेन पोर्तुगालच्या मर्यादेंत न येतां, वायव्येकडून जवळचा मार्ग हिंदुस्थानास सांपडेल, आणि तेणेंकरून हिंदुस्थानची संपत्ति आपल्या हातीं येईल अशी त्यास मोठी हिंमत वाटत होती. ड्रेकप्रमाणें चौर्यकर्मांत नांव मिळविणें त्यास पसंत नसून, कांहीं तरी नवीन शोध करून कोलंबसासारखी कीर्ति मिळवावी अशी त्याची हाव होती. लोक त्यास वेडा पीर म्हणत. पुष्कळ खटपट करून त्यानें पैसा जमविला; आणि सन १५७६त दोन जहाजें घेऊन, तो ध्रुवप्रदेशाकडे गेला. तिकडे लॅब्राडोरच्या पुढील बर्फाळ बेटांत पुष्कळ वेळ रेंगाळून त्यास विमुख परत येणें भाग पडलें. त्या बेटांतून त्यानें बरोबर सोन्याचे दगड आणिले होते. ते पाहून लोकांच्या तोंडास पुनः पाणी सुटलें, त्यानीं स० १५७७त फ्रॉबिशर यास आणखी सोन्याचे दगड आणण्यास पाठविलें, आणि त्या नवीन प्रदेशाचा कबजा घेण्यासाठीं जंगी तयारी करून दिली. ही सफर सुद्धां पहिल्यासारखीच निष्फळ होऊन परत आली. तरी सोन्याचांदीचे दगड आणून फायदा करावा ही टूम कायम होती. स. १५८३त फ्रॉबिशरनें आणलेल्या सर्व दगडांतील सोनें एका हुशार कारागिरानें बाहेर काढून जाहीर केलें. तें सर्व एक गुंजही भरलें नाहीं. फ्रॉबिशरच्या तीन सफरींस मिळून दोन लाख रुपये खर्च आला. सारांश, अंगांत हिंमत असूनही ती भलतीकडेच खर्च होऊन फ्रॉबिशर अन्नास मोताद झाला. त्याची बायको व पंधरा मुलें व त्यास भांडवल देणारा व्यापारी लोक, ह्यांचे हाल तर कुत्रा

खाईना! सर्व लोकांनीं त्याजवर कर्जाच्या फिर्यादी केल्यामुळें त्यास पसतीस वर्षें तुरुंगांत कंठावीं लागलीं. येणेंप्रमाणें वायव्येकडील मार्ग शोधून काढण्याच्या प्रयत्नापासून कांहींच उपयोग झाला नाहीं.

**गिल्बर्ट व रॅले.**—सर हंफ्रे गिल्बर्ट व सर वॉल्टर रॅले हे सावत्र भाऊ. हेही डेव्हनशायर प्रांतांत राहणारे होते. इंग्लंडजवळ उत्कृष्ट खलाशी असून तेथच्या लोकांनीं केवळ लुटारूपणाचा मार्ग पतकरावा व इतर राष्ट्रांप्रमाणें नवीन शोध किंवा नवीन प्रदेश काढू नये, ह्याचें त्यांस मोठें दुःख वाटून त्यांनीं अमेरिकेंत आपल्या वसाहती करण्याची एलिझाबेथ राणीस सल्ला दिली. ती प्रथम तिला आवडली नाहीं. ह्या कृत्यापासून देशांत पैसा न येतां उलट खर्च मात्र होणारा आहे असें तिला वाटे. स. १५७८त गिल्बर्ट अकरा जहाजें व पांचशें लोक घेऊन न्यूफॉउंडलंड बेटास गेला. पण तेथें व्यवस्था न लागून त्यास परत यावें लागलें. पुनः स. १५८३त तो त्याच बेटांत गेला; आणि पुनरपि अपयश घेऊन परत येत असतां रस्त्यांत जहाज फुटून वरच्या सर्व लोकांसह समुद्रांत बुडून मरण पावला. गिल्बर्ट यांस 'इंग्रज वसाहतींचा जनक' असें नांव देण्यांत आलें आहे.

त्यानंतर सर वॉल्टर रॅले त्याच कामासाठीं बाहेर पडला. स. १५८४त तो अमेरिकेच्या एका सुपीक भागावर येऊन दाखल झाला. तेथें त्यानें पहिली इंग्रज वसाहत स्थापिली, आणि तीस, कुमारी एलिझाबेथ राणीच्या सन्मानार्थ 'व्हर्जिनिया' असें नांव दिलें. पण ही वसाहत यशस्वी होण्यास पुष्कळ दिवस लागले. रॅलेचे व दुसऱ्या मंडळींचे असेच अनेक प्रयत्न फुकट गेले. तंबाकू व बटाटे ह्यांचीं झाडें इंग्लंडांत प्रथम रॅले व हॉकिन्स ह्यांनींच आणिलीं असें म्हणतात.

ह्यांशिवाय सर रिचर्ड ग्रेन्व्हिल, जॉन डेव्हिस, हेन्रि हड्सन इत्यादि अनेक शूर इंग्रज खलाशांनीं अनेक पराक्रमाचीं कृत्यें केलीं आहेत. स्पॅनिश लोकांची तर इंग्रजांच्या दर्यावर्दी शौर्याबद्दल चांगलीच खात्री होऊन हळूहळू इंग्रजांचें नांव युरोपांत वर येत चाललें. ह्या उन्नतीचें श्रेय राणी एलिझाबेथला दिलें

पाहिजे. स्पेनशीं दोन हात करावयाचे असा मनाचा धडा करून त्या शहाण्या राणीनें राष्ट्रीय वृद्धीच्या हरएक कृत्यास आपलें संपूर्ण पाठबळ दिलें. ह्मणूनच इतक्या विपत्तींतून अनेक शूर पुरुष हांहां म्हणतां उदयास आले. हा प्रभाव राणीच्या अंतःकरणांतील खऱ्या कळकळीचा होय.

४. **फादर स्टीफन व राल्फ् फिच.**—फिलिप व एलिझाबेथ ह्यांचें भांडण ऐन रंगांत येत चाललें असतां, स. १५८५–८७च्या तीन वर्षांत जॉन डेव्हिस ह्यानें उत्तरेकडे तीन सफरी केल्या. स. १५८६त **टॉमस कॅव्हेंडिश** हाही इंग्लंड सोडून निघाला, तो अमेरिकेवरून चीन, मसाल्याची बेटें व हिंदुस्थान वगैरे ठिकाणीं किनाऱ्या किनाऱ्यानें फिरून, स्पेनच्या मुलुखांत दंगा उडवीत व पुष्कळ महत्त्वाची माहिती मिळवीत, १५८८च्या सप्टेंबरांत म्हणजे स्पॅनिस आरमाराचा पराभव झाल्यावर दोन महिन्यांनीं परत इंग्लंडास आला. उत्तरेकडील मार्गाची खटपट सोडून पोर्तुगीझ लोकांनीं काढलेल्या मार्गानेंच आपणही व्यापार करावा, ही गोष्ट इंग्रजांच्या मनावर प्रथम ठसवून देणारा खलाशी कॅव्हेंडिश होय. इंग्लंडांत ह्या वेळीं उत्कृष्ट जहाजें तयार होत असून काम पाहिजे ह्मणून तीं रिकामीं पडलीं होतीं. नवीन वसाहती करण्यास इंग्रजांस जागा नव्हती. पोपाच्या ठरावानें नवीन शोध लाविलेल्या प्रदेशांचे मालक स्पेन व पोर्तुगाल मात्र होते. इंग्रजांचीं कांहीं गलबतें आमस्टर्डाम पावेतों जात; आणि क्वचित् कांहीं भूमध्यसमुद्राच्या पूर्वेस प्रवास करीत. पण पूर्वेकडील बेटांतले मसाले, बनारसचें उंची कापड, इराणांतलें रेशीम, गोवळकोंड्याचे हिरे वगैरे जिन्नस जर्मनी व हॉलंड येथील बंदरांतूनच त्यांस इंग्लंडास न्यावे लागत. स. १५८६त स्पेनच्या फिलिप राजानें हॉलंडचें ऍन्ट्वर्प शहर धुळीस मिळविलें, तेव्हां तेथचे व्यापारी इंग्लंडांत येऊन राहिले. इंग्लंडचे कोष्टी पुष्कळ माल तयार करीत; पण त्याचा बाहेर खप नसल्यामुळें तो माल पडून राहिला होता, यामुळें इंग्लंडचे खलाशी मनगटें चावीत स्वस्थ बसले होते. अशा स्थितींत कॅव्हेंडिश पृथ्वीप्रदक्षिणा करून परत आला. त्यानें पूर्वेकडील व्यापाराची भरंवसेलायक बातमी लोकांस दिल्याबरोबर, लंडनच्या

मुख्य मुख्य व्यापाऱ्यांनीं कॅव्हेंडिशच्या मदतीनें एक अर्ज लिहून तो राणीकडे सादर केला. त्यावर बरीच वाटाघाट व भवविनभवति होऊन अखेरीस पूर्वेकडे व्यापारासाठीं सफर करण्यास राणीनें परवानगी दिली. त्यास लागणारा खर्च वर्गणीनें गोळा करण्यांत आला.

ह्याप्रमाणें लंडनच्या साहसी व्यापाऱ्यांनीं कॅप्टन रेमंड ह्याच्या हाताखालीं तीन गलबतें स. १५९१च्या एप्रिलांत रवाना केलीं. ही गोष्ट बाहेरच्या राष्ट्रांस रुचली नाहीं. डच, फ्रेंच, स्पॅनिश व पोर्तुगीझ हे सर्व इंग्लंडविषयीं दांतओठ चावूं लागले. इंग्रज लोक दर्यावर्दी कामांत कुचकामाचे आहेत, त्यांनीं अशा साहसी कृत्यांस हात घालूं नये, असें त्या परकीयांचें मत होतें. ही पहिली सफर निघून गेल्यावर टॉमस स्टीफन नांवाच्या एका इंग्रज गृहस्थानें हिंदुस्थानांतून व्यापाराची बरीच हकीकत इंग्लंडास लिहून पाठविली, त्याचा वृत्तान्त बोधपर आहे.

**फादर टॉमस स्टीफन (स. १५४९-१६१९ ).**—ह्याचा जन्म इंग्लंडांत सॉल्सबरी गांवाजवळ स. १५४९त झाला. त्याचा बाप लंडनचा एक व्यापारी होता, त्याच कामांत त्यानें या मुलास लहानपणापासून घेतलें. पण तें न आवडून तो ऑक्सफर्डच्या न्यू कॉलेजांत जाऊन ग्रॅजुएट झाला. तेथें असतांना प्रॉटेस्टंट चळवळीविरुद्ध व रोमन कॅथोलिक पंथाच्या तर्फेनें त्यानें अनेक निकराचीं भांडणें केलीं. टॉमस पॉउंड नांवाचा एक विद्वान् गृहस्थ कॅथोलिक पंथाच्या तर्फेनें झगडत होता, त्याची व स्टीफनची मैत्री जुळली. त्यांची खटपट लोकांस पसंत न पडून पॉउंड कारागृहांत पडला. तेथें तीस वर्षें तुरुंगांतील यातना त्यास सहन कराव्या लागल्या. पण स्टीफन हा शत्रूंची दृष्टि चुकवून रोम येथें पळून गेला. तेथें सोसायटी आफ् जीझस म्हणजे जेझुइट पंथांत तो दाखल झाला. ह्या पंथाचें प्राबल्य पोर्तुगाल देशांत विशेष असल्यामुळें, स्टीफन लिस्बनास गेला. तेथें त्या वेळीं हिंदुस्थानच्या लोकांस क्रिस्ती करण्यासाठीं जबर प्रयत्न चालले होते, ते पाहून आपणही हें धार्मिक काम करावें अशा उद्देशानें लिस्बन सोडून स. १५७९च्या ऑक्टोबरांत तो गोव्यास आला.

तदनुसार त्याचें पुढील सर्व आयुष्य हिंदुस्थानांतच गेलें. गोव्यास आल्यावर त्यानें आपल्या प्रवासांतील हकीकतीचीं पत्रें आपल्या बापाला लंडनास पाठविलीं, त्यांत हिंदुस्थानच्या स्थितीची व व्यापराची हकीकत त्यानें लिहून पाठविली, तिचा तेथें पुष्कळ उपयोग झाला. इकडे हिंदुस्थानांतील लोकांस बाटविण्याचा पोर्तुगीझांनीं सपाटा चालविला, त्या कामीं फादर स्टीफननें फारच साह्य केलें. गोव्याहून तो साष्टीस गेला, आणि तेथेंच मरेपर्यंत त्यानें उद्योग केला. साष्टीच्या स्थितीविषयीं त्यानें असें लिहिलें आहे कीं, 'येथचे बहुतेक हिंदु लोक शूर व पोर्तुगीझ लोकांचे कट्टे द्वेष्टे असल्यामुळें, त्यांजपासून आपल्या धर्मप्रसाराच्या कामास फारच धोका येण्याचा संभव आहे'. पश्चिम किनाऱ्यावरील उत्कृष्ट हवा, आल्हाददायक सूर्यप्रकाश, नारळीचीं सुंदर बनें, ब्राह्मणांची बुद्धिमत्ता, क्रिस्ती धर्म स्वीकारून तत्प्रीत्यर्थ उद्योग करण्याची त्यांची हास व हिंदु लोकांच्या सुंदर भाषा इत्यादि कारणांनीं फादर स्टीफन ह्यास येथेंच चाळीस वर्षेपर्यंत जन्माचा उद्योग करण्याची स्फूर्ति उत्पन्न झाली, स्वदेशास परत जाण्याची इच्छाच झाली नाहीं. मराठी, गोव्याची कोंकणी व संस्कृत ह्या तीन भाषांचा त्यानें चांगला अभ्यास केला, तो इतका परिपूर्ण केला कीं, कोंकणी म्ह० मिश्र मराठी भाषेंत पण रोमन लिपींत त्यानें 'क्रिस्तपुराण' नांवाचा ओवीबद्ध उत्कृष्ट ग्रंथ बायबलाच्या आधारें लिहिला. तसेंच गोमांतकी कोंकणी ह्या भाषेचें व्याकरणही पोर्तुगीझ भाषेंत त्यानें लिहिलें आहे. § हेंच हिंदुस्थानांतील भाषेचें पाश्चात्यानें लिहिलेलें पहिलें व्याकरण होय.

स्टीफनच्या 'क्रिस्त पुराणा'चे दोन भाग आहेत. एक जुन्या कराराचा व दुसरा नव्या कराराचा. पहिल्या भागाचे ३६ अवसर म्हणजे अध्याय असून, दुसऱ्याचे ५९ आहेत. सगळा ग्रंथ ११०१८ ओव्यांचा आहे. ह्या ग्रंथाची पहिली आवृत्ति स. १६१६त निघाली, १६४९त दुसरी, व १६५४त तिसरी निघाली. याच्या दहा बारा सुंदर हस्तलिखित प्रति कानडा जिल्ह्यांत उपलब्ध आहेत. हें पुस्तक पांचपन्नास वर्षांपूर्वी मराठी जाणणाऱ्या एतद्देशीय क्रिस्ती

§ पहा–'मराठींतील आद्य व्याकरणकार'–नवयुग मासिक व वि. ज्ञा. विस्तार.

लोकांत फारच प्रिय होतें; मंदिरांतील पठनांत त्याचीच आवृत्ति होत असे. पुढें अठराव्या शतकांत कानडा जिल्हा टिपूनें जिंकला, त्या वेळीं प्रत्येक क्रिस्ती कुटुंबांत ह्या पुराणाच्या प्रती त्यास सांपडल्या, त्या सर्व त्यानें जाळून टाकिल्या. हल्ली ज्यांच्याजवळ ह्या प्रती आहेत, त्यांस त्या अत्यंत बहुमोल वाटतात. या ग्रंथाची चौथी आवृत्ति मि० साल्ढाना यांनीं स. १९०७त मंगळूर येथें छापलेली उपलब्ध आहे. रा. रामचंद्र भिकाजी जोशी यांच्या ' मराठी भाषेची घटना ' या पुस्तकांत या ग्रंथाची हकीकत व कांहीं उतारे दिले आहेत.

मूळ पुराण फादर स्टीफननें रोमन लिपींत लिहिलें होतें. त्याची कविता वाचून त्याच्या जबर उद्योगाची जरी प्रशंसा केली पाहिजे, तरी त्या परकीयाच्या आहेत ह्याची साक्ष त्यांतील शब्दरचनेवरून सहज पटणारी आहे. कित्येकांच्या मतें मूळ बायबलापेक्षां ह्या पुराणांत स्टीफननें विशेष रस आणिला असून, प्राच्य रुचीस साजणारी अशी काव्यरचना केल्यानें त्याचा परिणाम इकडे चांगलाच झाला. क्रिस्ती धर्माचीं तत्त्वें व त्यांतील नीतीचा भाग ह्या पुराणांत उत्तम प्रकारें उतरलेला आहे. आपणांस ह्या ग्रंथावरून पाश्चात्यांच्या उद्योगाची मात्र चांगली कल्पना करितां येईल. अशा उद्योगानेंच मलबार किनाऱ्यावर इतके हिंदु लोक बाटलेले आज आपण पाहत आहों.

**राल्फ फिञ्च्** नांवाचा दुसरा एक इंग्रज गृहस्थ फिरत फिरत गोव्यास आला होता, त्यास पोर्तुगीझ लोकांनीं तेथें कैदेंत टाकिलें, ही गोष्ट स्टीफननेंच प्रथम इंग्लंडास लिहून कळविली. हा फिञ्च स. १५८३त खुष्कीच्या वाटेनें हिंदुस्थानास येण्यासाठीं निघाला. त्याजबरोबर पूर्वेकडील राजांस एलिझाबेथ राणीनें पत्रें दिलीं होतीं. फिञ्च हा भूमध्यसमुद्रांतून आशियाच्या पश्चिम किनाऱ्यावर उतरला. नंतर युफ्रेटीस नदीच्या कांठानें इराणच्या अखातांतून ऑर्मझ येथें आला. तेथें पोर्तुगीझ लोकांनीं द्वेषानें त्यास पकडून गोव्यास पाठवून कैदेंत घातलें. पुढें स्टीफनच्या शिफारसीनें त्याची सुटका होऊन तो तेथून आग्र्यास मोगल दरबारीं जाऊन अकबर बादशहास भेटला. नंतर ब्रह्मदेश, मलाक्का, मसाल्यांचीं बेटें वगैरे ठिकाणीं फिरून तो पुनः

गोव्यास येऊन तेथून परत इंग्लंडास गेला. आपल्या प्रवासांत फिचनें पोर्तुगीझांच्या जुलमाची व पूर्वेकडील व्यापाराची अत्यंत उपयुक्त माहिती मिळवून इंग्लंडच्या लोकांस कळविली. आज सगळ्या जगांतील घडामोडी तळहातावर असल्याप्रमाणें आपणांस कळतात, तशी स्थिती त्या वेळीं नव्हती. तेव्हां फिचसारखा क्वचित् एकादा गृहस्थ दूरचा प्रवास करून परत आला म्हणजे त्याची हकीकत ऐकण्यास लोकांचे थव्यांचे थवे एकत्र जमत, आणि त्या साहसपूर्ण प्रवासांच्या गोष्टी मोठ्या आस्थेनें व उत्सुकतेनें ऐकत.

फिच परत आला त्याच वर्षी कॅप्टिन रेमंड निघून हिंदुस्थानाकडे आला होता. पण त्यास यश आलें नाहीं. त्याजबरोबरच्या दोन जहाजांतले सर्व लोक आजारानें व वादळानें मृत्युमुखीं पडले. रेमंडबरोबर तिसरें एक जहाज कॅप्टिन लँकॅस्टर ह्याच्या हाताखालीं हिंदुस्थानास आलें. पुढें मलाक्का येथें जाऊन तेथें माल भरून तें जहाज अनेक संकटें सोशीत स. १५९१त परत गेलें. ही इंग्रज जहाजांनीं व्यापारासाठीं केलेली पहिली सफर होय. डच लोकांनीं अद्यापि अशी सफर केली नव्हती. थोडा कां होईना, पण लँकॅस्टरनें व्यापाराचा माल पूर्वेकडून थेट इंग्लंडांत आणिला, येणेंकरून पोपनें पोर्तुगीझांस जो व्यापाराचा संपूर्ण मक्ता दिला होता, त्याचें महत्त्व लयास गेलें.

५. **कंपनी स्थापण्याचा उपक्रम.**—स. १५८८त स्पॅनिश आरमाराचा पाडाव झाल्यापासून प्रॉटेस्टंट राष्ट्रांनीं पोपचा हुकूम झुगारून दिला, इतकेंच नाहीं, तर नवीन शोध करण्याच्या पद्धतींतही पुष्कळ फेरफार केले. प्राचीन व मध्ययुगांत व्यापाराची माहिती व मार्ग गुप्त ठेवण्याचा प्रघात असे. कोणी नकाशे वगैरे काढून विकल्यास त्यास देहान्त शासन करीत असत. ॲड्रिॲटिक समुद्रावरील राष्ट्रें इजिप्ट वगैरे पूर्वेकडील देशांविषयीं कांहीं एक माहिती पश्चिमेकडील अटलांटिक राष्ट्रांस मिळूं देत नसत. हा बाऊ सोळाव्या शतकांत नाहींसा झाला. पोर्तुगीझ राजपुत्र हेन्री ह्यानें आपले शोध गुप्त ठेविले नव्हते; पण सोळाव्या शतकांत हॉलंडांत छापण्याची व धातूंवर कोरण्याची युक्ति प्रसिद्ध झाल्यापासून नकाशे पाहिजे त्यास

मिळूं लागले. एँन्टवर्प, ब्रुजिस वगैरे शहरांत मोठमोठे नामांकित शिल्पी निपजले, त्यांनीं आपल्या कसबानें नकाशे व माहिती छापाय्यानें प्रसिद्ध करून ती सर्व राष्ट्रांस मिळेलशी केली. ह्याचाच मुख्य परिणाम डच व इंग्रज कंपन्यांची स्थापना होय असें म्हणण्यास हरकत नाहीं.. सारांश, व्यापारांत गुप्तपणा ठेवणें हें पहिलें तत्त्व होतें; तें नाहींसें झाल्यावर, ज्यास जें प्रथम सांपडेल तें त्याचें समजावें, हें तत्त्व कांहीं दिवस पुढें आलें. ह्यांत आतां इतकाच फरक होऊं लागला कीं, ज्याला जें आपल्या ताब्यांत ठेवतां येईल, तें त्यानें ठेवावें. म्हणजे डच व इंग्रज कंपन्यांनीं अंगच्या सामर्थ्यावर व्यापाराचा उद्योग आरंभून त्याच्याच जोरावर त्यांनीं पुष्कळ दिवस पावेतों संपत्ति मिळविली, आणि अद्यापि हा प्रकार चालू आहे.

पोर्तुगीझ लोकांनीं तरी इतरांबद्दल विशेष कडकपणा धारण केला नव्हता. ते जो माल पूर्वदेशांतून लिस्बनास आणीत, तो पुढें देशोदेशीं पोंचविण्यास ते डच व्यापाऱ्यांसच सांगत असत. हॉलंडांत पूर्वी ब्रुजिस शहर पूर्वेकडील मालाचें द्वार होतें. पण ब्रुजिस खाडी रेतीनें भरून बंदर निरुपयोगी झाल्यामुळें, पोर्तुगीझ राजानें स. १५०४त एँट्वर्प शहराचें बंदर खोदवून तें सर्व व्यापाराचें नाकें केलें. सारांश, लिस्बन हें माल पुढें पोंचविण्याचें मधलें द्वार होतें. लंडनचा व्यापार एँट्वर्पेशीं चाले, प्रत्यक्ष लिस्बनशीं चालत नसे. एँट्वर्पच्या बंदरांत दररोज ५०० व सालाचीं ९.२ हजार गलबतें संचार करीत. ह्या शहराच्या भरभटाटीमुळें इंग्लंडच्या व्यापारास पुष्कळ चलन मिळालें. त्यामुळें आपलीं गलबतें थेट पूर्व देशांत पाठवून तेथचा माल आपणच आणण्याची इंग्रज व्यापाऱ्यांस स्फूर्ति झाली. ह्या स्फूर्तीस एलिझाबेथ राणीनें प्रोत्साहन दिलें. तिनें भूमध्यसमुद्रांतून मोरोक्को व टर्की येथें कित्येक लोक पाठविले. सन १५८७त ड्रेकनें सेंट फिलिप नांवाचें मोठें स्पॅनिश जहाज पकडून आणिलें; त्यावरील मालाचें उत्पन्न दहा लाख रुपये आलें. सर जॉन बरो ह्यानें एक दुसरें जहाज स. १५९२त पकडिलें, त्यांतील मालाची किंमत पंधरा लाख आली. परंतु असें नशीब क्वचितच उघडे. एँट्वर्प शहर

स्पेनच्या राजानें उद्ध्वस्त केल्याबरोबर इंग्रजांस बाहेर गेल्याशिवाय गत्यंतर राहिलें नाहीं. त्यावरूनच स. १५९१तली पहिली सफर निघाली. सेंट फिलिप जहाजावर जे कागदपत्र इंग्रजांस मिळाले त्यांवरून पूर्वेकडील व्यापारांत केवढा मोठा फायदा आहे ह्याची इंग्रजांस खरी कल्पना झाली, आणि इतउत्तर बाकीचे मार्ग सोडून आफ्रिकेच्या दक्षिण टोंकानेंच आपणही व्यापार करावयाचा, असा त्यांच्या मनाचा पक्का निश्चय झाला. तसेंच स. १५९२त पकडलेल्या जहाजावरील कागदपत्रांत जी माहिती मिळाली, त्यावरूनच पुढें कंपनीनें राणीकडे आपला पहिला अर्ज लिहिला.

पंधराव्या शतकाचे अखेरीस पोर्तुगीझ सरकारास तुर्क व मुसलमान देशांविरुद्ध युद्ध करावें लागलें, तीच गोष्ट सोळाव्या शतकाच्या अखेरीस प्रॉटेस्टंट राष्ट्रांस पोर्तुगाल वगैरे कॅथोलिक राष्ट्रांविरुद्ध करावी लागली. भूमध्यसमुद्रावर स्पेनचा ताबा होता. अटलांटिक महासागर हातचा गेला, तेव्हां त्याचा वचपा भूमध्यसमुद्रावर काढण्याचा स्पेनचा विचार झाला. ह्यामुळें इंग्रजांच्या टर्की कंपनीला पुष्कळ त्रास सोसावा लागला.

मस्कोव्ही कंपनीस खुष्कीच्या मार्गांनें व्यापार चालविण्यास अतोनात खर्च येऊं लागल्यामुळें, भूमध्यसमुद्राचा फायदा घेऊन तुर्कस्तानच्या किनाऱ्यावरून पूर्वेकडील माल इंग्लंडांत आणण्याकरितां टर्की व लिव्हँट नांवाची कंपनी सन १५८१त स्थापन झाली. तिचा उद्देश युरोपियन तुर्कस्तानांतून आशिया खंडाच्या पश्चिमभागीं व्यापार करण्याचा होता. उत्तरेकडचा मार्ग सांपडत नव्हता, ह्मणून स्पेनपोर्तुगालशीं लढण्याचा प्रसंग न आणितां व्हेनिशन व्यापाऱ्यांप्रमाणें खुष्कीच्या मार्गानें पूर्वेकडील माल भूमध्यसमुद्रांतून आणण्याचा हा प्रयत्न होता. भूमध्यसमुद्राच्या पूर्वभागास लिव्हँट म्हणतात. त्यावरून ह्या कंपनीस लिव्हँट कंपनी असेंही ह्मणत. ह्या कंपनीचे व्यापारी लिव्हँट समुद्रांतून खुष्कीनें आलेप्पो, बगदाद वगैरे ठिकाणीं जाऊन इराणी अखातावर आलेला पूर्वेकडील माल खरीद करीत. तिची सनद सन १५९३त वाढविण्यांत आली होती, तरी आफ्रिकेच्या उत्तरेकडील बार्बरी लुटारू व

भूमध्यसमुद्रांतील फिलिपचीं जहाजें ह्यांनीं त्या कंपनीचा व्यापार मुळींच चालूं दिला नाहीं. रशियाचा बादशहा पीटर धि ग्रेट ह्यानें आपल्या देशाशीं हिंदुस्थानचा व्यापार जोडण्याचा प्रयत्न करून स. १७१७त बेकोविट् ( Becko-vitz ) ह्यास पाठवून अमूदर्या नदीचा शोध लाविला, आणि सन १७३३त ब्रूस ह्यास पाठवून कास्पियन समुद्राचा तपास केला. इंग्रज सरकारानेंही स. १७४३त जॉन एल्टन ( Elton ) ह्यास रशियाचे आग्नेय भागांत पाठवून स्वतःचा व्यापार वाढविण्याची खटपट केली; पण त्यामुळें आपला व्यापार बुडेल असें रशियन सरकारास वाटून त्यानें इंग्रजांस आपल्या देशांत इतःपर व्यापाराकरितां येण्याची मनाई केली.

लिन्स्कोटेन नांवाच्या डच खलाशानें पोर्तुगीझ राज्यांत प्रवास करून पुस्तक छापिलें, त्याचे तर्जुमे बहुतेक युरोपियन भाषांत झाले. इंग्रज तर्जुमा स. १५९८त झाला. त्याला एक प्रस्तावना जोडलेली होती, तिजवरून इंग्लंडांत जागृति होऊन तेथें कंपनी स्थापण्याचा उद्योग सुरू झाला.

लिन्स्कोटेन व फिच ह्यांच्या प्रवासानें इंग्रज व डच राष्ट्रांत स्पर्धा उत्पन्न होऊन पूर्वेकडचा व्यापर अगोदर कोण बळकावितो असें झालें. स्टेट्स् जनरल ह्मणून हॉलंडचा राज्यकारभार हांकणारी सभा होती. तिनें स्पेनच्या फिलिपचें वजन जोखलें तसें एलिझाबेथनें जोखलें नव्हतें. ह्मणून डच लोकांची त्वरा एलिझाबेथ राणीस साधली नाहीं. शिवाय इंग्रजांच्या वर सांगितलेल्या दोन कंपन्या अगोदरच असल्यामुळें, तिसरी लवकर निघाली नाहीं. स. १५९७त कॅप्टिन बेंजामिन वूडची एक सफर सर्वस्वी बुडाल्यामुळें लोक विशेष साशंक झाले. शेवटीं डच लोकांनीं जहाजें खरेदी केलीं. ही बातमी बाहेर पसरली तेव्हां इंग्रजांस शरम वाटली. स. १५९९त पुष्कळ व्यापाऱ्यांनीं वर्गणी करून तीन लक्ष रुपये जमा केले आणि 'आमच्या देशाची अब्रू राखा, व व्यापार वाढवा,' अशी राणीस विनंती केली, त्या विनंतीचें फळ इंग्रज ईस्ट इंडिया कंपनीची स्थापना होय.

**६. पहिली बैठक.** ( ता. २४ सेप्टेंबर, १५९९ ).—कंपनी स्थापण्याचें व्यापाऱ्यांच्या मनांत आलें, तरी त्यांत पुष्कळ अडचणी होत्या. कंपनीची रचना व उद्योग कसे असावे याविषयीं मोठा वाद पडला. ह्यापूर्वी ज्या दोन राष्ट्रांनीं व्यापारांत आघाडी मारिली होती, त्यांच्या पद्धति वेगळ्या होत्या. पोर्तुगीझ लोकांचा व्यापार सर्वस्वी सरकाराच्या ताब्यांत होता, त्यामुळें आरंभीं राज्यस्थापनेच्या वगैरे कामांत जरी त्यांचें पाऊल झपाट्यानें पुढें पडलें, तरी अनेक दोषांमुळें त्या राष्ट्राचें नुकसान कसें झालें हें मागें सांगण्यांत आलेंच आहे. दुसरी पद्धति डच लोकांची. तींत सर्व सत्ता लोकांच्या हातांत असून कंपनीवर डच सरकाराची पूर्ण देखरेख व पाठबळ होतें. वाटेल त्या राष्ट्राशीं युद्ध किंवा तह करण्याचा, वाटेल तेथें वसाहती करण्याचा, किल्ले वगैरे बांधण्याचा, आणि नाणें पाडण्याचा अधिकार डच कंपनीस होता. उलट पक्षीं कंपनीचे हिशेब तपासून तिजपासून जकात घेण्याचा अधिकार डच सरकारास होता. सारांश, सरकारची सत्ता व खासगी व्यवस्था ह्या दोनही तत्त्वांचा मिलाफ डच कंपनींत यथायोग्य झाला होता. डच कंपनी जरी दोन वर्षांनीं इंग्रजांच्या मागून स्थापन झाली तरी दोहोंच्या घटनेंत पुष्कळ साम्य आहे. डच लोकांची पद्धत स्वीकारण्याजोगी त्या वेळीं इंग्लंडची परिस्थिति नव्हती. लिव्हँट कंपनीचे व्यापारी विशेष अनुभवलेले असून स्पेनपोर्तुगालशीं भरसमुद्रावर दोन हात करून दक्षिणेकडील जलमार्गानेंच आपणही व्यापार करण्याचा उद्योग हातीं घेण्यास त्यांनींच प्रथम पुढाकार घेतला. रिचर्ड स्टेपर व टॉमस स्मिथ, हे दोन इंग्रज व्यापारी आरंभीं लिव्हँट कंपनीचे पुढारी होते. त्यांनीं त्या कंपनींत पैशाचें व इतर नुकसान पुष्कळच सोसलें होते. टॉमस स्मिथ हाच पुढें ई. इ. कंपनीचा पहिला गव्हर्नर झाला.

स. १५९९च्या एप्रिल महिन्यांत खऱ्या कामास सुरुवात झाली. वर्गणीनें पैसा गोळा करून मिल्डनहॉल नांवाच्या एका साहसी गृहस्थास त्यांनीं राणीच्या मार्फत अकबर बादशहाशीं व्यापाराचें बोलणें करण्याकरितां हिंदुस्थानास रवाना केलें. त्याजबरोबर एलिझाबेथ राणीनें बादशहास पत्रें दिलीं

होतीं. हा गृहस्थ बादशहास भेटून तीन वर्षांनीं परत इंग्लंडास गेला. बादशहाचें वैभव व हिंदुस्थानची उच्च व संपन्न स्थिति त्यांविषयीं भरंवसेलायक हकीकत त्यांनेंच प्रथम इंग्लंडांत आणिली. पण कारण नसतां अनेक भानगडींत पडल्यामुळें त्याचा उद्योग उपयोगी झाला नाहीं.

ता. २२ व २४ सेप्टेंबर स. १५९९ रोजीं फॉउंडर्स हॉलमध्यें लंडनच्या व्यापाऱ्यांची पहिली सभा भरली. त्यांनीं एकदम तीस हजार पॉऊंड वर्गणी जमवून काम चालू केलें. लंडनास जहाजें खरेदी करण्यास डच व्यापारी आले होते, त्यांस इंग्रज व्यापाऱ्यांनीं रोख जबाब दिला कीं, 'आमचीं जहाजें आम्हांसच पाहिजेत, तुम्हांस तीं मिळणार नाहींत.' नंतर हिंदुस्थानशीं व्यापार करण्याचा संपूर्ण मक्ता ह्या मंडळीस द्यावा, इतरांस तो व्यापार करूं देऊं नये, असें फर्मान सरकारांतून मिळविण्याचा त्यांनीं सर्वानुमतें ठराव केला, आणि पंधरा डायरेक्टर्स नेमून त्यांजकडे पुढील काम सोंपिलें.

डच व्यापारी लंडनास जहाजें खरीद करण्याकरितां आले होते, त्यांस लंडनच्या व्यापाऱ्यांनीं जहाजें मिळूं दिलीं नाहींत, तेव्हां त्या व्यापाऱ्यांस लंडनच्या ह्या लोकांचा रोंख कांहीं निराळाच दिसला. हे आतां आपल्या आड येणार खास, अशी त्यांची खात्री झाली. अलीकडे लंडनची भराभराट विशेष झाली होती. पन्नास वर्षांपूर्वी लंडनांत लाख रुपयांची वर्गणी जमविण्यास मोठी मारामारी पडे. पण आतां नुकतेंच त्यांनीं राणीस सहा लाख कर्ज दिलें होतें. इतिहासकार फ्रॉउड लिहितो, 'सन १५७२त इंग्लंडच्या सर्व व्यापारी जहाजांचें आकार–माप ५० हजार टन असून मोठ्यांत मोठीं जहाजें अडीचशें टनांचीं होतीं. सन १५८८त चारशें टनांचीं जहाजें दोन तीनच असतील. पण १५९९त सहाशेंपासून आठशें टनांचीं जहाजें पुष्कळ झालीं होतीं; आणि अकराशें टनांचें एक जहाज पुढें लौकरच तयार झालें.' जर्मनींतील हंस व्यापारी इंग्लंडांत होते, (पृ० ४४ पहा), त्यांस राणीनें देशांतून घालवून दिलें; आणि हंस शहरांत जे इंग्रज होते ते तेथें व्यापाराचें कसब शिकून लंडनास परत आले.

लंडनच्या व्यापाऱ्यांस राणीपासून व्यापाराच्या इजाऱ्याचें जें फर्मान पाहिजे होतें, तें इंग्रजांच्या इतर व्यवहारांस योग्य असेंच होतें. अमुक एक कसब किंवा हुन्नर ठरींव मंडळीस सोंपलेला असे, त्यांत दुसऱ्या कोणास हात घालण्याची परवानगी नव्हती. प्रत्येक पदार्थ तयार करण्याचें काम ठरीव इसमांस दिलेलें असे. अशा प्रकारचे ट्रेड–गिल्डस् व ट्रस्टस् म्हणजे व्यापारी संघ पाश्चात्य देशांत अद्यापि आहेत. नवीन यंत्रांचें पेटंट घेण्याची आवश्यकता यावरूनच निघाली. हजारों अडचणी सोसून जे व्यापारी हिंदुस्थानशीं व्यापार सुरू करणार, त्यांचा फायदा पुढें थोड्या वर्षांनीं अचानक दुसऱ्या कोणीं उपटावा, हें अर्थात् न्याय्य नव्हतें. ह्मणून आपण सुरू केलेल्या व्यापारांत दुसऱ्या कोणीं पुढें हात घालूं नये अशी ह्या व्यापाऱ्यांची प्रथमपासूनच राणीकडे मागणी होती, ती तिनें कबूल केली. तेणेंकरून कंपनीस व्यापाराचा जो परवाना मिळाला, तो वाढतां वाढतां स. १८५८ सालापर्यंत टिकला. ह्या तत्त्वावर रचिलेल्या कंपनीस ‘ रेग्युलेटेड कंपनी ’ ह्मणत. निरनिराळ्या शहरांत जे धंदेवाल्या लोकांचे संघ असत, तेच जरा विस्तृत केले म्हणजे रेग्युलेटेड कंपनी होत असे. अशा कंपनींतील प्रत्येक इसमास तिच्या नियमांबरहुकूम स्वतंत्र उद्योग करण्याची पूर्ण मोकळीक असे आणि त्यास कंपनीच्या संरक्षक छत्राचा फायदाही मिळे. ज्या कोणास कंपनीच्या नियमांप्रमाणें व्यापार करण्याची इच्छा असे, त्यास ठरविलेली फी भरून कंपनीचा सभासद ( मेंबर ) व्हावें लागे. तसेंच धंदेवाल्या संघांमध्यें उमेदवार ह्मणून घेण्याची वहिवाट होती. म्हणजे एखाद्यानें त्या धंद्यांत कांहीं दिवस फुकट काम केल्यावर त्यास त्या धंद्याचा उमेदवार होतां येई. अशा प्रकारें लोक कंपनींतील व्यापाऱ्यांजवळ उमेदवार ह्मणून येत आणि त्यांची लायकी ठरल्यावर त्यांस मेंबर करण्यांत येई. कंपनीचा मक्ता बाहेरच्यानें आंत घुसून मोडल्यास त्यास भयंकर शिक्षा असत. व्यापार सर्वांस सारखा खुला असावा, हें तत्त्व इंग्लंडांत त्या वेळीं उदयास आलें नव्हतें. राजाकडून इजारा मिळण्यास मोठे प्रयास पडत, त्यांतूनही ईस्ट-इंडिया-कंपनीनें मागितलेल्या

इजाऱ्यास नेहमींच्या पेक्षां विशेष अडचणी होत्या. व्यापाऱ्यांनीं अनेक वशिले लाविले; राणीच्या व मंत्र्यांच्या अनेक वेळां खासगी मुलाकती घेतल्या; कैक वेळां तर त्यांची अगदीं निराशाही झाली. कारण इजारा मागणाऱ्या अविद्वान व्यापाऱ्यांची गणना सामान्य प्रतींत असून सभ्य गृहस्थ ( gentlemen ) म्हणविले जाणारे त्यांत थोडेच होते. अशा साध्या, अडाणी लोकांची दाद लौकर लागत नसे.

ता. २५ सेप्टेंबर १५९९ रोजीं लंडनांत फॉउन्डर्स हॉलमध्यें सभा भरली हें वर सांगितलेंच आहे. लंडनचा लॉर्ड मेयर सर स्टीफन् सोम् (Sir Stephen Soame) या सभेचा अध्यक्ष होता. रिचर्ड स्टेपर व टॉमस स्मिथ् हे त्यांचे पुढारी होते. यांशिवाय दुसरीही कित्येक नामांकित मंडळी हजर होती. पण त्यांजबरोबरच खलाशी, शिपाई, प्रवासी वगैरे प्रकारचे अनेक लोक हजर होते. लँकेस्टर, डेव्हिस, प्रेटि, फिच्च्, बॅफिन्, मिडल्टन् वगैरे पूर्वेकडील प्रदेश पाहिलेली बहुतेक मंडळी सभेस हजर होती. मौल्यवान् मालानें आकंठ भरलेलीं मोठमोठीं स्पॅनिश व पोर्तुगीझ जहाजें त्यांनीं अनेक वेळां भरसमुद्रांत पाहिलीं होतीं आणि कित्येकांवर त्यांनीं ताबही मारिला होता. हिंदुस्थानांत जाऊन आपण कशी चंगळ उडवूं ह्याचें सुरेख वर्णन त्यांनीं त्या सभेंत केलें. त्यांची भाषा प्रौढ नव्हती पण नानाप्रकारच्या हावभावांनीं व वेड्यावांकड्या शब्दांनीं त्यांनीं आपल्या मनांतील भाव व्यक्त करून दाखविले. बाहेरचे लोक आपणांस केवळ लुटारू ( Pirates ) समजतात हें आपल्या राष्ट्रास केवढें लांछन आहे, हें त्यांनीं त्या सभेंत व्यक्त करून आपल्या स्थितीबद्दल करुणा उत्पन्न केली. त्यांनीं हेंही सांगितलें, कीं पोर्तुगीझ, स्पॅनिश् व डच ह्यांनीं इतक्या वर्षे कितीही प्रदेश काबीज केले असले, तरी पूर्वेकडील देशांच्या विस्ताराच्या मानानें ह्या राष्ट्रांचे हातास कांहींच लागलें नाहीं असें म्हटलें तरी चालेल, इतकी तिकडे संपत्ति आहे. प्राच्य व्यापाराचा इजारा म्ह० संपूर्ण मक्ता राणीपाशीं मागून आपल्या देशाची अब्रू राखावी व व्यापाराच्या योगानें संपत्ति वाढवावी, अशी विनंति राणीस कर-

कंपनीच्या इतिहासांत एक गोष्ट अगदीं स्पष्टपणें दिसून येते ती ही, कीं कोणत्याही कामांत यश आलें असतां जसा कोणाचाही उद्योग पुढें चालतो, तसाच अपयश आलें तरी तिचा उद्योग पुढें चालू असे. तिचे चालक कधीं म्हणून हताश होऊन स्वस्थ बसले नाहींत. प्रिव्हिकौन्सिलनें कंपनीचा अर्ज नामंजूर केल्याबरोबर त्यांनीं अशी विनंति केली, कीं ' केप ऑफ् गुड् होपच्या पूर्वेस स्पेनचीं स्थळें कोणकोणतीं आहेत त्यांचा स्पष्ट निर्देश स्पेनच्या कमिशनरांकडून करून घ्यावा. ' परंतु स्पेनकडून असा खुलासा मिळणार नाहींसें पाहून, त्यांनींच सर्व प्रकारची माहिती मिळवून सादर केली. स. १६०० मध्यें स्पेनचा व इंग्लंडचा तह पुरा झाला नाहीं, आणि तो होण्याची आशाही राहिली नाहीं. तेव्हां वर्षभर वादविवाद झाल्यावर ता. २३ सेप्टेंबर स. १६०० रोजीं कंपनीची वार्षिक सभा पुनः भरली. तींत १७ असामी डायरेक्टर्स नेमून व्यापार करण्याचा निश्चय ठरला. डायरेक्टरांनीं रोज सभा भरवून साठ हजार रुपयांस चार जहाजें विकत घेऊन सफर पाठविण्याची सिद्धता केली. वाटेच्या भोजनखर्चाकरितां साठ हजार रुपये बरोबर दिले; आणि लोखंड, कथील व कापड बाहेर विक्रीसाठीं जहाजांवर भरलें.

मात्र दोन कामें व्हावयाचीं होतीं. कंपनीचा गव्हर्नर नेमणें, व पहिल्या सफरीचा कमांडर नेमणें. ह्यासाठीं ता. ३० ऑक्टोबर रोजीं पुनः कंपनीची सभा भरली. त्या वेळीं चोवीस डायरेक्टरांची व्यवस्थापक सभा नेमण्यांत येऊन ऑल्डरमन टॉमस स्मिथ ह्यास कंपनीचा पहिला गव्हर्नर व कॅप्टिन लँकॅस्टर ह्यास सफरीचा कमांडर नेमिलें; त्याच्या हाताखालीं डेव्हिस, मिडल्टन वगैरे कित्येक इसम दिले. एकंदर ह्या सफरींत ४८० मनुष्यें सर्वानुमतें नेमण्यांत आलीं. ह्यांपैकीं ३६ फॅक्टर्स म्हणजे हिशेबी कारकून असून प्रत्येकाचा पांच हजार रुपयांचा जामीन घेतलेला होता. त्यांच्या पगाराचें मान समजण्याकरितां एकच उदाहरण बस आहे. कॅप्टिन डेव्हिस ह्यास सफरीच्या दिवसांबद्दल १०० पाउंड पगार व स्वतःचा व्यापार करण्याकरितां २०० पाउंड कर्ज द्यावयाचें; तसेंच परत आल्यावर, सफरीचा नफा शेंकडा दोनशें

झाल्यास, ५०० पाउंड बक्षीस, शेंकडा ३०० झाल्यास १००० पाउंड बक्षीस व शेंकडा ५०० शें नफा झाल्यास २००० पाउंड बक्षीस द्यावयाचे, असा ठराव होता. ता. ३१ डिसेंबर सन १६०० रोजीं कंपनीच्या सनदेवर राणीची सही झाली. त्या वेळीं कंपनीत २१५ सभासद असून अर्ल आफ् कंबर्लंड अध्यक्ष होता. ह्या सनदत खालीं लिहिलेले मुद्दे होते.

'आमच्या राष्ट्राची अब्रू राहवी, लोकांस संपत्ति मिळावी, जहाजांची शक्ति वृद्धिंगत व्हावी, म्हणजे एकंदरींत कायदेशीर व्यापार वाढून आमच्या देशाची भरभराट व्हावी, ह्या उद्देशानें एक राष्ट्रीय संस्था स्थापन करण्यांत येत आहे. ह्या संस्थेला ' पूर्वेकडील प्रदेशांशीं व्यापार करणारी लंडनच्या व्यापाऱ्यांची कंपनी व गव्हर्नर ' असें नांव देण्यांत येत आहे. ह्या नांवाप्रमाणेंच तिचें काम चालावयाचें आहे. ( १ ) कंपनीचे मेंबर्स, त्यांचीं वयांत आलेलीं मुलें, त्यांचे नोकर व उमेदवार ह्यांस पंधरा वर्षेपर्यंत पूर्वेकडील व्यापाराचा संपूर्ण मक्ता देण्यांत येत आहे. ( २ ) मॅगेलनची सामुद्रधुनी व केप ऑफ् गुड् होप यांचे दरम्यान आशिया, आफ्रिका व अमेरिका ह्या ठिकाणचे पाहिजेत ते देश, बंदरें व बेटें ह्यांशीं मालाची नेआण करून कंपनीनें व्यापार चालवावा. ( ३ ) वरील देशांत पाहिजे तितकी जमीन विकत घेण्याचा, ( ४ ) फिर्याद मांडण्याचा व आपणांवर फिर्याद मांडून घेण्याचा, मोर्तब करण्याचा, ( ५ ) व्यवस्थेसाठीं पाहिजे ते नियम करण्याचा आणि ( ६ ) इंग्रजी कायद्याअन्वयें गुन्हेगारांस दंडाची किंवा कैदबंदीची शिक्षा करण्याचा कंपनीस अधिकार देण्यांत येत आहे. ( ७ ) ह्या सनदेंत दाखविलेल्या कंपनीशिवाय दुसऱ्या कोणीं इंग्रजानें ह्या देशांशीं व्यापार केल्यास त्यास शिक्षा देण्यांत येईल.'

ह्या शिवाय राणीनें कंपनीस स्वतः कांहीं विशेष सवलती दिल्या होत्या. पहिल्या चार सफरींत कंपनीकडून जो माल बाहेर विक्रीसाठीं नेण्यांत येईल, त्यावर निर्यात जकात माफ केली; आणि आयात जकातीचा भरणा करण्यास ६ पासून १२ महिन्यांची मुदत दिली. एकदां पहिल्या सफरींत तीन लाख रुपये पावेतों चांदी किंवा रोख नाणें बाहेर देशीं नेण्यास हरकत नाहीं; पण

पुढील सफरींत बाहेर नेलेलें नाणें सहा महिन्यांच्या आंत परत आणिलें पाहिजे. देशांतून पैसा बाहेर न जाऊं देण्याबद्दल त्या वेळीं विशेष कटाक्ष होता. मोगल बादशाहींतही असाच निर्बंध होता. पांचशें इंग्रज खलाशी व जहाजें पाहिजे तेव्हां दरसाल कंपनीस मिळत जावीं असा राणीनें हुकूम दिला. ह्या कंपनीचा उद्योग नीट चालतो असें दिसून आल्यास, पंधरा वर्षांची इजाऱ्याची मुदत वाढविण्यांत येईल, नाहीं तर ती कमी करण्यांत येईल, असाही उल्लेख सनदेंत होता.

इतकें होऊनही कांहीं अडचणी राहिल्या होत्या. पूर्वीच्या सफरीस सात लाख रुपये खर्च लागला तो वेळेवर वसूल होईना. तेव्हां कित्येकांनीं पदरचे पैसे भरून पूर्वींचा निकाल केला, तेव्हांच काम चालू झालें. अशी सर्व तयारी होऊन ता. १३ फे० स. १६०१ रोजीं टेम्स् नदी सोडून कंपनीचीं जहाजें एकदांचीं बाहेर सफरीवर निघालीं.

८. **कंपनीची रचना व कामाचें स्वरूप.**—एलिझाबेथ राणीच्या कारकिर्दींत इंग्रज राष्ट्राची नौकानयनांत प्रगति झाली तिचा कळस ह्या कंपनीची स्थापना होय. सहकारी पद्धतीचा हा नुकता आरंभ होता. हिंदुस्थानसारख्या दूरच्या मुलखांतील व्यापार पृथक्पणें थोडथोडा खर्च करून एखाद दुसरें जहाज गेल्यानें हस्तगत होणार नाहीं, त्यास सर्व राष्ट्राचें पाठबळ पाहिजे; स्पेन, डच वगैरे राष्ट्रांशीं वेळेस दोन हात केले पाहिजेत. हें काम एकट्याच्यानें होणारें नव्हे, अशी ओरड कंपनीचे व्यापारी आपल्या अर्जांत प्रथमपासूनच करीत असत. तसेंच प्रत्येक बाबतींत कोणाचीही भीड किंवा मुर्वत न धरितां काम करण्याचा ह्या व्यापाऱ्यांचा इरादा होता. रोख पैसे न भरतां कोणी कांहीं माल देईल किंवा जहाज देईल तर घ्यावयाचें नाहीं असा संकल्प होता. अलीकडे जॉइंट स्टॉक कंपन्या निघतात तशा प्रकारची ही कंपनी होती. तथापि पुढें जें त्या कंपनीचें काम वाढलें त्याची आरंभीं कोणासच कल्पना नव्हती. त्याचा पाया इजाऱ्याच्या पद्धतीवर होता. म्हणजे दुसऱ्या कोणासही त्या व्यापाराचें काम करण्याची परवानगी नव्हती. सर्वांच्या मदतीची ज्या कामांत जरूर त्या कामांत

व्यक्तीची स्वतंत्रता कमी होणें साहजिक आहे. असें असूनही ही कंपनी राष्ट्रीय नव्हती. ह्मणजे डच कंपनी प्रमाणें तींत सर्व इंग्रज राष्ट्राचा समावेश नव्हता. तिचें सर्व सामर्थ्य सरकारानें दिलेल्या हक्कांवर अवलंबून होतें. दर खेपेला सफर पाठवितांना राजाची परवानगी घ्यावी लागे. एका बंदरांतील माल दुसऱ्या बंदरीं नेण्यासही राजाची परवानगी लागे. तसेंच राजाचें मिरीं विकिल्याशिवाय कंपनीनें आपले मिरीं विकूं नये असा निर्बंध होता. कंपनीच्या अंतर्व्यवस्थेंत कांहीं बखेडा झाला, कोणीं आपली वर्गणी वेळेवर दिली नाहीं, सफरींत जाण्यास खलाशी, जहाजें किंवा सुतार मिळाले नाहींत, किंवा एखाद्या अपयशी कप्तानानें कांहीं कसूर केली तर कंपनीस प्रिव्हिकौन्सिलकडे जाऊन त्या गोष्टींचा निकाल करून घ्यावा लागे. अर्थात् अनेक गोष्टींत ही कंपनी राजाचे हुकुमानें बांधिलेली होती. काम करण्याचा सर्व अधिकार फक्त २४ इसमांच्याच हातीं होता. अलीकडील कंपनीच्या कायद्यानें कोणाही कंपनीस पूर्ण स्वातंत्र्य देतां येतें तसें या कंपनीस नव्हतें. कंपनीचा मेंबर होण्याचे अनेक मार्ग होते, त्यांपैकीं मुख्य ह्मणजे पैसे भरून भाग विकत घेणें हा होय. प्रत्येक भागाची किंमत आरंभीं २०० पौंड होती. दुसऱ्या सफरीत ती १०० पौंड झाली, त्या योगानें अनेक लहान लहान भागीदारांचे हातांत कंपनीची सत्ता जाऊं लागली. सन १६०७त तिसरी सफर गेली, तींत २०५ भागीदारांपैकीं १०८ असामी २०० पाउंडाखालचे होते. असा प्रकार न व्हावा ह्मणून सन १६०८त भागाची किंमत ५०० पौंड करण्यांत आली. तथापि लहान लहान मंडळीस व्यापारांत सामील होतां यावें याकरितां पुष्कळांनीं आपल्या रकमा एकाच्या नांवानें भराव्या अशी सवड ठेविली होती. ह्याप्रमाणें भागाची किंमत वारंवार बदलत असे. एक भाग घेणारास सभेंत एक मत देण्याची परवानगी होती.

पहिल्या सफरीस ६८,३७३ पौंड भांडवल लागलें. हें सर्व पहिल्या मंडळीनें जमा केलें. पण प्रत्येक सफरीचा जमाखर्च वेगळा व नफानुकसान त्या सफरीपुरतेंच, असा आरंभीं ठराव होता. केव्हांही दुसरी सफर जाण्यापूर्वी पहिलीचा हिशेब पुरा होत नसे. आलेला माल विकण्यास किंवा दुसऱ्या

भानगडींचा निकाल करण्यास पुष्कळ काळ लागे. ह्मणून दुसऱ्या सफरीस लागणारें भांडवल पुनः पहिली मंडळी आपण देत, किंवा तें देणारी दुसरीच व्यापारी मंडळी तयार होत. त्या दुसऱ्या सफरीचें नफानुकसान त्यांत ज्यांनीं भांडवल घातलें असेल तेवढ्यांसच सोसावें लागे. अशा रीतीनें जितकी नवी मंडळी वर्गणी देई, तितकी सर्व कंपनीचे सभासदांत दाखल होई. सारांश, ई० इं० कंपनी पहिल्याच एका भांडवलावर चालली होती असें नाहीं. नफानुकसानीच्या वेळेला ज्या त्या सफरीपुरता हिशेब ठेवीत. पण तिसऱ्या, चौथ्या किंवा पुढील सफरींत नवीनच मंडळींनीं पैसे भरले, म्हणजे मग पहिल्या सफरींतल्या लोकांस काम काय, असा प्रश्न राहतो. तर त्यांसही काम पुष्कळ होतें. नवीन सफरी कोठें पाठवावयाच्या, त्यांस खर्च किती लागेल याचा अंदाज करून रक्कम वर्गणीनें गोळा करावयाची, त्या सफरीस राजाची परवानगी मिळवावयाची, सफरीसाठीं जहाजें माल वगैरे विकत घ्यावयाचा, आणि नफानुकसान विभागून द्यावयाचें, इत्यादि कामें या मंडळीस करावीं लागत. कित्येक वेळां नवीन वर्गणीदार न मिळाले तर पहिल्याच लोकांस पैसे भरणें भाग पडे. सारांश अलीकडील कंपन्यांप्रमाणें ई० इं० कंपनीचें काम चालत नव्हतें. त्यांत अनेक नवीन लोक व नवीन पैसा सामील होऊन, दर सफरीचा हिशेब निराळा ठेवावयाचा असल्यामुळें, निरनिराळ्या भानगडी उत्पन्न होत. शेवटीं अशा भानगडींतच कंपनीचा अंत झाला. सफर चालू झाली म्हणजे कंपनीच्या सभासदांस थोडी विश्रांति मिळे; पण लगेच दुसरा एखादा गृहस्थ नवीन सफरीची योजना करी. तिचा विचार करण्याकरितां सभा भरे व काम चालू लागे. त्या सफरीचें जाहीरपत्रक तयार करून तिचे उद्देश व खर्चाचा व नफानुकसानीचा अंदाज आरंभीं लिहून, हजर असलेले लोक मर्जीप्रमाणें त्यांत आपली वर्गणी प्रथम भरीत व नंतर वर्गणी पत्रक लोकांत फिरविण्यांत येई. अशा रीतीनें पैसा जमा आला तर बरें, नाहीं तर पुनः भवतिनभवति होऊन वर्गणी गोळा करण्यासाठीं मुद्दाम निराळी कमिटी नेमण्यांत येई. कित्येक प्रसंगीं एका

सफरीच्या वर्गणीदारांसच पुढच्या सफरीची वर्गणी देणें भाग पडे. अशा रीतीनें वर्गणी गोळा झाल्यावर त्या सफरीचे नियम करून राजाची परवानगी वगैरे मिळविण्याचें काम सुरू होई. बहुतेक काम डायरेक्टर्सची सभा करी आणि सर्व सिद्धता झाल्यावर एकंदर वर्गणीदारांची बैठक भरवून त्यांज-पुढें काम ठेवण्यांत येई.

वर्गणीदारांस 'ब्रदर आफ धि कंपनी' किंवा 'प्रोप्रायटर आफ धि कंपनीज्ञ स्टॉक' असें ह्मणत. त्यांच्या वर्तणुकीबद्दल अगदीं किरकोळ गोष्टीं-तही नियम केलेले होते. सभेस मुळींच न येणारास, किंवा सभा बरखास्त होण्यापूर्वी निघून जाणारास, आठ आणे, व उशीरां येणारास चार आणे दंड होता. कित्येक वेळां प्रिव्हिकौन्सिलकडून तुरुंगांत पाठविण्याचें वॉरंट-ही घेण्यांत येई. सभेंत कोणासही तीनपेक्षां ज्यास्त वेळ बोलण्याची परवानगी नसे; ज्यास्त वेळ बोलल्यास पावणेदोन रुपये दंड होता. दुसरा मध्येंच कोणी बोलल्यास किंवा बडबड केल्यास सव्वा रुपया दंड; व अयोग्य वर्तनाबद्दल पांच रुपये दंड होता. सारांश, अध्यक्षाचा हुकूम पाळावाच लागे. दंड न दिल्यास कैदेंत जाण्याची शिक्षा सर्वानुमतें होई.

कोणत्याही नवीन सफरीची सिद्धता करण्यांत चार मुख्य कामें होतीं. पहिलें, राजाची लेखी परवानगी मिळविणें, ह्यांत सफरीचा जो कमांडर नेमलेला असेल त्यास सर्व प्रकारचे अधिकारही दिलेले असत. दुसरी, सफ-रीच्या मुख्य कामगारानें काय काय कामें करावयाचीं त्यांची यादी नक्की करणें. तिसरी, लेटर्स पेटंट म्हणजे सरकारी शिक्क्याचें दस्तक मिळविणें. हें दस्तक बाहेरच्या राष्ट्रांस दाखवावें लागे. चवथी गोष्ट म्हणजे बाहेरच्या राजांस इंग्लंडच्या राजाचें स्वदस्तुरचें पत्र घेणें. एलिझाबेथ राणीनें अशा प्रकारचें एक सरपत्र इकडील राजांस देण्यासाठीं पहिल्या सफरीच्या मुख्याशीं दिलें होतें तें अनेक कारणांनीं विशेष महत्त्वाचें असल्यामुळें, जसेंच्या तसें येथें देणें इष्ट आहे.

फेब्रुवारी, स. १६००

'परमेश्वरकृपेंकरून इंग्लंड, फ्रान्स व ऐर्लंडची राणी एलिझाबेथ यांजकडून,...............चे थोर व पराक्रमी राज्यकर्ते..................यांस. सर्वशक्तिमान प्रभूनें अपरिमित व अगाध शहाणपण व कृपादृष्टि दाखवून ह्या जगांत मनुष्याच्या उपभोगाकरितां अनेक उत्तम वस्तु उत्पन्न करून त्यांची सर्वत्र सुव्यवस्था करून ठेविली आहे. ते जिन्नस कोठेंही व कसेही मूळ पैदा झाले असले, व कांहीं ह्या देशांत व कांहीं त्या देशांत तयार झाले असले, तरी ते त्या प्रभूच्या हुकुमानें पृथ्वीवरील सर्व राष्ट्रांस पोंचले जावे व त्याचें अपरिमित औदार्य सर्व जनांस सारखें प्राप्त व्हावें, असा त्या प्रभूचा उद्देश दिसतो; ज्या प्रदेशांत तो जिन्नस पिकेल, तेथच्या लोकांनीं मात्र तो वापरावा, इतर देशांतील लोकांस तो मिळूं नये, असा त्याचा हेतु दिसत नाहीं. एका देशानें दुसऱ्या देशाच्या उपयोगी पडावें, व एका देशांत जो जिन्नस विपुल पिकतो, त्यानें दुसऱ्या देशाची गरज भागावी, असा ईश्वरी संकेत असल्यामुळें दूरदूरच्या देशांमध्यें व्यापाराची घडामोड चालते' आणि एकमेकांच्या मालाची देवघेव होऊन त्यांजमध्यें स्नेहभाव व प्रेम वाढत जातें.

'महाराज ! ह्या वर सांगितलेल्या हेतूशिवाय आणखी आम्हांस असें समजलें आहे, कीं कोणीही परराष्ट्राचे लोक व्यापाराचा उद्देश मनांत धरून स्नेहभावानें व सौम्यवृत्तीनें आपल्या देशांत गेले असतां, आपण त्यांचा उत्तम प्रकारें आदर करितां. त्यावरून आमच्या कित्येक व्यापाऱ्यांस आपल्या देशांत जाण्याची परवानगी देण्यास आम्हांस उमेद आली आहे. आपल्या देशांत व्यापारी मालाचा सौदा फार उत्तम होतो असें इकडे खात्रीलायक कळल्यावरून, जलमार्गाचीं अनेक दुर्धर संकटें सहन करूनही हे आमचे व्यापारी तिकडे जात आहेत. तेथें आपल्या लोकांशीं व्यापारी धोरणानें सौदा करावा, म्हणजे इकडचे जिन्नस त्यांस विकून तिकडचे इकडे विकत आणावे, असा त्यांचा उद्देश आहे. एवढीं संकटें सोसून आपल्या देशांत प्रवेश करण्याची ज्या अर्थी त्यांस स्फूर्ति झाली आहे, त्या अर्थी आपणही त्यांचा योग्य परामर्श

घेतला असतां, बोलण्याचालण्यांत व व्यवहारांत ते चोख व सभ्य आहेत असें आपणांस दिसून येईल; आणि आपल्या देशांत हे आल्याबद्दल आपणांस वाईट वाटण्याचें कारण घडणार नाहीं. तसेंच, त्यांनीं आपल्या गलबतांतून नेलेला इकडचा माल आपणांस देण्यांत व आपणांकडचा माल इकडे आणण्यांत एकमेकांचा निकट सहवास व व्यवहार घडल्यावर, त्यांनीं पुनरपि असाच माल घेऊन आपल्या देशांत यावें असें आपणांस वाटेल. आजपर्यंत फक्त स्पॅनिश व पोर्तुगीझ व्यापारीच कायते इकडचा माल आपल्या देशांत नेत आहेत; पण ते लोक व्यापाराच्या कामांत आमच्या व्यापाऱ्यांस व इतर लोकांस नाहक जाच करितात. वास्तविक पाहिलें तर, ते आपल्या देशांत व्यापाराच्या उद्देशानें गेले आहेत असें नाहीं. बाहेरच्या सर्व देशांचे मालक व बादशहा आपणच आहों असें ते लोक समजतात; आणि बाहेरचे लोक आपल्या केवळ प्रजा आहेत असें ते इकडील लोकांस सांगत सुटले आहेत, आणि लिहिण्यांतही ते तसा व्यवहार उघडपणें करीत आहेत.

'आमचे जे लोक केवळ व्यापाराच्या सौम्य उद्देशानें आपल्याकडे आज जात आहेत, त्यांस आपण मेहेरबानी करून आपल्या देशांत येऊं द्याल, व आजच्या ह्या पहिल्या प्रसंगाची ओळख पुढें चालू ठेवून आपल्या व आमच्या प्रजेमध्यें हें व्यापाराचें व स्नेहाचें दळणवळण वृद्धिंगत कराल, अशी आम्हांस आशा आहे. आपली आज्ञा असेल तर आमचे कांहीं व्यापारी इकडे परत येऊन पुनः इकडचा माल भरून तिकडे नेत तोंपर्यंत, बाकीची मंडळी आपल्या कृपाछत्राखालीं तेथेंच राहून तेथची भाषा वगैरे शिकतील; कीं जेणेंकरून एकमेकांचे विचार व रीतरिवाज एकमेकांस कळल्यानें स्नेह वृद्धिंगत होऊन उभयतांचा उद्देश पार पडेल.

'आपला आमचा स्नेह वृद्धिंगत होऊन दळणवळण वाढावें ह्यासाठीं उभयतांमध्यें कांहीं करार किंवा ठराव होण्याची जरूर आहे. त्यासाठीं, हें पत्र आपणांकडे घेऊन जाणारे इसमांस आमच्या तर्फे बोलणें व ठराव करण्यास आम्हीं पूर्ण अधिकार दिला आहे. ते गृहस्थ आपल्याशीं जे

ठराव करतील, तो आम्ही इमानानें पाळूं; आणि आपण आमच्या ह्या लोकांवर जी मेहेरबानी किंवा उपकार कराल त्यांची फेड आम्ही मोठ्या आनंदानें करूं. अखेरीस एवढेंच मागणें आहे, कीं आमचा हा उद्देश आपणांस पसंत पडल्याचें निदर्शन म्हणून आपण या पत्राचा जबाब गेलेल्या मंडळीजवळ द्यावा. जबाब पाठविल्यानें आमच्यावर आपली मोठी मेहेरबानी होईल व आम्हांस अतिशय संतोष वाटेल.' ह्या पत्रांतील मजकुराकर टीका करण्याची जरूर नाहीं.

वर सांगितलेलीं चार मुख्य कामें चालू असतांच मध्यंतरीं दुसरीं कामें उपस्थित होत. त्याचा एक मासला येथें देतों. पहिली सफर निघून गेल्यावर जॉर्ज वेमथ नांवाच्या एका दर्यावर्दी पुरुषानें कंपनीकडे अर्ज करून विचारिलें, कीं, उत्तरेकडून हिंदुस्थानास जाण्याचा मार्ग मी शोधून काढण्यास तयार आहें, तर ह्या उद्योगास लागणारा खर्च करण्यास कंपनी तयार आहे कीं नाहीं; नसेल तर आम्ही स्वतंत्र रीतीनें तो मार्ग शोधून काढल्यास कांहीं वर्षेपर्यंत हिंदुस्थानच्या व्यपाराचा मक्ता आम्हांस देण्यास कंपनी तयार होईल कीं नाहीं?' ह्या अर्जावर कंपनीनें सभा भरून, आपल्या खर्चानें तें काम करण्याचा ठराव केला; आणि तीस हजार रुपये खर्च लागत होता, त्याची तजवीज केली. कॅप्टिन वेमथ यास एक हजार रुपये हत्यारांकरितां द्यावे, व नवीन मार्ग सांपडल्यास पांच हजार रुपये बक्षीस द्यावे, न सांपडल्यास कांहीं देऊं नये, असा त्याजबरोबर करार झाला. ह्या उपक्रमानें आपल्या उद्योगांत व्यत्यय येतो अशी मस्कोव्ही कंपनीनें तक्रार केली, तिचा निकाल लावण्यांत आला. सर्व सिद्धता व ठराव करण्यांत आले. राणीनें पत्रें लिहून दिलीं. परंतु ह्या सफरीचा कांहीं एक उपयोग झाला नाहीं. सर्व पैसा फुकट गेला. इतःपर उत्तरेकडील सफरीच्या भानगडींत कंपनी फारशी पडली नाहीं. तरी मधून मधून त्याजबद्दल थोडीबहुत उचल होतच असे. स० १६०६त जॉन नाइट व स० १६०७, ०८ व ०९ ह्या सालीं हेन्री हड्सन ह्यांनीं ध्रुवाकडील प्रदेशांत सफरी केल्या. तसेंच स. १६१२ पासून वुल्यम बॅफिन ह्यानें उत्तरध्रुवाकडे सफरी करून बराच शोध लाविला.

स. १७४१त रशियन कॅप्टिन बेहरिंग ह्यानें नवीन सामुद्रधुनी शोधून काढिली, तिला त्याचेंच नांव हल्लीं चालतें.

कंपनीच्या व्यवस्थापक मंडळींत एक गव्हर्नर, एक डेप्युटी गव्हर्नर, एक ट्रेझरर व २२ असामींचें एक बोर्ड, इतकी मंडळी दरसाल जुलै महिन्यांत बहुमतानें निवडण्यांत येत असे. तीच तीच मंडळी फिरून निवडण्यास हरकत नसे. त्यांच्या मदतीस एक सेक्रेटरी, एक हिशेबनीस व कांहीं कारकून असत. आरंभीं पृथक् सफरींची पद्धत चालू होती तोंपर्यंत ही व्यवस्थापक सभाच सर्व गोष्टींत मुखत्यार होती. वर्गणीदारांच्या हातांत फारशी सत्ता नव्हती. पुढें सुमारें पन्नास वर्षांनीं ह्या व्यवस्थापक बोर्डाचा अधिकार पुष्कळ कमी झाला. प्रत्येक सफरीचा हिशेब जरी निराळा असे, तरी एका सफरींत काम केलेलीं माणसेंच बहुतेक दुसऱ्या सफरींत घेण्यांत येत असत. तसेंच एका सफरीचा माल किंवा उत्पन्न दुसऱ्या सफरींत देऊन तें पुढील हिशेबांत धरण्यांत येत असे. इंकडे हिंदुस्थानांत कंपनीची जी मंडळी असत ती बहुधा बदलत नसे. तिचा खर्च ज्या त्या सफरीवर धरून घेण्यांत येत असे. हिंदुस्थानांतले लोक खासगी व्यापार करीत, तो बंद करण्यासाठीं मात्र पुढें अतोनात त्रास पडला. हिंदुस्थानांत आलेले लोक एका कुटुंबाप्रमाणें राहत व त्यांजवर कंपनीची देखरेख कुटुंबासारखीच असे. ह्मणजे हल्लीं ज्याप्रमाणें सरकारी नोकराच्या खासगी राहणीकडे पाहण्याची सरकारास जरूर वाटत नाहीं, तसा प्रकार तेव्हां नव्हता. प्रत्येक वखारीच्या ठिकाणीं सर्व लोक एका जमावानें राहत, एका ठिकाणीं जेवीत, सकाळ संध्याकाळ एकत्र जमून प्रार्थना करीत, आणि ठरीव वेळेपुढें रात्रीं बाहेर जाण्याची त्यांस मनाई असे. ईस्ट इं० कंपनीकडून बाहेर गेलेलीं आरंभींचीं पुष्कळ पत्रें ह्या लोकांच्या वर्तनासंबंधाचींच आहेत. 'भांडूं नये, शरीर स्वच्छ ठेवावें, वरीष्ठांस मान द्यावा, उपाध्यायाचें ऐकावें, प्रकृतीची काळजी घ्यावी, चहाडी किंवा अनीतीचें वर्तन केल्यास शिक्षा होईल, जुगार बिलकुल खेळतां नये, अमर्याद मद्यपान व मेजवान्या करूं नयेत,' अशा प्रकारचा उपदेश पत्रांतून आढळतो. व्यापाराच्या हकी-

कर्तीत अशा खासगी वर्तनाचा उल्लेख दरएक ठिकाणीं आलेला पाहून कंपनी आपल्या नोकरांशीं किती ममतेनें वागे हें दिसून येतें. ' ईश्वरावर भक्ति ठेवून व त्याची भीति बाळगून वागा ' हा उपदेश पदोपदीं आहे. 'तुह्मीं आपला पेहराव व खासगी वर्तणूक अशी ठेवा, कीं त्यास खर्च फार येऊं नये आणि व्यापाराच्या मुख्य हेतूस अडचण येऊं नये. कॅप्टिन वगैरे लोकांस सन्मान देण्यासाठीं बंदुकांची किंवा तोफांची सरबत्ती देऊन दारूगोळा संपविणें ठीक नाहीं; पोर्तुगीझ लोक आपला दारूगोळा अशा कामीं फुकट घालवितात, हें ध्यानांत ठेवा. एकंदरींत पोर्तुगीझ लोकांचा कित्ता न गिरवितां डच लोकांचें अनुकरण करा, डच लोक उद्योगी व सावध असतात, तसे तुह्मी वागा.' अशा प्रकारचा उपदेश इकडे येणाऱ्या लोकांस करण्यांत येत असे. त्यांजकरितां चांगलीं पुस्तकेंही इंग्लंडांतून पाठविण्यांत येत. कंपनीच्या पुढील यशःप्राप्तीचें बीज पुष्कळ अंशीं या प्राथमिक व्यवस्थेंत दिसून येतें.

# प्रकरण नववें.

## पृथक् सफरी व सर टॉमस रो.

( स. १६००–१६२०. )

१. युरोपियन कंपन्या. २. पहिल्या पृथक् सफरी.
३. पोर्तुगीझांशीं पहिला झगडा. ४. चीनजपानकडील प्रयत्न.
५. सर टॉमस रोची नेमणूक व प्रयाण. ६. मोगल दरबारची स्थिति.
७. तहाचा मसुदा व वाटाघाट. ८. ह्या उद्योगाची कमाई.
९. इराणांतील खटपट.

**१. युरोपियन कंपन्या.**—युरोपांतून हिंदुस्थानांत प्रथम पोर्तुगीझ लोक आले. त्यांच्या कंपन्या नव्हत्या. त्यांचा सर्व व्यापार सरकारच्या

हातांत होता. स. १७५२त पोर्तुगीझ सरकारानें हिंदुस्थानचा व्यापार पाहिजे त्यानें करण्यास मोकळीक दिली. तेथपावेतों सरकारच्या हुकुमाशिवाय कोणासही इकडे व्यापार करण्याची परवानगी नव्हती. पोर्तुगीझांनंतर डच लोकांचे प्रयत्न सुरू होऊन पहिली डच कंपनी स. १६०२त कायमची स्थापन झाली. फ्रेंचांनींही उद्योग सुरू केला. त्यांच्या अनेक कंपन्या स्थापन झाल्या. पहिली स. १६०४त, दुसरी स. १६११त, तिसरी स. १६१५त, चवथी स. १६४२त व पांचवी स. १६४४त निघाली. त्यांची सहावी व मोठी कंपनी पूर्व व पश्चिम दोहोंकडील व्यापाराकरितां स. १७१९त निघाली. तिचें नांव कंपनी ऑफ दि इंडीझ असें होतें. ह्या कंपनीचा इजारा स. १७६९ पर्यंत चालला. स. १७९०त हा इजारा फ्रेंच सरकारानें कायमचा रद्द करून सर्वांस व्यापाराची मोकळीक दिली. डेनमार्कची पहिली कंपनी स. १६१२त व दुसरी स. १६७०त स्थापन झाली. स्कॉटलंडांत स. १६१७त स्कॉटिश ईस्ट इंडिया कंपनी ह्मणून सर जेम्स कनिंगहॅम ह्यानें स्थापन केली स. १६९५त राजा तिसरा वुल्यम ह्यानें आफ्रिका व इंडीझ येथें व्यापार करणाऱ्या दुसऱ्या एका स्कॉट कंपनीस बावीस वर्षांची सनद दिली. पण ती कंपनी बुडाली.

ऑस्ट्रियाच्या बादशहानें ' ऑस्टेंड कंपनी ' नांवाची एक कंपनी स्थापणारांस १७२३त परवानगी दिली. ही कंपनी स. १७८४त बुडाली.

स्पेनच्या लोकांनीं स.१७३३त एक कंपनी स्थापिली, ती स.१८०८त बुडाली.

प्रश्यन लोकांनीं स. १७९०त आशियाटिक कंपनी स्थापिली; ती स. १८०३त बुडाली. बंगाल कंपनी ह्मणून दुसरी एक कंपनी त्यांनीं स्थापिली होती, तीही लगेच बुडाली ( स. १७५५-५६ ).

अशा प्रकारें इकडच्या व्यापाराकरितां अनेक कंपन्या युरोपांत स्थापन होऊन मोडल्या. एक इंग्रजांची ई० इं० कंपनी स० १६००त स्थापन झाली, ती मात्र अखेरपर्यंत टिकाव धरून राहिली, व तिनेंच हिंदुस्थानचें राज्य कमावलें, ह्मणून तिचीच हकीकत आपल्या इतिहासांत महत्वाची आहे.

**२. पहिल्या पृथक् सफरी** (स. १६००–१६१२).—या कंपनीच्या उद्योगाची पद्धत ध्यानांत घेतली, ह्मणजे तिच्या हकीकतीचे कित्येक विशिष्ट भाग पडतात. पहिला भाग स. १६०० पासून १६१२ पावेतोंचा. ह्या काळांत एकसारखा व्यापार चालू नसून, प्रत्येक सफरींचा कारभार तितक्या पुरता पुरा करून तो भागल्यावर मग दुसरी सफर काढण्यांत येई. पण जेव्हांच्या तेव्हां सर्व काम व हिशेब पुरा होणें अशक्य पडूं लागल्यानें दोन भिन्न सफरींतले लोक एकाच वेळीं हिंदुस्थान वगैरे ठिकाणीं येऊन चढाओढीनें व्यापार करूं लागल्यामुळें चुरस वाढून एकमेकांचें नुकसान होऊं लागलें; तेव्हां ही पृथक्-सफरींची पद्धत बंद करून एकदम समाइक भांडवल उभारून एकसारखा व्यापाराचा उद्योग सतत चालू झाला, तो सन १६१२ पासून १६६१ पर्यंत चालला. म्हणजे पुष्कळ वर्षेपावेतों उद्योग चालू ठेवून, त्यांचा हिशेब एकत्र ठेवण्याचा क्रम स.१६१२त सुरू झाला तो असा पन्नास वर्षे चालला.पण हाही प्रयत्न सफल झाला नाहीं. कितीही वर्षें काळ वाढविला, तरी कोणतीही सफर पुरी झाली असें न होतां घोटाळा राहीच. म्हणून एक जॉइंट स्टॉक पुरा करून दुसरा सुरू करावयाचा, ही कल्पना पुढें सोडून देण्यांत आली, आणि शेवटीं कंपनीच्या समग्र भांडवलाचे शेअर्स किंवा भाग करून त्यांची खुल्या बाजारांत खरेदीविक्री करावयाची अशी पद्धत चालू झाली, तीच अखेरपर्यंत कायम होती.

पहिल्या सफरींतील जहाजांस इंग्लंडचा किनारा दिसेनासा होण्यास दोन महिने लागले. ह्या सफरींत चार जहाजें असून त्या सर्वांवर मिळून ४८० लोक होते. एक जहाज ६०० टनांचें व बाकीचीं २५० पासून ३०० टनांचीं होतीं. त्यांजवर विक्रीचा माल सात लाख रुपयांचा असून शिवाय तीन लाखपावेतों चांदी होती. कापड, कथील, शिसें, कांच, सुऱ्या, शस्त्रें वगैरे पदार्थ विक्रीसाठीं भरलेले होते. वाटेंत आफ्रिकेच्या किनाऱ्यावर ह्या सफरींतले १०५ लोक आजारानें मरण पावले. जून ता. ५ स. १६०२ रोजीं कॅप्टिन लँकॅस्टर सुमात्राची राजधानी अचीन येथें गेला. तेथील राजाला एलिझाबेथचें पत्र व नजराणे वगैरे देऊन, त्यानें त्याजशीं व्यापाराचा तह केला. तरी पण त्याला

तेथें माल मिळेना. पोर्तुगीझ, डच वगैरे व्यापारी सर्व माल दडपून बसले होते. शिवाय त्या वर्षी मिरीं पिकलें नव्हतें, म्हणून पोर्तुगीझ लोकांचें एक ९०० टनांचें भरलेलें जहाज लँकॅस्टरनें लुटलें. पुढें जावा बेटांत जाऊन बँटमच्या राजाशीं स्नेह करून तेथें आपले कांहीं व्यापारी ठेवून लँकॅस्टर सेप्टेंबर स. १६०३त परत इंग्लंडास येऊन पोंचला. तेव्हां एलिझाबेथ राणी मृत्यु पावल्याची खबर त्यास कळली. त्यावरून राष्ट्राचा मोठा पाठिंबा गेला असें सर्वांस वाटलें. लँकॅस्टर ह्यास नाइटचा किताब मिळाला; आणि तो कंपनीचा एक डायरेक्टर झाला. पुढें कंपनीची नोकरी उत्तम प्रकारें करून स. १६१८त लँकॅस्टर मरण पावला. एलिझाबेथच्या पश्चात् राजा पहिला जेम्स गादीवर आला.

मिरीं, लवंगा, दालचिनी व गोंद मिळून एकंदर दहा लाख पौंडांचा माल लँकॅस्टरनें भरून आणिलेला पाहून कंपनीच्या लोकांस अपरिमित आनंद झाला. त्यांनीं सहा मजूर लावून सगळीं गलबतें खालीं केलीं. त्यांनीं माल चोरूं नये म्हणून त्या सहा मजुरांस खिसे नसलेले खादीचे कपडे मुद्दाम करून दिले होते. बँटम येथें मिऱ्याचा भाव शेरीं चार आणे असून इंग्लंडांत त्याचा भाव नेहमींच सुमारें सवा रुपया शेर असे, परंतु स. १५९९त तो ३.४ रुपयेपर्यंत चढला होता. अशा प्रकारें ह्या मसाल्याच्या व्यापारांत अतोनात फायदा होई. स. १६०६त आंबोयना बेटांत ३० हजार रुपयांस घेतलेल्या लवंगांचें उत्पन्न इंग्लंडांत स. १६०८त तीन लक्ष साठ हजार रुपये झालें. पण असा फायदा नेहमींच होत असे असें नाहीं. स. १६०३त इंग्लंडांत प्लेग चालू होता. एका वर्षांत लंडन शहरांत ३८१३८ लोक प्लेगनें मेले, असें कंपनीच्या हकीकतींत लिहिलेलें आहे. प्लेग गेल्यावर माल विकण्यास अडचण पडूं लागली; तेव्हां वर्गणीदारांनीं पैशाबद्दल माल घेतला. येणेंप्रमाणें सन १६०९ पर्यंत पहिल्या सफरीचे हिशेब संपले नाहींत. हिशेब पुरा झाला तेव्हां दोन सफरींत मिळून शेंकडा ९५ फायदा झाला असें निदर्शनास आलें. तथापि हा फायदा नऊ वर्षांवर विभागला गेल्यानें तो कांहीं विशेष नाहीं असें दिसून येईल. सारांश पहिली सफर करून आल्यावर कंपनीचे बारा वाजण्याचा प्रसंग आला. लोकांचे

पगार वगैरे देण्यास एकदम साडेतीन लाख रुपये पाहिजे होते. प्लेगच्या कारणानें मालाची विक्री होईना. नेहमीं सहा मोठीं जहाजें व सहा लहान जहाजें व्यापारावर फिरतीं असावीं अशी सनदेंत अट असून दरसाल एक सफर होईल असा राणीचा अंदाज होता. तेव्हां कंपनीची ही ढिलाई राणीस खपली नाहीं. प्रिव्हिकौन्सिलास दम निघेना. ह्मणून स. १६०३त कसेंबसें करून दुसरी सफर पाठविणें भाग पडलें. पण त्यासाठीं वर्गणी जमेना. शेवटीं पहिल्या सफरींतील लोकांस तारण देऊन पहिल्याच वर्गणीदारांकडून पुनः कांहीं भांडवल जमा केलें. पहिलींच जहाजें दुसऱ्या सफरींत गेलीं. ही सफर १६०३च्या मार्चांत निघाली. हींत फक्त अकरा हजार रुपये किंमतीचा माल विक्रीसाठीं बाहेर आला. रोख शिल्लकही बरोबर थोडीच होती. पहिल्या व दुसऱ्या सफरीचे हिशेब एक करण्याचा ठराव झाला. कॅप्टन मिडल्टन हा ह्या सफरीचा मुख्य कामदार होता. त्यानें बँटम येथें दोन जहाजांत मिरीं भरलें व दुसऱ्या दोन जहाजांनीं आंबोयनांत लवंगा भरल्या. चांचे लोकांनीं टर्नेटच्या राजाचा समुद्रांत पाठलाग चालविला असतां, मिडल्टननें येऊन राजास सोडविलें. त्याबद्दल त्या राजानें कृतज्ञपणें मिडल्टन यास व्यापाराची सवलत लेखी तहानें ठरवून दिली. ह्याप्रमाणें एतद्देशीय राजांशीं संधान जुळवून त्यांजबरोबर तह करून घेण्याचा कंपनीचा आरंभ या वेळेपासूनच चालू झाला. कंपनीच्या जहाजांवर अशा तहांचे अनेक मसुदे नेहमीं तयार असत. कागदांवर तह करून देण्यास एतद्देशीयांसही त्या वेळीं दिक्कत वाटत नसे. कारण त्या कागदांतील ठरावाची बजावणी मनगटाच्या जोरानेंच व्हावयाची होती. अशा तहांचा उपयोग आरंभा जरी कंपनीस विशेष झाला नाहीं, तरी ह्याच युक्तीनें पुढें इकडील राजांचे प्रदेश काबीज करण्याचा कंपनीनें उद्योग केला. मात्र पूर्वेकडील लोकांस तोंडच्या शब्दापेक्षां लेखाचें महत्व जास्त असे असें नाहीं. मिडल्टन १६०६त इंग्लंडांत परत आला. रस्त्यांत त्याचें एक जहाज जायां झालें.

इंग्रज लोक हा धंदा भीत भीत चालवीत असतां तिकडे डच लोकांचा उद्योगही सपाट्यानें चालू होता. त्यांचें भांडवल ५४ लाखांवर असून शिवाय

त्यांत मोठमोठीं गलबतें सारखीं राबत होतीं. आपल्या राज्यांतून सोनें, चांदी बाहेर जाणें हें इंग्लंडांत व स्पेन वगैरे पुष्कळ देशांत मोठें नुकसान ह्मणून समजलें जात असे. स. १६०३त एलिझाबेथ राणी मरण पावली, आणि पहिला जेम्स गादीवर आला, त्यामुळें कंपनीच्या अडचणी ज्यास्तच वाढल्या. मायकेल्बोर्न (Michelborne) ह्मणून एक गृहस्थ लॉर्ड ट्रेझरर बर्ले ह्याचा दोस्त असून तो पूर्वीपासूनच हिंदुस्थानच्या व्यापाराचा इजारा मागत होता. पण लंडनच्या व्यापाऱ्यांची जुटीची मागणी पाहून राणी त्या एकट्याची गोष्ट ऐकेना. तेव्हां 'मायकेलबोर्न ह्यासच तुम्ही आपल्या सफरीचा प्रमुख कामदार करून घ्या,' अशा प्रकारचें बोलणें बर्लेनें मंडळीकडे चालविलें. निदान असा मनुष्य सफरीबरोबर गेला तर त्या योगानें दरबारास सगळी खबर कळेल; कंपनीच्या हातास विशेष कांहीं किफायत लागल्यास त्यांत दरबारचें हित साधणारा आपल्या तर्फेचा कोणी तरी इसम असावा, असा बर्लेनें घाट घातला. ह्याचा परिणाम आपणास हितावह होणार नाहीं हें जाणून कंपनीनें बर्लेचें ह्मणणें साफ नाकारिलें. ते ह्मणाले, 'लोकांचे पैसे आमच्या हातांत आहेत, तर त्याची व्यवस्था आमच्याच मर्जीप्रमाणें चालली पाहिजे. ही व्यापाराची गोष्ट आहे, जेणेंकरून फायदा वाढेल तें काम आह्मांस केलें पाहिजे; उगाच यःकश्चित् गोष्टींत तंटा उपस्थित करून तलवार उपसल्यानें काम होत नसतें.' पुढें हा मायकेलबोर्न कंपनीचा एक वर्गणीदार झाला; पण पहिल्या सफरींत कबूल केलेली वर्गणी त्यानें भरली नाहीं ह्मणून कंपनीनें त्याचें नांव पटांतून काढून टाकिलें. याजबद्दल एलिझाबेथच्या मृत्यूनंतर त्यानें कंपनीवर सूड उगविण्याची संधि साधिली. सन १६०४त जेम्स राजानें त्याला खंबायतेपासून चीनपर्यंतच्या किनाऱ्यावर, कंपनीचा व्यापार ज्या ठिकाणीं चालत असेल तीं ठिकाणें शिवाय करून, व्यापार करण्याची परवानगी दिली. अशा रीतीनें कंपनीच्या एकतंत्री इजाऱ्यास अडथळा आला. मायकेलबोर्ननें प्रयाण केलें. बँटम येथें डच लोकांशीं तो लढला. त्यानें चिनी जहाजें लुटलीं आणि अनेक प्रकारें पूर्वेकडील देशांत इंग्रजांच्या नांवास काळिमा आणून तो सन

१६०६त परत आला. ह्यामुळें डकडे कंपनीची पत राहिली नाहीं. स्पेन पोर्तुगालशी इंग्लंडचा तह झाल्यामुळें त्यांजवर हात मारण्याचीही सोय नव्हती. शिवाय डच लोकांशी कंपनीची चुरस वाढत चालली होती. त्या चुरशींतच मायकल्बोर्नच्या हल्ल्याबद्दल आंबोयना येथें अखेरीस डच लोकांनीं जबरदस्त सूड घेतला. मायकेल्बोर्न स. १६११त मरण पावला.

सन १६०७त तिसरी सफर बाहेर आली. तिचा मुख्य कॅप्टिन् कीलिंग हा होता. ह्या सफरींत आणलेल्या मसाल्याचें उत्पन्न इतकें झालें, कीं शेंकडा २३४ नफा झाला. ह्यामुळेंच कंपनीची थोडी निभावणी लागली. स. १६०८त चवथी सफर सिद्ध होऊन माराकुटीनें दोन जहाजांच्या भरतीची वर्गणी जमली. परंतु तीं दोनही जहाजें दुर्दैवानें समुद्रानें गडप करून टाकिलीं. तेव्हां स. १६०९त पांचव्या सफरींत एकच जहाज गेलें. ज्यास्त मिळेनात. कंप-नीची स्थिति अशा प्रकारें बरीच खालावली होती, तरी दरबारांत व बड्या मंडळींत व्यापारांतील ह्या किफायतीविषयीं मोठी हाव उत्पन्न होऊन राजानेंही त्यांत मन घातलें. त्यानें स. १६०९त ई. इं. कंपनीची सनद फिरून वाढवून दिली. तींत पंधरा वर्षांची पहिली मुदत काढून ती कायमची वाढविली; मात्र ह्या व्यापारांत राज्यास फायदा नाहीं असें राजास वाटल्यास, तीन वर्षांची आगाऊ सूचना देऊन कंपनी बंद करण्यांत येईल असें कलम होतें. ह्या नवीन सनदेंत राजानें सर्व मोठमोठ्या लोकांचा समावेश केला. अशा रीतीनें स. १६१०त सहावी सफर गेली. तिचा मुख्य सर हेनरी मिडल्टन होता. कंपनीनें एक मोठें जहाज स्वतः बांधिलें, त्याचा नामकरणविधि करण्यास राजा स्वतः गेला होता. त्याचें नांव व्यापारवर्धक ( Trades Increase ) असें ठेविलें. दुर्दैवानें हें जहाज बँटम येथे दुष्ट लोकांनीं जाळिलें व सर हेनरी मिडल्टनही तेथेंच पुढे स. १६१३त मरण पावला.

ह्या सुमारास डच व पोर्तुगीझ हे इंग्रजांचा हेवा करूं लागले. त्यांजशीं टिकाव धरण्याकरितां निरनिराळ्या सफरींची व्यवस्था मोडून जॉइंट् स्टॉक कंपनीची ह्मणजे समाइक भांडवलाची व्यवस्था करणें इंग्रज कंपनीस जरूर

पडलें. स. १६११त व १२त गेलेल्या सफरी मोठ्या तयारीच्या असून, पुढें सर्व सफरींची एक व्यवस्था कायम झाली. वर सांगितल्याप्रमाणें आरंभीं एकंदर नऊ पृथक् सफरी झाल्या. त्यांत खपलेलें भांडवल शेचाळीस लक्ष रुपये होतें. एकंदर गलबतें २६ होतीं. सर्व मिळून मुद्दलावर फायदा शेंकडा दीडशें पासून अडीचशें पावेतों पडला. ४६ लक्षांपैकीं २६ लक्ष गलबतांच्या व खाण्याच्या खर्चास लागले, बाकीचे व्यापारांत गेले. एवढ्या अवधींत राज्यांतून सहा लक्षांचा माल व रोख रकम तेरा लक्षांची बाहेर गेली. नफ्याचे आंकडे पाहिले ह्मणजे प्रथम आश्चर्य वाटतें; पण त्या वेळच्या अडचणी मनांत आणतां तो विशेष होता असें नाहीं. माल खपेनासा झाला ह्मणजे एक इंच मेणवत्ती बाजारच्या चौकांत जळत ठेवून लिलांव करण्याचा प्रघात पडला. मेणबत्ती जळावयाची संपली कीं लिलाव पुरा होत असे. त्या वेळीं लोकांच्या हातांपायां पडून भांडवल जमा करावें लागे. कंपनीच्या आरंभींच्या सफरी पूर्वेकडील द्वीपसमूहांत झाल्या. त्यांत पोर्तुगालशीं व स्पेनशीं तह झाल्यामुळें, पुष्कळ ठिकाणें वर्ज्य करावीं लागलीं आणि डच लोकांशीं तर इंग्रजांच्यानें टिकाव धरवेना.

वास्तविक त्यांनीं हिंदुस्थानाशींच व्यापार केला पाहिजे होता; पण त्या वेळीं हिंदुस्थानचा व्यापार पूर्वेकडील बेटांसारखा किफायतशीर समजला जात नसे. शिवाय त्याबद्दल मोगल बादशहाची परवानगी लागे. पूर्वी मिल्डेनहॉल नांवाचा गृहस्थ बादशहास भेटून परत गेला होता पुढें स. १६०९त कॅप्टिन हॉकिन्स नांवाचा गृहस्थ कंपनीच्या तर्फेनें मोगल बादशाकडे आला. बादशहानें त्याचा उत्तम सन्मान करून, कंपनीस सुरत येथें व्यापार करण्याची परवानगी दिली; आणि हॉकिन्स ह्याचें लग्न करून त्यास कांहीं तनखा करून दिला. ही त्याची बायको क्रिस्ती होती. तिच्याशीं नीटपणें संसार करून राहण्याचा हॉकिन्सचा विचार होता. पण कंपनीची कामगिरी त्याच्या हातून सिद्धीस गेली नव्हती. दरबारांत पोर्तुगीझ लोकांचें वजन भारी होतें. शेवटीं हॉकिन्सचे प्रयत्न निष्फळ होऊन तो आपल्या बायकोसह कसाबसा स. १६१२च्या आरंभीं खंबायतेहून इंग्लंडास गेला. बादशहाच्या एकंदर संपत्तीची आग्रा येथें

लेखी यादी तयार करून त्यानें आपल्याबरोबर नेली. हॉकिन्स पुढें मरण पाव- ल्यावर त्याच्या बायकोनें आंबोयनाचा गव्हर्नर टॉवरसन ह्याजशीं लग्न केलें. पूर्वे- कडील बेटांत व्यापाराचा जम बसेना, ह्मणून सुरतेस वखारी घालण्याचा प्रयत्न कंपनीनें केला, तोंही पोर्तुगीझ लोकांनीं तडीस जाऊं दिला नाहीं. तसेंच सहाव्या सफरींत सर हेन्री मिडल्टन ह्यानें तांबड्या समुद्रांत शिरून व्यापार करण्याचा प्रयत्न केला तो सुद्धां सफल झाला नाहीं. पुढें मिडल्टन सुरतेस येत असतां पोर्तुगीझांनीं बंदरांत येण्याचा त्याचा रस्ताच अडवून धरिला.

पश्चिमकिनाऱ्यावर सुरत व खंबायत येथें आपल्या व्यापाराचा जम चांगला बसेल असें कंपनीच्या व्यापाऱ्यांस वाटलें. स. १६०९त अँटनी मार्लोचें सुरतेहून कंपनीस पत्र गेलें त्यांत मजकूर होता तो असा.—'आमचें कापड व शिसें येथें बरें खपेल, लोखंड एडन येथें बरें जाईल; नीळ, कस्तुरी, कालिको कपडा, मिरीं वगैरे जिन्नस आपणांस मुबलक मिळूं शकतील. स. १६११त कारोमंडल किनाऱ्यावर कॅप्टिन हिपोन ह्यानें मच्छलिपट्टणनजीक पट्टपुळि येथें एक वखार घातली. इकडे एतद्देशीय लोकांशीं गुप्त बेत करून पोर्तुगीझ लोक इंग्रजांचे खून करण्याचाही प्रयत्न करीत, व कोणत्याही देशांत, मग तेथें त्यांचा व्यापार असो वा नसो, ते इंग्रजांचा शिरकाव होऊं देत नसत. राजा जेम्स त्यांजशीं तह करून बसला होता, इतकेंच नव्हे, तर स्पेनच्या राजाची मुलगी आपल्या मुलास करावी, अशी त्याची खटपट चालू होती. तथापि इंग्रज कंपनीचा पोर्तुगीझांशीं हिंदुस्थानांत झगडा सुरू होऊन त्यांत अखेरीस कंपनीचीच सरशी झाली.

**३. पोर्तुगीझांशीं पहिला झगडा** ( स. १६१२ ).—स. १६११त इंग्रज जहाजांस पोर्तुगीझ आरमारानें सुरतेस येऊं दिलें नाहीं, तेव्हां समुद्रांतच उभे राहून झाला तेवढा सौदा त्यांनीं केला. स. १६१२त रेड ड्रगून नांवाचें व दुसरें एक जहाज घेऊन इंग्रज कॅप्टिन बेस्ट हा सुरतचें बंदर सुवाळी येथें आला, तेथें त्यांस पकडण्याकरितां नोव्हेंबर ता. २९ रोजीं पोर्तुगीझांचीं चार जहाजें व १२० तोफांचें आरमार आलें. तें थोडें अव्यवस्थित होतें. त्याचा

फायदा घेऊन कॅप्टिन बेस्टनें त्यांजवर हल्ला केला. दोन तीन दिवस लढाई होऊन १००।१२५ पोर्तुगीझ लोक पडले. पुढें ही लढाई सुमारें महिनाभर चालू होती. इंग्रज कॅप्टिन मोठा हिकमती होता. त्यानें पोर्तुगीझांच्या मोठ्या आरमाराचा विध्वंस करून टाकिला. कॅप्टिन बेस्ट पुढें मोठ्या योग्यतेस चढला आणि स. १६३८ पर्यंत कंपनीची त्यानें नोकरी उत्कृष्ट बजावली. ही पोर्तुगीझांशीं इंग्रजांची पहिली टक्कर होय. या लढाईनें ई. इं. कं. चा फायदा झाला. महिनाभर चाललेला हा संग्राम मोगल अधिकारी व इतर लोक मोठ्या कौतुकानें पाहत होते. पोर्तुगीझांची जमिनीवर नाचक्की पूर्वीच झाली होती; आणि समुद्रावर त्यांची अशी पिछेहाट झालेली पाहून त्यांचा नकशा उतरला, आणि शंभर वर्षांची त्यांची पत क्षणार्धांत लयास गेली. या विजयाचा फायदा घेऊन टॉमस ऑल्डवर्थनें ( Aldworthe ) आगऱ्यास जाऊन सुरतेस कायमची वखार घालण्याची परवानगी बादशहापासून मिळविली. सुरतेच्या लढाईची बातमी ऐकून जहांगीर बादशहानें इंग्रजांस व्यापाराचें फर्मान एकदम दिलें. तसेंच सुरतेच्या मोगल अधिकाऱ्यांनींही कॅप्टिन बेस्ट याजबरोबर व्यापराचा ठराव केला; आणि सुरत, खंबायत वगैरे ठिकाणीं शेंकडा साडेतीन टक्के जकातीनें वखारी घालून व्यापार करण्याची परवानगी दिली. तसेंच अहंमदाबाद, बऱ्हाणपुर, अजमीर व आग्रा या ठिकाणींही त्यांनीं लहान लहान वखारी घातल्या. येणेंप्रमाणें इंग्रजांच्या व्यापारास इकडे कायद्याचें साह्य मिळून त्यांच्या पहिल्या पावलास हिंदुस्थानच्या पवित्र भूमीवर थारा मिळाला. कोणताही व्यवहार सरशेवटीं मनगटाचे जोरावर अवलंबून राहतो, नुसत्या तोंड वेंगाडण्यानें कोणी भीक घालीत नाहीं, हा जगाचा अबाधित न्याय इकडे इंग्रजांच्याही प्रथमच प्रत्ययास आला. सुरतेस वखार घालून व पृथक् सफरी सोडून, समाइक भांडवलाची पद्धत स्वीकारण्यानें कंपनीच्या इतिहासांतील दुसऱ्या कालखंडास सुरुवात झाली. हॉकिन्सच्या नंतर दुसरेही इंग्रज व्यापारी मोगल दरबारीं जाऊं लागले. बरोबर बादशहास कांहीं तरी नजराणा मात्र त्यांस घेऊन जावें लागे. हातमोजे, पाकिटें, चित्रें, सुऱ्या,

वाजणारीं घड्याळें, बायकांचे रेशमी मोजे अशा कोणत्याही चिजा नजर केल्या तरी चालत.

इकडे पोर्तुगीझ लोकांशीं युद्ध सुरू असतांच कॅप्टिन् डॉउन्टन (Downton) हा एक धाडशी गृहस्थ सन १६१४त कंपनीच्या एका सफरीचा मुख्य होऊन इकडे आला. त्याच वेळीं इंग्रजांची खोड मोडण्याकरितां ह्मणून गोव्यांहून एक मोठें पोर्तुगीझ आरमार तयार होऊन आलें. स्वतः व्हाइस्रॉय त्या आरमाराचा मुख्य होता. त्याजवळ २६०० युरोपियन लढाऊ लोक व २३४ तोफा होत्या. डॉउनट्टन्जवळ ४०० लोक व ८० तोफा होत्या. सुरत येथें तापीच्या मुखांत आंत इंग्रज व बाहेर पोर्तुगीझ असे सज्ज होऊन आले. इंग्रजांचा भावी अभ्युदय सर्वस्वी ह्या लढाईवर अवलंबून होता. डॉउन्टननें परमेश्वराचा धावा सुरू केला. दोघां शत्रूंची एक महिनाभर जंगी झटपट होऊन पोर्तुगीझ आरमार पुष्कळ नुकसान पावून परत गेलें. तेव्हां कॅप्टिन् डॉउन्टनचा सुरतच्या मोगल सुभेदारानें मोठा गौरव केला. पुढें डॉउन्टन् बॅन्टम येथें गेला असतां तिकडेच मरण पावला. वरील लढाईनें मलबार किनाऱ्यावर इंग्रजांची सरशी झाली. १६१६त कॅप्टिन् कीलिंग यानें उघडपणें कालिकोट येथें जाऊन सामुरीशीं तह केला. सन १६२२त इंग्रजांनीं पोर्तुगीझ लोकांचें इराणी अखातांतील मोठें बेट ऑर्मझ काबीज केलें. ह्या योगानें इराणी अखातांतून पोर्तुगालचा पाय निघाला. पुढें सन १६४२त पोर्तुगीझ लोकांनीं इंग्रजांचें पश्चिम किनाऱ्यावरील वर्चस्व थोडेंसें कबूल केलें; आणि १६५४त क्रॉमवेल व पोर्तुगालचा राजा चवथा जॉन यांजमध्यें तह होऊन इंग्रजांचा पगडा या देशांत कायम झाला.

स. १६१२त पृथक् भांडवलाची पद्धत मोडून समाइक भांडवलाची पद्धत सुरू झाली. सुरत येथें कॅप्टिन बेस्ट ह्यास यश आल्याबरोबर इंग्लंडांत कंपनीच्या चालकांस मोठा धीर आला. त्यांनीं एकदम बेचाळीस लक्ष रुपये भांडवल जमविलें. तेवढ्यांत स. १६१३ पासून १६१६ पावेतों चार सफरी झाल्या. दरसाल सुमारें सात जहाजें बाहेर गेलीं; आणि सरासरीनें शेंकडा

८७॥ फायदा झाला. पोर्तुगीझ व डच यांनीं त्रास दिला नसता तर याहूनही फायदा ज्यास्त झाला असता. एकदां नव्वद हजार रुपयांस घेतलेल्या मालाची इंग्लंडांत आठ लाख रुपये किंमत आली. ह्याप्रमाणें पहिलें समाइक भांडवल चार वर्षांचें होतें. पुढें दुसरें समाइक भांडवल उभारलें त्यास एक कोटि बासष्ट लक्ष रुपये एकदम गोळा झालें. हें भांडवल ९६४ गृहस्थांनीं उभारलें होतें. त्यांत राष्ट्रांतील सर्व मोठमोठ्या लोकांचा समावेश होता. अर्थात् ह्या वेळेपासून ई० इं० कंपनीच्या व्यापारांत एकंदर इंग्रज राष्ट्र सामील झालें असें ह्मणण्यास हरकत नाहीं. स. १६२१त कंपनीनें आपल्या वीस वर्षांच्या कारभाराची करामत पार्लमेंटपुढें मांडिली त्यांत खालील हकीकत जाहीर केली.

| पाठविलेलीं गलबतें. | पैकीं सुरक्षित परत. | बुडालीं. | जायां झालीं. | शत्रूच्या हातीं गेलीं. | हिंदुस्थानांत माल भरीत आहेत. | एकूण. |
|---|---|---|---|---|---|---|
| ८६ | ३६ | ९ | ५ | ११ | २५ | ८६ |

| रोख रक्कम पाठवितां आली असती | रोख रक्कम पाठविली. | किंमतीचा माल पाठविला. | एकूण पाठविली. | पैकीं ३६ गलबतांनीं आणलेल्या मालाच्या खरेदीची किंमत. | ह्या मालाच्या विक्रीची इंग्लंडांत उपज. |
|---|---|---|---|---|---|
| ९१लक्ष रु. | ६१,२६,८१० | ३१,९२,११० | ९३,१८,९२० | ३७,५२,८८० | २को.४६ह. |

स. १६७०त सर जोशिया चाइल्ड ह्यानें पार्लमेंटास असें जाहीर केलें, कीं एक एकावर ६० पासून १०० लढाऊ लोक, व सुमारें ३० तोफा, अशा मासल्याचीं तीन मजल्याचीं २५।३० लढाऊ जहाजें एकट्या कंपनीनेंच ठेविलेलीं असल्यामुळें, राष्ट्राच्या आरमारास मोठीच बळकटी आली आहे. या वरून कंपनीच्या भरभराटीची कल्पना होईल.

**४. चीन जपानकडील प्रयत्न.**—आरंभीं कंपनीच्या व्यापाराचे प्रयत्न चीन व जपान इत्यादि देशांतही बरेच झाले. वुल्यम अडॅम्स नांवाचा

केंटकाउंटींत राहणारा एक इंग्रज गृहस्थ सरकारी आरमारांत नोकर होता (स० १५६२–१६२०). स० १५९८त डच लोकांच्या सफरींत पायलट म्ह० वाटाड्याची नोकरी पतकरून तो इंकडे आला. इकडे येत असतां सफरींत त्याचें जहाज इतरांपासून अलग होऊन, त्याजवरील बहुतेक लोक आजारानें वगैरे मेले, आणि तो फिरांडो येथें जपानच्या किनाऱ्यास लागला. जपानांत त्या वेळीं पोर्तुगीझ व जेझुइट लोक गेले होते; त्यांनीं त्यास मारण्याचा बेत केला. पण नशिबानें तो वांचला. जपानच्या बादशहापुढें त्याची चौकशी झाली. पुढें जहाजें बांधण्याच्या कामांत बादशहानें त्याची हुशारी पाहून त्यास नोकरीस ठेविलें. तेथें तो वाढत वाढत महत्त्वास चढला. त्यास बादशहानें इनाम देऊन हाताखालीं ८०।९० कामकरी मजूर दिले. पुढें स. १६०९त कांहीं डच जहाजें फिरांडोच्या बंदरांत आलीं; त्यांस अडॅम्सच्या शिफारसीनें जपानांत व्यापार करण्याची परवानगी मिळाली. तेव्हां डच लोकांपासूनच त्यास कळलें, कीं इंग्रज मंडळीसुद्धां व्यापाराकरितां इकडे अनेक ठिकाणीं आली आहेत. हें ऐकून त्यानें बँटम येथील आपल्या जातभाईस मोठ्या काकुळतीचें पत्र पाठविलें. त्यांत जपानांत व्यापार कसा चालेल, काय काय माल खपेल वगैरेची माहिती देऊन, शिवाय जपानच्या इतकी उत्कृष्ट राज्यव्यवस्था पृथ्वीवर दुसरे कोठें नाहीं, तेथें बेधडक व्यापार सुरू करा, अशी विनंति केली. हें पत्र येण्यापूर्वीच अडॅम्सची हकीकत डच लोकांमार्फत इंग्लंडांत कळून कंपनीचे व्यापारी जपानशीं संबंध जोडण्यास उत्सुक झाले होते. तदनुरूप सातव्या सफरींतील एक इसम कॅप्टिन सॉरीस स० १६१३त एक जहाज घेऊन फिरांडो येथें आला. त्याची व अडॅम्सची भेट झाली; आणि दोघांनीं मिळून बादशहाचें मन वळवून फिरांडो येथें कंपनीकरितां व्यापार करण्याची परवानगी मिळविली. पुढें दरसाल हजार रुपये वेतन घेण्याच्या करारानें अडॅम्सनें कंपनीची नोकरी पत्करिली. त्यानें जपान सोडून जाऊं नये म्हणून बादशहानें पुष्कळ खटपट केली. ‘ बायकामुलांस भेटून येतों, ’ असें त्यानें सांगितलें, तेव्हां बादशहानें त्याचें

जपानांतच लग्न करून दिलें. तेथें त्यास मुलेंही झालीं. पुढें दोन तीन वर्षें जपानांत राहूनच तो कंपनीची नोकरी करीत होता. तेथेंच तो सन १६२०त मरण पावला. यड्डो शहरांतील एका रस्त्यास ह्या अडॅम्सच्या नांवावरून 'पायलट स्ट्रीट' असें नांव पडलें आहे. पण जपानांत पुढें कंपनीचा व्यापार नीट चालला नाहीं. पोर्तुगीझ व डच ह्यांनीं इंग्रजांस पुष्कळ त्रास दिला. शिवाय किनाऱ्यापासून आंतल्या प्रदेशांत जाऊन व्यापारवृद्धि करीत असतां, जपानी लोकांनीं सर्व युरोपियन लोक कापून काढिले. कोचीन चायनाच्या राज्यांत डच लोकांनीं खोटीं नाणीं चालवून माल खरेदी करून लोकांस फसविलें, त्यावरून तेथच्या राजानें जपानी लोकांमार्फत सर्वांचीच वरप्रमाणें कत्तल करविली असें ह्मणतात. स० १६१६त जपानचा बादशहा मरण पावला, आणि नवीन गादीवर आलेल्या बादशहानें इंग्रजांस व्यापाराच्या सवलती दिल्या नाहींत. तेव्हां सुमारें चार लक्ष रुपये फुकट जाऊन, जपानकडील व्यापार कंपनीस बंद करावा लागला. (स. १६२३).

स० १६१६त चीनशीं व्यापार करण्याची कंपनीनें खटपट केली. एलिझाबेथनें स. १५९६त सर रॉबर्ट डड्ले याजबरोबर चीनच्या बादशहास पत्रें पाठविलीं होतीं, पण त्यांपैकीं कोणीच इसम परत आला नाहीं. पुढें स. १६१४त कॉक्स नांवाच्या इसमाबरोबर पुनः जेम्स राजानें चीनच्या बादशहास पत्रें पाठविलीं. तेव्हां चिनांत इंग्रजांचें थोडेंबहुत दळणवळण सुरू झालें.

डच लोक जपानांत अडीचशें वर्षें व्यापाराची खटपट करीत होते, त्यांनीं ह्या कामीं नाना तऱ्हा करून पाहिल्या. पण त्यांस कांहींच यश आलें नाहीं. आपल्या देशांतील सोनेंचांदी बाहेर जाऊं नये ह्मणून जपानी बादशहानें सक्त हुकूम सोडिले, तेव्हां परदेशचा माल देशांत येण्याची बंदी झाली. सन १६३५–३८ पर्यंतच्या चार वर्षांत पोर्तुगीझ लोकांनीं दोन कोटि तीस लक्ष रुपयांची सोनेंचांदी जपानांतून बाहेर नेली. तसेंच स. १६११–१६४० पावेतों डच लोकांनीं जपानांतून दोन अब्ज शहायशीं कोटि रुपये बाहेर नेले, असा लेखी उल्लेख सांपडतो. ( Rundall's

Memories of Japan. ) अशा प्रकारें पैसा बाहेर जाऊं नये ह्मणूनच त्याबद्दल जपानच्या बादशहानें पुढें सक्तीचे उपाय योजिले.

**५. सर टॉमस रोची नेमणूक व प्रयाण.**—समाइक भांडवलाची पद्धत कंपनीनें स. १६१३त सुरू केली. पहिल्या सफरींचा मुख्य कॅप्टिन डॉउन्टन ( Downtan ) म्हणून होता हें वर सांगितलेंच आहे. त्यास इंग्लंडच्या राजाची अशी ताकीद होती, कीं विनाकारण कोणाशीं कलह उकरून काढूं नये, पण आपल्या वाटेस कोणी गेल्यास, सूड घेण्यासही कमी करूं नये, आणि लूट मिळेल ती सरकारांत जमा करावी. स. १६१४ च्या ऑक्टोबरांत डॉउन्टन सुरतेस आला, तेव्हां तेथें ऑल्ड्वर्थ हा कंपनीचा मुख्य व्यापारी होता. ऑल्ड्वर्थनें बडोदें, अहंमदाबाद वगैरे आजूबाजूच्या ठिकाणीं प्रवास करून इकडील व्यापाराची माहिती पुष्कळ मिळविली होती. त्यावरून त्याचें असें मत झालें, कीं कापसाचीं हरतऱ्हेचीं वस्त्रें ह्या प्रांतांत तयार होतात तीं फार स्वस्त असून त्यांचा खप युरोपांत चांगला होईल; अहंमदाबादेस नीळ फार स्वस्त मिळे, तिचाही व्यापार चांगला चालेल. पण अशा व्यापारास लाख दीडलाख रुपयांचें भांडवल हातांत खेळतें पाहिजे; आणि व्यापाराच्या संरक्षणार्थ मोगल दरबारीं आपला एक कायमचा वकील असला पाहिजे. ऑल्ड्वर्थच्या ह्या सूचनेचा विलायतेंत चांगलाच परिणाम झाला.

आग्रा येथें मोगल दरबारीं पोर्तुगीझ लोकांचें वजन विशेष असल्यामुळें ईस्ट इंडिया कंपनीचा व्यापार नीट चालेना. म्हणून प्रत्यक्ष इंग्लंडच्या राजाकडून एकादा विद्वान व वजनदार वकील मोगल बादशहाकडे गेल्याशिवाय व्यापाराचा जम बसणार नाहीं; म्हणून अशा प्रकारचा वकील इकडे पाठविण्याची वाटाघाट बरेच दिवस इंग्लंडांत चालू होती. ऑल्ड्वर्थच्या वरील पत्राप्रमाणेंच दुसऱ्या कित्येक हुशार इंग्रज व्यापाऱ्यांचींही तशींच पत्रें विलायतेस गेलीं होतीं. त्याप्रमाणें सन १६१४ च्या सेप्टेंबर महिन्यांत गव्हर्नर सर टॉमस् स्मिथ ह्यानें असा वकील हिंदुस्थानांत पाठविण्याची सूचना कंपनीपुढें आणिली; त्याची पुष्कळ वाटाघाट होऊन शेवटीं एक वजनदार गृहस्थ वकील म्हणून

पाठविण्याचें ठरलें. पुढें कोण गृहस्थ पाठवावा ह्याची चर्चा चालून, अखेरीस सर टॉमस रो ह्यास ह्या कामगिरीसाठीं विनंति करण्यांत आली.

सर टॉमस रो ह्या कामास अगदीं योग्य होता. तो तरुण, विद्वान्, तरतरीत, उद्योगी, देखणा व भव्य असून, त्याची शहाणपणाची व रुआबदार वागणूक लोकांच्या परिचयाची होती. त्याचा जन्म चांगल्या कुळांतला असून त्याचे वाडवडील संभावित व सधन होते. त्याचा आजा लंडनचा लॉर्ड मेयर होता. टॉमस रोचा जन्म स. १५८०।८१ च्या सुमारास झाला. त्यास लहानपणीं चांगलें शिक्षण मिळालेलें असून त्यास एलिझाबेथच्या मानकरी मंडळींत नोकरी होती. जेम्स राजानें नाइटची पदवी दिल्यावरून त्यास सर ह्मणूं लागले. जेम्सचा मुलगा राजपुत्र हेन्री, व मुलगी एलिझाबेथ यांशीं त्याचा चांगला स्नेह होता. ह्या राजपुत्राच्या साह्यानें रोनें दक्षिण अमेरिकेची सफर करून साहसाचा अनुभव संपादन केला. ह्या सफरींत त्यानें आमेझोन नदींतून पुष्कळ वरपर्यंत प्रवास केला. राजपुत्र हेन्री स. १६१२त मरण पावल्यामुळें रोचा मोठा आश्रय तुटला. स. १६१४त त्याचा पार्लमेंटांत प्रवेश झाला. जेम्स राजानें आपल्या सल्लागारांत रोचा उपयोग करून घेतला नाहीं; तेव्हां राजास खूष ठेवून राष्ट्राच्या उपयोगी पडणें अशक्य वाटून, परराष्ट्राच्या वकिलीशिवाय दुसरी नोकरी त्यास राहिली नाहीं. सन १६१४च्या सुमारास तो पैशाकडून बराच अडचणींत आला होता. त्यानें नुकतेंच गुप्तपणें लग्न केल्यामुळें पैशाची अडचण वाढली होती. अर्थात् ईस्ट इंडिया कंपनीची वरील नोकरी येतांच, पडल्या फळाची आज्ञा ह्मणून तें काम त्यानें एकदम स्वीकारिलें. वर्षाचा पगार ६०० शें पौंड ठरून, त्यापैकीं निम्मी रक्कम त्यानें कंपनीच्या व्यापारांत भांडवल ह्मणून घालावी; तसेंच पांचशें मार्क ह्म० ३३३ पौंड त्यास कपड्यालत्याकरितां द्यावे; त्याच्याबरोबर हिंदुस्थानांत एक पाद्री व एक डॉक्टर कंपनीच्या खर्चानें दरमाल ५० व २४ पौंड पगाराचे असावे; शिवाय, नोकरचाकर व त्यांचा कपडालत्ता ह्यांबद्दल १३० पौंड ज्यास्त द्यावे; तसेंच भोजनाचा व इतर खर्च मागेल

दरबारांतून न मिळाल्यास तो कंपनीनें द्यावा, असा ठराव झाला. रोनें खासगी व्यापार करूं नये असेंही ठरलें होतें. ह्या ठरावास राजाची संमति मिळून त्यानें मोगल बादशहाच्या नांवचें पत्र लिहून रोपाशीं दिलें; आणि त्यास कामाची सर्व व्यवस्था सांगितली. 'जेम्स राजा मोठा भाग्यशाली आहे; त्याची दर्यावरील सत्ता प्रबल असल्यामुळें सर्व राष्ट्रांस त्याचा धाक वाटतो; त्याची रयत त्याची आज्ञा मोठ्या तत्परतेनें पाळते, इतकेंच नाहीं, तर तो त्यांस फार आवडतो.' इत्यादि गोष्टी मोगल बादशहाच्या मनावर बिंबविण्याचा रोनें प्रयत्न करावा अशी त्यास राजाची विशेष सांगी होती.

ह्याप्रमाणें सर्व सिद्धता झाल्यावर, ता. २ फेब्रुवारी, स. १६१५ रोजीं सर टॉमस रो पंधरा नोकर बरोबर घेऊन लायन नांवाच्या गलबतांत बसून इंग्लंडाहून निघाला. वारा प्रतिकूळ असल्यामुळें इंग्लंडचा किनारा दिसेनासा होण्यास एक महिना व सुरतेस पोंचण्यास साडेसात महिने लागले. हा काळ त्यास फारच त्रासदायक वाटला. गलबतावरील अधिकाऱ्यांचें व त्याचें पटलें नाहीं. रस्त्यांत केप ऑफ गुड होप, कोमोरो बेटें व सोकोत्रा बेटें येथें जहाजांनीं वरवा केला. तेथेंच त्यास कंपनीचें परत येणारें एक जहाज भेटलें व हिंदुस्थानांतील बरीच हकीकत कळली. ता० १८ सेप्टेंबर, स. १६१५ रोजीं रो सुरतेस सुवाळीच्या धक्यावर उतरला. त्या वेळेस एड्वर्ड्स् नांवाचा कंपनीचा एक एजंट आग्रा येथें मोगल दरबारीं होता. गुजराथचा कारभार शहाजादा खुर्रम् म्ह० शहाजहान ह्याजकडे असून, त्याच्या तर्फेनें झुलिफकारखान तेथचा कारभार पाहत होता. मुकर्रबखान नांवाचा पूर्वीचा सुभेदार दिल्लीस प्रमुख असून, त्याच्या मार्फतच ह्या परराष्ट्रांशीं बादशहाचे व्यवहार चालत. बादशहाची पोर्तुगीझ लोकांशीं नुकतीच समुद्रावर एक लहानशी चकमक झडून उभयतांचा तह ठरत होता; त्यांत शहाजादा व इतर सरदार पोर्तुगीझांच्या लाभांत होते.

अशा स्थितींत रो यास थोडें काम करावयाचें नव्हतें. हिंदुस्थानच्या जमिनीवर पाय ठेवतांच त्यास नाना प्रकारच्या अडचणी येऊं लागल्या.

प्रथमपासूनच आपला बोज चांगला राखण्याचा त्यानें निश्चय केला होता, कारण पूर्वीचे कंपनीचे अधिकारी मोगलांच्या ताब्यांतील हलक्या नोकरांची व शिपाई, हमाल वगैरेंची मनधरणी करून आपलें काम साधीत असत. हा प्रकार रो यास पसंत वाटला नाहीं. त्यानें लांच किंवा नजराणा देऊन सुरतच्या अधिकाऱ्यांची मर्जी संपादण्याची खटपट केली नाहीं. तेव्हां त्या लालचावलेल्या अधिकाऱ्यांची मर्जी खपा होऊन ते रो यास त्रास देऊं लागले. पण तो धूर्त मुत्सद्दी डगमगला नाहीं, आणि अपमान सहन न करितां त्यानें आपला उद्देश सिद्धीस नेला. ह्यांत सुरतेच्या अधिकाऱ्यापेक्षां इंग्रज वकिलाचाच शहाणपणा दिसून येतो. त्याची परवा न करितां रो जव्हां थेट आग्र्यास जाण्यास निघाला, तेव्हां त्या अधिकाऱ्यानें रोची उलट खुशामतच सुरू केली.

एवढा वकील इंग्लंडाहून बादशहाकडे आल्याबरोबर कंपनीच्या परिस्थितींत बरेंच अंतर पडलें. मोगल दरबार व पोर्तुगीझ यांजमध्यें जो तह ठरत होता, त्यांत मोगल हद्दींत इंग्रजांचें वास्तव्य होऊं देऊं नये असें एक कलम होतें; आणि तशा प्रकारचे हुकूमही सुरतेस आले होते. म्हणून सुरतेस वेळ न घालवितां रो त्वरेनें आग्र्यास निघाला. आग्र्यास बातमी कळतांच, त्याजकरितां रस्त्याचे परवाने आले, आणि सुरतेच्या अधिकाऱ्यास ठपका मिळाला. डिसेंबर ता. २३, स. १६१५ ला रो अजमीर येथें पोंचला. सुरतेहून अजमिरास येण्यास दोन महिने लागले. रस्त्यांत बऱ्हाणपूर येथें शहाजादा पर्वीझला भेटून तेथें वखार घालण्याची परवानगी रोनें मिळविली. बऱ्हाणपूर येथें त्यास भयंकर ताप येऊन त्याचा केवळ पुनर्जन्म झाला. आग्र्यास पोंचल्यावरही कांहीं दिवस तो आजारीच होता. शेवटीं ता. १० जानवारी, स. १६१६ रोजीं तो प्रथम जहांगीरच्या दरबारास गेला.

**८. मोगल दरबारची स्थिति.**—जाहांगीर बादशहाविषयीं रोचें मत पुष्कळ चांगलें आहे. मद्यपानामुळें बादशहा अशक्त व आळशी झाला होता तरी स्वभावतः अकबराचे बरेच गुण त्याच्या अंगीं होते. विशेषतः

दुसऱ्यांस योग्य सन्मान देऊन त्यांच्याशीं अदबीनें वागण्याचा मोठा गुण जहांगीरच्या आंगीं होता. रोचा तर त्यानें एवढा सन्मान केला, कीं त्या पूर्वी इराणी किंवा तुर्की वकिलांसही दरबारांत इतका सन्मान मिळाला नव्हता. रोच्या सभ्य व प्रतिष्ठित वागणुकीचा बादशहाच्या मनावर चांगलाच परिणाम झाला; आणि जरी रोच्या वकिलातीचे उद्देश फारसे सफल झाले नाहींत, तरी त्याजबद्दल बादशहाला आदर असे, ह्यांत संशय नाहीं. उद्देश सिद्धीस न जाण्याचें कारण बादशहाच्या हातांत विशेष सत्ता नव्हती. दरबारांत दुसरी वजनदार मंडळी असून त्यांची मर्जी संपादन करणें सुलभ नव्हतें. राणी नूरजहान, तिचा बाप इतिमादुद्दौला व भाऊ आसफ्खान, आसफ्खानाची मुलगी खुर्रमची बायको मुम्मताजमहल ही मंडळी राज्यकारभारांत प्रमुख असून त्यांचा उद्देश खुर्रमची सत्ता वाढवून वडील मुलगा सुलतान खुसरू व शहाजादा पर्वीझ ह्यांचा पाडाव करावा असा होता. जहांगीरवर रोची छाप चांगली बसल्यामुळें ह्या इतर मंडळीची त्यानें परवा केली नाहीं; म्हणून त्याचा बेत फसला. निदान ह्या मंडळीच्या वजनाची त्यास कल्पना झाली नाहीं. शिवाय ह्या सर्वांस देण्याजोगे जिन्नस रोपाशीं नव्हते. मुख्य नूरजहान व तिचा भाऊ यांस त्यांच्या योग्य त्यानें कांहींच दिलें नाहीं. शहाजादा खुर्रम ह्याची भेट घेतली. पहिल्याच भेटींत त्यानें सुरतच्या अधिकाऱ्याच्या दुर्वर्तनाबद्दल बादशहाकडे फिर्याद करण्याची गोष्ट काढिली, ती खुर्रम ह्यास आवडली नाहीं. खुर्रमचा ताठा विशेष होता, असें रोचें ह्मणणें आहे. कदाचित् सुरतच्या झुल्फिकारखानानें इंग्रजांच्या विरूद्ध खुर्रम्कडे तक्रारी केल्या असाव्या. तथापि आरंभीं खुर्रम्नें रोच्या संबंधानें वैषम्य दाखविलें नाहीं; आणि आपलें काम फत्ते होणार अशी रोस बरीच आशा वाटली. पोर्तुगीझ लोकांस तंबी देण्याचें काम पाहिलें होतें. इंग्रजांची व त्यांची स. १६१२त व १६१५त अशी दोनदां समुद्रावर लढाई झाल्यापासून एक गलबत भरावयाचें असलें, तरी बंदोबस्तासाठीं कंपनीला आपलें सर्व आरमार सुरतेला ठेवावें लागे. वास्तविक गोव्यावर एकदम हल्ला केला असता तर परभारेंच

बंदोबस्त झाला असता; पण वकील म्हणून शांततेच्या कामासाठीं आलेल्या रोला युद्ध हातीं घेणें शक्य नव्हतें. पो० शिवाय लोकांचा बंदोबस्त आपोआपच होत आला होता. पुढें बादशहाशीं इंग्रजांचा तह कायम झाला, आणि इंग्रजांस होणारा उपद्रवही बंद पडला. झालेल्या नुकसानाबद्दल इंग्रज व्यापारी प्रसंगोपात पोर्तुगीझ जहाजांवर हल्ले करून तीं लुटीत. त्या दोघांमधील लढा मोगलांनीं तोडला नाहीं ही गोष्ट दोघांच्याही पथ्थावरच पडली.

तथापि ह्या लढ्याची तडजोड चाललीच होती. तींत खुर्रम् व आसफ्खान हे तड लावीनात, तेव्हां रोनें बादशहाची गांठ घेऊन त्याजकडे तक्रार केली. त्यांत शहाजादा खुर्रम्चें नांव आल्यामुळें बादशहा एकदम रागावून बोलला, ‘ तुम्हांस कोणीं त्रास दिला तें एकदम सांगा. ’ दुभाष्याच्या मार्फत रोनें बादशहाचा राग शांत करण्याचा प्रयत्न केला; पण तो सिद्धिस न जातां, बादशहानें खुर्रम् व आसफ्खान ह्यांस तेथेंच बोलाविलें; आणि भरदरबारांत खुर्रमूला ठपका दिला. पुढें पोर्तुगीझ वकील व रो ह्यांचीही बरीच भांडाभांडी दरबारांत झाली, तेव्हां आसफ्खानानें मध्यें पडून रो ह्यास आपली तक्रार लेखी देण्यास सांगितलें व तंटा मिटविला.

ही तडजोड रोला बरीच समाधानकारक वाटली; कारण एकदां प्रकरण लेखावर आलें म्हणजे आपणास पाहिजे तसा तह करून घेतां येईल अशी रोस आशा वाटत होती. पाहिजे तेथें व्यापार करण्याची सामान्य परवानगी बादशहापासून मिळवावी, शहाजाद्याशीं वगैरे विनाकारण तोंडीं तंटा करण्याचा प्रसंग आणूं नये; एकदां बादशहाचें फर्मान मिळालें कीं तें सुरतेप्रमाणें इतर सर्व ठिकाणींही लागू पडेल, असें रोस वाटत होतें. वास्तविक अशा फर्मानाचाही कांहीं उपयोग होणारा नव्हता. कारण विशिष्ट व्यक्तीस हुकूम म्हणून हीं फर्मानें लिहिलेलीं असल्यामुळें, त्यांचा अंमल सर्व राज्यांत चालत नसे; आणि पुष्कळदां विरुद्ध हुकूम सुटल्यामुळें त्यांचा उपयोग होत नसे. वास्तविक उभय राष्ट्रांमध्यें पद्धतशीर तह ठरविणें एवढाच एक उपाय रो यास होता.

**७. तहाचा मसुदा व वाटाघाट.**—अशा प्रकारचा व्यापारी तह त्या वेळीं युरोपांतील तुर्कस्थानाशीं इतर युरोपियन राष्ट्रांनीं केलेला होता. त्याच तहाचा एक मसुदा करून तो रोनें बादशहाकडे रुजू केला. त्यांत खालील कलमें होतीं. इंग्रज व्यापाऱ्यांस सिंध बंगालसुद्धां हिंदुस्थानच्या किनाऱ्यावरील पाहिजे त्या बंदरांत व्यापार करण्याची मोकळीक असावी. राज्यांत इतरत्र चालू असलेल्या जकातीपेक्षां इंग्रजांच्या मालावर ज्यास्त जकात घेऊं नये. मालाची खरेदीविक्री करणें, वखारी भाड्यानें ठेवणें, बोटी व गाडे भाड्यानें ठेवणें, आणि पोटगीस लागणारें सामान चालू भावानें खरेदी करणें ह्या गोष्टी इंग्रजांनीं आपल्या मर्जीमाफक कराव्या, त्यांत सरकारी अधिकाऱ्यांनीं ढवळाढवळ करूं नये; तसेंच मयत इंग्रज व्यापाऱ्यांची मिळकत सरकारांत जमा करूं नये, व्यापारी किनाऱ्यावर उतरले असतां त्यांचा झाडा घेऊं नये, बादशहाला नजर देण्याकरितां आणिलेले जिन्नस किनाऱ्यावर उघडून तपासूं नयेत, जकातीच्या नाक्यावर माल पाडून ठेवूं नये, अशीं कित्येक कलमें होतीं. बादशहानें ह्या गोष्टी कबूल केल्यास, इंग्रजांनीं पाळण्याच्या शर्ती अशा होत्या, कीं इंग्लंडचे शत्रु किंवा इंग्रज जहाजांस त्रास देणारे दुसरे लोक ह्यांखेरीज इतर राष्ट्रांच्या जहाजांस इंग्रजांनीं त्रास देऊं नये; हिंदुस्थानांत राहणाऱ्या इंग्रज व्यापाऱ्यांनीं सभ्यपणानें व शांत वृत्तीनें राहवें; बादशहाकरितां कांहीं अप्रतिम चिजा पैदा करून देण्याची त्यांनीं खटपट करावी; बादशहानें योग्य मागणी केली असतां त्यास लागेल तो माल अथवा युद्ध-सामुग्री विकत द्यावी; आणि शांततेचा भंग करणारा शत्रु बादशहावर उठल्यास त्याचा बंदोबस्त करण्यास इंग्रजांनीं बादशहास मदत करावी; अशा प्रकारच्या शर्ती पोर्तुगीझ लोक पाळण्यास कबूल असतील तर त्यांजबरोबरही तसा तह करण्यास इंग्रजांची हरकत नसावी; परंतु सहा महिन्यांचे आंत पोर्तुगीझ लोक असा तह न करतील, तर त्यांस शत्रु समजून त्यांजशीं युद्ध करण्यास इंग्रजांस मोकळीक असावी, त्यांत बादशहानें हरकत आणूं नये. अशा प्रकारच्या कलमांचा मसुदा रोनें बादशहाकडे रुजू केला. बादशहानें तो वजीर आसफ-

खानास विचाराकरितां दिला. दोहों बाजूचीं कलमें पाहिलीं म्हणजे खोंच कोठें व कशी आहे, ह्याचा उलगडा वाचकांस सहज होईल. आसफ्खानानें नाहीं होय करितां, कांहीं थोडा शाब्दिक फेरफार करून मसुदा पसंत केला, आणि बादशहाचा शिक्का होणें मात्र बाकी आहे, असें त्यानें दरबारांत रो ह्यास कळविलें. इतक्यांत सुरतचा अधिकारी झुल्फिकारखान ह्याजविरुद्ध रोनें पूर्वी गाऱ्हाणीं केलीं असल्यामुळें, त्यास आग्र्यास येण्याविषयीं हुकूम जाऊन तो येऊन दाखल झाला. युरोपियन लोकांपासून आपल्या राज्यास उपयोग अगर अपाय काय आहे हें हा गृहस्थ पक्केपणीं जाणत असून त्याजविरुद्धच रोचा फिर्याद असल्यामुळें त्यानें आपल्या तर्फेची बाजू दरबारास स्पष्ट कळविली. तिचें वर्णन रोनें आपल्या पुस्तकांत विशेष दिलें नाहीं. म्हणून ह्या तहाच्या भानगडीची उलट बाजू कळण्यास मार्ग नाहीं. तथापि हा तह सिद्धीस जाऊं दिल्यास बादशाहीचें नुकसान होईल, असा दरबारांत समज होऊन तोच शेवटीं रो यास बाधक झाला असावा. बादशहाकडून कामाचा निकाल लवकर लागेना, तेव्हां थोडीशी चांगली मादक दारू शहाजाद्यास नजर करून तिच्या कैफांत त्याजवळ रोनें आपला निकाल मागितला. तेव्हां झुल्फिकारखान यास देहदंड न करितां, इतर सर्व बाबतींचा तुम्हांस संपूर्णपणें समाधानकारक असा निकाल लावितों, असें शहाजाद्यानें स्पष्ट वचन दिलें. ह्याउपर रो परत घरीं गेला. थोड्याच दिवसांत बादशहानें दोन फर्मानें सोडिलीं; एकांत इंग्रजांस सुरतेस राहण्याची व तेथून पुढें आंत प्रवास करण्याची परवानगी दिलेली होती; दुसऱ्यांत त्यांचें सुरतेस झालेलें नुकसान भरून देण्याचा तेथील अधिकाऱ्यास हुकूम होता. हीं फर्मानें रोनें घेऊन लगेच सुरतेस पाठविलीं.

पुढें झुल्फिकारखानापासून नुकसान काय भरून घ्यावें ह्याजबद्दलच्या वादांत महिना गेला. नाहीं होय करतां, झुल्फिकारखान सतरा हजार मामुदी देण्यास तयार झाला; परंतु ही रक्कम थोडी म्हणून रोनें स्वीकारिली नाही. पुढें असें आढळून आलें, कीं सुरतेच्या इंग्रज व्यापाऱ्यांनीं नुकसानीचा जो

हिशेब पाठविला तोच चुकीचा होता; ती चूक पदरांत आल्यामुळें रोची बरीच मानखंडना झाली; व सतरा हजार हातांत येते तर वाईट नाहीं असेंही त्यास वाटलें. आसफ्खान बाहेरून गोडगोड भाषणें करून वेळ मारून नेई, पण कोणतीही गोष्ट निकालास आणीना. रोचा तह म्हणजे स्वराष्ट्राच्या पायांत अडकविण्याची शृंखला होय असें वरील मसुदा वाचून वाटल्यास रोच्या अपमानापेक्षां आसफ्खानाच्या धूर्ततेचेंच कौतुक करावें लागेल.

रोची उत्तरोत्तर निराशा होत चालली. त्याजकडून आपणास ज्यास्त नजराणा मिळत नाहींत असें दिसल्याबरोबर, बादशहाचीही त्याजवरील मर्जी उतरत चालली. झुल्फिकारखानास त्रास दिल्यामुळें शहाजादा खुर्रम् तर रोचा द्वेषच करीत होता. इतक्यांत कांहीं पोर्तुगीझ लोक गोव्याहून अनेक उत्तमोत्तम चिजा घेऊन दरबारीं आले, त्यांनीं त्यायोगें आसफ्खान वगैरे वजनदार अधिकाऱ्यांस आपलेंसें करून घेतलें. तेव्हां इंग्रजांचा नकशा बराच कमी होऊन रो चिंतेंत पडला. ता. १ जून रोजीं आसफ्खानाचा त्याला निरोप आला, कीं शहाजाद्यानें तक्रार केल्यावरून, रोनें दरबारास येऊं नये अशी बादशहानें ताकीद केली आहे. हा हुकूम तोडून दरबारास जावें तर शहाजाद्याचे अनुयायी सूड घेण्यास चुकणार नाहींत अशाही सूचना आल्या. पण रो डगमगला नाहीं. ' झुल्फिकारखानाच्या शिक्षेचा नाद सोडून दिल्यास आपण मदत करण्यास तयार आहों, ' असें आसफ्खानानें त्यास सांगून पाठविलें, त्यास रोनें जबाब पाठविला, कीं ' कंपनीचा पैसा वाटेवर आलेला नाहीं. आम्हांस सगळें जग मोकळें आहे. तुम्हांस पैसे चारून व्यापार करण्याइतकी त्यांत आम्हांस किफायत नाहीं. आणखी थोडे दिवस आम्ही बादशहाच्या उत्तराची वाट पाहूं; आणि पुढें येथें राहवें कीं सर्व व्यापाऱ्यांसह हिंदुस्थानास शेवटचा रामराम ठोकून परत आपल्या देशास जावें ह्याचा विचार करूं. '

अशा प्रकारें एका बावांत दोन तुकडे करण्याचा विचार रोच्या मनांत घोळत असतां, एक अकल्पित गोष्ट घडून आली. मुकर्बखान म्हणून एक

सरदार पूर्वी इंग्रजांचा द्वेष्टा होता. त्यानें वरील प्रसंगीं इंग्रजांकडून कांहीं चिजा नजर मिळविण्याच्या आशेनें रो दरबारास न येण्याचें खरें कारण बादशहास जाऊन कळविलें. बादशहानें लगेच त्याजबरोबर रो ह्यास कळविलें, कीं, 'आम्ही तुम्हांस दरबारची बंदी केलेली नाहीं.' परंतु आसफखानाची पाठ सोडून मुकर्रबखानावर भरंवसा ठेवणें रो यास पसंत पडलें नाहीं. मुकर्रबखानाची खटपट पाहून आसफ्खानही रोची समजूत करण्याच्या खटपटीस लागला. पुढें त्याच्या मार्फत जून ता. २५ रोजीं रो पुनः दरबारास गेला. तेथें बादशहानें त्याचा पूर्ववत् सत्कार केला. इतके दिवस दरबारास न येण्याचें कारणही त्यानें विचारिलें नाहीं. पुढें झुल्फिकारखान व शहाजादा खुर्रम् हे दक्षिणेंत लढाईवर जावयाचे असल्यामुळें, झुल्फिकारखानावरील फिर्यादींची पुनः त्वरेनें उजळणी होऊं लागली. जुलई ता. ९ रोजीं तडजोड कायम झाली, तथापि पुनः होय नाहीं होऊन ता. ५ ऑगष्ट रोजीं एकदांचा कामाचा निकाल लागला, असें रोनें रोजनिशींत लिहिलें आहे. रोनें मागणी केलेली सर्वच रक्कम आली असें नाहीं; थोडेंबहुत नुकसान झालें, तथापि सत्तावान राजपुत्राच्या दोस्तास भूर्दंड द्यावा लागला हें इंग्रज वकिलानें कांहीं थोडें काम केलें नाहीं. इतर अधिकाऱ्यांवरही त्याचा परिणाम चांगलाच झाला. शहाजाद्याचा व रोचा बाह्यतः स्नेह जुळला. बादशहानेंही त्याचा मोठा सन्मान केला; आणि आसफ्खान त्याजबरोबर दोस्तीनें वागूं लागला.

मध्यंतरीं विलायतेहून आलेली एक सुंदर तसबीर रोनें बादशहास नजर करून पैज मारिली, कीं आपल्या देशांत कोणीही हिची नक्कल करून दोनही एक ठिकाणीं ठेवील, तर मी ही तसबीर हटकून ओळखून काढीन;' त्याचा समज, कीं हिंदुस्थानांत असें काम होणें शक्यच नाहीं. त्याप्रमाणें बादशहानें चित्राच्या नकला इतक्या हुबेहुब करविल्या, कीं रो यास आपली तसबीर ओळखूं आली नाहीं. बादशहानें त्या नकला रो यास नजर करून विलायतेस नेऊन दाखविण्यास सांगितलें, आणि 'तुम्ही समजतां तितके आमचे लोक अडाणी नाहींत,' असें त्यास कळविलें.

कांहीं दिवसांनीं डच लोकांचीं जहाजें विलायतेहून सुरतेस आलीं. डच लोकांस हिंदुस्थानांत थारा मिळाल्यास इंग्रजांचें फार नुकसान होणार होतें. पण त्यांच्या विरुद्ध तक्रार केल्यास सर्वांस व्यापाराची सवलत सारखी असावी, असा रोचा मुद्दा होता, त्यांत अर्थ राहिला नसता. तेव्हां डच लोक केवळ तुमचीं जहाजें लुटण्याच्या हेतूनें इकडे आलेले आहेत, अशा प्रकारची नालस्ती आसफखानास सांगून त्यांचा प्रतीकार करण्याचा रोनें प्रयत्न केला;पण तो सिद्धीस न जातां इंग्रज व्यापाऱ्यांस जशा सवलती मिळाल्या होत्या, तशाच प्रकारच्या सवलती मोगल दरबारानें स. १६१८त डच व्यापाऱ्यांसही कायमच्या लिहून दिल्या.

तहाच्या अटी दरबारापुढें ठेविल्यास पांच महिने होऊन गेले, तरी निकाल लागेना. पुढें इंग्लंडाहून जहाजें माल घेऊन येत आहेत अशी खबर आली. तेव्हां शहाजाद्यापाशीं खटपट करून रोनें त्याजपासून सुरतेच्या अधिकाऱ्याकर एक तात्पुरता हुकूम मिळविला; मात्र ज्या चिजा विक्रीसाठीं येतील त्या प्रथम शहाजाद्यास दाखवून त्यानें वाटतील त्या स्वतःसाठीं घ्याव्या असें कबूल केल्यावर, सुरतेस जहाजें उतरून इंग्रजांस व्यापार करण्याची परवानगी मोठ्या मिनतवारीनें मिळाली.

सेप्टेंबरांत जहांगीर बादशहाचा वाढदिवस मोठ्या थाटानें झाला. बादशहाची सुवर्णतुला होते ती पाहण्यास रो यास बादशहानें मुद्दाम आमंत्रण पाठविलें होतें. पण वेळेच्या समजांत चूक होऊन रोस तो प्रसंग पाहण्यास मिळाला नाहीं. सायंकाळीं पुनः आमंत्रण आल्यावरून तो बादशहाकडे गेला. त्या वेळीं बादशहा उत्तमोत्तम वस्त्रालंकारांनीं सजलेला असून,सभोंवतीं उमराव लोक बसले होते. त्यांजबरोबर मद्यप्राशनाचा सपाटा त्यानें चालविला होता. रो त्या प्रसंगांत सामील झाला आणि ज्या सोन्याच्या पेल्यांत त्यानें मद्यप्राशन केलें, तो त्यास झांकणासह बादशहानें बक्षीस दिला. ह्या प्रसंगीं जहांगीरनें रोचा अपूर्व गौरव केला. हा योग साधून तह कायम करण्याविषयीं रोनें आसफखानास आग्रह केला. त्यास खानानेंही होय म्हणून उत्तर दिलें.

दोन दिवसांनीं आसफखानानें तहाचा मसुदा परत पाठविला. त्यांत खानानें स्वदस्तुरचा मजकूर घालून बहुतेक कलमें नाकबूल केलीं. मसुद्यांतील कलमें बादशहाच्या इभ्रातीस योग्य नाहींत असें त्यानें कळवून, सुरतेचा संपूर्ण अधिकार शहाजाद्याकडे असल्यामुळें, त्याजकडून सुरतेचें फर्मान मिळविलें ह्मणजे बस आहे, बाकी बंगाल व सिंध ह्या प्रांतांत व्यापार करण्याची परवानगी देतां येत नाहीं; कांहीं कलमें पसंत करून ' तेवढींच पाहिजे तर बादशाही शिक्यानें तुह्मांस देऊं, ' असें खानानें रोस कळविलें. मोगल बादशाहीचा कारभार आसफखान किती दक्षतेनें पाहत होता हें यावरून व्यक्त होतें. ' आपणांस सुरतेच्या अधिकाऱ्याची आडकाठी असूं नये, त्याचा हुकूम आपणांस झुगारतां यावा, ' अशाच प्रकारची रोची मागणी असून ती कबूल झाली नाहीं यांत नवल नाहीं. तहाचा मसुदा खानाच्या हातांत आल्याबरोबर ' तुमच्या मागण्या अयोग्य असून पसंत होण्याजोग्या नाहींत, ' असें त्यानें रोस कळविलें होतें. पाश्चात्य राष्ट्रांच्या भांडणांनीं मोगल अधिकारी त्रासून गेले होते. हे तंटे गुजराथेंत आहेत तितके पुरत, आणखी बंगाल्यांत व सिंध प्रांतांत तरी नकोत, अशी त्यांची इच्छा होती. तसेंच इंग्लंडचा राजा मोगल बादशहाच्या बरोबरीचा आहे, ही गोष्ट दरबारांत पटली नाहीं. एकंदरींत मोगल अधिकाऱ्यांच्या मनांतले डावपेंच व संशय दूरदृष्टीचे होते. आसफखानानें बरेच दिवस रो यास आशेवर ठेविलें, ह्याबद्दल त्यास दोष देण्याचें कारण नाहीं. पुनरपि एकवार रोनें खटपट केली, त्यावरही आसफनें शहाजाद्याकडेच बोट दाखविलें. इतउत्तर शहाजाद्याच्या मार्फतच आपला हेतु सिद्धीस नेण्याचा रोनें बेत केला.

शहाजादा पर्वीझ दक्षिणच्या सुभ्यावर होता त्याची बदली ऑक्टोबरच्या सुमारास होऊन शहाजादा खुर्रमची नेमणुक त्या जागेवर झाली, आणि पर्वीझची नेमणूक बंगल्यावर झाली. दक्षिणेंत त्या वेळीं बरीच गडबड चालू होती. त्यांत खुर्रम यास पाठबळ देण्याकरितां स्वतः बादशहा तिकडे निघाला, तो प्रथम अजमिरास गेला. निघण्यापूर्वी इराणचा वकील आगऱ्यास आला;

त्याचा इतमाम व त्यानें आणलेले नजराणे ह्यापुढें इंग्रज वकील अगदीं फिका पडला; तथापि त्याच्या गौरवांत कांहीं कमी पडलें नाहीं.

इकडे कॅप्टिन पेप्वेलच्या हाताखालीं कांहीं इंग्रज जहाजें विलायतेहून सुरतेस आलीं. रस्त्यांत त्यांची व पोर्तुगीझ जहाजांची चकमक झडून इंग्रजांस जय मिळाला. ही खबर रोनें मोठ्या उत्कंठेनें मोगल दरबारास कळविल्यादर, बादशहानें विचारलें, कीं जहाजांत आपणांकरितां नजराणा काय आला आहे? रोनें सांगितलें, कीं ' नजराणे पुष्कळ आले आहेत; परंतु पेट्या बंदरावर न उघडतां त्या पुढें आणविण्याची परवानगी पाहिजे.' बादशहा ह्मणाला, ' बंदरावर संपूर्ण मालकी खुर्रमची आहे, त्याला सांगा. ' दुसरा एक प्रकार असा घडला, कीं मोगलांपासून एखादें बंदर मागून घेऊन तेथें तटबंदी वगैरे करण्याची परवानगी घ्यावी, असे हुकूम रो यास विलायतेहून आले. रो यास ही योजना पसंत पडून, ती सिद्धीस नेण्याची खटपट करून त्यानें शहाजाद्याकडे विनंति केली, कीं पोर्तुगीझ लोकांचा नुकताच पराभव झालेला असल्यामुळें ते पुनरपि इंग्रजांच्या व एतद्देशीयांच्या जहाजांवर हल्ले करितील; ह्यासाठीं एखादें तटबंदी केलेलें बंदर संपूर्णपणें इंग्रजांच्या ताब्यांत ठेविल्यास, आपण सर्व किनाऱ्याचें व तांबड्या समुद्रांतील एतद्देशीयांच्या व्यापाराचें संरक्षण करूं. ह्यावर शहाजाद्याकडून जबाब आला, तो असा कीं, ' आमच्या वडिलांस काय किंवा आम्हांस काय, इंग्रजांच्या मदतीची जरूर नाहीं; आमच्याकरितां आपण पोर्तुगीझ लोकांशीं लढण्याची तसदी घेऊं नये; ह्मणजे आपणांस तटबंदी करण्याचीही जरूर राहणार नाहीं.' मोगलांचा राज्यकारभार किती दक्षतेनें चालू होता हें ह्या बाणेदार जबाबावरून दिसन येतें. पुढें रोनें तीच विनंति बादशहापुढें ठेवण्यास आसफखानास सांगितलें असतां, त्यानें आम्ही आपल्या धन्यापुढें हें प्रकरण ठेवूं इच्छीत नाहीं, असा रोकडा जबाब रो यास दिला.

**८. रोच्या उद्योगाची कमाई.**—वर्षभर हिंदुस्थानांत राहून आपण काय काम केलें त्याचा रिपोर्ट रोनें विलायतेस पाठविला त्यांतील आशय असा.

' व्यापारासंबंधानें आपल्या मर्यादित इच्छा सफल होण्यास अडचण नाहीं. आमची बादशाहाजवळ चांगली पत आहे आणि आपल्या पाठिंब्याचा पुष्कळ उपयोग आहे. बरोबरीच्या नात्यानें बादशहाशीं आमचा कायमचा तह होणें शक्य नाहीं. आपल्याकडून योग्य नजराणे न आल्यामुळें माझी नाचक्की झाली आहे. तथापि थोडथोडा ह्मणतांना माझ्या येण्याचा बराच फायदा झाला आहे. आजपर्यंत आमच्यापासून उपटलेला लांच नजराणे वगैरेंचा पैसा परत मिळाला असून, आणखी बराच फायदा मिळण्याची आशा आहे. बाकी मोठ्या योग्यतेचा व दर्जाचा इंग्रज वकील ह्या दरबारीं राहण्याची आवश्यकता दिसत नाहीं. आम्ही मानपानास फार जपतों; परंतु ह्या दरबारास मानपान सोडून देणारा, व हांजी हांजी करणाराच मनुष्य पाहिजे. वर्षाचें एक हजार रुपये वेतन देऊन एकादा एतद्देशीय वकील ठेविला तरी काम भागणार आहे. बादशहास मदत करणें, किंवा तटबंदी करून किनाऱ्याचें संरक्षण करणें, असली हांव आपणांस उपयोगाची नाहीं. विनाकारण लोभाच्या पाठीस लागून खर्च वाढविण्यांत हांशील काय ? व्यापार व युद्ध ह्या दोन गोष्टी परस्पर विरोधी आहेत. पोर्तुगीझ लोक ह्या नादानें भिकेस मात्र लागले. ह्याचा नीट विचार करा. आपण असा एक निर्बंध कायमचा घालावा कीं नफा मिळवायाचा तर तो समुद्रावर गोडीगुलाबीनें व्यापार करूनच मिळवावयाचा. कोणी कुरापत काढिली नसतां तटबंदी व युद्धें करणें मोठी चूक होईल.'

नोव्हेंबरांत बादशहानें अजमीर सोडून मांडवगडास कूच केलें. तेथें तो मार्चांत येऊन दाखल झाला. रो यास एका पडक्या मशिदींत राहण्यास जागा मिळाली होती. मार्चपासून ऑक्टोबरपर्यंत बादशहाची स्वारी मांडवगडास राहिली. ह्या ठिकाणीं विलायतेहून आलेले नजराणे एडवर्ड टेरी ह्यानें आणून दाखविले. रस्त्यांत टेरीची व शहाजादा खुर्रमची गांठ बऱ्हाणपुरास पडली. तेव्हां तो त्यास पुढें जाऊं देईना. पण बादशहाचा सक्त हुकूम असल्यामुळें नाइलाज होऊन शहाजाद्यानें पेट्या पुढें जाऊं दिल्या. पेट्या आल्याबरोबर त्या रोस न विचारतां परभारें बादशहानें तावडतोब उघडून त्यांत होतें नव्हतें तें

सर्व ठेवून घेतले, त्यांत कांहीं इतर मंडळीकरितां चिजा होत्या, त्याही बादशहानें घेतल्या. आपल्या पश्चात् पेट्या उघडल्याबद्दल रोस अतिशय त्वेष आला; आणि दरबारांत बादशहाची व त्याची बरीच बोलाचाली झाली. इकडे खुर्रमची दक्षिणेंतील मोहीम फत्ते होऊन तो मांडवगडास आला, तेव्हां बादशहानें त्याचा मोठा सन्मान करून त्यास 'शहाजहान' किताब दिला. बादशहा केवळ त्याच्या मुठींत होता. रोनें विलायतेस परत जाण्याची इच्छा कंपनीस लिहून पाठविली होती, पण आणखी कांहीं दिवस राहण्याबद्दल तिकडून त्यास लिहून आलें. इतके दिवस नूरजहान व शहाजहान एक विचारानें होते; पण शहाजहानचें वाढतें वजन सहन न होऊन दरबारांत पुढें दोन पक्ष झाले, तेव्हां प्रसंग पडेल तसें वागून रो यास निभाव काढावा लागे.

ऑक्टोबर १६१७ च्या अखेरीस मांडवगड सोडून बादशहाची स्वारी अहंमदाबादेस आली. इतक्यांत विलायतेहून पुनः कांहीं जिन्नस आले, ते आपणांस मिळावे अशी शहाजहानची इच्छा होती. म्हणून सुरतेस जिन्नस आल्याबरोबर पेट्यांवर शहाजहाननें स्वतःचें मोर्तब लावून ठेविलें. पेट्या अहंमदाबादेस आल्यावर रोनें वीस दिवस वाट पाहिली, तरी उघडण्याची परवानगी आली नाहीं. तेव्हां रोनें परवानगीची वाट न पाहतां मोर्तब तोडून पेट्या उघडल्या. याबद्दल सर्वांसच मोठा राग आला. शहाजाद्यानें बादशहाकडे फिर्याद केली; त्यावरून रो बहुतेक नजरकैदेंत पडल्यासारखा झाला. बादशहानें त्यास उघड बोलून दाखविलें, कीं 'तुम्हीं सरकारचा हुकूम तोडिला; आतां तुमच्यावर आमचा विश्वास बिलकूल नाहीं.' अशा प्रकारचा बादशहाचा राग रोच्यासंबंधानें प्रथमच व्यक्त झाला होता. आपण अजाणतेपणीं हें काम केलें अशी सबब रोनें सांगितली.

स. १६१८ च्या फेब्रुवारींत रोनें वार्षिक हकीकत स्वदेशीं लिहून पाठविली, त्यांतही तो साफ लिहितो, कीं 'कायमचा तह होणें शक्य नाहीं. वेळ पडेल तसें आपण वागलें पाहिजे. जरूर तेवढीं फर्मानें मिळालीं आहेत, व कांहीं मिळावयाचीं आहेत. बादशहाची मर्जी हाच येथें कायदा असून

पैशावर सर्व व्यवहार चालतात. एकंदरींत लोकांस न्याय बरा मिळतो. अंमलदारांचा लोकांवर जुलूम नाहीं; मात्र त्यांस हवी असलेली चीज ते वाटेल तें करून उपटतील. आम्हांस त्रास पडतो तो आमच्याच अव्यवस्थेमुळें. ह्या लोकांशीं गरिबीनें वागून उपयोग नाहीं. त्यांस आमचा तिरस्कार वाटतो. त्यांचीं बंदरें सधन होतीं, तीं आह्मीं भिकेस लावून, त्यांचा व्यापार बुडविला आहे. आमची जरब त्यांजवर जितकी बसेल, तितकें आपलें काम होत जाईल. ह्या लोकांस तरवारीच्या धारेखालीं ठेविलें पाहिजे. जर आमच्या मागण्या अधिकाऱ्यांनीं कबूल केल्या नाहींत, तर बेलाशक एत्तद्देशीय व्यापाऱ्यांचीं गलबतें पकडून आह्मीं आपलें काम भागवावें.' इतक्या थरास पुढें गोष्टी आल्या नाहींत, तथापि आपण कधींही पडतें घेतां नये हें रोचें सांगणें होतें. कदाचित् डच लोक मध्यें पडून वरचढ होतील ह्याची रो यास मोठी भीति होती.

फेब्रुवारी स. १६१८त बादशहा कांहीं दिवस शिकारींत होता, त्या अवधींत रो बऱ्हाणपुरास जाऊन आला. पुढील मे महिन्यांत अहंमदाबादेस प्लेगची सांथ आली. इंग्रजांच्या कंपनींतले ७ लोक मेले. ऑगस्ट महिन्यांत बादशहा अहंमदाबाबाद सोडून आग्ऱ्यास जाण्यास निघाला, तेव्हां पुनः परत आग्ऱ्यास जाण्यांत अर्थ नाहीं असें वाटून रोनें परत जाण्यासाठीं बादशहाची रजा घेतली. जातांना बादशहापासून त्यानें जेम्स राजाला एक पत्र घेतलें, त्यांत इंग्रज व्यापाऱ्यांचा आपण चांगला परामर्ष घेऊं, असें बादशहानें अभिवचन दिलेलें होतें. शहाजहानास भेटूनही त्यानें सुरतेबद्दल एक फर्मान घेतलें. त्यांत कित्येक गोष्टींचा उल्लेख होता. मात्र नवीन घर बांधणें, किंवा तें कायमचें भाड्यानें घेणें, ह्या गोष्टी सर्वथैव मना केल्या होत्या; तसेंच इंग्रज कंपूतील लोकांस हत्यारें वापरण्याची परवानगी नव्हती. हत्यारें वापरणारांची संख्या ठरीव होती. रोनें मात्र वाटाघाट करून आपले लोक सुरतेच्या लोकांस त्रास देणार नाहींत, अशी स्वतः हमी घेतल्यावर हत्यारांच्या परवान्याचें कलम शहाजाद्यानें रद्द केलें. सेप्टेंबर सन १६१८त हें

फर्मान हातांत पडल्यावर रो सुरतेस गेला. तेथें चार महिने राहून जहाजें वगैरे भरल्यावर, स. १६१९, फेब्रुवारी ता. १९ रोजीं रो विलायतेस जाण्यास निघाला, तो त्या सालच्या ऑगस्टअखेर लंडनास पोंचला. तेथें आल्यावर त्याचा उत्तम प्रकारचा सत्कार झाला. त्याची कामगिरी सर्वांस पसंत पडली; आणि त्यास कंपनीनें १५००० रुपयांची रक्कम बक्षीस दिली.

एकंदरीनें रोचें येणें निष्फळ झालें नाहीं असें मानतात. त्यास संपूर्ण यश आलें नाहीं खरें, पण त्यांत त्याचा इलाज नव्हता. पोर्तुगीझ लोकांचा कायमचा बंदोबस्त झाला. राष्ट्र या नात्यानें इंग्रजांची छाप मोगल दरबारीं चांगली बसली. स्थानिक अंमलदारांचा त्रास बंद झाला. त्यायोगें जें बीं हिंदुस्थानांत रुजत घातलें गेलें, त्याच्या मुळांस जमिनींत पाळें घेण्यास अवकाश मिळाला. पोर्तुगीझ वगैरे इतर राष्ट्रें निराळाच पंथ स्वीकारीत असतां, इंग्रजांनीं रोसारखा वजनदार व न डगमगणारा गृहस्थ तीन चार वर्षें मोगल दरबारीं ठेविला, त्यामुळें त्या राष्ट्राची इभ्रत इकडे पुष्कळ वाढली. जहांगीर व शहाजहान ह्यांस रोच्या गुणांची चांगली पारख झाली. एकंदरींत ज्या थोर इंग्रज पुरुषांनीं अंगच्या अनेक गुणांवर हिंदुस्थानांत इंग्रजी राज्याची इमारत उभारली, त्यांपैकीं रो हा पहिला होय. त्याच्या बरोबरीचे पुढें कित्येक पुरुष झाले, पण वरचढ कोणीच झाला नाहीं, असें इतिहासकारांचें मत आहे. रोची रोजनिशी व पत्रें वाचलीं म्हणजे मोगल बादशाहीच्या तत्कालीन स्थितीची चांगली कल्पना होते. पाश्चात्य ग्रंथकारांत रोच्या लेखाची किंमत विशेष आहे. सुरतेशिवाय, इराणांत व तांबड्या समुद्रावरील बंदरांत इंग्रजांचा व्यापार वाढविण्याची रोनें बरीच खटपट केली.

हिंदुस्थानांत परत गेल्यावर रोनें आणखी पुष्कळ मोठमोठीं कामें केलीं. दोन वर्षें तो पार्लमेंटचा मेंबर होता. नंतर स. १६२१त कान्स्टांटिनोपल येथील शहाच्या दरबारीं वकील ह्मणून नेमणूक होऊन तेथें त्यानें फारच उत्कृष्ट काम केलें. त्या कामावर तो मोठ्या नाखुषीनें स. १६२८ पर्यंत राहिला. पुढें स्वीडन व पोलंड यांजमधील तह त्याच्या मध्यस्थीनें ठरला.

पहिल्यानें चार्लस् राजानेंही त्याचा सन्मान उत्तम केला. पण त्याचीं मतें भिन्न असल्यामुळें राजानें आपल्या राज्यकारभारांत रोचा उपयोग करून घेतला नाहीं. पुढील दहा पांच वर्षांत आणखी त्यानें कित्येक कामें केलीं. स. १६४२त राजा व पार्लमेंट यांजमध्यें युद्ध जुंपल्यावर रोची चलबिचल झाली. त्याचीं मतें लोकपक्षाचीं होतीं, पण राजावर उघड शस्त्र उभारण्यास त्यास धीर होईना. स. १६४४त नोव्हेंबर तारीख ६ रोजीं रो मरण पावला.

९. **इराणांतील खटपट.**—एलिझाबेथचीं पत्रें घेऊन कांहीं व्यापारी हिंदुस्थान व चीनप्रमाणेंच इराणांतही गेले होते. सर अँटनी शर्ले (Shirlay) ह्यानें स. १५९९त शहा अब्बासकडून इराणच्या व्यापाराची लेखी परवानगी मिळवून ती इंग्लंडास पाठविली होती. वरील शर्लेचा भाऊ सर रॉबर्ट शर्ले हा बरेच दिवस इराणांत जाऊन राहिला होता. त्यास इराणच्या शहानें आपला वकील ह्मणून स. १६०७त इंग्लंडाशीं दोस्ती करण्याकरितां पाठविलें. ईस्ट इंडिया कंपनीनें इराणशीं व्यापार सुरू करण्याची पुष्कळ खटपट केली, पण ती सिद्धीस गेली नाहीं. पुढें सुरतेहून कंपनीचा एक नोकर कॅप्टिन केरिज ह्यानें स्टील नांवाच्या एका व्यापाऱ्यास इराणांत पत्रें देऊन पाठविलें. तो प्रथम जास्क येथें उतरून पुढें राजधानी इस्पहान येथें गेला. तेथें त्याचा सत्कार फार चांगला झाला. शर्लेनें त्यास सांगितलें, कीं तुर्कस्तान व इराण ह्यांचें युद्ध चालू असल्यामुळें इराणचें रेशीम तुर्कस्तानच्या हद्दींतून युरोपांत जाण्याचें बंद झालें आहे. ह्यासाठीं सुरतेकडून हा माल युरोपांत नेण्यास ही संधि उत्तम आहे. तसेंच युरोपांतील कापड वगैरे पुष्कळ माल ह्या वेळीं इराणांत खपणारा आहे. त्याप्रमाणें सुरतेच्या व्यापाऱ्यांनीं २०००० रुपयांचा माल भरून जास्क येथें पाठविला. इकडे सर टॉमस रो सुरतेस आला, त्याला ही इराणची खटपट पसंत पडली नाहीं. तो आग्र्यास जाऊन परत सुरतेस आला, तेव्हांही त्यानें पुनः इराणच्या व्यापाराविषयीं चांगलाच निषेध केला; आणि जास्क येथें गेलेलें मालाचें गलबत चुकून तिकडे गेलें आहे, असें त्यानें इराणच्या शहास लिहून

पाठविलें. इकडे सर रॉबर्ट शर्लेनें कंपनीशीं कपट करून स्वतःचीच मूठ युक्तीनें भरण्याचा विचार चालविला. कंपनीकडून आपणास चांगली किफायत व्हावयाची नाहीं हें जाणून शर्लेनें इराण व स्पेन ह्यांचा तह जोडून व्यापार चालविण्याची शक्कल काढिली. त्याजबद्दल शहाची संमति घेऊन शर्ले स्पेन देशास गेला. ह्या दरम्यान कंपनीचा इस्पहान येथील एजंट कॉनॉक (Connock) ह्यानें शर्लेची खोड मोडण्याच्या इरादानें त्याचा सर्व बेत राजाकडे लिहून पाठविला; आणि शहाची संमति घेऊन पोर्तुगीझांचें ऑर्मझ बेट आपण एकदम काबीज करावें असें सुरतेस कळविलें. सुरतेस सर टॉमस रो होताच; त्यास ही नवीन हकीकत कळल्यानें आपला विचार फिरविला लागला. ही खटपट झाल्यामुळें शर्ले व स्पेनचा वकील इराणांत येऊन दाखल होतात तों कंपनीची लढण्याची जय्यत तयारी तेथें झालेली होती. कॉनॉक हा हुशार असून शहाशीं तह वगैरे करण्यास लायक होता. स. १६२०त कंपनीच्या आरमारानें पोर्तुगीझ आरमाराचा पराभव करून आपला माल इराणच्या बंदरावर उतरिला. इकडे पोर्तुगीझांनीं इराणच्या शहावरच शस्त्र धरिलें, तेव्हां शहानें इंग्रजांची मदत मागितली. ती कबूल करून, आपल्या मालावर जकातीची माफी असावी अशा करारावर इंग्रजांनीं ऑर्मझ घेण्याकरितां शहास मदत दिली. या मदतीनें स. १६२२त शहानें ऑर्मझ बेट पोर्तुगीझांपासून जिंकून घेतलें. तेव्हां इंग्रजांस पुष्कळच पैशाची प्राप्ति होऊन शिवाय गोंबरून (Gombroon) येथें माल उतरण्याची परवानगी, जकातीची माफी, व इराणांत कोठेंही रेशीम खरीद करण्याचीही परवानगी मिळाली. पुढें इंग्रज लोक आपणच ऑर्मझ ताब्यांत घेण्याच्या विचारास लागले, पण तें शहानें बिलकूल चालूं दिलें नाहीं. इकडे कंपनीला जी लूट मिळाली होती, ती मात्र राजा जेम्सनें त्यांजकडून हिसकून घेतली. शर्ले अजून जिवंत होता. जेम्स राजा मरण पावल्यावर स. १६२६त शर्ले इराणचा वकील म्हणून राजा चार्लस ह्याजकडे जाऊन त्यानें बरीच ढवळाढवळ केली. शेवटीं स. १६२८त इराणांत परत येऊन तो तिकडेच मरण पावला. इराणच्या शहानें दिलेल्या फर्मानाचा कंपनीस फारसा उपयोग झाला नाहीं; तेव्हां

चंबूगवाळें उचलून इराणांतून निघून जाण्याचा कंपनीचा विचार होता. तेव्हां शहानें पुनः मध्यस्थी करून त्यांस ठेवून घेतलें. पुढें डच लोकांनीं इंग्रजांस इराणांतून घालवून देण्याची खटपट चालविली, पण ती सिद्धीस गेली नाहीं. कांहीं दिवसांनीं शहा अब्बास मरण पावला व शहा सूफी इराणच्या तख्तावर बसला. ह्या शहा सूफीनें दरसाल १५००० रुपये किंमतीच्या चिजा नजराणा घेऊन कंपनीस इराणांत व्यापाराची मोकळीक दिली; आणि डच लोकांस आपल्या देशांत येण्याची बंदी केली. स. १६३७त कंपनीचे पुष्कळ लोक आजारानें इराणांत मरण पावले. वुल्यम गिब्सन नांवाचा त्यांचा एजंट इस्पहान येथें होता, त्यानें कंपनीशीं बेइमान करून डच लोकांस १,२०,००० रुपये कर्ज देऊन त्यांचा व्यापार इराणांत सुरू केला. हा गिब्सन स. १६३७त मरण पावला. तथापि पुढें इराणांत कंपनीचा व्यापार नीटसा चालला नाहीं. आज तीनशें वर्षें होत आलीं तरी युरोपियनांच्या ढवळाढवळी व इराणच्या भानगडी तेथें अद्यापि चालूच आहेत.

# प्रकरण दहावें.

## कंपनीचें संकटमय अर्धशतक.

( स० १६१४–१६५८. )

१. राजा पहिला चार्ल्स् व कंपनी. २. सुरतेची वखार.
३. मद्रासची उत्पत्ति. ४. बंगाल्यांतील वसाहतींची सुरुवात.
५. क्रॉम्वेलनें केलेली व्यवस्था. ६. नोकरांचे पगार व अंतर्व्यवस्था.
७. खासगी व्यापाऱ्यांची बंडाई.

**१. राजा पहिला चार्ल्स् व कंपनी.**—प्राच्य देशाशीं व्यापार करण्याकरितां कंपनीचा उदय झाला, तेव्हांपासून आंबोयना येथील भयंकर

प्रकार घडेपर्यंत कंपनीचें लक्ष हिंदुस्थानाकडे नव्हतें. पण आंबोयनाच्या कत्तलीमुळें मसाल्यांच्या बेटांतील आपले व्यवहार बंद करणें कंपनीस भाग पडलें. अर्थात् पुढें कंपनीचें लक्ष हिंदुस्थानाकडेच विशेष लागलें. तेथें पुढील उद्योग कंपनीच्या व्यापाऱ्यांनीं कोणत्या प्रकारें चालविला, हें समजण्याकारितां त्या वेळीं इंग्लंडची राजकीय परिस्थिति कशा प्रकारची होती व तिचा परिणाम कंपनीच्या उद्योगावर काय झाला हें समजणें जरूर आहे.

स. १६२५त राजा पहिला जेम्स्* मरण पावला, व त्याचा मुलगा पहिला चार्ल्स इंग्लंडचे गादीवर बसला. बापाचेंच राज्यधोरण चार्ल्स राजानें ज्यास्त जोरानें पुढें चालविलें. राजा हा ईश्वरदत्त होय, तो सांगेल तें लोकांनीं निमूटपणें मान्य केलें पाहिजे, असा त्याचा ग्रह असल्यामुळें, पार्लमेंटाशीं त्याचा बेबनाव होऊन अखेरीस तंटा विकोपास गेला. राजपक्ष व प्रजापक्ष असे दोन उघड तट पडून युद्ध झालें आणि अखेर प्रजापक्षास जय मिळाला, तेणेंकरून चार्ल्स राजास स. १६४९त देहान्त शिक्षा भोगावी लागली. हा प्रकार इंग्लंडांत चालू असतां इकडे जपानांत सुरू केलेलें व्यापाराचें काम सोडून कंपनीचे व्यापारी तेथून जीव घेऊन पळून गेले. आंबोयनाच्या कत्तलीमुळें मसाल्यांच्या

*टीप—इंग्लंडचा इतिहास न शिकलेल्या वाचकांस राज्यकर्त्यांची खालील नांवें उपयोगी पडतील. वास्तविक इंग्लंडचा इतिहास अवगत असेल तरच कंपनीच्या त्या वेळच्या इतिहासाचें मर्म कळणार आहेः—

| | |
|---|---|
| राणी एलिझाबेथ, स. १५५८-१६०३ | राजा पहिला जेम्स, स.१६०३-२५ |
| राजा पहिला चार्ल्स्, स. १६२५-४९ | ऑलिव्हर क्रॉम्वेल, स. १६४९-५८ |
| ,, दुसरा चार्ल्स् स. १६६०-८५ | राजा दुसरा जेम्स, स. १६८५-८८ |
| ,, तिसरा वुल्यम, स. १६८८-१७०२ | राणी ॲन, स. १७०२-१४ |
| ,, पहिला जॉर्ज, स. १७१४-२७ | राजा दुसरा जॉर्ज, स. १७२७-६० |
| ,, तिसरा जॉर्ज, स. १७६०-१८२० | ,, चवथा जॉर्ज, स. १८२०-३० |
| ,, चवथा वुल्यम, स. १८३०-३७ | राणी व्हिक्टोरिया, स.१८३७-१९०१ |

बेटांतूनही त्यांना आपला पाय काढावा लागला. दुखण्याच्या भयंकर यातनांमुळें जावा बेटास रामराम ठोकणें त्यांस भाग पडलें. हिंदुस्थानांतही पूर्व व पश्चिम किनाऱ्यांवर त्यांस नाना प्रकारचे हाल भोगावे लागत होते. अशा स्थितींत इंग्लंडांतही त्यांस स्वास्थ्य बिलकुल नव्हतें. त्यांची पत बरीच कमी होऊन शंभरांचा शेअर ऐशींसही विकला जात नव्हता. कर्जाचा बोजा मनस्वी वाढल्यामुळें नवांन कर्ज मिळेना. डायरेक्टर मंडळींत अंतर्वैमनस्यें चालू होतीं. ही कंपनी इंग्लंडचीं माणसें व इंग्लंडचा पैसा परदेशांत नेऊन नाहक बुडवीत आहे असा सामान्यतः इंग्लंडच्या लोकांचा ग्रह झाला होता. हा ग्रह दूर करण्याकरितां कंपनीच्या तर्फे अनेक गृहस्थांनीं कंठशोष केला, पण त्याचा फारसा उपयोग त्या वेळीं झाला नाहीं.

अशा संकटसमयीं राजाकडून कंपनीला मदत व्हावी तीही झाली नाहीं. उलट कंपनीच्या विरोधकांसच राजाचें पाठबळ मिळूं लागलें. तेव्हां कंठीं प्राण आल्याप्रमाणें होऊन स. १६२८त कंपनीच्या डायरेक्टरांनीं पार्लमेंटाकडे अर्ज केला. ' हा व्यापार राष्ट्रास विघातक आहे कीं काय, याचा आपण नीट तपास करावा; तपासाअंतीं तो विघातक आहे असें ठरल्यास तो खुशाल बंद करावा, पण फायदेशीर आहे असें दिसून आलें तर त्यास उघडपणें मदत मिळावी. ' अशी मागणी कंपनीनें पार्लमेंटाकडे केली, ह्यावरूनच तिची निकृष्ट स्थिति व्यक्त होते. हा अर्ज म्हणजे त्या वेळच्या व्यापारी धोरणाचें व भावी उदयाचें निदर्शन होय. कंपनीच्या विरुद्ध लोकांचा आक्षेप असा होता, कीं ह्या व्यापाराच्या नादीं लागून हजारों लोक निष्कारण समुद्रांत जाऊन मृत्युमुखीं पडतात, त्यामुळें राष्ट्र बलहीन होत चाललें आहे. त्यावर कंपनीचें समर्पक उत्तर असें होतें, कीं कंपनीच्या व्यापारामुळें इंग्लंडचे खलाशी नौकाशास्त्रांत व दर्यावर्दी कामांत तयार होत आहेत; परचक्र आलें असतां कंपनीच्या गलबतांचा, खलाशांचा व सामानाचा राष्ट्रास अतिशय उपयोग होणारा आहे. राज्यांतील पैसा कंपनी बाहेर नेऊन परदेशांत बुडविते, ह्या आक्षेपावर कंपनीचें उत्तर असें होतें कीं, कंपनी राष्ट्राचा पैसा बुडवीत तर नाहींच, उलट हिंदु-

स्थानांतील माल इंग्लंडांत आणून तेथून तो युरोपच्या इतर देशांत किफायत-शीर विकीत असल्यामुळें, राष्ट्रास मोठा फायदा होत आहे. शिवाय कंपनीच्या धाकामुळें डच लोक मर्यादेंत आहेत, नाहीं तर ते इंग्लंडचा सर्वच व्यापार गिळून टाकते. एवंच राजास व लोकांस आपला मोठा उपयोग आहे असें कंप-नीनें प्रतिपादन केलें.

अशा स्थितींत राजाची वर्तणूक केवळ आपमतलबाची होती. ही कंपनी आपण स्थापन केली व आपल्या हुकुमानें ती चालते, असें राजा समजे; आणि येणेंकरून कंपनीवर तो एक प्रकारचें ममत्व दाखवी. सर्व व्यापाराचा मक्ता एकट्या कंपनीच्या हातांत असणें कांहीं लहान फायद्याची गोष्ट नव्हे. त्याच्या योगानें राज्यांतील जकातीचें उत्पन्न तर वाढेच, पण शिवाय राजाला व त्याच्या जवळच्या मंडळींना खुष ठेवण्याकरितां म्हणून त्यांस नेहमीं लांच देणें कंपनीला भाग पडे. होतां होतां अशा देण्याच्या रकमा अनिवार वाढल्या, व कंपनीपाशीं कर्जाऊ रकमाही राजा मागूं लागला. त्या दिल्याशिवाय कंपनीस गत्यंतर नव्हतें; कारण परराष्ट्रांच्या तंट्यांत अनेक वेळां कंपनीस राजाच्या वजनाचा उपयोग होत असे; ह्याबद्दल थोडा बहुत पैका कंपनीला द्यावा लागला तर मोठेंसें नव्हतें; आणि जेम्स् राजानें कधीं अमर्यादित मागणीही केली नाहीं. पण चार्ल्स राजा नेहमींच पेंचांत असल्यामुळें कंपनीकडून पैसे उकळण्यांत त्यानें सर्व भीडभाड सोडून दिली. स. १६२८त त्यानें कंपनीकडे एक लाख रुपये कर्ज मागितले, ते कंपनीनें दिले नाहींत. तेव्हां कंपनीचे शत्रु जे डच त्यांज-पासून तीन लाख रुपये घेऊन, त्यानें डच लोकांचा फायदा करून कंपनीचें नुकसान केलें. स. १६४०त राजानें पुनः कंपनीकडे पैशाची मागणी केली, तेव्हां कंपनीजवळ रोख शिल्लक कांहींच नसून साडेसहा लाख रुपये किंमतीचें मिरीं मात्र शिल्लक होतें, तें सर्व राजानें दीड लाखांस कंपनीपासून विकत घेतलें; आणि स्वतः विकून टाकिलें. ह्या शिवाय कंपनीला त्रास देण्याचे अन्य मार्गही राजाजवळ पुष्कळ होते. जेम्स् राजानें व्यापाराचा मक्ता कंपनीस कायमचा दिला होता, पण त्या सनदेंत असें एक कलम होतें, कीं हा व्यापार राष्ट्रास

अपायकारक होईल तर आगाऊ तीन वर्षांची नोटीस देऊन तो बंद करण्याचा अधिकार राजास आहे. अर्थात् ह्या व्यापारापासून राष्ट्रास अपाय होतो किंवा नाहीं ह्याचा निर्णय करणें एकट्या राजाच्या मर्जीवर राहिलें. तेव्हां आपलें नुकसान करूनही राजास व त्याच्या मर्जीतील मंडळीस खूष ठेवणें कंपनीस भाग पडूं लागलें. राजाच्या मर्जीतील मंडळीस इराण, हिंदुस्थान वगैरे ठिकाणीं फिरवून आणणें, व त्यांस आपल्या व्यापाराची स्थिति समजावून देणें, हीं कामें कंपनीस करावीं लागलीं. ह्या वेळेस दुसरेही अनेक व्यापारी पैशाच्या जोरावर कंपनीशीं टक्कर मारण्यास तयार झाले होते. स. १६३५त कोर्टेन, पिंडर व पोर्टर ह्या तीन धनसंपन्न व्यापाऱ्यांनीं संगनमत करून कंपनीचा व्यापार बुडविण्याची मसलत केली. त्यांनीं मोठमोठ्या रकमा राजास कर्ज देऊन त्यास आपकडे वळवून घेतलें, आणि त्याजपासून व्यापाराची सनद मिळविली. मात्र राजानें कंपनीची सनद रद्द केली नाहीं, ही मेहरबानीच समजावयाची. तथापि ह्या कृत्यानें विलक्षण घोटाळा उत्पन्न होऊन हिंदुस्थान, चीन वगैरे ठिकाणीं कंपनीच्या इभ्रतीस मोठा धक्का बसला. कंपनीच्या उत्कर्षाविषयीं बाहेरून राजा फारच गोड गोष्टी बोलत असे. परंतु त्याचीं अंतस्थ कृत्यें कंपनीच्या विरुद्ध असल्यामुळें व कोणत्याही तक्रारीचा निकाल राजाकडून वेळेवर होत नसल्यामुळें, उघडपणें त्याजवर उठून पार्लमेंटाकडे दाद मागण्याचा कंपनीच्या डायरेक्टरांनीं निश्चय केला ( स. १६४१ ). परंतु पार्लमेंटाकडेही कंपनीची दाद लागली नाहीं. पार्लमेंटास वाटे कीं कंपनी राजाच्या बाजूची आहे. अशा संकटात आतां तरणोपाय नाहीं असें पाहून, हळूहळू आपला व्यापार गुंडाळून अखेरीस तो बंद करण्याचा कंपनीनें निश्चय केला; आणि सन १६४८त हिंदुस्थानांतील सात वखारी बंद करण्याचें ठरविलें. वास्तविक कंपनी राजाच्याच बाजूची होती. पण राजानें तरी तिच्या राजनिष्ठेचा अंत पाहवयाचा नव्हता. त्याच्या हुकुमांबद्दल तो स्वतः किती जबाबदार होता, व त्याचे सल्लागार किती जबाबदार होते, ह्याचा निश्चय होणें आतां शक्य नाहीं. तो स्वतः तितका दुष्ट नव्हता असें दिसतें. तथापि त्याच्या धरसोडीच्या वागणुकीमुळें जसें लोकांनीं त्याजवर शस्त्र

उचलिलें, त्याचप्रमाणें व्यापाराच्या कामांत कंपनीनेंही त्याजवर शस्त्र उचलिलें, असें म्हणण्यास हरकत नाहीं. एकंदरीस चार्लस् राजा फांसावर चढत असतां कंपनी अगदीं डबघाईस आली होती.

२. **सुरतेची वखार.**—इकडे हिंदुस्थानांत मात्र कंपनीचे व्यापारी निराश झाले नव्हते. त्यांच्या आरंभींच्या वखारींचें धोरण केवळ व्यापारावर अवलंबून नव्हतें. हिंदच्या पश्चिम किनाऱ्यावरूनच सर्व परकीय व्यापाराची घडामोड चाले. हा किनारा पोर्तुगीझ लोकांनीं व्यापिल्यामुळें, त्यांच्याशीं टिकाव धरण्यासाठीं हिंदुस्थानच्या राज्यकर्त्यांचें पाठबळ कंपनीच्या व्यापाऱ्यांस पाहिजे होतें. त्यासाठीं त्या किनाऱ्यावरील मोगलांचें मुख्य ठिकाण जें सुरत तेथेंच त्यांनीं प्रथम वखारी घातल्या. प्राचीन काळापासून सुरत हें व्यापाराचें मुख्य नाकें असून, सुरतेच्या खालीं सुवाळी बंदर गलबतांच्या सोयीचें होतें. सुरत येथें व्यापाराच्या सवलती मिळविण्याकरितां कॅप्टन हॉकिन्स व सर टॉमस रो हे वकील इंग्लंडच्या तर्फे मोगल बादशहाकडे आले, त्यांची हकीकत मागें आलीच आहे. सुरतेसही डच लोकांनीं इंग्रजांचा पाठलाग करण्यास सोडिलें नाहीं. परंतु मोगल बादशहाच्या बंदोबस्तापुढें डच लोकांचे हातून इंग्रजांचें वांकडें झालें नाहीं. मात्र युरोपियन लोकांत इंग्रज, डच, पोर्तुगीझ वगैरे निर-निराळीं अनेक राष्ट्रें असून, त्यांचे व्यवहार पृथक् आहेत, ही गोष्ट मोगल अधिकाऱ्यांना आरंभीं चांगली ठाऊक नसल्यामुळें, केव्हां केव्हां डच लोकांच्या अपराधांबद्दल इंग्रजांस शासन भोगावें लागे. पण पुढें हा प्रकार लवकरच बंद झाला. इंग्रज लोक वेळच्या वेळेस जकातीचा भरणा करीत व कोणाच्या वाटेस जात नसत. तसेंच इराणी अखातांत व पश्चिम किनाऱ्यावर पोर्तु-गीझांचा दंगा मोडण्यांत इंग्रजांचा चांगलाच उपयोग बादशहास झाला अस-ल्यामुळें, समुद्राकडून पश्चिम हद्दीच्या बंदोबस्तास इंग्रज आरमार आपल्या फार उपयोगाचें आहे अशी बादशाहींत समजूत होती. स. १६२९त शहाजहान बादशहानें पोर्तुगीझ लोकांस वाटेल तेथें गांठून त्यांचा फडशा उडविण्याची परवानगी इंग्रजांस दिली. पुढील वर्षीं सुवाळी येथें इंग्रज व पोर्तुगीझ

जहाजांची मोठी लढाई होऊन दोघांची बरोबरी झाली, तथापि इंग्रजांचा वरचढपणा कायम राहिला. स. १६३०त इंग्लंड व पोर्तुगाल ह्यांजमध्यें माद्रिड येथें तह होऊन पूर्वीकडील व्यापारासंबंधानें उभयतांची गोडी झाली. पण असल्या कागदावरील ठरावांनीं मनुष्याचे व्यवहार बांधले जाते, तर जगाची स्थिति निराळीच झाली असती. इतकें खरें, कीं इंग्रजांच्यामुळें जकातीचें उत्पन्न व बाह्य शत्रूंचा बंदोबस्त ह्या दोन गोष्टींचा फायदा आपणास होतो असें मोगल सरकारास वाटत असे. मोगल बादशहाचा अंमल समुद्रावर बसला नव्हता. समुद्रावरील बंदोबस्तासाठीं व मक्केस जाणाऱ्या यात्रेकरू गलबतांच्या संरक्षणार्थ जंजिरा येथें मोगल सरकारानें जसें हबशाचें ठाणें ठेविलें होतें, त्याच प्रकारचे सुरतेचे इंग्रज आपल्या उपयोगाचे आहेत, अशी त्या वेळीं मोगल सरकाराची कल्पना होती. चार्ल्सच्या वेळेस शहाजहान बादशहाची शांत कारकीर्द सुरू होऊन हिंदुस्थानांत अनेक प्रकारची भरभराट नांदत होती. आशिया-खंडाच्या कित्येक भागांतील नाना तऱ्हेचा माल सुरत बंदरांतून हिंदुस्थानांत येऊन खेळत होता. मच्छलिपट्टण, बऱ्हाणपूर व आग्रा ह्या शहरांशीं सुरतेचें मुख्य दळणवळण असून, गाड्यांचे व जनावरांचे भले मोठे तांडे सुरतेस येणाऱ्या रस्त्यांवर सर्वकाल वावरत असत. राज्यांत बंदोबस्त चांगला असल्यामुळें व्यापार व दौलत वृद्धि पावलीं. सुरतेस हंगामाच्या वेळीं परकी व्यापाऱ्यांचे थवे इतके लोटत, कीं त्यांस राहण्यास जागा सुद्धां मिळत नसे. इंग्रजांचे मुख्य कामगार एकामागून एक हुशारच येत गेले. हेन्री लॉर्ड वगैरे कित्येक शोधक गृहस्थांनीं हिंदूंच्या चालीरीती, व धर्मसंस्कार ह्यांची माहिती गोळा करण्याचा सपाटा चालविला. अशा माहितीचा उपयोग पुढील इंग्रज राज्यकर्त्यांस पुष्कळ झाला. भावी राज्यस्थापनेची ही एक तयारीच होय. पोर्तुगीझ लोकांनीं हिंदुस्थानांत आपलें राज्य स्थापितांना अशी तयारी कांहींच केली नाहीं. सुरत येथें बसलेलें हें व्यापाराचें उत्कृष्ट संधान विलायतेंत कंपनीस माहीत होतें; म्हणून सुरतच्या प्रेसिडेंटास त्यांनीं इकडच्या सर्व इंग्रजांवर मुख्य अधिकार दिला. जावा येथील बँटमही त्याच्याच ताब्यांत

दिलें. सन १६३०त गुजराथेंत भयंकर दुष्काळ पडला; त्यामुळें असंख्य लोक प्राणांस मुकले. सुवाळी येथें २६० घरें होतीं, त्यांपैकीं फक्त ११ शिल्लक राहिलीं असें स. १६३१त एका डच व्यापाऱ्यानें लिहून पाठविलें होतें. सुरतेस रस्तोरस्तीं प्रेतांचे ढीग पडले होते. त्या शहरांत एकंदर तीस हजार लोक मेले. पुढें सांथीचा रोग उत्पन्न झाला, त्यांत इंग्रजांचा प्रेसिडेंट व बरेच व्यापारी मरण पावले. तथापि त्यांचा व्यापार चालू होता. सुरत मुख्य ठिकाण झाल्यामुळें कंपनीच्या सर्व जहाजांचा उपयोग तेथेंच होऊं लागला. हिंदुस्थानांत कंपनीचीं वीस पंचवीस गलबतें बंदरोबंदरीं फिरतीं असत. सन १६२९तील एक दाखला असा आढळतो, कीं गेल्या बारा वर्षांत बंदरोबंदरींच्या व्यापारासाठीं इंग्रजांचीं सत्तावन गलबतें खपत होतीं; आणि त्या सर्वांचा आकार २६,६९० टन होता. ह्या गलबतांच्या भरतीसाठीं रोख व माल मिळून कंपनीचे १,१४,५४,४२० रुपये बाहेर आले; व २८,९६,४३० रुपये तिनें हिंदुस्थानांत कर्ज काढलें; मिळून १,४३,५०,८५० रुपये खर्च झाले. वरील गलबतांशिवाय सुरतेच्या बंदोबस्तासाठीं म्हणून एक लहानसें आरमार असून त्यांतील प्रत्येक गलबतावर सहा सहा तोफा होत्या. ह्यांपैकीं दहा गलबतें स. १६१५त कॅप्टन डाउटन याच्या हाताखालीं लढलेलीं होतीं. त्यांतलींच चार सन १६२२त इराणच्या अखातांतून पोर्तुगीझांस हुसकून लावण्यांत खपत होतीं. पोर्तुगीझ जहाजांपेक्षां इंग्रजांचीं गलबतें ज्यास्त चांगलीं होतीं. अशा प्रकारें हिंदुस्थानांतील इंग्रज आरमाराचा इकडेस आरंभ झालेला आहे. स. १६३५त इंग्रज प्रेसिडेंट व गोव्याचा व्हाइसरॉय यांजमध्यें व्यापारसंबंधीं तह होऊन दोघांच्याही गलबतभरतीस माल मिळण्याची सोय झाली. अशा प्रकारें हिंदुस्थानांतील कंपनीचे व्यापारी हिंदुस्थानांत हातपाय हालवीत होते, म्हणूनच पहिल्या चार्लसच्या भयंकर कारकिर्दींतून कंपनीचा निभाव लागला.

इकडे कंपनीचा व्यापार भरभराटींत असतां, इतर इंग्रज व्यापारी कानांत तुळशीपत्रें घालून बसले नव्हते. त्यांचा खासगी व्यापार अतोनात होता; व प्रसंग पडला असतां पदरचे पैसे खर्चून एकादें बिकट काम अंगावर घेण्यास ते समर्थ

होते. डच व्यापाऱ्यांस इंग्रजांचा हेवा अतिशय वाटे; इंग्रज लोक आपणांपेक्षां ज्यास्त कुशल आहेत अशी सुरत येथील डच व्यापाऱ्यांची खात्री होती, आणि इंग्रजांशीं सख्य ठेवून वागल्यानें आपला मोठा फायदा आहे, असें ते आपल्या सरकारास वारंवार लिहून पाठवीत; पण त्यांच्या म्हणण्याकडे तेथें कोणीं लक्ष दिलें नाहीं.

इकडे चार्ल्स राजानें कोर्टेनच्या कंपनीस हिंदुस्थानांत व्यापार करण्याची सनद दिली; तेव्हां कोर्टेनचे व्यापारी इकडे येऊन कंपनीच्या वखारींवर ताव मारूं लागले. त्यांनीं तांबड्या समुद्रांत मोगलांचीं यात्रेकरू जहाजें लुटलीं, त्याबद्दल सुरतेच्या प्रेसिडेंटास व इतर मंडळींस बादशहानें एकदम कैदेंत टाकिलें. पुढें १,७०,००० रुपये दंड देऊन तो सुटला. कोर्टेनचा कॅप्टिन वेडेल ( Weddell ) ह्यानें राजापुरची वखार घातली, ती पुढें पुष्कळ दिवस चांगली चालली. स. १६३९त सुरतेच्या प्रेसिडेंटानें मोगल बादशहाचा पोर्तुगीझांशीं तह जुळवून दिला. सारांश, इंग्रजांच्या सत्तेचा आरंभ सुरत होय. टॉमस रॅस्टल ( १६२५–३१ ) व वुल्यम मेथ्वोल्ड वगैरे सुरतचे कामगार कंपनीच्या सुदैवानें चांगले आले. त्यांनीं कंपनीचें नांव कायम राखिलें व बादशहाशीं आपला बोज ठेविला. पैशाची देवघेव, चांचे लोकांचा बंदोबस्त व मक्केच्या यात्रेकरूंची नेआण, ह्या तीन कामांनीं सुरतेचें महत्त्व वाढून इतर राष्ट्रांच्या तर्फेनें मोगल बादशहाशीं मध्यस्थी करण्याइतका तेथच्या इंग्रज व्यापाऱ्यांत जोम आला. स. १६६७त सुरतेची एकच प्रेसिडेन्सि ठेवण्याचा कंपनीनें निश्चय केला. प्रेसिडेन्सि म्हणजे प्रेसिडेंटाच्या ताब्यांतील व्यापाराचा टापू होय.

स. १६२९ पासून स. १६३४ पर्यंत कंपनीच्या व्यापारांत ३६ गलबतें वावरत होतीं. पैकीं वुल्यम नांवाच्या एका गलबतावर १६० खलाशी होते. त्यांतील आठ गलबतें वरील पांच वर्षांत नवीन तयार केलेलीं होतीं. सहासातशें टन आकाराचें गलबत बांधण्यास त्या वेळीं पन्नास साठ हजार रुपये खर्च येत असे. स. १६३३त हिंदुस्थानांतील सर्व वखारींत मिळून १९०

व्यापारी (factors) काम करीत होते. त्यांपैकीं रोगानें ४८ मरण पावले. पुढें खर्च कमी करण्याकरितां लोकांचे पगार वगैरे बरेच कमी करण्यांत आले. तथापि इंग्लंडांत कंपनीचे कित्येक धर्मादाय खर्च होते ते त्यांनीं कमी केले नाहींत. गरीबांस अन्न व भिक्षा वांटणें, हॉस्पिटलसारख्या संस्थांस वर्गण्यांची मदत देणें अशा कामीं कंपनीचा खर्च सढळ असे. कित्येक प्रसंगीं इंग्लंडांत कंपनीचा माल चोरीस जात असे. स. १६३४त एकदां चार मजुरांनीं मिऱ्यांचें एक पोतें चोरलें व खिशांत भरलेलीं मिऱ्यें खालीं गळूं लागलीं, तेव्हां चोर सांपडले. पुढें ह्याचा बंदोबस्त करण्यांत आला. कापडाचे गठ्ठे हिंदुस्थानांतून विक्रीसाठीं येत, त्यांतलें कापडही अनेक वेळां चोरीस जात असे.

कोर्टेनची कंपनी निघाली होती, तीस पहिल्या सफरींत जरी चांगला फायदा झाला, तरी तिच्यानें ई० इं० कंपनीशीं टिकाव धरवला नाहीं. डच लोकांकडून कोर्टेनच्या जहाजांस अतिशय जाच झाला. त्याजपाशीं स्वसंरक्षणाचें साधन नव्हतें. तेव्हां 'भीक नको, पण कुत्रा आंवर,' अशांतली स्थिति होऊन कोर्टेनची कंपनी ई० इं० कंपनीशीं तजजोडीनें समेट करण्यास तयार झाली. राजाला ई० इं० कंपनीपासून प्राप्ति होती, तशी कोर्टेनपासून नसल्यामुळें तोही त्याजवर नाखुषच होता. पुढें सन १६३९त राजानें ह्या व्यापाराचा सर्व तपास करून हकीकत जाहीर करण्यासाठीं एक कमिटी नेमिली. तिनें तपास केल्यावर राजानें कोर्टेनची सनद काढून घेतली, आणि ई० इं० कंपनीस नवीन भांडवल जमविण्याची भर दिली. आलेली अडचण अशा रीतीनें राजा कशी तरी निभावून नेत होता. स. १६४९त राजाचा शिरच्छेद झाला.

स. १६४३त इंग्लंडांत वुल्यम कॉकेन (Cockayne) ह्याची कंपनीच्या गव्हर्नरचे जागीं नेमणूक होऊन त्याच्या हाताखालचा वुल्यम मेथ्वोल्ड (Methwold) हा डेप्युटी गव्हर्नर हुशार होता. ह्यास हिंदुस्थानांतील व्यापाराची उत्कृष्ट माहिती असून, त्या व्यापारांत तो धनाढ्य होऊन परत गेला होता. हा प्रथम स. १६१५त सुरतेस आला; नंतर व्यापाराची माहिती

मिळवीत सर्व हिंदुस्थानभर फिरला. गोवळकोंडा येथील हिऱ्याच्या खाणीची वार्ता ह्यानेंच प्रथम प्रसिद्धीस आणिली. स. १६३१–३७पावेतों तो सुरतेचा प्रेसिडेंट होता; त्या अवधींत त्यानें कंपनीच्या व्यापाराची शिस्त चांगली ठेवली. बंगाल प्रांतांत वखारी घालण्याचें प्रोत्साहन कंपनीला त्यानेंच दिलें. सारांश, इंग्लंडांत कंपनी टेकीस आली असतां, मेथ्वोल्डसारख्या गृहस्थांनीं हिंदुस्थानांत तिची बाजू फार चांगली संभाळिली होती.

तसेंच सर्जन गेब्रियल बॉउटन ( Boughton ) नांवाचा एक इंग्रज वैद्य मोगल दरबारच्या मागणीवरून सुरतेच्या अधिकाऱ्यांनीं आग्र्यास पाठविला होता. त्यानें मोगल दरबारीं चांगला लौकिक मिळविला. पुढें तो पुष्कळ वर्षें बादशहाचा मुलगा सुजा बंगालच्या सुभेदारीवर असतां त्याजवळ राहिला. बाउटनवर* सुजाची मर्जी चांगली बसली. तिचा उपयोग करून त्यानें स. १६५१त सुजाचे मार्फत बंगाल्यांत व्यापाराचें फरमान मिळवून हुगळी येथें एक वखार घातली. (इंपीरि० गॅझेटियर II. ४५८) स. १६५८त बंगालमधील हा उपक्रम मद्रासच्या वखारींच्या ताब्यांत देण्यांत आला. मद्रास तर त्या वेळीं सुरतेच्याच ताब्यांत होतें.

अशा रीतीनें कंपनीचे व्यापारी खटपट करीत होते. चार्ल्स जिवंत असतांना व त्याचा शिरच्छेद झाल्यावर कांहीं दिवसपर्यंत, कंपनीला उघडपणें बोलण्याची सुद्धां मनाई होती. केव्हां कोणता पक्ष वरचढ होतो व कोणाच्या हातांत आपली शेंडी जाते, ह्याचा अदमास न सांपडल्यामुळें प्रत्येक व्यवहारांत त्यांस जपून वागावें लागे, व कोणत्याही पक्षास राग न येई अशी भाषा

* टीपः—सर्जन बॉउटन स. १६३६ पासून १६५१–५२ पर्यंत मोगलशाहीत वावरत होता. त्यानें प्रत्यक्ष कामगिऱ्या काय केल्या त्याची स्पष्टता नाहीं. स. १६४४त जहानारा आगऱ्यास भाजली, तिच्या उपचारासाठीं बॉउटनला बहुधा बोलाविलें असावें. बंगाल्यांत इंग्रजांचें वजन बसण्यास हाच कारण झाला यांत संशय नाहीं. या संबंधांत वि. ज्ञा. विस्तारांत—एप्रिल १९१८ रा. आर्ते यांनीं केलेलें विवेचन चुकलें आहे.

वापरणें भाग पडे. ह्या काळीं हिंदुस्थानास आलेल्या कित्येक पत्रांवर ' वाचल्यावर जाळून टाका, ' अशीं आरंभीं ठळक सूचना लिहिलेली असे. त्यावरून अनेक पत्रें जाळलीं गेलीं आणि त्यांत काय मजकूर होता हें जाणण्यास आज साधन नाहीं. एवढी गोष्ट खरी, कीं इंग्रजांनीं आपल्या राजास फांशीं दिलें, ही बातमी, इराण, हिंदुस्थान वगैरे ठिकाणीं कळली, तेव्हां ' हे इंग्रज राजघातक आहेत. हे केव्हां काय करतील याचा नेम नाहीं,' असा त्यांजबद्दल पुष्कळांचा ग्रह झाला. हा ग्रह कित्येक प्रसंगीं त्यांस बाधक झाला हें सांगणें नकोच.

**३. मद्रासची उत्पत्ति** ( स. १६३९ ).—कारोमांडल किनाऱ्यावर इंग्रजांची व्यवस्था सुलभपणें लागली नाहीं. ह्याचें कारण असें कीं त्या किनाऱ्यावर मोगल बादशहांची सत्ता स्थापन झाली नसून तेथें लहान लहान राजे हमेश झगडत होते. स. १५६५तील तालिकोटच्या लढाईनें विजयनगरच्या राज्याचा फडशा उडाल्यावर, पूर्व किनाऱ्यावर गोवळकोंड्याच्या कुत्बशहाचा अंमल सुरू झाला होता. तरी पूर्वींचे कित्येक हिंदु सत्ताधीश कुत्बशहाशीं पुष्कळदां झगडत असत. ह्या पूर्व किनाऱ्यावर मद्रासच्या उत्तरेस २३ मैलांवर पुलिकत येथें डच लोकांचें ठाणें होतें. हें पुलिकत एक लहानसें बेट असून तें स. १६०९त डच लोकांनीं काबीज केलें. स. १६११त सातव्या सफरींतील इंग्रज जहाजांनीं ते काबीज करण्याचा प्रयत्न केला, पण तो डच लोकांनीं चालू दिला नाहीं. तेव्हां पुलिकतच्या उत्तरेस पेट्टपुळी येथें कॅप्टिन हिपोन ( Hippon ) ह्यानें एक इंग्रजांची वखार घातली, ( स. १६११, ऑगस्ट ). पेट्टपुळी हें हल्लीं कृष्णा जिल्ह्यांत निजामपट्टण ह्मणून प्रसिद्ध आहे. स. १६२०त डच व इंग्रज ह्यांचें सख्य होऊन डच लोकांनीं पुलिकत येथें इंग्रजांना व्यापार करण्याची मोकळीक दिली; पण आंबोयना येथील कत्तलीनंतर पुलिकतही सोडून देणें इंग्रजांना भाग पडलें. इकडे पेट्टपुळीचा व्यापार कांहीं दिवस चालला, पण तेथील हवा वाईट असल्यामुळें स. १६२१त तें ठिकाण इंग्रजांनीं सोडून दिलें. तथापि पुनः तेथें स. १६३३त त्यांनीं आपल्या वखारी घातल्या. अशा रीतीनें रडतकडत पेट्टपुळी येथें इंग्रज राहत असतां, स. १६८७त कंपनीच्या हुकमानें ती वसाहत मोडण्यांत आली.

पेट्टपुळी येथें आपला निभाव लागणार नाहीं हें जाणूनच कॅप्टिन हिपोन हा उत्तरेस मच्छलिपट्टण तेथें गेला. पेट्टपुळी कृष्णेच्या दक्षिण तीरावर आहे, तसें मच्छलीपट्टण उत्तर तीरावर आहे. येथें स. १६११त हिपोन ह्यानें एक इंग्रजी वखार घातली. मच्छालिपट्टण येथें इंग्रजांस कापड पुष्कळ मिळे; आणि तेथून अनेक बंदरांनां निरनिराळया प्रकारचा माल रवाना होई. गोवळकोंड्याचे हिरे, माणकें व अतर्गत भागांतलीं सुंदर वस्त्रें ह्यांचा बाह्य प्रदेशांत मोठा खप होत असे; तसेंच पूर्वेकडील बेटांतील सोनें, कापूस, बेंजामिन (Benzoine?) वगैरे माल मच्छलिपट्टणास खपे. स. १६२७त बटेव्हियाच्या व्यापाऱ्यांनीं इंग्लंडांत कंपनीस असें लिहून पाठविलें, कीं आपण दरसाल पावणेसात लाख रुपये मच्छालिपट्टणास रोख पाठवीत गेल्यास त्यापासून मोठा फायदा आहे. एवढ्या किंमतीचें कापड मच्छालिपट्टणास खरेदी करून तें बटेव्हिया येथें आणून विकलें असतां, त्यावर दरसाल साडेतेरा लाख नफा होण्याचा संभव आहे. सुरतेस वखारी घालून इंग्रजांनीं पोर्तुगीझांचा पश्चिमेकडील सर्व व्यापार बळकाविला, त्याचप्रमाणें मच्छलिपट्टणच्या वखारीनें पोर्तुगीझांचा पूर्वेकडील व्यापार वळकाविला. परंतु मच्छलिपट्टणाबद्दल डच लोकांशीं इंग्रजांची चांगलीच चुरस लागली. स. १६३१त किनाऱ्यावरच्या एतद्देशीय अधिकाऱ्यापासून इंग्रज व्यापाऱ्यांनीं सुवर्णपत्रावर व्यापार करण्याचा परवाना लिहून घेतला. स. १६१९तील एक लेख असा आहे, कीं मच्छालिपट्टणची वखार थोड्या खर्चांत अत्युत्कृष्ट चालली होती. तथापि पुढें लवकरच डच लोकांनीं इंग्रजांस इतका त्रास दिला, कीं मच्छलिपट्टणचे कांहीं इंग्रज व्यापारी पळून आर्मागांव येथें जाऊन राहिले (स. १६२८). तरी मच्छलिपट्टणबद्दल त्यांची आशा सुटली नव्हती. सन १६३०तील सुरतेचा दुष्काळ मच्छालिपट्टणास चांगलाच भोंवला. भुकेलेले लोक फाडून खातील ह्या भीतीनें रस्त्यानें प्रवास करणेंही दुर्घट झालें होतें. कोष्टी वगैरे धंदेवाले लोक मरून गेले. स. १६३३त इंग्रजांनीं गोवळकोंड्याच्या कुतूबशहापासून मच्छलिपट्टणच्या वखारीचा परवाना सुवर्णपत्रावर लिहून घेतला; ह्याबद्दल इराणचे घोडे आणून

महास विकत देण्याचें कंपनीनें पत्करिलें. ह्याप्रमाणें मच्छलिपट्टण येथें इंग्रजांनीं व्यापार सुरू केला, तो अद्यापि अव्याहत चालला आहे.

मच्छलिपट्टणच्या नजीक आर्मागांव येथें स. १६२६त इंग्रजांनीं पहिली वखार घातली, व तेथें तोफा वगैरे ठेवून डच लोकांपासून ते आपला बचाव करूं लागले. पण तेथें मालाचा पुरवठा बरोबर न झाल्यामुळें ती जागाही त्यांस सोडून द्यावी लागली. आर्मागांवचा मुख्य व्यापारी फ्रान्सिस डे ( Francis Day ) म्हणून होता; त्यानें डच लोकांचा त्रास मिटविण्याकरितां पुलिकतच्या दक्षिणेस मद्रास येथें नवीन वसाहत स्थापण्याचें ठरविलें. तेथें बंदर चांगलें होतें; व सेंट टॉमे येथील पोर्तुगीझांची त्यास मदत मिळणारी होती.

विजयनगरच्या राज्याचा पाडाव झाल्यावर, तेथच्या राजवंशांतील पुरुष चंद्रगिरि येथें जाऊन राहिले, ( स. १५९४ ). चंद्रगिरि हें ठिकाण मद्रासचे नैर्ऋत्येस सुमारें ७० मैलांवर आहे. आर्मागांव व मच्छलिपट्टण येथें डच लोकांपुढें इंग्रज व्यापाऱ्यांचा टिकाव लागेना, तेव्हां फ्रॉन्सिस डे हा चंद्रगिरीच्या नायकाकडे गेला, ( स. १६६९ ऑगस्ट ता. २७ ). चंद्रगिरीच्या वंशांतील पुरुष श्रीरंगराय नाईक म्हणून होता, त्यानें त्याचा चांगला सत्कार केला. नायकाच्या मुलखांत व्यापाराच्या सोयी चांगल्या आहेत, व मच्छलिपट्टणापेक्षां शेंकडा ४० टक्के माल तेथें स्वस्त मिळेल अशी डे याची खात्री झाली. श्रीरंगरायानें स. १६३९त पूर्व किनाऱ्यावर आपल्या ताब्यांतील कांहीं जागा व तेथें तटबंदी करण्याची परवानगी इंग्रजांस दिली. श्रीरंगरायाच्या बापाचें नांव चन्नापा. ह्या चन्नापाचें स्मारक म्हणून नवीन शहरास चन्नापट्टण नांव द्यावें अशी श्रीरंगरायानें इंग्रजांची कबुली घेतली होती. अजून कित्येक एतद्देशीय लोक मद्रासेस चन्नापट्टण असें म्हणतात. त्या ठिकाणास मद्रास हें नांव मद्रेश्वर नांवाच्या एका पुरातन राजाच्या नांवावरून पडलें असावें. चंद्रगिरीचा नाईक निराश्रितच होता, तेव्हां इंग्रजांनीं आपल्या मुलखांत तटबंदीचें ठिकाण बांधिलें असतां वेळेवर आपल्या बचावासही तें उपयोगी पडेल अशा हेतूनें त्यानें ही इंग्रज कंपनी आपल्या घरांत आणिली. लहान

लहान राज्यांचे परिणाम देशाला किती भयंकर होतात, ह्याच्या अनेक उदाहरणांपैकींच हें एक उदाहरण आहे. मच्छलिपट्टणास इंग्रजांचा टिकाव लागला नाहीं ह्याचें कारण तेथें कुतुबशहाचा अंमल जोरांत होता. सुरतेसही मोगल बादशाहींत तीच अवस्था इंग्रजांची झाली. पण मद्रास तेथें त्यांस सुलभ वाव सांपडला. श्रीरंगरायापासून वरील करार करून घेऊन डे हा लगेच मच्छलिपट्टणास गेला. तेथचा मुख्य अंमलदार कोगन ह्यास डेची कल्पना पसंत पडली. परंतु त्यांजवळ पैसा नव्हता. तथापि कर्ज वगैरे काढून डे ह्यानें तट बांधण्याचें काम तर सुरू केलें, (फेब्रुवारी, १६४०). ता. २३ एप्रिल रोजीं सेंट जॉर्ज साधूचा पुण्य दिवस होता, त्याच दिवशीं किल्ल्याचा तट समाप्त झाला, म्हणून त्या किल्ल्यास फोर्ट सेंट जॉर्ज असें नांव देण्यांत आलें. लगेच कोष्टी वगैरे लोकांचीं ४०० कुटुंबें किल्ल्याच्या बाहेरच्या टापूंत येऊन राहिलीं, त्यावरून आंतील भागास व्हाइट टाउन म्ह० गोऱ्यांचें शहर, आणि बाहेरच्या भागास ब्लॅक टाउन म्ह० काळ्यांचें शहर अशीं नांवें पडलीं. किल्ल्यास दहा हजार पगोडा म्ह० सुमारें साडेपसतीस हजार रुपये लागले, तरी पुष्कळ काम बाकीच होतें. किल्ल्याच्या संरक्षणार्थ आरंभीं सुमारें ३५ इंग्रज व तितकेच एतद्देशीय लोक होते. स. १६४२त डे विलायतेस गेला आणि मच्छलिपट्टणचे इंग्रज लोक मद्रासेस येऊन राहिले.

हें बिनहुकमानें केलेलें काम विलायतेस पसंत पडलें नाहीं. कारण तेथील क्षणभंगुर स्थिति ध्यानांत आणिली असतां, विनाकारण नवीन किल्ल्यांचीं कामें उपस्थित करून त्यांत पैका खर्च करण्यास कंपनीस ताकद नव्हती. त्याबद्दल कंपनीनें सुरतेच्या प्रेसिडेंटास ठपका दिला. तेव्हां सुरतेच्या प्रेसिडेंटानें कानावर हात ठेविले. तथापि मद्रासच्या किल्ल्याचा उपयोग आपणास फार चांगला होणार आहे असें त्यानें आपलें मत लिहून कळविलें. पुढें ह्या प्रकरणाचा तपास करण्याकरितां कोर्ट आफ् डायरेक्टरांनीं एक कमिटी नेमिली. त्या कमिटीनें स. १६४५, ता. १३ मे रोजीं आपला निकाल दिला, तो असा, कीं जवळ पैसा नसतां असलीं खर्चाचीं कामें हातीं घेणें ही मोठी

चूक होय, तथापि कंपनीजवळ मागें पुढें भांडवल जमलें असतां, ह्या किल्ल्याचा उत्कृष्ट उपयोग होणारा आहे. शिवाय ह्या कामीं एकासच अपराधी ठरवितां येत नाहीं. अपराधच समजावयाचा असेल तर तो डेचा समजावा. डे तर अगोदरच सुटून गेला होता. कामही संपून गेलें होतें. तेव्हां आतां पाठीमागून काथ्याकूट करून उपयोग नव्हता. डेसारखे धूर्त व धोरणी पुरुष एकादी मनांत आलेली गोष्ट हुकमाची वाट न पाहतां कशी करतात हें ध्यानांत ठेवण्याजोगें आहे. आल्बुकर्क, क्लाइव्ह वगैरे पुरुषांची रीत हीच होय. वास्तविक हिंदुस्थानांतील इंग्रजी राज्य वरिष्ठांचे हुकूमांकडे दुर्लक्ष केल्यानें स्थापन झालें आहे. हुकमाची बरोबर बजावणी करून तें सिद्धीस गेलें नसतें.

मद्रासची स्थापना झाली, व पूर्वकिनाऱ्यावर कंपनीचा पाय रोवला गेला. जवळच पोर्तुगीझांचें सेंट टॉमे हें ठिकाण होतें. ह्या दोन ठिकाणीं दोघांचें चांगलें सख्य होतें. थोड्याच दिवसांत इंग्रजांचा मद्रासेस चांगला जम बसला. आरंभीं मद्रासची वसाहत बँटमच्या ताब्याखालीं होती. पण स. १६५३त ' मद्रास प्रेसिडेन्सि ' ह्या नांवानें ती स्वतंत्र झाली. मद्रासच्या किल्ल्यास एकंदर सुमारें ४० हजार रुपये खर्च आला. मद्रासची वसाहत इतर वखारींहून भिन्न आहे. कारण येथें सेंट टॉमेनजीक किनाऱ्यानें सहा मैल लांब व आंत एक मैल रुंद एवढा भूप्रदेश कायमचा इंग्लंडच्या ताब्यांत येऊन त्यांत सत्तेची जमीन नव्हती. परंतु ही वसाहत झाली. हिंदुस्थानांतील इतर भागांत केवळ वखारी होत्या. स. १६४५त गोवळकोंड्याच्या कुतूबशहाकडून मद्रासच्या वसाहतीची सनद कंपनीनें मिळविली. पुढें युरोपांत क्रॉम्वेलनें डच लोकांशीं लढून त्यांचा बंदोबस्त केला, आणि स. १६५७त मद्रासची व्यवस्था नीट लावून दिली. तेव्हांपासून त्याची भरभराट होत आली आहे.

**४. बंगाल्यांतील वखारींची सुरुवात.**—सुरत व मद्रास ह्यांहून बंगालचा प्रकार वेगळा आहे. बंगालप्रांत मोगलांच्या राजधानीपासून दूर असल्यामुळें तेथचे अधिकारी बहुतेक स्वतंत्रच असत. निदान गुजराथेंतील सुरतेवर जसें बादशहाचें प्रत्यक्ष लक्ष असे, तसें बंगालप्रांताकडे नव्हतें. ह्मणून

मच्छलिपट्टणच्या इंग्रज वखारवाल्यांनीं प्रथम बंगाल प्रांतांत प्रवेश केला. त्यांनीं स. १६३३त राल्फ् कार्ट राइट ( Cartwright ) वगैरे कांहीं व्यापारी महानदीच्या मुखांतून वर ओरिसांत पाठविले. ते प्रथम हरिषपुर येथें उतरले. तेथील हिंदु कारभाऱ्यानें त्यांस चांगला आश्रय देऊन कटकच्या मुसलमान नवाबाकडे रवाना केलें. किनाऱ्यावरील लहान मोगल अधिकारी, वरिष्ठ सुभेदार, व मुख्य बादशहा त्यांजमधील फरक आरंभींच्या इंग्रज गृहस्थांस, चांगलासा कळत नसे; ह्मणून सर्वांसच त्यांनीं राजा ही संज्ञा दिलेली त्यांच्या लेखांत आढळते. वास्तविक ओरिसाचा नबाब हा बंगालच्या सुभेदाराचा हस्तक होता. त्यानें इंग्रज व्यापाऱ्यांची मोठ्या सत्कारानें भेट घेतली. तेथें दरबारांत पोर्तुगीझ व्यापाऱ्यांशीं कार्ट्राइटची पुष्कळ तक्रार झाली; त्यांत कार्ट्राइट दांडगाईनें वागला. तेणेंकरून त्याचा वचक बसून, ओरिसाच्या अधिकाऱ्यानें त्यास आपल्या प्रांतांत जमीन विकत घेऊन वखारी घालण्याची व जहाजें बांधण्याची परवानगी दिली ( स. १६३३ ), आणि त्यास मेजवानी देऊन निरोप दिला. पुढें त्या इंग्रजांनीं हरिहरपूर व बालासोर येथें वखारी घालून स. १६३३च्या जुलै महिन्यांत इंग्लंडाहून आणिलेला माल उतरला. पण हा माल तेथें खपला नाहीं. पावसाळ्यांत हिंवताप येऊन इंग्रजांचे बहुतेक लोक हाल होऊन मरण पावले. त्याच संकटांत एकीकडून पोर्तुगीझांनीं व दुसरीकडून डच जहाजांनीं त्यांजवर हल्ले चालविले. ही आंतबट्ट्याची व्याद नको असें विलायतेस कंपनीस व इकडे मच्छलिपट्टणच्या अधिकाऱ्यांसही वाटलें; आणि स. १६४१त बालासोरच्या व्यापाऱ्यांस निघून येण्याविषयीं इंग्लंडाहून हुकूम आला. त्याच संधीस फ्रान्सिस डे मद्रासेहून बालासोर येथें गेला; आणि तेथील हकीकत पाहून ही वखार बंद करूं नये असें त्यानें ठरविलें. पुढें हा प्रश्न विलायतेस गेला; तेथेंही स. १६५०पर्यंत त्याचा निकाल लागला नाहीं. स. १६५०त बंगाल्यांत वखार असण्याची जरूर आहे असें डायरेक्टरांनीं ठरविलें. त्याप्रमाणें बालासोर हें मध्यस्थान करून तेथून युरोपचा माल हुगळी येथें विक्रीस पाठवावा, अशी व्यवस्था

करण्यांत आली. शंभर वर्षांपूर्वी हुगळी येथें पोर्तुगीझ लोकांनीं वखार घातली होती, पण तेथें त्यांनीं तटबंदी वगैरे केली ती शहाजहान बादशहास न खपून, त्यानें स. १६३२त तेथील पोर्तुगीझ ठाण्याचा विध्वंस केला होता. हुगळीच्याच खालीं थोड्या अंतरावर चिनसुरा येथें डच लोकांची वसाहत होती. हुगळी हेंच मोगलांच्या गलबतांनाही बंगाल प्रांतांतील मुख्य बंदर होतें. स. १६५१त सर्जन बाउटनच्या मार्फत कंपनीनें बादशहाच्या कामगारांपासून हुगळी येथें व्यापार करण्याचा परवाना मिळविला. या कामीं नारायण नांवाचा एक हिंदु गृहस्थ स. १६३२ पासून इंग्रजांस मदत करीत होता, त्याला फुसलावण्याचा इंग्रजांच्या शत्रूंनीं अनेक वेळां प्रयत्न केला असतां, तो त्यांजशीं इमानानें वागला, आणि त्यानेंच हुगळीच्या वखारीस सर्व मदत केली. स. १६५१ पासून बंगाल प्रांतांत इंग्रजांचा व्यापार व्यवस्थितपणें सुरू झाला. म्हणजे बालासोर, पिपळी, हुगळी, कासीमबाझार, पाटणा ह्या व अन्य ठिकाणीं त्यांनीं हें काम चालू केलें. पण आरंभींच एवढा विस्तार कंपनीच्या मूठभर नोकरांस झेपण्यासारखा नव्हता. सहा सात वर्षांतच मद्रासच्या कौन्सिलनें ठरविलें, कीं बंगालप्रांतील वखारी बंद कराव्या. पण स. १६५७त क्रॉम्वेलनें कंपनीच्या कारभाराची नवीन व्यवस्था लावून दिली, तेणेंकरून त्यांच्या उद्योगास निराळें वळण लागलें. हिंदुस्थानांतील इंग्रज व्यापारी कंपनीच्या फायद्याकडे न पाहतां स्वतःच्याच तुंबड्या भरीत, त्यांच्या बंदोबस्तासाठीं क्रॉम्वेलनें प्रत्येक वखारीचे नियम बांधून दिले. वखारींत एक मुख्य, त्याचे तीन मदतनीस व हाताखालीं दुसरे लोक, अशा नोकरांच्या पायऱ्या बांधून मुख्य अधिकार सुरतेचा, सुरतेच्या ताब्यांत मद्रास, व मद्रासच्या ताब्यांत हुगळी, असा बंदोबस्त कॉम्वेलनें केला. सारांश, स. १६५८ हें वर्ष कंपनीच्या इतिहासांत महत्त्वाचें आहे. ह्याच वर्षी कंपनीचीं व्यवस्था लावून क्रॉम्वेल मरण पावला, आणि याच वर्षी शहाजहान बादशहा कैदेंत पडून त्याची कारकीर्द संपली. स. १६५८ पासून पुढें शंभर वर्षेपावेतों इंग्रज केवळ व्यापाराकडे लक्ष देऊन होते. स. १७५८त

ते राज्य मिळवूं लागले, त्या राज्याची सांगता स. १८५८त झाली. अर्थात् हे तीन शतसंवत्सर ब्रिटिश अंमदानींत स्पष्ट लक्ष्यांत ठेवण्याजोगे आहेत.

**५. क्रॉम्वेलनें केलेली व्यवस्था** (स. १६५७).–स. १६४९त पहिला चार्लस् फांशीं गेल्यावर व स.१६६०त दुसरा चार्लस् गादीवर आल्यावर इंग्लंडांत ज्या घडामोडी झाल्या त्यांमुळें कंपनीस फारच त्रास भोगावा लागला. चार्लसच्या मृत्यूनंतर राजचिन्हें म्हणून जितकीं कंपनीजवळ होतीं, तितकीं सर्व तीस नाहींशीं करावी लागलीं. तसेंच मध्यंतरींची प्रजासत्ताक राज्याचीं चिन्हें स.१६६०त कंपनीस काढून टाकावीं लागलीं. वेळ पडेल तसें वागणें जरूर होतें. क्रॉम्वेलचा उद्योग मात्र इंग्रज राष्ट्राच्या अत्यंत उपयोगी झाला, आणि कंपनीचें त्यानें कायमचें हित करून दिलें. व्यापार हें राष्ट्राच्या अभ्युदयाचें मुख्य अंग असून, तो वाढविण्याविषयीं राज्यकर्त्यांनीं जपलें पाहिजे, हें तत्त्व क्रॉम्वेल ह्यास पूर्णपणें अवगत होतें. डच लोकांनीं कंपनीस ग्रासून टाकिलें आहे, आणि पोर्तुगीझ लोकही तिला त्रास देतात, हें त्याच्या पक्कें लक्षांत आलें. इंग्रज लोकांस पूर्वेकडील व्यापाराची पूर्ण मोकळीक आहे, असा त्यानें पोर्तुगालपासून तह करून घेतला, आणि आंबोयनाच्या कत्तलीबद्दल डच लोकांस योग्य प्रायश्चित्त दिलें. तसेंच कंपनीची अंतर्व्यवस्था सुधारून, व समाइक भांडवलाची पद्धत कायम करून सन १६५७त क्रॉम्वेलनें कंपनीस नवीन सनद करून दिली. ह्या सनदेनें लोकांस धीर येऊन त्यांनीं आपला पैसा मुबलक व बिनदिक्कत कंपनीच्या हातांत दिला. क्रॉम्वेलच्या या व्यवस्थेमुळेंच पुढील दोनशें वर्षांत राज्यस्थापनेचा प्रचंड उद्योग कंपनीस करतां आला.

क्रॉम्वेलचा जन्म व कंपनीचा जन्म समकालीन म्ह० स. १५९९ चा आहे. कंपनीनें स. १६२८त पार्लमेंटाकडे प्रथम दाद मागितली, त्याच वर्षी क्रॉम्वेलनेंही पार्लमेंटांत प्रथम प्रवेश केला. तेव्हांपासून स. १६४९ पर्यंत कंपनीचे बारा वाजत आले होते. त्यांत विशेषतः युद्ध चालू असतां, म्हणजे स. १६४२ पासून १६४९ पावेतों, दोन पक्षांच्या द तफाईत कंपनीचा बहुतेक चुराडा

होऊन गेला. अशा स्थितींत कंपनीच्या नोकरांनीं हिंदुस्थानांतील व्यवहार कसेबसे चालू ठेविले हेंच विशेष आहे.

क्रॉम्वेलच्या हातांत राज्यसूत्रें आल्याबरोबर त्यानें कंपनीच्या उद्योगाचा बारकाईनें तपास केला. व्यापारानेंच राष्ट्राचें हित होतें असा त्याचा पक्का ग्रह असून, हिंदुस्थानांतील व्यापार इंग्रजांच्या कबजांत ठेवण्यास कोणते उपाय केले पाहिजेत ह्याचा विचार करितां, कंपनीसच मदत करणें बरें, अशी त्याची खात्री झाली. वास्तविक प्रत्यक्ष कंपनीविषयीं त्याच्या मनांत ओढा होता असें मुळींच नाहीं. बाह्य देशांत व समुद्रावर इंग्लंडच्या आरमाराचें महत्त्व वाढविण्याकरितां त्यानें नॅव्हिगेशन ॲक्ट वगैरे अनेक उपाय केले, त्यांतीलच कंपनीच्या सनदेची उजळणी करणें हा एक उपाय होता. डच लोकांविरुद्ध कंपनीच्या कागाळ्या पार्लमेंटाकडे जातच होत्या. डच लोकांनीं गेल्या वीस वर्षांत आपलें दोन कोट रुपये नुकसान केलें आहे अशी फिर्याद कंपनीची होती. पण केवळ कंपनीच्या खातर डच राष्ट्रावर एकदम युद्ध सुरू न करतां, दुसरीं कारणें सांपडतांच क्रॉम्वेलनें डच लोकांचा पुरेपूर सूड उगविला. स.१६५४त डच लोकांनीं इंग्लंडशीं तह केला, त्यास ब्रेडाचा तह म्हणतात. त्या तहांत कंपनीच्या नुकसानीचीच भरपाई मुख्यत्वेंकरून झळकत होती. नुकसानीबद्दल डच लोकांनीं कंपनीस सुमारें नऊ लाख रुपये व पुलरून बेट कायमचें इंग्रजांस दिलें. बारा वर्षांपूर्वी म्हणजे स. १६४२त डच लोकांपासून पांच लाख रुपये घेऊन तंटा तोडण्यास कंपनी कबूल होती. असो. ह्याप्रमाणें डच लोकांचा बंदोबस्त केल्यावर, क्रॉम्वेलनें पोर्तुगालशीं बोलणें सुरू केलें. तोफेचें तोंड पोर्तुगालकडे फिरवितांच त्यांनीं वठणीस येऊन हिंदुस्थानांत इंग्रजांच्या वाटेस जावयाचें नाहीं, असा करार लिहून दिला. ह्या सर्व कामगिरीबद्दल क्रॉम्वेलनें कंपनीकडून सहा लाख रुपये कर्ज म्हणून घेतले. हा पैसा राज्याच्या कामांत लावून पुढें तें कर्ज क्रॉम्वेलनें फेडूनही टाकिलें.

कंपनीच्या अंतर्व्यवस्थेविषयीं विचार करितांना क्रॉम्वेल ह्यास असें दिसून आलें, कीं ई. इं. कंपनीशिवाय कोर्टेनची कंपनी व लंडन ब्रिस्टल वगैरे ठिकाणचे

व्यापारी हिंदुस्थानच्या व्यापारासाठीं भांडत आहेत. पैकीं पहिल्या दोघांची स. १६५०त गोडी झाली. गोडी झाली तरी कंपनीला आरंभीं भांडवल मिळेना. एकट्या कंपनीला एवढ्या सगळ्या व्यापाराचा मक्ता असावा ही गोष्ट पुष्कळ पैसेवाले व्यापाऱ्यांस खपत नव्हती. वास्तविक खुला अगर उघड व्यापार व नियंत्रित व्यापार ह्या दोन तत्त्वांचा झगडा आजच्या प्रमाणें त्या वेळींही चालू होता. सगळा व्यापार एकट्या कंपनीनेंच करावा, इतरांस त्यांतला वांटा मिळूं नये, असें कंपनीचें म्हणणें होतें. पण विरुद्ध मताचा वर्गही मोठा होता. एवंच स १६५४त क्रॉम्वेलपुढें हा प्रश्न निकालासाठीं आला. हिंदुस्थानचा व्यापार सर्व राष्ट्रास मोकळा ठेविला तर आपल्या आरमाराकडून त्याचें संरक्षण करण्यास इंग्लंडनें तयार असलें पाहिजे. परंतु त्या वेळीं युरोपच्या राष्ट्रांशीं झुंजण्याचें सामर्थ्य इंग्रजांचे अंगीं नव्हतें, हें क्रॉम्वेलनें पक्कें जाणून, व्यापाराचा मक्ता कंपनीकडेच ठेविला. मात्र दुसऱ्या कोणास त्या व्यापारांत पडावयाचें असल्यास त्याजबद्दल कांहीं सवलती करून दिल्या. इतकें झालें, तरी कंपनीच्या मंडळींतच दोन पंथ होते, एक समाइक भांडवल पाहिजे म्हणणारांचा, व दुसरा, कंपनीचा सभासद असूनही ज्यानें त्यानें आपला व्यापार खासगी रीतीनें कांहीं नियमांस अनुसरून करावा असें म्हणणारांचा. ह्या दुसऱ्यास विशिष्ट कराराची पद्धत (Regulared system) असें नांव दिलेलें आहे. दोघांचा तंटा क्रॉम्वेलनें अभिप्रायासाठीं कौन्सिल आफ् स्टेट म्ह० मंत्रिमंडळाकडे पाठविला. ज्यास्त विचार करतांच, 'कंपनी म्ह० कोण' हें ठरविण्याची कौन्सिलास पंचाईत पडली. फायद्याची गोष्ट असली, म्हणजे जो तो म्हणे मी कंपनीचा सभासद; पण पैसे जाण्याची वेळ आली, म्हणजे प्रत्येक असामी कानावर हात ठेवी. अशा स्थितींत कामाचा पार येईना. दोन वर्षें झालीं तरी कौन्सिलच्या हातून कंपनीच्या कारभाराचा निकाल लागेना; तेव्हां कंपनीनें शेवटचा एक अर्ज क्रॉम्वेलकडे केला. तो अर्ज घेऊन, त्याच दिवशीं क्रॉम्वेलनें स्वहस्तानें कौन्सिलास त्या खालीं सक्तीचा हुकूम लिहून, एक लहानशी कमिटी नेमून 'लवकर निकाल द्यावा', असें कळविलें. ह्या कमिटींत त्यानें

आपल्या तर्फेचीच सर्व मंडळी नेमिली. त्यांतही कर्नल फिलिप जोन्स म्हणून कॉम्वेलच्या मर्जीतला व भरंवशाचा एक गृहस्थ होता, त्यानेंच सर्व कच्चें काम केलें आणि दीड महिन्यांत कमिटीनें निकाल दिला. त्यांचें असें मत बनलें, कीं पूर्वेकडील सर्व व्यापार एकट्या कंपनीनेंच समाइक भांडवलच्या पद्धतीवर चालवावा. पुढें हें प्रकरण हुकुमासाठीं कॉम्वेल पुढें आलें. व्यापारानें राष्ट्राची भरभराट केवढी होते याचा विचार कॉम्वेलनें पूर्वीच केला होता. राष्ट्राचा भावी व्यापार चांगल्या स्थितीस आणाया अशा योजना करून, प्रथम त्यानें स १६५१त नॅव्हिगेशन ॲक्ट नांवाचा कायदा मंजूर केला. ह्या कायद्यानें त्यानें असें ठरविलें, कीं इंग्लंडच्या किनाऱ्यावर उतरणारा माल इंग्रज जहाजांतूनच आला पाहिजे, परकीय जहाजांस इंग्लंडचे किनाऱ्यावर येऊं द्यावयाचें नाहीं. ह्या कायद्यामुळेंच पुढें डच लोकांशीं इंग्लंडचें युद्ध सुरू झालें. स्पेनच्या कॅथालिक राष्ट्राशीं लढण्यांत तरी कॉम्वेलचा उद्देश व्यापाराचाच होता. पोर्तुगालपासून व्यापाराचाच तह त्यानें करून घेतला. जगांतील कोणत्याही समुद्रावर इंग्लंडचा ताबा बिनहरकत चालावा, अशी कॉम्वेलची मोठी हाव होती. आशिया खंडाच्या समुद्रांत मोठें आरमार ठेवण्याची इंग्रज राष्ट्रास ऐपत नसल्यामुळें, तेथचा व्यापार सर्व राष्ट्रांस मोकळा ठेवणें शक्य नव्हतें. तेव्हां समाइक भांडवलाच्या पद्धतीवर कंपनीनें व्यापार करावा, किंवा कंपनींतील सभासदांनीं कांहीं ठरीव नियमांस अनुसरून खासगी रीतीनें पृथकपणें व्यापार करावा, ह्या दोन गोष्टींपैकीं कॉम्वेलनें पहिलीच पसंत केली. पृथक भांडवलानें व्यापार करण्याचे प्रयत्न पुष्कळ झाले, पण अनेक अडचणींमुळें ते सोडून द्यावे लागले. वास्तविक त्या वेळची समाइक भांडवलाची पद्धत सुद्धां हल्लींच्या सारखी नव्हती. कांहीं मंडळींनीं समाइक भांडवल एकत्र जमवून चार दोन वर्षेपर्यंत व्यापार करावयाचा; आणि ती मुदत संपल्यावर सर्व व्यापार आटपून आपलें भांडवल नफानुकसानीसह परत काढून घ्यावयाचें. ही त्या वेळची समाइक पद्धत होय. पण हल्लींची समाइक पद्धत अशी असते, कीं कंपनीच्या एकंदर भडवलाचे शेअर्स म्ह० भाग करून ते विकावयाचे, आणि

दरसाल ठरीव व्याज व फायदा हिसेरसीनें मालकांस देऊन धंदा कायमचा चालू ठेवावयाचा. हा हल्लींचा प्रकार त्या वेळीं नव्हता. अशा प्रकारची पुष्कळ भवतिनभवति होऊन, इकडे हिंदुस्थानांत कंपनीनें अगदीं कंटाळून जाऊन गाशा गुंडाळण्याचा ठराव केला असतां, क्रॉम्वेलनें ता. १९ ऑक्टोबर स. १६५६त मंत्रिमंडळाच्या संमतीनें कंपनीस नवी सनद करून दिली. पुढें लवकरच कंपनीने सोयीसाठीं आणखी नवीन नियम केले. पन्नास रुपये रक्कम घेऊन वाटेल त्यास कंपनींत दाखल करण्याचा नवीन नियम अंमलांत आला. ठरीव मुदतीपर्यंत समाइक भांडवल चालू ठेवण्याचा प्रघात रद्द करून, प्रथम सात वर्षांनीं व पुढें दर तीन वर्षांनीं कंपनीच्या व्यापाराचे हिशेब पुरे करून, कोणास आपलें भांडवल काढून घ्यावयाचें असल्यास, तें घेतां यावें अशी सवड ठेविली. क्रॉम्वेलच्या ह्या सर्व नवीन व्यवस्थेमुळें ई० ई० कं० चा उद्योग भक्कम व कायमचा झाला. स. १६६०त चार्लस राजा गादीवर आला आणि राजनिष्ठा व्यक्त करण्याकरितां क्रॉम्वेलनें दिलेली सनद कंपनीला रद्द करावी लागली, तरी क्रॉम्वेलच्या व्यवस्थेचा उपयोग झाल्याशिवाय राहिला नाहीं.

ह्या व्यवस्थेनें ७३,९७.८२० रुपये नवीन वर्गणी जमली. कमीत कमी आंकडा १००० रुपयांचा होता. पांच हजार रुपये भरणारास एक मत असून, दहा हजार रुपये भरणारास कमिटींत नेमण्याचा हक्क प्राप्त होत असे. पुष्कळांनीं मिळून पांच हजार रुपये जमा करून एकाच्या नांवावर भरावे, अशीही सवड होती. कोर्ट आफ् डायरेक्टर्स ह्मणून कंपनीची व्यवस्थापक सभा होती, तींत पूर्वीप्रमाणें एक गव्हर्नर, एक डेप्युटि गव्हर्नर, एक खजानची व चोवीस सभासद असत. ह्याप्रमाणें जी नवीन कंपनी क्रॉम्वेलच्या सनदेनें निर्माण झाली, तिनें पूर्वीच्या भागीदारांची सर्व कमाई, माल, जमिनी, घरें, किल्ले वगैरे दोन लक्ष रुपयांस खरेदी केलें. अशी व्यवस्था चालू झाल्यावर कोणी खासगी व्यापार करील तर त्यास जबर शासन ठरविलेलें होतें. गव्हर्नर व डेप्युटि गव्हर्नर ह्यांनीं लागोपाठ दोन वर्षांहून ज्यास्त अधिकारावर राहूं नये, चोवीस डायरेक्टरांपैकीं दरसाल आठांनीं आपले कामांतून निवृत्त व्हावें, आणि त्यांच्या बदली आठ इसम

दरसाल नवीन नेमावे, कोणत्याही सबबीवर भागीदारांस पैशाऐवजीं कच्चा माल न देतां सर्व व्यवहार रोकडीनें भागवावे; असे आणखी पुष्कळ नियम नवीन झाले. सुरत व पश्चिम किनाऱ्यावरील वसाहती, फोर्ट सट जॉर्ज, मद्रासच्या व बंगालच्या किनाऱ्यावरील वसाहती, बँटम व त्याच्या ताब्यांतील जम्बी, मॅकासर व पुलरून हीं ठिकाणें आणि इराणी अखातावरील गॉम्ब्रून, एवढ्या जागा दोन लक्ष रुपयांस कंपनीस नवीन मिळाल्या. त्या वेळच्या स्थितीच्या मानानें ही किंमत थोडी आहे असें नाहीं. नवीन भांडवल हातीं येतांच स. १६५८च्या जानेवारींत कंपनीनें व्यापाराकरितां एकंदर सतरा ठिकाणें पूर्वेकडे मुकर्रर केलीं; आणि व्यापाराच्या कामांत हुशार असे एक्याण्णव नवीन इसम हिंदुस्थानांत निरनिराळ्या ठिकाणीं पाठविले. सारांश, क्रॉम्वेलचा सूड उगाविण्याचे पुढील कारकीर्दींत जरी अनेक प्रयत्न घडून आले तरी पूर्वेकडील व्यापार हा राष्ट्राच्या जीवनाचा मुख्य आधार होय हें तत्त्व लक्षांत ठेवून, त्यानें कंपनीस पुनर्जन्म दिला, व राष्ट्राचें कोटकल्याण केलें, ही गोष्ट निर्विवाद आहे. क्रॉम्वेलनें आपल्या राष्ट्राचें आरमार मजबूद पायावर स्थापिलें, रोमन कॅथोलिक राष्ट्रांची रग नाहींशी केली व हॉलंडसारख्या प्रॉटेस्टंट राष्ट्राच्या गमजा जिरविल्या, ह्यामुळेंच स्पेन व डच ह्यांचें पुढें वर्चस्व कमी होऊन इंग्रजी राज्य वाढूं लागलें, ही गोष्ट पुढील इतिहासावरून दिसून येणार आहे.

**६. कंपनीच्या नोकरांचे पगार व अंतर्व्यवस्था.**—मागें सांगितलेल्या अनेक अडचणींतून कंपनी जिवंत कशी राहिली, ह्याचें आश्चर्य वाटण्यास नको. कंपनीचें जीवित्व पैसा व व्यापार ह्यांवर अवलंबून नव्हतें. कंपनीचा गव्हर्नर, डेप्युटि गव्हर्नर व चोवीस डायरेक्टर्स हे जोंपर्यंत कायद्यानें हयात होते, तोंपर्यंत कंपनी हयात आहे असेंच समजावयाचें. विशेषतः एक गव्हर्नर ठीक असला, म्हणजे सर्व काम भागे. सन १६००–१६२१ पावेतों सर टॉमस स्मिथ्, सन १६२४–१६३७ पावेतों सर मॉरिस ॲबट, व सन १६४३-१६५८ पावेतों वुल्यम कॉकेन ह्या तिघांनींच कंपनीचें आरंभींचें बहुतेक काम केलेलें आहे. गव्हर्नरास काम फार पडे. दर सभेस हजर राहणें, पार्लमेंटांत

कंपनीच्या संबंधानें जबाब देणें, नवीन वर्गण्या जमा करणें, मालाची खरेदी-विक्री करणें, दरएक भांडवलाचे हिशेब पुरे करून नफा नुकसान वांटणें, तसेंच राजदरबारीं हजर राहून तेथील मनसुबा संभाळणें, हें एवढें काम कांहीं थोडें नव्हे. शिवाय पैशाच्या बाबतींत अत्यंत निस्पृह राहून पार्लमेंटांत आपलें वजन कायम ठेवण्याबद्दल त्यास जपावें लागे तें वेगळेंच.

सर टॉमस स्मिथची हकीकत मागें आलीच आहे. सर मॉरिस ॲबटचा बाप कापडाचा व्यापार करी. मॉरिसचा जन्म स. १५६५त झाला. ई. इं. कंपनीच्या व्यवस्थेंत तो आरंभापासून होताच; पण त्याशिवाय टर्की कंपनी व वायव्येकडून मार्ग शोधून काढण्याच्या अनेक कंपन्या इत्यादिकांतही तो नेहमीं पुढें असे. डायरेक्टरांच्या सभेंत बरेच दिवस काम केल्यावर, तो स. १६१५त डेप्युटि गव्हर्नर झाला. त्याचे भाऊही त्याच्या सारखेच उद्योगी व साहसी होते. स. १६२४ पासून १६३७ पावेतों कंपनीचा कारभार करून वयाच्या ७३वे वर्षी तो लंडनचा लॉर्ड मेयर झाला. त्याचा कारभार पुष्कळांस पसंत पडला नाहीं. राजास व लोकांस खूष ठेवण्याचें कठीण काम करीत असतां, अनेक वेळां त्रासून, 'नको हें मला काम' असें त्यानें ह्मणावें; पण कंपनीचें तरी त्याच्या शिवाय थोडेंच चालणार होतें. सर्व पक्षांशीं गोडीनें वागून आपलें कार्य दक्षतेनें हाकणारा दुसरा इसम कंपनीस कोठें मिळणार होता. असो; ह्याप्रमाणें मॉरिसनें कंपनीचा गाडा बरेच दिवस दक्षतेनें हांकिला.

वुल्यम कॉकेनही मॉरिस ॲबट प्रमाणेंच हुशार व वाकबगार गृहस्थ होता. स. १६२९त डायरेक्टरांच्या सभेंत त्याची नेमणूक झाली. पुढें सन १६३९त डेप्युटि गव्हर्नर होऊन, सन १६४३त तो गव्हर्नर झाला. त्याच्या कारकीर्दींत राजा, पार्लमेंट व इतर पक्ष ह्यांजकडून कंपनीवर नाना तऱ्हेचे आघात झाले; तरी पण केव्हांही न डगमगतां व धीर न सोडतां सरतेशेवटीं क्रॉम्वेलच्या हातून त्यानें कंपनीची व्यवस्था चांगल्या तऱ्हेनें लावून घेतली, ह्यांतच त्याची करामत दिसून येते. कॉकेन ह्यास वुल्यम मेथ्वोल्डची मदत सारखी होती. मेथ्वोल्डचें नांव पूर्वीं आलेंच आ. हा स. १६१५त कंप-

नीचा व्यापारी म्हणून सुरतेस आला. हिंदुस्थानांत ठिकठिकाणीं फिरून तेथील व्यापाराची उपयुक्त माहिती त्यानें मिळविली. त्यानें सात वर्षें इकडे प्रेसिडेंटचें काम केलें. त्याच्या उत्कृष्ट पत्रांनीं इंग्लंडांत कंपनीच्या कारभाऱ्यांस चांगला धीर येत असे. मद्रास व बंगाल येथील किनाऱ्यांवरील वखारी स्थापण्याची भर त्यानेंच दिली, आणि परत जातांना त्यानें अलोट संपत्ति बरोबर स्वदेशीं नेली. वास्तविक हिंदुस्थानांतील व्यापाराची घडामोड प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहून परत गेल्यावर ह्या व्यापारांत लोकांस ओढण्याची खटपट करणारा हाच पहिला मोठा पुरुष होय. हा मेथ्वोल्ड स. १६५३त मरण पावला. कॉम्वेलच्या नवीन व्यवस्थेनें कंपनीचें भांडवल सर्वच कायमचें झाल्यामुळें पैशाची अडचण दूर झाली, त्यामुळें पुढें गव्हर्नराचें विशेष महत्त्व राहिलें नाहीं. गव्हर्नर व डेप्युटि गव्हर्नर दोन वर्षांहून ज्यास्त कामावर राहूं नये, व दरसाल आठ डायरेक्टरर्स बदलत जावे, असाही नवीन नियम झाल्यामुळें, नफानुकसान वांटण्याच्या भानगडी राहिल्या नाहींत. कॉम्वेलच्या व्यवस्थेंत अधिकाऱ्यांचे पगार नवीन बांधण्यांत आले, ते असेः--

| | | |
|---|---|---|
| १ | अकाउंटंट जनरल ... ...सालिना पगार रु० | २२०० |
| २ | अकाउंटंट जनरलचा असिस्टंट ... ... | ८०० |
| ३ | पत्रलेखक व कापडी कोठाराचा मुख्य ... | १५०० |
| ४ | तिजोरीचा मुख्य... ... ... ... | १५०० |
| ५ | तिजोरीचा असिस्टंट ... ... ... | ८०० |
| ६ | सोन्याच्या कोठाराचा मुख्य ... ... | ८०० |
| ७ | जहाजांचा तपासणी कामदार ... ... | ५०० |
| ८ | खलाशांचे पगार वांटणारा कारकून... ... | ३०० |
| ९ | मुख्य जमादार ( शिपाई व हमाल ह्यांचा ) ... | ३०० |
| १० | मिऱ्यांचे कोठाराचा मुख्य... ... ... | १४०० |
| ११ | सॉलिसिटर ( वकील ) ... ... ... | २०० |
| १२ | निळीच्या कोठाराचा मुख्य ... ... | ८०० |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १३ गव्हर्नर व डे० गव्हर्नर प्रत्येकी | ... | | ... | ५००० |
| १४ प्रत्येक डायरेक्टर | ... | ... | ... | ३००० |

गव्हर्नर, डेप्युटि गव्हर्नर व डायरेक्टर्स ह्यांस आरंभीं पगार नसे, फक्त काम पाहून त्यांस बक्षीस देण्याची वहिवाट होती. हें बक्षीस बंद करावें असा प्रश्न क्रॉम्वेलच्या वेळेस निघाला होता; पण तो सर मॉरिस ॲबटनें मोडून काढिला. कंपनीच्या कारभाराची व्यवस्था कशी होती ह्याचें विवेचन मागें ठिकठिकाणी आलेंच आहे. खरी ईस्ट इं० कंपनी म्हणजे स. १६००त स्थापन झालेली कंपनीच अखेरपर्यंत टिकली असें नाहीं. निरनिराळ्या वेळीं अनेक कंपन्या स्थापन झाल्या, त्यांचा अंतर्भाव एकाच संस्थेंत होऊन, तिचें अखेरीस ईस्ट इं० कं० हें एक नांव प्रचारांत आलें. कंपनीच्या स्वरूपांत वेळोवेळीं रूपांतरें झालीं. तरी एकंदरीत विलायतेंत काय किंवा हिंदुस्थानांत काय, तिच्या उद्योगाचें सातत्य भंग पावलें नाहीं.

कंपनीच्या भांडवलाचे भागीदार असत, त्यांस 'प्रोप्रायटर्स ऑफ धि कंपनीझ स्टॉक' अशी संज्ञा असून, त्यांची सभा भरे, 'तीस कोर्ट ऑफ प्रोप्रायटर्स' असें ह्मणत. सर्व अधिकार नांवानें ह्या कोर्टाकडेच असत. तथापि त्यांच्यापैकीं बहुमतानें निवडलेल्या चोवीस इसमांची, 'कोर्ट ऑफ डायरेक्टर्स' ह्मणून व्यवस्थापक सभा असे तीच सर्व कच्चा कारभार पाही. कोर्ट ऑफ् डायरेक्टर्स दरसाल नवें निवडण्यांत येई. कोर्ट ऑफ् प्रोप्रायटर्स ही सभा वर्षांतून चार वेळां म्ह० मार्च, जून, सेप्टेंबर व डिसेंबर ह्या महिन्यांत भरत असे. वीस हजार रुपयांचें भांडवल ज्यानें दिलें असेल, त्यासच व्यवस्थापक सभेंत निवडून येण्याचा अधिकार असे. डायरेक्टरास काढून टाकावयाचें असलें, तर कोर्ट ऑफ प्रोप्रायटर्सच्या दोन सभा भरवाव्या लागत, त्यात बहुमतानें त्याचा निकाल होई. कामांची वांटणी करून तीं डायरेक्टरांच्या चार पोटकामिट्यांकडे विभागलेली होती ती येणें प्रमाणें:—

(१) स्टँडिंग कमिटी म्हणजे कायमची व्यवस्थापक मंडळी.

( २ ) सीक्रेट पोलिटिकल कमिटी ह्मणजे दरबारांतील गुप्त काम पाहणारी मंडळी. ही मंडळी पार्लमेंटानें सन १७४८त मुद्दाम नेमिली. कंपनीला युद्ध किंवा तह करणें भाग पडे त्यांत इंग्रज राष्ट्राचा संबंध असल्यामुळें, अशा व्यवहारांवर देखरेख ठेवून पार्लमेंटास व प्रधानमंडळास सर्व प्रकारची बातमी व मदत देणें हें ह्या कमिटीचें काम होतें.

( ३ ) सीक्रेट कमर्शल कमिटी म्ह० गुप्त व्यापारी काम पाहणारी मंडळी. ही सन १८१५त स्थापन झाली.

( ४ ) कमिटी ऑफ बाय-लॉज, म्ह० नियम करणारी मंडळी.

ह्यांपैकीं पहिल्या म्ह० स्टँडिंग कमिटीचे बारा पोटभाग असत, ते असेः—

१ पत्रव्यवहाराची कमिटी. ह्या कमिटीचें काम अतिशय महत्त्वाचें होतें. परमुलखांतून आलेलीं पत्रें व सामानाच्या याद्या वाचून त्यांचे निकाल लावणें, नोकरांच्या तक्रारींचा निकाल करणें, नोकरांच्या नेमणुका करणें, इत्यादि कामें ह्या कमिटीकडे होतीं.

२ दिवाणी दाव्यांची कमिटी. कंपनीच्या व्यवहारांचे दावे लावावे लागत, त्याचें काम ह्या कमिटीकडे होतें.

३ लष्कराची व्यवस्था पाहणारी कमिटी. ही सन १७७०त क्लाइव्हनें स्थापिली. लष्करांतील अनाथ लोकांस किंवा त्यांच्या विधवांस योग्य मदत देऊन त्यांचा सांभाळ करणें, हें ह्या कमिटीचें काम होतें.

४ ट्रेझरी कमिटी. इच्याकडे नाण्यांचें व खतापत्रांचें काम होतें.

५ सिव्हील कॉलेज कमिटी. ही सुद्धां फार मागाहून निर्माण झाली. हिंदुस्थानांत येणाऱ्या अंमलदारांस योग्य शिक्षण देण्याचें काम ह्या कमिटीकडे होतें. इंडियन सिव्हिल सर्व्हिसचा हा आरंभ होय.

६ लायब्ररी कमिटी. ही सुद्धां कंपनीच्या पुढील भरभराटींत निर्माण झाली.

७ खरेदीची व वखारींची कमिटी. मालाच्या खरेदीविक्रीचें काम ह्या कमिटीकडे होतें. ८ हिशेबकमिटी. सर्व हिशेबी कामासाठीं.

९ घरकमिटी. १० लष्करी शिक्षणकमिटी.

११ नौकाकमिटी. हिच्याकडे गलबतांची हरएक प्रकारची व्यवस्था होती.

१२ खासगी व्यापाराची कमिटी. कंपनीच्या नांवाखालीं लोक खासगी व्यापार करीत, त्याचें काम ह्या कमिटीकडे होतें.

कंपनीची नोकरी ज्यांस पाहिजे असेल, त्यांचीं नांवें कोर्टाच्या सभेंत कोणी तरी सुचवावीं लागत. तेथें तीं नांवें पसंत झाल्यावर, मग त्या नोकरांस कंपनीकडे रीतसर नोकरीचा अर्ज करावा लागे. नंतर त्या लोकांची परीक्षा घेण्याकरितां हिशेबी कमिटीकडे लिहून जाई. तेथें पास झाल्यावर त्या लोकांस बहुमतानें नोकरींत घेण्यांत येई. हीं मतें प्रत्येकानें कागदावर लिहून ते कागद एका पेटींत टाकावे लागत; पण केव्हां केव्हां हात वर करूनही मत देण्याचा प्रचार होता. ज्या गृहस्थांची नेमणूक झाली असेल, त्यांस डायरेक्टरांच्या कोर्टापुढें येऊन इमानानें वागण्याची शपथ घेऊन जामीन द्यावा लागे. हिंदुस्थानांतले नोकर बहुधा तीन प्रतींचे असत.—१ व्यापारी म्ह० मर्चंट, २ दुकानदार म्ह० फॅक्टर, आणि ३ कारकून म्ह० रायटर. शिवाय कांहीं लहान मुलगे उमेदवार ह्मणून घेत, व त्यांनीं सात वर्षेपर्यंत चांगल्या प्रकारची उमेदवारी केल्यावर त्यांस कायम नोकरी देण्यांत येई. रायटर ह्मणजे कारकून. त्यास पगार वर्षाचा प्रथम रुपये शंभर असून पांच हजारांचा जातमुचलका द्यावा लागे. पुढें त्याची बढती होऊन दुकानदारीची जागा मिळे. त्याबद्दल वर्षाचा पगार दोनशें रुपये असून त्यास दहा हजारांचा जातमुचलका असे. तीन वर्षें दुकानदारी केल्यावर त्यास वरिष्ठ दुकानदार नेमीत व आणखी तीन वर्षांनीं ते व्यापारी म्ह० मर्चंट होत. व्यापारी असेल त्यालाच वखारींचा मुख्य नेमीत, व त्याबद्दल वर्षाचा पगार रुपये चारशें होता. शिवाय सर्व लोकांस राहण्यास जागा व जेवण कंपनीच्या खर्चानें मिळे. स. १६६० पर्यंत दुकानदार व व्यापारी असे नोकरांचे दोनच वर्ग होते. रायटर ह्मणजे

कारकून हा तिसरा वर्ग पुढें निर्माण झाला. स. १७६५त दुकानदारांचा वर्ग कमी करण्यांत आला.

प्रेसिडेंटास पन्नास हजारांचा जातमुचलका द्यावा लागे. शिवाय त्याचा अर्धा पगार नोकरी संपेपर्यंत शिलकेंत ठेवण्यांत येई आणि नोकरी पुरी होऊन इंग्लंडांत परत गेल्यावर स्वतः हजर होऊन शिल्लक टाकलेला पगार त्यास घ्यावा लागे. ह्यामुळें कंपनीच्या विरुद्ध वागण्यास ते सहसा धजत नसत. सुरतच्या नोकरांचे पगार खालीं लिहिल्याप्रमाणें होतेः—

| हुद्दा. | वा. प. रु. | | वा. प. रु. |
|---|---|---|---|
| प्रेसिडेंट ... ... | ५००० | अकाउंटंट... | ...१५०० |
| जनरल पर्सर, तिजोरी कामगार | ...१००० | कोठारावरचा मुख्य ... | ७०० |
| सेक्रेटरी ... ... | ... ४०० | पांच दुकानदार ह्म. फॅ. प्र. | ३०० |
| कारकून ह्म० रायटर. ... | ... २०० | पाद्री. ... | ...१००० |

इ० इ० कंपनीचा प्रेसिडेंट हा हिंदुस्थानांत मोठा अब्रूदार गृहस्थ असे. परत आल्यावर त्यास इंग्लंडांतही तसाच मान मिळे. कदाचित् कारणपरत्वें त्याचा आदर कमी झाला, तरी जवळच्या द्रव्यसंचयावर पाहिजे तितकें ऐश्वर्य मिरविण्याची ऐपत त्यास असे. सुरत व मद्रास येथील प्रेसिडेंटाच्या दोन जागा मोठ्या हुद्याच्या होत्या. त्यांच्या खालोखाल मुंबईचा डेप्युटि गव्हर्नर व इराणांतला एजंट या दोन जागा असून मुंबईची जागा मोठ्या विश्वासाची व इराणांतली जागा पैशानें किफायतशीर समजली जात असे.

कंपनींत ठेवण्याचे नोकर बहुमतानें निवडण्यांत येत. विशेषतः सुरतेचा प्रेसिडेंट निवडतांना विशेष खबरदारी घ्यावी लागे. इंग्लंडांतल्यापेक्षां हिंदुस्थानांतल्या नोकरांस पगार कमी असे. उदाहरणार्थ, विलायतेंतील इंडिया हाउसमधील चीफ अकौंटंटास वार्षिक पगार रु.२२०० असे; व सुरतेच्या अकौंटंटास १५०० रुपये असे. इंग्लंडांतील तिजोरीकामगार रु. १५०० तर सुरतेचा तिजोरीकामगार रु. १०००; विलायतेंतील रायटर व कापडी दुकानचा मुख्य रु. १५००; सुरतेच्या रु. ७००. हिंदुस्थानांत खर्च कमी येई खरा, पण जबा-

बदारी ज्यास्त असे. हिंदुस्थानांत काम करणारांस ज्यास्त पगार देण्याचा ठराव पुढें पुष्कळ वर्षांनीं अंमलांत आला.

कॅाम्बेलच्या सनदेनंतर नवीन व्यवस्था झाली, तींत सुरतच्या प्रेसिडेंटाच्या हाताखालीं सोळा नोकरांचा मेहेकमा देण्यांत येऊन त्यांचा पगार सालिना ११,१०० रुपयांचा आणि मद्रास व बँटम येथील वखारींत प्रत्येकीं २००० रुपयांचा ठरविण्यांत आला; तसेंच इतर किरकोळ वसाहतीसाठीं १००० रुपयांचा खर्च ठरविण्यांत आला. शिवाय भोजन व राहण्याची जागा फुकट देण्यांत येत असे. सर्वांचें भोजन एका वेळीं एकाच टेबलावर होई. प्रेसिडेंटाचा वर्षाचा पगार ५००० रुपये असून, शिवाय भोजन खर्चाबद्दल दर असामीस वर्षाचे २०० रुपये प्रमाणें बारा असामींचें २४०० रुपये व त्यांच्या किरकोळ खर्चाबद्दल वर्षाचे २६०० रुपये प्रेसिडेंटाच्या हातांत एकदम देण्यांत येत. या १३ असामींशिवाय आणखी ३ असामी प्रेसिडेंटाच्या हाताखालचे कौन्सिलर्स ह्मणून असत. त्यांस स्वतःचीं घरें घेऊन स्वतंत्र राहण्याची परवानगी होती. पगाराशिवाय लोकांस उत्तेजन ह्मणून व्यापारांत त्यांचा हिस्सा ठेवण्यांत येत असे; आणि केव्हां केव्हां फायद्याचा कांहीं भागही त्यांस देण्यांत येत असे. मात्र खासगी व्यापार करणें झाल्यास तो उघडपणें ठरीव रकमेपर्यंतच करण्याची मोकळीक होती. उदाहरणार्थ, स. १६००त कॅप्टनचा पगार वर्षाचा १००० रुपये असून, त्यास खासगी व्यापार २००० रुपयेपर्यंत करण्याची परवानगी असे; शिवाय प्रत्येक सफरींतील भांडवलाच्या दुप्पट पासून पांचपट, फायदा होईल त्या प्रमाणानें, पांच हजारांपासून वीस हजार पावेतों फायद्याचा अंश त्यास मिळे.

हिंदुस्थानांत नोकरांनीं सदाचरणानें वागण्यासंबंधानें कंपनीकडून विशेष काळजी घेण्यांत येत असे. त्यांजकरितां मुद्दाम इकडे प्रार्थनामंदिरें बांधण्यांत आलीं. विलायतेहून सफर निघतांना ईश्वराराधना करण्यांत येत असे; तसेंच सफर सुखरूपपणें परत आल्यावर तिकडे आभारप्रदर्शक प्रर्थाना होत असत. हिंदुस्थानांत वगैरे बाहेर राहणाऱ्या मंडळीकरितां पुस्तकें व पाद्री पाठविण्यांत

येत. स. १६२३त पीट्रो ड ला व्हेल व स. १६३८त मंडेल्स्लो ह्यांहीं सुरत येथील इंग्रज वखारी प्रत्यक्ष पाहून, तेथील शिस्त व सदाचरण ह्यांविषयीं अनुकूल अभिप्राय व्यक्त केला आहे. दूर देशांत येऊन पडल्याबद्दल या मंडळीस अत्यंत दुःख होत असे. ते मद्यपान करीत, पण हिंदुस्थानच्या हवेस तें सोसत नसे. कांहीं व्यापारी फार चाणाक्ष व हुशार असून लढण्यांतही कांहीं कमी कुशल नव्हते. तथापि त्यांच्यांतील कित्येक दुराचारांबद्दल कंपनीस नेहमीं धाक वाटत असे. अमर्याद मद्यपान, उद्दाम वर्तन, मौल्यवान दागिने व भरजरी कपडे अंगावर घालण्याची हौस, रात्रीं बाहेर भटकणें, मंदिरांत प्रार्थनेच्या वेळीं हजर नसणें, इत्यादि अनिष्ट प्रकार त्यांच्यांत थोडेबहुत होते. पण ह्यांहीपेक्षां त्यांचा मोठा दुर्गुण म्हणजे जुगार होय. जुगारीच्या पायीं पुष्कळ इसम आपलें मातेरें करून घेत. दोन तीन वर्षांचा पगार दोन तीन तासांत उधळून देणें कांहीं लहान पाप नव्हे. एका गृहस्थानें एका रात्रींत दहा हजार रुपये जुगारींत घालविल्याचा दाखला सांपडतो. अशा व्यसनाबद्दल शिक्षा करण्यास कंपनीचे अधिकारी मागें पुढें पाहत नसत. पोर्तुगीझ अंमलांत जुगारीचे अड्डे कायद्यानें चालू होते, आणि त्यांपासून सरकारास वसूल मिळे. पण हा प्रकार इंग्रजांनीं स्वीकारिला नाहीं. सुरतच्या प्रेसिडेंटास नेहमीं दक्ष राहवें लागे. कोणी इसम वेळेवर वखारींत न येतां रात्रीं बाहेर भटकत राहिल्यास, त्यास वीस रुपये दंड द्यावा लागे. वीस रुपये म्हणजे सवा महिन्याचा पगार. प्रार्थनेस हजर नसल्यास रविवारीं अडीच रुपये व इतर दिवशीं सवा रुपया दंड असे; शपथ घेण्याबद्दल आठ आणे, व मद्यपानाबद्दल सवा रुपया दंड असे. परकीय इसमाशीं शिवीगाळ किंवा मारामार केल्यास दोन दिवस सक्तमजुरीची कैद असे. वखारींची व्यवस्था एखाद्या कुटुंबासारखी होती. कुटुंबाचा जसा एक चालक असतो, तसाच वखारीचा प्रेसिडेंट होता. कसूर व भलाई लिहून ठेवण्यासाठीं काळ पत्रक व पांढरें पत्रक अशीं दोन पुस्तकें नेहमीं वखारींत ठेवून, त्यांत वर्तनाबद्दल शेरे लिहून ठेवीत. मद्यपानामुळें हिंदुस्थानांत राहणाऱ्यांस मरण लवकर येई. तसेंच अनेक प्रसंगीं निरानिराळ्या रोगांनीं व साथींनीं कंपनीचे

हजारों लोक मृत्युमुखीं पडत. दर पांच वर्षांत सरासरीनें एकचतुर्थांश लाख मेले, असें त्या वेळच्या आंकड्यांवरून दिसतें.

**७. खासगी व्यापाऱ्यांची बंडाई.**—वर सांगितलेंच आहे कीं पगारा-शिवाय इतर बाबतींत पैसे मिळविण्याची सवलत कंपनीच्या मंडळीस आरंभा-पासून देण्यांत आली होती. ह्याचा परिणाम मात्र हितकर झाला नाहीं. नोकरांचा पगार हा उगाच आधार होय. वास्तविक हात मारणें दुसरीकडेच आहे, असा ग्रह सर्व व्यापाऱ्यांचा आरंभापासून झालेला असे. आरंभींच्या बारा वर्षांत पृथक् भांडवलाची पद्धत चालू होती, तोंपर्यंत हा खासगी व्यापार मर्यादेंत होता. पण समाईक भांडवलाची पद्धत सुरू झाल्यावर, खासगी व्यापारास सुमार राहिला नाहीं. आरंभीं प्रत्येक गलबत परत आलें ह्मणजे तपासणी-कामदार डोव्हरच्या बंदरांत जाऊन, कंपनीच्या मालाची व लोकांच्या खासगी मालाची नोंद करीत, पण समाइक पद्धतीमुळें ही तपासणी पुढें बंद झाली, तेव्हां तर खासगी व्यापार कळसास पोंचला. कोणकोणत्या जिनसाचा खासगी रीतीनें लोकांनीं व्यापार करावा, त्यांची यादी करण्यांत आली. तथापि खासगी व्यापारामुळें कंपनीचें अतोनात नुकसान होऊं लागलें तेव्हां काय-द्यानें हा खासगी व्यापार बंद करावा ह्मणून कंपनीची एकसारखी ओरड चालू होती. पहिल्या चार्ल्स राजानें ह्या कामीं कांहीं सक्तीचे इलाज केले. तथापि पुढें जेव्हां कंपनीचेच बारा वाजण्याची वेळ आली, तेव्हां ते इलाज लटपटले. स. १६०१त मिरीं वगैरे जमा करण्याकरितां म्हणून कांहीं थोडे असामी पूर्वे-कडील प्रदेशांत मागें राहिले होते, ते वाढतां वाढतां स. १६३०त १४० धनवान व्यापारी बनले. तिकडे इंग्लंडांत एका भांडवलाचा हिशेब पुरा करून, पहिल्याचे सगळे नोकर व सामानसुमान दुसऱ्या भांडवलाच्या माल-कांस विकले जाई. त्यामुळें इकडे हिंदुस्थानांत आलेल्या लोकांचे धनी वरचेवर बदलत, आणि त्या धन्यांत अनेक कलह असत. अशा स्थितींत ह्या नोकरांचें इकडे चांगलेंच फावे. नवीन भांडवलवाले कोणाकडून तरी आपलीं गलबतें भरून परत नेत, मग त्यांचे नोकर जे इकडे राहत ते सर्व वेळ रिकामे असून

त्यांजवर कोणाची देखरेख नसल्यामुळें, ते काय उद्योग करतात हें विचारणारा कोणी नसे. पुढें पुढें तर कंपनीस भांडवल मिळेनासें होऊन, दरसाल नवीन गलबतें बाहेर जाण्याचें बंद झाल्यामुळें, इकडे असलेल्या लोकांनीं रिकामें न बसतां, इकडच्या इकडेच बंदरोबंदरींचा व्यापार त्यांनीं सुरू केला. कंपनीचीं दहा वीस गलबतें नेहमींच इकडे असत, तीं घेऊन पोर्तुगीझ लोकांप्रमाणेंच ई. इं. कंपनीच्या नोकरांनीं आपल्या तुंबड्या भरण्यास सुरुवात केली. त्यांस कंपनीचे डायरेक्टर्स दंड करीत, तो मुकाट्यानें ते भरीत व आपला उद्योग चालू ठेवीत. स. १६३५त इंग्रज व पोर्तुगीझ ह्यांची गोडी झाल्यामुळें दोघांचेंही चांगलेंच फावलें. इंग्लंड व हॉलंड ह्यांचें वांकडें असतांही, खासगी रीतीनें इंग्रज व डच व्यापाऱ्यांचा धंदा एकसारखा चालू होता. इंग्लंडांतील कित्येक मंडळी ह्या बंडाळीकडे मुद्दाम कानाडोळा करी. कारण आपली पुढें हिंदुस्थानांत नेमणूक होऊन आपणांसही तोच प्रकार स्वीकारावा लागेल, ह्या आशेवर ते त्यांचा निषेध करीत नसत.

चार्लस राजा फांसावर चढला, त्या वेळेस व पुढें कांहीं दिवसपावेतों सर्व व्यापार राष्ट्रास मोकळा असावा अशी लोकांनीं उचल घेतली होती. त्या वेळेस तर ह्या खासगी व्यापाऱ्यांचें चांगलेंच पिकलें. कंपनीजवळ जर भांडवल नाहीं, तर लोकांनीं आपल्या मर्जीप्रमाणें कां वागूं नये असा गवगवा चालू झाला. त्याचा फायदा ह्या इकडच्या लोकांस चांगलाच मिळून खासगी व्यापार करण्याचा आपला हक्कच आहे असें प्रत्येक असामी समजूं लागला. जे कोणी नवीन लोक इंग्लंडांतून माल घेऊन इकडे येत, त्यांचे एजंट म्हणून हे इकडचे लोक त्यांस मदत करून आपली पिशवी भरीत. हा प्रकार दीडशें वर्षेपावेतों अव्याहत चालू होता. पोर्तुगीझ व डच ह्या राष्ट्रांची जी ओरड चालू होती, तोच अनिष्ट प्रकार इंग्लंडचाही असून, दीडशें वर्षेपावेतों कंपनीच्या डायरेक्टरांनीं होते तेवढे इलाज केले. आरंभीं पगार लहान होते, म्हणून लहान पगारांच्या भरतीसाठीं थोडीशी खासगी व्यापाराची सवलत देणें जरूर असल्यामुळें. पुढील अनिष्ट प्रकार सुरू झाला. पोर्तुगीझ लोक

लढाऊ जहाजें घेऊन व नेमिलेली कामगिरी सोडून खासगी व्यापार करूं लागत. एकदां पोर्तुगीझ आरमारावरील एका अंमलदारानें एका सरकारी गलबतांत आपला खासगी माल दुप्पट खचून भरल्यामुळें तें बुडालें; आणि दुसऱ्या गलबतांत स्वतः २४५०० रुपये मिळविले व त्याच सौद्यांत राजाचा फायदा त्यानें ७८० रुपये काढिला. असला प्रकार इंग्रजांनीं केला नाहीं. पहिल्या साठ वर्षांत व्यापारांत अपार संपत्ति मिळवून परत आलेले इंग्रज इसम दोनच होते असा दाखला मिळतो. मात्र त्यांचा कित्ता गिरविण्याचें बंद पाडण्यास त्या वेळीं अधिकाऱ्यांस सामर्थ्य नव्हतें. बँटम येथील इंग्रज एजंट हाताखालील मंडळीचा खासगी व्यापार बंद करण्याचा प्रयत्न करीत होता, त्यांसच त्या मंडळीनें कैद करून बंदीखान्यांत ठेविलें.

हिंदुस्थानांतील वखारींत कंपनीचीं गलबतें असत, त्यांशिवाय इंग्लंड-हिंदुस्थानच्या दरम्यान फिरत्या सफरींवरही पुष्कळ गलबतें होतीं. स. १६०० पासून पहिल्या दहा पांच वर्षांत जुनीं गलबतें विकत घेऊनच कंपनीनें काम चालविलें. त्यामुळें गलबतांच्या दुरुस्तीकरितां आरमार खात्यांतून एक गोदी त्यांनीं भाड्यानें घेतली. परंतु हीं युरोपांतलीं गलबतें हिंदुस्थानच्या सफरीस निरुपयोगी वाटल्यावरून, सन १६०७त कंपनीनें स्वतःचीं गलबतें बांधण्यास सुरुवात केली. त्यासाठीं लंडननजीक डेप्ट्फर्ड येथें त्यांनीं एक गोदी भाड्यानें घेतली. स. १६०९त जेम्स राजानें स्वतः येऊन कंपनीचीं पहिलीं दोन नवीन गलबतें चालू केलीं. गलबतें बांधण्याबद्दल सरकारांतून कंपनीस दर टनामागें पांच शिलिंग म्हणजे अडीच रुपये उत्तजन म्हणून मिळे. अशा रीतीनें चांगलीं मजबूद नवीन गलबतें बांधण्यांत आलीं, तेव्हांच पोर्तुगीझ किंवा डच ह्यांच्यापुढें कंपनीचा टिकाव लागला. पण अशा गल-बतांस खर्च फार येऊं लागला. पहिल्या चार्लसच्या वेळेस कंपनी जेव्हां डबघाईस आली, तेव्हां तर गलबतें बांधण्याचा प्रयत्न तीस सोडून द्यावा लागला; आणि पहिल्याप्रमाणें लोकांकडून गलबतें भाड्यानें घेऊन व्यापार करण्याची तिनें सुरुवात केली. क्रॉम्वेलची नवीन व्यवस्था झाल्यावर आणखी अनेक उपयुक्त फेरफार करण्यांत आले.

आरंभीं कंपनीचे सर्व व्यवहार गुप्त चालत. हिशेब गुप्त ठेवण्यांत येऊन आपलें कसें चाललें आहे हें लोकांस कळूं न देण्याची खबरदारी घेण्यांत येत असे. शिवाय व्यापाराच्या कामांत इतक्या भानगडी उत्पन्न होत, कीं त्या वेळच्या हिशेबाच्या पद्धतीनें त्यांचा निकाल लागत नसे. अमुक एक गलबत भरून माल आला त्यावर मालकी कोणाची, अथवा हिंदुस्थानांत अमुक कर्ज देणें आहे तें कोणीं द्यावयाचें, असल्या प्रश्नांचे निकाल सुद्धां हिशेबांच्या कागदांवरून होत नसत. त्यांच्या व्यापाराची पद्धत डच लोकांच्या पेक्षां ज्यास्त चांगली होती, म्हणजे कित्येक इसमांस इंग्रज कंपनींत विशेष अधिकार होता. त्या वेळीं इंग्लंडांतील राजकीय घडामोडींचा परिणाम कंपनीच्या व्यापारावर फारच होत असे. क्रॉम्वेल मरण पावल्याची बातमी सुरतेस पोंचल्याबरोबर तेथील इंग्रजांनीं ठराव केला, कीं परत जातांना सर्व गलबतांनीं मिळून एकदम जावें; सेंट हेलेनास पोंचपर्यंत इंग्लंडच्या स्थितीची चांगली बातमी न कळल्यास, गलबतांनीं एकदम इंग्लंडांत न जातां, किनाऱ्याकिनाऱ्यानें बातमी ठर्वीत पुढें जाऊन, वेळ पडेल तसें वागावें. अशा प्रकारची सावधगिरी वारंवार ठेवावी लागे.

---

# प्रकरण अकरावें.

## मुंबईची स्थापना व कंपनीची भरभराट.

( स० १६५८-१६८८ ).

१. मुंबईची स्थापना. २. पहिले तीन गव्हर्नर.
३. कंपनीच्या नोकरांची राहणी. ४. व्यापाराची भरभराट व त्याची मीमांसा.

**१ मुंबईची स्थापना** ( स. १६६८ ).—हल्लींच्या मुंबई बेटांत पूर्वी अनेक लहान लहान बेटें होतीं. मोगलांच्या पूर्वी तें गुजराथच्या सुलतानाच्य

ताब्यांत होतें. पश्चिम किनाऱ्यावर पोर्तुगीझ लोक युद्धप्रसंग करीत, तेव्हां ते वारंवार ह्या बेटांत येऊन उतरत असत. कारण येथें गलबतांच्या सोयीच्या अनेक लहान लहान जागा होत्या. त्या वेळीं मुंबई बेट वसईच्या टापूंत मोडत असे. स. १५३४त वसईबरोबर तें पोर्तुगीझांच्या ताब्यांत गेलें, (पृ. १२० पहा). तेथील जमिनी पोर्तुगीझांनीं ठराविक साऱ्यानें लोकांस वांटून दिल्या. त्या वेळीं फक्त एका मुंबई बेटाचें उत्पन्न सुमारें १७०० रुपये सालाचें होतें. पोर्तुगीझ अंमलांत तेथची लोकसंख्या फारच थोडी ह्मणजे सुमारें दहा हजार होती. पोर्तुगाझ, एतद्देशीय क्रिस्ती, थोडे ब्राह्मण, प्रभु, कोळी, भंडारी, कुणबी, कोंकणी मुसलमान वगैरे निरनिराळ्या जातींचे लोक त्या वेळीं मुंबईंत राहत असत. पारशी मागाहून आले. पोर्तुगीझांनीं तेथें क्रिस्ती धर्माचा प्रसार झपाट्यानें केला. धर्माच्या भानगडींत न पडतां केवळ व्यापाराच्या कामीं पोर्तुगीझांनीं मुंबई बेटाचा उपयोग केला असता, तर त्या राष्ट्रानें महत्व लवकर नाहींसें झालें नसतें. परंतु धर्मवेडाच्या भरांत सर्व बेट त्यांनीं आपल्या मंदिरांनीं भरून टाकिलें. क्रिस्ती पाद्र्यांच्या तावडींतून कांहींच उरत नसे; पाद्र्यांचाच ताबा सर्व बेटावर झाला. हिंदूंचा व मुसलमानांचा यांनीं अतोनात छळ केला. हा छळ करण्यांत जेझुइट पंथाचे लोक अग्रगण्य होते. ह्मणूनच पोर्तुगीझांच्या अमलांत मुंबईची भरभराट झाली नाहीं.

तथापि स्वराज्यसंरक्षणास ह्या बेटाचा चांगला उपयोग होणारा आहे, हें पोर्तुगीझांसही माहीत होतें. इंग्रजांस तर मूळपासूनच त्याचा लोभ सुटला. स. १६६०त दुसरा चार्लस राजा इंग्लंडच्या गादीवर आला. राष्ट्रानें त्याच्या बापाचा शिरच्छेद केला होता, तरी ह्या नवीन राजावर राष्ट्राचें प्रेम भरपूर होतें. त्याचप्रमाणें कंपनीही त्यास देवाप्रमाणें भजत असे. कंपनीकडून त्यास अनेक मोठ्या देणग्या मिळत. शिवाय प्रसंग पडे तव्हां कर्जही मिळे. एकंदर कारकिर्दींत ह्या राजास कंपनीकडून सतरा लाख रुपये कर्ज म्हणून पोंचलेले आहेत. राजाही कंपनीस वेळोवेळीं साह्य करून तिच्या अडचणी दूर करी. त्याच्या कारकिर्दींत एकंदर पांच नवीन सनदा व पुष्कळ नवीन अधिकार

कंपनीस मिळाले. चार्ल्स राजा गादीवर आला, तेव्हां व्यापारापलीकडे दुसरा अधिकार कंपनीस नव्हता. पण नाणें पाडणें, किल्ले बांधून त्यांतील लोकांवर हुकमत बजावणें, युरोपियन व इंडियन फौज बाळगणें, दारूगोळा वगैरे सामान इंग्लंडांतून बाहेर नेणें, पाहिजे तितके इंग्लंडांतले लोक बाहेर नेणें, बाह्य देशांत युद्ध किंवा तह करून नवीन संबंध जोडणें, इत्यादि अधिकार जे नेहमीं राजानेंच वापरावयाचे, ते त्यानें कंपनीस दिले. शिवाय पोर्तुगीझ, डच वगैरे परशत्रूंचा व कंपनीच्या विरुद्ध उद्योग करणाऱ्या अनेक इंग्रज गृहस्थांचा बंदोबस्त करण्यांत राजापासून कंपनीस उपयोग होत असे. उलट पक्षीं राजावर अनेक कठीण प्रसंग आले, त्यांत कंपनीचा त्यास चांगला उपयोग झाला. दुसरा चार्ल्स राजाचा ओढा फ्रान्सकडे असून हॉलंडाविरुद्ध त्याची खटपट चालू होती. परंतु इंग्रज राष्ट्रास फ्रान्ससारख्या रोमन कॅथोलिक राष्ट्राचा स्नेह नको होता; त्यांस प्रॉटेस्टंटधर्मी डच लोकांशीं मैत्री पाहिजे होती. पण चार्ल्स अंतर्यामीं प्रॉटेस्टंट धर्माविरुद्ध असल्यामुळें, फ्रान्सच्या राजाशीं त्याची गुप्त मैत्री होती. ह्या कामीं कंपनीचा रोखही राजासारखाच होता. अंबोयनाच्या कत्तलीपासून डच लोकांशीं कंपनीचें हाडवैर जुंपलें होतें, तें ह्या इंग्रज कंपनीच्या मनांत अजूनही एकसारखें सलत होतें. ह्मणून इंग्रज राष्ट्राची परवा न करितां कंपनी राजाच्या बाजूची झाली. ह्याबद्दल पुढें कंपनीसही अद्दल घडल्याशिवाय राहिली नाहीं. दुसऱ्या चार्ल्स राजाचीं पहिलीं कृत्यें क्रॉम्वेलच्या विरुद्ध असल्यामुळें त्यानें स. १६६१त क्रॉम्वेलनें दिलेली कंपनीची सनद रद्द केली, आणि एलिझाबेथ व पहिला जेम्स ह्यांच्या सनदा जमेस धरून त्या धोरणानें नवीन सनद कंपनीस करून दिली. तथापि भाषेच्या फरकापलीकडे क्रॉम्वेलनें ठरविलेली व्यवस्था चार्ल्सला मोडतां आली नाहीं. कंपनीच्या व्यवस्थापकांत राजानें आपल्या मर्जीतील लोकांचा मात्र समावेश करून घेतला, आणि त्यांस मान्यतेच्या पदव्या दिल्या. तसेंच दरएक सफरीस तीन लक्ष रुपयांपर्यंत रोख पैसा बाहेर नेण्याची क्रॉम्वेलनें कंपनीस परवानगी ठेविली होती, ती राजानें पांच लक्षांपर्यंत वाढविली.

डच लोकांचें भांडण चालूच होतें. त्यांत भर पडण्यास आणखी कारणें झालीं. चार्लस वा भाऊ जेम्स ह्यानें आफ्रिकेच्या किनाऱ्यावर व्यापार करण्याकरितां नवीन कंपनी स्थापिली. त्या कामींही डच लोकांपासून इंग्रजांस त्रास होऊं लागला. इकडे पोर्तुगीझ लोकांना सुद्धां डच लोकांपासूत अतोनात उपद्रव होत होता. त्यांचा बंदोबस्त करण्याकरितां पोर्तुगीझांनीं इंग्रजांचा आश्रय केला. तसेंच पश्चिम किनाऱ्यावर इंग्रजांचा पाया गोवला गेल्यास, तेथून डच लोकांचा प्रतिकार करण्यास आपणास इंग्रजांची मदत होईल ह्या हेतूनें, ता. २३ जून स. १६६१ रोजीं पोर्तुगालच्या राजानें इंग्लंडचा राजा दुसरा चार्लस ह्याच्याशीं लंडन येथें तह केला. पोर्तुगीझ राजाची मुलगी कॅथरीन चार्लसला द्यावी, आणि मुंबई व आजूबाजूचीं बेटें हीं लग्नाचें आंदण ह्मणून कायमचीं इंग्लंडच्या राजास द्यावीं, असें ठरून लग्न झालें. ह्यानंतर पूर्वेकडील व्यापाराच्या संबंधांत डच व इंग्रज ह्यांचें पुनरपि युद्ध जुंपलें (स. १६६५–६७). ह्या युद्धासाठीं पार्लमेंटानें पाण्यासारखा पैसा खर्च केला, तरी इंग्लंडास यश आलें नाहीं. हिंदुस्थानांत त्या वेळीं मोगल बादशहा औरंगजेब ह्यानें ह्या उभय राष्ट्रांस आपल्या देशांत लढण्याची मनाई केल्यामुळें, इंग्रजांस बरें झालें, नाहीं तर, इकडेही कंपनीचा पाडावच झाला असता. पण ज्या ठिकाणीं मोगल बादशहाचा अंमल नव्हता, तेथें डच लोकांचीच सरशी होऊन, कालिकोट, कोचीन, पुलरून वगैरे ठिकाणें डच लोकांनीं काबीज केलीं. तेव्हा युद्ध सुरू होण्याच्या पूर्वी, मसाल्यांच्या बेटांत जशी आपली स्थिति झाली, तशीच हिंदुस्थानांतही होते कीं काय, अशी भीति सुरतच्या इंग्रज प्रेसिडेंटास पडली. लवकरच डच युद्धाचा शेवट होऊन स. १६६७त युरोपांत ब्रेडा येथें तह झाला. त्यानें पूर्वद्वीपसमूहांतील सर्व ठिकाणांवर डच वर्चस्व कायम झालें; आणि इंग्रजांनीं तिकडून आपला पाय सर्वस्वी काढून घेतला. ह्याप्रमाणें ह्या युद्धांत चार्लस राजास अपयश येऊन तो त्रासून गेला. मुंबई बेट त्यास नकोसें झालें. आंदण मिळतांच तें ताब्यांत घेण्याकरितां त्यानें स. १६६२त पांच जहाजें पाठविलीं होतीं, त्या वेळीं चारशें इंग्रज लोक मुंबई बेट ताब्यांत घेण्याकरितां राजानें पाठविले, त्यांचा दुखण्यानें वगैरे फडशा होऊन, तीन वर्षांनीं ९७

लोकांचा पाय मुंबईस लागला. पांच वर्षांत राजा चार्ल्सनें मुंबईस तीन गव्हर्नर पाठविले. तीनही नालायक, भांडगे व आपमतलबी होते.

पुढें मुंबई बेट व बंदर ह्यांत, ठाणें व साष्टी ह्या ठिकाणांचा समावेश होतो कीं नाहीं, ह्याबद्दल हिंदुस्थानांत पोर्तुगीझ व इंग्रज ह्यांमध्यें वाद उपस्थित झाला. ठाणें व साष्टी तर त्या वेळीं इंग्रजांच्या ताब्यांत आलींच नाहींत. मुंबई बेट ताब्यांत आलें, त्याचा राजास कांहीं उपयोग झाला नाहीं. विनाकारण त्यास खर्च मात्र फार येऊं लागला. सुरतचे इंग्रज व गोव्याचे पोर्तुगीझ ह्यांमध्यें नसतें वितुष्ट येऊन मराठे व मोगल ह्यांच्या स्वाऱ्यांपासून आपला बचाव करणें दोघांसही कठीण पडूं लागलें. तेव्हां मुंबईची ही ब्याद अंगावरून काढून टाकावी असें राजाचे मनांत आलें, आणि 'तुम्हांस मुंबई पाहिजे असेल तर बोला.' असें त्यानें कंपनीस प्रथम विचारिलें. कंपनीचा डोळा मुंबईवर होताच. स. १६६४त शिवाजीनें सुरतेवर स्वारी केल्यापासून तेथें इंग्रजांस आपल्या बचावाची धास्ती पडूं लागली होती. मोगलांकडून त्यांस हवा तसा आश्रय मिळत नव्हता, आणि अनेक शत्रूंशीं झगडण्यांत त्यांच्या शक्तीचा अपव्यय होई. तेव्हां सुरत सोडून मुंबईस गेलें असतां ह्या सर्व त्रासापासून आपली सुटका होईल असें सुरतकरांस वाटलें. मुंबईचा बंदोबस्त केल्यानें सर्व किनाऱ्यावर व परदेशांत कंपनीस आपला वचक बसवितां येणारा होता. डच व पोर्तुगीझ ह्यांजवर नजर ठेवण्यासाठीं व बंदरोबंदरींच्या व्यापारासाठीं मुंबई बेट इंग्रज व्यापाऱ्यांस उपयोगी होतें. तें मोगलांच्या हद्दीबाहेर असल्यामुळें, तेथें चांगली तटबंदी करून आपली मजबुदी करण्यास कंपनीच्या फार सोयीचें होतें. शिवाय ते बेट मिळविण्याविषयीं स. १६२६ पासून कंपनीचे प्रयत्न चालू होते. सुरतच्या काऊन्सिलच्या गलबतें वसई येथें बांधलीं जात असत. स. १६५२–५३त मुंबई व वसई हीं दोनही ठिकाणें पोर्तुगीझांपासून विकत घेण्याचा कंपनीचा उपक्रम चालू होता. पुढें स. १६६६त चार्ल्सनें तें बेट विकत घ्या ह्मणून कंपनीस सांगितलें, तेव्हां तें आपणास स्वस्तांत पडावें ह्मणून, 'आह्मांस मुंब-

ईचा कांहीं एक उपयोग नाहीं. आह्मांस तें नको, त्यामुळें उगाच आमचा खर्च मात्र वाढेल, ' असें बाह्यात्कारी ढोंगी बोलणें कंपनीनें राजास कळविलें. शेवटीं दरसाल दहा पौंड ह्मणजे शंभर रुपये भाड्यादाखल कंपनीनें राजास द्यावे, अशा करारानें मुंबई बेट हवालीं करण्याचा हुकूम स. १६६७ ता. २३ सेप्टेंबर रोजीं राजानें सोडिला.

हा हुकूम ता० १ सेप्टेंबर स. १६६८त सुरतेस पोंचला. तेथचा गव्हर्नर ऑक्झेंडन ह्यानें गूडियर ( Goodyer ) ह्यास मुंबईस पाठवून, राजाचा कामगार गॅरी ( Gary ) याजकडून बेटाचा ताबा घेवविला. सर स्ट्रेन्शॅम् मास्टर हा गूडियरबरोबर होता. नंतर स्वतः ऑक्झेंडननें मुंबईस जाऊन नवीन नियम वगैरे केले, आणि आपले कामगार नेमिले. ऑक्झेंडन लवकरच मरण पावल्यामुळें पुढील व्यवस्था ऑंजियरनें केली. मुंबईचें बंदर उत्कृष्ट आहे, ती आपल्या सत्तेची जागा असल्यामुळें तेथें मोगलांचा उपद्रव होणें शक्य नाहीं, इत्यादि फायदे कंपनीच्या अधिकाऱ्यांच्या तेव्हांच लक्षांत आले.

कंपनीच्या ताब्यांत मुंबई बेट आलें तेव्हां तेथची लोकसंख्या दहा हजारांपेक्षां ज्यास्त नव्हती. सुरतेचा प्रेसिडेंट ऑंजिअर हाच मुंबईचा गव्हर्नर व कमांडर-इन्-चीफ झाला. त्यानें तें स्थळ सुधारण्याकरितां अनेक उपाय केले. पोर्तुगीझांनीं चालविलेला धर्मच्छल त्यानें बंद केला; व्यापाराच्या सोयी नवीन करून राज्यकारभाराची व्यवस्था लावून दिली, टांकसाळ घातली व तटबंदी केली. लंडन शहर त्या वेळीं नुकतेंच म्हणजे स. १६६६त जळून खाक झालें होतें, तें पुनः बांधण्यासाठीं जे नकाशे व नियम करण्यांत आले, तेच कंपनीनें हिंदुस्थानांत मुंबई शहरासाठीं पाठवून दिले. राजाचे थोडे लोक मुंबईस होते, तेच मुंबईची पहिली संरक्षक फौज होत. त्या इंग्रजांस कांहीं शर्तीवर मुंबई येथें घरें करून सुखवस्तु राहण्याची परवानगी देण्यांत आली. शिवाय इंग्लंडांतल्या वीस सदाचारी बायका मुंबईस आणून, प्रॉटेस्टंटधर्मी इंग्रज पुरुषांशीं त्यांचीं लग्नें करून, मुंबईस वसाहत करावी असें ठरलें. तीन वर्षांत मुंबईची वसाहत बरीच वाढली. मुंबईत राहून डुकरें व खबुतरें

पाळण्याचा कित्येक इंग्रजांस मोठा नाद लागला. आरंभीं एक दोन वर्षांचे पगार आगाऊ देऊन कंपनीनें कित्येक कारागीर मुंबईस आणिले. तसेंच बाहेरचे कोष्टी लोक मुद्दाम मुंबईस आणून, त्यांस आपल्या कोठारांतून कापूस देऊन कापड विणून घेण्याची सोय केली. गोव्यास पायमोजे विणीत असत, तें काम जाणणारे कारागीर मुंबईस आणिले. हे कापसाचे पायमोजे विलायतेस चांगले खपत. सुरतेहून श्रीमंत वाणी व व्यापारी मुद्दाम सवलती देऊन मुंबईस आणिले. त्यांत दीवचा निमा पारख प्रमुख होता. तो प्रथम आला तेव्हां त्यास कोणताही त्रास न देतां, व्यापार, धर्म व व्यवहार वाटेल तसा करण्याची लेखी हमी दिली. सारांश, सर्व बाजूंनीं ती जागा सुधारण्याचा कंपनीनें झपाट्यानें प्रयत्न केला. सुरतचे एतद्देशीय व्यापारी मुंबईस येण्यास कबूल नव्हते. सुरतच्या प्रेसिडेंटावर त्यांना भरंवसा नव्हता. इंग्लंडांतून कंपनीच्या मुख्य कोर्टामार्फत संरक्षणाचें अभिवचन मिळेल, तरच आपण निघून मुंबईस येऊं असें ते ह्मणत. मुंबईची हवा त्या वेळीं अतिशय खराब होती. जिकडे तिकडे खाजणें असून महामारी व ताप ह्यांच्या योगानें लोक पटापट मरत. पांच वर्षांत पांचशें लोकांपैकीं चारशें युरोपियन लोक मेले. स. १६७५त चार महिन्यांत १०० सोल्जर्स मेले. तेथें कामावर जाण्यास कोणी धजत नसे. पोटदुखी, आमांश, व ताप हे मुख्य विकार होते. पण ह्या सर्व रोगांचा विकोप होण्याचीं कारणें त्या लोकांचें अमर्याद मद्यप्राशन व व्यभिचार हीं होत.

शिवाय ऑंजिअर मरण पावल्यावर, अंतस्थ कलह, युद्धें, इकडील व्यापाराकरितां निरनिराळ्या कंपन्यांचीं भांडणें; मोगल, मराठे, आंग्रे, जंजिऱ्याचे सीदी, आरब, इत्यादिकांनीं केलेला उपद्रव, ह्या कारणांनीं पुढील पन्नास वर्षांत मुंबईची अतिशय दुर्दशा होऊन, मुंबईची लोकसंख्या साठ हजारांवरून स. १७१८त सोळा हजारांवर आली. मुंबईत जिकडे तिकडे खाड्या व चिखल असे. कुलाब्यापासून माहिमपर्यंत लहान लहान सात बेटें असून मध्यें खाड्या होत्या. हल्लींच्या पायधुणीजवळ एक खाडी होती, तींत पाय भिजवून गेल्याशिवाय मुंबादेवीचें

दर्शन होत नसे, म्हणून त्या जागेस पायधुणी हें नांव होतें. तसेंच उमरखडी, भेंडी बाजार हे हल्लींचे भाग त्या वेळीं पाण्यांत होते. हल्लींच्या कामाठीपुऱ्यांत पूर्वी होड्या चालत असत. मुंबईची हवा वाईट असून त्यांत आणखी मद्य व व्यभिचार ह्या व्यसनांची भर पडल्यामुळें, लोकांत मृत्यूचा सपाटा चालत असे. स. १६७५त मुंबईचें एकंदर उत्पन्न सुमारें एक लाख रुपये होतें.

मुंबईच्या या वसतीसंबंधानें थोडें ज्यास्त स्पष्टीकरण करणें जरूर आहे. इंग्लंडच्या प्रत्यक्ष मालकीचें हिंदुस्थानांतलें पहिलें ठिकाण मुंबई होय. दुसरीं कित्येक ठिकाणें कंपनीच्या ताब्यांत होतीं, पण तीं थोडीं बहुत एतद्देशीय राजांच्या मर्जीवर अवलंबून होतीं. त्या वेळीं औरंगजेब बादशहानें ह्या युरोपियन लोकांच्या हालचालींकडे लक्ष दिलें नाहीं. उलट बादशहाची ही हेळसांड हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यास कशी बाधक झाली हें ह्या मुंबईच्या वृत्तांतांत दिसून येते. औरंगजेबासारख्या शहाण्या, कर्तृत्ववान, व एवढ्या मोठ्या राज्याच्या मालकानें पोर्तुगीझ, डच व इंग्रज ह्यांचा संचार आपल्या किनाऱ्यावर अव्याहत चालूं दिला; त्यांची मुळांत शक्ति काय आहे, त्यांचे डावपेंच कसे आहेत, त्यांच्या उद्योगाचा पुढें काय परिणाम होईल, हें समजून घेण्याचा प्रयत्न करणें बाजूस ठेवून त्यांजकडे त्यानें संपूर्ण डोळेझांक केली, ही त्याची मोठी चूक होय. आरमारा संबंधाने पाहिलें तरी आरबांनीं शंभर वर्षे पोर्तुगीझांशीं समुद्रावर सारखा झगडा चालविला होता. ही मुसलमान जातभाईच्या पराक्रमाची गोष्ट औरंगजेबास कळली नसेल हें शक्य नाहीं. आरबांस मोगल बादशहांनीं पैशाची व इतर मदत केली असती, तर त्यांच्या करवीं पोर्तुगीझ वगैरे पाश्चात्य राष्ट्रांचा आपल्या आरमारानेंच बंदोबस्त करणें अशक्य नव्हतें. ही गोष्ट तर बाजूस राहिली. उलट पक्षीं, विजापुर व गोवळकोंडा येथील मुसलमानी राज्यें बुडवून त्यांचा ह्या युरोपियन राष्ट्रांस पूर्व व पश्चिम किनाऱ्यावर जो थोडाबहुत धाक होता, तोही औरंगजेबानें नाहींसा केला. पोर्तुगीझ लोक इंग्रजांस मुंबई बेट देतात, मुंबईस इंग्रज लोक आपलें आरमार बळकट करितात, तेथें तटबंदी करून ते आपला पाय पश्चिम किनाऱ्यावर कायमचा

रोंवितात, आणि तेणेंकरून सुरत वगैरे ठिकाणच्या प्रत्यक्ष मोगलांसही ते आपला धाक दाखवितात; हा सर्व प्रकार डोळयांनीं पाहण्याइतका नजीक म्हणजे दक्षिणेंत बादशहा पंचवीस वर्षे राहतो, आणि त्यांचा प्रतिकार करण्याऐवजीं उलट त्यांस सवलती व उत्तेजन देतो, ह्याचें प्रायश्चित त्याच्या वंशास मिळाल्या शिवाय राहिलें नाहीं. हिंदी व मुसलमान आरमाराची हकीकत पुढें प्रसंगानें येणार आहे, त्यावरून असें दिसून येईल, कीं मोगल बादशहांनीं ठिकठिकाणीं स्वतःचें आरमार ठेविलें असतें, तर पाश्चात्यांचा बंदोबस्त त्यांस करितां आला असता. इतर उद्योगांप्रमाणें आरमाराचा धंदा सुद्धां पूर्वीपासून हिंदी लोकांच्या सवयीचा होता हें निर्विवाद आहे. ( मुंबई गॅझेटियर,-व्हॉ. १, गुजराथचा इतिहास. )

मुंबईस पाय रोंवल्यावर, तेथपासून थेट इंग्लंडपावेतों किनाऱ्या किनाऱ्यानें आपला मार्ग शाबूद ठेवण्याचा इंग्रजांनीं केलेला उद्योग धूर्ततेचा आहे. आफ्रिकेचें दक्षिण टोंक केप आफ् गुडहोप प्रथम पोर्तुगीझांच्या ताब्यांत होतें, तें स. १६५२त डच लोकांनीं काबीज केलें. स. १६०३त कॅप्टिन लॅंकॅस्टर यानें सेंट हेलेना बेटावर आपला पाय रोंविला होता, पण तेंही स. १६८५त डच लोकांनीं काबीज केलें आणि तेथें वसाहत करण्याचा सात वर्षे प्रयत्न करून तो निष्फळ झाल्यावर, डच लोक निराश होऊन केप येथें गेले. पुढें डच व इंग्रज यांजमध्यें कैक वर्षे झटापटी होऊन अखेरीस १६७३त सेंट हेलेना बेट इंग्रजांस मिळालें. अशा रीतीनें तें ई. इं. कंपनीच्या ताब्यांत आलें. मुंबईप्रमाणेंच सेंट हेलेनाच्या वसाहतीचे सर्व अधिकार राजानें कंपनीस दिले, आणि मुंबई व सेंट हेलेना हीं दोन ठिकाणें इंग्लंडच्या आग्नेयीकडील केंट परगण्यांत नांवानें तरी सामील केलीं. सेंट हेलेना येथें इंग्रज गलबतांस मध्य उताराची कायमची जागा झाली. केप कॉलनी मात्र स. १८०६ पावेतों इंग्रजांच्या ताब्यांत आली नाहीं.

दुसऱ्या चार्लस राजाचें कंपनीस चांगलें पाठबळ होतें, आणि कंपनीही पूर्णपणें त्याच्याच तंत्रानें वागत असे. तथापि कंपनीच्या कारभारांत अन्य

कारणांनीं पुष्कळ बखेडे झाले. क्रॉम्वेलनें जी व्यवस्था केली तीत त्यानें आपल्या तर्फेचे कामगार हिंदुस्थानांत पाठविले, ते बहुतेक प्युरिटन पंथाचे होते परंतु चार्ल्स गादीवर आल्यावर तें पारडें फिरलें, आणि राजा आपले नवीन रोमन कॅथोलिक कामगार हळूहळू पाठवूं लागला. ह्या करण्यांत प्युरिटन पंथाचा पाडाव करण्याचा त्याचा मुख्य हेतु होता. फ्रान्स व हॉलंड ह्या राष्ट्रांशीं चार्ल्स राजाचे जे व्यवहार चालू होते, ते इंग्रज राष्ट्रास पसंत नव्हते. परंतु वर्दळीस न येतां दोनही पक्ष कसेबसे निभाव करून राहत होते. कंपनीचा गव्हर्नर दोन वर्षांहून ज्यास्त कामावर राहूं नये असा नवीन नियम झाल्यामुळें, कंपनीच्या कारभारांत धरसोड उत्पन्न झाली. तिचा परिणाम मुंबई व सेंट हेलेना येथील वसाहतींवर झाला.

स. १६६८त मुंबई बेट कंपनीच्या ताब्यांत आलें तेव्हां तेथील इंग्रज फौजेचा मुख्य अंमलदार कुक ह्यानें बराच बखेडा केला. पुनः स. १६७४त सर्व इंग्रज शिपायांनीं बंडावा केला, तो मोडण्यासाठीं कडक शिक्षा कराव्या लागल्या. पुढें १६८३त रिचर्ड केग्विन नांवाच्या आरमारावरील एका अधिकाऱ्यानें मुंबईच्या डेप्युटी गव्हर्नरास कैद करून सर्व कारभार आपल्या ताब्यांत घेतला. त्यानें राजाच्या नांवानें जाहीरनामा काढून, आपण राजाचा मान राखीत आहों आणि बंडखोर कंपनीस शासन करीत आहों, असें जाहीर केलें. अशा रीतीनें एक वर्षभर त्यानें वाटेल तसा दंगा केल्यावर, कंपनीचा अधिकार अगदींच बुडतो कीं काय असें लोकांस वाटूं लागलें. सुरतेच्या अधिकाऱ्यासही कैद करण्याचा केग्विनचा इरादा होता; पण चार्ल्स राजानें स्वदस्तूरचा हुकूम पाठवून केग्विन यास पकडिलें. पुढें त्यास माफी देण्यांत आली. मद्रासेसही अशाच प्रकारचा दंगा स. १६६५ पासून तीन वर्षेंपावेतों चालू होता. इकडे सेंट हेलेना येथें स. १६७३ पासून ८४ पावेतों नानातऱ्हेचे दंगे इंग्रज रहिवाश्यांत व तेथच्या अधिकाऱ्यांत चालू होते. अशा घालमेली चालू असतां दुसरा चार्ल्स राजा स. १६८५त मरण पावला, आणि त्याचा भाऊ दुसरा जेम्स गादीवर आला. जेम्सच्या कारकिर्दींत सर्व बंडखोरांस कडक शिक्षा करण्यांत आल्या.

२. **मुंबईचे पहिले तीन गव्हर्नर.**—मुंबईस नवीन ठाणें इंग्रजांनीं बसवून तेथें आपला बंदोबस्त केला, ही गोष्ट डच लोकांस रुचली नाहीं. ह्यापूर्वी इंग्लंडचा प्रत्यक्ष मालकीचा मुलूख पूर्वेकडे नव्हता. असा मुलूख काबीज करण्याची पद्धत डच लोकांचीच होती, ती आतां इंग्रजांनीं उचलली. आरंभींच्या अनेक अडचणींतून कंपनीचा निभाव लागला, ह्याचें कारण त्या वेळच्या हिंदुस्थानांत आलेल्या दोन तीन अधिकाऱ्यांचें शहाणपण होय. राज्य करण्याचें कसब त्यांस शिकावें लागलें आणि ते ते शिकले. स. १६६२ पासून १६९० पर्यंत सुरतेस तीन प्रेसिडेंटांनीं कारभार केला.—पहिला सर जॉर्ज ऑक्झेंडन ( Oxenden ), दुसरा जरल्ड ऑंजियर (Aungier), व तिसरा सर जॉन चाइल्ड.

**सर जॉर्ज ऑक्झेंडन** ह्याचा जन्म स. १६२०त झाला. क्रॉम्वेलच्या वेळेस तो कंपनीच्या नोकरींत शिरला. दुसरा चार्लस गादीवर आल्यावर सन १६६२त त्यास सर ही पदवी व सुरतेच्या प्रेसिडेंटाची जागा मिळाली. त्याचा सालाचा पगार आठ हजार रुपये असून, दोन हजार रुपये बक्षिस म्हणून ठरविलेले होते. तो सुरतेस आला, तेव्हां शिवाजीचा उदय होऊं लागला होता. सन १६६४त शिवाजीनें सुरतेवर स्वारी केली, तेव्हां ऑक्झेंडननें इंग्रज वखारीचें संरक्षण केलें, त्याबद्दल औरंगजेबानें त्यास बहुमानाचा पोषाख दिला आणि कंपनीनेंही बक्षीस दिलें. स. १६६८त मुंबई बेट ताब्यांत घेऊन तेथें दिवाणी व लष्करी कायदे सुरू करून आक्झेंडननें व्यवस्था लाविली. तो धीट व हुशार असून हिंदुस्थानांत इंग्रजी राज्य स्थापण्यास त्यानें बरीच मदत केली आहे. ई.इं. कंपनीचें लष्कर हिंदुस्थानांत होतें त्याची मूळ स्थापना ऑक्झेंडननें केली. तो स. १६६९त सुरत येथें मरण पावला. तेथें त्याची कबर बांधिलेली आहे. मुंबई बेट ताब्यांत आल्यावर तेथें गलबतें बांधण्याचा मोठा कारखाना काढण्याचा कंपनीचा विचार असून दोन गलबतें बांधण्याचा हुकूमही ऑक्झेंडन ह्यास आला होता. पण क्रॉम्वेलच्या नॅव्हिगेशन ॲक्टाप्रमाणें परदेशांतून इंग्लंडांत येणारा माल, इंग्लंडांत तयार झालेल्या गलबतांतूनच आला पाहिजे, असा निर्बंध

असल्यामुळें, मुंबईस गलबतें बांधण्याचा विचार कंपनीच्या अंमलदारांस सोडून द्यावा लागला.

पुढें **जरल्ड ऑंजियर** ह्यानें स. १६६९ पासून १६७७ पर्यंत सुरतेच्या प्रेसिडेंटचें काम केलें. मुंबईचा संस्थापक हाच होय. ह्यानें मुंबई हें गलबतांचें व व्यापाराचें मुख्य बंदर केलें; आणि तेथें वखारींच्या व वसाहतीच्या बचावासाठीं तट बांधिला. मुंबईच्या सर्व रहिवाशांस शहराच्या संरक्षणार्थ लढण्याची फरज त्यानें ठेविली. मात्र ब्राह्मण व वाणी ह्यांनीं स्वतः न लढतां कांहीं रकम द्यावी अशी सवलत ठेविली. ह्याप्रमाणें ६०० एतद्देशीय व ४०० युरोपियन शिपायांचें लष्कर तयार करून त्यांजवर ऑंजियरनें इंग्रज अधिकारी नेमिले. आणि त्यांच्या सेनापतीस कौन्सिलचा सभासद केलें. स. १६७३त डच लोकांनीं मुंबईवर हल्ला केला, तेव्हां ऑंजियरची व्यवस्था कसास लागली. डच लोक मुंबईची जय्यत तयारी पाहून घाबरून पळून गेले. ऑंजियरनें मुंबईस टांकसाळ घालून तेथें हिंदुस्थानांतलीं नाणीं पाडण्याचा उपक्रम केला. ह्यांत त्यास चांगला फायदा होऊं लागला. मोगल व इतर अधिकाऱ्यांनीं अशीं नाणीं त्यास कां पाडूं दिलीं तें समजत नाहीं. मुंबई बेटावर अंमल इंग्रजांचा होता खरा, तथापि दुसऱ्या राष्ट्रांचीं नाणीं तेथें पाडण्यास त्यांस अधिकार पोंचत नव्हता. मोगल सरकारानें त्यांस त्याजबद्दल लेखी परवानगी दिली होती. मुंबईंतील उत्पन्नावर ऑंजियरनें शेतसारा ठरवून दिला, तो सर्व मिळून त्या वेळीं सालाचें उत्पन्न १६,६६० रुपये होतें. तसेंच एतद्देशीय व्यापाऱ्यांस व कारागिरांस नानाप्रकारच्या सवलती देऊन त्यानें मुंबईस आणिलें. त्यांजवर धर्मसंबंधीं जुलूम होऊं नये व गाई वगैरे मारून त्यांस दुखवूं नये, अशी त्यानें व्यवस्था ठेविली. एतद्देशीय लोकांपैकीं प्रत्येक जातीचे पंच नेमून त्यांनीं आपले खटले तोडावे, अशी परवानगी ऑंजियरनें विलायतेहून आणविली. ऑंजियरनें मुंबईची हवा सुधारून तेथें रोग्यांच्या शुश्रूषेकरितां दवाखाने बांधिले; एक मोठें प्रार्थनालय स्थापिलें; आणि पोलीसचीं व इनसाफाचीं कोर्टें निर्माण केलीं. मुंबईस विशेष त्रास आरबांचा होत असे. ह्या आरबांचीं गलबतें सर्व पश्चिम किना-

त्यावर पांच पांच मैलांच्या अंतरावर पसरलेलीं असल्यामुळें, युरोपियन गलबतांवर ते केव्हांच येऊन झडप घालीत. वास्तविक आरबी समुद्रावर आरबांचीच सत्ता अनादि कालापासून होती, हें त्या समुद्राच्या नांवावरूनही उघड दिसतें. ह्या समुद्रांत परक्यांचा संचार होऊं नये म्हणून आरबांनीं आटोकाट प्रयत्न केले. त्यांनीं स्वसंरक्षणार्थ शेकडों वर्षे जें निकराचें युद्ध केलें त्याचा इतिहास लिहून ठेवलेला नाहीं. तो उपलब्ध असता, तर शौर्य, साहस वगैरे गुणांचीं अनेक अप्रतिम उदाहरणें त्यांत सांपडलीं असतीं. अशा ह्या आरबांस इतिहासकार ' चांचे ' ह्या शब्दानें संबोधितात; आणि आरबी समुद्रावर पाश्चात्यांचाच ताबा पूर्वापार आहे असें भासवितात. मुंबईचें बंदर इंग्रजांनीं काबीज केलें हें आरबांस आवडलें नाहीं. ह्या आरब चांच्यांपासून मुंबईचें संरक्षण इंग्रजांच्या तोफांनीं केलें. इकडे शिवाजीच्या हल्यांपासून संरक्षण करण्याकारितां त्यांनीं स.१६७४त जॉर्ज ऑक्झेंडनचा मुलगा हेन्री ऑक्झेंडन ह्यास रायगडास पाठवून शिवाजीबरोबर तह केला. त्यांत शिवाजीनें इंग्रजांस पश्चिम किनाऱ्यावर वखारी घालण्यास व मालाची खरेदीविक्री करण्यास परवानगी दिली; आणि विलायतेहून आणिलेल्या मालावर शेंकडा अडीच टक्के जकात बसविली. ह्यांशिवाय जंजिऱ्याचे सीदी मोगल आरमाराचे अधिकारी होते, ते दरसाल पावसाळ्यांत मुंबईस येऊन राहत व मराठ्यांशीं लढत. त्यांजबरोबरही ऑंजियरनें सामोपचारानें वागून आपलें सख्य वाढविलें. हिंदु लोकांच्या सामाजिक व धार्मिक रीतीभाति ह्यांचा फायदा घेऊन आपलें राज्य वाढवितां येईल हें ऑंजियरच्या नजरेस आलें, आणि त्यानें तसा प्रयत्न सुरू केला. एतद्देशीय लोकांच्या ज्ञातींस कांहीं राजकीय हक्क देऊन त्यांस आपल्या अधिकाराखालीं आणण्याचा त्याचा विचार होता, पण तो विलायतेस मंजूर झाला नाहीं.

थोड्याच वर्षांत मुंबईची लोकसंख्या दहा हजार होती ती ६० हजार झाली; इंग्रजांचा वसूल तिप्पट वाढला; आणि हळूहळू सुरतेचें महत्त्व कमी होऊन मुंबईची भरभराट झाली. सुरत सोडून इंग्रजांनीं

मुंबईसच कायमचें यावें असें ऑंजियरच्या मनांत होतें, पण तें त्या वेळीं विलायतेंत कंपनीच्या कोर्टानें मंजूर केलें नाहीं. ऑंजियर हा स. १६७७त सुरत येथें मरण पावला. इंग्रजांची पश्चिम किनाऱ्यावर सत्ता कायम करणारा हाच पहिला पुरुष होय. 'त्याचा थोरपणा शब्दांनीं वर्णन करितां येत नाहीं,' असें कौन्सिलनें लिहिलें आहे. खालील मार्मिक उल्लेखावरून त्याची कर्तबगारी व्यक्त होते. 'एतद्देशीय सत्ताधीशांना कागदी दपटशा दाखवून कांहीं उपयोग नाहीं. हातीं तलवार घेऊनच आपला व्यापार चालविला पाहिजे. परमेश्वराच्या मनांत तुमच्यावर मोठी मेहेरबानी आहेशी दिसते. दुसऱ्या कोणत्याही युरोपियन राष्ट्रापेक्षां तुमचा पाया हिंदुस्थानांत ज्यास्त मजबूद झाला आहे ह्यांत संशय नाहीं,' असें त्यानें कंपनीस लिहून पाठविलें.

ऑंजियरनंतर स. १६७७–८२ पर्यंत रोल्ट ह्यानें प्रेसिडेंटाचें काम केलें. हा भित्रा असून गांगरून गेला. मुंबई बंदरांत निरनिराळ्या अनेक सत्ताधीशांनीं तळ दिला. मराठे व सीदी झगडूं लागले. खांदेरी व उंदेरी हे दोन किल्ले त्या दोघांनीं काबीज केले; आणि थोडा वेळ मुंबईस इंग्रजांची धडगत लागत नाहीं असा सुमार दिसूं लागला. पण नशिबानें स. १६८२त सर जॉन चाइल्ड ह्याची प्रेसिडेंटाच्या जागेवर नेमणूक होऊन त्यानें कंपनीची बाजू संभाळिली.

**सर जशुआ चाइल्ड** व **सर जॉन चाइल्ड** हे दोघे पराक्रमी बंधु दहा वर्षेंपावेतों अनुक्रमें विलायतेंत व हिंदुस्थानांत कंपनीच्या कारभारावर मुख्य होते. सर जशुआ हा इंग्लंडांत कंपनीचा गव्हर्नर होता, त्याच वेळेस जॉन चाइल्ड हाही सुरतचा प्रेसिडेंट होता. त्यांचा चुलता राजापुरच्या वखारींत बरेच दिवस कामावर होता, त्याजपाशीं जॉन लहान असतां राहत असे. त्यानें राजापुरास राहून त्या वेळच्या सर्व उलाढाली पाहून घेतल्या. मराठ्यांचें खरें धोरण काय आहे हें त्यास कळलें होतें. स. १६८२त त्यास सुरतच्या प्रेसिडेंटाची जागा मिळाली. दोघे भाऊ हुशार व हिंमतवान होते. काय होईल तें होवो, पण हातीं शस्त्र धरून आपली सत्ता वाढवावयाची, असा त्यांचा संकल्प होता. येथें जॉन ह्यास विलायतेहून जशुआ याचें चांगलें पाठबळ

होतें. ह्या दोघांस शत्रूही पुष्कळ होते. प्रथमतः हुकुमाची अमान्यता करून खासगी व्यापार करणारांस जॉन चाइल्डनें जबरदस्त शिक्षा करून त्यांची खोड मोडिली. इकडे औरंगजेबाची सत्ता उत्तरोत्तर ढांसळूं लागली. मराठ्यांशीं लढण्याकरितां तो स्वतः दक्षिणेंत आला, तेव्हां सुरतेचा बंदोबस्त ढिला पडून पूर्वीची शिस्त बिघडली. ह्मणून सुरतचें ठाणें सोडून मुंबईसच बंदोबस्त करून राहवें, असें सर जॉन चाइल्डनें आग्रहानें इंग्लंडांत कळविलें. तेथें त्याचा भाऊ सर्व काम पाहत होताच, त्यानें खरी स्थिति समजावून सुरत सोडण्याचें ठरविलें. येणेंप्रमाणें स. १६८७त इंग्रजांनीं सुरत कायमचें सोडिलें. त्या वेळीं मुंबईच्या बंदोबस्ताकरितां आरमार व इतर साहित्य तयार ठेवण्यासाठीं खर्च करण्यासही कंपनीनें परवानगी दिली.

ह्याच संधीस मराठ्यांची बाजू खालावली हें लक्षांत ठेविलें पाहिजे. शिवाजी मरण पावला. त्याचा मुलगा संभाजी आपली बाजू संभाळण्यास लायक नव्हता. शिवाय औरंगजेब स्वतः त्याच्या छातीवर येऊन बसल्यामुळें, त्यास दुसऱ्या गोष्टींकडे लक्ष देण्यास फावलें नाहीं. ही स्थिति लक्षांत आणून त्याचा फायदा घेण्याचें काम सर जॉन चाइल्डनें केलें. चाइल्डच्या व्यवस्थेची सगळी खुबी तत्कालीन परिस्थितीचा फायदा घेण्यांत दिसून येते. त्याच्या कारभाराची हकीकत पुढें प्रसंगानुसार येणार आहे.

**३. कंपनीच्या नोकरांची राहणी.**—क्रॉम्वेलनें कंपनीची व्यवस्था लाविल्यावर सुरत येथें इंग्रज व्यापाऱ्यांची राहणी सुखाची होऊं लागली. येथें बंगले बांधून कित्येक असामी आरामानें राहूं लागले. विलायतेहून गलबतें आलीं ह्मणजे सुबाळीचा देखावा मोठा मजेदार दिसे. ते लोक बैलांच्या दोन चाकी व चार चाकी गाड्या वापरीत. त्यांत पाय सोडण्यास जागा नसून आंत मांडी घालून बसावें लागे. आंतून रंगीबेरंगी कापडांनीं त्या मढविलेल्या असत. गाडी बरोबर शिपायांचे तांडे पायीं चालत. कंपनीच्या सर्व नोकरांस युनिफॉर्म्स ह्मणजे एक फर्मांचे कपडे दिलेले असून, त्या योगानें इकडील लोकांच्या मनावर अनुकूल ग्रह होऊन आपला बोज राहतो असें कंपनीस वाटे.

सुरतच्या प्रेसिडेंटाची स्वारी मोठ्या थाटानें पालखींत बसून बाहेर पडत असे. बरोबर नगारखाना, शिंगें वगैरे वाद्यें, व सजविलेले घोडे असत. तसेंच छत्री, मोरचेल, व पंखा धरणारे बरोबर असून, पालखीच्या दोहों बाजूस युरोपियन शिपायांची रांग चाले. मुंबईच्या डेप्युटि गव्हर्नराचा थाटही जवळ जवळ असाच होता. मद्रासच्या प्रेसिडेंटाचा थाट सुरतच्या सारखाच असे. त्याजबरोबर वाद्यें वगैरे असून स्वारीत कौन्सिलर मंडळी घोड्यांवर व त्यांच्या बायका पालखींत बसून बाहेर जात. प्रेसिडेंटाच्या तैनातीस मोठा लवाजमा असे. हत्ती, घोडे पालख्या, शिवाय डॉक्टर, शस्त्रवैद्य, उपाध्ये, नोकर वगैरे जमाव मोठाच असे. भोजनाच्या वेळेस सुस्वर वाद्यें वाजत आणि दरएक पदार्थ बाहेर येतांना शिंग वाजे. दरपदार्थांबरोबर चांदीची छडी धारण केलेले चोपदार सदैव असत. ह्मणजे एका खोलींतून दुसऱ्या खोलींत पदार्थ जातांना बरोबर चोपदार असे. बंगल्यांत वरच्या मजल्यावरून खालच्या मजल्यावर स्वारी येतांच तेथें त्यांस सलामी होत असे. कधीं कधीं प्रेसिडेंटाची स्वारी घोड्यावर किंवा घोड्याच्या बगींत बसूनही बाहेर पडे, हें सांगावयास नकोच. सुरतचा प्रेसिडेंट सर जॉन चाइल्ड ह्याचे गुणानुवाद खालीं लिहिल्या प्रमाणें कंपनीनें स. १६८८ च्या आपल्या एका अर्जांत पार्लमेंटापुढें मांडले होते. 'हे गृहस्थ आज पसतीस वर्षें हिंदुस्थानांत आहेत. एवढ्या अवधींत एकदांही ते इकडे विलायतेस आलेले नाहींत. त्यांचें शहाणपण, धैर्य, प्रामाणिकपणा व निर्व्यसनता हे गुण सर्वविश्रुत आहेत. त्यांस हिंदुस्थानांतील सर्व जातींचे लोक मान देतात. शत्रूंच्या ठिकाणीं सद्गुण दिसला तर तो ओळखण्यास हिंदु लोक सदा तत्पर असतात. सर जॉन चाइल्ड ह्यांनीं औरंगजेबाशीं इतक्या हुशारीनें युद्ध केलें कीं, मोगलांचीं सर्व जहाजें इंग्रजांनीं पकडिलीं, तरी पण ह्या युद्धांत रक्ताचा एक थेंबही सांडला नाहीं. शत्रूंचे लोक चाइल्डच्या हातीं पडले त्यांस परत पाठवितांना त्यानें कपडेलत्ते व पैसे देऊन इतकें खुष केलें कीं, त्यांनीं होऊनच चाइल्डबद्दल व इंग्रजांबद्दल बादशहापाशीं रदबदली करून त्यांच्या वाटेस न जाण्याविषयीं बादशहाचें मन वळविलें.' या युद्धाचें वर्णन पुढें यावयाचें आहे.

सुरतेची वखार एका मोठ्या भव्य इमल्यांत होती. ही इमारत सुरतेच्या मोगल अधिकाऱ्यापासून नांवाचें भाडें देऊन त्यांनीं घेतली होती. याच वाड्यांत प्रेसिडेंटाचीही राहण्याची जागा होती. तळ मजल्यावर कचेऱ्या व माल भरलेला असे. चणचणीच्या वेळीं येथची रहदारी फारच मोठी चाले. त्या आवारांत गोंगाट एवढा मोठा चाले कीं कांहीं सुमार नाहीं. वखारीचा बंगला मजबूद, दगडी व सुंदर होता. सभोंवार मोटमोठे सज्जे असून लांकडावर कोरीव कामाची नकशी होती. नानाप्रकारच्या वस्तूंनीं तो बंगला शृंगारलेला होता. तसेंच चित्रविचित्र पक्षी व प्राणी ठिकठिकाणीं ठेविलेले होते. कचेरीचें काम बहुधा सकाळीं दहापासून बारा व संध्याकाळीं चारपासून रात्रींपर्यंत चालू असून, त्या अवधींत तेथें चणचण व गोंगाट विलक्षण चालत असे. प्रत्येक इसम आपआपल्या हुद्याप्रमाणें आपला मान संभाळण्याची शिकस्त करी. विलायती नोकरांच्या ठरलेल्या पगारापैकीं निम्मा पगार हिंदुस्थानांत देत व निम्मा विलायतेंत देत. सर्व मंडळीस एतद्देशीय भाषा शिकविण्यासाठीं एक मुनशी ठेविलेला असे, परंतु इकडच्या भाषा फारशा कोणास येत नसत. त्याबद्दल विलायतेहून त्यांना नेहमीं दपटशा लिहून येत असे. बाहेरगांवच्या लहान लहान वखारींत जे लोक पाठविण्यांत येत, ते शाळेंतल्या पोरासारखे आळशी व खेळाडू असून, काम बरोबर करीत नसत. त्याबद्दल त्यांस विलायतेहून दंड लिहून येत असत. अशा दंडांचा एक निराळा फंड असून त्याचा विनियोग कांहीं सार्वजनिक कामाकडे करण्यांत येत असे. सुरत येथें इंग्रज व डच लोकांच्या कबरींच्या इमारती आहेत त्या सुद्धां एवढ्या प्रचंड आहेत कीं त्यांवरून जिवंतपणाच्या त्यांच्या वैभवाची व थाटमाटाची सहज कल्पना करितां येईल. मुसलमानांचाच बडेजाव या क्रिस्त्यांनीं उचलिलेला होता. ह्या लोकांनीं एवढा मोठा थाट करूं नये, निदान निष्कारण खर्च तरी करूं नये, अशा ताकिदी त्यांस विलायतेहून वारंवार लिहून येत असत.

वखारीच्या चार शाखा असत. एक हिशेबी शाखा. अकाउंटंटच्या सहीनें कोणताही हिशेब प्रेसिडेंटाकडे जाऊन त्याची सही झाल्याशिवाय तिजोरींतील पैसा बाहेर पडत नसे. दुसरी, कोठार शाखा. खरेदीविक्रीची नोंद ठेवणें कोठाऱ्याचें काम असे. तिसरी शाखा जहाजांची. जहाजांच्या कामगारास पर्सर म्हणत. तो मालाची नोंद पाहून त्याप्रमाणें माल जहाजांवर चढविण्याउतरण्याचें काम करी. चवथी चिटणीसी शाखा, सेक्रेटरीच्या ताब्यांत असे. त्याचें काम सर्व प्रकारच्या पत्रव्यवहाराचें. कौन्सिलच्या सभेची हकीकत नोंदणें, व कंपनीचें मोर्तब करणें वगैरे कामें या शाखेंत होतीं.

स. १६३८त एक फ्रेंच गृहस्थ मंडेल्स्लो सुरतेस आला होता त्यानें तेथची हकीकत दिली आहे ती अशी. तापी नदीच्या दोनही कांठांवर सुंदर बागा असून, त्यांत मोठमोठे वाडे होते. त्यांचा शुभ्र पांढरा रंग सभोंवारच्या हिरव्या गार बागांत फारच खुलत असे. आम्ही गलबतांतून उतरल्यावर प्रथम सुभेदाराच्या वाड्याजवळ कस्टम हाउस म्ह० जकात–घर होतें, त्यांत जकात भरण्यासाठीं सर्व सामान घेऊन गेलों. तेथें आमच्या सारख्या युरोपांतून आलेल्या उतारूंजवळ जें कांहीं सामान असे, त्यांपैकीं पाहिजे तें तेथचे अधिकारी विकत मागत. मग खासगी जिन्नस असला तरी तो त्यास द्यावा लागे. परंतु अशा वस्तूंची खरी हकीकत सांगितल्यावर त्या ते अधिकारी परत देत. ह्या वस्तु पाहण्यास स्वतः मोगल सुभेदार तेथें येत असे. युरोपचे व्यापारी नानातऱ्हेचे जिन्नस आणून ते खासगी उपयोगाचे आहेत असें सांगून जकात चुकवून घेऊन जात, व पुढें वाटेल त्या किंमतीस ते जिन्नस बाहेर विकीत. या साठीं जकात अधिकाऱ्यांस फारच सावध राहवें लागे.’

मंडेल्स्लो बंदरावर उतरतांच, इंग्रज प्रेसिडेंटानें त्याजकरितां दोन सफेत बैलांची गाडी पाठविली होती, तींत बसून तो प्रेसिडेंटाकडे गेला. तेथें प्रेसिडेंटानें त्यास फारच आदरानें वागविलें; आणि आपल्या घरीं ठेवून घेऊन त्याचा पाहुणचार केला. वखारींतील व्यवस्था व शिस्त फार चांगली असून सर्व नोकरास प्रेसिडेंटाचा मोठा वचक असे. त्या वेळीं चहा घेण्याची वहिवाट एतद्देशीय

लोकांत असून, ती इंग्रज व डच लोकांतही होती. इंग्रजी येत नसल्यामुळें मंडेल्स्लो ह्याला बराच त्रास पडला. सुरतेहून अहंमदाबादेस गेला, तेथचा गव्हर्नर आरबखान फार हुशार होता. आरबखानाचें वय सुमारें साठ वर्षांचें असून, जिंदगी दहा कोटी रुपयांची होती त्याची एक रूपवान मुलगी बादशहाचा मुलगा सुजा यास दिली होती. मंडल्स्लो येण्याच्यापूर्वी नुकतेंच हें लग्न झालें. ती सासरीं गेली, तेव्हां आरबखानानें तिच्याबरोबर वीस हत्ती, एक हजार घोडे, व निरनिराळ्या जिनसांनीं भरलेले सहा हजार गाडे नजर पाठविले. अहंमदाबाद येथील सुभेदाराच्या कचेरींत पांचशें नोकर असून शिवाय त्याचे घरचे नोकर चारशें होते. ते सर्व त्याच्या घरीं जेवीत. त्याच्या घरचा खर्च दरमहा सुमारें बारा तेरा हजार रुपये होता. त्याचे खासगी घोडे पांचशें व हत्ती पन्नास होते, त्यांचा खर्च वेगळाच. त्याच्या नोकर-चाकरांचे पोशाख मौल्यवान होते, तरी त्याचें स्वतःचें राहणें अगदीं साधें असे. मंडेल्स्लोची आरबखानानें मोठ्या अदबीनें भेट घेतली व त्यास भोजनास ठेवून सत्कार केला. आरबखान बराच क्रूर व कडक असे.

एतद्देशीय व्यापारी कंपनीच्या अडत्यांचें काम करीत, त्यांस हरएक खरेदी-विक्रीवर शेंकडा दोन टक्के कमिशन मिळत असे. वखारींत वीस इंग्रज होते. सुरतच्या आजूबाजूस कापडाचा व्यापार मोठा चाले. बरसातीच्या आरंभीं कंपनीचे अंमलदार गांवोगांव गुमास्ते पाठवून कापसाचें सर्व सूत विकत घेत; आणि तें निरनिराळ्या गांवांत कोष्टी लोकांस वांटून देत, म्हणजे बरसात संपल्यावर विलायतेस पाठविण्यास कपडा मुबलक मिळे. सुरतेचे मुसलमान लोक बहुधा इंग्रजांच्या वाटेस जात नसत, असें मंडेल्स्लो म्हणतो.

स. १६६८त इकडील प्रत्येक इंग्रजी वखारींतील कंपनीच्या नोकरांनीं कसें वागावें ह्याबद्दल दहा नियम ठरवून, ते इंग्लंडांतून बाहेर सर्व ठिकाणीं पाठविण्यांत आले. प्रत्येक वखारींत जाहीर ठिकाणीं ते चिकटविलेले होते. इंग्रजांच्या बायबलांत अशाच दहा आज्ञा परमेश्वरानें लोकांस दिलेल्या आहेत, त्यांवरून 'ह्या कंपनीच्या दहा आज्ञांची' वखारींत बरीच टर

उडत असे. सर जॉन चाइल्ड ह्यानें ह्या बाबतींत खालील मजकुराचें पत्र विलायतेस पाठविलें होतें. ‘ कंपनीनें आज्ञा केल्या आहेत; पण त्यांचें उल्लंघन केल्यास सर्वांसच शिक्षा सांगितलेल्या नाहींत. आजपावेतों प्रेसिडेंट व कौन्सिल ह्यांनीं वखारीच्या बंदोबस्तासाठीं नियम केलेले असून, अपराध्यांस शिक्षाही ठरवून दिलेल्या आहेत. प्रार्थनेच्या वेळीं गैरहजर राहणें व व्यभिचार करणें ह्याबद्दल कडक शिक्षा करण्यांत येतात; आणि माझ्या मतें कंपनीच्या आज्ञांपेक्षां हे नियम चांगले आहेत. रविवारीं प्रार्थनेस हजर नसल्यास अडीच रुपये दंड व इतर दिवशीं सव्वा रुपया दंड आहे. कोणी दारू पिऊन एतद्देशीयांस शिवीगाळ करील, तर त्याबद्दल त्यास सर्व दिवस बेड्या घालून वखारीच्या मुख्य दारांत ठेवण्यांत येतें; आणि रात्रीं आंत खांबाशीं बांधून ठेवितात. प्रेसिडेंटाच्या परवानगीशिवाय वखारीच्या बाहेर पडल्यास वीस रुपये दंड आहे. ह्या शिक्षा वारंवार होतात, व कोणासही चुकत नाहींत; तसेंच प्रेसिडेंटही मोठ्या शिस्तीनें वागत असल्यामुळें आमची ही वखार अत्युत्कृष्ट स्थितींत आहे. जणूं काय तीस एकादें कॉलेज किंवा मठ असेंच कोणी म्हणेल; कारण येथें व्याख्यानें व वादविवादही चालतात. इतिहास, नीति, आत्मसंयमन, व्यापार, द्रव्योत्पादन इत्यादि विषयांवर चर्चा चालू असते. आम्ही दररोज सकाळीं वखारीचे दरवाजे उघडण्यापूर्वी प्रार्थना करितों; आणि रात्रीं दरवाजे बंद केल्यावर ८ व ९ चे दरम्यान पुनः प्रार्थना करतों. रविवारीं दिवसा दोन वेळ प्रार्थना होते, व उपाध्याचा उपदेश होतो. एकंदरींत आमच्या धर्माचे नियम आम्ही फार निष्ठेनें पाळितों. कित्येक सणांचे दिवशीं आम्ही मोठे समारंभ करितों, आणि कित्येक उपोषणाचे दिवस ठरले आहेत त्या दिवशीं उपोषण करितों. क्रिस्ट्मस, ईस्टर व व्हिट्सन्टाइड हे आमचे मोठे सण होत. त्या दिवशीं सुटी असून सरकारी काम बंद असतें आणि मोठी प्रार्थना व मेजवानी होते. आम्ही आज मजा करीत आहों हें बाहेर सर्व एतद्देशीय लोकांस ठाऊक असतें. ‘ गन्–पॉवडर प्लॉट ’ चा दिवस ता. ५ नोव्हेंबर, व राजाचा वाढ-

दिवस ता. २९ मे, हेही आमचे मौजेचे सण आहेत. लेंट, गुड्‌फ्रायडे व पहिल्या चार्लेस्‌चा फांशीचा दिवस ता. ३० जानेवारी, हे आमचे उपासाचे दिवस होत. प्रेसिडेंट वगैरे कित्येक मंडळी दर शुक्रवारीं उपास करितात. उपासाचे दिवशीं मासे मात्र खावयाचे, पण मांस खावयाचें नाहीं, असा जो रोमन पंथाचा संप्रदाय आहे तो आह्मी पाळीत नाहीं. आम्ही वाटेल तें खातों, पण थोडे खातों; आणि दिवसा कांहींच न खातां रात्रीं थोडें खाऊन प्रार्थना म्हणून निजतों. ह्यावरून आमचें वर्तन तुम्हांस तेथें वाटतें तितकें निंद्य नाहीं. आम्हीं धर्मबंधनें झुगारून दिलेलीं नाहींत, आम्ही पवित्र आचरण करीत आहों. मर्जीस वाटल्यास ही हकीकत कंपनीपुढें ठेवा. मुंबई ता. १८ जानुआरी स. १६८२, "जॉन चाइल्ड."

चाइल्डचें हें म्हणणें जरी खरें असलें तरी मनुष्यधर्माप्रमाणें हिंदुस्थानांतल्या वखारींत पुष्कळ अनाचार चालत असे असेंही अनेकांनीं लिहिलेलें आहे. मात्र जे दुराचारी असत ते कंपनीच्या कारभारांतून दूर होऊन आपला पंथ स्वतंत्र काढीत; आणि अशा बंडखोरांचा कंपनीस फार त्रास होत असे. स. १६६७त कंपनीनें विलायतेहून आपल्या नोकरांच्या मुलांस शिकविण्याकरितां स्वतःच्या खर्चानें मद्रासेस शिक्षक पाठविले. हिंदुस्थानांत येऊन हजारों लोक मृत्युमुखीं पडत, तरी पण त्यांचें धैर्य खचत नसे; आणि हातीं धरलेला उद्योग त्यांनीं मोठ्या निग्रहानें चालविला हें त्यांस भूषणावह आहे. फ्रायर म्हणतो, 'उपटून आणून भलत्याच ठिकाणीं लावलेल्या झाडाप्रमाणें आमची येथें स्थिति आहे. ५०० लोक इकडे आले तर त्यांतले १०० जगत नाहींत; त्या शंभरांपैकी पंचवीसांना द्रव्यलाभ झाला कीं हरहर! त्यांपैकीं दहांतल्या एकानें स्वदेश पुनरपि पाहिला म्हणजे मोठी मिळवली, असें होत असे.'

त्या वेळीं व्यभिचार व मद्यपान यांचा प्रसार विलायतेंतच फार झाला होता. प्रत्यक्ष राजा दुसरा चार्लस्‌ हा व्यसनांचा केवळ पुतळा बनला असून त्याचा अनुवाद हिंदुस्थानांत झाल्याशिवाय राहिला नाहीं. लोकांवर

जुलूम करणें, लांच खाणें, स्वधर्माची निंदा करणें, दुसऱ्यांस निष्कारण प्रतिबंधांत ठेवणें, बंड करणें, अशा प्रकारचे आरोप कंपनीच्या नोकरांवर वारंवार येत असत. दारू पिऊन दंगा करण्याचा प्रकार हरहंमेश चालू असे. अशा दंगेखोरांस ताब्यांत ठेवणें मोठें कठीण पडे. त्या वेळच्या स्त्रियाही पुरुषांप्रमाणें व्यसनी झालेल्या असत. सेंट हेलेना येथें आणलेले गुलाम काम चांगलें करीनात, म्हणून त्यांच्यासाठीं त्यांच्या जातीच्या बायका गलबतें भरून आणल्या, तेव्हां त्यांचें मन ताळ्यावर येऊन, ते काम करूं लागले. त्याचप्रमाणें कंपनीनें आपल्या सोल्जरांसाठीं व इतर नोकरांसाठीं विलायतेंतून वेळोवेळीं इकडे बायका पाठविण्याची तजवीज केली. पण अशा बायांच्या उदरनिर्वाहास साधन नाहींसें झाल्यामुळें, व सर्वांचीं लग्नें होणें शक्य नसल्यामुळें, विलायतेहून बरोबर आणलेली सदाचरणाची अल्प पुंजी तेव्हांच खलास होऊन, पोटापाण्यासाठीं तरी त्यांस असन्मार्ग पत्करावा लागे. यथा राजा तथा प्रजा, हें तत्त्व सर्वत्रच लागू असावयाचें. त्यांचें धर्मबाह्य व नीतिभ्रष्ट वर्तन सुधारण्याचे ऑंजियरनें पुष्कळ प्रयत्न केले; पण उपयोग झाला नाहीं. सन १६८३त आलेल्या एका पत्रांत चार्लस राजाची खालील आज्ञा हिंदुस्थानांत लिहून आली होती.

‘ राजाची आम्हांस अशी आज्ञा झाली आहे कीं, हिंदुस्थानांतून एक अतिशय ठेंगू सतरा अठरा वर्षांचा सीदी पुरुष व चौदा चौदा वर्षांच्या दोन सीदी मुली पैदा करून पाठवाव्या. त्या मिळतील तितक्या ठेंगू व सुंदर असाव्या. त्या नीट व्यवस्थेनें गलबतावर चढवून त्यांची उत्कृष्ट काळजी घेण्याविषयीं कप्तानास ताकीद द्यावी. विशेषतः मार्गांत खलाशी लोक त्या मुलींचें पातिव्रत्य भ्रष्ट करणार नाहींत, अशी सक्त तजवीज ठेवावी. रस्त्यांत त्यांच्या खाण्यापिण्याची व कपड्यालत्याची व्यवस्था नीट ठेवावी; आणि त्यांच्या अंगावर इकडच्या चालीचे हातापायांतले वगैरे सर्व प्रकारचे खोटे दागिने त्यांजबरोबर पाठवावे. ’ इकडच्या लोकांचा जनावरांप्रमाणें सौदा करण्याचा प्रघात त्या वेळीं किती होता हें ह्यावरून दिसून येतें.

**४. व्यापाराची भरभराट.**—अनाचार चालू असला तरी व्यापाराची भरभराट चांगली होती. वास्तविक कंपनीच्या व्यापारास परशत्रूंपासून फारसा उपद्रव नव्हता, पण अनेक इंग्रज व्यापारी कंपनीचा इजारा मोडून व्यापार व समुद्र सर्वांस सारखाच मोकळा असला पाहिजे ह्या सबबीवर, स्वतःचा व्यापार चालवीत असत. ह्या उपद्रवाचा बंदोबस्त कंपनीच्या हातून कधींच झाला नाहीं. राजाच्या मदतीनें किंवा अन्य उपायांनीं हा त्रास कांहीं वेळ मिटे, पण फिरून तेव्हांच त्याचा स्फोट होई. तरी एकंदरींत दुसरा चार्ल्स व दुसरा जेम्स ह्यांच्या कारकिर्दींत अशा बंडखोरांचा बराच बंदोबस्त झाला होता. जेम्सनें स्वतःचे पुष्कळ पैसे ह्या व्यापारांत घातले होते, आणि बंडखोरांस शिक्षा करण्यास तो कधीं कचरत नसे.

स. १६६० नंतरच्या पंचवीस तीस वर्षांत कंपनीचा व्यापार फारच भरभराटींत. होता. इंग्लंडांत जिकडे तिकडे लोकांत सुंदर रेशमी कपड्यांची व ऐषआरामाची हौस सुरू झाली. गरिबीचे व भित्रेपणाचे दिवस गेले. मिरींमसाल्यांची भोजनांत चंगळ उडूं लागली. सर टामस मन्न ह्यानें इंग्लंडच्या ह्या व्यापाराची योग्यता खालील शब्दांनीं वर्णिली आहे. ' परदेशांशीं जो आमचा व्यापार आहे, त्यामुळें आमच्या राज्यास वसुलाचें उत्पन्न मिळतें, राष्ट्राची पत वाढते, लोकांस उत्कृष्ट उद्योग मिळतो, कलाकौशल्याची भरभराट होते, आमच्या गरजांची भागवण होऊन, गरीबांस पोटाचें साधन सांपडतें, येथील जमिनीची किंमत वृद्धि पावते, राष्ट्रीय खलाशांची शाळा निर्माण होते, राज्यसंरक्षणाचे तट आपोआप बनतात, द्रव्याचा झरा सदैव वाहत राहून, आमच्या युद्धांचें पोषण होतें, आणि शत्रूंना दरारा बसून दुसरीं अनेक कामें ह्या एकट्या व्यापारानें तडीस जातात. ' *

स. १६६३–६४त राजाचा भाऊ जेम्स ह्यानें वेस्ट इंडिया बेटांत उद्योग करण्याचा विचार मनांत आणून एक कंपनी उभी केली, तीस राजानें सनद

* **टीप**—Sir Thomas Munn's England's Treasare by Foreign Trde,–1664.

दिली. ह्या कंपनीचें मुख्य काम म्हटलें ह्मणजे आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्यावरून गुलाम पकडून जमेका येथें कामासाठीं न्यावयाचे. पण असे गुलाम पकडणें हाहा एक व्यापार असून, ई० इं० कंपनीच्या सनदेंत आफ्रिकेचाही समावेश होता. परंतु ह्या बाबतींत राजानें ई० इं० कंपनीची आफ्रिकेपुरती सनद रद्द करून, ती जेम्सच्या कंपनीस दिली. तेव्हां आफ्रिकेच्या किनाऱ्यावरील आपला सर्व उद्योग ई० इं० कंपनीनें बंद करून तेथचा माल व लोक ह्या नव्या कंपनीस विकले. अशा गुलामांच्या व्यापारांत कंपनीस अतिशय किफायत होत असे. असल्या धरून आणिलेल्या गुलामांनीं सुरतेचे रस्ते नेहमीं भरून गेलेले असत.

ह्या भरभराटीच्या काळांत दरसाल विलायतेहून दोन लाख पासून तीस लाख पक्के मण माल भरून सुरतेस येत असे. हिंदुस्थानांतला कापूस विलायतेस पाठविण्याविषयीं इंग्रजांनीं शर्थ केली. इकडे कापसाचे गठ्ठे बांधतां येत नसत, त्यासाठीं त्यांनीं विलायतेहून येथें गठ्ठे बांधण्याचीं यंत्रें आणून तीं निरनिराळ्या ठिकाणीं ठेविलीं आणि तेथें सर्व कापूस जमवून ते विलातेस रवाना करूं लागले.

स. १६७०त कारोमांडल किनाऱ्यावरील कंपनीचा व्यापार फारच भरभराटींत होता. तेथें डच लोकांचा उपद्रव विशेष नव्हता, ह्मणून त्या सालीं सोळा लक्ष रुपयांचें चांदीसोनें त्यांनीं मद्रासेस पाठवून, तेथें नाणीं पाडून माल खरेदी केला. बंगाल्यांत हुगळी येथें सोन्याचा व्यापार मोठा चाले. स. १६७३त बंगाल्यांतून कांहीं उत्तम रेशमी कापड कंपनीनें प्रथम विलायतेस नेलें. तें विलायतेंत कंपनीच्या सभेंत तपासून पाहतां असें आढळलें, कीं हीं तलम रेशमी वस्त्रें अतिशय सुंदर, हलकीं, व बेसुमार स्वस्त आहेत. मात्र कित्येकांचे रंग चांगले नाहींत. रंगांत थोडी सुधारणा केली तर ह्या रेशमी कपड्याच्या व्यापारांत आपणांस मोठी किफायत होईल. त्यावरून त्यांनीं इंग्लंडचे कांहीं रंगारी हिंदुस्थानांत पाठविले, आणि हिंदुस्थानांतील आपल्या व्यापाऱ्यांस सक्त ताकीद दिली, कीं 'हें रंगाचें काम अगदीं गुप्त रीतीनें चालवा, तें एतद्देशीय रंगाऱ्यांस शिकवूं नका.' स. १६६८त खालील किंमतीचा माल इंग्लंडांतून आला.

| | गलबतें | मालाची किं. रु. |
|---|---|---|
| सुरतेस उतरलेलीं. | ३ | ७,५०,००० |
| कारोमांडेल कि. ,, | ४ | ९,००,००० |
| वरच्यांपैकीं बंगाल्यांत. | ० | २,४०,००० |
| बँटम येथें. | ० | १,००,००० |

या एका सालांत १९, ल. ९०,००० रुपयांचा माल प्रथम व मागाहून १ ल. ३०,०००चा माल इंग्लंडांतून इकडे आला.

इंग्लंडांतून पूर्वीप्रमाणेंच ह्या वेळींही रुंद वस्त्रें ( Broad Cloths ), कथील व जस्त, पारा, शिसें, सोनें व रुपें, इतके जिन्नस बहुधा हिंदुस्थानांत येत; आणि त्यांच्या बदलीं मिरीं, मसाले, रेशमी वस्त्रें, कालिको, तापता, सोरा हे जिन्नस तिकडे जात. रेशमी वस्त्रांचा खप इंग्लंडांत आतां फारच होऊं लागला. हिंदुस्थानांत बाजारभाव कसा असेल व तेथें कोणता जिन्नस विशेष खपेल, ह्याचा आगाऊ अंदाज करणें शक्य नसल्यामुळें, रोख सोनें-चांदी बाहेर पाठविण्यांतच कंपनीस किफायत चांगली होई. पण एकदां सोन्याचांदीच्या भावांत एकदम पुष्कळ पैसा बाहेर आल्यानें सोन्याचांदीचा भाव उतरला. दुसरा चार्लसच्या कारकीर्दींत माल खरेदीसाठीं खालीं लिहिल्याप्रमाणें सोनेंचांदी बाहेर आलीः—

१६६७-६८त १२,८६,०५० रुपयांची. १६६८-६९त १६,२३,९४० रुपयांची.
१६६९-७०त १८,७४,५८० ,, १६७०-७१त १८,६१,४९० ,,
१६७१-७२त १८,६४,२०० ,, १६७२-७३त १३,१३,००० ,,
१६७३-७४त १८,२९,८३० रुपयांची.

ह्या बाहेर आणलेल्या ऐवजाचें व ह्याशिवाय इंग्लंडांतूत विक्रीसाठीं बाहेर आणलेल्या मालावरील जकातीचें उत्पन्न कंपनीकडून इंग्लंडच्या राजास दरसाल ३,५०,००० रुपये मिळत असे. गलबतें बांधण्याकडे कंपनीकडून दहा लाख रुपये दरसाल खर्च होई, तो मजुरीच्या रूपानें इंग्रजांसच मिळे; शिवाय पूर्वेकडील सर्व माल स्वस्त दरानें इंग्लंडच्या लोकांस मिळे तो वेगळाच. तो माल दुसऱ्या राष्ट्रांनीं इंग्लंडास पुरविला असता, तर त्याबद्दल वर सांगितलेल्या सोन्याचांदीच्या ऐवजापेक्षां पुष्कळच ज्यास्त रक्कम

इंग्लंडांतून बाहेर गेली असती. कंपनीच्या परवान्यानें दुसरे हजारों व्यापारी खासगी रीतीनं व्यापार करून नानाप्रकारचे जिन्नस पूर्वेकडून युरोपांत आणीत, त्यांचा अंतर्भाव वरील आंकड्यांत नाहीं.

स. १६७३–७५ सालीं कंपनीनें हिंदुस्थानांतून ११ लक्ष रुपयांचा माल आणि ३२ लक्ष रुपयांची सोनेंचांदी विलायतेस नेली. रंगीत कापड, रेशमी कापड, कच्चें रेशीम, मिरीं, सोरा, नीळ, मसाले, औषधि वगैरे जिन्नस ते तिकडे नेत. वरील ११ लक्ष रुपये मालाची किंमत तेथें ८६,००,००० रुपये आली. ही किंमत मोठी दिसते, तरी त्याचा खर्चही तसाच होता. एक तर प्रवासाचा खर्च व संकटें जबरदस्त असत. जकातीचा खर्च मोठा असे. हिंदुस्थानांत वखारींच्या संरक्षणार्थ व एतद्देशीय राजांशीं वाटाघाटी करण्यास सुमारें सहा लक्ष रुपयांचा सालिना खर्च लागे. तथापि विलायतेंत स. १६७० सालीं कंपनीच्या शेअरचा भाव शेंकडा ७० होता, तो १६७५त शेंकडा २४५ झाला.स. १६७५त क्रॉम्वेलच्या व्यवस्थेनंतर कंपनीस वाटेल तितकें भांडवल मिळूं लागलें; तेव्हां पासून कंपनीचा व्यापार फायदेशीर होऊं लागला. स. १६६१त कंपनीच्या शेअरचा भाव शेंकडा ९२ पासून ९४ होता, व स. १६६५त डच लोकांशीं युद्ध सुरू झाल्यावर हा भाव एकदम ७० वर उतरला. पण पुढें चार वर्षांनी कंपनीस फायदा होऊं लागला, तेव्हां ह्या भावाची चढ शेंकडा १३० वर गेली. पुढें दर तीन वर्षांनीं कंपनीच्या व्यापाराचे हिशेब पुरे होऊन लोकांच्या हातांत पडत. अशा रीतीनें शेअरची खरेदीविक्री करून हल्लीं जी व्यापाराची जॉइन्ट-स्टॉक म्ह० समाईक भांडवलाची पद्धत बनली आहे, ती त्या वेळीं नुकती बनत चालली होती. ह्या पद्धतीचा उपयोग करणारी पहिली कंपनी इंग्लंडांत हीच होय. दुसऱ्या चार्लसच्या कारकिर्दीत ई. इं. कंपनींत पैसे घालण्याइतकी किफायतशीर बाबत दुसरी नव्हती. स १६७७त शेअरचा भाव शेंकडा २४५ व स. १६८१ त २८० झाला. स. १६७१ च्या जॅनुवारींत शेंकडा दीडशें टक्के सर्व भागीदारांस नफ्याचे वाटण्यांत आले. सारांश, स. १६५७त कंपनीमें घातलले ३६,९८,९१० रुपयांचें सर्व भांडवल २५ वर्षांत फायद्याच्या

रूपानें लोकांस परत मिळून, पुनः तितकीच रक्कम कंपनीकडे राहिली. इव्हेलिन ( Evelyin ) लिहितो, मी सन १६५८त शेंकडा २५० पौंड भरून शेअर खरेदी घेतले, ते स. १६८२त शेंकडा ७५० पौंडास विकले; म्हणजे पंचवीस वर्षांत मूळ भांडवल परत येऊन शिवाय पांचशें नफा झाला. ह्या नफ्याची कमाल स. १६८३त होऊन १०० पौंडांच्या शेअरचा भाव ३६० पौंड झाला आणि कधीं कधीं तर आपसांत ५०० पौंडासही एक शेअर विकत असे. मालाच्या खरेदीविक्रीवरूनही ह्या फायद्याची कल्पना होण्याजोगी आहे. स. १६७५त ४३ लक्ष रुपयांचा माल कंपनीनें इंग्लंडांतून बाहेर नेला. तो विकून त्याच्या बदल्यांत हिंदुस्थानांतला माल विलायतेंत आणून विकला त्याचें उत्पन्न खर्च भागून ८६ लक्ष रुपये झालें. ह्याशिवाय कंपनीचा परवाना घेऊन इंग्रज लोक खासगी व्यापार करीत तो वेगळाच. स. १६६४तील कंपनीच्या तीन विक्रींचें मिळून एकंदर उत्पन्न १ कोट ८० लक्ष झालें. यावरून सर्व राष्ट्राचा निदान अर्धा व्यापार एकट्या कंपनीनें गट्ट केला आहे, अशी ओरड चालू झाली. सन १६५७ पासून १६९१ पावेतों जीं ३४ वर्षें गेलीं, त्या एकंदर अवधींत शेंकडा ८४० रुपये भागीदारांस नफ्याबद्दल मिळाले; म्हणजे सरासरीनें दरसाल शेंकडा २५ उत्पन्न झालें. स. १६७६ पासून ८५ पर्यंतच्या नऊ वर्षांत ९६ लक्ष रुपये कंपनीस नफ्याचे मिळाले. हा फायदा नुसत्या वर्गणीच्या भांडवलावरलाच आहे असें नाहीं; तर वर्गणीशिवाय कर्ज काढूनही कंपनी व्यापार करीत असे, त्या कर्जावरचा फायदाही ह्यांत धरलेला आहे. स. १६८१त कंपनीनें व्यापाराकरतां म्हणून पंचावन लाख रुपये कर्ज काढिलें होतें. त्या कर्जाचें व्याज शेंकडा ३ पासून ६ टक्के द्यावें लागत असें.

इंग्लंडांत कंपनीच्या मक्त्याविरुद्ध ओरड करणारी पुष्कळ मंडळी होती. त्यांना जाशिया चाइल्डनें आपल्या लेखांनीं गप्प केलें. त्यानें स. १६८१त लिहिलेला मजकूर असा आहेः— “ कंपनीच्या व्यापारामुळें इंग्लंडच्या राजास सालिना सहा लाख रुपये फक्त जकातीचे मिळतात. सुमारें सहासात

लाखांचा माल दरसाल इंग्लंडांतून बाहेर जातो. ई. इं. कंपनीचा व्यापार चालू नसता तर हा माल बाहेर गेला नसता, आणि फ्रेंच व डच व्यापाऱ्यांनींच पूर्वेकडे खपणारा सर्व माल बाहेर नेऊन पुरविला असता." असें सणसणीत उत्तर बाहेर आलें ह्मणजे वरील ओरड कांहीं दिवस बंद पडे. वास्तविक कंपनी आपला मक्ता कडक रीतीनें पाळीत नसे. कंपनीच्या परवानगीनें वाटेल त्या इसमास खासगी गलबतें पाठवून व्यापार करण्याची मोकळीक होती. मात्र कांहीं ठरीव जिनसांची खरेदीविक्री कंपनीशिवाय दुसऱ्या कोणास करितां येत नसे, त्याबद्दल ओरड चाले. ती बंद करण्याकरितां राजानें कंपनीस पुनः एक सनद दिली; पण अशी सनद देऊन लोकांचे हक्क बुडविण्याचा राजास अधिकार नाहीं अशी तक्रार होऊन कोर्टांत दावे झाले. राजाचा अधिकार, विरुद्ध हिंदुस्थानचा व्यापार, असें ह्या खटल्यास नाव पडून मोठी चळवळ झाली. जेम्स्‌चा मुख्य न्यायाधीश जेफ्रीझ ह्याजकडे खटला गेला, आणि त्यानें राजाच्या तर्फे निकाल करून कित्येकांस शिक्षाही दिल्या, तेव्हां कंपनीची लोकांवर दहशत बसली. जेम्स् राजाची एकंदर कारकीर्द राष्ट्रास जितकी दुःसह झाली, तितकीच ती कंपनीस हितावह झाली. राजाचे अधिकार पूर्णपणें कंपनीस मिळाले. आणखी तें तिला काय पाहिजे! स. १६८५त कंपनीची अतिशय भरभराट होती. स्वतः राजा कंपनीचा एक मोठा भागीदार म्ह० शेअर-होल्डर असून, एका भागीदारापेक्षां ज्यास्त अधिकार त्यास कंपनींत नव्हता. इकडे पुष्कळ ठिकाणीं कंपनीच्या ताब्यांत मुलूख असून त्यांत मुलकी, दिवाणी, लष्करी, वगैरे अधिकार कंपनी चालवीत असे. तिला नाणें पाडतां येत होतें; युद्ध व तह करतां येत होते. हे अधिकार बजावण्यास राजाचे कामगारही तत्पर असत. वास्तविक ही मूठभर व्यापाऱ्यांची सभा नव्हे, तर राजाप्रमाणें सर्व सत्ता वापरणारी मोठी मंडळी असून, तिचा अंमल मोठ्या कडक व पद्धतशीर रीतीनें चालू होता. खुद्द लंडनमध्येंच हाय एक्स्चेंज ह्मणून राष्ट्रांच्या देवघेवीचा मोठा अड्डा होता, त्याच्या खालोखाल ई. इं. हाउसची, ह्मणजे कंपनीच्या पेढीची योग्यता होती. एखादा महत्वाचा प्रश्न निकालासाठीं कंपनीच्या सभेंत येई, तेव्हां तो प्रसंग पाहण्यास हजारों लोक मोठ्या आतुरतेनें जमत असत.

सर जशिया चाइल्ड मोठा हुशार अंमलदार होता. त्यानें कंपनीच्या कारभाराची सुव्यवस्था लावून दिली. निरर्थक लेख व काम वाढलें होतें तें बंद केलें. पूर्वेकडून जो माल गलबतें भरून येई, तो सर्व लिलावानें विकण्यांत येई. ह्या लिलावांत बोलण्याची परवानगी कंपनींत भाग असलेल्या लोकांस मात्र असे. माल आला कीं, कोर्टाची सभा भरे, तेथें एक इंच लांबीचा मेण-बत्तीचा तुकडा पेटवून समोर ठेवीत. तो तुकडा जळून संपण्याचे आंत ज्याची मागणी ज्यास्त येईल त्याच्या नांवानें लिलाव पुरा होई. हिशेबाच्या कामांत मोठे घोटाळे होते. दर दोन तीन वर्षांनीं नवीन वर्गणी गोळा करून तेवढ्या रकमेचा निराळा हिशेब ठेवण्याचा प्रघात असल्यामुळें, आणि उत्तरोत्तर ह्या पृथक् वर्गण्यांची संख्या वाढल्यामुळें, प्रत्येकाचें नफानुकसान वांटण्याचें काम फारच बिकट होऊं लागलें. शिवाय नफा वांटावयाचा तो रोकडीनें न वांटतां प्रत्यक्ष माल देऊन वांटीत. उदाहरणार्थ, स १६४१त एकंदर नफा २४ टक्के वांटण्याचा ठराव झाला, त्यापैकीं $\frac{5}{8}$ रेशीम, $\frac{2}{8}$ कापड, व $\frac{1}{8}$ लवंगा अशा रीतीनें तो नफा वांटावा असें ठरलें. अर्थात् ह्यामुळें फारच घोटाळा उत्पन्न होई.

डा. फ्रायर स. १६७३--८० पर्यंत सुरतेस होता तो कंपनीच्या व्यापाराविषयीं लिहितो, ‘ सुरत येथून कंपनीचीं गलबतें कापड भरून बँटम येथें जातात. तेथें त्यांत साखर, चहा, चिनी भांडीं, लाखेचें सामान, पारा, तांबें, वगैरे पदार्थ भरून परत आणितात. रस्त्यावर सुमात्रा येथें धान्य देऊन हस्तिदंत घेतात. इराणांतून औषधि व लोकर आणितात; मोचा येथून काफी, अहमदाबादेहून रेशमी कापड व सोनेरी काम केलेल्या तलवारी, आग्र्याहून नीळ व कापड, पश्चिम किनाऱ्यावरून मसाले, मिरीं, अफू, सोरा, इत्यादि जिन्नस भरून आणितात.’

कापड वगैरे जिन्नस कंपनीचे व्यापारी भरबाजारांत खरीद करीत नसत. ते आपले एतद्देशीय गुमास्ते गांवोगांव पाठवून कापूस खरेदी करून कोष्टयांस मजुरी कबूल करीत, आणि त्यांजकडून कापड तयार झाल्यावर सर्व माल

एकदम आपण घेत. मद्रासेस तर स. १६४०त ४०० कोष्ट्यांचीं कुटुंबें कंपनीच्या हद्दींत वस्ती करून राहिलीं होतीं.

सुरतच्या जकात-अधिकाऱ्यांकडून कंपनीच्या नोकरांस बराच त्रास पोंचत असे. पण जकातींमुळें युरोपांतला प्रवास आज सुद्धां किती त्रासदायक होतो, हें ज्यांनीं पाहिलें असेल, त्यांस त्या वेळचा त्रास म्हणजे कांहींच नव्हे असें वाटेल. कोणीही इसम अगर गलबत बंदरांत आलें, कीं त्याची झडती घेण्यांत येई. रात्रीं गलबत आल्यास दुसरे दिवसपर्यंत तसेंच तिष्ठत राहवें लागे. प्रत्येक इसमाच्या सामानाची झडती घेतांना त्यास अतोनात त्रास पोंचे. गलबतावर व सामानावर पाहरा ठेवण्यांत येई. प्रत्येक उतारूस बोटीबद्दल एक रुपया फी द्यावी लागे. झाडा संपल्याशिवाय नवीन आलेल्या उतारू लोकांस इकडच्या लोकांशीं भाषण सुद्धां करूं देत नसत. त्यांच्या सभोंवार सोटेवाल्या शिपायांचा गराडा असे. प्रत्येकाचें नांव लिहून त्याच्या सामानाची नोंद करीत. सोन्याचांदीवर शेंकडा अडीच टक्के व इतरांवर पांच टक्के जकात होती. कोटाच्या बटनांवर सुद्धां जकात घेत. पण जकात अधिकाऱ्यांस फसविण्याची प्रवृत्ति सर्वच लोकांची असल्यामुळें, हल्लीं परदेशाहून मुंबई वगैरे ठिकाणीं येणाऱ्या उतारूंस असाच त्रास सहन करावा लागतो. सुरतेच्या अधिकाऱ्यांची कोणत्याही कारणानें त्या वेळीं इतराजी झालेली असली, मग तर ह्या उपद्रवास सीमाच नसे. युरोपियन बायांचा मात्र झाडा घेण्यांत येत नसे.

हळू हळू कंपनीच्या व्यापाराची भरभराट होऊन तिला हिंदुस्थानांत राजाचे हक्क प्राप्त झाले. नाणें पाडणें, कर बसविणें, किल्ले बांधणें, लष्कर बाळगिणें, युद्ध किंवा सख्य करणें, ह्या गोष्टी करण्याचा हक्क राजांसच असतो, तो कंपनीस मिळाला. पण हा हक्क कंपनीस दिला कोणीं, राजानें दिला असल्यास त्यास देण्याचा अधिकार आहे कीं काय? पार्लमेंटानें ह्याचा तपास कां ठेविला नाहीं? इत्यादि अनेक प्रश्न ह्या कंपनीच्या व्यवहारांत उद्भवतात. पहिल्या चार्लसच्या अमदानींत कंपनीचा व्यापार संपुष्टांत आल्यामुळें लोकांनीं

तिच्याकडे लक्ष दिलें नाहीं. दुसऱ्या चार्ल्सच्या कारकिर्दीत राजानें तिला चांगलें पाठबळ दिल्यामुळें, पार्लमेंटास तिच्या कारभारांत हात घालतां आला नाहीं.परंतु दुसऱ्या जेम्स्च्या कारकिर्दीत प्रत्यक्ष जेम्सचाच अधिकार पार्लमेंटानें काढून घेतल्याबरोबर, कंपनीही पार्लमेंटाच्या कचाट्यांत आली. हा प्रकार पुढें व्यक्त होईल.

' ईस्ट इंडिया कंपनीचा फायदा होण्याचें कारण असें आहे, कीं जी जागा त्यांनीं आपल्या ताब्यांत घ्यावी, तेथें उत्तम मजबुदी करून शिवाय त्या ठिकाणीं आजूबाजूचा व्यापारी माल येण्याची सर्व सोय करावी; माल तयार करण्याचे कारखाने घालावे; कोष्टी, कातकरी श्रीमंत लोक आपल्या हद्दींत येऊन राहतील असें करावें; तेथें येऊन राहणाऱ्यांस चांगल्या रीतीनें वागवावें; त्यांचे धर्मसंबंधीं समज दुखवूं नयेत; परधर्मीयांच्या घरांत कोणींही शिरूं नये; त्यांचे सर्व प्रकारचे आचार त्यांस यथास्थित चालवूं द्यावेत; त्यांस प्रेतें जाळूं द्यावीं; क्रिस्ती धर्म दुसऱ्यावर जुलमानें लादूं नये; आणि न आवडणारें काम लोकांस सांगूं नये. त्यांच्या गलबतांस आपल्या बंदरांत येऊं द्यावें; आपल्या जहाजांकडून बंदरांतील सर्व जहाजांचें व मालाचें संरक्षण करावें; वखारींत तयार झालेल्या मालावर आरंभीं जकात घेऊं नये. त्यांनीं आपलीं नाणीं पाडिलीं; न्यायाचीं कोर्टें स्थापिलीं; वसाहतींत जीवित व मालमत्ता सुरक्षित ठेविली. सन १६८५ पासून १६९० पर्यंत त्यांनीं युद्धप्रसंग करून पाहिले; पण त्यांत यश आलें नाहीं.' सारांश, इतर राष्ट्रांहून इंग्रजांचा क्रम निराळा होता. इतर राष्ट्रांनीं ज्या गोष्टी एकदम जुलमानें केल्या, त्या ह्यांनीं केल्या नाहींत. ह्मणून इंग्रजांचा अंमल दुःसह व एकदम अप्रिय झाला नाहीं, आणि त्यांची येथें वृद्धि होत गेली.

स. १६७२चे पूर्वी कंपनीची रोकड देवघेव ऑल्डरमन ब्लॅकवेल ह्याचे मार्फत चाले. ह्या ब्लॅकवेलची पेढी मोठी नामांकित होती. स.१६७८त ह्या पेढींत कंपनीच्या नावें २,३७,००० रुपये रकम पडली होती. कंपनीचा शेअरचा भावही स. १६७२ वर्षाइतका पूर्वी कधीं वाढला नव्हता. सर्व भांडवलाइतकें

उत्पन्न एका वर्षांत झालें. ह्यावरून कंपनीची पत किती वाढली ह्याची कल्पना होईल. सगळे भागीदार मिळून ८० च्या वर नव्हते, त्यांतही सर्व कारभार पाहणारे दहांच्या वर नव्हते. पुढें स १७५०त भागीदारांची संख्या ५०० असून, स. १७८०त ती दोन हजारांवर गेली होती. चोवीस डायरेक्टरांची सभा हीच काय ती सर्व कारभार मुखत्यारीनें करी.सर जशिया चाइल्ड कंपनीचा गव्हर्नर असतां, स. १६८५त कंपनीचें सुमारें $\frac{1}{3}$ भांडवल त्याचें एकट्याचें होतें. हा अंमलदार करडा असल्यामुळें, त्यानें हिंदुस्थानांतले सर्व नोकर आपल्या अगदीं धाकांत ठेविले होते. ‘ तुमच्या पत्राची भाषा उद्धट असते, अर्थाचा विपर्यास करतां, तुह्मी वेळेवर जबाब पाठवीत नाहीं, आमचे हुकूम अमलांत आणीत नाहीं, ह्याचा अर्थ काय ? आह्मी तुमचे उपरी असतां तुह्मी आमच्याशीं बरोबरीच्या नात्यानें वागूं पाहतां. ह्यामुळेंच कदाचित् तुमच्या कौन्सिलांत आणखी फेरफार करणें आह्मांस जरूर पडेल. तर हें नीट लक्षांत आणून आह्मांस तसें करण्यास तुह्मी भाग पाडणार नाहीं व ह्या पत्रांची सौम्य भाषा सोडण्यास आपण आह्मांस भाग पाडणार नाहीं, अशी आशा आहे. ’ अशा प्रकारचे कडक हुकूम हिंदुस्थानांतील अंमलदारांस इंग्लंडांतून जावे, आणि ते त्यांनीं अनेक सबबी सांगून धाब्यावर बसवावे, असा प्रकार सदैव चालू होता. पुढें शंभर वर्षांनीं झालेल्या फॉक्स व पिट्टच्या बिलांत हाच मुद्दा आहे. फार कशाला, विलायतेंतील अधिकाऱ्यांचे हुकूम हिंदुस्थानांतील अंमलदारांनीं तंतोतंत पाळले असते, तर हें राज्य त्यांनीं कमावलें नसतें, असा पुष्कळांचा अभिप्राय आहे.

स. १६१५त सर टॉमस रोनें कंपनीच्या व्यापाराची जी घडी बसविली तिचा पुढें ७० वर्षांत असा परिपोष झाला. पण पुढें रोची शिस्त बदलून औरंगजेब बादशहाशीं कंपनीनें युद्ध चालविलें; ह्या युद्धाप्रीत्यर्थ कंपनीस निव्वळ ४० लक्ष रुपये खर्च आला. त्याशिवाय व्यापाराचें काम बंद पडल्यानें सुमारें एक कोट रुपयांचें नुकसान झालें, तें वेगळेंच. हिंदुस्थानांतील फौजबंदी खर्च वाढला; इंग्लंडांत राज्यक्रान्ति झाल्यामुळें कंपनीच्या कामांतही बराच घोटाळा

उत्पन्न झाला. ह्या कारणांनीं कंपनीची पत फिरून उतरली; आणि स.१६८३त कंपनीच्या शेअरचा भाव शेंकडा ५००होता तो स.१६९२त१९०पर्यंत उतरला.

हिंदुस्थान, चीन वगैरे देशांतील सुबत्तेचा परिणाम युरोपच्या व्यापाराबर अतिशय घडतो हें अनेक विद्वानांनीं सिद्ध केलें आहे. हिंदुस्थानांत अवर्षणाच्या वगैरे योगानें दुष्काळ पडून धान्याच्या भावांत एकदम मोठा फरक पडला, कीं लगेच त्याचा परिणाम इंग्लंडच्या व्यापारावर घडल्याशिवाय राहत नाहीं, हा आज दोनशें वर्षांचा अनुभव आहे. सारांश, पृथ्वीवरील मोठमोठ्या व्यापारी शहरांत एकदम मोठी चलबिचल किंवा क्रान्ति झालेली दिसून आल्यास, त्याचें कारण हिंदुस्थान होय, म्हणजे हिंदुस्थानचा व्यापार होय, असें विद्वानांचें मत आहे. ( पहा, वर्डवूडचा रिपोर्ट, Birbwood's report of the old records of the India Office, टीप पृ. १०१–१०३ ).

**डाक्याच्या मलमली.**—डाक्का येथें अनेक प्रकारच्या उत्कृष्ट मलमली अगदीं पूर्वीपासून होत असत; साध्या, चौकडीच्या, पट्टेदार, ठिपकेदार, वेलबुट्टीच्या वगैरे. पैकीं साध्या तर अप्रतिम असत. त्या मलमली रोमन बादशाहाच्या पूर्वीपासून बाबिलोनियन व असिरियन राज्यांच्या अंमदानींतही प्रसिद्ध होत्या. स. १६६०–७०च्या दरम्यान ई० इं० कं०नें या मलमली प्रथम इंग्लंडांत आणिल्या, तेव्हांपासून सालोसाल दहा लक्ष रुपये किंमतीच्या मलमली हिंदुस्थानांतून बाहेर जात. कंपनीचे व्यापारी त्या मलमली इंग्लंडांत नेऊं लागल्यापासून त्यांचा खप तिकडे पुष्कळच होऊं लागला. स. १७८५त सूत कातण्याचें यंत्र इंग्लंडांत नॉटिंगहॅम् येथें प्रचारांत आल्यामुळें डाक्काचा व्यापार बसला. स. १७८७त डाक्काच्या जाड्या नमुन्यामुजब पांच लाख ठाणें इंग्लंडांत निघालीं. तेव्हां डाक्काच्या मालास अटकाव करण्यासाठीं इंग्लंडच्या कापडकऱ्यांनीं ओरड करून, हिंदुस्थानांतून येणाऱ्या कापडावर इंग्लंडांत शेंकडा ७५ टक्के जकात बसवून घेतली. त्यामुळें डाक्काचा खप हळू हळू कमी झाला. स. १७८७त ३० लाख रुपयांचा

माल इंग्लंडांत गेला, तर स. १८०७त फक्त ८॥ लाखांचा व स. १८१३त ३॥ लाखांचा गेला; आणि सन १८१७त तो सबंध नाहींसा झाला. तेव्हां कंपनीनें डाक्का येथील आपली पेढी उठवून घेतली. वर सांगितलेली कापडावरील ७५ टक्के जकात स. १८२५त कमी करून शेंकडा दहा टक्के करण्यात आली, तरी डाक्काची मलमल पुनः वर आली नाहीं. कारण इंग्रजी यंत्रांवर तयार झालेलें बारीक सूत हिंदुस्थानांत येऊन तेंच विशेष खपूं लागलें. ह्या इंग्रजी सुताचा खप हिंदुस्थानांत स. १८२७त ३० लाख पौंड होता, तो स. १८३७त ६६ लक्ष पौंड झाला. तेव्हांपासून मलमलीस लागणारें देशी सूत इकडे मुळींच निघेनासें झालें. अशा प्रकारें मलमलीच्या व्यापारानें अत्यंत भरभराटीस आलेलें डाक्का शहर इंग्रज अधिकाऱ्यांनीं भिकेस लाविलें. डाक्काप्रमाणेंच हिंदुस्थानांतील पूर्वीच्या सर्व सधन व्यापारी पेठांची दुर्दशा झाली आहे. इंग्लंडांतील नॉटिंगहॅम्, ग्लासगो वगैरे शहरांच्या भरभराटीसाठीं हिंदुस्थानच्या भरभराटीचा इंग्रजांनीं खून केला आहे. कंपनीच्या भरअमदानींत हिंदुस्थानचा व्यापार पुष्कळ वृद्धिंगत झाला होता. कांहीं कांहीं जिन्नस तर नवीन तयार होऊं लागले होते. इंग्लंडांतून प्रतिवर्षी उत्कृष्ट लोकरी कापड, फ्लानेल वगैरे इकडे येई, तें पाहून इकडचे कारागीर लोक तसलीं वस्त्रें इकडे अनेक ठिकाणीं तयार करूं लागले होते. ' म्हणजे सर बर्डवूडच्या मतें, हिंदुस्थानास नागविलें तें कंपनीनें नव्हे, तर इंग्रज सरकारानें.

सतराव्या शतकाच्या अखेरीस व अठराव्याच्या आरंभीं हिंदुस्थानांतील व्यापाराकडे इंग्रजांचें लक्ष फारच लागलें. कंपनीस झालेला अतोनात फायदा पाहून सर्वांच्या तोंडास पाणी सुटलें; आणि कंपनीचा मक्ता न जुमानतां खासगी रीतीनें बाहेर गलबतें पाठवून व्यापार करणारांची संख्या अतोनात वाढली. ह्यांसच पायरेट्स ( Pirates ) किंवा इंटरलोपर्स (Interlopers ) म्हणजे चांचे अशा संज्ञा ग्रंथकारांनीं दिल्या आहेत. हा चांचेपणाचा धंदा फार दिवस बंद झाला नाहीं. युरोपांत अठराव्या शतकांत इंग्लंडचा बहुतेक काळ दुसऱ्या राष्ट्रांशीं मोठमोठीं युद्धें करण्यांत गेला. ह्या

युद्धांचा खर्च भागण्यासाठीं राष्ट्रानें कंपनीकडून मोठाल्या रकमा कर्जाऊ घेतल्या होत्या. त्यामुळें कंपनीचा मक्ता मोडून टाकण्याचें किंवा यांचे लोकांचा बंदोबस्त करण्याचें काम राष्ट्रानें मनावर घेतलें नाहीं. कंपनीच्या योगानें राष्ट्राचा मोठाच फायदा होत होता. कंपनीच्या नोकरींत जे इसम गुंतलेले असत, ते मरण पावल्यावर, त्यांच्या मुलांस नोकरी देऊन, अगर अन्य तऱ्हेनें त्यांच्या बायकामुलांचा सांभाळ करून, कंपनी त्यांचा चांगला परामर्ष घेई. कंपनीच्या खर्चानें पोसणाऱ्या अशा लोकांची संख्या इंग्लंडांत मोठी होती. सन १६८९ नंतर कंपनी मोडण्याच्या विरुद्ध उद्योग सुरू झाला, तेव्हां विधवांनीं व मुलांनीं पार्लमेंटाकडे अर्ज करून, कंपनी मोडूं नये, अशी विनंती केली. सारांश, इंग्लंडची भरभराट ज्या व्यापारावर अवलंबून होती त्याचा बराच मोठा हिस्सा हिंदुस्थान वगैरे ठिकाणीं कंपनीच्या हातांत होता. ( Cunningham's Growth of England's Commerce. )

एकाद्या राष्ट्रानें व्यापाराच्या कामांत आपली व्यवस्था कसकशी बदलीत जावी याचें उत्कृष्ट प्रत्यंतर ईस्ट इंडिया कंपनीच्या इतिहासावरून मिळतें. पहिल्या शंभर वर्षांत इंग्लंडांत कंपनीच्या विरुद्ध ओरड अशी होती, कीं राज्यांतील पैसा व माणसें ही कंपनी धुऊन बाहेर नेत आहे. सुमारें शंभर वर्षें उद्योग करून कंपनीनें ही ओरड बंद पाडिली, आणि ही ओरड निराधार आहे असें प्रत्यक्ष रीतीनें लोकांस दाखविलें. पुढें अठराव्या शतकाच्या आरंभीं कंपनीविरुद्ध एक दुसरीच ओरड सुरू झाली. हिंदुस्थानांत विणलेलीं रेशमाचीं व कापसाचीं उत्कृष्ट वस्त्रें इंग्लंडांत आणून कंपनी स्वस्त दरानें विकूं लागल्यामुळें, इंग्लंडचे कारागीर रिकामे बसले आणि त्यांच्या पोटावर पाय आला. हिंदुस्थानांतील तलम कापडाचा खप इंग्लंडांत इतका होऊं लागला, कीं मोलकरीणबाईपासून तों तहत बड्या सरदारापर्यंत कोणासच हिंदुस्थानांतील कापडाशिवाय सुचेनासें झालें. लोकांच्या अंगावर, घरांतील सामानाच्या शृंगारास, आणि खोल्या वगैरे सजविण्यास, जिकडे पाहावें तिकडे

हिंदुस्थानचा कपडा. विलायतेंतून कांहीं कुशल कारागीर म्हणजे कोष्टी, रंगारी वगैरे हिंदुस्थानांत आणून, त्यांजकडून एतद्देशीय मजुरांस शिकवून इंग्लंडांत खप होईल असा कपडा कंपनी विलायतेस नेऊं लागली. ह्यामुळें थोड्या व्यापाऱ्यांस मोठा नफा होई ही गोष्ट खरी, पण त्यामुळें हजारों इंग्रज कारागिरांच्या तोंडचें अन्न गेलें. नॉरविच् वगैरे शहरांतून ह्याजबद्दल पार्लमेंटाकडे भराभर अर्ज आले. तेव्हां इ० स० १७००त पार्लमेंटानें कायदा करून असें ठरविलें, कीं कंपनीनें हिंदुस्थानांतील कपडा आणून तो इंग्लंडांत विकूं नये; पाहिजे तर तो इंग्लंडाच्या बाहेर युरोपांत पाठवून खुशाल विकावा. ह्या कायद्यामुळें इंग्लंडच्या कारागिरांचें संरक्षण झालें आणि लवकरच त्यांची ओरड मिटली.

हिंदुस्थानच्या संबंधानें पाहिलें तर व्यापाराच्या दृष्टीनें कंपनीच्या वरील कृतीनें आपल्या देशाचें फारसें नुकसान होत नव्हतें; पण पुढें जेव्हां यंत्रांचा प्रसार झाला, आणि हिंदुस्थानांत झालेला कच्चा माल विलायतेंत नेऊन तेथें यंत्रसामुग्रीच्या मदतीनें हिंदुस्थानांत खपणारा माल तयार करून तो कंपनी हिंदुस्थानांत आणून विकूं लागली, तेव्हां विलायतेच्या पार्लमेंटाप्रमाणें आपल्या देशांतील कारागिरांचें संरक्षण करण्यास येथें कोणी शास्ता नसल्यामुळें, आपल्या लोकांची किफायत सर्वस्वीं बुडाली, आणि आह्मी हलके हलके दरिद्री व अन्नास मोताद झालों.

साखर, रेशीम व विशेषतः सोरा हे जिन्नस बंगाल्यांत मुबलक व स्वस्त मिळत, आणि त्यांत कंपनीस मोठी किफायत होई. सन १६५०च्या सुमारास एका पत्रांत कंपनीनें खालील मजकूर इकडे लिहून पाठविलेला आढळतो.'सोऱ्या-साठीं पाटणा इतकी उत्कृष्ट जागा दुसरी नाहीं असें सर्व सांगतात. ह्मणून कसेंही करून पाटणा येथें व्यवस्था करून सोरा मिळवीत जा. एकट्या सोऱ्याच्या व्यापारांत निदान निम्में तरी भांडवल तुह्मी खर्च करीत जा; आणि हुगळी येथें तो सोरा शुद्ध करून इकडे रवाना करा.' रेशीम व साखर त्यांविषयींही अशाच ताकिदी आहेत.

बंगाल्यांतून कंपनीस अतिशय किफायत होत होती. पण आरंभीं पुष्कळ दिवस अडचणी येऊन तेथें त्यांचा जम बसला नाहीं. नानाप्रकारचीं संकटें आलीं, तरी धीर खचूं न देतां, 'फिरून यत्न करून पहा,' ह्या तत्त्वावर कंपनीनें बंगल्यांत उद्योग चालू ठेविला, त्यामुळेंच तिला अंतीं यश आलें, ही गोष्ट कंपनीच्या प्रत्येक व्यवहारांत अगदीं स्पष्ट दिसून येते. स. १६५८च्या सुमारास कंपनीनें बंगाल्यांतील आपल्या नोकरांची संख्या दुप्पट वाढविली; नोकरांच्या दुर्वर्तनास आळा घातला, आणि त्यांचे पगार वाढविले. शहाजहानच्या दुखण्यानें मोगल बादशाहींत कलहाग्नि उसळला असतां, इंग्रजांनीं स्वस्थ चित्त ठेवून आपला उद्योग धिमेपणानें चालू ठेविला.

स. १६६१त दुसऱ्या चार्लस राजानें कंपनीला नवी सनद दिली. क्रिस्ती राष्ट्रांशिवाय इतरांशीं बेलाशक युद्ध करून आपला व्यापार वाढवावा, असा अधिकार ह्या सनदेंत राजानें कंपनीला दिला होता. सर एडवर्ड ट्रुइंटर ह्यास कंपनीनें मद्रासचा प्रेसिडेंट नेमून त्याजकडे बंगालची व्यवस्था सांगितली. 'शांतपणानें वागून किंवा हांजी हांजी करून आपला व्यापार वाढावयाचा नाहीं. जो कोणी मोगल अधिकारी जकात मागेल, त्याजवर एकदम शस्त्र उचलावें आणि दांडगाई करून वाटेल तसा व्यापार चालवावा,' अशी ट्रुइंटरच्या मनाची खात्री झाली. त्या वेळेस हिंदुस्थानांत औरंगजेबाचा अंमल सुरू होऊन प्रख्यात मीरजुम्ला बंगालचा कारभारी होता. त्याची कांहीं आगळीक ह्या इंग्रजांनीं केली, त्याबरोबर त्यानें इंग्रजांवर शस्त्र धरलें. तेव्हां ट्रुइंटरचे डोळे उघडले आणि त्यास कंपनीनें परत बोलाविलें. तरी व्यापाराचें काम चालूच असून त्यांत कंपनीस किफायतही चांगली होत असे. त्यांनीं गंगा नदीची व तींतील पाण्याच्या खोलीची नीट तपासणी केली, आणि नदींतून मालाची नेआण करून बंगाल प्रांतांतील बंदरोबंदरांचा स्थानिक व्यापार सुद्धां आपल्या कबजांत घेतला. त्यामुळें एतद्देशीय व्यापाऱ्यांची व इंग्रज व्यापाऱ्यांची चुरस लागली. मीर जुम्ल्यानंतर शाएस्तेखान कारभारावर आला, त्यानें आपल्या प्रांताचा बंदोबस्त उत्कृष्ट ठेवून, कंपनीस मिळालेल्या फर्मानांनीं आपल्या व्यापाऱ्यांचें नुकसान होऊं नये असे प्रयत्न चालविले.

स. १६७६त **सर स्टेन्शॅम मास्टर** ह्याची नेमणूक बंगाल्यांत झाली. ह्या पूर्वी सुरतेस असून स. १६७०च्या शिवाजीनें केलेल्या स्वारीच्या प्रसंगीं सुरतेस चांगला लौकिक संपादन करून पुढें तो विलायतेस गेला. तेथें त्यास हुकूम मिळाला कीं, कंपनीच्या व्यवहाराचे सुरत येथील हिशेब व पुस्तकें वगैरे तपासून, कामाची पद्धत ठरवून द्यावी; बाहेरून आलेला माल किफायतशीर कसा खपेल, व इकडून नेलेल्या कोणत्या मालास विलायतेंत दर येईल, कंपनीच्या नोकरांची नीति व राहणी बिघडली आहे ती सुधारण्यास कोणते उपाय करावे, त्यांजमध्यें नानाप्रकारचे तंटेबखेडे होत ते कसे मिटवावे, इत्यादि गोष्टींचा पूर्ण तपास करून विलायतेस रिपोर्ट पाठवावा, अशी त्यास ताकीद होती. त्याप्रमाणें स. १६७६त तो हिंदुस्थानांत आला. ह्या गृहस्थानें तपास करून हकीकत लिहून ठेविली आहे, तिजवरून त्या वेळची बरीच माहिती मिळते.

हुगळी व कासिमबाजार ह्या दोनच इंग्रजांच्या वसाहती आरंभीं बंगाल्यांत होत्या. येथें ते आपला बहुतेक माल आणून विकीत. तिसरी जागा बालासोर. येथें ते आपलीं गलबतें रिकामीं करीत व भरीत. सर स्टेन्शॅम मास्टर हुगळी येथें प्रथम आला, तेव्हां त्याच्या जहाजासभोंवार मासे विकणाऱ्या अनेक लहान लहान होड्या गोळा झाल्या. एक आणा दिला कीं दहा असामींचें पोट भरण्याइतके मासे विकत मिळत. हुगळी येथें व्यापाराच्या सोयी फार चांगल्या आहेत असें मास्टर ह्यास दिसून आलें. येथें रेशीम, साखर, अफू, तांदूळ, गहूं, तेल, तूप, अंबाडी, ताग ह्या जिनसांची खरेदीविक्री मोठ्या झपाट्याची चालत असे. आजूबाजूच्या प्रदेशांत कोष्ट्यांची वस्ती मोठी होती.

इंग्रजांच्या वखारींत नेहमीं एक एतद्देशीय दुभाष्या असे. अशा दुभाष्याच्या हातांत सौदा करण्याचें काम असल्यामुळें, त्याचें माहात्म्य मोठें होतें. राघो पोतदार ह्मणून असाच एक वजनदार गृहस्थ कासीमबाजार येथें असून, त्याचा इंग्रजांनीं खून केल्यामुळें मोठें प्रकरण माजलें होतें. सभोंवतालच्या

प्रदेशांत फिरून कंपनीकरितां मालाचा सौदा करावा, हें दुभाष्याचें मुख्य काम होतें. त्यास जामीन द्यावा लागे, आणि एकंदर सौद्यावर शेंकडा तीन टक्के त्यास मिळत. कित्येक वेळां आजूबाजूचे व्यापारी मालाचे नमुने घेऊन वखारींत येत. अशा प्रकारें सौदा ठरल्यावर त्या व्यापाऱ्यांस कंपनीच्या अधिकाऱ्यांकडून जकातीच्या माफीचा पास मिळे. इंग्रजांच्या वखारींतून विक्रीसाठीं बाहेर जाणाऱ्या मालावर आणि बाहेरून विक्रीसाठीं वखारींत येणाऱ्या मालावर, अशा दोनही प्रकारची जकात ह्या पासांत माफ होती.

त्या आरंभींच्या काळीं इकडे आलेले इंग्रज लोक हल्लींच्या सारखे एतद्देशीयांपासून तुटक राहत नसत. ते लोकांत मिसळत व पुष्कळ अंशीं इकडच्याच रीतीभाती पाळीत. सामान्य इंग्रज लोक बहुधा खालीं जमिनीवर सतरंजी वगैरे टाकून बसत व नेहमींच मेजावर जेवीत असें नाहीं, पुष्कळदां इकडच्या रिवाजाप्रमाणें जमिनीवर बसून जेवीत. हल्लींच्या प्रमाणें ते हिंदी समाजापासून दूर व सर्व प्रकारें अलग राहिले असते, तर त्यांचा पाय येथें कायम झाला नसता. ह्या बाबतींत सुरतेपेक्षां बंगाल्यांतल्या इंग्रजांत ढिलाई, व्यसन व अव्यवस्था हे दोष अतोनात होते. सुरतेस मात्र चांगला बंदोबस्त होता. बंगाल्यांतील इंग्रजांविषयीं शाएस्तेखान नेहमीं म्हणे, ‘ ह्यांच्याइतके दुष्ट, भांडखोर, व लबाड दुसरे लोक कोणी नसतील. ’ सर हेन्री यूल लिहितो, कीं ‘ ह्या वेळच्या त्यांच्या निंद्य वर्तनावरून पुढें हे चांगलें नांव काढतील आणि ह्यांच्यांतूनच एल्फिन्स्टन, मन्रो, माल्कम, लॉरेन्स ह्यांच्या सारखे कर्तृत्ववान पुरुष निपजतील, असें कोणास वाटलें नसतें. ’ आपसांत जरी हे लोक भांडत व दुर्वर्तन करीत, तरी एतद्देशीय व्यापाऱ्यांस ते भयंकर छळीत असत. त्यांच्या तावडींत आमचे व्यापारी सांपडले म्हणजे त्यांनीं कंपनीचा माल अतिशय महाग दरानें विकत घ्यावा आणि आपला स्वतःचा माल अतिशय स्वस्त दरानें कंपनीस विकावा, म्हणून हे इंग्रज नाना तऱ्हा करून त्या व्यापाऱ्यांच्या पाठीस लागत, त्यांस एकटे सोडीत नसत, आणि बाजारभावांची दाद त्यांस लागूं देत नसत.

वखारीत इंग्रजांच्या मेजावर हरतऱ्हेच्या सामानाची सदैव चंगळ असे. भाजीपाला, फळफळावळ, शिकार, मांस इत्यादि भोजनाचे पदार्थ त्यांस अगदीं स्वल्पांत व मुबलक मिळत. प्रत्येकाचीं वेगवेगळीं टोलेजंग घरें असून त्यांसभोंवार विस्तृत बागा असत, त्यांत बहुधा वाटेल त्या भाज्या व फळें तयार होत. कपडालत्ता सुद्धां त्यांस पाहिजे तसा अगदीं मातीमोल मिळत असे.

स. १६९९त बंगाल प्रांतांतील सर्व वखारींचा स्वतंत्र प्रेसिडेन्सि म्हणजे इलाखा करण्यांत आला तेव्हां चार्लस आयर ( Eyer ) हा बंगालचा पहिला प्रेसिडेंट झाला.

---

# प्रकरण बारावें.

## राज्यस्थापनेची हांव.

( स. १६८८. )

१ चढावाचा उपक्रम. २ राजकीय परिस्थिति.
३ कलकत्याची स्थापना. ४ औरंगजेबाशीं युद्ध.
५ मद्रासची स्थिति.

**१. चढावाचा उपक्रम.**—व्यक्तीचें व राष्ट्राचें चरित्र ह्यांत पुष्कळदां चांगलें साम्य असतें. ह्याचें एक उदाहरण कंपनीच्या ह्या वेळच्या उद्योगांत मिळतें. प्रथम कंपनी गरीब होती, तोंवर ती एतद्देशीय अधिकाऱ्यांची मर्जी संभाळून असे. पुढें क्रॉम्वेलच्या व्यवस्थेनंतर कंपनीला दहा बीस वर्षांत जी भरभराटीची स्थिति प्राप्त झाली, तीमुळें पूर्वीच्या मर्यादा तीस आवडेनाशा झाल्या; आणि राज्यस्थापनेच्या नादाकडे तिचें लक्ष लागलें. हा प्रकार आतां सांगावयाचा आहे.

हिंदुस्थानांत काम करणाऱ्या इंग्रजी अधिकाऱ्यांस शहाणा, हुशार, धाट अशीं विशेषणें इतिहासकार देऊं लागले, ह्मणजे ह्या ह्मणण्याचा रोंख काय हें आतां एतद्देशीय लोकांस बरेंच समजूं लागलें आहे. न्यायान्याय न पाहतां, आपल्या राष्ट्राचें राज्य वाढवावें, पैसा व सत्ता यांची कमाई करावी, एतद्देशीयांस जिंकावें आणि असें करण्यांत एखादे वेळेस पाय घसरला तरी डगमगूं नये, असें ज्या अधिकाऱ्यांचें वर्तन असतें, त्यांसच हिंदुस्थानच्या इंग्रजी इतिहासांत हुशार, किंबहुना थोर अशी पदवी मिळालेली आहे. हा प्रकार अलीकडे सुरू झाला आहे असें नाहीं. ऑक्झंडन, ऑंजियर, चाइल्ड वगैरे अधिकाऱ्यांची इतिहासकारांनीं कशी प्रशंसा केली आहे हें वर सांगितलेंच आहे. त्या प्रशंसेच्या मुळाशीं निराळाच प्रकार दिसतो. क्रॉम्वेलनें डच राष्ट्राचा पाडाव करून कंपनीच्या व्यापाराची सुव्यवस्था लावून दिल्यावर पंचवीस वर्षांत कंपनीची अतिशय भरभराट झाली. पोर्तुगीझ लोकांची सत्ता संपून डच लोकही मंदावले. अशा स्थितींत व्यापाराचा उद्योग थोडासा बाजूस ठेवून, त्याच्या नांवाखालीं राज्यप्राप्तीचा उद्योग हातीं घेतां येईल, आणि जपून वागलें तर तो सिद्धिसही जाईल, अशीं स्वप्नें कंपनीच्या इकडील कित्येक नोकरांस पडूं लागलीं. मुंबईसारख्या स्वतंत्र जागा कंपनीच्या ताब्यांत आल्यापासून, एकमेकांशीं झगडणाऱ्या एतद्देशीय सत्ताधीशांच्या दरम्यान लुब्रेपणा करण्यास कंपनीस चांगली सवड झाली. राज्यस्थापनेचीं स्वप्नें प्रथम ज्या इसमांस पडलीं, तेच ऑक्झंडन, ऑंजियर व चाइल्ड हे अधिकारी होत. ह्या कामीं त्यांची कडी एकावर एक होती. तत्कालीन राजकीय परिस्थिति त्यांस चांगली अवगत होती. आपल्या आरमाराचें खरें सामर्थ्य ते जाणून होते. मोगल बादशहा औरंगजेब हट्टास पेटून, सर्व राज्याची धूळधाण करून टाकीत आहे हें त्यांनीं पाहिलें. चाइल्डनें तर एकदम उतावळ करून बादशहाशीं दोन हात करून पाहिले. पण कसें झालें, तरी त्या वेळची कंपनीची वाढती सत्ता व औरंगजेबाचें पडकें सामर्थ्य ह्यांची तुलना कशी होणार ? औरंगजेबानें इंग्रजांस सहज चिरडून टाकिलें व आपण शिक्षा देण्याइतकेही ते लायक नाहींत असें

समजून, त्यांजवर दयाही केली. त्याच सुमारास चाइल्ड यास मृत्यूनें सोडविलें आणि कंपनीचा जीव बचावला. हा प्रकार समजण्याकरितां, मुंबईची व्यवस्था, बंगालचा सुभेदार शाएस्तेखान याचें इंग्रजांशीं वर्तन, व ई० इं० कंपनीचे घाट इत्यादि एकांत एक गुंतलेले विषय समजून घेतले पाहिजेत. त्यांतच दुसऱ्या एका महत्त्वाच्या प्रश्नाचा उलगडा आहे. हिंदुस्थान देश आपणास जिंकता येईल, ही गोष्ट प्रथम डुप्ले ह्यानें उघडकीस आणिली, आणि स. १७५०च्या सुमारास इंग्रज व फ्रेंच हे दोघेही त्या उद्योगास लागले, हा जो सामान्यतः समज आहे तो चुकीचा होय. मराठे जर नवीन राज्य स्थापित आहेत, तर आपणांसही तें कां स्थापतां येणार नाहीं? बादशहाचे सुभेदार बंगाल वगैरे ठिकाणीं जर स्वतंत्रतेनें कारभार करितात, तर आपणांसही तो प्रकार कां साधूं नये? असे प्रश्न शिवाजीच्या वेळेसच विचारी व दूरदृष्टि इंग्रजांच्या मनांत येऊं लागले होते. पोर्तुगीझांनीं तर हा प्रयोग अगोदरच सिद्धीस नेला होता. अशी स्थिति असतां, कंपनीनें स. १७५० पर्यंत शांतपणानें व्यापाराचें काम केलें आणि तेव्हांपासून मात्र ती राज्य कमावण्याच्या उद्योगास लागली, हा समज चुकीचा होय. क्लाइव्हच्या पूर्वीं पाऊणशें वर्षें ह्या कामीं कंपनीची धडपड चालू होती. मात्र क्लाइव्हचा उद्योग सिद्धीस गेला व तत्पूर्वीची मंडळी फसली. हा प्रकार आतां समजून सांगावयाचा आहे.

स. १७७७त ऑंजियर मरण पावल्यावर रोल्ट हा कांहीं दिवस प्रेसिडेंट झाला. तो व्यापाराच्या कामांत हुशार होता; पण मोगल व मराठे ह्यांजपाशीं कसब लढवून आपला लाग साधून घेण्याइतका तो चलाख नसल्यामुळें, त्याजबद्दल इतिहासकारांनीं तिरस्कार व्यक्त केला आहे. विलायतेहून हुकूम येत कीं एतद्देशीयांच्या झगड्यांत पडूं नये. हे हुकूम अक्षरशः पाळण्याचा प्रयत्न केल्यामुळें त्यास यश आलें नाहीं. त्याच्या पश्चात् जॉन चाइल्डची प्रेसिडेंटच्या जागयावर नेमणूक झाली, तेव्हांच कंपनीच्या कारभारास तेजी आली. कंपनीच्या ताब्यांत आतां थोडें बहुत लष्करही तयार झालें होतें. ऑंजियर व चाइल्ड ह्यांनीं लष्कराच्या व्यवस्थेकडे विशेष लक्ष दिलें; कारण त्यांचे

मनांत राज्यस्थापनेचे विचार घोळत होते. कंपनीच्या हुकुमांत नेहमीं अशीं वाक्यें आढळतात. ' आह्मांस आपलें संरक्षण करितां यावें, व व्यापार वाढवितां यावा, ह्मणूनच आह्मीं लष्कर बाळगितों; उगाच युद्ध करून विजय संपादण्याची हांव आह्मांस नको. ' तथापि संरक्षणाची सबब कांहीं थोडी नाहीं. तेवढ्यावरच ऑंजियर व चाइल्ड यांनीं सर्व इमारत रचिली. स्वसंरक्षणासाठीं नुसतें लष्कर ठेवूनच भागावयाचें नाहीं. इकडे येणाऱ्या प्रत्येक इंग्रजानें लष्करी काम करण्यास तयार असलें पाहिजे, असाही कंपनीचा ठराव होता. ह्या ठरावानेंच अनेक कलमबहादर सेनापति बनले.

२. **राजकीय परिस्थितिः**—बंगाल्यांतील इंग्रजांच्या वसाहतींची हकीकत मागें आली असून मुसलमानी रियासतीचाही संदर्भ येथें ध्यानांत ठेवला पाहिजे. स. १६५९त बंगालच्या कारभारावर औरंगजेब बादशहानें प्रसिद्ध मीरजुम्ला यास सुभेदार नेमिलें. हा अंमलदार हुशार व दक्ष होता. कंपनीच्या हुगळी येथील एजंटानें गंगा नदीवर एका एतद्देशीय व्यापाऱ्याची होडी पकडून ठेविली, कारण त्या व्यापाऱ्याकडे कंपनीचें कांहीं घेणें होतें. ही गोष्ट मीरजुम्ला ह्यास समजल्यावर त्यास कंपनीच्या लोकांचा फार राग आला. त्यानें इंग्रजांची हुगळीची वखार जप्त करून बंगाल्यांतून इंग्रजांस घालवून देऊं अशी धमकी दिली. कंपनीच्या एजंटानें हें प्रकरण सुरतेस लिहून कळविलें. सुरतेहून त्यास ठपका येऊन जप्त केलेली होडी परत देण्याविषयीं हुकूम आला. ' इतकें करून सुभेदाराची समजूत न होईल तर सर्वांनीं बंगाल प्रांत सोडून निघून येण्याची तयारी करावी. ' ' मोगल अधिकाऱ्यांविषयीं फार सावध असा ;त्यांच्या गोड बोलण्यावर विश्वास ठेवूं नका. त्यांच्या मनांत जेव्हा कांहीं तरी भयंकर प्रकार वागत असतो, तेव्हांच बाहेरून ते विशेष गोडी दाखवीत असतात, ' असें सुरतेहून लिहून गेलें. असो, पुढें एवढ्यावर हें प्रकरण विझलें. मीरजुम्ला स. १६६३त मरण पावला; आणि त्याच्या जागेवर शाएस्तेखानाची नेमणूक झाली.

मुंबई बेट स्वतंत्रतेनें इंग्रजांस मिळून तेथें ते आपला बंदोबस्त करूं

लागले ही गोष्ट मोगलांस अर्थातच आवली नाहीं. त्यांच्या मनांत तेव्हांपासून इंग्रजांविषयीं वैषम्य उत्पन्न झालें. मुंबईच्या इंग्रजांत दोन पक्ष होते,--एक इंग्लंडच्या राजाचा व एक कंपनीचा. राजाच्या पक्षानें मोगलांशीं दांडगाई वगैरे केली, त्याबद्दल कंपनीलाच बादशहानें जबाबदार धरिलें. कारण इंग्रजांत असे दोन पक्ष आहेत, ही गोष्ट इकडे एतद्देशीय अधिकाऱ्यांस कळण्याजोगी नव्हती. कंपनीचें वर्तन सामदामाचें असे. ऑंजियरसारखी मंडळी राज्यस्थापनेच्या लांब लांब गोष्टी विलायतेस लिहून पाठवीत, त्या कंपनीच्या अधिकाऱ्यांस खऱ्या वाटत नसत. त्या वेळीं सुद्धां हिंदुस्थानचें राज्य त्यांच्या आटोक्यांत होतें, पण तसा प्रयत्न करण्यास लागणारी सामुग्री त्यांचेपाशीं नव्हती. या पुस्तकांस ब्रूस Bruce's Annals of British Commerce ह्मणतो, "शिवाजी किंवा मोगल यांजबरोबर प्रेसिडेंटानें कोणत्या प्रकारचा व्यवहार ठेवावा, ह्याचे धोरण ठरविणें सोडून देऊन, उलट 'सावधगिरीनें वागा, तंटे उपस्थित करूं नका,' अशा रीतीचा मजकूर कंपनी आपल्या अधिकाऱ्यांस लिहून पाठवीत असे; अशा समजावणीनें प्रेसिडेंटाच्या अडचणी भागत नसत. विलायतेंतील अधिकाऱ्यांस हिंदुस्थानांतील व्यवहारांची खरी कल्पना नव्हती. ह्मणून हिंदुस्थानांतील नोकरांच्या अडचणी त्यांस कळत नसत आणि त्यांनीं लिहिलेल्या पत्रांनीं हिंदुस्थानांतलें काम भागत नसे. शिवाजीच्या मृत्यूनंतर औरंगजेब दक्षिणेंत उतरल्यापासून मोगल, मराठे, सीदी, विजापुर, व गोवळकोंडा येथील सुलतान यांजमधील भानगडींनी दक्षिण देश उद्ध्वस्त होत होता. त्यामुळें इंग्रजांच्या व्यापारासही ठोकर बसली. सुरतच्या वखारीस दहा लाख रुपये कर्ज झालें होतें. अशा स्थितींत मुंबईस किल्ला वगैरे बांधून ज्यास्त खर्च करण्यास कंपनी तयार नव्हती. ह्मणून सुरतच्या कौन्सिलनें विलायतेहून पन्नास लाख रुपये मागितले होते ते कंपनीनें मंजूर केले नाहींत.

तथापि प्रत्यक्ष कंपनीच्या मतांतही हळूहळू फरक पडत चालला होता. कंपनीच्या एका पत्रांत खालील मजकूर आहे. "हिगिन्सन ह्यास आह्मी एकदम मोठी जागा दिली ह्याबद्दल तुह्मांस वैषम्य वाटण्याचें कारण

नाहीं. हिगिन्सनबद्दल आमच्या मनांत पक्षपात नाहीं, किंवा त्याच्याबद्दल आमच्याकडे कोणी शिफारसही केलेली नाहीं. प्रत्यक्ष त्याच्या मनांतही त्या जागेविषयीं अभिलाष नाहीं. शिवाय त्या नेमणुकीनें दुसऱ्या कोणाचा उपमर्द करण्याचीही आमची इच्छा नाहीं. ही नेमणूक आह्मी खरोखर राष्ट्रहिताच्याच बुद्धीनें केलेली आहे. मि. हिगिन्सन विद्वान आहे; लॅटिन व ग्रीक भाषा त्यास येतात; इतिहासाची त्यास आवड आहे आणि जात्याबुद्धिमान असल्यामुळें कंपनीचा कारभार हाकण्यास व राजकीय उलाढाली समजण्यास तो योग्य आहे. आम्हांस जो जगाचा अनुभव आहे त्यावरून, असलें काम करणारास त्या त्या राष्ट्रांचे कायदेकानु व रीतीभाती माहित पाहिजेत; तरच परकीय राजांशीं तह, युद्ध किंवा व्यापार हीं कामें त्यास करतां येतील. नुसतें लहानपणापासून सर्व आयुष्य हिंदुस्थानांत गेलें, किंवा तेथील भाषा शिकण्यांत फार दिवस घालविले, किंवा व्यापाराच्या उलाढाली समजून घेतल्या म्हणजे भागलें असें नाहीं. फोर्टसेंटजॉर्ज येथील डेप्युटीच्या जागेचें काम करण्यास वरील सर्व गुणांची जरूर आहे खरी, तरी पण त्याहूनही जास्त विद्वत्तेची आतां जरूर आहे. आम्ही जेव्हां नुसते व्यापाराच्याच मार्गे होतों, तेव्हां हे गुण कदाचित् पुरे झाले असते, पण हल्लीं आमच्या थोर राजांनीं आम्हांवर मेहेरबानी करून आम्हांस सनदा वगैरे देऊन आमची सत्ता व आमचे अधिकार वाढविले आहेत. आतां हिंदुस्थानांत राजाचीच योग्यता आमच्या अंगीं आली आहे. त्यामुळें डचलोकांप्रमाणें आम्हांसही स्वतःचा बचाव दोस्तांस मदत, व शत्रूंस शिक्षा करणें प्राप्त झालें आहे.' 'लष्कर ठेवणें, राज्यव्यवस्था बांधणें, वसूल वाढविणें वगैरे कामें आपण आतां इतक्या नेटानें हिंदुस्थानांत चालविलीं पाहिजेत तीं तेथें आपलें विस्तृत व चिरकालीन राज्य मजबूद पायावर निर्माण होईल.' व्यापारा इतकेंच राज्याचें उत्पन्न वाढविण्याकडे आपण लक्ष दिलें पाहिजे, म्हणजे व्यापारास किती ही हरकती आल्या तरी आपलें लष्कर शाबूद राहील. लष्कराच्या जोराशिवाय तेथें आपणांस विचारणार कोण! डच लोकांनीं हाच मार्ग स्वीकारला. त्यांच्या हुकमांत

एक पान व्यापाराविषयीं असलें तर दहा पानें राज्यकारभारासंबंधीं असतात.'

हे लेख स. १६८६च्या सुमाराचे आहेत. त्यावरून कंपनीची महत्त्वाकांक्षा त्या वेळीं काय होती हें कळून येतें. सर जॉन चाइल्ड मुंबईस काम पाहूं लागल्यापासून हिंदुस्थानांत कंपनीची मजबुदी करण्याकडे अधिकाऱ्यांचे विशेष लक्ष होतें. सुरतेवर मराठे झडप घालूं लागल्यामुळें तेथची मोगल सत्ता बहुतेक नाहींशी झाली होती. तिकडे कर्नाटक व मद्रास हेही प्रांत अशाच स्थितींत होते. म्हणून जहाजें वाढवून त्यांवरून तोफांनीं आपला बंदोबस्त करणें एवढाच उपाय कंपनीच्या स्वाधीन होता. हा उपाय हळूहळू अमलांत आला. सुरत सोडून इंग्रज मुंबईस आले. तिकडे बंगाल प्रांत धुंडाळतां कलकत्त्याची स्थापना झाली. मद्रासेस तोच प्रकार झाला. कंपनीच्या राज्यस्थापनेचें सर्व बीज गलबतें व तोफा ह्यांजवर असून, हल्लींही ब्रिटिश राज्याचें संरक्षण त्यांवरच होत आहे. कोर्ट ऑफ् डायरेक्टरांनीं स. १६८४त धरसोडीचा क्रम सोडून, फौज, किल्ले व लढाऊ जहाजें ह्यांच्या योगानें मुंबईस व इतर ठिकाणीं आपली सत्ता बळकट करण्याचा निर्धार केला. तथापि खर्च फारसा करूं नये, आणि व्यापाराचा बाणा सोडूं नये, ह्या दोन गोष्टींत कंपनीचें मत पहिल्याप्रमाणेंच अढळ होतें. पण सुरत सोडून मुंबईस आल्यावर नवीन प्रकार उद्भवला. मुंबईस इंग्रजांस मोगलांचा आश्रय नाहींसा झाल्यामुळें, एक तर आपला आपणच बंदोबस्त केला पाहिजे, नाहीं तर हिंदुस्थान सोडून चालतें तरी झालें पाहिजे, असा प्रश्न त्यांजपुढें येऊन पडला. इकडे बंगाल्यांत शाएस्तेखानाशीं इंग्रजांचा झगडा सुरू होऊन, तेथेंही शस्त्र तरी धारण करावें, नाहीं तर बंगाल प्रांत सोडून चालतें व्हावें, असा प्रसंग आला. स. १६१६त सर टॉमस रोनें कंपनीची कर्तव्यमर्यादा ठरवून दिली तेव्हांपासून ७० वर्षेंपावेतों, रोनें घालून दिलेल्या मर्यादेंत कंपनीचा उद्योग चालू होता. रो म्हणतो, 'युद्ध व व्यापार हीं परस्पर विरुद्ध आहेत. तुम्हांस माझें निग्रहाचें सांगणें आहे कीं, तुम्ही समुद्राशिवाय इतरत्र युद्धप्रसंग आणूं नका; समुद्रावरही तुम्हांसच विजय मिळेल अशी खात्री नाहीं. लष्कर वाढवून पोर्तुगालनें आपणास भिकेस लावून घेतलें.

पोर्तुगालच्या राजास हिंदुस्थानापासून कांहींच फायदा झाला नाहीं, हें नीट ध्यानांत ठेवा. डच लोकांनीं तरवारीच्या जोरावर शेतीची लागवड केली, ही तरी चूकच. कारण शेतींतला सर्व फायदा नोकर लोकांच्या पगारांत संपून जातो. म्हणून तुम्हांस फायदा हवा असेल तर तो समुद्रावर शांतपणें व्यापार करून मिळवा. लष्कर वाढवून युद्धप्रसंग उपस्थित करण्यानें निःसंशय हानि होईल.' मोगल बादशाहीच्या संबंधानें रोचें हें अनुमान योग्य होतें. 'काय व्यवहार करणें असेल तो प्रत्यक्ष मोगल बादशहाशीं करा, अधल्या मधल्यांस जुमानूं नका,' असें रोचें म्हणणें होतें. पण हें तत्त्व कंपनीनें मोगल राज्याबाहेर कसें लागू करावें ? पूर्व किनाऱ्यावर मोगलांची सत्ता नसतांही तेथें स्वसंरक्षणार्थ किल्ले वगैरे बांधण्याची कंपनीनें आपल्या नोकरांस मंजुरी दिली नाहीं, त्याचा परिणाम उत्तरोत्तर घातुक होऊं लागला. देशांतला बंदोबस्त कमी होऊन वाटेल त्यानें येऊन दरडावें व वखारी लुटाव्या, असा प्रसंग आला, तरी कंपनी जागी होईना. मद्राससंबंधानें तर तटबंदीप्रीत्यर्थ खर्च केल्याबद्दल कंपनीनें आपल्या कित्येक प्रेसिडेंटांस बरतर्फ केलें. मुंबईसंबंधानेंही आरंभीं तोच प्रकार होता. सीदी आणि मराठे यांचीं आरमारें मुंबई बंदरांत खुशाल येऊन सालोसाल उतरत, त्यांचा प्रतीकार करण्यास मुंबईच्या अधिकाऱ्यांस सामर्थ्य नव्हतें. शेवटीं बंगाल्यांतही तोच प्रकार घडून आला. म्हणजे सर्व गाशा गुंडाळून निघून तरी जावें, नाहीं तर शस्त्र उचलावें असा प्रसंग आला.

स. १६६३त मीरजुम्ला मरण पावल्यावर शाएस्तेखानाची बंगालच्या कारभारावर नेमणूक झाली. शाएस्तेखान हा औरंगजेबाचा मातुल वजनदार असून, बंगाल्यांत त्याचा अधिकार बहुतेक स्वतंत्र होता. बंगालचा कारभार पंचवीस वर्षे करून तो स. १६९४त मरण पावला, त्या वेळीं त्याचें वय ८६ वर्षांचें होतें. बंगाल्यांत इंग्रजांनीं जो व्यापार आरंभिला, त्याविषयीं शाएस्तेखानाची अनुकूलता नव्हती. स. १६७४त मद्रासच्या बंदोबस्तासाठीं तेथचा प्रेसिडेंट सर एड्वर्ड वुइंटर ( Winter ) यानें कंपनीकडे पुष्कळ रदबदली केली, पण त्यास कंपनीनें परत बोलाविलें. मद्रासजवळच फ्रेंचांनीं सेंट टोमे हें

ठिकाण काबीज केलें, त्यामुळें इंग्रजांस ज्यास्तच धास्ती पडली. स. १६७८त शिवाजीनें कर्नाटकांत स्वारी केली, तेव्हां तर इंग्रजांचें धाबें दणाणून गेलें. त्या वेळीं मद्रासचा प्रेसिडेंड सर स्ट्रेन्शम मास्टर हा मद्रासची तटबंदी करीत होता. शिवाजीची कर्नाटकांतील स्वारी त्यास फार जाचक झाली. परंतु शिवाजी पुढें मरण पावला, आणि गोवळकोंड्याचें राज्य औरंगजेबानें काबीज केलें, या दोन गोष्टींमुळें मद्रासच्या इंग्रजांस धीर आला. वास्तविक शिवाजीची त्यांस केवढी दहशत होती, आणि शिवाजीसारखाच त्याचा मुलगा संभाजी कर्तृत्ववान निघाला असता तर इतिहासाचें स्वरूप पुढे कसे बदललें असतें, हें विचार करण्यासारखें आहे. मास्टरनें शिकस्त करून मद्रासची मजबुदी केली. लोकांकडून वर्गण्या जमवून तेथें एक चांगलें मंदिर बांधिलें. इकडे पुनामालीच्या लिंगाप्पा नायकानें मद्रासेस वेढा घातला, त्यांतून इंग्रज बचावतात तों औरंगजेबानें दक्षिणेंत स्वारी केली. बादशहाच्या फर्मानानें काम होईल, तटबंदी करण्याची जरूर नाहीं, असें कंपनीचें या वेळींही म्हणणें होतें. सर मास्टर ह्यानें हा हुकूम पाळिला नाहीं, म्हणून त्यासही कंपनीनें परत बोलाविलें, (स. १६८१). शेवटीं स० १६८७त औरंगजेबानें गोवळकोंडा काबीज केल्याची बातमी आली, तेव्हां इंग्रजांच्या जिवांत जीव आला.

स. १६५०त शहाजादा सुजा बंगाल प्रांताच्या सुभेदारीवर होता, त्यानें त्या प्रांतांत मालाची नेआण व बिनजकातीनें खरेदीविक्री करण्याची परवानगी इंग्रजांस दिली होती. ही व्यवस्था स. १६६४त शाएस्तेखानाची नेमणूक बंगाल प्रांतावर होईपर्यंत चालली. शाएस्तेखान फार कडक होता. त्यानें कांहीं नजराणा घेऊन पूर्वीचे परवाने चालू केले. पुढें त्याच्या मनांत काय आलें कळत नाहीं. स. १६७२त त्यानें इंग्रजांच्या सोन्यानें भरलेल्या होड्या अडकविल्या. इतर एतद्देशीय व्यापाऱ्यांप्रमाणें जकात द्यावी आणि आपल्या मदतीस इंग्रजांनीं आपलें लष्कर पाठवावें, असा त्यानें इंग्रजांस हुकूम फर्माविला. पांच वर्षेपर्यंत हा घोटाळा चालू होता. स. १६७७त मद्रासच्या प्रेसिडेंटानें सुभेदारास लेखी कळविलें कीं, ' हा नवीन जुलूम जर आपण बंद न कराल तर बंगाल प्रांत

सोडून आह्मांस चालतें व्हावें लागेल.' जणूं काय, इंग्रज सोडून गेले तर सुभेदाराचें चाललेंच नसतें! त्याच वर्षी थोडे दिवस शाएस्तेखानाची बदली झाली, तेव्हां एकवीस हजार रुपये दंड भरून नवीन सुभेदारापासून बंगाल्यांत जकातीची माफी व व्यापाराची परवानगी इंग्रजांनीं मिळविली. परंतु स. १६७९त शाएस्तेखान परत आला; तेव्हां हा पुनः त्रास देईल या भीतीनें इंग्रजांनीं बादशहाचें नवीन फर्मान आणिलें. त्यांत सुरतेस मात्र इंग्रजांकडून जकात घ्यावी, इतर ठिकाणीं घेऊं नये, असा हुकूम होता ( स १६८० ). हा हुकूम हुगळीस पोंचला, तेव्हां इंग्रजांनीं आपला आनंद प्रदर्शित करण्याकरितां ३०० तोफांची सलामी दिली. पण त्या तोफांतला धूर नाहींसा झाला नाहीं तोंच बादशहाच्या हुकुमाची किंमत काय हें सुभेदारानें इंग्रजांस समजावून दिलें. बंगाल्यांतील व्यापार फार किफायतशीर असून बादशहाचें फर्मान मिळालें, तेव्हां इंग्लंडांत कंपनीसही हुरूप येऊन त्यांनीं बंगालच्या वखारी मद्रासेपासून तोडून स्वतंत्र केल्या, आणि हुगळीच्या बंदोबस्ताकरितां मुद्दाम २० वीस इंग्रज शिपाई पाठविले. परंतु सुभेदारानें सोरा विकत घेण्याची इंग्रजांस मनाई केली. सोरा जमविणारा कंपनीचा एजंट होता त्यास त्यानें कैद केलें, आणि फर्मानांतील उल्लेख संदिग्ध आहे अशा सबबीवर, कंपनीच्या सर्वच खरेदीविक्रीवर ३॥ टक्के जकात बसविली. सोऱ्यावर जकात बसविण्याचें दुसरें विशेष कारण असें होतें कीं, येथून सोरा थोड्या किंमतींत बिलायतेस नेऊन तेथें त्याची दारू बनवावी आणि ती येथें आणून एतद्देशीय लोकांशीं तोफांनीं लढावें, हा इंग्रजांचा खटाटोप शाएस्तेखानानें चालूं दिला नाहीं. जकात किती बसविली हा प्रश्न नाहीं. थोडी जरी बसविली, तरी जकातीच्या नांवाखाली कंपनीस त्रास देण्यास मोगल अधिकाऱ्यांस वाटेल तितकी सवड मिळे. इंग्रज आपल्या ताब्यांत आहेत व हें पारतंत्र्य त्यांनीं ध्यानांत ठेविलें पाहिजे, अशी शाएस्तेखानाची इच्छा होती. इतर युरोपियन राष्ट्रांच्या वखारी बऱ्याच खालीं समुद्राच्या जवळ होत्या; पण इंग्रजांनीं बादशहाच्या फर्मानांवर भरंवसा ठेवून हुगळी शहरांतच आपल्या वखारी ठेविल्या. या ठिकाणीं आपण सुरक्षित नाहीं

असें इंग्रजांस वाटल्यावरून, हुगळी नदीच्या कांठीं माल उतरण्याच्या बांदा-वर लहानशी तटबंदी करण्याची परवानगी इंग्रज एजंटानें सुभेदाराजवळ मागितली, ( स. १६८५ ). ही परवानगी न देतां, उलट त्यानें, इंग्रज लोक उद्दामपणानें वागून आपला हुकूम तोडतात, अशी कागाळी बादशहाकडे लिहून पाठविली. कंपनीचीं जहाजें माल न मिळाल्यामुळें रिकामींच परत गेलीं; आणि बंगाल्यांतील इतर व्यापार सुद्धां स्थानिक अधिकाऱ्यांच्या मर्जीवर अवलंबून राहूं लागला. एका मोगल अधिकाऱ्यानें कासीमबाजारच्या इंग्रज वखारीस वेढा सुद्धां घातला. अशा प्रसंगीं एक तर बंगाल प्रांत सोडून जावें, किंवा मोगलांशीं उघडपणें लढावें असा समय प्राप्त झाला.

इकडे मुंबईस सर जॉन चाइल्ड तर लढाईच्या गोष्टी करीत होता. स. १६८४तील त्याच्या एका पत्रांत खालील मजकूर आहे. ' मोगलांशीं भांड-ण्याचा प्रसंग आल्यास मी काय करीन तें सांगवत नाहीं. आजपर्यंत होते तेवढे सामोपचार झाले. दररोज आमचा येथें अपमान व अवहेलना होत आहे त्यास सीमा नाहीं. ह्मणून जें होईल तें होवो, एकवार दोन हात करून पाहवें असें फार मनांत आहे. ' ' हल्लीं जी वंडाळी चालू आहे तींतून आपली निभावण्याची इच्छा असेल तर, तसेंच आमच्या राजाची व देशाची सर्व अबरू गेली आहे ती परत मिळविण्याची इच्छा असेल तर, बादशहाशींच दोन हात केले पाहिजेत. ' जमिनीवरील युद्धांत आपला निभाव लागणार नाहीं हें चाइल्ड जाणून होता, पण समुद्रावर मोगलांच्या यात्रेकरूंच्या जहाजांचा आपण तव्हांच समाचार घेऊं हें त्यास कळत होतें; आणि अगोदरपासूनच तशा प्रकारची भाषा कागदोपत्रीं तो वापरूं लागला होता.

ह्या सर्व कागळ्या विलायतेंत कंपनीच्या कानावर गेल्या. पुढें काय करावें ह्याची पुष्कळ भवतिनभवति झाली. हिंदुस्थानांत जसा सर जॉन चाइल्ड मोगलांशीं दोन हात करण्यास उद्युक्त झाला होता, तसाच त्या वेळीं विलाय-तेंत त्याचाच भाऊ सर जशुआ चाइल्ड हा कंपनीचा गव्हर्नर होता. त्याच्या साहाय्यानें कंपनीच्या कोर्टानें मोगल बादशहाशीं युद्ध करून कंपनीची बाजू

राखण्याविषयीं आपल्या नोकरांस हुकूम पाठविले. हिंदुस्थानांतील इंग्रजी राज्यस्थापनेचा खरा आरंभ हा होय. सर टॉमस रोनें आंखून दिलेली मर्यादा सोडून ७० वर्षांनीं कंपनीनें आपला रोंख बदलिला. मद्रासेस किल्ला बांधण्याची परवानगी सन १६७५त होऊन, बंगाल्यांतील वखारींचा बंदोबस्त करण्याचाही हुकूम आलेला होता.

मोगलांशीं सामना करण्याचा कंपनीनें निश्चय केला, त्यास राजा जेम्सनें पाठबळ दिलें ई. इं. कंपनींत त्याचें भांडवल होतें, त्याच्या फायद्यावरच त्यास हद्दपार झाल्यावर आपलें पुढील आयुष्य कंठतां आलें. फ्रान्स देशांत पळून जातेवेळीं ७० हजार रुपयांचे आपले भाग त्यानें विकले. राजाची मोठी रक्कम कंपनींत गुंतली असल्यामुळें, त्यानेंही जहाजें, लोक, पैसे वगैरे वाटेल ती मदत एकदम कंपनीस दिली. तेव्हां त्यास खर्चास पैसा मिळाला. कॅप्टिन निकलसनच्या हाताखालीं सहा पायदळ पलटणें व १० लढाऊ गलबतें विलायतेहून बंगाल्यांत रवाना झालीं. ह्यांस हिंदुस्थानांतील वखारींतली मंडळी येऊन मिळणार होती. ‘पश्चिम समुद्रावर मोगलांचीं यात्रेकरू जहाजें पकडावीं, नंतर बंगाल्यांतील सर्व लोक जमा करून पूर्व सरहद्दीवरील ठिकाण जें चित्तगांव तें काबीज करावें, तेथें एक टांकसाळ घालावी, नंतर गंगेच्या मुखांतून डाका येथें जाऊन सुभेदाराच्या वाड्यावर हल्ला करून त्याजकडून वाटेल तसा तह करून घ्यावा; इतकें केल्या-वर सयामच्या राजाचें पारिपत्य करून मुंबईजवळच्या साष्टी व ठाणें ह्या जागा पोर्तुगीझ लोकांशीं लढून घ्याव्या,’ असा ह्या स्वारीच्या चालकांस विलायतेहून हुकूम आला होता.

पण बोलेल तो करील काय, अशी ह्या स्वारीची अवस्था झाली. मुंबई कोठें, चित्तगांव व सयाम कोठें, मोगलांची सत्ता केवढी, इत्यादि गोष्टीं-विषयीं एवढा अंधार कंपनींत असावा हेंच आश्चर्य आहे. अर्थात् वरच्यापैकीं एकही बेत सिद्धीस गेला नाहीं. इतकेंच नव्हे, पण अन्य उपायांनीं बाद-शहाची मर्जी इंग्रजांनीं सुप्रसन्न करून घेतली नसती, तर हिंदुस्थानांतील

इंग्रजांचा भावी इतिहास अगदींच बदलून गेला असता. स. १६८६च्या अखेरीस २ जहाजें व ३०८ लोक हुगळी नदींतून वर येऊं लागलें. पण हुगळीच्या खालीं वीस मैलांवर त्या लोकांस जमिनीवर उतरून चालत यावें लागलें. कारण जहाजें वर येऊं शकेनात.

३. **कलकत्याची स्थापना.**—मोगलांशीं चाललेल्या या युद्धांतच कलकत्याच्या स्थापनेचा आरंभ आहे. कंपनीच्या सुदैवानें बंगाल्यांत त्या वेळीं जॉब चारनॉक ( Job Charnock ) हा मोठा धूर्त गृहस्थ कंपनीच्या अधिकारावर होता. सन १६५५त तो प्रथम हिंदुस्थानांत आला. सन १६५८त कासीमबाजार येथील कौन्सिलांत त्याची नेमणूक होऊन, त्यास दरसाल २०० रुपये पगार मिळूं लागला. स. १६६४त त्यास बंगालची मुख्य जागा मिळाली. तेव्हांपासून तो पाटणा येथें राहत असे. सोळा वर्षेपर्यंत पाटणास राहून त्यानें देशस्थिति समजून घेतली. कित्येक वेळां त्यास नबाबाच्या हातचे चाबूक खावे लागले, आणि कैद पण भोगावी लागली. औरंगजेबाच्या राज्यांत अव्यवस्था होऊन स्थानिक अंमलदार मनसोक्त वर्तन करूं लागले होते. एक हिंदु बाई सती जात होती, तिला चारनॉकनें आपले शिपाई पाठवून पळवून आणिलें आणि तिच्याशीं लग्न लाविलें. पुढें तो तिच्याशीं एतद्देशीय तऱ्हेनें राहूं लागला. त्यांस संतति झाली, मात्र ती बाई कांहीं केल्या क्रिस्ती होईना, उलट तिनें नवऱ्यासच आपल्याकडे वळविलें. तथापि चार्नॉकनें क्रिस्ती धर्म सोडला असें कित्येक म्हणतात, तें पुराव्यावरून खरें नाहीं, असें हंटरचें म्हणणें आहे. कलकत्यास चारनॉकचें थडगें आहे त्यावरून तो क्रिस्तधर्मानुयायी होता असें दिसतें, स. १६८१त बंगालच्या वखारी स्वतंत्र करण्यांत आल्या, तेव्हां कासीमबाजारची मुख्य जागा आपणास मिळेल अशी चारनॉकची अपेक्षा होती. पण दोनदां त्याचा आशाभंग झाला. कासीमबाजार ही जागा मुर्शिदाबादेजवळ असून हुगळीच्या वर दोन दिवसांच्या वाटेवर आहे. एतद्देशीय व्यापाऱ्यांनीं चारनॉकच्या वखारीवर कर्जाच्या

फिर्यादी मांडून मोगल अधिकाऱ्यांपासून हुकूमनामे मिळविले. चारनॉकनें उत्तर दिलें, कीं अन्यायी व भ्रष्ट अधिकाऱ्यांचे हुकूमनामे मी पाळीत नाहीं.' स. १६८५त चारनॉक यास हुगळीची मुख्य जागा मिळाली; त्या वेळीं तो कासीमबाजार येथील वखारींच्या वेढ्यांत सांपडला होता. पण युक्तीनें त्या वेढ्यांतून निसटून तो हुगळीस आला. पुढें सुभेदारानें हुगळीवर फौज रवाना केली, आणि त्या ठाण्यास वेढा घातला, तेव्हां इंग्रजांस शिधापाणी सुद्धां मिळेनासें झालें. ता. २८ ऑक्टोबर स. १६८६ रोजीं लढाई झाली. इंग्रजांचे लोक बाजारांत सामान विकत घेण्यास गेले असतां, त्यांस मोगलांनीं कापून काढिलें. त्यावर चारनॉक आपले लोक घेऊन बाजारांतून तीं प्रेतें आणण्यास गेला; आणि तेथें बरीच लढाई करून आपल्या लोकांचीं प्रेतें त्यानें उचलून वखारींत आणिलीं. चारनॉकजवळ एकंदर ४०० लोक होते. हुगळी येथें निभाव लागत नाहींसें पाहून, चारनॉकनें आपले सर्व लोक व सामान होड्यांत घालून खालीं २७ मैल आणिलें. ही जागा लढण्यास बरी आहे असें चारनॉक यास वाटून तेथें त्यानें आपली मजबुदी केली. तेथून समुद्र सुमारें ७० मैल असून नदीच्या वांकणांत मोठमोठीं जहाजें येण्याची सोय होती. तेथेंच पूर्वीं पोर्तुगीझ लोक आपला माल उतरून बंगाल्यांत व्यापार करीत असत. त्या ठिकाणीं दोन तीन खेडीं होतीं. त्यांतील एकाचें नांव सुतनत्ती हाट, म्हणजे सुताचा बाजार असें होतें. नद्या, पूर, खाजणें इत्यादिकांनीं ही जागा मनुष्यवस्तीस योग्य आहे असें मुळींच कोणास वाटलें नसतें. पूर्वीं ह्या ठिकाणीं नदी असून तिच्या मुखांतून हा प्रदेश भर पडून वर आला होता. तेथील नदीच्या किनाऱ्यावर काली देवीचें मंदिर असून नदींतून वर येण्यास घाट होता, त्याचें नांव 'कालीघाट.' ह्या किनाऱ्यावर स. १६८७च्या जानेवारींत चारनॉकनें कांहीं झोंपड्या बांधिल्या. हाच कलकत्ता शहराचा पाया होय. तेथेंही चारनॉकवर मोगलांनीं हल्ला केल्यामुळें, तो आपले लोक गलबतांत घालून खालीं समुद्रांत आला. लढाई चालूच होती. आजारानें व लढाईनें चारनॉकचे पुष्कळ लोक मेले, तरी आपणास मदत येत आहे असें

दाखवून त्यानें टिकाव धरिला. जून ता. ४ स. १६८७त तह्राची बाटाघाट होऊन चॉर्नाकचे लोक मोगलांच्या स्वाधीन झाले. पुढें सेप्टेंबरांत पुनः कालिघाट येथें येऊन त्यांनीं वसाहत केली. चार्नाकच्या ह्या कामगिरीबद्दल त्यास कोणी बरें तर म्हटलें नाहींच; उलट वेड्यासारखें भलत्याच ठिकाणीं चिकटून राहून नुकसानी केल्याबद्दल ठपका मात्र आला. स. १६८८त झोंपड्या वगैरे बांधून स्थीरस्थावर होते, इतक्यांत विलायतेहून कॅप्टिन हीथ येऊन दाखल झाला, आणि चित्तगांव जिंकण्याच्या कामगिरीवर निघाला. त्यानें बळजबरी करून चारनॉकचे कांहीं लोक आपल्याबरोबर घेतले. बाकीचे सुभेदाराच्या कैदेंतच होते. चित्तगांव हें ठाणें आराकानच्या राजाच्या ताब्यांत होतें. तेथचा बंदोबस्त उत्तम असल्यामुळें तें हातीं न येतां, कंपनीचीं लढाऊ जहाजें, पुष्कळ लोक गमावून हात हालवीत मद्रासेस परत आलीं. बरोबर चारनॉक होताच.

**४. कंपनी व औरंगजेब यांचें युद्ध** ( स. १६८७–९० ).–दोघां चाइल्ड बंधूंची करामत वर ठिकठिकाणीं आलीच आहे. त्यांनीं स्वदेशाची नोकरी करितांना स्वतःचाही पुष्कळसा फायदा करून घेतला. सर जशिया चाइल्डनें आपल्या अंमदानींत वीस लाख रुपयांची पुंजी जमविली. त्याचा भाऊ सर जॉन चाइल्ड याला कंपनीच्या अधिकाऱ्यांत मोठा मान असे. पण त्यास शत्रूही फार होते, व पुढें साठ वर्षांनीं झालेल्या क्लाइव्हप्रमाणें अमुक एक काम करण्याचें त्यानें मनावर घेतल्याबर, मग त्यांत न्यायान्याय किंवा बरेवाईटपणा पाहणारा तो नव्हता. धाडसी व मतलबी कृत्यांनीं त्यानें कंपनीस झालेलें कर्ज फेडून उलट मोठी किफायत करून दाखविली.

ह्या दोघां भावांच्या शिफारशीनें इकडे वाटेल तसा जुलूम व खेळखंडोबा करण्यास, कंपनीनें आपल्या नोकरांस हवी तितकी मुभा दिली. प्रत्यक्ष मोगल बादशहावर शस्त्रें उगारण्यापूर्वी, त्यांनीं सयाम, बँटम वगैरे ठिकाणच्या लहान लहान राजांवर कांहीं तरी कुरापतीचें शस्त्र उचलून आपली शक्ति अजमावून पाहिली. इंग्लंडांत कंपनीनें राजाकडे विनंति करून कांहीं फौज हिंदुस्थानांत

पाठविली; आणि आपली तयारी अतिशय गुप्त रीतीनें चालविली. चाइल्डनें कारण नसतां सुरतच्या मोगल अधिकाऱ्याकडे तक्रार चालविली, आणि अनेक प्रकरणांत त्याचा अपमान केला. आंतून त्यानें कंपनीस कळविलें कीं, ' युद्धाची सर्व जबाबदारी माझ्या अंगावर टाका. यश आलें नाहीं, तर मला पुढें करून सांगा, कीं आमच्या हुकमाशिवाय चाइल्डनें हें कृत्य केलें. यश आलें तर त्याचा सर्व फायदा तुम्हांसच मिळणार आहे. ' व्यापारासाठीं दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहण्याची जरूर लागूं नये; सर्व किल्ली आपल्या हातांत असेल, तरच हा व्यवहार चांगला चालेल, असा त्याचा सल्ला होता.

युद्ध बंगाल्यांतच चाललें होतें असें नाहीं. सर जॉन चाइल्डनें पश्चिम किनाऱ्यावर मोगलांचीं यात्रेकरू जहाजें पकडलीं, तेव्हां मात्र बादशहास राग येऊन त्यानें इंग्रजांस आपल्या सर्व राज्यांतून हांकून देण्याचे हुकूम सोडिले. सुरत, मच्छलिपट्टण, विशाखापट्टण वगैरे ठिकाणच्या इंग्रजांच्या वखारी मोगल अधिकाऱ्यांनीं काबीज केल्या. मुंबईवर सीदीच्या आरमाराची रवानगी झाली. बंगाल्यांतून तर इंग्रज पळून आलेच होते. जॉन चाइल्डनें फ्रेंच व डच यांची आपणांस मदत मिळविण्याची खटपट केली, पण ती सिद्धीस गेली नाहीं.

स. १६८७च्या मे महिन्यांत इंग्रजांनीं मुंबईहून मुद्दाम आपलीं जहाजें पाठवून मोचा, बसरा इत्यादि ठिकाणांहून पांच सात मोगल जहाजें पकडून आणिलीं, आणि मोगलांचीं कांहीं जहाजें मुंबईसच होतीं तीं चाइल्डनें पकडिलीं. सुरतच्या मोगल अधिकाऱ्यास हा कावा समजला नाहीं. हें कोणा तरी उच्छृंखल इंग्रज गृहस्थाचें कृत्य असून त्यांत कंपनीचे मुख्य अधिकारी सामील नसतील, अशा समजुतीनें त्यानें त्या गोष्टी इंग्रज अधिकाऱ्यांच्या कानावर घातल्या. इतक्यांत त्याची बदली होऊन सुरतेस नवा सुभेदार आला. त्यानें डिसेंबर १६८८त उघडपणें इंग्रजांशीं युद्ध सुरू केलें, आणि सुरतच्या वखारी जप्त करून, चाइल्ड यास जो जिवंत पकडून आणील त्यास मोठें बक्षीस देऊं केलें. हें वर्तमान ऐकून इंग्रजांसही चेव आला.

त्यांनीं बेधडक मोगल जहाजांवर व एतद्देशीय व्यापाऱ्यांवर हल्ला सुरू केला, आणि मोगलांचीं चाळीस जहाजें पकडिलीं. तरी चाइल्ड हा बादशहास गोडी-गुलाबीचींच पत्रें लिहून फसवीत होता. ‘ गंजी सवाई ’ नांवाचें एक मोठें मोगल जहाज इंग्रजांनीं पकडिलें, तेव्हां औरंगजेबास त्यांचा सर्व राग कळून आला. त्यानें सुरतेच्या सर्व इंग्रजांस पकडून कैदेंत घातलें, आणि बेड्या घालून त्यांस रस्तोरस्तीं फिरविलें. सुमारें तीन वर्षेपर्यंत हे लोक सुर-तेस कैदेंत होते. त्या वेळच्या त्यांच्या दुर्दशेचीं त्यांचीं केविलवाणीं पत्रें वाच-ण्यालायक आहेत. याप्रमाणें बादशहाचें यत्किंचित् उग्र स्वरूप दृष्टीस पडतांच, चाइल्डची घाबरपट्टी उडाली. जिकडे तिकडे इंग्रजांचा पिछेहाट होऊन सर्व लोक चाइल्डवर चिडून उठले. हाताखालचे लोक सुद्धां त्याचें ऐकेनात. पोर्तु-गीझही विरुद्ध झाले. मुंबईचा बचाव कसा होतो ह्याचीच चाइल्ड यास धास्ती पडली; मग बाहेरच्या युद्धाच्या गमजा जिरल्या असतील, हें सांगणें नकोच. ‘बंगालचे व मद्रासचे इंग्रज आपणांस मदत करीत नाहींत, एकट्यानें मी काय काय करावें ? ’ असा मजकूर तो कंपनीस गयांवयां करून लिहूं लागला, इत-क्यांत मोगल आरमाराचा मुख्य जंजिऱ्याचा सीदी याकूबखान पंचवीस हजार लोक घेऊन मुंबईवर आला. ( सन १६८९ फेब्रुवारी. ). मध्यरात्रीस एकदम मुंबईवर घाला आल्याबरोबर किल्यांत तीन तोफा सुटल्या. त्या ऐकून युरोपियन व एतद्देशीय लोक बायकांमुलांसह सैरावैरा पळूं लागले. सकाळीं सीदीनें मजगांव काबीज करून तेथें तोफखाना चढविला. माहीमचा किल्लाही त्यानें हस्तगत केला. तिसऱ्या दिवशीं थोडीशी लढाई होऊन किल्ला शिवाय करून बाकीचें सर्व बेट सीदीनें हस्तगत केलें. पुढें पावसाळाभर सीदी तेथेंच तळ देऊन बसला. तेव्हां हात जोडून शरण जाण्याशिवाय चाइल्ड यास गत्यंतर राहिलें नाहीं. अशा स्थितींत अत्यंत मानहानि सहन करून क्षमा मागण्या-करितां आपले दोन इंग्रज वकील त्यानें बादशहाकडे पाठविले. ‘ हात पाठी-वर बांधून लोटांगणें घालीत ते बादशहापुढें आले. ’ औरंगजेबाच्या मनांत इंग्रज व्यापाऱ्यांस घालवून देण्याचें मुळींच नव्हतें. त्यांच्या व्यापारापासून

आपणांस मोठें उत्पन्न आहे असें त्यास वाटून, झाली मानहानि एवढी पुरे, अशा बुद्धीनें कांहीं अटींवर त्यांचें ह्मणणें बादशहानें मान्य केलें. मोगल अधिकाऱ्यांचें किंवा हिंदुस्थानांतील रयतेचें जें जें नुकसान झालें असेल तें तें सर्व इंग्रजांनीं भरून द्यावें, आणि चाइल्ड ह्यानें हिंदुस्थानांत राहूं नये, असा करार ठरला. इंग्रजांनीं हिंदुस्थानांत पाय ठेवल्यापासून ह्या वेळपावेतों अशा प्रकारचा अपमान त्यांस कधींच सहन करावा लागला नव्हता. फरमानाच्या भाषेवरून उघड दिसतें, कीं इंग्रजांस स्वतंत्र राष्ट्राचे लोक असें न समजतां, क्षमा केलेले गुन्हेगार, असें त्यांस बादशहानें लेखिलें आहे. ह्या युद्धांत कंपनीला चाळीस लक्ष रुपयांवर खर्च आला. इतकेंच नाहीं, तर त्यांत सगळ्या इंग्रज राष्ट्राची मानखंडना झाली. त्यामुळें कंपनीच्या विरुद्ध इंग्लंडचें मत खवळून गेलें. ह्मणूनच पुढें दुसरी कंपनी स्थापण्याच्या उद्योगास यश आलें. हा सर्व चाइल्डच्या उपद्व्यापी स्वभावाचा परिणाम होय. १६९०च्या फेब्रुवारींत चाइल्ड मरण पावला.

बादशहाची स्थिति ह्या वेळीं चमत्कारिक झाली होती. मराठ्यांशीं लढून तो कावला होता. मराठ्यांस जिंकण्याच्या आवेशांत कंपनीकडे लक्ष देण्यास त्यास सवड झाली नाहीं. इंग्रजांचा बंदोबस्त करण्यास लागणारें आरमार त्याजपाशीं नव्हतें. इंग्रजांस आपण केव्हांच चिरडून टाकूं, आपल्यापुढें त्यांचा काय पाड, अशी त्यास घमेंड होती. शिवाय इंग्रजांच्या व्यापारामुळें त्यास मोठें उत्पन्न होतें; आणि इंग्रजांस घालवून अगोदरच उद्भवलेली पैशाची अडचण वाढविणें, त्यास बरें वाटलें नाहीं. आणखी असें कीं इंग्रजांच्या आरमाराचा बादशहास उपयोग व त्याच्या शत्रूंस वचक होता. सीदी व इंग्रज ह्या दोघांचीं आरमारें आपल्या मदतीस असल्यावर, आपण मराठ्यांस जुमानण्याचें कारण नाहीं, असें त्यास वाटत होतें. इंग्रजांची शक्ति आरमारांत आहे, व आपणाजवळ आरमार नसल्यामुळें आपल्या हातून त्यांचें संपूर्ण पारिपत्य होणें शक्य नाहीं, हेंही तो जाणून होता. इंग्रजांचें त्याचें वांकडे असें कधींच नव्हतें. उलट इंग्रजांस लागतील त्या सवलती देऊन त्यांचा उत्कर्ष व्हावा, व त्यांनीं आपल्या राज्यांत नांदावें, अशीच त्याची इच्छा होती. ह्मणून शाए-

स्तेखानासारखे अनुभविक कामदार इंग्रजांबद्दल ज्या तक्रारी बादशहाकडे करीत, त्यांजकडे बादशहा लक्ष देत नसे. उलट आपल्याच अंमलदारांस तो ठपका देई. वास्तविक चाइल्डनें बादशहाचीं यात्रेचीं जहाजें पकडून औरंगजेबाच्या धर्मवेडांत भर घातली नसती, तर सगळा तंटा थोडक्यांत मिटला असता. तथापि बादशहापुढें कोणाची आज्ञा चालत नसे. शाएस्तेखान मोठा घोरणी होता. त्यानें इंग्रजांस पूर्ण ओळखिलें होतें. पण तो स्वतःच वृद्ध होऊन मृत्युपंथास लागला होता. बंगालच्या बाहेर त्याचा अधिकार नव्हता; आणि बादशहानें मराठ्यांस जिंकण्याचें दुराग्रहानें हातीं घेतलेलें काम पुरें झालें नसतां दुसऱ्या भानगडी उपस्थित करण्यास बादशहाची त्यास मंजुरी मिळाली नसती. अशा सर्व कारणांनीं चाइल्डनें मागितलेली माफी कबूल करून खालील फर्मान बादशहानें इंग्रजांच्या वकिलांस दिलें, ( ता. २७ फेब्रुवारी, स. १६९० ).

‘ आपणांस सर्व अपराधांची क्षमा करावी, आम्हीं दीड लाख रुपये दंड देण्यास तयार आहों, आमचा जप्त केलेला सर्व माल परत द्यावा, पुनः आम्हीं असलें निंद्य कृत्य करणार नाहीं, ’ अशा प्रकारची विनंति सर्व इंग्रजांनीं शरण येऊन अत्यंत नम्रतापूर्वक आमच्याकडे केली आहे. ती त्यांची विनंति मान्य करून बादशहा त्यांस व्यापाराचा परवाना पुनः देत आहेत आणि असें फर्मावितात कीं, मि. चाइल्ड यांनीं असलें बेगुमानी कृत्य केल्याबद्दल त्यास ई. इ. कंपनीनें नोकरीतून हाकून द्यावें. ’ हें फर्मान निघण्याच्या अगोदर तीन आठवडे चाइल्ड मरण पावला होता. ह्या फर्मानाची नकल बंगालच्या सुभेदारास पाठविण्यांत आली. पण बंगाल्यांतील तंटा जकातीचा असल्यामुळें, चॉर्नाकनें सुभेदाराकडून बंगाल्यांतील व्यापारसंबंधी निकाल करून घेतला. पूर्वीप्रमाणें सालाचे तीन हजार रुपये भरून, जकात न देतां, आयात व निर्यात व्यापार खुशाल पाहिजे तितका करावा, अशी सुभेदाराची मंजुरी चॉर्नाकनें आणिली. शाएस्तेखान जाऊन त्याच्या जागयावर अलीमदानखानाचा मुलगा इब्राहीमखान हा नवीन आला होता. त्याला आपल्या कारकिर्दीच्या आरंभीच इंग्रजांशीं सख्य जोडून देण्याचें सत्कृत्य करण्यास आनंद वाटला. त्या भरांत त्यानें इंग्र-

यांची बंगाल्यांत सुव्यवस्था लावून दिली. रविवार ता. २४ ऑगस्ट स. १६९० रोजीं इंग्रज लोक पुनः कालीघाटावर आले. अहोरात्र पावसाची धार सुरू होती. सर्वांची मर्जी मोगलांच्या हद्दींत हुगळीस जाण्याची असतांही, आपल्या तोफांचा आश्रय सोडून दूर जाणें धोक्याचें आहे, असें वृद्ध चॉर्नॉक यास वाटून, त्यानें तेथेंच कालीघाटावर नवीन ठाणें वसविलें, तेंच कलकत्ता होय. ह्या कृत्यास दोन वर्षे लागलीं. ह्या दोन वर्षांत इंग्रजांस अतोनात हाल सोसावे लागले. पण एकदां तेथें थोडीशी तटबंदी झाल्याबरोबर कंपनीच्या तोफांमुळें सर्वांस ही जागा सुरक्षित वाटून तेथें व्यापाराची व लोकांची जी लाट येऊं लागली ती आजपावेतों चालू असून, कलकत्ता हें हिंदुस्थानांतलें पहिल्या प्रतीचें राजधानीचें शहर बनलें. दहा वर्षांत कलकत्ता शहर विस्तार पावलें. ता. १० जान्युआरी स. १६९३ रोजीं चॉर्नॉक मोठ्या विपत्तींत कलकत्ता येथें मरण पावला. त्याच्या उद्योगाची खरी किंमत बाहेर पडण्यास पुढें पुष्कळ दिवस लागले.

शाएस्तेखानानंतर सुमारें दहा वर्षेपर्यंत बंगालच्या कारभारावर बादशहाकडून लायक मनुष्य आला नाहीं. स. १७०२त मुर्शीदकुलीखानाची नेमणूक झाली, त्या पूर्वीच इंग्रजांनीं आपलें काम उरकून घेतलें होतें. स.१६९८त रहीमखान नामक एका अफगाणानें बंगाल्यांत बंड केलें, तें तेथील अधिकाऱ्याच्या हातून मोडेना; मग तो त्या दंग्यांत इंग्रज-फ्रेंचांचें संरक्षण कसें करणार ? म्हणून 'तुम्ही आपला बंदोबस्त वाटेल तसा करा, किल्ले बांधा, किंवा पाहिजे ते करा,' असें सुभेदारानें ह्या युरोपियन लोकांत कळविलें. ते तरी ह्याचीच वाट पाहत होते. इंग्रजांनीं व इतर युरोपियनांनीं लगेच आपापल्या वखारींचे सभोंवार तट बांधण्यास सुरवात केली. अशा प्रकारें इंग्रजांनीं कलकत्यास किल्ला बांधिला, त्याचें नांव त्यांनीं आपल्या राजाच्या नांवावरून 'फोर्ट वुल्यम' असें ठेविलें, (स. १६९८). पुष्कळ वर्षे तटबंदी करण्याची ह्या युरोपियनांस मनाई होती, ती बरप्रमाणें नाहींशी झाली. ह्या नवीन उपक्रम बंगालच्या नबाबांस किती जाचक झाला, हें पुढें कळून येणार आहे.

सन १६५८त औरंगजेब राज्यावर आला तेव्हांपासून सन १६८३ पर्यंत २५ वर्षांच्या कारभारांत राज्याच्या दूरदूर हद्दीपर्यंत सुद्धां त्याची हुकमत चालू होती. म्हणून त्या अवधींत बादशहाच्या फरमानांप्रमाणें व्यापार करून कंपनीला आपला फायदा करून घेतां आला. कंपनीला मोठ्या भरभराटीचा काळ हाच पंचवीस वर्षांचा होय. पण स.१६८३त बादशहानें दक्षिणेंत मराठ्यांवर स्वारी केली, तेव्हांपासून अखेरपर्यंत तो युद्धाच्या नादांत गुंतल्यामुळें, त्याचा कारभार अव्यवस्थित झाला, त्याची हुकमत ढिली पडली; आणि प्रांतोप्रांतीचे त्याचे अंमलदार मनसोक्त वर्तन करूं लागले; त्यामुळें इंग्रजांस एक धनी असा कोणी राहिला नाहीं. प्रत्येक अधिकाऱ्याची तोंडदाबी करण्यांत त्यांचें नुकसान होऊं लागलें. तेव्हांच तो त्रास चुकविण्याकरितां, यात्रेकरू जहाजांना पीडा देऊन, इंग्रज लोक प्रत्यक्ष बादशहासच तंबी देऊं लागले. बादशहाच्या राज्याची उतरती कळा व कंपनीची चढती कळा ह्यांचा खुबीदार विरोध ह्या पुढील पंचवीस वर्षांत दिसून येतो. ह्याच पंचवीस वर्षांत विलायतेंत कंपनीची सर्व प्रकारें सुव्यवस्था लागून मजबुदी झाली, आणि इकडे मोगल बादशाही ढांसळली. तेव्हांच हिंदुस्थानचें राज्य बलवानाच्या हातांत गेलें, असें म्हणण्यास हरकत नाहीं. बादशहा दक्षिणेंत राहिल्यामुळें, उत्तरेच्या राज्यांतील बंदोबस्त ढिला पडला; आणि नवीन जिंकलेल्या दक्षिण प्रांतांत त्याचा अंमल चांगलासा बसला नाहीं. दूरदूरच्या किनाऱ्यावर तर त्याचा ताबा बिलकूल बसला नव्हता. नवीन जिंकलेल्या राज्यांतील सरदार व मराठे दोघेही बादशहाचा सूड उगविण्यासाठीं कंपनीस अनुकूल झाले; तेणेंकरून तिला आपली मजबुदी सुलभ रीतीनें करितां आली. कंपनीच्या सुदैवानें त्याच वेळेस युरोपांत फ्रान्स व हॉलंडचें युद्ध चालून त्यांजकडून हिंदुस्थानांत इंग्रजांस कांहीं एक प्रतिबंध झाला नाहीं. अर्थात् फ्रान्सचा चौदावा लुई व हिंदुस्थानचा औरंगजेब ह्या दोघांची अशी अप्रत्यक्ष मदत हिंदुस्थानांत इंग्रजी राज्याचा पाया मजबूद करण्यास पुष्कळच झाली आहे.

वरील इंग्रज मोगलांच्या तंट्याची तपशीलवार माहिती कळेल तर आंतलें इंगित समजेल. ‘जकातींची माफी’ हे शब्द सोपे दिसतात; पण त्यांमुळें माफीदाराच्या हातांत सर्व व्यापार गेला. बंगाल्यांतील जकातीचा हा तंटा शंभर वर्षांवर चालला. १७५६ व १७५७त नबाब सिराजुद्दौल्याचें व स. १७६३त मीरकासीमाचें इंग्रजांशीं युद्ध झालें, तें जकातीच्याच कारणानें. शाएस्तेखान ह्या प्रश्नाचें महत्व ओळखून होता असे दिसतें. ह्या बाबतींत जहांगीर व शहाजहान ह्यांच्या कारकिर्दीत सुद्धां ज्या सवलती इंग्रजांस मिळाल्या नाहींत, त्या औरंगजेबाच्या वेळेस इंग्रजांस मिळाल्या. मीठ, मिर्ची, सुपारी, तंबाकू वगैरे गरीब लोकांच्या रोजच्या निर्वाहाच्या व हिंदुस्थानांत पिकून हिंदुस्थानांतच खपणाऱ्या जिनसांचा व्यापार सुद्धां जकातीच्या माफीमुळें इंग्रजांच्या हातांत गेला. औरंगजेबानें दिलेल्या या माफीनें शंभर वर्षेंपावेतों बंगालच्या सुभेदारांस रडविलें. शेवटीं मीरकासीमनें सर्वांसच जकात माफ केली. ती गोष्टही इंग्रजांस पटली नाहीं, आणि युद्ध होऊन बंगाल प्रांत इंग्रजांच्या ताब्यांत गेला. सारांश, ह्या जकातीच्या चंचुप्रवेशानें इंग्रजी राज्य ह्या देशांत झालें. वर दिलेल्या हकीकतींत उलट बाजूनें ह्मणजे काय होतें, ह्म० शाएस्तेखानाची तक्रार काय होती, ह्याचा पाहिजे तसा खुलासा बाहेर आलेला नसून ऐतिहासिक दृष्ट्या ह्या प्रश्नाचें विवेचन अपूर्णच होय.

सन १६८८ तील चकमकीनें कित्येक गोष्टी कंपनीच्या पूर्णपणें लक्षांत ठसल्या. पहिली, मोगलांशीं जमिनीवर उघड सामना करणें कंपनीस अशक्य होय. दुसरी, मक्केस जाणाऱ्या यात्रेकरू जहाजांवर दहशत बसविणें, आणि मोठमोठ्या व्यापारी बंदरांची आरमारानें नाकेबंदी करणें, ह्या दोन गोष्टींनीं मोगलांस वठणीस आणतां येईल. तिसरी, तटबंदी व फौज ठेविल्याशिवाय नुसत्या वखारींचा परकी राज्यांत निभाव लागावयाचा नाहीं ह्मणून जेथें व्यापार चालवावयाचा असेल, तेथें स्वसंरक्षणाची तजवीज अगोदर केली पाहीजे. बंगाल प्रांतांत व्यापार करण्याची कंपनीची इच्छा असो वा नसो, चार्नोकच्या हट्टानें कलकत्ता येथें इंग्रजांची तटबंदी झाली ही गोष्ट खरी.

तटबंदी करावयाची खरी.पण तिचा खर्च कोण देणार? कंपनीस राज्य नको होतें, ह्मणून तटबंदी नको होती. अशा अडचणींत सर जशुआ चाइल्डनें डच लोकांची पद्धत स्वीकारली. ज्या ठिकाणीं तटबंदी करावयाची असेल तेथील लोकांवर व रयतेवर कर बसवून पैसा काढावा, आणि तो तेथच्या मजबुदीस लावावा, अशी परभारें खर्च भागण्याची युक्ती चाइल्डनें काढिली. व्यापार आणि वसूल ह्या उत्पन्नाच्या दोन बाबी स.१६८४ नंतर सुरू झाल्या. 'आशिया खंडांतील दुसऱ्या कोणत्याही राज्यापेक्षां आमच्या हद्दींत राहणारे लोक ज्यास्त सुरक्षित व निर्धास्त असतात, ह्मणून रक्षणाची किंमत त्यांजकडूनच वसूल केली पाहिजे,' असा कंपनीनें ठराव केला. स. १६८८त मद्रासेस म्युनिसिपालिटी स्थापण्यांत येऊन तिच्यांत सर्व लोकांचे प्रतिनिधि घेण्याचें ठरलें. ही मद्रासची म्युनिसिपालिटी पहिला नमुना होय. ह्या नमुन्यांत 'दिवाणी व लष्करी अंमलाचा योग्य मिलाफ करून वसुलाची पद्धत अशी बसविली पाहिजे कीं, त्या नमुन्यावर पुढें मोठें मजबूद व कायमचें राज्य हिंदुस्थानांत इंग्रजांस सदैव स्थापितां येईल. आमच्याशीं जे गोडीनें वागतील, त्यांस तोसीस पडावी अशी आमची इच्छा नाहीं. 'योग्य' व 'खंबीर' ह्या दोन शब्दांत आमच्या उद्योगाचें रहस्य आहे. आमचा व्यापार वाढावा अशी आमची इच्छा आहे खरी, पण त्याचप्रमाणें प्रत्येक ठिकाणचा वसूलही वाढविण्यासाठीं तुह्मीं उद्योग केला पाहिजे. आमच्या व्यापारास अनेक विघ्नें येतील, पण वसूल सुरू असेल तर आमच्या सत्तेस धक्का बसणार नाहीं. त्या योगें हिंदुस्थानांत आमचें राज्य कायम होईल. तें नसेल तर आह्मीं नुसते चांचे किंवा पळपुटे व्यापारी असेच समजले जाऊं. डच लोकांनीं हाच मार्ग स्वीकारिला. व्यापाराच्या दसपट ते राज्याकडे लक्ष देतात, ह्मणूनच मसाल्याच्या बेटांत व जपानांत डच लोकांची सरशी आहे.' अशा प्रकारची नवीन पद्धत कंपनीनें स्वीकारून टॉमस रोची पद्धत साहून दिली. इंग्लंडांत स. १६८८त जी मोठी राज्यक्रान्ति झाली, तशीच कंपनीच्या उद्योगांतली ही पहिली मोठी क्रान्ति त्याच वर्षी इकडे घडून आली. ह्या वेळेसच कंपनीला पुढील राज्यस्थापनेचीं स्वप्नें पडूं लागलीं, तीं त्या

वेळेस औरंगजेबास दिसलीं नाहींत. औरंगजेबाची बाहेरून सरशी दिसत असतां, मोगल बादशाही आंतून मोडत चालली होती, ह्याचें प्रत्यंतर कंपनीच्या नवीन उपक्रमांत दिसून येतें. कर्तबगारीनें औरंगजेब बादशहा, जहांगीर व शहाजहान ह्या दोघांहीपेक्षां हुशार होता. पण दुराग्रहानें त्यानें आपल्या राज्याचें व बादशाहीचें नुकसान करून घेतलें, ही गोष्ट इतिहासांत मशहूर आहे. कंपनीबरोबर चाललेल्या युद्धांत औरंगजेबानें लक्ष घातलें नाहीं. राज्यांतील दूरदूरच्या कोनाकोपऱ्यांत काय चाललें आहे ह्याची खडानखडा बातमी ज्या बादशहास लागत असे, आणि यत्किंचित् सरकारी बाब सुद्धां ज्याच्या हुकुमावांचून तडीस जात नसे, त्या धूर्त व चाणाक्ष पुरुषास युरोपियनांचे उद्योग समजले नाहींत. युरोपियन लोक किनाऱ्यावरील दहा पांच अप्रसिद्ध ठिकाणें यावेळीं व्यापून राहिले होते. बैलाच्या शिंगावर माशा बसाव्या इतकीच त्यांची योग्यता बादशहास वाटत असावी. पण समुद्रावर नाकेबंदी करून हे पुढें बादशाही बुडवितील. हें बादशहास समजलें नाहीं. उलट हे आपल्या फार उपयोगाचे आहेत असें त्यास वाटत होतें. सुरत, बंगाल वगैरे ठिकाणचे बादशहाचे अंमलदार त्यास योग्य सूचना करीत असतां, त्यांच्या ह्मणण्यास पुष्टि देण्याचें सोडून उलट त्यानें त्यांस दोष दिलेले आहेत.

स. १७०१त पुन औरंगजेब इंग्रजांवर चिडून गेला, आणि त्यानें सर्व इंग्रजांस देशांतून घालवून देण्याचा हुकूम सोडला. त्याचें कारण असें झालें कीं, दरसाल बादशहाचें एक जहाज सुरतेहून मक्केस जात असे. मक्केस उतरण्याचें बंदर मोचा ह्मणून होतें. त्या जहाजांतून पुष्कळ माल सुद्धां मोचा व जिद्दा येथें जाई. स. १७०१त एक जहाज परत येत असतां त्याजवर सोनेंचांदी मिळून ५२ लाख रुपयांचा ऐवज असून, इब्राहिमखान नांवाचा कप्तान मुख्य होता. त्याजपाशीं ८० तोफा व चारशें बंदुका व आणखी हत्यारें होतीं. हें जहाज मोचा सोडून सुरतेकडे येत असतां आठ नऊ दिवसांनीं त्याची एका लहानशा इंग्रज जहाजाशीं गांठ पडली. तेव्हां लढाई होऊन इंग्रजांनीं मोगलांचें जहाज पकडून त्यावरील लोक कैद केले व सर्व पैसा लुटला. हें वर्तमान

बादशहास कळल्यावर तो चिडून गेला, आणि त्यानें सुरत मुंबईहून इंग्रजांस घालवून देण्याचा हुकूम सोडिला. शिवाय इंग्रज व्यापारी इकडे, आपल्या राजाच्या नांवाचें नाणें पाडीत असत, त्याकरितां त्यांनीं टांकसाळही घातली होती. हें वरील हुकमाचें दुसरें एक कारण होतें. ह्या भांडणाची तडजोड करण्याकरितां खाफीखान मुंबईस गेला होता. त्यास तेथें असा जबाब मिळाला कीं, ज्यांनीं जहाज लुटलें, ते इंग्रज लोक कंपनीच्या नोकरींतले नसून, कंपनीनें काढून लावलेले बंडखोर इसम असा लुटारूपणा करून राहतात. एकंदरींत पोर्तुगीज, डच व इंग्रज यांच्या दरम्यान बादशहाचें नुकसान कसें होत होतें, ह्याची कल्पना वरच्या हकीगतीवरून वाचकांस येईल.

५. **मद्रासची स्थिति**—मद्रासच्या स्थापनेची हकीकत पूर्वीं येऊन गेली आहे ( प्र. १० क. ३ ) तेथील व्यवस्थाही बऱ्याच अंशीं इतर ठिकाणांसारखी होती. मद्रासची स्थापना झाल्यापासून खालील गव्हर्नरांनीं तेथें कारभार केला.

१ सर व्युल्यम लँगहॉर्न. १६७०-१६७७. २ स्ट्रेन्शॅम मास्टर, १६७७-१६८३.
३ व्युल्यमगिफर्ड, १६८३-१६९८. ४ टॉमस पिट, १६९८-१७०९.
५ कॉलेट, १७१७-१७२०

स. १६७०त मद्रासची अवस्था मोठी कठीण झाली होती. दक्षिणेस सेंट् टॉमे नांवाचें बंदर होतें, तें फ्रेंच आरमारानें येऊन काबीज केलें. तें परत घेण्याकरितां गोवळकोंड्याचा सेनापति बाबासाहेब मोठी फौज घेऊन चालून आला. फ्रेंचांबरोबर लढण्यास आपणास इंग्रज लोक मदत करीत नाहींत, ह्मणून बाबासाहेबास मोठा राग आला. अशाखालीं सुमारें दीड वर्ष गेलें, व सेंट टॉमे फ्रेंचांकडून निघालें नाहीं. तेवढ्या मुदतींत तें त्यांनीं चांगलें मजबूद केलें. मद्रासचा किल्ला त्या वेळेस तितका मजबूद नव्हता. तेव्हां शत्रूंच्या कचाट्यांत सांपडण्यापेक्षां मद्रास अजीबात सोडून द्यावें असा कांहीं वेळ विचार चालला. इकडे स. १६७४त डच लोकांनीं सेंट टॉमे फ्रेंचांपासून काबीज केलें; आणि मद्रासही त्याच वेळेस घेतलें असतें, पण इतक्यांत युरोपांतून इंग्रज व डच

यांजमध्यें तह झाल्याची बातमी आली, तेव्हां मद्रासच्या इंग्रजांच्या जिवांत जीव आला.

मद्रासच्या इंग्रजांनीं नीतीनें वागावें ह्मणून लँगहॉर्न ह्यानें कांहीं नियम केले. नाना प्रकारच्या गुन्ह्याबद्दल शिक्षा ठरविल्या, तथापि लोकांची नीति समाधानकारक नव्हती. तंटे व मारामाऱ्या ह्या गोष्टी केवळ दारूच्या दुकानांत व बाजारातांच न चालतां, भरकौन्सिलांत सुद्धां चालत. मद्रास येथें पॅट्रिक वॉनेर नांवाचा एक पाद्री होता तो लिहितो, ( ता. ३१ जॅनुआरी स. १६७६ ), 'डायरेक्टर महाराज, आपण धर्माभिमानी असून, ईश्वराबद्दल आपल्या मनांत पूज्यबुद्धि आहे असें मी समजतों; पण आपले देशबंधु येथें हिंदुस्थानांत असें कांहीं निंद्य आचरण करीत आहेत कीं, तें आपल्या कानांवर गेलें असतां, आपणास रडूं आल्याशिवाय राहणार नाहीं. मद्यपान व अनाचार ह्या लोकांत इतका चालू आहे, कीं त्याचें वर्णन ऐकून आपल्या अंगावर कांटा उभा राहील. ह्या गोष्टी अगदीं भर दिवसा चालू असून, त्याबद्दल ह्या मंडळीस यत्किंचित् लाज वाटत नाहीं. दारू, जुगार, व्यभिचार ह्यांच्या पायीं आपलें किती नुकसान हे लोक करीत आहेत ह्याचें वर्णन करणें अशक्य आहे.'

लिंगाप्पा ह्मणून गोवळकोंड्याच्या नोकरींत एक लष्करी अंमलदार होता, त्यानें मद्रासेवर स्वारी करून चार महिनेपर्यंत इंग्रजांचा कोंडमारा करून त्यांचा सर्व व्यापार बंद पाडिला. शेवटीं नाइलाज होऊन तीस हजार रुपये दंड भरून लिंगाप्पापासून इंग्रजांनीं आपली सुटका करून घेतली. स. १६७९त शिवाजी कर्नाटकांतून परत येत असतां मद्रासेस गेला. त्या प्रसंगीं सुमारें दोन अडीचशें रुपयांचें सामान त्यास इंग्रजांनीं नजर केलें. मद्रासच्या बाजूचे एतद्देशीय लोक पकडून त्यांस परदेशीं नेऊन गुलाम ह्मणून विकण्याचा धंदा डच व पोर्तुगीझ यांनीं जोरांत चालविला होता, तो बंद करण्याविषयीं मद्रासचे इंग्रज प्रयत्न करीत असून ( स. १६८३ ), मोगल बादशहाचेही त्या संबंधानें अव्याहत प्रयत्न चालू होते. कॉलेटच्या वेळेस मद्रासच्या इंग्रज लोकांपाशींही पुष्कळ गुलाम असून त्यांत स्त्रियाही होत्या, व त्यांच्या संतती-

करितां दोन धर्मार्थ शालागृहें ठेविलेलीं होतीं. मद्रासच्या कंपनीच्या दप्तरांत ह्या गुलामांविषयीं बरीच माहिती आहे.

स. १६८७त औरंगजेबानें गोवळकोंड्याचें राज्य काबिज केल्यावर इंग्रजांना होणारा त्रास पुष्कळ कमी झाला. कारण त्यांस धमकावणारी सत्ता कायती एकटी मोगलांचीच राहिली. झुल्फिकारखानानें जिंजीस वेढा घातला, त्या वेळीं मोगल फौजेस दारूगोळा वगैरे सामान मद्रासच्या इंग्रजांनीं पुरविलें. पुष्कळदां मराठ्यांपासून पराभव पावून मोगल अंमलदार व त्यांची फौज मद्रासेस इंग्रजांच्या आश्रयास येऊन राहत असत. जिंजीच्या वेढ्याची हकीकत इंग्रजांच्या दप्तरांत पुष्कळ सांपडते. मराठ्यांनीं मोगल फौजेस इतकें जेरीस आणिलें होतें, कीं राजाराम व त्याचे सरदार लोक ह्यांस कोणत्याहि प्रकारें दुखवूं नये, अशी इंग्रजांनीं आपल्या नोकरांस ताकीद दिली होती. झुल्फिकारखानानें इंग्रजांपाशीं साडेतीन लाख रुपये कर्ज मागितले होते पण ते त्यांस देतां आले नाहींत. पुढें जिंजी पडल्यावर झुल्फिकारखानास चाळीस हजार रुपये भरून त्याच्या मार्फत इंग्रजांनीं व्यापाराच्या सनदा बादशहाकडून मिळविल्या. एकंदरींत अधिकाऱ्यांची तोंडदाबी करून इंग्रज आपला बचाव करीत होते. मद्रासच्या दक्षिणेस नागपट्टण नांवाचें ठिकाण व आजूबाजूचा थोडा प्रदेश छत्रपति राजाराम ह्याजपासून खरेदी घेऊन इंग्रजांनीं तेथें नवीन किल्ला बांधिला, तो फोर्ट सेंट् डेव्हिड होय.

---

# प्रकरण तेरावें.

## दोन विरुद्ध पक्ष व त्यांची तडजोड.

१ चांचपणावर वाढलेले व्यापारी. २ नवीन कंपनीची स्थापना.
३ दोन कंपन्यांचीं हिंदुस्थानांत भांडणें. ४ सर वुल्यम नॉरिसची वकिलात.
५ समेटाची तडजोड. ६ संमेलन व त्याचे परिणाम.
७. भावी राज्यस्थापनेची सिद्धता.

**१. चांचेपणावर वाढलेले व्यापारी.**—इकडील व्यापारांत कंपनीस कल्पनातीत प्राप्ति होऊं लागली, त्याजबद्दल विलायतेंत लोकांच्या मनांत हेवा उत्पन्न झाला. सगळें भांडवल भरून येऊन पुनः शेअरचा भाव पांचशें आहे तो आहेच! हा काय लूट, कीं आहे तरी काय, असें लोकांस वाटूं लागलें. स. १६६५त लंडनांत भयंकर प्लेग होऊन हजारों लोक मेले; आणि स. १६६६त अग्निप्रलय होऊन त्यांतही लोकांचें अतोनात नुकसान झालें. पण कंपनीकडे पाहवें तों ह्या अरिष्टांनीं तिचें कांहींच नुकसान न होतां, तिची भरभराट कायम आहे! हें पाहून तिला अनेक शत्रु उत्पन्न झाले. पण दुसरा चार्ल्स व दुसरा जेम्स् हे राजे राज्य करीत असतां, कंपनीस त्यांचा चांगला आश्रय असल्यामुळें शत्रूंचें कांहीं चाललें नाहीं. कंपनीनें सुद्धां थोडीशी पड खाऊन वाटेल त्यास आपल्या आश्रयाखालीं व्यापाराची सवलत देऊन कांहीं दिवस समजूत काढिली; तसेंच आपल्या नोकरांस खासगी व्यापाराच्याही पुष्कळ सवलती दिल्या. ह्यामुळें अनेक इंग्रज लोक हिंदुस्थानांत येऊन, मुंबई, मद्रास वगैरे ठिकाणीं कंपनीच्या आश्रयाखालीं वसाहत करून खासगी व्यापार करूं लागले. अर्थात् पूर्वी नुसत्या वखारी होत्या, त्यांच्या आतां वसाहती बनल्या. अशा रीतीनें कांहीं दिवस कंपनीच्या शत्रूंचीं तोंडें बंद झालीं. पण अशा खासगी व्यापाऱ्यांची नोंद ठेवणें व त्यांवर देखरेख ठेवणें कठाण पडूं लागलें. इकडे खुद्द कंप

नीच्या व्यवस्थापकांतही दुफळी झाली. एका पक्षाचा मुख्य जशुआ चाइल्ड असून दुसऱ्या पक्षाचा टॉमस पॅपिलोन होता. चाइल्डचें म्हणणें असें होतें, कीं सर्व व्यापार कंपनीसारख्या एकाच संस्थेच्या ताब्यांत असावा; आणि पॅपिलोनचा पक्ष म्हणे कीं व्यापार सर्वांस खुला असला पाहिजे, त्यावर आडकाठी बसविण्याचा अधिकार राजास नाहीं. अर्थात् पॅपिलोन राजाच्या विरुद्ध होता. उलट राजाच्या कृपेवर आपण वाटेल तें करूं शकूं, अशी चाइल्डची हिंमत होती, तर त्याचे उलट या कंपनींत सर्वांचा समावेश करून व्यापाराचा फायदा सर्व राष्ट्रास सारखा मिळूं द्यावा, अशी पॅपिलोनची होती. परंतु चाइल्डनें मोठमोठ्या कामगारांस पैसे वगैरे चारून आपलें म्हणणें खरें केलें. स्वतः तर तो फारच धनाढ्य बनला होता. स. १६८३त त्यानें आपली मुलगी डयूक ऑफ् बोफर्टच्या मुलास दिली, त्या वेळीं पांच लाख रुपये त्यानें हुंडा दिला. स. १६९२त दुसऱ्या मुलीच्या लग्नांत त्यानें चार लाख हुंडा दिला, अशी बोलवा होती. त्याचा मुलगा सर रिचर्ड चाइल्ड हा अर्ल झाला. त्यानें बॅन्स्टेडचा बाग ( Banstead Park ), विकत घेऊन अक्रोडाचीं झाडें लावून मच्छीखातें बांधण्यांत वीस लाख रुपये खर्च केले. ह्याप्रमाणें चाइल्डच्या पक्षाची सरशी होऊन, पॅपिलोनच्या पक्षांतील लोकांस जबरदस्त शिक्षा झाल्या, म्हणून पॅपिलोन कांहीं दिवस हतवीर्य होऊन पळून हॉलंडांत युट्रेक्ट येथें गेला. ह्याप्रमाणें चाइल्ड निष्कंटक होऊन, त्यानें आपल्या म्हणण्याप्रमाणें कंपनीची व्यवस्था कायम करून घेण्याचा निश्चय केला. त्या कामीं हिंदुस्थानांत भावाचें त्यास साह्य होतें. परंतु कंपनीचा हा मक्ता काढून घेण्याचा पॅपिलोनच्या पक्षाचा उद्योग चालूच होता. तांबड्या समुद्राच्या दोनही किनाऱ्यांवरील प्रदेशांत टर्की कंपनी ह्मणून एक इंग्रज कंपनी फार दिवसांपासून व्यापार करीत होती. तिनें केप आफ् गुड होपच्या रस्त्यानें तांबड्या समुद्रांत माल आणण्याची परवानगी राजाजवळ मागितली होती ( स. १६८२ ). ही परवानगी देणें म्हणजे ई. इं. कंपनीचा एकतंत्री व्यापार बुडविण्यासारखें होतें. या संबंधानें पुष्कळ खट-

पंट झाली, पण राजानें टर्की कंपनीची मागणी मंजूर केली नाहीं. तेव्हां ज्या व्यापाऱ्यांचा मोड झाला, त्यांनीं निराळीच युक्ति काढिली. ई. इं. कंपनीच्या विरुद्ध जे लोक व्यापार करीत असत, त्यांचीं गलबतें व माल पकडून कंपनीनें घ्यावा, आणि त्यांच्या चौकशीसाठीं कंपनीनें आपसांतून एक आरमार–कोर्ट स्थापन करावें, असें फर्मान राजानें कंपनीस स. १६८३त दिलें होतें. हें फर्मान कंपनीस देण्यास राजास अधिकार नाहीं असें कंपनीच्या विरुद्ध पक्षानें ठरवून, टॉमस सॅन्डिस ( Tomas Sandys ) नांवाच्या इसमाकडून ह्या बाबतींत कोर्टापुढें दावा आणविला. ह्या सँडिसचीं गलबतें कंपनीनें पकडलीं होतीं. हा दावा लॉर्ड चीफ् जस्टिस जेफ्रिस ह्याजपुढें एक वर्षभर मोठ्या जोरानें चालला. दोनही पक्षांनीं आपापल्या बाजूनें अगदीं शिकस्त केली. एका बाजूस राजा व कंपनी, आणि दुसऱ्या बाजूस कंपनीच्या मक्त्याविरुद्ध तक्रार करणारे व्यापारी, असा हा झगडा होता. इंग्लंडांतील त्या वेळचे नामांकित कायदेपंडित ह्या वादांत सामील झाले, तेव्हां या प्रश्नास महत्त्व चढलें. नियंत्रित व्यापार व अनियंत्रित व्यापार ह्या दोन पक्षांमध्यें जो वाद कैक वर्षे पुढें चालला, त्याचा हा पूर्वरंग होय. राजापक्षाचा मुख्य वकील होल्ट व लोकपक्षाचा सर जॉर्ज ट्रेबी होता. होल्टचें समर्थन असें होतें कीं, ‘ कोणाही इंग्रजास राजाच्या परवानगीवांचून परधर्मी राष्ट्रांशीं व्यापार करण्याचा अधिकार नाहीं. कारण इंग्लंडचा राजा व परदेशाचे राजे यांजमध्यें विशिष्ट करार होऊन हा व्यापार सुरू झाला आहे; ह्मणून राजा परवानगी देईल त्यासच हा व्यापार करितां येईल. अर्थात् राजानें हा व्यापार कंपनीसच दिला असल्यामुळें, इतरांस त्यांत पडण्याचा अधिकार नाहीं ’ ह्यावर उलट पक्षाचें ह्मणणें असें होतें, कीं तिसऱ्या एड्वर्ड राजानें ( स. १३२७–१३७७ ) ‘ समुद्र सर्व प्रकारच्या व्यापारास खुला आहे, ’ असा ठराव केला होता. त्यावरून ई० इं० कंपनीस व्यापाराचा मक्ता देतांना, इतरांचा समुद्रावर यथेच्छ संचार करण्याचा हक्क एलिझाबेथ राणीस काढून घेण्याचा अधिकारच नव्हता. ह्मणून चार्ल्स राजा-

सही हा हक्क काढून घेतां येत नाहीं. परधर्मीयांशीं राजाच्या परवानगीशिवाय लोकांस व्यापार करण्याचा अधिकार नाहीं, हें ह्मणणें व्यर्थ आहे. तुर्क व डच लोक क्रिस्ती लोकांशीं व्यवहार करून आपले दावे कोर्टांत आणीत आहेत. इंग्रज राजानें परदेशांच्या राजांशीं व्यापारी तह केला ही गोष्ट खरी, पण त्या तहाचा फायदा सर्व इंग्रज राष्ट्रास मिळाला पाहिजे; अमक्यासच तो फायदा मिळावा, व इतरांस तो मिळूं नये,असा भेद करण्याचा राजास अधिकार नाहीं. शिवाय कंपनी ही दृश्य वस्तु नाहीं. घेण्यादेण्याचे व्यवहार फक्त व्यक्तींमध्यें घडतात, आणि धनकोस ऋणको ओळखतां येतो. तशी स्थिति ह्या कंपनीची नाहीं. ह्या कंपनीस जीव नाहीं, देह नाहीं. एका क्षणीं हिची सत्ता सर्व समुद्रांवर चालते, पण पाहूं गेलें तर ती कोठें दिसत नाहीं. अशा प्रकारची कंपनी जर अनेक इंग्रजांस बंदी करते, तर ही कंपनी राष्ट्राचा व्यापार वाढविण्याकरितां स्थापन झाली असें कसें ह्मणतां येईल ? ' ह्याप्रमाणें अनेक मोठमोठ्या विद्वानांचीं भाषणें झालीं. शेवटीं चीफ जस्टिस जेफ्रिज ह्यानें कंपनीच्या तर्फेनें निकाल दिला. जेफ्रिज केवळ राजाचा हस्तक असल्यामुळें, विरूद्ध तर्फेनें निकाल होणें शक्यच नव्हतें. तथापि ह्या निवाड्यांत एकंदर प्रश्नाचा संपूर्ण इतिहास भरलेला आहे.

सर जशुआ चाइल्डच्या हातांत हा निवाडा पडल्यावर, त्यानें, कंपनीच्या व्यापारांत ढवळाढवळ करणाऱ्या इसमांचा ताबडतोब बंदोबस्त केला. तथापि त्यामुळें धंद्याचें राजरोस स्वरूप जाऊन त्यास चोरीचें व चांचेपणाचें स्वरूप प्राप्त झालें. हा चांचेपणाचा धंदा पुढें जोरांत चालू झाला. किड्ड ( Kidd), एव्हरी ( Avory ) वगैरे अनेक मोठमोठे चांचे या धंद्यांत नामांकित आहेत. हे मादागास्कर वगैरे ठिकाणीं राहून कंपनीच्या गलबतांवर ताव मारून लूट करीत. एवढ्या अफाट प्रदेशांवरचा खासगी व्यापार बंद करणें कंपनीस शक्य नव्हतें. कंपनींतील अनेक नोकर नोकरींतून बडतर्फ झाल्यावर खुशाल खासगी धंदा करीत. त्यांस लंडनच्या कित्येक व्यापाऱ्यांकडून भांडवल व मदत मिळे. हिंदुस्थानांतील राजांबरोबर ते वशिला बांधीत. हिंदुस्थानच्या पूर्व किनाऱ्यावर

तर अशा लोकांनी कंपनीच्या विरूद्ध आपल्या वसाहतीही स्थापिल्या होत्या. टॉमस पिट्ट नांवाचा एक गृहस्थ होता. ह्याचाच नातू प्रासिद्ध वुल्यम पिट्ट होय. तो स. १६७४त बालासोर येथें येऊन राहिला. पुढें ११ वर्षें पावेतों त्यानें इराण पासून बंगालपर्यंतच्या किनाऱ्यावर व्यापार करून पैसा मिळविला. कंपनीच्या धमकावणीस त्यानें दाद दिली नाहीं. स. १६८१त इंग्लंडास जाऊन तो पुनः इकडे परत आला. त्यास पकडण्याचे कंपनीनें अनेक प्रयत्न केले, ते सफळ झाले नाहींत. कंपनीनें त्याजबद्दल बंगालच्या मोगल सुभेदाराकडे तक्रार केली; पण पिट्टनें सुभेदारास पैसे चारून त्याचें तोंड बंद केलें. स. १६८३त पुन: मोठी संपत्ति घेऊन तो विलायतेस परत आला असतां, त्यास वारंटानें पकडले; आणि चार लक्ष रुपयांच्या जामिनावर सोडलें. त्याजवर चार वर्षें खटला चालून स. १६८९त सहा हजार रुपये दंडाची शिक्षा त्यास झाली. स. १६८९त तो पार्लमेंटाचा सभासद झाला, तेव्हांपासून उघडपणें तो कंपनीच्या विरुद्ध वागून तिच्या व्यापाराचा मक्ता मोडण्याच्या खटपटीस लागला. स. १६९३त पार्लमेंटांत असतांच हिंदुस्थानांत सफर करून तो परत गेला. ह्याच सुमारास दुसऱ्या कारणांनीं कंपनीचे बारा वाजण्याची वेळ आली असल्यामुळें, तिनें आपल्या शत्रूंशीं सख्य केलें, आणि पिट्ट यास स. १६९७त मद्रासचा प्रेसिडेंट नेमिलें. अकरा वर्षें हा कारभार करून तेवढ्या अवधींत स्वत:ची व कंपनीची भरती केल्यावर स. १७०९त तो अपार संपत्ति घेऊन परत इंग्लंडास आला. त्यानें एक हिरा इंग्लंडांत विकला त्याची किंमत तेरा लाख रुपये आली. ह्या हिऱ्याचें नांव पिट्ट हिरा. हा हिरा स. १७९१त फ्रान्सच्या राजानें खरेदी घेतला, तेव्हां त्याची किंमत ४८ लाख रुपये होती.

**२. नवीन कंपनीची स्थापना:**—भरभराटीमुळेंच कंपनीला शत्रु उत्पन्न झाले. स. १६५७त जी वर्गणी जमविण्यांत आली, तिच्यावरच आज तीस वर्षे व्यापार चालू होता. त्यामुळें नवीन मंडळींस कंपनीच्या व्यापारांत शिरण्याची सोय राहिली नव्हती. कंपनींत सुमारें ऐंशीं असामा असून त्यांपैकीं

मुखत्यारीनें कारभार करणारे दहापांचच होते. एकट्या सर जशुया चाइल्डचीं मतें ८० होतीं. ही अव्यवस्था बंद करण्यासंबंधानें पुष्कळ चर्चा व ओरड झाली. थोड्याशा मंडळीनें खुशाल वाटेल तितकें कर्ज काढावें, व्यापार करावा व वाटेल तितका फायदा करावा, ही गोष्ट अत्यंत निंद्य होय, ह्यामुळें राष्ट्राचें भयंकर नुकसान होत आहे, राज्याच्या बाहेर पैसा नेणें राष्ट्रास घातक आहे, अशी जी ओरड कंपनीच्या पहिल्या पन्नास वर्षांत चालू होती, त्याचप्रमाणें थोड्या लोकांच्या हातांत व्यापार असणें राज्यास अपायकारक आहे, अशी ओरड पुढील पन्नास वर्षें कंपनीच्या कारभारास छळीत होती. सर जशुया चाइल्डसारखे गृहस्थ वाटेल त्या कंड्या पिकवून पैसा मिळवीत असत. कंपनीचीं गलबतें समुद्रांत बुडालीं, अशी खोटीच बातमी उठवून स्टॉकचा भाव उतरवून ठगाई करीत. एकदम एखादे दिवशीं चाइल्डचे हस्तक शेअरबाजारांत येऊन, सुस्कारे टाकून मोठ्या दुःखाची बतावणी करीत; आणि हिंदुस्थानांतून वाईट बातमी आली आहे, सर जशुया चाइल्ड वाटेल त्या किंमतीस आपले शेअर विकीत आहेत, असें सांगत. अशी हूल उठल्याबरोबर भराभर लोक आपले शेअर विकण्यास येत. इतक्यांत चाइल्डचे दुसरे गुप्त हस्तक पुढें येऊन ते शेअर विकत घेत. ह्याप्रमाणें एक लाखाचे शेअर शेंकडा ४।५ टक्के नुकसान सोसून चाइल्ड विकी, आणि शेंकडा १०।१२ फायद्यानें लगेच दहा लाखांचे शेअर विकत घेई.

दुसरी एक ओरड कंपनीच्या विरुद्ध होती. रेशीम, कापूस व लोकर ह्यांचीं वस्त्रें तयार करणारे इंग्लंडचे कारागीर गवगवा करूं लागले कीं, कंपनीनें बाहेरच्या देशांतील माल आणून आपला येथील धंदा बुडविला. त्यांनीं आपलीं गाऱ्हाणीं सरकारच्या कानावर घातलीं. पण दुसऱ्या जेम्सच्या जोरावर चाइल्डनें ह्या शत्रूंस दाद दिली नाहीं. उलट सन १६८६त त्यानें सर्व प्रकारच्या अधिकारांची नवीन सनद राजापासून मिळविली, तींत कंपनीला हरप्रकारें मदत करण्याविषयीं राजानें आपल्या सर्व अधिकाऱ्यांस हुकूम सोडिला. त्यामुळें चाइल्ड यास मोठी कृतकृत्यता वाटली. कंपनी पूर्वी लढ्यानशीं

व्यापाराची मंडळी होती, ती आतां हिंदुस्थानांत राजाचा अधिकार गाजवीत आहे, अशी घमेंड तो मारूं लागला. पण ह्या गोष्टीस दोन वर्षें झालीं नाहींत तोंच इंग्लंडांत राज्यक्रांति होऊन सर्व मनु बदलला. जेम्स शेअर्स विकून फ्रान्सांत जाऊन बसला. जेफ्रिसनें तुरुंगांत पडल्यावर आत्महत्या केली; आणि पार्लमेंट सभा राष्ट्राचीं गाऱ्हाणीं ऐकण्यास तयार झाली. कंपनीच्या कारभाराची जी घालमेल ह्या वेळीं झाली तिचें उत्कृष्ट वर्णन मेकॉलेच्या इतिहासांत आहे. तसेंच हिंदुस्थानचें राज्य जिंकण्यास व तें राखण्यास पुढील शेंदीडशें वर्षांत कंपनीस शक्ति कशी आली, त्याचें रहस्यही ह्या घालमेलींत आहे.

स. १६८८च्या राज्यक्रान्तीपूर्वी पार्लमेंटानें कंपनीच्या व्यवहारांत फारसें लक्ष घातलें नव्हतें. स. १६८९त कंपनीविरुद्ध असलेल्या सर्व तक्रारी कोर्टां-तून निघून पार्लमेंटापुढें आल्या. पूर्वींची वर्गणी बंद करून नवीन कंपनी स्थापन करावी व ती तयार होई तोंपर्यंतच ई० इं० कं० नें व्यापार चालवावा, असा ठराव पार्लमेंटानें स. १६९०त केला. तदनुरूप कंपनीच्या विरुद्ध पक्षानें एकदम मोठें भांडवल जमवून नवीन कंपनी स्थापिली, ( स. १६९१ ). ह्या कंपनीची सभा स्किनर्स हॉल ( Skinners Hall ) मध्यें भरत असे. पूर्वींचा पॅपिलोन आतां ह्या कंपनीत सामील झाला. पार्लमेंटानें कंपनीचें भांड-वल दीड कोट रु. पर्यंत वाढवून, कोणीही एका इसमानें पाऊण लाखापेक्षां ज्यास्त शेअर्स घेऊं नयेत असा निर्बंध ठरवून, दोनही कंपन्यांचा समेट करण्याचा प्रयत्न केला. पण ही गोष्ट जुन्या कंपनीस पटली नाहीं. चाइल्ड आपला हट्ट सोडीना. तेव्हां जुनी कंपनी रद्द करून नवीन कंपनीस सर्व व्यापार देण्याविषयीं कॉमन्स सभेनें राजाकडे मागणी केली. राजानेंही दोघां कंपन्यांचा समेट करण्याचा प्रयत्न केला. पण चाइल्डच्या आग्रहामुळें तो प्रकार साधला नाहीं. तेव्हां तीन वर्षांची मुदत कंपनीस देऊन पुढें ती साफ रद्द करण्याचा विचार ठरला ( स. १६९३ ). परंतु हा प्रकार घडून येण्यापूर्वींच चाइल्डनें दरबारच्या मंडळीस लांच चारून प्रधान मंडळाकडून २१ वर्षांच्या मुदतीची पूर्वींच्या सर्व हक्कांची नवीन सनद ई० इं० कंपनीसाठीं मिळविली'

मात्र नवीन भांडवल पाऊण कोटीचें करून, एका इसमास एक लक्षाहून ज्यास्त शेअर्स घेतां येऊं नये, आणि त्यास सभेंत दहापेक्षां ज्यास्त मतें असूं नयेत असा ठराव झाला. प्रधान मंडळानें केलेला हा व्यवहार पार्लमेंटास रुचला नाहीं. पार्लमेंटानें कित्येक तक्रारींचा तपास करून, हिंदुस्थानचा व्यापार पाहिजे त्यानें करावा असा हुकूम काढिला. येणेंकरून राजाच्या हक्कावर गदा आली. चाइल्डनें भरलेल्या लांचाचाही पार्लमेंटानें तपास केला; पण दुसऱ्या इसमांचीं नावें पुढें करून चाइल्डनें आपला बचाव केला. इकडे स्कॉट्लंडांत एक नवीन कंपनी स्थापन झाली. तिनें हिंदुस्थानाशीं व्यापार सुरू केला. पण तिच्यांत पुष्कळ अव्यवस्था होऊन ती लवकरच मोडली. पार्लमेंटांत दोन कंपन्यांचा तंटा चालूच होता. स. १६९७ त तीन हजार वीणकर लोकांनीं चाइल्डच्या घरावर हल्ला करून कंपनीचा खजिना लुटला. स. १६९८त राजास कर्ज पाहिजे होतें, तेव्हां ई. इं. कंपनीनें शेंकडा चार टक्के व्याजानें ७० लाख रुपये राजास देऊं केले; त्यावर दुसऱ्या कंपनीनें दोन कोट रुपये शेंकडा आठ टक्यानीं देण्याचें वचन दिलें. त्याच वर्षीं नवीन कंपनी स्थापन करण्याचा कायदा पार्लमेंटानें पास करून तिचें कर्ज स्वीकारिलें. अशा प्रकारें कंपनीपासून कर्ज किंवा नजर घेऊन तिला हक्क देण्याचा वहिवाट पूर्वापार चालू होती, हें मागें व्यक्त झालेंच आहे. ह्या नवीन कंपनीनें दोन कोट रुपये राष्ट्रास कर्ज द्यावें; आणि दुसरें दोन कोट भांडवल उभारून हिंदुस्थान वगैरे देशांशीं व्यापार करावा; पाहिजे त्या इंग्रजानें किंवा इतर राष्ट्रीयानें कंपनींत भाग ठेवण्यास हरकत नसावी; वरील कर्जाच्या व्याजांत मीठ, मिरीं, वगैरे कित्येक जिनसांवर कंपनीस जकात माफ असावी; आणि जुनी कंपनी तीन वर्षांनीं रद्द व्हावी, असें ठरलें. ह्या नव्या कंपनीस पुढें पूर्वदेशांशीं व्यापार करणारी इंग्रज कंपनी (the Eg. Co. Trading to the East Indies,) असें नांव मिळालें. कर्ज फिटेपर्यंत कंपनीची सनद चालावयाची होती. ह्या नव्या कंपनींत ३१ लाखांचें भांडवल एकट्या जुन्या कंपनीनें घेतलें. तीन दिवसांत दोन कोट भांडवल

जमलें. ह्यावरून व्यापारांतील किफायतीची लोकांची केवढी खात्री होती हें व्यक्त होतें. तरी नुकतेंच फ्रान्सशीं युद्ध होऊन चार हजारांवर इंग्रज जहाजें शत्रूंच्या हातांत पडलीं होतीं. तेव्हांची ही स्थिति आहे. हिंदुस्थानच्या व्यापारापासून इंग्रज राष्ट्रास अशी मोठी प्राप्ति होती. वुल्यम राजानें नवीन कंपनीस दिलेली सनद मोठी व्यापक असून तिच्यांत हिंदुस्थानच्या व्यापाराच्या सर्व भानगडींचा इतिहास भरलेला आहे. चोवीस असामींच्या कमिटीनें सर्व कच्चा कारभार पाहवा, ही जुन्या कंपनीची पद्धत राजानें ह्या नवीन कंपनींतही घातली. मात्र त्यांस डायरेक्टर्स हें नांव नवीन मिळालें. लिलांव मेणबत्ती जाळून करणें, ५०० टन सोरा खरेदीच्या दरानें सरकारास पुरविणें, हिशेबाचे चोपडे सर्वांस पाहण्यासाठीं खुले ठेवणें, प्रत्येकीं पांच हजार रुपयांचे शेअर्स घेतलेल्या नऊ असामींनीं मागणी केल्यास, समग्र कोर्टाची सभा भरविलीच पाहिजे अशी फरज असणें, प्रत्येक जहाजावर व वसाहतींत निदान एक तरी पाद्री ठेवणें, कंपनीच्या नोकरांनीं पोर्तुगीझ व हिंदुस्थानच्या भाषा शिकण्याची फरज असणें, इत्यादि अनेक कलमें ह्या नवीन सनदेंत होतीं.

ह्या व्यवस्थेनें दोन कंपन्या उत्पन्न झाल्या. पहिली ई. इं. कंपनी व दुसरी इंग्लिश कंपनी. नवीन कंपनी स्थापन झाल्याबरोबर पहिलीच्या शेअरचा भाव शेंकडा ३३–४० वर आला. तरी पण ती डगमगली नाहीं. नवीन कंपनीस व्यापाराचा अनुभव नाहीं, तेव्हां कधीं तरी दोनही कंपन्या एक झाल्याच पाहिजेत, असा तिचा पूर्वीपासून समज होता; आणि अशा धीराच्याच गोष्टी जुनी कंपनी हिंदुस्थानांतील आपल्या नोकरांस लिहून पाठवीत असे. याचा मासला खालील पत्रांत दिसतो. ' आमचे गुडघे सज्जड झाले आहेत. ते ह्या नवीन पोरांच्यापुढें नमत नाहींत. पूर्वी आरंभीं आमचें चहूंकडून नुकसान होत असतां व आम्ही डबघाईस येऊन आतां बुडणार असें सर्व जग ह्मणत असतां, आम्ही दमानें वागून तरलों; आणि पहिला पैसा बुडाला असतां, आणखी पैसा घालून व्यापार चालविला.

अशी गोष्ट आजपर्यंत कोणीं केली नाहीं. ह्यावरून आमचा कित्ता घ्या; अशा संकटांस आपण भीक घालीत नाहीं, असें सर्व जगास दाखवा; वादळानें झाडें उलथून पडत नाहींत, उगीच पाळें जरा हालतात, पण तेणेंकरून तीं ज्यास्तच भक्कम होतात, तशी आपली गत आहे. अशा अडचणीमुळें आपला उद्योग ज्यास्त बळावतो ह्यांत संशय नाहीं.'

नव्या कंपनीच्या अडचणी तर पुष्कळच होत्या. सरकारास जें कर्ज द्यावयाचें होतें त्याचा पैसा लगेच जमला; पण व्यापारासाठीं भांडवल जमेना; आणि जें थोडें जमलें, त्यानें जोराचा व्यापार चालविणें शक्य नव्हतें. तेव्हां त्यांनीं होऊन पहिल्या कंपनीशीं आपला व्यापार जोडून दोनही कंपन्या एक करण्याचा निश्चय केला. पण जुन्या कंपनीस ही गोष्ट एकदम कबूल झाली नाहीं. तीन वर्षांची नोटिस संपल्यावर आपली पुढें काय स्थिति होते ही जुन्या कंपनीस मोठी धास्ती होती. ती दूर करण्यासाठीं तिनें पार्लमेंटाकडे अर्ज केला कीं, सेप्टेंबर स. १७०१च्या पुढें ही कंपनी बंद न करितां तशीच पुढें चालूं द्यावी. इकडे त्याच वेळेस नव्या कंपनीनें ठराव केला, कीं दोनही कंपन्या एक कराव्या. मार्च स. १६९९त जुन्या कंपनीचा अर्ज पार्लमेंटानें नामंजूर केला. तेव्हां दोनही कंपन्यांची एकी करण्याची अर्थात्च दोघांनीं खटपट चालविली. प्रत्येक कंपनीनें आपले सात मुखत्यार नेमिले आणि त्यांनीं सलुखाचीं कलमें ठरवून रिपोर्ट करावा असें ठरविलें. ही वाटाघाट स. १६९९च्या मार्च पासून डिसेंबरपर्यंत चालली. पण तडजोड जुळली नाहीं. स. १७००त जुन्या कंपनीनें आपले व्यवहार १७०१त बंद करूं नयेत, असा पुनः पार्लमेंटाकडे अर्ज केला, तो मंजूर झाला, तेणेंकरून तीस मोठाच धीर आला. कांहीं दिवसांनीं राजानेंही त्या अर्जास मंजुरी दिली. हा अर्ज मंजूर होण्यापूर्वी कंपनीच्या शेअरचा भाव ७० होता तो लगेच १४९ झाला. नव्या कंपनीचा मात्र त्या गोष्टीनें धीर सुटला; आणि एकी होण्याचीं चिन्हें नाहींशीं होऊं लागलीं.

**३. दोन कंपन्यांचीं हिंदुस्थानांत भांडणें.**—हिंदुस्थानात नव्या

कंपनीनें जुनीचीच पद्धत स्वीकारिली होती. जुन्या कंपनीनें काढून टाकिलेल्या लबाड व नालायक लोकांस नव्या कंपनीनें हातीं घेतल्यामुळें, हिंदुस्थानांत दोघांमध्यें कलह उत्पन्न झाला. नवीन कंपनीचे नोकर हिंदुस्थानांतील सर्व इंग्रजांवर आपली हुकमत चालवूं लागले; परंतु ही हुकमत जुन्या कंपनीचे नोकर स. १७०१त तीन वर्षांची मुदत संपेपर्यंत मान्य करीनात. हीं भांडणें मुख्यतः तीन ठिकाणीं ह्मणजे मुंबई, मद्रास व बंगाल येथें झालीं. त्या तीनही ठिकाणीं नव्या कंपनीचे प्रेसिडेंट होते. ते तिघेही पूर्वी जुन्या कंपनींतून बडतर्फ झालेले असून हेकड व अज्ञानी होते. त्यांनींच खरोखर आपल्या धन्याचें नुकसान केलें. त्यांस ‘ राजाचे सल्लागार ’ (Kings' Counsel) अशी विशिष्ट पदवी असल्यामुळें, हिंदुस्थानांतील जुन्या व नव्या सर्व नोकरांवर ते आपला अंमल गाजवूं लागले. निदान स. १७०१त जुन्या कंपनीची मुदत संपण्यापूर्वीच त्यांनीं आपली हुकुमत सुरू केली ही त्यांची चूक होय. त्यांनीं वास्तविक व्यापाराकडे लक्ष घालावें; जुन्या कंपनीच्या वाटेस जाण्याचें कारण नव्हते. ‘ आह्मांस पार्लमेंटानें नेमून पाठविलें आहे. आमच्या सन्मानार्थ तुह्मीं निशाण खालीं केलें पाहिजे. सर्वांनीं आमचे हुकूम पाळण्याचें वचन दिलें पाहिजे, ’ अशी घमेंड मारण्यांतच त्यांनीं आपली इतकर्तव्यता मानिली. त्यांच्याजवळ नाहीं पैसा, नाहीं फौज, नाहीं उद्योग, अशा स्थितींत जुन्या कंपनीच्या नोकरांनीं त्यांस धाब्यावर बसविलें, व त्यांची अवहेलना केली, ह्यांत नवल नाहीं. नव्या कंपनीच्या डायरेक्टरांस सुद्धां त्यांचा हा उद्दामपणा आवडला नाहीं. मुंबईस सर जॉन गेयर ( Gayer ) हा जुन्या कंपनीचा अधिकारी त्या धामधुमीच्या काळांत मराठे व मोगल ह्यांजपासून मोठ्या कष्टानें मुंबईचें संरक्षण करीत होता. अनेक लुटारू जहाजांनीं मुंबईवर येऊन धाड घालावी, असा प्रकार चालू होता. पुढें पन्नास वर्षांनीं क्लाइव्हनें मराठ्यांच्या आरमाराचा बंदोबस्त केला, तोपर्यंत मुंबईची स्थिति अशीच गडबडीची होती. गेयर ह्यानें स. १६९९त कंटाळून आपल्या जागेचा राजीनामा दिला, परंतु तो कंपनीनें मान्य केला नाहीं. उलट अशी बातमी हिंदुस्थानास

पोचली कीं, जुन्या कंपनीचीं कृष्ण कृत्यें राजानें ओळखून तीं मोडून टाकिलीं व नव्या कंपनीची स्थापना केली. ह्या बातमीस अनुसरून नव्या कंपनीमार्फत सर निकलस वेट ( Sir Nicholas Waite ) हा मुंबईचा प्रेसिडेंट होऊन आला, ( स. १७०० ). हा उद्दाम व मूर्ख होता. त्याला सुरतेस जुन्या कंपनीकडून कांहींच मान मिळाला नाहीं, तेव्हां त्यानें आपले लोक पाठवून सुरतेचें निशाण मुद्दाम खालीं करविलें. इकडे सुरतेच्या मोगल सुभेदारानें त्यास सांगितलें कीं, " तुमच्या राजानें जरी तुह्मांस नेमून इकडे पाठविलें असलें तरी, येथें व्यवहार करण्यास आमच्या बादशहाचें फर्मान पाहिजे, तें मिळवी-पर्यंत आह्मी जुन्या कंपनीस मात्र ओळखणार, तुह्मीं येथें दंगा करण्याचें कारण नाहीं. " गेयर ह्यानें त्याची नानाप्रकारें समजूत केली, कीं अशा रीतीनें आपसांत भांडून दोन कंपन्यांचा विरोध एतद्देशीय लोकांस दाखविणें बरें नव्हे. पण वेट ह्या समजुतीच्या गोष्टी थोड्याच ऐकणार ? त्यानें बादशहास लिहून पाठविलें कीं, जुनी कंपनी चोर व लुटारू आहे, तिचीं कृत्यें तुह्मीं मानूं नका. ह्या गोष्टीनें औरंगजेबाचें पित्त खवळलें. मक्केस जाणाऱ्या जहाजांस अलीकडे पुष्कळच त्रास पोंचला होता; तेव्हां इंग्रजही चोरच आहेत; हे सर्व चोर आहेत असें समजून त्यानें प्रांतोप्रांतीं हुकूम पाठविले, कीं जुन्या कंप-नीचा सर्व माल पकडून नोकरांस कैद करावें. सर जॉन गेयर हा बायकोसह वेटशीं तडजोड करण्याकरितां मुंबईहून सुरतेस गेला; तेथें पोंचतांच त्यास मोग-लांनीं कैद करून बंदींत टाकिलें. ह्या बंदींत कित्येक वर्षे त्यास कंठावीं लागलीं.

बंगाल्यांतही असाच कांहीं प्रकार झाला. तेथें जुन्या कंपनीचा अधि-कारी जॉन बियर्ड ( John Beard ) हा असून, नवीन कंपनीचा लिट-ल्टन ( Sir Edward Littleton ) हा होता. हा लिटल्टन स. १६८२त जुन्या कंपनींतून बरतर्फ झालेला होता. तो उर्मट व स्वतःची तुंबडी भरणारा असून कोणतेंही वाईट कृत्य करण्यास कचरणारा नव्हता. त्याच्या हाताखालीं असेच आणखी तीन बरतर्फ झालेले इसम नव्या कंप-नीनें नोकरी देऊन इकडे पाठविले. महिना पंधरा दिवसतांच त्यांचा कंपनीस

सुद्धां बीट आला; पण पार्लमेंटांत वशिला मोठा असल्यामुळें त्याचें कांहीं वांकडें झालें नाहीं. जॉन बियर्ड हा फोर्ट विल्यमचा गव्हर्नर असून हुशार व धोरणी होता. लिटल्टननें बंगाल्यांत पोंचण्यापूर्वी बियर्ड यास दरडावणीचा निरोप पाठविला. इंग्लंडांत जुन्या कंपनीची सत्ता कितीही खालावली असली, तरी हिंदुस्थानांत तिचा अधिकार केवढा आहे ह्याची लिटल्टन यास कल्पना नव्हती. आपण आल्याबरोबर जुन्या कंपनीचे नोकर आपल्या जागा पटापट खालीं करून आपणांस देतील असें त्यास वाटत होतें. कर्ज देण्याची वेळ आली, कीं जुन्या कंपनीचें कर्ज आपण देणार नाहीं, पण फायद्याची बाब आली, कीं जुनी कंपनी संपली व आतां आपणच सर्व मुखत्यार आहों, असें त्यास वाटे. बियर्ड ह्यानें लिटल्टनाच्या दरडावणीस भीक घातली नाहीं आणि जबाबही दिला नाहीं; उलट लिटल्टनचा हुकूम कोणीं पाळूं नये असा त्यानें आपल्या नोकरांसाठीं जाहीरनामा लाविला. तें पाहून लिटल्टननें पुष्कळ दांतओंठ चाविले, पण कांहीं उपयोग झाला नाहीं. त्याच्या बरोबरचे बहुतेक लोक गेले, आणि आपोआप त्याचा गर्व जिरूं लागला. बादशहाच्या फर्मानांच्या नकला त्यास पाहिजे होत्या, त्याही बियर्डनें दिल्या नाहींत.

मद्रासेस जॉन पिट्ट व टॉमस पिट्ट यांची अशीच जोडी होती. टॉमस पिट्टची हकीकत मागें आलीच आहे. तो ह्या वेळेस जुन्या कंपनीच्या तर्फे फोर्ट सेंट जॉर्जचा गव्हर्नर होता. जॉन पिट्टही त्याच्याच कुटुंबांतला होता. स. १६९९ च्या जुलैंत तो मद्रासेस आला. टॉमसनें त्यास सलामी दिली नाहीं, तेव्हां जॉनची तब्यत गेली. बियर्डप्रमाणेंच टॉमसनेंही आपल्या लोकांस हुकूम फर्माविला कीं जॉनचा हुकूम कोणीं मानूं नये. अशा रीतीनें त्याची फजिती होऊन तोही दांतओंठ खात स्वस्थ बसला.

**४. सर व्युल्यम नॉरिसची वकिलात** ( स. १६९९-१७०२ ).— **स. १६९८** त नवीन कंपनीची स्थापना झाली तेव्हां जो ठराव पार्लमेंटानें केला त्यांत एक कलम असें होतें, कीं कंपनीच्या व्यापाराची नीट व्यवस्था मोगल दरबारांत ठेवण्याकरितां त्या दरबारीं इंग्लंडचा एक वकील आपल्या

खर्चानें नवीन कंपनीनें ठेवावा. असा वकील तेथें ठेवला म्हणजे किल्ले वगैरे बांधून लष्कर ठेवण्याचें प्रयोजन उरणार नाहीं. लष्करी बंदोबस्त विरुद्ध सलोख्याची वकिलात, असे दोन प्रकार बरेच दिवस चालू होते. शेवटीं नवीन कंपनी स्थापन झाल्यावर तिनें बादशहाकडे वकील पाठविण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें पार्लमेंटांतील लिव्हरपूलचा मेंबर वुइल्यम नॉरिस (William Norris) ह्यास सर हा किताब देऊन इकडे पाठविलें. त्याचा पगार वर्षाचा वीस हजार रुपये होता. त्याजबरोबर एक एक शस्त्रवैद्य, एक उपाध्या व मोठा लवाजमा होता. त्या सर्वांना उंची पोषाख दिलेले होते. जुन्या कंपनीस हें आवडलें नाहीं. त्यांनींही आपला वकील पाठविण्याचा निश्चय केला, पण तो पुढें रहित झाला. नॉरिस हा स. १६९९ च्या सप्टेंबरांत हिंदुस्थानांत आला. प्रथम कोणत्या बंदरांत उतरावें हा प्रश्न होता. जॉन पिट्टनें विशेष आग्रह केल्यावरून तो मच्छलिपट्टण येथें उतरला. असा आग्रह करण्याचें कांहीं कारण नव्हते. बादशहा त्या वेळीं महाराष्ट्रांत होता, म्हणून त्याची भेट घेण्यास मुंबईस उतरणें चांगलें झालें असतें. देशांत चाललेल्या युद्धाच्या गर्दीतून मच्छलिपट्टणाहून महाराष्ट्रांत पायरस्त्यानें येणें बहुतक अशक्यच होतें. शिवाय नॉरिस ह्यास लव्याजम्याची हौस फार; संपूर्ण इतमाम घेतल्यावांचून तो पाऊल पुढें टाकीत नसे वेळ पाहून वागण्याचें तारतम्य त्याच्या ठिकाणीं नव्हतें. आग्रह धरावा केव्हां व सोडावा केव्हां, हें सर टॉमस रो समजत होता, तसा नॉरिस समजत नसे. सारांश, त्याच्या मताप्रमाणें स्वारीची तजवजि जॉन पिट्टच्या हातून लागेना, व सिद्धता करण्यांतच कित्येक महिने निघून गेले. इकडून सर निकलस वेटचीं सुरतेस येण्याविषयीं त्यास पत्रावर पत्रें येत होतीं. त्याप्रमाणें तो सुरतेस जाण्यास निघाला. सुरतेस पोंचण्यास दीड महिना लागावयाचा, ते त्यास तीन महिने लागले. स. १७०० च्या डिसेंबरांत तो सुरतेस पोंचला. जानेवारींत तो मोठा लवाजमा घेऊन बादशहाकडे गेला. बादशहा त्या वेळेस मराठ्यांचा पन्हाळा किल्ला काबीज करीत होता. त्याचा प्रधान आसदखान ब्रह्मपुरीस होता तेथें प्रथम नॉरिस गेला. तेथें वाद्यें वाजवीत

मोठ्या स्वारीनिशीं दिवाणाची भेट घेण्याचा त्यानें आग्रह धरल्यावरून आसद-खानानें त्याची भेट घेतली नाहीं. पुढें तो तसाच पन्हाळयास गेला. तेथें बाद-शहानें ता. २८ एप्रिल रोजीं त्याची भेट घेतली. सुदैवानें बादशहानें त्याचा सर्व हक्क चालू दिला; आणि लगेच तीनही इलाख्यांत व्यापाराचीं फर्मानें देण्याचें कबूल केलें. परंतु तीं हातीं पडण्यापूर्वीं अनेक अडचणी उद्भवल्या. औरंगजेब ह्या युरोपीय राष्ट्रांस हिंदुस्थानांत व्यापार करण्याचें फर्मान देई, त्यास एक मोठी अट ठेवी, ती अशी कीं, पश्चिम किनाऱ्यावरून मक्केस जाणाऱ्या मुसलमान यात्रेकरूंच्या गलबतांचें त्यांनीं संरक्षण करावें, यांचे लोकांचा उप-द्रव त्यांस होऊं देऊं नये. ह्यासाठीं प्रत्येक राष्ट्राची मर्यादा त्यानें ठरवून दिली होती. सुरतेपासून तांबड्या समुद्रापर्यंत डच लोकांनी, फ्रेंचांनीं इराणच्या अखातावर, व इंग्रजांनीं दक्षिण किनाऱ्यावरील प्रदेशावर पाहरा ठेवावा. हें पाहऱ्याचें काम अलीकडे बरोबर होत नसून यात्रेकरूंस फार त्रास पोंचल्या-मुळें बादशहा चिडून गेला होता. ह्या संधीस सुरतेहून सर निकलस वेटनें बादशहास लिहून पाठविलें कीं, आपण आह्मांस सुरत येथें व्यापाराच्या सव-लती दिल्यास आह्मीच तुमच्या यात्रेकरू जहाजांवर सर्व ठिकाणीं पाहरा ठेवूं. बादशहास आणखी ज्यास्त तें काय पाहिजे ? त्यानें लगेच ही गोष्ट कबूल करून तशा प्रकारचीं फर्मानें देण्याचा हुकूम सोडला. पण नॉरिस ह्यास तसलीं फर्मानें नको होतीं. वेटनें कबूल केलेली गोष्ट नॉरिस ह्यास कबूल नव्हती. यात्रेकरूंच्या बंदोबस्ताची हमी घेतल्याशिवाय त्यास व्यापाराच्या सवलती मिळवावयाच्या होत्या. ह्यामुळें तो वेटवर चडफडूं लागला. तेणेंकरून फर्मानाच्या कामांत लढा पडला. यात्रेकरूंची हमी इंग्रजांवरच लादली जावी अशी डच लोकांचीही इच्छा होती; तेव्हां बुध्या सर्व जोखीम आपल्या एकट्या कंपनीवर ओढून घेण्याचें नॉरिसच्यानें कबूल करवेना; आणि कबूल केलें असतें तरी तें त्यास शक्यही नव्हतें. त्यानें आपल्याबरोबर चार लढाऊ जहाजें आणिलीं होतीं, पण त्यांजवरील अधिकाऱ्यांचें व नॉरिसचें वांकडें येऊन ते त्याचा हुकूम पाळीत नव्हते. अशा रीतीनें जो लढा पडला त्याचा निकाल

होईना. आंतून जुन्या कंपनीचे एजंट दरबारांत लांच वगैरे देऊन नॉरिसचा उद्योग बुडविण्याची खटपट करीतच होते. अशा स्थितींत बादशहानें त्यास लिहून सांगून पाठविलें कीं, 'यात्रेकरूंची हमी घ्या; नाहीं तर इंग्लंडची वाट धरा.' हें उत्तर ऐकून नॉरिसच्या अंगाचा तिळपापड होऊन त्यानें इंग्लंडचा रस्ता धरिला. ब्रह्मपुरी येथें त्यास पन्नास हजार मोगल फौजेनें वेढा घातला, तेव्हां पोरखेळाप्रमाणें आपल्या चार तोफा सज्ज करून तो युद्धास सिद्ध झाला. तेथें त्याचे अडीच महिने गेले. शेवटीं शरण जाऊन त्यानें आपली सुटका करून घेतली; आणि माल हालवीत १७०२ च्या मार्चांत तो सुरतेस परत आला. तेथें वेटशीं त्याचें जोराचें भांडण झालें. आपलें काम फसलें ह्याचा दोष ते एकमेकांवर लोटूं लागले. वास्तविक नॉरिसचें काम बिकट होतें. सर टॉमस रोची हुशारी त्याच्या अंगीं नव्हती. त्याच्या वकिलातीचा सात लाख रुपये खर्च विनाकारण नव्या कंपनीवर पडला. इकडे इंग्लंडांत जुन्या कंपनीच्या व्यापाराची मुदत पार्लमेंटानें ज्यास्तच वाढविली. ही खबर त्यास पोंचली, तेव्हां त्याची कंबर पूर्णपणें खचून गेली. म्हणून त्यानें परत जाण्याचा निश्चय केला. पण त्यास गलबत मिळेना; तेव्हां एका खासगी व्यापाऱ्याचे गलबतावर बसून तो निघाला, परंतु रस्त्यांत सन १७०२च्या ऑक्टोबर महिन्यांत सेंट हेलेना येथें मरण पावला. जुन्या कंपनीचे प्रयत्न, नव्या कंपनींतील अधिकाऱ्यांचे तंटे व उद्योग, इत्यादिकांनीं बादशहा इंग्रजांविषयीं अत्यंत साशंक होऊन चिडून मात्र गेला. त्यानें ठिकठिकाणीं इंग्रजांचा माल पकडून लोक बंदींत टाकिले. बंगाल्यांत व मद्रासच्या किनाऱ्यावर तीच स्थिति झाली. कर्नाटकच्या नबाबानें मद्रासेवर स्वारी केली आणि टॉमस पिट्ट यास वेढा घातला, तेव्हां पिट्टनें मोठ्या शौर्यानें तीन महिनेपर्यंत आपला बचाव केला. त्यामुळें हळूहळू जुन्या कंपनीचीच सरशी होत चालली.

**५. समेटाची तडजोड.**—अशा संकटसमयीं पार्लमेंटानें दोन्ही कंपन्यांचा समेट केला ह्मणूनच इंग्रजांचें हिंदुस्थानांत वर्चस्व कायम राहिलें. सन

१७०१च्या आरंभीं पार्लमेंटाची नवीन निवणूक होत होती. ह्या निवडणुकीच्या प्रसंगीं दोनही कंपन्यांनीं लांच, वशिला, मेजवान्या, वाटाघाट वगैरे हरतऱ्हा करून आपापल्या तर्फेचे लोक पार्लमेंटांत निवडून येण्याविषयीं अशी कांहीं जबरदस्त खटपट केली, कीं शहाणे व तिऱ्हाईत लोक ह्मणूं लागले, ह्या दोनही कंपन्या नाहींशा होतील तर बरें, नाहीं तर आपल्या राज्याची धडगत दिसत नाहीं. तथापि नवीन पार्लमेंटांत ह्या व्यापाराच्या प्रश्नाचा विचार करण्यास योग्य असें पुष्कळ लोक निवडून आले. मात्र राजा वुल्यमचें लक्ष ह्या व्यापाराकडे नव्हतें. फ्रान्सचा राजा चौदावा लुइ फार प्रबळ झाला होता. त्याचा मोड करण्याविषयीं फ्रान्सशीं युद्ध सुरू करण्याच्या विचारांत वुल्यम होता. ह्मणून दोनही कंपन्या एक करून बखेडा मोडण्याचा जालीम हुकूम त्यानें सोडिला; आणि पार्लमेंटांतील त्या प्रश्नाची वाटाघाट बंद केली. स. १७०१च्या एप्रिलांत दोनही कंपन्यांचे सात सात मुखत्यार तडजोडीसाठीं बसले. एक वर्षभर नाना तऱ्हेची वाटाघाट व खटपट चालली. इकडे फ्रान्सशीं युद्ध सुरू होण्याच्या रंगांत आलें. स. १७०२च्या एप्रिलांत दोनही कंपन्यांच्या संमेलनाचा ठराव होऊन पसंतीसाठीं राजाकडे गेला. इतक्यांत राजा मरण पावला, व राणी ॲन तख्तावर आली. तिनें जुलै महिन्यांत त्या ठरावास आपली संमति दिली ( स. १७०२ ). हा ठराव दोन कंपन्या व राणी ह्या त्रिवर्गांमध्यें झालेल्या तहाच्या स्वरूपाचा आहे. त्यांत खालील अटींवर दोन कंपन्यांची एकी करण्यांत आली.

१. नवीन कंपनीस हिंदुस्थानाशीं व्यापार करणारी इंग्रजांची संयुक्त मंडळी ( The United Co. of Merchants of England Trading to the East Indies ), असें नांव देण्यांत आलें.

२. प्रत्येक कंपनीनें बारा डायरेक्टर्स नेमावे, या चोवीसांनीं विलायतेंत सर्व कच्चा कारभार पाहवा. त्यांनीं विलायती मालाचा अंदाज ठरवून दोन सारखे भाग दोन कंपन्यांस वांटून द्यावे.

३. सात वर्षांच्या अवधींत पूर्वींच्या देण्याघेण्याचे सर्व व्यवहार संपवावे. त्यानंतर दोनही कंपन्यांचे व्यवहार व पूर्वींच्या सनदा व हक्क नवीन कंपनीनें वापरावे.

४. पहिल्या कंपनीच्या ताब्यांतील इमारती, किल्ले वगैरेची किंमत ३३ लाख रुपये व नवीन कंपनीच्या ताब्यांतील इमारतींची ७ लाख रुपये ठरविण्यांत आली. येणेंप्रमाणें सर्व व्यवहार उलगडण्यांत आले.

ह्या ठरावाची खबर हिंदुस्थानांत आली. पण केवळ कागदावरील ताकिदींनीं येथचे व्यवहार एकदम उलगडण्यासारखे नव्हते. विलायतेंत सुद्धां पांच सात वर्षेपर्यंत संयुक्त डायरेक्टरांशिवाय प्रत्येक कंपनीचे २४ डायरेक्टर्स आपल्या सभा भरवून हिंदुस्थानांत हुकूम पाठवीत असत. येणेंप्रमाणें हिंदुस्थानांत तीन निरनिराळे हुकूम येत. असा बखेडा स. १७०८ पावेतों चालला होता. नवीन कंपनीचे जे अधिकारी नालायक होते, ते सर्व काढून टाकण्यांत येऊन, 'राजाचे सल्लागार' ( King's Consul ), ही त्यांची पदवी काढून घेण्यांत आली. सर जॉन गेयर हा सुरतेस मोगलांच्या कैदेंत होता, त्यास मुंबईच्या मुख्य प्रेसिडेंटाची जागा देण्यांत येऊन निकलस वेट ह्यास त्याच्या हाताखालीं सुरतेस नेमण्यांत आलें. पण वेटनें तो हुकूम मानला नाहीं. मोगल अधिकाऱ्यांस लांच वगैरे चारून आणखी सहा वर्षे गेयर ह्यास त्यानें तसाच कैदेंत राहूं दिलें; आणि आपण वाटेल तें दुर्वृत्त आचरूं लागला. त्याची बायको इंग्लंडांत जिवंत असतां, हिंदुस्थानांत त्यानें आपल्या पुतणीशीं लग्न केलें. शेवटीं कंपनीनें त्यास विलायतेहून हुकूम पाठवून कैद करविलें आणि सर जॉन गेयर ह्यास मुक्त केलें, ( स. १७१० ). पण गेयरचें दुर्दैव येथें संपलें नाहीं. इंग्लंडांत परत येत असतां रस्त्यांत फ्रेंच लढाऊ जहाजांनीं पकडून त्यास कैद केलें, आणि तो फ्रेंचांच्या कैदेंतच मरण पावला ( स. १७३१ ). ऑंजियरच्या वेळची शिस्त, दरारा, आणि स. १७०० पासून पुढील दहा वर्षांतील त्यांची बदनामी, ह्यांचा एकसमयावच्छेदें विचार केला म्हणजे इंग्रजांची सत्ता अंतःकलहांनीं किती खालावली होती हें दिसून येईल.

ठेवणें, जरूरीप्रमाणें संग्राम करणें व जमेल तेथपावेतों हिंदुस्थानांत प्रदेश काबीज करून त्यावर आपली सत्ता स्थापणें, ह्या गोष्टी अपरिहार्य आहेत, अशी इंग्रज राष्ट्राची खात्री होऊन त्या कामीं कंपनीस पुढें साह्य करण्यास इंग्रज राष्ट्र तयार झालें. हा प्रकार स. १७०८ पावेतों घडून आला. एकशें आठ वर्षांचा कंपनीच्या कारभाराचा हा पहिला मोठा खंड पुढील राज्यस्थापनेचा पाया होय.

**७. भावी राज्यस्थापनेची सिद्धता.**—स. १६९०त औरंगजेब व कंपनी यांचा समेट झाल्यावर कंपनीच्या व्यापारास ज्यास्त ज्यास्त अडचणी येऊं लागल्या. त्यांच्या वखारींच्या संनिध सदैव युद्धप्रसंग चालू झाले; युरोपियन चांचे लोकांचा उपद्रव वाढला, आणि फ्रेंच व डच यांनींही ज्यास्तच नुकसानी आरंभिली. ह्या अडचणींमुळें एतद्देशीय अधिकाऱ्यांवर अवलंबून न राहतां आपला आपण बचाव करण्याचा उपक्रम कंपनीनें सुरू केला. हिंदुस्थानांत एतद्देशीयांचा कारभार सुरळीत असता तर हा नवीन खटाटोप करण्याचें प्रयोजन कंपनीस पडलें नसतें. हाच मुद्दा कंपनीच्या त्या वेळच्या, पत्रव्यवहारांत मुख्यत्वेंकरून दिसून येतो. स. १६९० नंतर औरंगजेबाच्या अडचणीही वाढतच गेल्या. मुसलमान व मराठे ह्यांच्या फौजांनीं व युद्धांनीं हिंदुस्थानच्या द्वीपकल्पाचा भाग व्यापून गेला. बादशहा वयातीत झाल्यामुळें, पुढें परिणाम काय होतो इकडे सर्वांचे डोळे लागले. अशा परिस्थितींतच हिंदुस्थानांत आपणांस राज्य स्थापन करतां येईल, अशीं स्वप्नें कंपनीस पडूं लागलीं. हा प्रयोग कांहीं नवीन नव्हता. डच लोकांनीं पूर्वद्वीपसमूहांत आपलें राज्य स्थापलेंच होतें. पोर्तुगीझांचेंही राज्य इकडे होतें. सर चार्लस डव्हेना ( Davenant ) व लीब्निझ ( Leibnitz ) ह्या गृहस्थांनीं त्या वेळच्या ह्या व्यापाराची व राज्यस्थापनेची उत्कृष्ट मीमांसा केली आहे, ती वाचली ह्मणजे हिंदुस्थानांत इंग्रजांचें राज्य स्थापन झालें, ह्याचें कांहीं एक आश्चर्य वाटत नाहीं. डव्हेना ह्मणतो, ‘ ज्याच्या हातांत इकडचा व्यापार तोच इकडील भूप्रदेशाचा मालक; हिंदुस्थानावरील आमचा ताबा यत्किंचित् कमी झाला, कीं आमचा व्यापार बसला; व्यापार बसला कीं आरमार लयास

गेलें; आणि आरमार गेलें, कीं राज्यही लयास गेलें ह्मणून समजावें. हिंदुस्थानाच्या व्यापारानें आह्मांस पाहिजे त्या राष्ट्राशीं झगडतां येईल.' अद्यापि इंग्रजांचें राज्य ह्याच तत्त्वावर चाललें आहे. लीब्निझ हा फ्रेंच होता. त्यानें फ्रान्सचा राजा चौदावा लुई यास असें कळविलें, कीं, 'युरोपांत डच लोकांशीं लढून त्यांचा कधीं पाडाव होणार नाहीं. डचांची सर्व शक्ति पूर्वेकडील व्यापारावर अवलंबून आहे. प्रथम इजिप्ट देश जिंकून डच लोकांचा व्यापार व आरमार ह्यांचा उगम नाहींसा करावा, तेव्हांच डच लोकांचा युरोपांत पाडाव होईल, इतकेंच नाहीं, तर त्या योगानें आपणांस आशिया खंडांत मोठें राज्यही कमावतां येईल.

कित्येक ग्रंथकारांनीं हिंदुस्थानांत इंग्रजांचें राज्य झालें हा एक अद्भुत प्रकार घडून आला, अशीं जीं विधानें केलीं आहेत, तीं वरील हकीकतीवरून वास्तविक नाहींत. त्यांत अद्भुत प्रकार कांहीं नाहीं. लहानशा चार दोन वसाहतींचें एकदम मोठें कल्पनातीत राज्य निर्माण झालें, अशांतला हा प्रकार नाहीं. एका राष्ट्रानें दुसऱ्या राष्ट्रास जिंकण्याचें पूर्वींचें साधन म्हणजे अलेक्झांडर किंवा सीझरप्रमाणें मोठ्या फौजा घेऊन विजय संपादणें हें होतें. पण त्याच्याही पेक्षां जास्त सोयीचें, ज्यास्त प्रचंड, पण बाहेर दिसून न येणारें साधन व्यापार होय, हें कोणाचे लक्षांत नव्हतें. व्यापारांत राज्यप्राप्तीचीं मुळें असतात, हें पुष्कळांस ठाऊक नसल्यामुळें, त्यांस ह्या इंग्रजी राज्यविस्ताराचा प्रकार अजब वाटतो. इंग्रजांच्या वखारी थोड्या होत्या खऱ्या, पण त्या नाक्यांच्या ठिकाणांवर वसलेल्या होत्या. तेथें व्यापाराची घडामोड उत्कृष्ट चालून, शिवाय तेथील आरमाराच्या मजबुदीनें पूर्वेकडील एकंदर व्यापाराचें संरक्षण इंग्रजांस करतां येण्यासारखें होतें. म्हणजे व्यापारानें धनप्राप्ति, धनप्राप्तीनें आरमार, व आरमारानें व्यापार, अशीहि परस्परावलंबित कारणपरंपरा असून, तिच्यांत राज्य जिंकण्याच्या कामीं नेपोलियन अगर सीझर ह्यांच्या सारख्या योद्ध्यांहून ज्यास्त करामत भरलेली आहे. अपूर्व प्रकार कांहीं असेल तर तो हा आहे. पूर्वीं लष्कराच्या जोरावर जीं कामें

घडत, तीं पुढें आरमाराच्या जोरानें घडूं लागलीं, एवढाच फरक. आरमाराची व व्यापाराची शक्ति केवढी आहे हें प्रथम लोकांच्या निदर्शनास आलें नव्हतें, ह्मणून आकाशांतून एकदम एखादें फळ तोंडांत येऊन पडावें, त्याप्रमाणें हिंदुस्थानाचें राज्य अकल्पित व अनायासें इंग्रजांच्या घशांत येऊन पडलें, अशीं विधानें लेखकांनीं केलीं, पण तीं अवास्तव होत. ई. इं. कंपनीनें शेंपन्नास वर्षांत येथें आपला व्यापार थोडथोडा वाढवीत नेला, त्यांत त्यांची किफायत हळूहळू वाढत गेली; पैशाबरोबर त्यांची मजबुदी व शक्ति वाढली; त्या शक्तीवर पुढील राज्याचा पाया हळूहळू पण मजबूद घालण्याचें काम कंपनीनें केलें. ह्या कंपन्यांचें अंतःस्वरूप पाहिलें असतां, त्या राज्यांच्या घडामोडी करणाऱ्या स्वतंत्र संस्था होत. अशाच संस्थांनीं अमेरिकेंत व आफ्रिकेंत नवीन राज्यें निर्माण केलीं आहेत, हें सहज कळून येईल. आफ्रिकेच्या किनाऱ्यापासून तों जपानच्या किनाऱ्यापर्यंत जो मोठा भूजलप्रदेशाचा विस्तृत व्यापारोपयोगी पट्टा, त्याचा पूर्वेकडचा भाग डच लोकांनीं व्यापिला व पश्चिमेकडचा भाग इंग्रजांनीं व्यापिला; पण हा व्याप पूर्ण होण्यास पुष्कळ काळ लागला. तो एकुणिसाव्या शतकांत तडीस गेला. हा खटाटोप करितांना पाश्चात्य राष्ट्रांनीं एक मोठी युक्ति केली ती ही, कीं ते त्यांच्या इकडच्या वसाहती, वखारी, व ठिकाणें आपापल्या युरोपियन राजांच्या नांवानें धारण करीत. एतद्देशीय राजांच्या हुकमतीखालीं आपण आहों, आपला युरोपियन राजांशीं संबंध नाहीं, असा स्वतंत्रतेचा प्रकार त्यांनीं कधीं अवलंबिला नाहीं. हल्लीं सुद्धां इंग्रज, जर्मन किंवा फ्रेंच लोक चिनांत, तुर्कस्तानांत, किंवा सयामांत आगगाड्या बांधण्याचे, खाणींचे, किंवा अन्य उद्योग सुरू करितात, तेव्हां ते उद्योग आपल्या युरोपियन सत्ताधीशांच्या नांवानें करितात, त्या त्या राष्ट्रांच्या वकिलांमार्फत त्यांचें संरक्षण होतें आणि त्यांस त्या परदेशांत यत्किंचित् उपद्रव झाला तर युरोपांतील सरकारांमार्फत त्यांची लगेच दाद लागते. ह्मणून त्यांचे उद्योग सहज तडीस जातात.

---

# प्रकरण चौदावें.

## हिंदुस्थानांत फ्रेंचांचा उद्योग.

### इ. स. १७४० पावेतों.

१. फ्रेंच व इंग्रज ह्यांच्या उद्योगांतील फरक. २. आरंभींचे प्रयत्न.
३. मार्टिन व पांदिचरीची स्थापना. ४. लेन्वॉर, लाबूर्डोने, डुप्ले व डुमास.

**१. फ्रेंच व इंग्रज ह्यांच्या उद्योगांतील फरक.**--इंग्रजांप्रमाणें फ्रेंचांनींही पूर्वेकडील व्यापार ताब्यांत आणण्याचे पुष्कळ प्रयत्न केले. पोर्तुगीझ व स्पेनचे खलाशी जगाच्या निरनिराळ्या भागांत नवीन प्रदेश कबज्यांत आणीत आहेत हें पाहून, फ्रेंचांनाही त्या संबंधानें अभिलाष वाटूं लागला. त्या वेळच्या फ्रेंच ग्रंथांत परदेशांची माहिती व व्यापारापासून होणार राष्ट्रीय फायदे ह्यांचें भरपूर विवेचन आहे. तथापि इंग्लंड व हॉलंड ह्या देशांत स. १६००च्या सुमारास कंपन्या स्थापन झाल्या, तशा प्रथम फ्रान्सांत झाल्या नाहींत. स. १६२४त कार्डिनल रिशेल्यु हा नामांकित धर्मोपासक फ्रान्सचा मुख्य प्रधान झाला; आणि तें काम त्यानें फार दिवस केलें. त्यानें दूर देशांत वसाहती करण्यासाठीं नवीन उद्योग सुरू केले. इंग्रजांनीं व डचांनीं उद्योग केले त्यांत व फ्रेंचांच्या त्या वेळच्या उद्योगांत मुख्य फरक असा आहे, कीं बाहेरच्या देशांत रोमन कॅथोलिक धर्म पसरून, तेथच्या लोकांस क्रिस्ती करून आपल्या राज्यांत सामील करावें, आणि त्याबरोबरच स्पेनची वाढती भरभराट कमी करून आपला फायदा करावा, अशी योजना आरंभीं फ्रेंचांची होती. म्हणजे स्पेनची सत्ता कमी करण्याच्या कामांत इंग्लंड, हॉलंड व फ्रान्स ह्यांची एकवाक्यता होती. परदेशांत क्रिस्ती धर्म वाढविण्याची कल्पना तत्कालीन फ्रेंच लोकांस फारच आवडली. त्यांनीं भराभर वर्गण्या गोळा केल्या; आणि मिशनरी लोकांच्या टोळ्या अमेरिकेंत वगैरे

पाठविल्या. उत्तर अमेरिकेंत जेझुइट् लोकांचा भरणा ह्या फ्रेंचांनीं केला. ह्या उद्योगास फ्रेंच सरकाराचें पूर्ण पाठबळ होतें, इतकेंच नव्हे, तर व्यापारी लोकांस सरकारी अधिकाऱ्यांचा दाब दुःसह वाटत असूनही, ह्या उद्योगांत फ्रेंच सरकारानें लोकांच्या हातांत कांहींच सत्ता ठेविली नाहीं. वास्तविक व्यापारासारखे उद्योग लोकांनींच संभाळिले पाहिजेत; त्यांत सरकाराची मध्यस्थी नुकसानीस मात्र कारण होते. इंग्लंडांत व्यापाराच्या कामांत सरकारानें लोकांस पूर्ण स्वातंत्र्य दिल्यामुळें इंग्रज व्यापाराची भरभराट झाली. फ्रान्सचा प्रकार उलट होता. त्यांत सरकाराचें अंग मुख्य होतें. व्यापारांत घातलेले पैसेही सरकाराचे व सरकारी अधिकाऱ्यांचे होते. मोठमोठ्या नेमणुकांची वाटणी सरकारी अधिकाऱ्यांनी आपापसांत करून घेतली होती. कंपनीच्या सभासदांत व व्यवस्थापकांत मुख्य भरणा दरबारी लोकांचा होता. कार्डिनल रिशेल्यूची ही व्यवस्था व्यापारी लोकांस रुचली नाही. धर्मप्रसाराची ब्याद व्यापारी लोकांस नको होती. रुआँ व मार्सेल ह्या शहरांतील व्यापाऱ्यांनीं सरकाराकडे नाना प्रकारच्या तकरारी केल्या, पण त्यांचें कोणी ऐकिलें. नाहीं तथापि रिशेल्यूच्या उपक्रमाचा सांगण्यासारखा परिणाम झाला नाहीं. कित्येक सफरी बाह्य प्रदेशांत गेल्या, त्यामुळें पुढील मार्ग सुलभ झाला, इतकेंच. ह्यावरून आरंभांतच इंग्रज व फ्रेंच ह्यांच्या उपक्रमांत कित्येक ठळक भेद दिसून येतात. इंग्रज कंपन्या लोकांनीं स्थापिल्या, त्यांस राजांचें पाठबळ नुसतें नांवाचें होतें. फ्रेंच कंपन्या राजानें स्थापिल्या, त्यांत लोकांचें अंग फारसें नव्हतें. इंग्रजांनीं आपले नियम व व्यवस्था स्वतः मर्जीप्रमाणें आपल्या सोयीची करून घेतली; फ्रेंच कंपन्यांचे नियम सरकारानें ठरवून दिले होते. इंग्रज व्यापारी भूतलावर वाटेल तिकडे स्वेच्छेनें संचार करून, पाहिजे तें साहस करीत. फ्रेंच व्यापाऱ्यांना सरकारानें आंखलेल्या रेषेबाहेर यत्किंचित् पाऊल टाकतां येत नसे.

फ्रान्सचा विख्यात राजा चादावा लुइ राज्य करीत असतां (१६४३-१७१५), त्याचा मुख्य प्रधान कोलबर्ट हा प्रसिद्ध पुरुष होता. कोलबर्टनें युरोपच्या बाहेर फ्रेंचांचें

राज्य वाढविण्याचे अनेक उपाय केले. सन १६६४त त्यानें दोन कंपन्या स्थापिल्या; एक ईस्ट इंडियाची व एक वेस्ट इंडियाची. इंग्रज व डच कंपन्यांप्रमाणें ह्या फ्रेंच कंपन्यांना मोठ अधिकार दिलेले होते. परंतु फ्रान्सच्या राज्यकारभारांत राजा करील ती पूर्वदिशा असा प्रकार असल्यामुळें, लोक आपलें भांडवल कंपनींत घालण्यास पुढें येत नसत. मंदिरांत प्रार्थना चालू असतांना सुद्धां पाद्री लोक ह्या कंपनांत भांडवल घालण्यास लोकांस उपदेश करीत; तरी रकमा जुळतां जुळतां हरहर पडे. वेस्ट इंडिया कंपनी तर दहा वर्षांतच बंद करावी लागली. ईस्ट इंडिया कंपनीचें काम सुरू होतें. मादागास्कर बेट जिंकून फ्रान्सच्या ताब्यांत आणण्याचा उद्योग ह्या कंपनीस सांगितल्यामुळें, कंपनीचें नुकसान मात्र पुष्कळ झालें आणि उद्योग तडीस गेला नाहीं युरोपांत फ्रान्सचें डच लोकांशीं युद्ध चालू होतें, त्या युद्धाचा जाच बाहेर ह्या कंपनीस झाला. किंबहुना, त्या युद्धाचें एक कारण पूर्वेकडील व्यापारांत ह्या दोन राष्ट्रांची स्पर्धा हेंच होय. सन १७०२–१७१३ पर्यंत इंग्रजफ्रेंचांचेंही युरोपांत मोठें युद्ध झालें. सन १७१३त यूट्रेक्ट येथें तह होऊन युद्धाचा शेवट झाला, तेव्हांपासून फ्रेंच कंपनीची भरभराट होऊं लागली. पंचवीस वर्षांत ही भरभराट इतकी झाली, कीं शंभर वर्षांच्या उद्योगानें इंग्रजांनीं जेवढी कमाई केली होती, तेवढी कमाई फ्रेंचांनीं त्या पंचवीस वर्षांत केली. माहीं. पांदिचरी व चंद्रनगर हीं मुंबई, मद्रास व कलकत्ता ह्या इंग्रजांच्या तोडीचीं ठिकाणें निर्माण झालीं. लेन्वॉर, ड्यूमास व डुप्ले हे एकामागून एक हुशार व धोरणी अधिकारी हिंदुस्थानांत आले; त्यांनीं हरएक गोष्टींत अल्प काळांत इंग्रजांशीं आपली बरोबरी करून ठेविली. म्हणून सन १७४०च्या सुमारास इंग्लंड व फ्रान्स ह्या दोन राष्ट्रांमध्यें वेस्ट इंडिया व ईस्ट इंडिया या दोनही भागांत जबरदस्त चुरस उत्पन्न झाली. पश्चिमेकडील स्पर्धा वसाहतींकरितां, व पूर्वेकडील स्पर्धा व्यापाराकरितां. पश्चिमेकडील स्पर्धेचा निकाल अमेरिकेंत व्हावयाचा असून, पूर्वेकडील स्पर्धेचा निकाल हिंदुस्थानांत व्हावयाचा होता.

अशा रीतीनें दोनही राष्ट्रांची बरोबरी होती, तरी त्यांचे मूळचे राष्ट्रीय स्वभाव व धोरणें कायम होतीं. फ्रेंच कंपनीस तेथील राजानें मोठमोठ्या रकमा कर्जाऊ दिल्या होत्या. उलट पक्षीं इंग्लंडांत तेथील सरकारानें कंपनी-पासून कर्ज घेतलेलें होतें. स. १७५०त हें कर्ज सुमारें साडेचार कोट रुपये होतें. फ्रेंचांचे अधिकारी सरकारानें नेमिलेले असून, केवळ शिफारशीनें उदयास आले होते; पण इंग्रजांचे व्यापारी स्वतःच्या हिमतीनें कामें करून योग्यतेस चढले होते. सन १७१५त फ्रान्सचा राजा चौदावा लुइ मरण पावल्यानंतर पंधरावा लुइ गादीवर आला. तो सदा ऐषआरामांत निमग्न असल्यामुळें, कारभारी लोक मन मानेल तसा कारभार करूं लागले. हे इंग्लंड फ्रान्सचे राजकीय स्थितींतले फरक ध्यानांत घेतले असतां पुढील परिणामांची मीमांसा करितां येईल.

ह्या दोन राष्ट्रांचे तंटे हिंदुस्थानांत विकोपास गेले ते दक्षिण हिंदुस्थानांत कां गेले, हें समजण्यासाठीं तत्कालीन स्थिति ध्यानांत आणावी. पश्चिम किनाऱ्यावर मराठ्यांचा अंमल जोरांत होता. बंगाल्यांतही नबाबांचा अंमल मज-बूद असून, परकी राष्ट्रांना आपल्या हद्दींत ते धुडगुस घालूं देणारे नव्हते. राहतां राहिला पूर्वेकडचा कारोमांडेल किनारा. ह्या किनाऱ्यावर मात्र पुष्कळसा गोंधळ माजलेला होता. निजाम, सातारकर व तंजावरकर मराठे अर्काटचे नबाब वगैरे अनेक सत्ताधीश आपापल्यापरी त्या प्रदेशावर हक्क सांगत होते. म्हणून ह्या परकी राष्ट्रांस प्रथम एकमेकांवर शस्त्र उगारण्यास हा प्रदेश सोयीचा सांपडला. हिंदुस्थानांतली स्थिति कशीही असली, तरी ह्या दोन राष्ट्रांच्या भांडणाचा अखेर निकाल युरोपांत व अमेरिकेंत जशा प्रकारचा झाला, त्याच धोरणावर तो हिंदुस्थानांतही अवश्य झाला पाहिजे, अशी अटकळ आगाऊ बांधण्यास हरकत नव्हती.

**२. आरंभींचे प्रयत्न.**—पोर्तुगीझ, डच व इंग्रज हे लोक पूर्वेकडील व्यापाराच्या आशेनें इकडे आले, त्याचप्रमाणे फ्रेंचही आले. सर्वांच्या मागून फ्रेंच इकडे आले, तरी त्यांनीं थोड्या अवधींत पुष्कळच आघाडी

मारिली. डच व इंग्रज यांच्या मानानें फ्रेंचांचें वजन पूर्वेकडे जरी आज बरेंच कमी आहे, तरी त्यांच्या अंगीं हुशारी किंवा शौर्य कमी होतें असें नाहीं. डच व इंग्रज राष्ट्रांप्रमाणें युरोपांत फ्रेंचांचा कोंडमारा झाला नव्हता; तसेंच स्थानिक भानगडींत गुंतल्यामुळें बाहेरच्या व्यापारांत त्यांनीं आरंभीं फारसें लक्ष घातलें नाहीं.×

सन १५८३त रुआं शहरच्या व्यापाऱ्यांनीं व्यापारासाठीं दोन गलबतें तयार करून पूर्वेकडे पाठविलीं. तीं रस्त्यांतच गडप झालीं, परत गेलीं नाहींत. त्यापुढचा राजा फ्रॅन्सिस ह्यानें १५३७त व १५४३त जाहीरनामे काढून लोकांस परदेशीं व्यापार करण्याविषयीं बरेंच उत्तेजन दिलें. पण त्याचा फारसा उपयोग झाला नाहीं. सन १५७८त तिसऱ्या हेन्रीनें असाच एक जाहीरनामा काढिला. परंतु तोही निष्फळ ठरला. पुढें चवथ्या हेन्रीची कारकीर्द शांततेची झाल्यामुळें त्यास ह्या विषयाकडे बरेंच लक्ष देण्यास फावलें. तारीख १ जून सन १६०४ रोजीं कंपनी स्थापन होऊन, तिला पंधरा वर्षेंपावेतों व्यापार करण्याची राजाची मंजुरी मिळाली. तथापि ह्या कामांत तंटे उत्पन्न होऊन त्यांमुळें कांहींच निष्पन्न झालें नाहीं. पुढें स. १६२५त तेराव्या लुईनें आणखी कित्येक

---

× पुढील हकीकत समजण्याकरितां फ्रान्सच्या कित्येक राजांचीं नांवें येथें दिलीं आहेत.

अकरावा लुइ, सन १४६१-१४८३. आठवा शार्ल्स, सन १४८३-१४८९.
बारावा लुइ, सन १४८९-१५१५. पहिला फ्रॅन्सिस, सन १५१५-१५४७.
दुसरा हेन्री, सन १५४७-१५५९. दुसरा फ्रॅन्सिस, सन १५५९-१५६०.
नववा शार्ल्स, सन १५६०-१५७४. तिसरा हेन्री, सन १५७४-१५८९.
चवथा हेन्री, सन १५८९-१६१०. तेरावा लुइ, सन १६१०-१६४३.
चौदावा लुइ, सन १६४३-१७१५. पंधरावा लुइ, सन १७१५-१७७४.
सोळावा लुइ, सन १७७४-१७८९. १७८९त फ्रान्स देशांत राज्यक्रांति झाली.

व्यापारी पहिल्या कंपनींत मिळवून तिला नवी सनद करून दिली. ह्या कंपनीनें आपलें काम लगेच सुरू केलें. तिनें दोन गलबतें तयार करून तीं दोन हुशार कप्तानांच्या हाताखालीं पूर्वेकडे रवाना केलीं. त्यांतलें एक जहाज जायां झालें, तरी ह्या सफरींत एकंदरींत बराच फायदा झाला. स. १६१९त पुनरपि तीन जहाजांची सफर पूर्वेकडील मसाल्यांच्या बेटांत जाऊन किफायत करून परत आली. ह्या दोनही सफरींत कॅप्टिन बोलियो मुख्य होता. त्यास डच लोकांपासून पुष्कळ त्रास सोसावा लागला. पुढें स. १६२६त प्रसिद्ध फ्रेंच मुत्सद्दी रिशेल्यु ह्यानें ह्या कामांत मन घालून एक नवीन कंपनी स्थापिली, तिचें नांव हिंदुस्थानची कंपनी. तिची सनद वीस वर्षांची होती. ह्या कंपनीनें प्रथम मादागास्कर बेटांत वसाहती केल्या. युरोप व हिंदुस्थान ह्यांच्या दरम्यान आपल्या सत्तेची एक जागा असावी असें सर्व राष्ट्रांस वाटत असे, आणि तेंच फ्रेंचांसही अवश्य वाटून त्यांनीं मादागास्कर ताब्यांत घेण्याबद्दल तीस वर्षे कसून प्रयत्न केला. पण मादागास्करच्या लोकांस परकीय लोकांचा संबंध न आवडून त्यांनीं हरप्रयत्नानें त्यांस ती जागा सोडून देण्यास भाग पाडलें.

पुढें सन १६४३त चौदावा लुइ राज्यावर आला. हा औरंगजेबाचा समकालीन असून त्याच्या सारखाच उपद्व्यापी होता. त्याचा प्रधान कोल्बर्ट यानें राज्याचा कारभार फार चांगला केल्यामुळें फ्रेंच इतिहासांत त्यांची कीर्ति मोठी आहे. राज्याचा वसूल, उद्योगधंदा, व्यापार व आरमार ह्या बाबतींत नवीन योजना करून त्यानें राष्ट्राची भरभराट केली. आरमाराच्या सोयीचे किल्ले व बंदरें बांधून शंभर नवीन लढाऊ जहाजें तयार केलीं. पूर्वेकडील व्यापाराची कमाई तो ओळखून होता. तदनुसार इंग्रजांची पद्धत उचलून त्यानें फ्रेंच कंपनीस हिंदुस्थानच्या व्यापाराचा पन्नास वर्षांचा कायमचा मक्ता दिला. कंपनीपासून कर न घेतां पहिल्या दहा वर्षांत नुकसान होईल तें भरून देऊन, शिवाय तिला सरकारांतून हरएक प्रकारचें साह्य मिळावें, अशी व्यवस्था कोल्बर्टनें केली. त्यानें कंपनीचें भांडवल ६० लक्ष रुपये ठरविलें, पैकीं पांचवा हिस्सा सरकारांतून दिला.

सरकारानें पुढाकार घेतल्याबरोबर पैसेवाले लोकही व्यापाराचे कामांत मनापासून झटूं लागले. ह्याप्रमाणें नव्या कंपनीनें उद्योग सुरू केला, तरी मादागास्कर सोडून देण्याचें धाडस फ्रेंचांनीं केलें नाहीं. म्हणून पुनरपि पहिल्याच चुका होऊन, पहिल्याप्रमाणेंच नुकसानही आलें. तेथची वाईट हवा, खराब जमीन व तद्देशीय लोकांचें वैर ह्या तीन कारणांनीं त्यांना फार नुकसान व अपेष्टा सोसाव्या लागल्या. सन १६७२त तद्देशीय लोकांनीं कंपनीच्या पुष्कळ लोकांची कत्तल केली, तेव्हां तें बेट सोडून फ्रेंच लोक हिंदुस्थानाकडे वळले. कांहीं थोड्या लोकांनीं जवळच पूर्वेस बुर्बोन नांवाच्या बेटांत वसाहत केली. तें बेट अद्यापि फ्रान्सच्याच ताब्यांत आहे.

स. १६६६त फ्रॅन्सिस कारोन ( François Caron ) नांवाच्या एका हुशार गृहस्थाच्या हाताखालीं कांहीं मंडळी फ्रेंच कंपनीनें हिंदुस्थानास पाठविली. हा कारोन जातीचा डच असून डच कंपनींत प्रथम हलकी नोकरी पत्करून पुढें मोठ्या योग्यतेस चढला होता. जपानांत जाऊन तेथची भाषा शिकून डच कंपनीचा त्यानें बराच फायदा करून दिला होता. पण पुढें त्याचें डच कंपनीशीं न पटून, नोकरी सोडून तो फ्रेंच प्रधान कोलबर्ट याजकडे आला. कोलबर्टनें त्यास हाताशीं धरिलें, आणि फ्रेंच व्यापाराचा मुख्य अधिकार त्यास देऊन हिंदुस्थानांत पाठविलें. तो स. १६६७त फ्रान्स सोडून निघाला. रस्त्यांत मादागास्करची दुःस्थिति पाहून तो तसाच कोचिनवरून सुरतेस आला. तेथें स. १६६८त त्यानें फ्रेंचांची पहिली वखार घातली; आणि पहिल्याच प्रथम चांगली जुळवाजुळव करून कंपनीचा पुष्कळ फायदा केला. कारोनच्या हाताखालीं मर्कारा नांवाचा इस्पहानचा एक गृहस्थ होता. तो गोवळकोंड्यास जाऊन तेथील सुलतानास भेटला; आणि डच व इंग्रज यांनीं पुष्कळ अडथळे आणिले असतांही, सुलतानापासून त्यानें जकातीची माफी व पूर्व किनाऱ्यावर व्यापार करण्याची परवानगी मिळविली, आणि प्रथम मच्छलीपट्टण येथें फ्रेंचांची वखार घातली (१६६९). फ्रेंच लोकांचा मुख्य स्वभावदोष म्हणजे आपसांत एकमेकांचा हेवा व द्वेष करणें हा होय. ह्यामुळें त्या राष्ट्राचें पुष्कळच

नुकसान झालें आहे. वरील कामगिरींत कारोन व मर्कारा ह्यांचीं भांडणें होऊन त्यांनीं एकमेकांबद्दलच्या तक्रारी फ्रेंच सरकाराकडे लिहून पाठविल्या. इकडे हिंदुस्थानांत आपल्या सत्तेची एखादी जागा असावी ह्या उद्देशानें कारोननें मद्रासच्या दक्षिणेस डच लोकांच्या ताब्यांत असलेलें सेंट टॉमे हें ठिकाण काबीज केलें. तथापि इतर ठिकाणीं फ्रेंचांचें वरेंच नुकसान होऊन. त्याचा सर्व दोष कारोनवर आला; आणि त्यास फ्रेंच सरकारानें परत बोलाविलें. त्याप्रमाणें परत जात असतां लिस्बननजीक त्याचें गलबत फुटून तो मरण पावला. ( स. १६७४ ).

३. **मार्टिन व पांदिचरीची स्थापना** ( स. १६७४–१७०६ ) — कारोननें सेंट टॉमे घेतलें, त्या वेळीं त्याच्या हाताखालीं फ्रान्सिस मार्टिन नांवाचा एक हुशार फ्रेंच गृहस्थ होता. तोही आरंभीं डच कंपनीत नोकर असून, ती नोकरी सोडून तो फ्रेंच कंपनींत शिरला होता. त्याच्यावर कारोनचा पूर्ण विश्वास असून, तो सर्वांस मोठा प्रिय होता. सेंट टॉमे आपल्या कबजांत राहील न राहील, ह्या भीतीनें त्यानें गोवळकोंड्याच्या कुत्बशहापासून पूर्वकिनाऱ्यावर थोडीशी जागा विकत घेतली. पुढें लवकरच डच लोकांचें मोठें आरमार येऊन त्यांनीं सेंट टॉमे काबीज केलें. त्या वेळीं जे फ्रेंच लोक जिवंत राहिले ते तेथून नवीन विकत घेतलेल्या जागीं आले. त्या ठिकाणीं मार्टिननें एक शहर वसविलें, तें पुलिचेरी ऊर्फ पांदिचरी होय ( स. १६७५ ). ह्या ठिकाणची व्यवस्था व देखरेख मार्टिननें उत्तम ठेविली. मार्टिन हा अत्यंत मनमिळाऊ असून एतद्देशीय लोकांशीं तर फारच सौम्यपणानें वागत असे. ह्मणून पांदिचरी येथें बराच मोठा व्यापार सुरू होऊन फ्रेंच कंपनीस किफायतही बरी होऊं लागली. स. १६७७त शिवाजीनें कर्नाटकांत स्वारी केली, तेव्हां त्याजला नजराणा देऊन मार्टिननें संतुष्ट केलें, आणि त्याजपासून पांदिचरी येथें व्यापार करण्याचा परवाना मिळविला ( स. १६७७ ). पुढें सुमारें पंधरा वर्षेपावेतों पांदिचरी येथें शांततेनें उद्योग करून फ्रेंचांनीं आपली पुष्कळ भरभराट केली. पण स. १६९२त फ्रेंच व डच यांजमध्यें युरोपांत युद्ध सुरू झालें, त्यांत डच आरमारानें पांदिचरी काबीज केली, (स. १६९३).

ती पुढें चार वर्षें डच लोकांच्या ताब्यांत होती. चार वर्षांनीं रिस्विक्चा तह होऊन तें ठिकाण परत फ्रेंचांस मिळालें. इतक्या दिवस मोठ्या कष्टानें टिकाव धरून राहिलेलें ठिकाण अखेरीस फ्रेंचांकडे कायम राहिलें ह्याचें श्रेय मार्टिन यास आहे. तो अत्यंत निस्पृही व एकनिष्ठ देशभक्त होता. देशकल्याणापुढें स्वतःस तो तुच्छ समजत असे. ह्मणून पांदिचरीचें ठाणें नांवारूपास आलें.

सन १६९३त पांदिचरी पडल्यावर मार्टिन फ्रान्स देशास परत गेला. तेथें फ्रेंच सरकारानें त्याचा उत्कृष्ट सत्कार केला. त्यानेंही पांदिचरीचें व हिंदुस्थानच्या व्यापाराचें महत्त्व सरकारास समजून सांगितलें. त्यावरून पुढें तह झाला तेव्हां पांदिचरी हें ठिकाण डच लोकांपासून फ्रेंचांनीं परत मिळविलें. तेव्हांपासून पांदिचरीची सुधारणा झपाट्यानें सुरू झाली. सार्वजनिक रस्ते, मोठमोठ्या इमारती, बंदरांतील व्यापाराच्या सोयी वगैरे तेथील कामें प्रथम मार्टिननें सुरू केलीं. पांदिचरीचे कायदे व व्यवस्था उत्तम असल्यामुळें अनेक एतद्देशीय तेथें जाऊन राहिले. स. १७०६त तेथील लोकसंख्या चाळीस हजार होती. स. १६९७त पांदिचरी हें फ्रेंचांच्या सर्व वसाहतींचें मुख्य ठिकाण होऊन मार्टिन यास 'डायरेक्टर जनरल ऑफ फ्रेंच अफेयर्स इन् इंडिया' असा हुद्दा मिळाला. हा कारभार त्यानें स. १७०६ पर्यंत केला. ता. ३० डिसेंबर १७०६ रोजीं मार्टिन पांदिचरी येथें मरण पावला. त्याच्या जवळ काम करून अनेक लोकांनीं आपले खिसे भरले; पण तो स्वतः प्रामाणिकपणानें वागून बेफिकीर राहिल्यामुळें, त्याजवळ पैसा बिलकुल जमला नाहीं. त्याच्या मरणसमयीं हिंदुस्थानांतील सर्व दरबारांत व एतद्देशीयांच्या मनांत फ्रेंचांचा लौकिक उत्तम होता. स्वतःचा बडेजाव न सांगतां मार्टिन व त्याचे लोक हिंदुस्थानच्या राजेरजवाड्यांचा मोठा सन्मान ठेवीत असत; आणि त्यांच्या रीतीभातींस तुच्छ न मानतां, होतां होईतों आपणही इकडचे रिवाज पाळीत. डुप्ले यास पुढें हिंदुस्थानांत फ्रेंचांची सत्ता फार लवकर वाढवितां आली आणि इतर युरोपियनांपेक्षां फ्रेंचांचें वजन व वचक इकडे लवकर बसला, ह्याचें कारण मार्टिनची सुव्यवस्था हें

होय. आजूबाजूचे राजे खुशाल पांदिचरीस येत, फ्रेंचांचा पाहुणचार घेत व त्यांच्याशीं सख्य ठेवीत. उभयतांत परस्पर हेवा किंवा कपट वागत नसे. अनेक एतद्देशीय गृहस्थ आपल्या तंट्यांचा निकाल फ्रेंचांच्या मार्फत करीत. ‘ आपण यजमान मालक, व आह्मी आपलीं कुळें, ’ असें एतद्देशीय अधिकाऱ्यांस फ्रेंच लोक भासवीत. फ्रेंचांचें राज्य हिंदुस्थानांत चिरस्थायी कां झालें नाहीं तें पाहण्याचा प्रसंग पुढें येणार आहे. पण आरंभीं मार्टिन यानें केलेला उपक्रम यशस्वी होता व त्याबद्दल फ्रेंच राष्ट्रानें त्याचे धन्यवाद गाइले पाहिजेत ह्यांत संशय नाहीं.

इकडे सुरतेच्या वखारींतही विशेष फायदा न वाटल्यामुळें स. १७००च्या सुमारास ती जागा फ्रेंचांनीं सोडून दिली. त्या ठिकाणीं एतद्देशीय व्यापाऱ्यांचें पुष्कळ कर्ज फ्रेंचांनीं देणें झालें होतें; तें त्यांनीं न दिल्यामुळें फ्रेंचांची पत बरीच कमी झाली. त्यायोगें त्यांच्यावर पुढें कोणी विश्वास ठेवीनासा झाला, आणि त्यांचा व्यापार नीट चालेना. हें पाहून मार्टिन हा पुनः पांदिचरीच्या कारभारावर आला त्या वेळेस त्यानें सुरतेचें मागचें सर्व कर्ज देऊन टाकिलें, तेव्हां फ्रेंचांवर लोकांचा विश्वास पुनरपि बसला. मच्छलिपट्टण येथील त्यांची वखारही बऱ्याच भरभराटींत होती. स. १६८८त फ्रेंचांनीं बंगाल्यांत हुगळी नदीच्या कांठीं चंद्रनगरचें ठिकाण औरंगजेबापासून खरेदी घेतलें आणि तेथें व्यापार चालविला. पुढें कांहीं वर्षांनीं चंद्रनगरची मोठी भरभराट झाली. तेथें फ्रेंचांनीं एक किल्लाही बांधिला. मात्र चंद्रनगरचा कारभार पांदिचरीच्या अधिकाऱ्यामार्फत चाले.

**४. लेन्वॉर, लाबूर्डोने, डुप्ले, व डुमास.**—स. १६६४त चौदाव्या लुइनें कंपनीस दिलेली पन्नास वर्षांची सनद स. १७१४त म्हणजे मार्टिनच्या मृत्यूनंतर आठ वर्षांनीं संपणार होती. एवढ्या अवधींत तिला म्हणण्यासारखी किफायत झाली नव्हती. म्हणून खासगी व्यापाऱ्यांना स्वतःच्या जबाबदारीवर वाटेल तसा व्यापार करण्याची परवानगी कंपनीकडून पुष्कळांस मिळत असे. पण अशा रीतीनेंही कांहीं निभाव लागेना. कर्ज फार झालें. युरोपांतून

गलबतें व माल येण्याचें बंद झाल्यामुळें इकडे पांदिचरीची भरभराट तरी कशी कायम राहणार ? मात्र मार्टिन मेल्यावर पुढें लवकरच औरंगजेब बादशहा मरण पावला, आणि मोगल बादशाहींत जी धामधूम उडाली, तिचा संपर्क पांदिचरीस पोंचला नाहीं. सर्व पक्षांशीं फ्रेंचांचें सख्य कायम होतें. स. १७१५त फ्रेंच राजाकडून कंपनीस आणखी दहा वर्षांची सनद मिळाली. त्याच वर्षी राजा चौदावा लुइ मरण पावला. युरोपांत चौदावा लुइ व हिंदुस्थानांत औरंगजेब ह्यांचें पुष्कळ साम्य आहे. चौदावा लुइ सन १६४३त बाळपणीं गादीवर आला. त्यानें ७२ वर्षे राज्य केलें. एवढ्या अवधींत त्यानें आपल्या जबरदस्त महत्त्वाकांक्षेनें सर्व युरोप हालवून सोडिलें; आणि वृद्धापकाळीं कर्ज, दुःख, पराभव इत्यादि गोष्टींनीं गांजून अखेरीस हालअपेष्टेंत मरण पावला. विषेषतः कर्जामुळें फ्रेंच सरकार अतिशय पेचांत आलेलें होतें. हा पेंच कमी करण्याकरितां पुष्कळ उपाय करण्यांत आले. ह्या उपायांची कामगिरी बजावणारे फ्रेंचांचे कित्येक हुशार गृहस्थ हिंदुस्थानांत प्रसिद्धीस आले, त्यांची पूर्वपीठिका प्रथम दिली पाहिजे.

मार्टिनच्या पश्चात् लहान मोठे अधिकारी पांदिचरीस नेमले गेले, त्यांत लेन्वॉर ( Lenoir ) हा हुशार, उद्योगी व दृढनिश्चयी असून, व्यापाराच्या कामांत निष्णात होता, ( १७२६–३५ ). त्यानें एतद्देशीय व्यापाऱ्यांच्या मदतीनें कंपनीचा व्यापार चालवून बराच फायदा केला. स. १७२३त फ्रेंच सरकारानें कंपनीशीं आपला बहुतेक संबंध तोडून टाकिला, आणि तिला पूर्ण स्वतंत्रता दिली. त्याबरोबर बरेंच भांडवल जमून कांहीं गलबतें हिंदुस्थानांत आलीं, त्यांत बोव्हालिये ( Beauvallier ) हा लेन्वॉरच्या जागीं गव्हर्नर होऊन आला. त्यानें तीन वर्षांत कंपनीचा व्यापार बराच वाढविला. पुढें स. १७२६त लेन्वॉरची पुनरपि गव्हर्नरच्या जागेवर नेमणूक झाली, तेव्हांपासून दरसाल दहा वीस लाख किंमतीचा माल फ्रेंच जहाजांतून युरोपास जात असे. पांदिचरीची भरभराट वाढत गेली आणि लोकसंख्याही वाढली, तेव्हां बंदोबस्ताकरितां शहरासभोंवती एक तट बांधण्यांत आला.

शिवाय वाडे बागा, रस्ते, बंदरांच्या सोयी वगैरेंच्या योगानें पांदिचरीची भरभराट होऊं लागली. तेथें मुख्य अधिकारी गव्हर्नर असून त्याच्या मदतीस एक कौन्सिल असे, त्यांतील सभासद पांचांहून कमी नसत. त्यांच्या ह्यातांत सर्व अधिकार होता. ह्यांस नेमण्याचा व काढून टाकण्याचा संपूर्ण अधिकार कंपनीस होता, त्यांत राजास मध्यें पडतां येत नसे. गव्हर्नरची स्वारी मोठ्या थाटानें बाहेर पडत असे. एकंदरींत शांततेनें व्यापार व उद्योग वाढविण्याची संधि पांदिचरीच्या अधिकाऱ्यांस मिळाली, ती फार थोडे दिवस टिकली. आणखी पांचपन्नास वर्षें अशींच गेलीं असतीं तर पांदिचरीस फ्रेंचांचा जम कायमचा बसला असता.

(२) **लाबूर्डोने**, ( स. १७२५–४८ ).–स. १७२५त पांदिचरीच्या गव्हर्नरानें माही बंदर काबीज करण्याकरितां लढाऊ जहाजें पाठविलीं. हें बंदर मलबार किनाऱ्यावर तेलिचरीच्या दक्षिणेस एका एतद्देशीय राजाच्या ताब्यांत होतें. सुरत सोडल्यापासून पश्चिम किनाऱ्यावर स्वसत्तेचें दुसरें बंदर नसल्यामुळें फ्रेंचांची फार गैरसोय होत होती; आणि हरप्रयत्न करून तिकडे एकादें ठिकाण मिळवावें अशी फ्रेंच कंपनीकडून पांदिचरीच्या गव्हर्नरास एकसारखी टोंचणी होती. तदनुसार माही काबीज करण्याकरितां गलबतें आलीं, त्यांवर बर्ट्रांड फॉन्सिस लाबूर्डोने ( Bertrand Francis La Bourdonnais ) हा एक गृहस्थ होता. त्याचा जन्म सेंट मॅलो ( Malo ) येथें १६६६त झाला. दहा वर्षांचा असतां तो गलबतांतून दूरदूरच्या सफरींस जाऊं लागला. दक्षिण महासागरांत व पूर्वेकडे फिलिपाइन बेटांपर्यंत त्यानें प्रवास केला; आणि अभ्यास करून ज्ञान मिळविलें. श. १७१६–१७त उत्तरसमुद्र व भूमध्यसमुद्र ह्या ठिकाणीं तो फिरला. पुढें दोन वर्षांनीं फ्रेंच ईस्ट इंडिया कंपनींत नोकरी पत्करून तो सुरतेस आला. येथें अंगच्या हुशारीनें तो लवकर चढला. कांहीं दिवसांनीं फ्रान्सांत परत येऊन त्यानें नेव्हल एंजिनियरिंगचा अभ्यास केला आणि पुढें पुनः पांदिचरीस आल्यावर, वर सांगितल्या-

प्रमाणें माही घेण्याच्या सफरींत त्याची नेमणूक झाली; आणि त्याच्याच हुशारीनें तें ठिकाण फ्रेंचांच्या हस्तगत झालें.

( ३ ) **डुप्ले.**—लाबूर्डोनेप्रमाणें आणखी एक गृहस्थ फ्रेंचांच्या नोकरींत इतका प्रसिद्धीस आला कीं त्यांच्या ह्या इतिहासांत त्याचें नांव अजरामर झालें आहे. तो जोझेफ फ्रॅन्सिस डुप्ले ( Jospeh Francis Dupleix ) हा होय. हा फ्रान्स देशांत स. १६९७त जन्मला. त्याचा बाप सधन असून फ्रेंच ईस्ट इंडिया कंपनींत एक डायरेक्टर होता. जोझेफ यास लहानपणापासून गणिताचा नाद विशेष असून बापानें त्यास स. १७१४त समुद्रप्रवास करण्यास पाठविलें. अटलांटिक आणि हिंदी महासागरांत प्रवास करून तो हुशार झाला. त्याला दर्यावरील साहसाची आवड उत्पन्न होऊन जबरदस्त महत्त्वाकांक्षेचीं चिन्हें त्याच्या ठिकाणीं दिसूं लागलीं. त्याचा बाप फ्रेंच कंपनींत होताच, त्याच्या वशिल्यानें एकदम पांदिचरी येथील दुसरी जागा त्यास मिळाली. त्या वेळीं कौन्सिलचा पहिला म्हणजे लष्करी सभासद होऊन तो इकडे आला ( स. १७२० ). त्या संधीस पांदिचरीचा व्यापार मंदावलेला असल्यामुळें, मनांत घोळत असलेले द्रव्योत्पादनाचे विचार कृतींत उतरविण्यास डुप्लेस ही संधि चांगली मिळाली. युरोप व हिंदुस्थान ह्यांजमधील व्यापारांत म्हणण्यासारखी किफायत होईना, म्हणून त्यानें बंदरोबंदरींच्या नेआणीचा व्यापार आपल्या हातांत घेतला. हा धंदा कंपनी हातीं घेईना, म्हणून त्यानें खासगी व्यापाऱ्यांस त्यांत शिरण्यास प्रोत्साहन दिलें, आणि स्वतःही त्यांत पुष्कळसा पैसा घातला. त्यांत त्यास चांगलेंच यश आल्यामुळें सर्व लोक त्याच्या नादीं लागले. लवकरच पांदिचरीचें बंदर म्हणजे सर्व प्रकारच्या मालाची दक्षिण हिंदुस्थानांतील मोठी उतारपेठ झाली. तथापि डुप्लेचें वर्तन फ्रान्सांतील डायरेक्टरांस पसंत न पडून त्यांनीं स. १७२६त कामावरून त्यास दूर केलें. पुढें त्यानें खरी हकीकत लिहून पाठविल्यावर चार वर्षांनीं त्यास योग्य न्याय मिळाला, आणि १७३०त चंद्रनगरच्या मुख्य जागेवर त्याची नेमणूक झाली.

चंद्रनगरची स्थापना मूळ स. १६७६त झाली, तेव्हांपासून त्याजकडे कोणीं विशेष लक्ष न दिल्यामुळें, तें स्थल अगदींच मंद स्थितींत होतें. स. १६८८त तेथें एक लहानसा तट बांधिलेला होता, तथापि तेथें कोणत्याही प्रकारचा उद्योग चालू नव्हता. तेव्हां तेथें व्यापारवृद्धि करण्याकरितां स. १७३१त मुद्दाम डुप्लेची नेमणूक झाली. तेथें पुष्कळ काम करावयाचें आहे व आपणांस तें करण्याची धमक आहे हें तो जाणून होता. त्यानें एकदम जहाजें विकत घेतलीं, माल भरला, गांवोगांवचे व्यापारी जमवून आणिले, आणि सर्व जमवाजमव करून व्यापार सुरू केला. हाताखालच्या लोकांस त्यानें प्रोत्साहन दिलें, कित्येकांस पैसा दिला, कित्येकांस भागीदार केलें. येणेंप्रमाणें अल्पावकाशांत त्यानें चळवळ उडवून दिली. त्यामुळें बंगालचा माल सुरत, बसरा, जद्दा, मोचा इत्यादि ठिकाणीं जाऊं लागला. एतद्देशीय राजेलोकांशीं संधान व मैत्री करून डुप्लेनें आपल्या उद्योगास हरएक प्रकारची मदत मिळविली. थोड्याच वर्षांत चंद्रनगरचें वैभव बाहेर पुष्कळच फैलावलें. हा प्रकार पाहून फ्रान्सांत कंपनीच्या मंडळीस आनंदीआनंद झाला. लोक डुप्लेची तारीफ करून त्याचे धन्यवाद गाऊं लागले. स. १७३१ पासून १७४१ पर्यंतच्या दहा वर्षांत चंद्रनगरच्या स्थितींत जमीनअस्मानचें अंतर पडलें. इकडे डुप्लेचा खासगी व्यापारही पुष्कळ वाढून तो सधन झाला.

( ४ ) **डुमास.**—स. १७३५त लेन्वॉरचा कारभार संपून पांदिचरीस बेन्वॉ डुमास ( M. Benoit Dumas ) ह्याची नेमणूक झाली. हा गृहस्थही चांगला हुशार होता. हा जुन्या फ्रेंच कंपनीचा नोकर असून स. १७१३त सतरा वर्षांचा असतां पांदिचरीस आला होता. पांच वर्षांत तो सुप्रीम कौन्सिलचा मेंबर व १७२१त अटोर्नें जनरल झाला. पुढें त्यास बुर्बोच्या गव्हर्नरची जागा मिळाली. तेथें कांहीं वर्षें काम केल्यावर त्याची पांदिचरीच्या मुख्य जागीं नेमणूक झाली. तो हुशार, धोरणी व स्वदेशाभिमानी असून एतद्देशीय लोकांच्या रीतीभाती पूर्ण समजत होता; आणि कसेंही करून फ्रान्सची सत्ता वाढविण्याविषयीं तो अतिशय झटत होता. शांततेनें व धिमेपणानें

वागून आपले उद्देश पार पाडण्याची ताकद त्याचे ठिकाणीं होती. कर्नाटकचा नबाब दोस्तअली याजशीं डुमासची दोस्ती फार चांगली असून त्याच्या मध्यस्थीनें मोगल बादशहा महंमदशहा याजपासून पांदिचरी येथें नाणें पाडण्याची परवानगी त्यानें मिळविली. हें नाणें सोन्याचांदीचें असून, इतर मोगली नाण्यांप्रमाणेंच एका बाजूस मोगल बादशहाचा मुखवटा व दुसऱ्या बाजूस ठिकाणाचें नांव छापलेलें होतें. ह्या परवानगीमुळें पांदिचरीची फारच भरभराट झाली. युरोपांतून सोनेंचांदी आणून पांदिचरीस नाणीं पाडावीं व त्यांवर मोठा किफायतीचा व्यापार चालवावा, असा सपाटा चालला. ह्या व्यापारांत फ्रेंच कंपनीस दरसाल दोन लक्ष फायदा होऊं लागला. पुढील व्यवहारांत या फ्रेंच गृहस्थांचीं नांवें यावयाचीं आहेत.

---

# प्रकरण पंधरावें.

## कर्नाटकच्या रणभूमीवरील तयारी.

### इ. स. १७३९—१७४४.

१. वर्दळीस येण्याचीं पूर्व चिन्हें. २. मोगलशाहींत कर्नाटकची व्यवस्था. ३. चंदासाहेबाची फ्रेंचांशीं दोस्ती. ४. मराठ्यांची कर्नाटकांत स्वारी. ५. रघूजीचा व फ्रेंचांचा पत्रव्यवहार. ६. डुप्ले व कर्नाटकांतला गोंधळ.

**१. वर्दळीस येण्याचीं पूर्व चिन्हें.**—गोडोल्फिननें तडजोड करून इंग्लंडांतील विरुद्ध कंपन्यांचा समेट केला, त्यामुळें आशियाखंडांत राज्य मिळविण्याची प्रचंड शक्ति ई० इं० कंपनीस प्राप्त झाली. हें राज्य मिळविण्यास त्या कंपनीस पुढें दीडशें वर्षांचा अवधि लागला. लंडन शहर त्या वेळींही

संपत्तीचें माहेरघर होतें. तेथील अपार संपत्तीचा पुरवठा इंग्रज कंपनीस होऊं लागला. सर्व राष्ट्राचे दर्यावर्दी खलाशी कंपनीस साह्य झाले. बलाढ्य इंग्रज सरकाराचें तीस पूर्ण पाठबळ मिळालें. त्या सरकाराचा कारभारही बहुतेक धनाढ्य व्यापाऱ्यांच्याच हातांत होता. कंपनीची मुख्य जागा लंडनांत असून तटबंदी केलेल्या अनेक वसाहती इकडे प्राच्य प्रदेशांत होत्या. व्यापाराचें संरक्षण करण्यास प्रचंड आरमार सज्ज होतें. हिंदुस्थानांत पाहिजे तो कारभार करण्यास सनदेनें कंपनीस अधिकार मिळलेला होता. इतके सर्व फायदे असल्यावर एकमेकांशीं झगडणाऱ्या पडक्या मोगल शाहींतील अधिकाऱ्यांशीं झुंजण्याची कंपनीस शक्ति आली ह्यांत नवल नाहीं. लंडनपासून हिंदुस्थान दूर होतें, ह्यामुळें कित्येक तोटे होत होते, तसे कित्येक फायदेही होते. दूर असल्यामुळेंच युरोपियन राष्ट्रांच्या परस्पर भांडणांत हिंदुस्थानचे प्रश्न गोंवले गेले नाहींत. विशेषतः सतराव्या शतकामध्यें युरोपांत अनेक झगडे चालू असतां, हिंदुस्थान इतकें दूर होतें, म्हणूनच कंपनीस वाटेल त्या गोष्टी इकडे करितां आल्या. हिंदुस्थानांत झगडणाऱ्या निरनिराळ्या एतद्देशीय पक्षांस इंग्रज व फ्रेंच हे तिऱ्हाइतांसारखे आपल्या उपयोगाचे वाटले; आणि त्यांनीं निर्भयपणें ह्या तिऱ्हाइतांचा आश्रय केला.

स. १७१३त युट्रेक्टचा तह झाल्यावर पंचवीस तीस वर्षें फ्रेंच व इंग्रज कंपन्यांस जें स्वास्थ्य मिळालें, तेणेंकरून त्यांची अतोनात भरभराट झाली; आणि त्या उभयतांत जबरदस्त चुरस लागली. हा त्या भरभराटीचाच परिणाम होय. युरोपांत ह्या दोन राष्ट्रांचें भांडण लागलें म्हणजे त्याचे परिणाम हिंदुस्थानांतही घडून येत. सन १७४३ते १७६३च्या दरम्यान जीं वीस वर्षें गेलीं, त्यांत युरोपांतल्याप्रमाणेंच हिंदुस्थानांत ह्या दोन राष्ट्रांचा जबरदस्त खटका उडाला. ह्यांत अनेक एतद्देशीय सत्ताधीश सामील झाले. ह्या झगड्याच्या शेवटीं फ्रान्सच्या ताब्यांतील पूर्वेकडची सत्ता सर्वथैव मोडली जाऊन इंग्रज पुढें विजय पावले.

वर सांगितलेला इंग्रज फ्रेंचांचा भरभराटीचा काळ हाच मोगल बादशाहीच्या मोडकळीचा काळ होय. गोडोल्फिनच्या तडजोडीच्या वेळेसच औरंगजेब बादशहा सन १७०७त मरण पावला. तेव्हां त्याचें राज्य अगदीं मोडकळीस आलें होतें. राज्यांत जिकडे तिकडे अव्यवस्था होती. मराठे वगैरे शत्रु प्रबळ झाले होते. सर्वांस धाकांत ठेवून राज्य सांभाळील असा कर्तृत्ववान् पुरुष औरंगजेबाच्या पश्चात् निपजला नाहीं; तेव्हां निरनिराळे सुभेदार व नबाब राज्याकरितां भांडूं लागले. लष्करी जोरावर जो उठला तो राज्याकरितां झगडूं लागला. तेव्हां कोणी तरी सत्ताधीश यशस्वी होऊन ह्या अंदाधुंदीचा शेवट करो आणि आपणांस स्वस्थता देवो, असें सर्व लोकांस होऊन गेलें.

मोगल बादशाहीच्या पडत्या काळांत निजामुल्मुल्क, मराठे सरदार, इंग्रज, फ्रेंच वगैरे अनेक मंडळी राज्यप्राप्तीकरितां उत्सुक होऊन उद्योग करूं लागली. अशा प्रकारें उद्योग करणारांपैकीं कित्येक अशक्त होते, कित्येकांनीं घाई केली, कित्येकांच्या स्वतःच्या घरची व्यवस्था समाधानकारक नव्हती. इंग्रजांसारखी कित्येक मंडळी या घडामोडीचें बारकाईनें निरीक्षण करून तटस्थ वृत्ति दाखवीत होती. जे लोक घाई किंवा चुका करितील, ते आपोआपच त्या फळास मुकतील किंवा झगडून निःसत्त्व होतील, अशा समजुतीवर, आला प्रसंग पार पाडून, इंग्रज लोक योग्य संधीची वाट पाहत वेळ मारून नेत होते. शिवाय असल्या कामास एक प्रकारचा दृढनिश्चय व दम लागत असतो. मराठे जोरदार होते. पहिले बाजीराव पेशव्यानें परिस्थिति ओळखून मोगल बादशाहीच्या शाखांवर एकदम घाव घालण्यास सुरुवात केली. पूर्व, पश्चिम, दक्षिण व उत्तर या चारही दिशांकडे एकदम उचल खाऊन बादशाही बळकाविण्याचा उद्योग पेशव्यांनीं प्रथम आरंभिला. त्यांत दक्षिणच्या स्वारीचें आधिपत्य रघूजी भोसल्याकडे होतें. त्याचा व फ्रेंचांचा संबंध कसा आला हें लवकरच दिसून येणार आहे. त्यांत असेंही दिसून येईल, कीं यूरोपियन लोकांस आरमाराचें पाठबळ विशेष होतें. शत्रूंच्या आघातापासून

विशेष नुकसान न पावतां, आणीबाणीचा प्रसंग आल्यास लगेच आरमाराचे मदतीनें पळून जावें, अशी त्यांस सोय होती. परकेपणा हा जसा कांहीं प्रसंगीं अपायकारक आहे, तसा तो केव्हां केव्हां फायदेशीरही आहे. एतद्देशीय सत्ताधीश परस्पर वैमनस्यांत गुंतून गेल्यामुळें, या युरोपियन लोकांचा परकेपणा तिऱ्हाइतांप्रमाणें त्यांना बराच फायदेशीर झाला.

दुसरी एक गोष्ट पुढील हकिकतीवरून दिसून येईल, कीं हिंदुस्थानांत स्वराज्य स्थापन करण्यांत इंग्रज लोकांपेक्षां फ्रेंच लोक अग्रेसर व ज्यास्त कल्पक होते. खरी परिस्थिति फ्रेंचांनींच ओळखिली व तदनुसार उद्योग त्यांनींच सुरू केला. इंग्रजांनीं त्यांचे पश्चात् फ्रेंचांचा कित्ता गिरवून त्या उद्योगाची सांगता केली.

**२. मोगलशाहींत कर्नाटकची व्यवस्था.**—मोगल अमदानींत एकंदर राज्याचे मोठे विभाग असत, त्यांस सुभे अशी संज्ञा होती. सुभ्यां-वरील मुख्य अंमलदारास सुभेदार ह्मणत. सुभ्याचे पोटभाग असत, त्यांज-वरील अंमलदारास नबाब असें ह्मणत. हे नबाब सुभेदाराच्या हाताखालचे असून, त्यांस हल्लींच्या पद्धतींत कलेक्टर असें ह्मणतां येईल. सुभेदारांची आणि नबाबांची नेमणूक प्रत्यक्ष बादशहाकडून व्हावी लागे; परंतु राजधानी शहर दूर असल्यामुळें, अडचणीच्या प्रसंगीं राज्यकारभार अडून राहूं नये म्हणून, नबाबांची तात्पुरती नेमणूक करण्यास सुभेदारांस अधिकार होता. अशा तात्पुरत्या नेमणूकीस मागाहून बादशहाची मंजुरी आणावी लागे. मोगलबादशाहीच्या अमदानींत ही व्यवस्था सुरळीत चालू असून, कोणीही अंमलदार डोईजड होऊं लागल्यास, त्याचा बंदोबस्त ताबडतोब बादशहाकडून होत असे. पण औरंगजेबाच्या अखेरीस व त्याच्या मृत्यूनंतर राज्यांत बेबंदशाही सुरू झाल्यामुळें, सुभेदार न नबाब हे मर्जीप्रमाणें आपल्या नेमणूका आपणच करूं लागले; आणि नबाबानें मरणसमयीं आपला मुलगा अगर जवळचा आप्त आपल्या कारभारावर नेमावा असा प्रघात सुरू झाला. कांहीं प्रसंगीं अशा नेमणुका मंजुरीसाठीं बादशहाकडे जात, पण बादशहा प्रधानांच्या

ह्यातांत बाहुल्याप्रमाणें असल्यामुळें, हरएक नेमणुकीस मंजुरी देणें त्यास भाग पडत असे. आपल्या इकडे मराठशाहीच्या पडत्या काळांत पेशवाईचीं वस्त्रें सातारच्या छत्रपतींकडून जशीं पाहिजे त्यास मिळूं लागलीं, तशांतलाच प्रकार मोगल बादशाहींतही झाला होता.

बादशाहीच्या इतर सुभ्यांप्रमाणें दक्षिणच्या सुभ्याची हद्द निश्चित झालेली नव्हती. एक तर दक्षिण देश म्हणजे हिंदुस्थानच्या द्वीपकल्पांतर्गत भाग मोगलांनीं कायमचा कधींच जिंकिला नाहीं. तो जिंकण्यासाठीं अकबराच्या वेळेपासून प्रत्येक बादशहानें शिकस्त केली. शेवटीं औरंगजेब तर हें काम तडीस नेण्यांतच निजधामास गेला. गोवळकोंडा व विजापुर हीं राज्यें त्यानें जिंकिलीं; आणि त्यांतले प्रदेश दक्षिणच्या सहा सुभ्यांत सामील केले. तथापि अगदीं महाराष्ट्रापलीकडचा प्रदेश ज्यास कर्नाटक म्हणतात तो व मराठ्यांचा महाराष्ट्र हे प्रांत जिंकण्याचें काम औरंगजेबाच्या मरणसमयीं सुरू होतें; आणि त्याची कामगिरी बऱ्याच अंशीं दक्षिणच्या सुभेदारावर होती. त्रिचनापल्ली, तंजावर व म्हैसूर येथें स्वतंत्र राज्यें असून, ह्यांच्या उत्तरेकडील व पूर्वेकडील भागांस कर्नाटक ही संज्ञा सामान्यतः देण्यांत येते. आर्काट हें ठिकाण ह्या प्रांताच्या मध्यभागीं असल्यामुळें, तेंच कर्नाटकची राजधानी होतें. कर्नाटकचा निराळा सुभा औरंगजेबानें कधींच पाडला नाहीं; कारण निराळा सुभा पाडण्याइतका दक्षिणचा सबंध प्रांत त्यानें जिंकिला नव्हता. म्हणून जेवढा प्रदेश जिंकलेला होता तेवढा दक्षिणच्या इतर सुभ्यांत मोडे. ह्याच कारणास्तव हैदराबादचा निजाम आर्काटच्या नबाबावर आपली हुकमत सांगे, त्यामुळें तेथें अनेक भानगडी उपस्थित झाल्या. आरंभीं हे प्रांत जिंकितांना औरंगजेबाचा सेनापति झुल्फिकारखान याजलाच कांहीं दिवस आर्काटच्या नबाबगिरीचें काम बादशहानें सांगितलें होतें. पुढें झुल्फिकारखान बादशहा-बरोबर राहत असल्यामुळें त्यानें कर्नाटकच्या कारभारावर दाऊदखान पन्नीची नेमणूक केली. दाऊदखानानें हा कारभार १६९९ पासून १७०८ पावेतों केला. त्यानंतर त्याची नेमणूक महाराष्ट्रांत झाली, तेव्हां त्यानें सादतुल्लाखान ह्यास

आपला कारभार सांगितला; त्यास बादशाहाकडून पुढें मंजुरी मिळाली. सादतुल्लानें हा कारभार सन १७१०–१७३२ पावेतों मोठ्या दक्षतेनें केला. त्यास अपत्य नव्हतें; म्हणून मरणसमयीं त्यानें आपल्या भावाचा मुलगा दोस्तअली ह्यास दत्तक घेऊन त्याजला कर्नाटकचा कारभार सांगितला. सन १७३२त सादतुल्ला मरण पावला.

दोस्तअलीची नेमणूक दक्षिणचा सुभा निजामउल्मुल्क ह्यास पसंत पडली नाहीं. दक्षिणच्या सुभ्यांत कर्नाटकचा अंतर्भाव असल्यामुळें तेथच्या नबाबाची नेमणूक आपल्या संमतीनें झाली पाहिजे असें निजामास वाटत होतें. त्यानें दोस्तअलीच्या नेमणुकीस हरकत घेतली, आणि दिल्लीसही निजामाचें वजन विशेष असल्यामुळें, दोस्तअलीची नेमणूक दिल्लीहून मंजूर झाली नाहीं. त्या दोस्तअलीस दोन मुली व एक मुलगा सफ्तरअली अशीं तीन मुलें होतीं. मुलींचीं लग्नें मुर्तुजाअली व चंदासाहेब ह्यांच्याशीं झालीं होतीं. चंदासाहेब हा नबाबाच्या दिवाणगिरीचें काम पाहत असे. ह्या प्रकरणांतील भानगडी समजण्यास कर्नाटकच्या नबाबांची ही वंशावळ उपयोगी पडेल.




**३. चंदासाहेबाची फ्रेंचांशीं दोस्ती.**—हा चंदासाहेब मूळचा गरीब, पण हुशार, धाडसी, व महत्त्वाकांक्षी होता. नबाबाचा जांवई झाल्यामुळें त्यास महत्त्व आलें. त्यास अनेक प्रतिस्पर्धी होते, म्हणून प्रथमपासूनच आपणास कोणाचें तरी साह्य असावें ह्या हेतूनें त्यानें फ्रेंचांचा आश्रय केला.

फ्रेंच लोकही आपली सत्ता वाढविण्याच्या नादांत असल्यामुळें, दोघांसही एकमेकांचा आश्रय पाहिजे होता. चंदासाहेब वरचेवर पांदिचरीस जाई, तेव्हां डुमास व इतर अधिकारी त्याचा चांगला सत्कार करीत.

कर्नाटकचा बराच भाग मुसलमानी अंमलाखालीं होता. अर्काट, शिरें, कडापा, कर्नूळ व सावनूर ह्या पांच ठिकाणचे नबाब बरेच सामर्थ्यवान् होते. शिवाय त्रिचनापल्ली व तंजावर येथें स्वतंत्र हिंदु राज्यें नांदत होतीं. सन १७३६त त्रिचनापल्लीचा राजा मरण पावला, आणि त्याच्या वारसांत तंटे लागले. त्यांत मयताची राणी एका पक्षांत होती. तिला मदत करण्यासाठीं नवाब दोस्तअलीनें आपला जांवई चंदासाहेब यास फौज देऊन त्रिचनापल्लीवर पाठविलें. चंदासाहेबानें राणी व इतर वारस ह्या सर्वांस बाजूस सारून स्वतःच त्रिचनापल्ली हस्तगत केली, आणि आपण तेथील कारभार करूं लागला. त्या कारभारावर असतां फ्रेंचांशीं ज्यास्त सख्य करण्याचे त्यास अनेक प्रसंग आले. त्यांत तंजावरच्या राजाच्या ताब्यांतील कारिकल हें पूर्वकिनाऱ्यावरील ठिकाण मोठ्या युक्तीनें चंदासाहेबानें फ्रेंचांस मिळवून दिलें, त्याचा प्रकार असा. तंजावरचा पहिला राजा, शिवाजीचा सावत्र बंधु व्यंकोजी स. १६८२त मरण पावल्यावर त्याचे मुलगे शहाजी (मृ. १७११), सरफोजी ( मृ. १७२७ ) व तुकोजी ( मृ. १७३५ ) यांनीं तंजावरचें राज्य केलें. नंतर कित्येक भानगडी होऊन स. १७४०त तुकोजीचा मुलगा प्रतापसिंह गादीवर आला, त्यानें स. १७६३ अखेर राज्य केलें. तुकोजीच्या मृत्यूनंतर फ्रेंचांनीं तंजावरचे कारभारांत ढवळाढवळ सुरू केली. तुकोजीस मुलगे तीन. दोन औरस, बाबासाहेब व शाहूजी, व तिसरा अनौरस प्रतापसिंह. तुकोजीच्या पश्चात् बाबासाहेब गादीवर बसला; पण तो लगेच मरण पावला. त्यास संतति नव्हती. तेव्हां शाहूजी गादीवर बसला; पण सर्व सत्ता लष्करी अधिकारी सय्यदखान याच्या हातांत असून तो शहाजीस अनुकूळ नव्हता. सय्यदखानानें सिधोजी नांवाचा दुसरा एक इसम गादीवर बसविला. तेव्हां शाहूजी पळून पांदिचरीनजीक चिदंबरं येथें गेला,

आणि तेथून त्यानें फ्रेंचांची मदत मागितली. फ्रेंचांनीं आपणास तंजावरच्या गादीवर बसविल्यास, ' पूर्वकिनाऱ्यावरील बंदर कारिकल, त्याच्या नजीकच असलेला करकनगढी नांवाचा मजबूत किल्ला, व कांहीं गांवें तुम्हांस देऊं, ' असें शाहूजीनें कबूल केलें. ही चालून आलेली संधि डुमासनें वायां घालविली नाहीं. त्यानें लगेच शस्त्रास्त्रांनीं सज्ज अशी फौज व दोन जहाजें कारिकल घेण्यास पाठविलीं. त्याच फौजेस पुढें जाऊन शाहूजीस तंजावरचे गादीवर बसवावयाचें होतें. इकडे शाहूजीचीं दुसरीं संधानें होतींच. त्यानें सय्यदखानास वश करून त्याच्याच मदतीनें तंजावरची गादी मिळविली आणि फ्रेंचांस कारिकल देण्याचें नाकारिलें. तेव्हां हातचा डाव गेलेला पाहून डुमास त्यास वाईट वाटलें. शाहूजीशीं उघडपणें लढण्यास त्यास धाडस होईना. इतक्यांत फ्रेंचांस खूष करण्याची ही संधि चंदासाहेबास आयती सांपडली. त्यानें आपण होऊन कारिकल जिंकून फ्रेंचांचे ताब्यांत देण्यासाठीं कारिकलवर फौज रवाना केली. तेव्हां शाहूजीनें कारिकलच्या बचावास फौज पाठविली. तिकडून फ्रेंचांची फौज येऊन तिनें कारिकल जिंकिलें. तेव्हां शाहूजीचा निरुपाय होऊन तो फ्रेंचांशीं केलेला करार पार पाडण्यास तयार झाला. पण इतक्यांत त्याची गादी जाऊन प्रतापसिंह गादीवर आला आणि त्यानें चिदंबरंचा करार पुरा करून दिला. येणेंकरून कारिकल, कर्कनगढी व सुमारें ३०।४० हजार वसुलाचा प्रदेश पूर्वकिनाऱ्यावर फ्रेंचांस मिळाला ( १७४१ ).

**४. मराठ्यांची कर्नाटकांत स्वारी*** (जाने. १७४०–मे १७४१).- चंदासाहेब त्रिचनापल्लीस राहूं लागल्यामुळें, दिवाणाच्या जागेवर नवाबानें मीरआसद त्यास नेमिलें. हा मीरआसद चंदासाहेबाच्या विरुद्ध खटपटी करूं लागला. तें ऐकून चंदासाहेबानें त्रिचनापल्लीसच आपली सर्व प्रकारें मजबुदी केली. मदुरा व दिंडिगल येथें त्यानें आपले दोघे भाऊ बडासाहेब व सादि-

* **टीप.**—या स्वारीची हकीकत मराठी रियासत मध्यवि० २ पृ. ७९ वर पहावी.

कसाहेब असे ठेवून दिले. ह्याप्रमाणें कर्नाटकांत मुसलमानी राज्याचा ज्यास्ती विस्तार झाला, ही गोष्ट तंजावर व म्हैसूर येथील हिंदु राजांस आवडली नाहीं. इकडे निजामासही कर्नाटकच्या नबाबाची वाढलेली सत्ता बरी वाटली नाहीं. तथापि निजाम दिल्लीस गुंतला होता, म्हणून मराठ्यांशीं संधान बांधून त्यांजला कर्नाटकावर स्वारी करण्यास त्यानें भर दिली. कर्नाटक प्रांत जिंकणें हें मराठ्यांच्या कार्यक्रमांतलें काम असल्यामुळें, शाहू महाराजांच्या हुकमानें रघूजी भोंसल्यानें पन्नास हजार निवडक फौज घेऊन कर्नाटकावर स्वारी केली, ( स. १७४० ). त्या वेळीं कर्नाटकचा नबाब दोस्तअली असून त्याचा मुलगा सफतरअली व जांवई चंदासाहेब हे त्रिचनापल्ली घेऊन तिकडे आपला अंमल बसवीत होते. रघूजीशीं सामना करण्याकरितां त्यांस दोस्तअलीनें तातांबळीनें परत बोलाविलें. पण चंदासाहेबाच्या पोटांतील उद्देश स्वार्थाचा असल्यामुळें, तो तितक्या तावडतोब आला नाहीं. इकडे रघूजीनें दोस्तअलीस समरांगणीं गांठून त्याजवर जोराचा हल्ला केला. दोस्तअली जिवावर उदार होऊन लढला. पण निरुपाय होऊन तो व त्याचा मुलगा हसनअली समरांगणीं पडले, दिवाण मीरआसद कैद झाला व त्याचे सर्व मोठमोठे अधिकारी पतन पावले. ही लढाई दमलचरीच्या खिंडींत ( ता. २० मे स. १७४० ) रोजीं झाली. ह्या पराभवानें कर्नाटकांत प्रळय उडाला. मराठ्यांनीं सर्व हिंदुस्थान पादाक्रांत केलें, त्यांजपुढें आतां कोणाचा टिकाव लागत नाहीं असें लोकांस वाटूं लागलें. सफदरअली स्वसंरक्षणार्थ वेलोरच्या किल्ल्यांत गेला. चंदासाहेबास मात्र झालें हें एक तऱ्हेनें बरेंच झालेंसें वाटून तो त्रिचनापल्ली येथें स्वस्थ राहिला. मात्र उभयतांनीं आपलें कुटुंब, जडजवाहीर वगैरे सर्व पांदिचरीस पाठविलें. पांदिचरीचा गव्हर्नर डुमास ह्यासही मोठी धास्ती पडली. रात्रंदिवस खपून त्यानें पांदिचरीचा बंदोबस्त केला; आणि अन्नसामुग्री व दारूगोळा ह्यांची भरती केली. नबाबाच्या कुटुंबाशिवाय आणखीही पुष्कळ मंडळी सभोंवारच्या मुलखांतून पांदिचरीच्या आश्रयास गेली. नबाब दोस्तअलीची बायको, मुलें व परि-

वार वगैरे ता. २५ मे रोजीं पांदिचरीस आलीं, तेव्हां त्यांस आंत आश्रय द्यावा कीं नाहीं ह्याचा डुमास यास मोठा विचार पडला. नबाबाचें कुटुंब व धनदौलत आपल्याकडे आहे असें मराठ्यांस कळल्यास ते पांदिचरीवर आल्याशिवाय राहवयाचे नाहींत. बरें त्यांस आश्रय न द्यावा तर इतक्या दिवसांच्या स्नेहावर पाणी पडून शिवाय कृतघ्नपणाबद्दल लोकांत नाचक्की होणार. अशा पेचांत सांपडून डुमास ह्यानें ताबडतोब कौन्सिलचा सल्ला घेऊन नबाबाच्या कुटुंबास पांदिचरीच्या आंत घेण्याचा निश्चय केला; आणि स्वतः किल्ल्याचा दरवाजा खुला करून त्यांस त्यानें मोठ्या सन्मानानें आंत घेतलें, आणि त्यांस तोफांची सलामी देऊन राहण्यास वाडा दिला. मागून थोड्या दिवसांनीं चंदासाहेबाचीं बायका मुलें आलीं त्यांचीही डुमासनें पांदिचरीस व्यवस्था केली. इकडे मराठ्यांनीं आर्काट घेतलें; पण नबाबाची सर्व संपत्ति पांदिचरीस गेल्यामुळें त्यांच्या हातीं कांहींच लागलें नाहीं, ह्मणून ते चिडून गेले, आणि पुढील विचारास लागले. नबाब दोस्तअलीचा कारभारी मीर आसद त्यांच्या ताब्यांत होता. तो चंदासाहेबाचा कट्टा शत्रु असून, त्याचा स्वार्थी कावा तो ओळखून होता, तेव्हां चंदासाहेबास सोडून देऊन मराठ्यांशींच सल्ला करावा अशा बेतानें रघुजीशीं त्यानें बोलणें चालविलें. रघूजीनें तें मान्य करून त्यास बंधमुक्त केलें, आणि त्याच्या मध्यस्थीनें सफदरअलीशीं तह केला, ( १६ नोव्हेंबर स. १७४० ), त्यांतील मतलब असा, कीं सफरअलीस मराठ्यांनीं कर्नाटकचा नबाब ह्मणून कबूल करावें; त्यानें मराठ्यांस एक कोट रुपये हाप्त्याहाप्त्यांनीं द्यावे; चंदासाहेबास पकडण्यासाठीं मराठ्यांस फौजेचें साह्य द्यावें आणि पूर्व किनाऱ्यावरील हिंदु राजांचे जे मुलूख स. १७३६ नंतर इतरांनीं बळकाविले असतील ते ज्याचे त्यास परत द्यावे. शेवटचें कलम तंजावरच्या ताब्यांतील कारिकलबद्दल असावें. शेवटचीं दोनही कलमें गुप्त होतीं. ह्या तहाच्या कलमांवरून फ्रेंचांचा मतलब मराठ्यांनीं पूर्णपणें ओळखिला होता, आणि त्यांस आळा घालण्यास ते झटत होते हें उघड दिसतें.

**५. रघूजी व फ्रेंच यांचा पत्रव्यवहार**—फ्रेंचांनीं पूर्व किनाऱ्यावर राज्यस्थापना करून नबाबाचे कुटुंबास व दौलतीस आश्रय दिला, ही गोष्ट रघूजीस आवडली नाहीं. त्यानें लगेच खालील पत्र फ्रेंच गव्हर्नरास पाठविलें.*

'आमच्या महाराजांनीं तुह्मांस पांदिचरी येथें राहण्याची परवानगी दिली, त्यास ४० वर्षे होऊन गेलीं. हल्लीं आमची फौज ह्या बाजूस आली असतांही तुह्मांकडून कांहींच मजकूर कळला नाहीं. तुह्मी आमच्या दोस्तीस पात्र आहां, आपला शब्द कधीं मोडणार नाहीं, आणि आपले करार बरोबर पाळाल, अशी आमची खात्री होती, ह्मणूनच त्यांनीं तुह्मांस हा मुलुख राहण्यास दिला. त्याबद्दल दरसाल खंडणी देण्याचें तुह्मी कबूल केलें असून, अद्यापपावेतों भरणा केला नाहीं. त्यामुळें महाराजांस आपली फौज ह्या बाजूस पाठविणें भाग पडलें. इकडचे मुसलमान लोक गर्वानें फुगून गेले होते, त्यांचा चांगलाच समाचार ह्या फौजेनें घेतला आहे, हें वर्तमान तुह्मांस कळलेंच असेल; आह्मीं कळविण्याची जरूर नाहीं. हल्लीं जिंजी व त्रिचनापल्ली हे किल्ले घेऊन त्यांचा बंदोबस्त करावा असा महाराजांचा आह्मांस हुकूम आहे. तसेंच किनाऱ्यावर राहणाऱ्या युरोपियन लोकांकडील खंडणी वसूल करण्याचाही आह्मांस हुकूम आहे. हे हुकूम अंमलांत आणणें आह्मांस प्राप्त आहे. तुमची वर्तणूक व महाराजांनीं तुह्मांवर केलेली मेहेरबानी लक्षांत आणिली म्हणजे ही खंडणी तुम्ही भरीत नाहीं हें योग्य नाहीं. आम्ही तुह्मांवर मेहेरबानी करितों आणि तुह्मी आमच्या विरुद्ध वागतां. तुम्ही मुसलमानांस आपल्या जागेंत आश्रय दिला हें योग्य आहे काय? शिवाय त्रिचिनापल्ली व तंजावर येथील दौलतीच्या पेट्या, हत्ती, घोडे, वगैरे जें कांहीं तेथें हातास लागलें तें सर्व कुटुंबांतील मुलेंमाणसेंसुद्धां चंदासाहेबानें पांदिचरीस नेऊन तुमच्या जवळ ठेविलें आहे, ही गोष्ट योग्य आहे काय? तुह्मांस आमच्याशीं दोस्ती ठेवावयाची असेल तर वरील दौलत आणि सारीं चंदासाहेबाचीं मुलेंमाणसें

* टीप.–Extract trans. by Malleson, from French, in the archives of the Company of the Indies.

सुद्धां तुम्ही आमच्या हवालीं करावा. ती ताब्यांत घेण्याकरितां स्वार पाठविले आहेत. तुम्ही हें न ऐकल्यास, आम्हांस जबरदस्तीनें तें सर्व घ्यावें लागेल आणि चाळीस वर्षें न भरलेली खंडणीही जबरदस्तीनें घेऊं. वसईची काय स्थिति झाली तें तुह्मीं ऐकलेंच असेल. हल्लीं आमच्याजवळ येथें मोठी फौज असून तिचा खर्च चालला पाहिजे. बऱ्या बोलानें तुह्मीं आमची मागणी कबूल न केल्यास, तुह्मांपासून वसूल कसा करावा हे आह्मी जाणून आहों. थोड्याच दिवसांत आमचें आरमारही इकडे येऊन दाखल होणार आहे; ह्मणून ह्या प्रकरणाचा निकाल सत्वर झालेला बरा. ह्या पत्रांत मागितल्याप्रमाणें चंदासाहेबाचें कुटुंब व मुलें, तसेंच हत्ती घोडे, जवाहीर वगैरे सर्व ताबडतोब आमच्याकडे पाठवून द्याल अशी आशा आहे.’

ह्या पत्रास डुमासनें पाठविलेल्या जबाबांतील उतारा. ‘ महाराजांस आह्मीं खंडणी कबूल केली असून चाळीस वर्षें भरणा केला नाहीं, असें तुम्ही म्हणतां, तर फ्रेंच राष्ट्रावर आजपावेतों कधींच कोणीं खंडणी बसविलेली नाहीं. ‘ मी खंडणी देण्याचें कबूल केलें ’ असें माझे धनी जे फ्रेंचांचे राजे त्यांस कळेल, तर माझें डोकेंच उडवितील. इकडील राजांनीं आह्मांस समुद्रकांठच्या वाळूवर किल्ला व शहर बांधण्याची परवानगी दिली, तेव्हां येथील लोकांचा धर्म व देवालयें ह्यांस कोणताही उपद्रव देऊं नये एवढीच कायती अट आम्हीं कबूल केली होती; आणि ही अट आम्ही मनोभावें पाळिली आहे. त्यासाठीं आपली फौज इकडे येण्याचें कारण पडलेलें नाहीं. जिंजी व त्रिचनापल्ली येथील किल्ले हस्तगत करण्याचा हुकूम तुम्हांस मिळाला आहे असें तुम्ही लिहितां, त्यास जोंपावेतों तुमचा आमचा वैरभाव उत्पन्न होत नाहीं, तोंपावेतों त्यास आमची हरकत नाहीं. ह्या प्रांतांत जितके म्हणून मोगल अधिकारी झाले त्या सर्वांनीं आम्हां फ्रेंचांशीं संमानपुरःसर दोस्तीच ठेविली आहे. त्यांनीं आमच्यावर उपकार केले आहेत. ह्या स्नेहास्तव नबाब दोस्तअलीच्या कुटुंबास आश्रय देणें आम्हांस प्राप्त झालें आहे. आम्हीं आपले दरवाजे बंद करून त्यांस बाहेर भटकत ठेवणें आम्हांस रास्त होतें काय ? ज्यास स्वतःचा

अभिमान म्हणून आहे तो असलें भागूबाईचें वर्तन कधीं करणार नाहीं. चंदासाहेबाची बायको, तिची आई व भाऊ यांसह, येथें आली असून बाकीची मंडळी आर्काट येथें आहे. ही बाई, तिचा मुलगा व तिची संपत्ति तुमच्या स्वारांच्या हवालीं करावी असें तुम्ही लिहितां, त्यास तुम्ही शूर व थोर मनाचे सरदार आहां, मीं असलें निंद्य कृत्य केल्यास मजबद्दल तुमच्या मनास काय वाटेल तें तुम्हांस ठाऊक. चंदासाहेबाची बायको फ्रेंच राज्याच्या संरक्षणाखालीं पांदिचरी येथें आहे; आणि हिंदुस्थानांत असलेले एकूण एक फ्रेंच गृहस्थ ठार झाल्याशिवाय ती तुमच्या हातीं लागणार नाहीं. आपली मागणी कबूल केली नाहीं तर तुम्ही स्वतः सर्व फौज घेऊन पांदिचरीवर येणार असें तुम्ही लिहितां, त्यास तुमचा येथें योग्य सत्कार करण्याची संपूर्ण तयारी मी करीत आहें. सर्व जगांत अत्यंत शूर म्हणून नांवाजलेले शिपाई आमच्यापाशी आहेत, आपणांवर अन्यायानें हल्ला करणारांचा समाचार कसा घ्यावा हें त्यांस कळत आहे, असें तुम्हांस दिसून येईल. परमेश्वरसत्तेपुढें मोठमोठ्या फौजा सुद्धां तृणवत् आहेत, आणि त्या परमेश्वराच्या ठिकाणीं आमचा पूर्ण भरंवसा आहे. तो आम्हांस यश देईल अशी आमची आशा आहे. वसईचा प्रकार काय झाला तो आम्ही ओळखून आहों, मात्र वसईचा बचाव फ्रेंच लोक करीत नव्हते.' ( स. १७४० ).

असा पत्रव्यवहार चालू असतां सफतरअलीनें मराठ्यांशीं केलेल्या तहांतील गुप्त कलमांची माहिती डुमास ह्यास मिळाली. त्याबरोबर त्यानें युद्धाची तयारी झपाट्यानें चालविली. १२०० युरोपियन व पांच हजार मुसलमान फौज कवाईत शिकवून त्यानें तयार केली. हिंदुस्थानांतील कवाइती फौजेचा हा आरंभ होय. डुमासनें सर्व प्रकारची सामुग्री शहरांत भरली, व आरमारावरील लोकांसही जमिनीवरील युद्धकला शिकविली. इतक्यांत नबाब सफतरअली पांदिचरीस येऊन आपल्या आईस भेटला. त्यानें डुमासचेही फार उपकार मानिले. त्याबरोबर चंदासाहेबही आला होता. ह्या प्रसंगीं दहा हजार उत्पन्नाचा मुलूख सफतरअलीनें पूर्व किनाऱ्यावर फ्रेंचांस

तोडून दिला; त्याजबद्दल दिल्लीच्या बादशहाचें फरमानही पुढें आलें. कांहीं दिवस पांदिचरीस राहून सफतरअली आपल्या आईसुद्धां आर्काट येथें आणि चंदासाहेब त्रिचनापल्लीस निघून गेला; त्याचीं बायकोमुलें फ्रेंचांकडेच राहिलीं. परत आल्यावर चंदासाहेबानें स्वसंरक्षणाची तजवीज सोडून देऊन, आपला भाऊ बडासाहेब यास ज्यास्त मुलूख जिंकण्याकरितां मदुरा येथें पाठविलें. परंतु या वेळीं, मराठ्यांची त्या बाजूस विशेष चालती होती. रघूजी भोसले, मुरारराव घोरपडे व तंजावरचा प्रतापसिंग यांनीं चंदासाहेबाचा पाडाव करण्याची कडेकोट तयारी केली. त्रिचनापल्ली हस्तगत झाली कीं चंदासाहेब उघडा पडला असें ठरवून, आणि बडासाहेब व चंदासाहेब एकत्र नाहींत असें पाहून, रघूजीनें एकदम त्रिचनापल्लीस वेढा घातला. चंदासाहेब मोठ्या निकरानें लढला. त्यानें बडासाहेबास तावडतोब परत बोलाविलें. त्याप्रमाणें तो चंदासाहेबास येऊन मिळण्यापूर्वीच रघूजीनें त्याजवर वीस हजार फौज पाठविली. त्याजपुढें नाइलाज होऊन बडासाहेब लढाईत पडला व त्याची फौज सैरांवरां पळून गेली. बडासाहेबाचें प्रेत समारंभानें रघूजीनें चंदासाहेबाकडे पाठवून दिलें. त्रिचनापल्लीचा वेढा ता. १५ डिसेंबरपासून तीन महिने पावेतों चालला. ता. २१ मार्च स. १७४१ रोजीं चंदासाहेबानें निरुपाय होऊत किल्ला मराठ्यांचे स्वाधीन करून आपणही वडील मुलासह स्वाधीन झाला. त्या दोघांस तसेंच कैद करून रघूजीनें सातार्‍यास पाठविलें, आणि मुरारराव घोरपडे* याच्या हाताखालीं चौदा

---

* पूर्वी राजाराम महाराजांच्या कारकिर्दीत संताजी घोरपडे याचा खून झाल्यावर त्याचा पुतण्या शिधोजीनें सैन्य जमवून, कर्नाटकांत लुटालूट आरंभिली, आणि गुत्ती, गजेंद्रगड व सोंडूर हे किल्ले व सभोंवतालचा प्रदेश काबीज करून, तिकडे एक स्वतंत्र संस्थान स्थापिलें. कोणाचेंही पाठबळ नसतां परमुलखांत तरवारीच्या जोरावर मिळविलेलें हें लहानसें संस्थान या घोरपड्यांनीं उत्तम रीतीनें राखिलें, आणि कृष्णेपासून रामेश्वरापर्यंत सर्व रजवाड्यांवर आपला दरारा बसविला, यावरून त्यांचा पराक्रम व्यक्त होतो.

हजार फौज देऊन कर्नाटकचे बंदोबस्ताचें काम त्यास सांगितलें. चंदासाहेबास पकडल्यावर रघूजीनें फ्रेंचांकडे खंडणीचा तगादा लाविला. मागील बाकीबद्दल साठ लाख रुपये, पुढें दरसाल खंडणी देण्याचें वचन व चंदासाहेबाचीं बायकोमुलें स्वाधीन करणें, ह्या गोष्टींची त्यानें मागणी केली. तथापि डुमासनें त्यास दाद दिली नाहीं. मात्र बुर्बोंकडून तावडतोब ज्यास्त मदत त्यानें मागितली. रघूजीनें १६००० फौज पूर्व किनाऱ्यावर पाठविली; पण तिजमुळें फ्रेंचांस इजा पोंचली नाहीं. त्याच वेळेस माहीवरही रघूजीनें फौज रवाना केली. ह्या संधींत रघूजीनें आपला वकील पांदिचरीस पाठविला होता, त्याचा डुमासनें चांगला सत्कार करून पांदिचरीचा बंदोबस्त त्यास दाखविला; आणि परत जात असतां त्याजपाशीं रघूजी भोसल्यास नजर म्हणून फ्रान्समधील उत्कृष्ट दारूच्या दहा बाटल्या पाठविल्या. त्या बाटल्या रघूजीच्या बायकोस इतक्या आवडल्या, कीं तिच्या आग्रहावरून रघूजीनें आणखी बाटल्या डुमासकडे मागितल्या. त्यानें आणखी तीस बाटल्या पाठवून सलामालकीचीं पत्रें पाठविलीं, तेणेंकरून पुढें उभयतांचा स्नेहभाव जुळून आला.* पुढें पांदिचरीस इजा देऊं नये अशी ताकीद रघूजीनें आपल्या फौजेस दिली; आणि पूर्वीच्या सर्व मागण्या सोडून देऊन रघूजी माहीकडे निघून गेला.

---

शिधोजीचा मुलगा मुरारराव हा फारच प्रख्यातीस आला. कर्नाटकांत कोठेंही लढाईचा प्रसंग उपस्थित झाला असतां दोन पक्षांपैकीं एकाकडे मुरारराव नाहीं असें होत नसे. त्याचें सैन्य थोडें पण अत्यंत व्यवस्थित होतें. इंग्रजांस अनेक वेळां साह्य केल्याबद्दल त्यांनीं मुराररावाची स्तुति केली आहे. स. १७०४ पासून स. १७७६ पर्यंत अव्वल व उत्तर मराठशाही पाहिलेला असा हा एकच दीर्घायुषी पुरुष दिसतो. ( खरेकृ० ऐ० ले० सं०, भा० २ ).

* **टीपः**—या बाटल्यांचे प्रकरणावरून रघूजी शाहूचे मर्जीतून किती उतरला, त्याचें वर्णन ऐ० ले० सं० भा० ८ ले० ३२९२चे शेवटीं आहे.

६. डुप्ले व कर्नाटकांतला गोंधळ.—फ्रेंच गव्हर्नर डुमास मोठा हुशार कामगार होता. त्याच्या अमदानींत फ्रेंचांची सत्ता व वजन पुष्कळ वाढलें. तसेंच चंद्रनगर येथील डुप्लेचा कारभार लोकांस चांगला पसंत पडला. त्यानें तेथें कंपनीचा पुष्कळ फायदा करून स्वतःही मोठी संपत्ति मिळविली. स. १७४१त डुमास स्वदेशीं निघून गेला, आणि डुप्लेची नेमणूक पांदिचरीस झाली. स. १७४१च्या ऑक्टोबर महिन्यांत डुप्ले पांदिचरीस दाखल होऊन तेथील कारभार पाहूं लागला. डुमासनें रघूजीशीं जें बाणेदार वर्तन केलें, त्यामुळें एतद्देशीय मुसलमान दरबारांत फ्रेंचांची मोठी वाहवा झाली. निजाम-उल्मुल्क ह्यानें डुमास ह्यास स्तुतिपर पत्र लिहिलें. सफ्तरअलीनें त्यास अनेक मौल्यवान वस्तु नजर केल्या. दिल्लीचा बादशहा महंमदशहा ह्यानें त्यास स्वतंत्र नबाब करून साडेचार हजार स्वारांची मनसब दिली; आणि ती पांदिचरीच्या गव्हर्नराकडे कायमची चालावी, असा ठराव केला. सारांश, बादशहा, त्याचा सुभेदार व त्याचा हस्तक कर्नाटकचा नबाब हे किती निःसत्व बनले होते, आणि स्वसंरक्षणार्थ वाटेल त्याचा आश्रय करण्यास कसे तयार झाले होते, हें ह्यावरून दिसून येतें. पुढें कांहीं का होईना, ह्या क्षणाचें संकट टळो म्हणजे झालें, एवढीच त्यांची बुद्धि होती.

इकडे डुप्ले मोठ्या थाटानें राहूं लागला. हरएक प्रकारचीं वैभवचिन्हें धारण करून त्यानें आपली छाप चहूंकडे बसविली. चंद्रनगर येथें मि. व्हिन्सेंट म्हणून एक कौन्सिलचा मेंबर असे. तो मरण पावल्यावर त्याची विधवा मॅडम व्हिन्सेंट इच्याशीं डुप्लेनें लग्न लाविलें, ( स. १७४१ ). ही बाई हिंदुस्थानांत जन्मलेली असून तिचा विद्याभ्यासही इकडेच झाला होता. ती मोठी बुद्धिमान व धीट असून तिला इकडच्या भाषा चांगल्या येत होत्या, त्यामुळें तत्कालीन राजकारणांत डुप्लेला तिचा अतिशय उपयोग झाला. ह्या दोघांनीं एकमेकांच्या सल्यानें पुढें मोठीं राजकारणें उभारलीं.

डुप्ले कारभार पाहूं लागला, तेव्हां मराठ्यांच्या स्वारीमुळें कर्नाटकची दुर्दशा झाली होती. चंदासाहेब व त्याचा मुलगा सातान्यास कैदेंत पडले ते

पुढें तेथेंच सात वर्षे राहिले. त्यामुळें डुप्लेची बाजू बरीच लंगडी पडली. इकडे नबाव सफ्तरअली चंदासाहेबाच्या जाळयांतून सुटला; पण निजाम त्याजवर आपला शह बसवूं पाहत होता. निजाम ह्मणे कीं अर्काटचा नबाब आपला अंकित; त्यानें आपणास खंडणी द्यावी. नबाब ह्मणे कीं आपण दिल्लीच्या बादशहाशिवाय दुसऱ्या कोणास जुमानणार नाहीं. सारांश, इतर सत्ताधीशांप्रमाणें नबाबही साधेल तेवढी स्वतंत्र सत्ता स्थापण्यांत गुंतला होता. त्याजपाशीं संपत्ति मुबलक होती; पण निजामास खंडणी द्यावयाची नाहीं ह्मणून कांहीं तरी सबब सांगून तो निजामास फसवीत होता उलट पक्षीं निजामास खंडणी देण्याच्या निमित्तानें त्यानें हाताखालच्या जमीनदारांपासून पैसे उकळण्याचा सपाटा चालविला, त्यामुळें तो लोकांस अप्रिय होऊन त्यांनीं त्याजविरुद्ध गुप्त कारस्थानें चालविलीं. त्यांत दोस्तअलीचा दुसरा जांवई मुर्तुजाअली हा सामील झाला. त्याचा व सफ्तरअलीचा बेबनाव होता. सफ्तरअलीच्या शत्रूंनीं उचल खाल्ली, तेव्हां त्याचा वसूल वेळेवर जमा होईना. अशा प्रकारची बंडाळी निजामाला इष्टच होती. अशा अंदाधुंदींत स. १७४२त वेलोर येथें मुर्तुजाअलीनें सफ्तरअलीचा खून केला, आणि आपण आर्काट येथें जाऊन नबाबाचें पद धारण केलें. पुढें अनेक पक्ष उत्पन्न झाले. त्यांपैकीं एकानें मुराररावघोरपड्याची व इंग्रजांची मदत घेऊन मुर्तुजाअलीस काढून टाकिलें, आणि सफ्तरअलीचा अल्पवयी मुलगा सय्यद महंमदखान ह्मणून होता, त्यास नबाब केलें ( स. १७४२ ).

अशी बंडाळी चालू असतां, कर्नाटकावर आपला अंमल बसविण्यास ही संधि चांगली आहे असें पाहून, निजामुल्मुल्कनें मोठी फौज घेऊन कर्नाटकावर स्वारी केली. ( स. १७४३ ). तेव्हां त्याजबरोबर ऐशीं हजार स्वार व दोन लाख पायदळ एवढी फौज होती असें ह्मणतात. एवढ्या फौजेनें त्यानें सपाट्याबरोबर सर्वांचा पराभव करून दंगा मोडिला. मुरारराव निघून गेल्यामुळें त्रिचनापल्ली सहज त्याचे हस्तगत झाली. नंतर मुलखाचा बंदोबस्त करून, अर्काटच्या नबाबगिरीवर अन्वरुद्दीन नामक आपल्या पदरचा एक नवीन इसम

निजामानें नेमिला ( एप्रिल स. १७४४ ). अन्वरुद्दीनचा बाप औरंगजेबाजवळ कुराण पढविण्याचें काम करीत असे; त्याच्याच वशिल्यानें अन्वरुद्दीन यास प्रथम पांचशेंची मनसब मिळाली. पुढें तो निजामुल्मुल्कच्या बापाजवळ गुजराथेंत होता; तेथून निजामापाशीं येऊन त्यानें त्याच्या हाताखालीं अनेक ठिकाणीं कारभार केला. निजामानें कर्नाटकावर स्वारी केली, तेव्हां अन्वरुद्दीन गोवळकोंड्याचे बंदोबस्तास ठेविलेला होता. पुढें कर्नाटकचा बंदोबस्त ठेवण्यास हा योग्य आहे आणि हा आपल्या भरंवशाचा, शूर व अनुभवी आहे, असें जाणून निजामानें त्यास आर्काटच्या नवाबागिरीवर नेमिलें; आणि कर्नाटक प्रांत आपल्या ताब्यांतला आहे, असें सर्व लोकांस त्यानें जाहीर केलें.

अन्वरुद्दीन लोकांस आवडला नाहीं. तो फार वृद्ध होता. सादतुल्लाच्या कुटुंबानें तीस वर्षे नबाबगिरीचा कारभार केला होता. रयतेची काळजी घेऊन, प्रांतांतही त्यांनीं आबादानी ठेविल्यामुळें, लोकांची त्या कुटुंबावर भक्ति होती. निजामानें तरी सफतरअलीच्या मुलाच्या तर्फेनेंच अन्वरुद्दीन ह्यास तो कारभार सांगितला होता. सफतरअलीचा मुलगा सय्यद महंमद ह्याचा लवकरच एका लग्नप्रसंगांत खून झाला. हा खून मुर्तुजाअलीनेंच केला अशी लोकवार्ता होती. कोणी ह्मणतात, मुर्तुजाअली व अन्वरुद्दीन ह्या दोघांनीं संगनमत करून त्यास ठार मारिलें. असो. सय्यद महंमद मरण पावल्यावर निजामानें अन्वरुद्दीन ह्यासच नबाबगिरीवर कायम केलें. कर्नाटकची अशी व्यवस्था करून निजाम परत दक्षिणेंत गेला, आणि पुढें कर्नाटकांत इंग्रज फ्रेंचांचें युद्ध सुरू झालें.

---

# प्रकरण सोळावें.



## कर्नाटकांतलें पहिलें युद्ध.



### इ. स. १७४४-४८.

१. इंग्रजफ्रेंचांचें युद्ध. २. लाबूर्डोनेचा बुर्बो येथील कारभार. ३. मद्रासचा पाडाव, लाबूर्डोनेचा शेवट. ४. सेंट टॉमेची लढाई. ५. युद्धाचा शेवट. ६. निष्कर्ष.

१. **इंग्रज फ्रेंचांचें युद्ध** ( स. १७४४ ).—डुप्लेची महत्त्वाकांक्षा अनिवार्य होती. राज्यप्राप्तीच्या चढाओढींत आपला लाग साधून घेण्याची त्यास उत्कंठा झाली. हिंदुस्थानांत फ्रेंचांचें राज्य स्थापण्यास आपण योग्य व समर्थ आहों असें त्यास वाटलें. स. १७३९त युरोपांत इंग्लंड व स्पेन ह्यांचें युद्ध चालू झालें होतें. त्याचें कारण व्यापार व वसाहती ह्यांजबद्दलची त्या दोन राष्ट्रांची स्पर्धा होय. ह्या युद्धांत हळूहळू फ्रान्सही सामील होणार असा रंग दिसूं लागला. तेव्हां डुप्लेही तशाच तयारीनें इकडे वागूं लागला. पण फ्रेंच सरकारानें त्यास युद्धाचे हुकूम न पाठवितां, उलट खर्च कमी करण्याविषयीं सक्तीचा हुकूम पाठविला, तेव्हां डुप्लेस मोठी पंचाईत पडली. तथापि वरिष्ठांचा हुकूम बाजूस ठेवून त्यानें पांदिचरीची तटबंदी मजबूद केली. त्याबद्दल पुढें त्यास शाबासकीही मिळाली.

स. १७४४त फ्रान्सनें इंग्लंडवर उघडपणें शस्त्र उगारिलें. ह्या युद्धास 'ऑस्ट्रियाच्या वारसाचें युद्ध,' असें ह्मणतात. एकाद्या गादीच्या वारसांत तंटे उपस्थित झाले, ह्मणजे कोणाही एका राष्ट्रास फाजील वरचढ होऊं द्यावयाचें नाहीं, असा युरोपियन राष्ट्रांत एक निर्बंध होता. तदनुसार हें युद्ध सुरू झालें. पण त्याचें खरें अंतस्थ कारण व्यापार, दौलत, वसाहती ह्या

बाबतींबद्दलची चुरस होय. इंग्लंड व फ्रान्स ह्यांचा राज्यविस्तार पूर्वेकडे व पश्चिमेकडे असल्यामुळें, सर्व ठिकाणीं त्या दोन राष्ट्रांत युद्धाचा उद्भव झाला.

युद्धाच्या आरंभीं फ्रेंच आरमाराची व किल्ल्यांची स्थिति समाधानकारक नसून त्या बाबतींत इंग्रज बरेच जोरांत होते. इंग्रजांचें मोठें आरमार फ्रेंचांचा व्यापार बुडविण्याच्या इराद्यानें इकडे येण्यास निघालें होतें. उलट पक्षीं फ्रेंचांपाशीं आरमारच नव्हतें. फ्रेंच सरकारानें कांहीं गलबतें इकडे पाठविण्याचा विचार ठरविला, पण तीं नीटपणें वेळेवर निघूं शकलीं नाहींत. ह्मणून कोणत्याही तऱ्हेनें इंग्रजांशीं सख्य ठेवावें, युद्धप्रसंग आणूं नये, असा फ्रेंच कंपनीचा डुप्लेस हुकूम आला. डुप्लेचाही विचार तोच होता. मात्र ही गोष्ट घडणें शक्य नाहीं हें तो परिस्थितीवरून पूर्णपणें जाणून होता. इकडे फ्रेंचांची कमतयारी इंग्रजांस माहीत असल्यामुळें, ते युद्धाविषयीं मुद्दामच आतुर झाले. मि. मॉर्स मद्रासचा गव्हर्नर होता, त्यास डुप्लेनें पत्र लिहून युद्ध न करण्याविषयीं विनंति केली. मॉर्सनें उलट कळविलें, कीं ‘ इंग्लंडाहून युद्ध करण्याचा हुकूम आला असून, तत्प्रीत्यर्थ कमोडोर बार्नेट आरमार घेऊन इकडे येत आहे. तेव्हां माझा नाइलाज आहे.’ डुप्लेनें नंतर आर्काटचा नबाब अन्वरुद्दीन याजकडे संधान लावून कळविलें, कीं आपली आमची दोस्ती पूर्वापार आहे. तेव्हां एका युरोपियन राष्ट्रानें दुसऱ्या राष्ट्रावर आपल्या मुलुखांत उठून दंगा करावा हें योग्य नाहीं. असा प्रकार घडल्यास तो आपण बंद केला पाहिजे.’ ही गोष्ट अन्वरुद्दीन यास पटली. त्यानें दोघांही राष्ट्रांच्या अधिकाऱ्यांस युद्ध करण्याची सक्त मनाई केली. त्यामुळें फ्रेंचांचा ह्या आणीबाणीच्या प्रसंगीं बराच बचाव झाला.

२. **लाबूर्डोनेच्या बूर्बो येथील कारभार**—लाबूर्डोनें ह्या फ्रेंच सरदारानें स. १७२५त माहो काबीज केलें ही गोष्ट मागें सांगितलीच आहे. त्यानंतर तीन चार वर्षे तो स्वतःच्या हिंमतीवर हिंदी महासागरांत व्यापार करीत होता. कांहीं दिवस त्यानें गोव्याच्या पोर्तुगीज सरकारची नोकरी केली. ती सोडून तो स.१७३३त फ्रान्सांत परत गेला. पुढें स. १७३५त

बूर्बोंच्या कारभारावर त्याची नेमणूक झाली. मादागास्कर, बूर्बो व आइल् जाफ् फ्रान्स ह्मणजे फ्रान्सचें बेट, अशीं तीन बेटें आफ्रिकेच्या पूर्व किनाऱ्यावर फ्रेंचांचीं होतीं हें मागें सांगितलेंच आहे. त्यांतलें मादागास्कर त्यांनीं बहुतेक सोडून दिल्यासारखें असून, आईल आफ् फ्रान्स येथें त्यांची मुख्य बसाहत होती. त्याची मुख्य जागा सेंट लुइ नांवाचें बंदर होतें. ह्या बेटांत स. १७१९त काफीचीं झाडें, साबुदाण्याचीं झाडें व ऊंस लावण्याची फ्रेंचांनीं सुरुवात केली, त्यामुळें तेथचें उत्पन्न व व्यापार पुष्कळ वाढला. स. १७२१त तेथें मोठ्या फ्रेंच वसाहती सुरू होऊन, स. १७२३त गव्हर्नर व कौन्सिल ह्यांची नेमणूक झाली. डुमास हा तेथील पहिला गव्हर्नर होय. स. १७३५त डुमासची नेमणूक पांदिचरीस झाल्यावर लाबूर्डोनेची नेमणूक सेंट लुइस झाली. ह्या बेटाची जमीन सुपीक, हवा माफक व बंदराची सोय चांगली असल्यामुळें त्याचें महत्व वाढलें. तेथें मोठमोठीं अरण्यें होतीं तीं लाबूर्डोने ह्यानें तोडविलीं; तेथें अनेक ठिकाणाहून जमलेले निरनिराळ्या जातींचे व राष्ट्रांचें पुष्कळ लोक होते, त्यांस त्यानें अनेक गोष्टी शिकविल्या; आणि जिवापाड मेहनत करून बेटाची स्थिति सुधारली. शेती, कलाकौशल्य, व लष्करी नोकरी हीं तीन कामें त्यानें लोकांस शिकविलीं. गलबतें बांधण्याचा उद्योगही त्यानें आरंभिला. तसेंच दुसरें बेट बूर्बो येथेंही त्यानें पुष्कळ सुधारणा व वस्ती केली.

या उद्योगांत लाबूर्डोनेचा स्वतःचे फायद्याचा कांहीं अंतस्थ हेतु आहे अशी त्याच्या शत्रूंनीं फ्रान्सांत ओरड चालविली. पुढें स. १७४०त तो आपलें काम सोडून फ्रान्सांत गेला, तेथें त्यानें लोकांची खात्री करून शत्रूंचीं तोंडें बंद केलीं; आणि त्याच्या उद्योगाबद्दल व कल्पकतेबद्दल दरबारांत सुद्धां त्याची वाहवा झाली. त्या वेळीं फ्ल्यूरी ( Fleury ) नांवाचा गृहस्थ फ्रान्सचा मुख्य प्रधान होता. तो जात्या अजागळ असून शांतता राखण्यापलीकडे दुसरें राष्ट्रीय काम त्यास समजत नव्हतें. फ्रान्सांत परत गेल्यावर लाबूर्डोनेस तेव्हांच कळून आलें, कीं इंग्लंड व फ्रान्स ह्यांजमध्यें खास युद्ध होणार. त्यांत फ्रेंच राष्ट्राची बाजू संभाळून इंग्रजांचा नकशा कमी करण्याचे विचार त्याच्या मनांत

येऊन, दरबारच्या व लोकांच्या मदतीनें त्यानें युद्धाची सिद्धता केली; आणि एक मोठें आरमार घेऊन तो पूर्वेकडे निघाला. त्याच्या कल्पनेप्रमाणें वागण्यास त्यास फ्रेंच सरकाराचें पाठबळ मिळालें असतें, तर ह्या युद्धाचा परिणाम निराळाच झाला असता. पण त्या वेळचे फ्रेंच राजे, मुत्सद्दी, व राज्यपद्धति इतकी कुचकामी झाली होती, कीं त्या स्थितींत राष्ट्राची भरभराट होणें शक्यच नव्हतें. लाबूर्डोने फ्रान्स सोडून निघाला मात्र, इतक्यांत त्याच्या शत्रूंनीं फ्रेंच सरकारामार्फत त्यास हुकूम पाठविला, कीं सर्व गलबतें परत पाठवावींत. हा हुकूम प्रधान फ्ल्यूरीच्या मार्फत आला, त्या वेळीं फ्ल्यूरीचें वय नव्वद वर्षांचें होतें. लाबूर्डोने आइल आफ् फ्रान्समध्यें येऊन पोंचतो इतक्यांत मागून हा हुकूम आला. त्या वेळीं त्याच्या मनाची काय तडफड झाली असेल त्याची कल्पनाच केली पाहिजे. इंग्रजांचा सर्व व्यापार बुडविण्याचा संकल्प करून आपण निघालों काय व पुढें हा प्रकार काय ? तथापि हुकूम तो हुकूम. ताबडतोब मान्य करून त्यानें फ्रेंच गलबतें परत पाठविलीं, आणि वर्ष सहा महिने जिवापाड मेहनत व नानातऱ्हा करून त्यानें पांच सहा गलबतें नवीन तयार केलीं. इकडे इंग्लंडचें व फ्रान्सचें युद्ध सुरू होऊन इंग्रजांचा कमोडोर बार्नेट ह्यानें फ्रेंच व्यापार बुडविण्याचा तडाखा चालविला. ही मानहानि लाबूर्डोने ह्यास निमूटपणें पाहवी लागली. त्याच संधीस त्यास आरमाराची मदत घेऊन येण्याविषयीं डुप्लेकडून निकडीचें बोलावणें आलें. अशा संकटसमयीं त्याच्या अंगचा खरा धीटपणा बाहेर पडला. तो मुळींच डगमगला नाहीं. त्यानें हरतऱ्हा करून जहाजें तयार केलीं आणि त्यांजवर सर्व सामुग्री भरली. इतक्यांत फ्रान्साहून कांहीं जहाजें आलीं. तीं व हीं मिळून बरेंच मोठें आरमार स. १७४६ च्या आरंभीं कारोमांडल किनाऱ्यावर येऊन पोंचलें. त्याजबरोबर सामना करण्यासाठीं कमोडोर पेटन इंग्रजांचें आरमार घेऊन आला. एक दिवस दोघांचा सामना झाला. दुसरे दिवशीं कमोडोर पेटन फ्रेंचांस चुकवून चालता झाला. लाबूर्डोने ह्यानें त्याचा पाठलाग केला नाहीं. पुढें मद्रासेवर हल्ला न करितां लाबूर्डोने पांदिचरीस आला. तेथें डुप्लेची व त्याची गांठ पडली; आणि दोघांनीं अनेक स्नेहसंवाद करून पुढील बेत ठरविले.

**३. मद्रासचा पाडाव व लाबूर्डोनेचा शेवट, ( स. १७४६ ).—** लाबूर्डोने व डुप्ले दोघेही साहसी, महत्त्वाकांक्षी व आणीबाणीच्या प्रसंगीं नेटानें वागणारे होते. पण दोघांसही हुकमत चालविण्याची चटक असून दुसऱ्याचे हुकूम बजावण्याची संवय नव्हती. दोघांनींही आजपावेतों स्वतंत्रतेनें वागून पराक्रम करून दाखविले होते. पण आतां प्रसंग निराळा आला. एक ठिकाणीं दोघांची हुकमत चालणें अशक्य होतें; आणि दोघांतून एकही माघार घेणारा नव्हता. लाबूर्डोने हा सेंट लुइ येथें स्वतंत्र कारभार करीत असला, तरी पांदिचरीस गव्हर्नर व कौन्सिल ह्यांची त्याजवर हुकमत होती. दोघांनीं मद्रासेवर हल्ला करून तें शहर काबीज करण्याचा बेत एकमतानें ठरविला. डुप्लेनें तर सर्व मानापमान बाजूस ठेवून लाबूर्डोनेस मनोभावानें मदत करण्याचें कबूल केलें, आणि ह्या साहसांत जें यश येईल त्याचा मान संपूर्णपणें तुह्मांस आहे, अशी त्यानें लाबूर्डोनेची खात्री केली. मद्रास काबीज करणें ही गोष्ट दोघांसही अगत्याची वाटली; आणि तोच बेत सिद्धीस नेण्याचा दोघांचाही विचार ठरला. पण मद्रासेवर हल्ला करण्याची निकड आली, तेव्हां ऐन प्रसंगीं लाबूर्डोनेनें उडवाउडव सुरू केली. नाहीं नाहीं ती सबब काढून ठरलेल्या गोष्टीस तो व्यत्यय आणूं लागला. मध्यंतरीं मद्रासेवर ह्मणून जात असतां, रस्त्यांत त्यास इंग्रज आरमार भेटलें. पण फ्रेंचांस भिऊन इंग्रज जहाजें घाईनें पळून गेलीं, तेव्हां तसेंच मद्रासेवर जाणें सोडून लाबूर्डोने परत पांदिचरीस आला. सारांश डुप्लेचे हुकूम पाळण्याचें त्याच्या जिवावर आलें. शेवटीं अनेक वेळां नाहीं होय ह्मणून तो मद्रासेवर गेला. ( सेप्टेंबर स. १७४६ ).

मद्रासच्या किल्याचें नांव फोर्ट सेंट जॉर्ज. त्याशिवाय कारोमांडल किनाऱ्यावर, पांदिचरीच्या दक्षिणेस सोळा मैलांवर कडलोरनजीक फोर्ट सेंट् डेव्हिड व पोर्टोनोव्हो, आणि शिवाय त्या किनाऱ्यावर पेट्टिपुळी, मच्छालिपट्टण, मोदापुळम्, आणि विशाखापट्टण ह्या ठिकाणीं इंग्रजांच्या वसाहती होत्या. ई० गव्हर्नर मॉर्स पूर्वी व्यापारी असून, स्वभावानें साधा व शांत होता. धाडस कसें तें त्यास नव्हतें; आणि राजकीय धोरणही त्यास नव्हतें. स. १७४४त

डुप्लेनें जेव्हां युद्ध न करण्याविषयीं मॉर्सची विनवणी केली तेव्हां आपणास तसें करण्यास हुकूम नाहीं असा त्यानें जबाब दिला; पण त्याची तयारी असतां नबाबानें त्यास लढूं दिलें नाहीं. पुढें मद्रासला कांहींच अपाय होण्याचा संभव नाहीं असें त्यास वाटून, त्यानें तेथचा बंदोबस्त ढिला पाडिला. नंतर लॅाबूर्डोने मद्रासेवर चाल करून येणार अशी खबर आली, तेव्हां तेथें एकदम गोंधळ उडाला. ग० मॉर्सनें नबाबास विनंति केली, कीं 'आतां पूर्वी कबूल केल्याप्रमाणें फ्रेंचांचा बंदोबस्त करा.' पण ही विनंति करितांना नजराणा पाठवावयास पाहिजे होता, तो इंग्रजांनीं न पाठविल्यामुळें नबाबानें त्यांची विनंति साफ अमान्य केली. फ्रेंचांची पण त्यासंबंधानें खटपट होतीच. ता. १५ सेप्टेंबर रोजीं लाबूर्डोनेचें आरमार मद्रासेवर येऊन ठेपलें. इंग्रजी आरमार त्या वेळीं बंगाल्याकडे गेलें होतें. पांच दिवस थोडी बहुत चकमक झडून मद्रास शहर व किल्ला फ्रेंचांचे हातीं पडला, आणि तेथचे सर्व इंग्रज फ्रेंचांचे कैदी झाले. मद्रासचें पुढें काय करावयाचें हा प्रश्न अवघड होता. त्यासंबंधानें लाबूर्डोनें व डुप्ले ह्यांजमध्यें तंटा सुरू झाला. लाबूर्डोनेचें ह्मणणें दंड घेऊन मद्रास इंग्रजांस परत द्यावें; डुप्लेचें ह्मणणें तें फ्रेंचांनीं कायमचें आपल्या ताब्यांत घ्यावें. ह्या संबंधांत उभयतांचा पुष्कळ पत्रव्यवहार झाला. इकडे युद्ध बंद करण्याविषयीं आर्काटच्या नबाबानें डुप्ले यास सक्तीचा हुकूम पाठविला असतां, डुप्लेनें नबाबाशीं असा ठराव केला, कीं 'आह्मी इंग्रजांचा जो मुलूख जिंकूं तो तुमच्या हवालीं करूं; आह्मांस इंग्रजांची खोड मोडावयाची आहे, स्वतःचें राज्य वाढविण्याची इच्छा नाहीं.' ह्या ठरावाप्रमाणें मद्रास नबाबाच्या हवालीं करावयाचें होतें, सबब तें इंग्रजांस परत देण्याचा करार लाबूर्डोनें ह्यास करतां येत नव्हता. पण ह्या वेळेपासून लाबूर्डोने अगदींच स्वतंत्रतेनें वागून गव्हर्नरचे व कौन्सिलचे हुकूम तुच्छ मानूं लागला. मद्रासच्या संबंधानें तीन मार्ग शक्य कोटींतले होते, ह्मणजे तें ठाणें फ्रेंचांनीं स्वतः ताब्यांत घेणें, किंवा तेथचा किल्ला वगैरे पाडून तें जमीनदोस्त करणें, किंवा मोठा दंड घेऊन तें परत इंग्रजांच्या हवालीं करणें. लाबूर्डोनेचें ह्मणणें, 'युद्ध संपल्यावर जर

मद्रास पुनः परत द्यावें लागणार, तर आज तें ताब्यांत घेण्यापासून तरी फायदा कोणता ? मद्रासचा किल्ला जमीनदोस्त केला, तरी तो परत बांधण्यास इंग्रजांस विलंब व खर्च विशेष येणार नाहीं. तेव्हां मोठासा दंड घेऊन ठाणें सोडून द्यावें हा मार्ग बरा. ' ह्यावर डुप्लेचें ह्मणणें असें होतें, कीं ' आपणांस हिंदुस्थानांतून इंग्रजांस घालवून द्यावयाचें आहे.आजपर्यंत पांदिचरीचा बचाव करण्यास इंग्रजांच्या जाचामुळें किती खर्च व त्रास पडला आहे हें मशहूर आहेच.तर पांदिचरीनजीक मद्राससारखें इंग्रजांचें मुख्य ठाणें टिकूं दिल्यास फ्रेंचांचें डोकें कधींच वर यावयाचें नाहीं. शिवाय नबाबास दिलेल्या वचनाचें काय करावयाचें ? तें वचन पाळलें नाहीं तर तो एकदम मोठी फौज घेऊन पांदिचरीवर चाल करील त्याची वाट काय ? फ्रान्सांतून मदत येण्याची आशा बिलकुल नको. शिवाय दंड घेण्यांत तरी मोठासा फायदा काय ? नुसता पैसा घेऊन काय करावयाचें आहे ? बरें तो तरी इंग्रज एकदम कोठें देत आहेत ! आज ते नुसत्या हुंड्या देणार. ह्या हुंड्या त्यांनीं पुढें पाळल्या नाहींत तर त्यांचें काय घ्यावयाचें ? उद्यां त्यांचें मोठें आरमार इकडे येईल आणि त्यांस जय आला म्हणजे मागचे करार वगैरे ते कांहीं एक पाळणार नाहींत. तेव्हां मद्रास ताब्यांत घ्यावें हेंच उत्तम. ' असा डुप्लेचा संकल्प असून तो कौन्सिलासही पसंत पडला. त्याप्रमाणें त्यांनीं लाबूर्डोनेे ह्यास हुकूम पाठविले. डुप्लेनें तर त्याच्या नानातऱ्हा केल्या. विनवण्या केल्या; पायां पडणें झालें; स्वदेशाभिमानाच्या व स्वराज्याच्या गोष्टी झाल्या; पण लाबूर्डोनेचें आपलें एक. तो थोडा बहुत इंग्रजांस सामील. इंग्रजांकडून कांहीं थोडा लांच त्यास मिळावयाचा होता असें म्हणतात. अशा क्षुल्लक स्वार्थासाठीं राष्ट्रहिताचा घात करण्यास तो सिद्ध झाला. तो कौन्सिलचे हुकूम पाळीना, तेव्हां त्यास बाजूस ठेवून आपल्या हुकुमांची बजावणी करण्याकरितां डुप्लेनें आपल्या तर्फेचे सहा एजंट मद्रासेस पाठविले. त्यांस लाबूर्डोनेनें फौजेच्या व आरमाराच्या जोरावर कैद केलें, आणि साडेचार लाख रुपये दंड घेऊन मद्रास परत देण्याचा करार इंग्रजांस लिहून दिला. अशा बिकट प्रसंगीं काय करावें हें डुप्ले ह्यास सुचेना. फ्रान्सला लिहून हुकूम आणण्यास वेळ नाहीं. लष्करी बळ

सर्व लाबूर्डोनेच्या हातांत. ह्याप्रमाणें उभयतांची फारखत झाल्यावर लाबूर्डोने-सही पुढें काय करावें तें सुचेना. कारण कांहीं झालें तरी एकदां मद्रास सोडून गेल्यावर पुढील कारभार डुप्लेच्याच हातांत येणार. तेव्हां तोही वांकड्या रस्त्यानें डुप्लेशीं पुढील वाटाघाट करूं लागला. पण डुप्लेनें पुढें त्याशीं सामाच्या गोष्टी अजीबात टाकून दिल्या. अशा रीतीनें थोडे दिवस गेल्यावर ता. १३ ऑक्टोबर रोजीं मद्रासेस एकाएकीं समुद्रांत भयंकर वादळ झालें, तें दोन तीन दिवस तसेंच जोरानें चालू होतें. त्यांत फ्रेंचांचीं बहुतेक गलबतें जायां झालीं. तेव्हां लाबूर्डोनेचा नाइलाज होऊन तो आपल्या मोडक्या तोडक्या गलबतांसह पांदिचरीस आला. तेथें डुप्लेची व त्याची प्रत्यक्ष भेट तर झाली. नाहींच, पण इतरांचे मार्फत उभयतांचीं बरींच बोलणीं होऊन, लाबूर्डोने हिंदुस्थान सोडून निघाला, तो दिसेंबर ता. १० स. १७४६ रोजीं पोर्ट लुइ येथें आला. तेथें त्याच्या जागेवर दुसऱ्या इसमाची नेमणूक होऊन तो कामही करीत होता. म्हणून लाबूर्डोने आपली खरी हकीकत सरकारांत कळविण्याच्या उद्देशानें स्वदेशास येण्यास निघाला असतां, आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्यावर इंग्रज जहाजांनीं त्यास पकडून कैद केलें व इंग्लंडास नेलें. तेथें इंग्रज कंपनीनें व सरकारानें त्याचे उपकार जाणून चांगला सत्कार केला; व कांहीं दिवसांनीं फ्रान्सांत पाठवून दिलें.

फ्रान्स येथें त्यास सर्व लोक प्रतिकूळ होते. शत्रूस सामील असल्याबद्दल व सरकारचे हुकूम अमान्य केल्याबद्दल त्यास तीन वर्षांची शिक्षा होऊन तो बॅस्टिलच्या तुरुंगांत पडला. तेथें त्याची व बायकामुलांची सुद्धां गांठ पडत नसे, कीं लिहिण्यावाचण्यास पुस्तक किंवा शाई मिळत नसे. तथापि तेथें असतां भाताच्या पेजेंत हातरुमाल बुडवून त्यावर काफीच्या रंगानें, तांब्याच्या नाण्याची लेखणी करून त्यानें आपलें आत्मचरित्र लिहिलें. तें पुढें प्रसिद्ध झाल्यावर डुप्ले यास बरेंच बाधक झालें. तुरुंगांतून सुटल्यावर लवकरच स. १७५३त सेप्टेंबरच्या. ९ तारखेस लाबूर्डोने मरण पावला. अशा प्रकारचें ह्या एका नामांकित फ्रेंच सरदाराचें चरित्र आहे.

**४. सेंट टॉमेची लढाई ( स. १७४६ ).**--लाबूर्डोने निघून गेल्यावर मद्रासचा बंदोबस्त डुप्लेनें चालविला. मद्रास इंग्रजांस परत द्यावयाचें नाहींच, नबाबास द्यावेंच लागल्यास किल्ला व बंदोबस्त नाहींसा करून द्यावयाचें, असा त्याचा विचार होता. फ्रान्सहूनही त्यास तसा हुकूम आला होता. लाबूर्डोनेनें इंग्रजांस दिलेलें वचन पार पाडण्यास मोठी अडचण कायती ही होती. मद्रास फ्रेंचांचे हातीं पडून महिना होऊन गेला, तरी तें शहर डुप्ले आपल्या हवालीं करीत नाहीं हें नबाब अन्वरुद्दीन ह्यास रुचलें नाहीं. डुप्ले व लाबूर्डोने यांजमधील तंट्याचें त्यास काय ? हा तंटा उगाच आपणास फसविण्यासाठीं फ्रेंच लोक दाखवीत आहेत. असे संशय नबाबाचे मनांत आले ते योग्य होते. एक एक दिवस जाऊं लागला तसा नबाब चिडून गेला. हे फ्रेंच लोक आहेत तरी कोण ? हे घटकेंत आमच्या आज्ञेंत वागतात; व घटकेंत आमच्या विरुद्ध वागण्यासही चुकत नाहींत. ह्या फ्रेंचांची एक वार खोडच मोडली पाहिजे. त्यांजपाशीं असलेली फौज शेंकड्यांनीं मोजावयाची. त्यांचा एक, तर आपले वीस, इतकी फौज आपणांस त्यांजविरुद्ध आणितां येईल. त्यांची सत्ता समुद्रकांठावरील दोन तीन ठिकाणांवर आहे तर आपण सर्व कर्नाटकचे मालक आहों. सबब आमच्याशीं केलेले करार पाळण्यास त्यांस एकवार शिकविलें पाहिजे. अशा प्रकारचे नबाबाचे विचार चालून, लाबूर्डोनेनें मद्रास डुप्लेच्या हवालीं केलें, त्यापूर्वीच लहानशी फौज नबाबानें मद्रासेच्या बाजूस पाठविली होती, तिला मदत करण्यास आणखी दहा हजार फौज त्यानें पाठवून दिली. नबाबाचा वडील मुलगा माफूझखान हा त्या फौजेवर मुख्य होता.

लाबूर्डोने निघून गेल्याबरोबर लगेच हा प्रसंग डुप्लेवर आला. आतां करावयाचें काय ? इंग्रजांपासून दंड घेऊन मद्रास त्यांचे हवालीं करावयाचें असा करार लाबूर्डोनेनें केलेला, इकडे नबाब तें शहर घेण्यास तयार होऊन आलेला; अशा स्थितींत नबाबाचे हवालीं तें शहर केल्यास व तेथची तटबंदी वगैरे पाडून न टाकिल्यास नबाबाच्या हातीं आयतेंच आपल्या विरुद्ध शस्त्र दिल्यासारखें होणार. नबाबाची फौज समोर असतां तिच्या देखत किल्ले

वगैरे पाडण्याचें काम केल्यास तें त्यास कसें रुचेल ? अशा संकटसमयीं डुप्लेचा शहाणपणा व निश्चय विशेष दिसून आला. पहिलें काम नबाबाचें निवारण. प्रथम गोडीगुलाबीनें भागेल तर काम उरकून घ्यावें, नाहींतर त्याजबरोबर दोन हात करावयाचे, मग काय होईल तें होवो, असा डुप्लेचा निश्चय ठरला. तदनुसार त्यानें मद्रास येथील आपल्या अधिकाऱ्यास हुकूम पाठविला, कीं नबाबाशीं कोणतीही आगळीक मुद्दाम करूं नये, तथापि प्रसंग आल्यास बचावाची तजवीज ठेवावी. मद्रास येथें फ्रेंचांच सहाशेंपर्यंत युरोपियन व तितकेच एतद्देशीय लोक युरोपियन तऱ्हेनें कवाईत शिकविलेले होते. ते सर्व किल्लयांत घेऊन फ्रेंच अधिकाऱ्यानें बचावाची तयारी केली. इकडे माफूझखानानें वेढा घालून त्यांचा कोंडमारा केला, व आंतील लोकांस पाणी मिळण्याचा झरा होता तो त्यानें काबीज केल्यामुळें फ्रेंचांचा दम निघेना, तेव्हां मुसलमानी फौजेवर एकदम छापा घालून फळी मोडून निघून गेल्याशिवाय फ्रेंचांस मार्ग राहिला नाहीं. ता. २ नोवंबर स. १७४६ रोजीं फ्रेंचांचे चारशें लोक दोन हलक्या तोफा घेऊन शत्रूवर हल्ला करून झरा ताब्यांत घेण्यास सकाळींच निघाले. हे लोक थोडेच आहेत असें पाहून त्यांजमध्यें घोडे घालून त्यांस चिरडून टाकण्याच्या विचारानें मुसलमानी फौज तयार झाली. त्यांनीं फ्रेंचांच्या तोफा पाहिल्या नव्हत्या. जसे मुसलमान तोफांच्या टप्प्यांत आले, तशा फ्रेंचांनीं त्यांजवर तोफा चालू केल्या. पहिल्या माराबरोबर मुसलमान स्वार लगट करून पुढें आले. पण पंधरा मिनिटेंपावेतों तोफांचा सारखा मारा चालल्यामुळें ते घाबरून गेले. आश्चर्यानें व भीतीनें चकित होऊन त्यांस भान राहिलें नाहीं. ते घाबरून पळाले; त्यांचें कांहीं सामान वगैरे तसेंच मागें राहिलें तें फ्रेंचांस मिळालें. मुसलमानांचे एकंदर ७० लोक पडले.

इकडे डुप्ले स्वस्थ बसला नव्हता. नबाबाची फौज मद्रासेवर आलेली पाहून उलट दिशेनें त्यास तंबी देण्याकरितां पराडिस ( Paradis ) नांवाच्या एका हुशार व शूर फ्रेंच अंमलदाराच्या हाताखालीं सुमारें एक हजार लोक देऊन

त्यांस त्यानें पांदिचरीच्या बाजूनें नबाबाच्या मुलखांतून मद्रासेकडे पाठविलें. त्यास अडविण्याकरितां माफूझखान सेंट टॉमे येथें त्यांजवर चालून आला. मद्रासेंतील फ्रेंच फौजेची व पराडिसची गांठ पडूं द्यावयाची नाहीं हा त्याचा हेतु होता. सेंट टॉमे येथे त्याचा तळ असून त्याच्या व पराडिसच्यामध्यें अडियार नांवाची नदी होती. ता. ४ नोव्हेंबर स. १७४६ रोजीं परांडिस ह्यास ती नदी ओलांडून अलीकडे यावयाचें होतें. नदीच्या उत्तर तीरावर मुसलमानांची दहा हजार फौज असून तिच्या संरक्षणार्थ तोफखाना होता. दक्षिण-तीरावर पराडीस असून त्याजवळ तोफा वगैरे नव्हत्या. परंतु तो स्वतः शूर व तडफीचा योद्धा असल्यामुळें, मुसलमानांची फळी फोडून निघून जाण्याचा त्यानें निश्चय केला. अशा निश्चयानें शत्रूंच्या तोफांसमोर तो फौजेसह नदींत शिरला; व पलीकडच्या तीरापाशीं जाऊन त्यानें बंदुकांची एक फैरण मुसलमानांवर झाडिली. त्याबरोबर ते घाबरून सेंट टॉमे शहरांत शिरले व तेथील आडोशाच्या आश्रयानें लढण्यास सिद्ध झाले. पराडीस त्यांच्या मागोमाग आला व त्यानें गल्लींत जमा झालेल्या मुसलमान फौजेवर बंदुकांची फैरण सुरू केली, त्या बरोबर पुनरपि ते पळूं लागले. पण गर्दीमुळे त्यांस वाट मिळेना. त्यांचे बरेच लोक पडल्यावर ते निघून पळून जाणार इतक्यांत मद्रासची फ्रेंच फौज वरील चकमकीची वार्ता ऐकून, मागून त्यांजवर चाल करून आली. त्यामुळें सांपळ्यांत सांपडल्यासारखे होऊन त्यांचा फन्ना उडाला. माफूझखान तर आरंभींच पळून गेला होता. मागून ही त्याची फौज वाट फुटेल तिकडे सैरावैरां पळत आर्काटकडे गेली. ह्याप्रमाणें पराडीस व मद्रासची फौज यांची गांठ पडून फ्रेंचांस मोठा जय मिळाला आणि मोठ्या संकटांतून त्यांचा बचाव झाला. ह्या लढाईस सेंट टॉमेची लढाई म्हणतात. ऐतिहासिक दृष्ट्या ह्या लढाईचें महत्त्व मोठें आहे. कारण युद्धाची शिस्त व कवाईत शिकलेले युरोपियन व एतद्देशीय लोक ह्यांचा बिनकवाइती देशी फौजेशीं हिंदुस्थानच्या भूमीवर झालेला पहिला उघड सामना सेंट टॉमेचा होय. ह्या सामन्यांतील परिणामावरून, एतदेशीयांच्या मानानें आपली करामत केवढी आहे हें व्यापारी अस-

केल्या युरोपियन लोकांस चांगलें दिसून आलें, आणि हिंदुस्थानांत आपलें राज्य स्थापितां येईल ह्याची पहिली दृश्य कल्पना त्यांच्या डोक्यांत स्पष्ट प्रगट झाली. एतद्देशीय राजे कितीही मोठे असले, व त्यांची फौज कितीही पुष्कळ असली, तरी आपलें सामर्थ्य त्याहून अधिक आहे हें त्यांस समजून आलें. हा वेळ पावेतों एतद्देशीय दरबारांशीं सख्य ठेवण्यासाठीं फ्रेंच अधिकारी फार आतुर असत. मार्टिन, डुमास, व डुप्ले ह्यांनीं पराकाष्ठा करून येथील राजांचा स्नेह संपादिला होता. पण मद्रासेस कुमक पाठविण्याच्या वरील क्षुल्लक प्रसंगानें हा सर्व प्रकार तात्काल बदलून गेला. नबाबाच्या पायाशीं लोटांगणें घालण्याची पाळी येत असे, ती नाहींशी होऊन उलट इतउत्तर तो नबाबच डुप्लेच्या मुठींत आला. ह्या वेळेपासून युरोपियन लोकांच्या मसलती बदलल्या; इतरांबरोबर युरोपियन लोकही येथील राज्यपदप्राप्तीच्या झगड्यांत शिरूं लागले; आणि अनेक गोष्टींचा फायदा त्यांच्याच पक्षास असल्यामुळें हिंदुस्थानांत युरोपियन राज्यस्थापना संभवनीय झाली. युरोपियनांपैकीं फ्रेंच किंवा इंग्रज येथें कोण प्रमुख होणार हा प्रश्न त्या दोन राष्ट्रांच्या शक्तीवर अवलंबून होता. पण आतां येथें राज्य युरोपियनांचें होणार हें भविष्य निर्विवाद सिद्ध झालें. ह्या भावनेचें श्रेय इंग्रजांस नसून फ्रेंचांस आहे.

**५. युद्धाचा शेवट.**—ह्या विजयानें डुप्लेच्या अडचणी नाहींशा झाल्या, आणि लाबूर्डोनेनें केलेल्या गोंधळांतून त्याची सुटका झाली. नबाबानें आपण होऊन फ्रेंचांशीं युद्धप्रसंग केल्यामुळें, मद्रास त्याच्या हवालीं करण्याची फ्रेंचांची फरज नाहींशी झाली. तें ठिकाण परत इंग्रजांच्या हवालीं करण्याचा लाबूर्डोनेचा करार होता, पण त्यास डुप्लेची व कौन्सिलची संमति नसल्यामुळें, तो करार पुरा करण्याचीही आवश्यकता राहिली नाहीं. तेव्हां पराडिस ह्यासच मद्रासचा लष्करी गव्हर्नर नेमून त्याजकरवीं, 'तें ठिकाण फ्रेंच राज्यांत सामील करण्यांत आलें आहे.' असा डुप्लेनें जाहीरनामा काढविला; आणि बहुतेक इंग्रजांस युद्धांतले कैदी समजून पांदिचरीस नेलें. ह्या वेळीं कांहीं इंग्रज पळून सेंट डेव्हिड किल्ल्यावर गेले, त्यांत रॉबर्ट क्लाइव्ह होता.

सेंट् डेव्हिड किल्ला पांदिचरीच्या दक्षिणेस सुमारें १२ मैलांवर आहे. दक्षिणेस नजीकच दोन मैलांवर कडलूर शहर आहे. ही सर्व जागा स. १६९१त इंग्रजांनीं प्रथम विकत घेऊन तेथें वसाहत केली, व हळूहळू तेथचा बंदोबस्त केला. मद्रास पडल्यावर इंग्रजांनीं आपलें मुख्य ठाणें फोर्ट सेंट डेव्हिड येथें नेलें; व हरप्रयत्न करून त्याचा बचाव करण्याचा निश्चय केला. एवढी फोर्ट सेंट डेव्हिडची जागा इंग्रजांपासून घेतली, कीं त्यांचा त्या बाजूस पूर्ण उठाव झाला, असें डुप्ले यास वाटून, ती घेण्याच्या उद्योगास तो लागला. त्यासाठीं पराडिस ह्यास त्यानें पांदिचरीस बोलाविलें. तो डिसेंबर महिन्यांत तीनशें लोकांनिशीं बराच मोठा खजिना घेऊन पांदिचरीस जात असतां, माफूझखानानें पाळत राखून त्याजवर वाटेंत हल्ला केला. पण त्यांतूनही आपला बचाव करून पराडिस पांदिचरीस आला. तेथें फोर्ट सेंट डेव्हिडवर स्वारी करण्याची सर्व सिद्धता झाली. ह्या स्वारीवर पराडिस ह्यासच पाठविण्याचा डुप्लेचा आग्रह होता. पण जनरल ब्यूरि नांवाचा पांदिचरीस मुख्य सेनापति होता, त्यास वगळून पराडीस ह्यास सर्व काम सोंपण्याचें कौन्सिलनें कबूल केलें नाहीं. तेव्हां ब्यूरीसच त्या कामावर पाठवावें लागलें. तो पांदिचरी सोडून इंग्रजांच्या किल्ल्यानजीक तळ देऊन विश्रांति घेत राहिला. इकडे इंग्रजांपाशीं ३०० युरोपियन लोक असून एक हजार एतद्देशीय लोक त्यांनीं कवाईत शिकवून तयार केलेले होते. शिवाय त्यांनीं नबाबाशीं स्नेह संपादून त्याची मदत मागितली, व उभयतांनीं मिळून फ्रेंचांवर एकदम दोहोंकडून हल्ला करण्याचा विचार ठरविला. ह्या प्रसंगीं फ्रेंचांकडे पराडिस हा मुख्य असता, तर त्यास खचित जय मिळाला असता. परंतु ब्यूरी हा वृद्ध व अकुशल होता; शत्रूच्या घरांत तो बेफिकीर राहिला. त्याजवर नबाबाच्या फौजेनें येऊन एकाएकीं हल्ला केला, तेव्हां फ्रेंचांस जीव घेऊन पळून जातां पुरें झालें, आणि त्यांचें बरेंच सामानसुमान इंग्रजांच्या हातांत पडलें. तथापि ह्या लढाईंत नबाबाचे दोन हजारांवर लोक पडले. ह्यापुढें दुसरीकडून नबाबास शह देण्याचा विचार चालू करून, डुप्लेनें

आंतून तहाची खटपटही चालविली. ती सिद्धीस जाऊन नवाबाच्या तर्फेनें माफूझखानानें फ्रेंचांशीं तह करून इंग्रजांचा पक्ष सोडण्याचें कबूल केलें. हें झाल्यावर डुप्लेनें पराडिस ह्यास कडलूर व फोर्ट सेंट डेव्हिड काबीज करण्यास पाठविलें ( मार्च स. १७४७ ). परंतु मध्यंतरीं इंग्रजांस युरोपाहून मोठी मदत येऊन पोंचली. मेजर लॉरेन्स हा इंग्रजांचा मुख्य सेनापति होता. ही मदत असल्यामुळें डुप्ले यास पांदिचरी येथें मोठी धास्ती पडली. पांदिचरी-वर हल्ला येईल ह्मणून पराडिस ह्यास त्यानें परत बोलाविलें. शिवाय डुप्लेनें बुर्बों व सेंट लुइ येथून मदत मागितली. पांदिचरीचें संरक्षण कसें करावें हा मोठा प्रश्न होता. स. १७४८ त ऍड्मिरल बोस्कॅवेन ( Boscawen ) च्या हाताखालीं मद्रास व पांदिचरी काबीज करण्याकरितां इंग्रजांचें आणखी एक मोठें आरमार आलें. इंग्रजांनीं पांदिचरीस वेढा घातला, पण त्यांत त्यांचा एकसारखा मोड होत गेला. ‘ लढाईच्या गर्दींत पांदिचरीच्या किल्यांतील दारूच्या सांठ्यास आग लागून तो उडाला, त्यांत पराडिस ठार झाला. हें फ्रेंचांचें मोठेंच नुकसान झालें तथापि डुप्लेनें धूर्तता करून इंग्रजांचा पूर्ण पराजय करून त्यांस वेढा उठवून परत फिरण्यास भाग पाडिलें. ( ऑक्टोबर २७. १७४८ ). पुढें नवीन तयारी करून दोनही राष्ट्रांचे लोक निकरावर येऊन एकमेकांचा प्राण घेण्यास तयार झाले. इतक्यांत युरोपांत एक्स्लाचापेल येथें तह होऊन इंग्रज फ्रेंचांचें युद्ध बंद झाल्याचे हुकूम आले, ( जानेवारी स. १७४९ ). ह्या तहानें एकमेकांनीं जिंकिलेले प्रदेश ज्याचे त्यास परत द्यावे असें ठरल्यामुळें, मद्रास शहर इंग्रजांस परत देणें डुप्ले यास भाग पडलें. ही गोष्ट डुप्ले यास फारच वाईट वाटली. इतके दिवसांचीं खटपट फुकट जाऊन, शिवाय पैसा खर्चून ज्यास्त मजबुदी केलेलें मद्रासचें ठाणें हातांतून जावें व त्या योगें इंग्रजांस हिंदुस्थानांतून हांकून देण्याचा मनोरथ भंग व्हावा, त्यासारखें मरणप्राय दुःख त्यास दुसरें कोणतें होणार ? पांदिचरीचें स्वंरक्षण करण्यांत डुप्लेनें जी हुशारी व योग्यता दाखविली ती अप्रतिम होती.

६. **निष्कर्ष.**—ह्याप्रमाणें पांच वर्षें झगडा होऊन, पुनः येरे माझ्या मागल्या, अशांतता प्रकार झाला. फरक एवढाच कीं युद्धाचे पूर्वी इंग्रज-

फ्रेंचांचें तीव्र वैर नव्हतें तें मद्रासच्या प्रकारानें व पांदिचरी येथील हल्ल्यानें अतिशय वाढलें. दोघांपैकीं एकाचा समूळ नाश झाल्याशिवाय हें वैर संपणारें नव्हतें. सेंट टॉमेच्या लढाईनें डुप्लेच्या मनांत भावी विजयाचीं दिव्य स्वप्नें पडूं लागलीं. वरील युद्धांत दोनही राष्ट्रांनीं लष्कराची संख्या शक्तीबाहेर वाढविल्यानें शांततेच्या वेळीं एवढा खर्च सोसण्यास त्यांस सामर्थ्य नव्हतें व त्यांस तसा हुकूमही नव्हता. अर्थात् त्या लष्करास पोटापुरतें कांहीं तरी काम पाहणें भाग पडूं लागलें. आजपावेतों त्यांच्या हातांत तराजू मात्र होता, तो सोडून त्यांनीं हातांत तलवार घेतली, त्यामुळें एतद्देशीय राजे त्यांच्या मदतीची अपेक्षा बाळगून विनवण्या करूं लागले. एवंच इंग्रज व फ्रेंच हे ताबेदारांच्या पायरीवरून वर जाऊन एतद्देशीय राजांच्या बरोबरीस आले. मात्र विलायतेंतील ई० इं० कं०स हा प्रकार व हे सर्व परिणाम समजून येण्यास बराच अवधि लागला. त्यांस वाटलें, कीं आतां तह झाल्यामुळें उभयतांचा पूर्वीचा व्यापाराचा धंदा पूर्ववत चालून त्यांजमध्यें स्नेहभाव उत्पन्न होईल. पण हा समज चुकीचा होता. राज्यस्थापनेची जी कल्पना त्यांच्या मनांत बाणली होती, ती त्यांस स्वस्थ बसूं देणार नव्हती.

वरील युद्धांत डुप्लेच्या कर्तबगारीविषयीं एतद्देशीयांच्या मनांत चांगलाच ग्रह उत्पन्न झाला; आणि त्याचा फायदा घेऊन हिंदुस्थानांत फ्रेंच राज्य स्थापण्याचे उद्योग त्यानें सुरू केले. ते फसले, त्यास डुप्लेचा इलाज नाहीं. हिंदुस्थानापासून फ्रान्स पावेतोंचा फ्रेंच गलबतांच्या संचाराचा मार्ग इंग्रजांप्रमाणें निर्भय नव्हता. ह्मणून पाया नीट नसल्यामुळें ही राज्याची इमारत तेव्हांच ढांसळून पडेल हें डुप्लेच्या लक्षांत आलें नाहीं, आणि तसाच प्रकार पुढें झाला. लाबूर्डोनेनें डुप्लेचा हुकूम मान्य केला असता, तरी इंग्रज आरमाराशीं फ्रेंचांस शेवटपर्यंत टिकाव धरतां आला नसता.

राष्ट्रास आरमाराचा आधार केवढा आहे, ही गोष्ट लोकांस कळून येण्यास पुढें पुष्कळ काळ लागला. मद्राससारखें एकादें ठिकाण हस्तगत झालें ह्मणून त्याचा फारसा फायदा नव्हता. आरमाराशिवाय खुषकीच्या फौजेस पाठबळ

नाहीं; आणि युद्धाचा मार्ग (line of communications) मूळबिंदूपासून लढाईच्या अखेर टोंकापर्यंत एक सारखा आपल्या ताब्यांत असला पाहिजे, ही गोष्ट डुप्लेच्या लक्षांत राहिली नाहीं, ही त्याची मोठी चूक होय. वास्तविक हिंदुस्थानांतील सत्तेचीं पाळें युरोपांत चांगलीं मजबूद रोवलेलीं पाहिजेत. युरोपांतील मूळपाया जरा ढिला पडला, कीं इकडचें राज्य एकदम ढांसळून पडलें म्हणून समजावें, हा त्यावरील युद्धाचा निष्कर्ष ऐतिहासिक अभ्यासानें मनावर ठसल्याशिवाय राहत नाहीं. युरोपियन राष्ट्रांचीं आरमारें किती योग्यतेचीं होतीं, आणि कोणाची शक्ति किती होती, हें मुळीं डुप्लेस ठाऊक नव्हतें. युरोपांतील युद्धांत फ्रेंचांचें आरमार बहुतेक नाश पावून इंग्रजांचें आरमार पुष्कळच वृद्धिंगत झालें होतें. त्यांत फ्रान्सनें हॉलंडचा पाडाव केला खरा, पण तेणेंकरून इंग्लंडचा एक शत्रु अजीवात कमी झाला. तसेंच इंग्लंडनें फ्रान्सचें आरमार व त्याबरोबर फ्रान्सचा सर्व व्यापार ह्यांचा फडशा उडविला, तेव्हां फ्रेंच कंपनी भिकेस लागली. पुढें फ्रेंच सरकारानें कंपनीची व्यवस्था सुधारण्याकरितां नवीन कामगार नेमिले, तेणेंकरून ज्यास्त गोंधळ मात्र झाला. फेंच कंपनी कर्जबाजारी व दरिद्री झाली होती. फेंच राष्ट्राचीही जवळजवळ तीच अवस्था होती. इंग्रज राष्ट्र व्यापारानें सधन झालें असून त्यांचें आरमार अत्यंत प्रबल व तयार होतें. इंग्रज ई. इं. कंपनी आपला कारभार अगदीं स्वतंत्रतेनें करून सरकारास जुमानीत नव्हती. उलट सरकारच पुष्कळ अंशीं तिच्यावर अवलंबून होतें. फ्रेंच कंपनीचा प्रकार ह्याच्या अगदीं उलट होता. फ्रेंच लोक बुद्धिमान व शूर असूनही सरकारच्या जुलमाखालीं दडपून गेल्यामुळें, हीन दशेस येत चालले होते. इंग्रज लोकांचा कारभार, एखाद्या जंगलांत स्वेच्छेनें फोंफावत जाणाऱ्या जोमदार वृक्षाप्रमाणें सदृढ व प्रबळ होत चालला होता. स्वतंत्र संस्थांच्या योगानें राष्ट्राचा भाग्योदय कसा होतो, आणि उलट पक्षीं, लोकांच्या संस्था सरकारानें जुलमानें दाबून टाकिल्यानें, राष्ट्राचा ऱ्हास कसा होत जातो, हें ह्या वेळच्या इंग्रज-फ्रेंचांच्या इतिहासावरून चांगलें व्यक्त होतें.

हिंदुस्थानांत डुप्लेस हा प्रकार समजला नाहीं ह्यांत नवल नाहीं. इतरांसही तो त्या वेळीं चांगला समजला नव्हता. म्हणून डुप्लेला वाटलें, कीं थोडीशी कवाइती फौज ठेविली, आणि एतद्देशीय दरबारांवर आपला बोज ठेविला कीं राज्यस्थापना करितां येईल. ही त्याची चुकीची समजूत त्यास अतिशय जाचक झाली. आपण एवढें स्वदेशाभिमानाचें व स्वदेशहिताचें काम करीत असतां, लोकांस आपणाबद्दल सहानुभूति किंवा आदर वाटूं नये, ह्याचें डुप्लेस मोठें आश्चर्य वाटे. पण खरा प्रकार असा नव्हता. फ्रेंचांची सांपत्तिक स्थिति अतिशय निकृष्ट झाली होती. तेव्हां फ्रेंच सरकाराकडून डुप्लेस साह्य मिळालें नाहीं. पण आरंभाच्या विजयानें डुप्ले व इतर फ्रेंच गृहस्थ इतके दिपून गेले कीं, खरा प्रकार कोणाचेच ध्यानांत राहिला नाहीं. पुढील हकीकतींत हे विचार ध्यानांत ठेविले पाहिजेत.

रा. चिंतामण विनायक वैद्य आपल्या रामायणावरील टीकात्मक ग्रंथांत प्रतिपादन करितात, कीं सुधारणेंत कमी ज्यास्ती सरसावलेले दोन जातींचे लोक जेव्हां एकत्र येतात, तेव्हां कमी सुधारलेल्या लोकांत असलेली फूट व शस्त्रास्त्रांबद्दलचें अज्ञान हींच त्यांच्या नाशास कारण होतात, अशी आधुनिक इतिहासही साक्ष देत आहे. राम रावणांच्यामधील संग्राम भयंकर खरा, पण धनुर्विद्येंत रामचंद्र जर विशेष निष्णात नसते, व बिभीषणानें जर घरभेदीपणा केला नसता, तर रावणाचें राज्य लयास गेलें असत कीं नाहीं, ह्याचा शकाच आहे. रावणानें बिभीषणाच्या कृत्यांची मीमांसा खालील पद्यांत केली आहे, ती यथार्थ आहे.

नाग्निर्नान्यानि शस्त्राणि न नः पाशा भयावहाः ।
घोराः स्वार्थप्रयुक्तास्तु ज्ञातयो नो भयावहाः ॥

हीच मीमांसा एतद्देशीय रजवाड्यांसंबंधानें आपल्या प्रस्तुत विषयास तंतोतंत लागू पडणारी असून, ( १ ) गृहभेद व ( २ ) सुधारलेल्या लष्करी तयारीचें अज्ञान, हीं आपल्या राज्यनाशाचीं दोन मुख्य कारणें होत, हें मागील व पुढें येणाऱ्या हकीकतींवरून व्यक्त होईल. सेंट् टॉमेच्या लढाईनें हीच गोष्ट फ्रेंचांच्या निदर्शनास आली.

---

# प्रकरण सतरावें.

## कर्नाटकांतील दुसरें युद्ध.

स. १७४९–१७५४.



**१. एतद्देशीय कलहांत इंग्रजांची आघाडी.**—दोन राष्ट्रांमध्यें अगर पक्षांमध्यें युद्ध अगर तंटा होतो, तेव्हां त्यास आरंभीं कांहीं स्वतंत्र संज्ञा नसते. अमुक एक युद्ध करावयाचें व तें अमुक तऱ्हेनें अमुक मुदतीत संपवावयाचें, असा अगोदर निर्धार करून कोणी युद्ध करीत नाहीं. युद्ध होऊन गेल्यावर लेखक त्याची ऐतिहासिक संगति जुळवितात. ती संगति जुळविण्यासाठीं इतिहासकार निरनिराळे कालखंड ठरवितात आणि त्यांस पहिलें युद्ध, दुसरें युद्ध, अशीं निरनिराळीं नांवें स्मरणार्थ देतात. तसाच प्रकार ह्या कर्नाटकांतील युद्धांचा आहे. खरें म्हटलें म्हणजे सन १७४४त इंग्रजफ्रेंचांनीं शस्त्र उपसलें तें, फ्रान्सचा कायमचा पाडाव होऊन स. १७६३त पारिसचा तह होईपर्यंत थोड्याबहुत अंशानें चालूच होतें. पण त्यांत दोनदां थोडथोडा खळ पडला, एकदां स. १७४८त व पुनः सन १७५४त. येणेंप्रमाणें ह्या कर्नाटकांतील युद्धाचे तीन कालखंड पडतात. पहिला स. १७४४–४८ पर्यंत; दुसरा स. १७४९ पासून स. १७५४ पर्यंत, आणि तिसरा स. १७५६ पासून १७६३ पर्यंत. ह्या तीन कालखंडांस कर्नाटकांतील पहिलें, दुसरें, व तिसरें युद्ध अशीं सोपीं नांवे देणें सयुक्तिक

दिसतें. पहिल्या व तिसऱ्या कालखंडांत इंग्रज व फ्रेंच राष्ट्रांचीं युरोपांतही युद्धें चालू होतीं. दुसऱ्या खंडांतील झगडा केवळ हिंदुस्थानांत चालू होता, युरोपांत युद्ध नव्हतें; आणि इकडे चाललेला झगडा युरोपांतील राष्ट्रांस आवडला नाहीं. म्हणून कोणी कोणी लेखक ह्या दुसऱ्यास युद्ध हें नांव देतच नाहींत; आणि कर्नाटकांतील पहिलें युद्ध स. १७४४–४८ पर्यंतचें व दुसरें युद्ध स. १७५६ पासून १७६३ पर्यंतचें, अशी व्यवस्था करून दुसऱ्या झगड्यास इंग्रज व फ्रेंच कंपन्यांचा आपसांतील तंटा असें नांव देतात. एतद्देशीय वाचकांस असा भेद करण्याचें कारण नाहीं. म्हणून तीनही कालखंडांस कर्नाटकांतील पहिलें, दुसरें व तिसरें युद्ध अशीं नांवें येथें दिलीं आहेत.

पहिल्या युद्धांत इंग्रजफ्रेंचांचा लष्करी खर्च पुष्कळ झाला, तो, तह झाल्यावर, सोसण्याचें त्यांस सामर्थ्य नसल्यामुळें, परभारें हा वाढता लष्करी खर्च भागण्याची कांहीं तोड त्यांस पाहिजे होती. आजूबाजूच्या एतद्देशीय राजांचे झगडे चालू असून, त्यांजकडून मदतीच्या मागण्या जेव्हां ह्या युरोपियन व्यापाऱ्यांकडे येऊं लागल्या, तेव्हां त्या त्यांच्या पथ्यावरच पडल्या. इकडचा खर्च कमी करावा असें युरोपांतून त्यांस वरचेवर लिहून येत असल्यामुळें, एतद्देशीयांच्या मदतीच्या मागण्या कबूल करणें आपणांस प्राप्त झालें आहे, असें डुप्लेनें आपल्या सरकारास लिहून कळविलें. तथापि एतद्देशीयांच्या कारभारांत उघडपणें हात घालण्याचा क्रम प्रथमतः इंग्रजांनींच सुरू केला तो असा.

तंजावरास राजा प्रतापसिंग राज्य करीत असून त्याचा भाऊ शाहूजी भटकत होता, हा प्रकार मागें आलाच आहे. प्रतापसिंग लोकांस आवडत होता. शाहूजी कोणासही प्रिय नव्हता. दहा वर्षें होऊन गेलीं, तथापि शाहूजीनें आपला प्रयत्न सोडिला नाहीं. स्वतःच्या फायद्यासाठीं आपलें व राज्याचें पाहिजे तें नुकसान करण्यास तो तयार झाला. मागील प्रकरणांत सांगितलेले इंग्रज फ्रेंचांचे युद्धप्रसंग पाहून, त्यांची मदत आपणास मिळेल तर, आपलें काम होईल, अशा समजुतीनें त्यानें स. १७४९त इंग्रजांची

मदत मागितली. कारण अगोदरपासूनच प्रतापसिंगाचें फ्रेंचांशीं सख्य होतें. शाहूजीनें इंग्रजांस त्यांच्या मदतीबद्दल देविकोटा शहर व बाजूचा प्रदेश व युद्धाचा खर्च देऊं केला. या ठरावानुसार स. १७४९च्या एप्रिलांत ४३० युरोपियन व एक हजार एतद्देशीय इतकी इंग्रजांची फौज शाहूजीच्या मदतीस आली. कॅप्टिन कोप हा त्या फौजेवर मुख्य होता. शिवाय कांहीं आरमारही देविकोटा घेण्याकरितां आलें होतें. कॅप्टिन कोप तंजावर जवळ आला, तेव्हां प्रतापसिंगाची फौज त्याजवर चालून गेली. त्यापुढें आपला टिकाव लागावयाचा नाहीं हें पाहून कॅप्टिन कोप देविकोटाकडे परत गेला. तेथें त्यास इंग्रज आरमार दिसलें नाहीं, ह्मणून सेंट डेव्हिडच्या किल्ल्यावर तो निघून गेला. वास्तविक इंग्रजांचा हेतु देविकोटा मिळविण्याचा असून, शाहूजीची त्यांस विशेष परवा नव्हती. पुढें देविकोटा घेण्याकरितां मेजर लॉरेन्सच्या हाताखालीं इंग्रजांनीं दुसरी फौज पाठविली. प्रतापसिंगानें कांहीं वेळपर्यंत तेथचें संरक्षण केलें. इतक्यांत चंदासाहेब तंजावर काबीज करण्यास येत आहे असें पाहून, देविकोटा इंग्रजांस देऊन प्रतापसिंग तंजावरचे बचावास धावत परत आला. इंग्रजांनीं शाहूजीचा पक्ष सोडून दिला, आणि त्यास दरसाल चार हजार वेतन देऊन मद्रास येथें आपल्या कबजांत ठेविलें, आणि चंदासाहेबानें तंजावरावर हल्ला केला असतां प्रतापसिंगास मदत करण्याचे त्यांनीं कबूल केलें. ह्याप्रमाणें एतद्देशीय राजांच्या मदतीस आपल्या फौजा देण्याचा प्रघात इंग्रजांनीं प्रथम सुरू केला. यापूर्वी इंग्रजफ्रेंचांनीं एतद्देशीयांस मदत केली; पण त्यांचें उघड युद्ध सुरू असल्यामुळें तें करणें गैरशिस्त ह्मणतां येत नव्हतें. मात्र ह्या परकी लोकांस एतद्देशीय राजांनीं आपल्या हद्दींत उघडपणें लढूं दिलें हेंच गैर होय. तथापि हेंही लक्षांत ठेविलें पाहिजे, कीं ह्या वेळीं कर्नाटकांतील मोगलांची सत्ता अगदींच ढासळली असून जो तो राज्यप्राप्तीसाठीं झगडत होता. अशा स्थितींत ह्या युरोपियन लोकांस आरमारच्या मदतीनें मोठमोठीं कामें अंगावर घेतां आलीं. पांदिचरी व मद्रास येथें आरमारांमुळें त्यांचा बचाव होत असे.

युरोपांत इंग्रजफ्रेंचांचा तह झाल्यामुळें, त्यांस हिंदुस्थानांत उघड युद्ध करतां येत नव्हतें. ह्मणून आजूबाजूस चाललेल्या झगड्यांचा फायदा घेऊन एकमेकांनीं एकमेकांवर कडी करावी, आणि आपला पाय होईल तितका पुढें टाकावा असा प्रकार चालू झाला. त्यांच्या फौजांचा खर्च देऊन आपल्या कामीं उपयोग करून घेण्यास अनेक एतद्देशीय सत्ताधीश उत्सुक होते. कित्येक असामी केवळ स्वपराक्रमावर नशीब काढण्यास पाहत होते; कित्येकांचा राज्यावर हक्क होता, पण हातांत जोर नव्हता; कित्येक अनेक प्रदेश दडपून बसलेले होते; शिवाय मराठे व मुसलमान घिरट्या घालीत होते. अशांपैकीं कोणासही शेजारीं राहणाऱ्या युरोपियनांची आपण घटकाभर मदत घेतली, ह्मणून त्याचा देशावर किंवा राष्ट्रावर अखेर परिणाम काय होईल ह्याची परवा नव्हती. पण अशा प्रकारचें बोलावणें आल्यावर ह्या युरोपियनांचें आयतेंच साधल्यासारखें झालें. फौजेचा खर्च निघणार, शत्रूशीं दोन हात करून मनांतला डाव साधणार; पैशाची व प्रदेशाची थोडी बहुत प्राप्ति होणार, व्यापाराच्या सवलती वाढणार, इत्यादि फायदे डोळ्यांसमोर असल्यावर, हें काम अंगावर घेण्यास त्यांनीं काय ह्मणून कांकूं करावें? तंजावरच्या भांडणांत इंग्रजांनीं प्रथम हात घातला, तो अशाच समजुतीनें घातला. त्यांत त्यांस चांगलेंसें यश आलें नाहीं, ह्मणून त्यांचा दुहेरी तोटा झाला. एक त्यांत ह्मणण्यासारखा फायदा झाला नाहीं, व दुसरें इंग्रजांनीं अशा कामांत प्रथम सुरुवात केल्यामुळें, आपला नाइलाज आहे अशी सबब डुप्ले ह्यास पुढें आणितां आली; आणि ह्याच सबबीवर हिंदुस्थानांत फ्रेंच सत्ता स्थापण्याचा उपक्रम त्यानें आरंभिला.

निजामाच्या मृत्यूनें निजामशाहींत व कर्नाटकांत बंडाळी सुरू झाली. नाना तऱ्हेचे व्यूह, कट, खून, लढाया, वेढे व लहान मोठे अनेक संग्राम सुरू होऊन जो एक गोंधळ उडाला, त्यास इतिहासकारांनीं ‘ कर्नाटकांतलें युद्ध ’ असें नांव दिलें आहे. ह्या भानगडींत आपला शिरकाव करून प्रथम कर्नाटकांत व पुढें हळूहळू निजामशाहींत आपलें वजन स्थापन झाल्यावर, फ्रेंच राज्यसत्ता कायम करावी असा डुप्लेचा विचार ठरला. फ्रान्स देशांत

तसें मराठे दरबारीं कळविलें. डुप्लेची जामीनगिरी कबूल करून मराठ्यांनी चंदासाहेबास बंधमुक्त केलें, आणि तीन हजार स्वार बंदोबस्तासाठीं देऊन त्यास स्वदेशीं रवाना केलें, ( स. १७४८ ). अनेक ठिकाणीं युद्धें करीत व फौज जमवीत चंदासाहेब कर्नाटकांत आला व लगेच जाऊन डुप्ले यास भेटला आणि त्यानें त्याजबरोबर असा ठराव केला, कीं पांदिचरी येथें फ्रेंचांची दोन हजार एतद्देशीय फौज होती, तिचा खर्च चंदासाहेबानें द्यावा, आणि ती फौज व शिवाय ४०० युरोपियन फौज डुप्लेनें चंदासाहेबाचे मदतीसाठी द्यावी. ह्या फौजेच्या खर्चाबद्दल चंदासाहेबानें पांदिचरीच्या लगत आपला कांहीं मुलूख फ्रेंचांस कायमचा तोडून द्यावा. हा ठराव ह्मणजे पुढें इंग्रजांनीं एकजात सुरू केलेल्या तैनाती फौजांचा ( Subsidiary Armies ) उगम होय हें चाणाक्ष वाचकांच्या तेव्हांच ध्यानीं येईल. शिवाय चंदासाहेबानें स्वतःची सहा हजार फौज जमविली; आणि मुजफरजंगही तीस हजार फौजेसह त्यास येऊन मिळाला, फ्रेंच फौजेचा मुख्य डोटिल ( d'Auteuil ) ह्मणून होता. दक्षिण महाराष्ट्रांतून कर्नाटकांत उतरण्याची वाट दमलचेरीच्या घांटांतून आहे. तेथें हे सर्व येऊन दाखल झाले. तेव्हां अन्वरुदीन वीस हजार फौज घेऊन आपणांवर चालून येत आहे असें त्यांस कळलें. आर्काटच्या पश्चिमेस सुमारें २५ मैलांवर अंबूर ह्मणून ठिकाण आहे. तेथें अन्वरुद्दीनवर चंदासाहेब चालून गेला. ता. ३ ऑगस्ट स. १७४९ रोजीं डोटिलनें अन्वरुद्दीनशीं सामना केला, पण लढाईत त्यास जखम लागून त्याचे लोक परत फिरले. डोटिलच्या हाताखालीं बुसी (Bussy) नामक एक फ्रेंच अंमलदार होता, त्यानें परत फिरलेल्या लोकांस धीर देऊन पुनः लढाईस नेलें. तेव्हां थोडा वेळ मोठ्या निकराचा संग्राम होऊन अन्वरुद्दीन पडला. त्या वेळीं त्याचें वय १०७ वर्षांचें होतें असें ह्मणतात. अन्वरुद्दीनचा मुलगा माफूझखान चंदासाहेबाच्या हातांत सांपडला, आणि दुसरा मुलगा महंमदअली ह्मणून होता तो पळून गेला. चंदासाहेब व मुज्फरजंग ह्यांचा जय झाल्यावर ते अर्काट येथें आले. आर्काट राजधानींत सहज त्यांचा प्रवेश झाला, तेणेंकरून कर्नाटक प्रांत

यांचे ताब्यांत आला. आर्काट येथें मुज्फरजंगानें दक्षिणच्या सुभेदारीची पदवी धारण करून चंदासाहेबास कर्नाटकची नबाबगिरी दिली. नंतर ते दोघे पांदिचरीस गेले दोघांनींही डुप्लेचे आभार मानिले.डुप्लेनें त्यांचा मोठा बहुमान केला; आणि लोकांवर छाप बसविण्याकरितां तेथें मोठा समारंभ करून आपल्या लष्कराचा व आरमाराचा थाट सर्वांस दाखविला. जेणेंकरून एतद्देशीयांचे मनांत आपलें वजन वाढेल, तें करण्यास डुप्ले कधीं चुकत नसे. चंदासाहेबानें तर त्याचे अनंत उपकार मानिले. त्या उपकारांबद्दल डुप्लेयास त्यानें पांदिचरी नजीक ८१ गांवांची राज्यसत्ता कायमची तोडून दिली. पुढें मुज्फरजंग आपल्या ५० हजार फौजेंत बाहेर निघून गेला; व चंदासाहेब पुढील विचार ठरविण्यासाठीं पांदिचरीस राहिला. कर्नाटक जरी चंदासाहेबाच्या ताब्यांत आलें होतें, तरी अन्वरुद्दीनचा मुलगा महंमदअली जोंपर्यंत बाहेर आहे, तोंपर्यंत स्वस्थ राहणें योग्य नाहीं असें डुप्लेस वाटलें. महंमदअली त्रिचनापल्लीस जाऊन राहिला होता. त्रिचनापल्लीचा बंदोबस्त अलीकडे फार चांगला केलेला असून शिवाय सुभेदार नासीरजंग हा मोठ्या लष्करानिशीं कर्नाटकावर येत आहे अशी बातमी आली होती. म्हणून ' तुम्ही एकदम जाऊन त्रिचनापल्ली काबीज करा, ' असा डुप्लेनें चंदासाहेबास आग्रह केला. इकडे हा प्रकार चालू असतां इंग्रजांनीं तंजावरच्या प्रतापसिंगाजवळून देविकोटा ठिकाण मिळविलें, हें मागें सांगितलेंच आहे. पुढें लवकरच त्यांस अंबूरच्या लढाईची वार्ता समजली, तेव्हां आपण चंदासाहेबाचा पक्ष धरावा कीं महंमदअलीचा धरावा ह्या विचारांत इंग्रज लोक पडले. इकडे पांदिचरी येथें डुप्लेनें चंदासाहेबाची सर्व सिद्धता करून दिली. स्वतःच्या पदरचे एक लाख रुपये त्यास कर्ज देऊन इतर मंडळीकडून दोन लाख रुपये देवविले; शिवाय त्यास ८०० युरोपियन व ३०० आफ्रिकन फौज तयार करून दिली. ह्या फौजेवर मुख्य ड्यूकिन (Duquesne) हा होता. सर्व सिद्धता झाल्यावर चंदासाहेब त्रिचनापल्लीवर येण्यास निघाला. डुप्लेनें सर्व सिद्धता करून दिली खरी; पण ती तडीस नेणारे इसम दुसरेच होते. चंदासाहेबाच्या हातांत पडलेला पैसा त्यानें व मुज्फरजंगानें मिळून

भलतीकडेच खर्चून टाकिला, आणि अर्ध्या रस्त्यांत आल्यावर पैसा नाहीं म्हणून त्रिचनापल्लीवरील बेत सोडून ते तंजावरच्या राजापासून पैसे उकळण्यासाठीं तंजावरावर चालून आले, आणि राजाकडे खंडणीची मागणी करूं लागले. राजानें हें भलतेंच अरिष्ट आलेलें पाहून टाळाटाळ सुरू केली व कांहीं तरी सबबीवर पैसा न देतां उलट नासीरजंग व इंग्रज ह्यांजकडे राजानें निरोपांवर निरोप पाठवून त्यांची मदत मागितली. इंग्रजांनीं महंमदअलीस थोडीशी मदत पाठविलीच होती; त्यांतले वीस लोक त्यांनीं तंजावरास पाठविले. चंदासाहेबाचा हा दिरंगाईचा प्रकार पाहून डुप्लेच्या अंगचा तिळपापड झाला. तंजावराच्या नादास लागून हा सर्वच घालवितों कीं काय असें त्यास होऊन गेलें. त्यानें ड्यूकिन यास निकडीचे निरोप पाठवून तंजावरकराला जबरीची तंबी देऊन पैसा वसूल करावा व लगेच त्रिचनापल्लीवर जावें, असें फर्माविलें. तदनुसार ड्यूकिननें तंजावरचा किल्ला काबीज केला, त्याबरोबर प्रतापसिंग जेरीस येऊन सात लाख रुपये देण्यास कबूल झाला. शिवाय फ्रेंच लष्करास दोन लाख रुपये इनाम व फ्रेंच सरकारास ८१ गांव देण्याचेंही त्यानें कबूल केलें. परंतु हे पैसे देण्यांतही तो दिवसगत लावूं लागला. केव्हां दागिने, केव्हां भांडीं, इत्यादि थोडथोडें सामान पाठवून पैशाची भर करण्याचा बहाणा तो करीत होता. पोटांतील उद्देश हा, कीं नासीरजंग किंवा इंग्रज आल्यावर हें सर्वच संकट टळेल.

**३. दोन तट व फ्रेंचांचा विजय.**—इतक्यांत नासीरजंग मोठ्या फौजेनिशीं कर्नाटकांत उतरल्याची बातमी आली. त्याबरोबर चंदासाहेब व मुजफरजंग ह्यांच्या फौजा घाबरून धन्यास सोडून पळून जाऊं लागल्या; फ्रेंच फौज परत पांदिचरीकडेस आली. नासीरजंग आर्काटवर आला, त्यास मुरारराव घोरपडे दहा हजार फौज घेऊन मिळाला; व सहाशें इंग्रज लोक मेजर लॉरेन्सच्या हाताखालीं त्याच्या मदतीस आले. ह्याप्रमाणें डुप्लेचे बेत फसून त्याजवर कठीण प्रसंग येऊन ठेपला. ह्याच अडचणींत फ्रेंच लष्करांतील अधिकाऱ्यांनीं बंड केलें; तेव्हां डोटिल यास पांदिचरीस परत यावें लागलें.

रस्त्यांत मुरारराव घोरपड्यानें फ्रेंचांचा पाठलाग केला. त्यांतून जे निभावून परत आले, त्यांजबरोबर चंदासाहेब होता. पण मुज्फरजंग मागें राहिल्यामुळें त्यास नासीरजंगानें तेव्हांच पकडून घेतलें, आणि बिड्या घालून सक्त कैदेंत ठेविलें. त्याबरोबर नासीरजंग दक्षिणच्या सुभेदारीचा मालक झाला, आणि त्यामुळें लगेच महंमदअली व इंग्रज हा एक पक्ष, आणि मुज्फरजंग, चंदासाहेब व फ्रेंच हा दुसरा पक्ष, असे दोन तट उघड झाले. मुज्फरजंग व चंदासाहेब यांनीं सोन्यासारखी संधि घालविली, म्हणून डुप्लेची अत्यंत निराशा झाली. त्याचे सर्व बेत ढांसळल्यासारखे दिसूं लागले. तथापि न डगमगतां त्यानें तसाच उद्योग नेटाच्यानें पुढें चालविला. प्रथमतः फ्रेंच लष्कर शत्रूंस भिऊन पळून आलें, त्याबद्दल शिक्षा व फजिती करून त्यांजला त्यानें ताळ्यावर आणिलें, आणि त्यांच्यामध्यें नवीन जोम उत्पन्न केला. इकडे त्यानें स्वतःची भीति बाहेर समजूं न देतां नासीरजंगाशीं सख्य ठेवण्याचा प्रयत्न चालविला, आणि जणूं काय आपणासच जय मिळाला आहे अशा बेतानें तह करण्याकरितां आपले वकील नासीरजंगाकडे पाठविले. तसेंच नासीरजंगाच्या हाताखालचे अनेक सरदार अंतस्थ रीतीनें फोडून त्यानें आपल्या पक्षाकडे वळविले. अशा रीतीनें त्यास आपली तयारी करण्यास वेळ मिळाला. बाकी नासीरजंग डुप्लेच्या युक्त्यांनीं फसला नाहीं. त्यानें आपला लढण्याचा बेत तसाच चालू ठेविला. मात्र त्यानें दिरंगाई केल्यामुळें डुप्लेचे बेत बऱ्याच अंशीं सिद्धीस गेले. ता. १२ एप्रिल स. १७५० रोजीं रात्रीं कांहीं फ्रेंच लोक मुरारराव घोरपड्याच्या छावणीवर चोरून हल्ला करून, सुमारें १२०० लोक ठार मारून उजाडण्यापूर्वी परत पांदिचरीस आले. एवढ्यानेंच नासीरजंग घाबरून आर्काटकडे परत गेला. तथापि फ्रेंचांचा सूड उगविण्याकरितां त्यानें मच्छलिपट्टण येथील फ्रेंच ठाणें काबीज करविलें. परंतु डुप्लेनें आरमार पाठवून तें लवकरच पुनः हस्तगत केलें. थोड्याच दिवसांनीं महंमदअलीस दरहत घालण्याकरितां त्याच्या लष्कराजवळच तिरुवादी नांवाचें ठाणें होतें तें डुप्लेनें डोटिल यास पाठवून काबीज केलें. तें परत घेण्याविषयीं इंग्रज व महंमदअली यांनीं पुष्कळ यत्न केला;

पण तो सिद्धीस गेला नाहीं. सारांश, इंग्रजांनीं नासीरजंग व महंमदअली ह्यांचा पक्ष घेतला होता; व तो पक्ष मोडण्यासाठीं डुप्ले अतिशय झटत होता. नासीरजंगास आणखी दहशत घालण्याकरितां, जिंजीचा मजबूद किल्ला पांदिचरीच्या वायव्येस सुमारें ४० मैलांवर होता तो बुसीस पाठवून डुप्लेनें काबीज करविला. शिवाजी व औरंगजेब ह्यांच्या वेळेपासून ह्या किल्ल्याबद्दल अनेक भानगडी होऊन तो साऱ्या दक्षिण हिंदुस्थानांत अतिशय मजबूत म्हणून ठरलेला होता. तो जाऊन काबीज केल्यामुळें बुसीचें शौर्य प्रगट झालें व फ्रेंचांची दहशत त्या बाजूस पुनः बसली. स. १७६१त हा किल्ला इंग्रजांकडे आला.

बुसीचें नांव पुढील हकीगतींत आतां प्रमुखत्वानें यावयाचें आहे. त्याचा जन्म फ्रान्सांत स. १७१८त होऊन, लाबूर्डोनें गव्हर्नर असतां तो सेंट लुई येथें आला. स. १७४६त लाबूर्डोनेबरोबरच तो पांदिचरीस आला, तेव्हां-पासून तो तेथेंच राहिला. या ठिकाणीं डुप्लेशीं वागण्याचे त्यास अनेक प्रसंग येऊन, एकमेकांच्या गुणांची परीक्षा करण्यास संधि सांपडली, व त्यांच्या मनांत एकमेकांबद्दल पूज्यबुद्धि उत्पन्न झाली. पुढें त्या दोघांनीं स्वराष्ट्रहिताचीं अनेक कृत्यें केलीं. जिंजी किल्ला काबीज करण्यांत बुसीचें खरें शौर्य प्रगट झालें. हिंदुस्थानांतील दरबारांत फ्रेंचांची दहशत बसली व हे आतां सर्व हिंदुस्थानचें राज्य काबीज करितात कीं काय, असा थोडा वेळ भास झाला. नासीरजंग तर घाबरून जाऊन फ्रेंचांशीं सख्य जोडण्याच्या विचारास लागला. मुज्फरजंगास कैदेंतून सोडल्याशिवाय तह होईना. नासीरजंग ही गोष्ट कबूल करीना, तेव्हां लढाई करण्याशिवाय मार्ग राहिला नाहीं. परंतु लढण्यापूर्वीं डुप्लेनें अंतस्थ कारस्थानें करून नासीरजंगाच्या हाताखालचे बहुतेक मराठे व मुसलमान सरदार फोडून त्यांस मुज्फरजंगाच्या पक्षाकडे वळविलें होतें. नासीरजंग हा सदा चैनींत निमग्न असे, आणि हाताखालच्या सरदारांस उदारपणानें न वागवितां फ्रेंचांशीं सख्य जोडण्याकडे दुर्लक्ष करी. ह्या गोष्टी त्या सरदारांस न आवडून डुप्लेच्या व मुज्फरजंगाच्या शिकवणीनें त्यांचीं मनें बिघडलीं; व

ते नासीरजंगाचा नाश करण्यास उद्युक्त झाले. त्यांनीं असा एक गुप्त ठराव केला, कीं नासीरजंग फ्रेंचांशीं सख्य न करतां लढाईचा हुकूम देईल, तर ऐन लढाईच्या प्रसंगीं आपण त्यास सोडून विरुद्ध पक्षाकडे निघून जावयाचें. हा बेत गुप्त होता, तरी नासीरजंगही आपली स्थिति थोडी बहुत ओळखून होता. लढाईचा परिणाम भलताच होईल ह्या भीतीनें त्यानें डुप्लेचें ह्मणणें कबूल करण्याचें ठरवून तशा आशयाचें पत्र पांदिचरीस पाठविलें, आणि तह ठरविण्यासाठीं आपले तीन वकीलही पूर्ण अधिकार देऊन पाठविले. डुप्लेनें नबाबाचें ह्मणणें कबूल करून जबाब पाठविला, तो येण्यापूर्वीच इकडे लढाई सुरू झाली होती. नासीरजंगाचा तळ जिंजीपासून थोड्या अंतरावर असून जिंजी येथें फ्रेंच फौज ला टुश ( M. de La Touche ) ह्याचे हाताखालीं तयार होती. फितूर झालेल्या सरदारांकडून सूचना येतांच नासीरजंगावर हल्ला करण्याचा त्यास हुकूम होता. इकडे नासीरजंगानें डुप्लेस पत्र पाठविल्यावर ला टुश यास वरील सूचना आल्याबरोबर तो एकदम निघून नासीरजंगाच्या फौजेवर जाऊन पडला. नासीरजंग सावध नव्हता, तरी पण ह्या कृतघ्नतेनें त्वेष येऊन त्यानेंही लढण्यास कमी केलें नाहीं; व सरदार फितूर झाले नसते तर त्यास खचित जय प्राप्त झाला असता. पण लढाईचें तोंड लागलें असतां त्याच्या हाताखालचे फितूर पठाण सरदार, ह्मैसूरचा राजा व मराठे हे वीस हजार फौजेसह फ्रेंच निशाण उभारून समरांगणांतून निघून गेले. तेव्हां नासीरजंग हत्तीवर बसून ह्या फितुरांस गांठण्यासाठीं स्वतः लढाईत शिरला. जवळ दुसऱ्या हत्तीवर त्यानें मुज्फरजंगास घेतलें. इतक्यांत कडाप्पाचा नबाब समोर दिसला, त्याची नासीरजंगानें खूप निर्भर्त्सना केली, त्याबरोबर संतापून नबाबानें नासीरजंगास गोळी घालून ठार मारिलें; व त्याचें डोकें कापून तें मुज्फरजंगापुढें ठेवून त्यास प्रणाम केला. हा प्रकार ला टुश यास कळतांच त्यानें बुसी यास मुज्फरजंगाकडे पाठवून त्याचा गौरव केला. संध्याकाळीं लढाई थांबल्यावर ला टुशनें स्वतः मुज्फरजंगाची गांठ घेतली; व त्यास सुभेदारीचा सन्मान दिला ( डिसेंबर १७५० ). ‘ ह्या मदतीबद्दल

मी डुप्लेचा व सर्व फ्रेंचांचा अत्यंत आभारी आहें; आपल्या सल्ल्याशिवाय मी कांहीं एक करणार नाहीं,' अशी डुप्लेची खात्री करण्याकरितां त्यानें ला टुशच्या मार्फत पांदिचरीस निरोप पाठविले; आणि पाठीमागून लगेच स्वतः आपण पांदिचरीस गेला. वरील लढाईस जिंजीची लढाई ह्मणतात.

ह्या विजयाची बातमी पांदिचरीस पोंचतांच तेथें आनंद, उल्लास, व आश्चर्य यांस अशी कांहीं विलक्षण उकळी फुटली, कीं आठशें फ्रेंच, शिपाई, व त्यांनीं तयार केलेले तीन हजार एतद्देशीय लोक एवढ्यांच्या जिवावर, साडेतीन कोट लोकवस्तीवर राज्य करणारा अधिकारी आपण नेमितों, ह्यापेक्षां आणखी पराक्रम तो कोणता राहिला ? ' एवढा मोठा अधिकारी आपला सन्मान करितो, आमच्या पराक्रमापुढें स्वतःची किंमत मानीत नाहीं, व इतउत्तर आमच्याच सल्ल्यानें वागणार, ह्मणजे साडेतीन कोट लोकवस्तीचे खरे राज्यकर्ते आह्मीच,' असा योग घडून आल्यामुळें, डुप्लेस व त्याच्या खालच्या अधिकाऱ्यांस व शिपायांस अत्यंत कृतकृत्यता वाटली. पांदिचरीची स्थापना स. १६७४त झाली. पाऊणशें वर्षांच्या अवधींत फ्रेंचांनीं एवढा पराक्रम गाजविला. एतद्देशीय लोकांस फ्रेंचांची धास्ती न वाटतां, उलट त्यांच्या स्वार्थत्यागाचें व स्वार्थनिरपेक्षतेचें आश्चर्य वाटूं लागलें. सर्व लोक त्यांची मनधरणी करीत. अशा प्रकारच्या आनंदसागरांत डुप्ले निमग्न असतां स्वतः मुजफरजंग पांदिचरीस येऊन दाखल झाला, (ता. २७ डिसेंबर १७५०). मग त्या आनंदास पार काय ? डुप्ले आपला त्राता, आपला अन्नदाता, आपला देवाधिदेव, अशा प्रकारचा सन्मान त्यास ह्या नवीन सुभेदारानें दिला. नासीरजंगाची धनदौलत, जडजवाहीर व सोनेंचांदी वगैरे झाडून सारें मुजफरजंगानें आणून डुप्लेच्या पायापाशीं अर्पण केलें, मग अशा प्रसंगीं डुप्लेच्या निरपेक्षतेस ऊत न यावा तर केव्हां यावा ? ' मला कांहीं नको, मी ह्याला स्पर्श सुद्धां करणार नाहीं, तुमचें कार्य झालें व माझ्या हातून तुमच्या देशाचा उद्धार झाला, येणेंकरूनच मी कृतकृत्य झालों,' अशा प्रकारच्या मधुर भाषणांनीं एतद्देशीयांची प्रीति संपादन कशी करावी हें त्या मानभावी डुप्लेस कोणी

शिकविण्याची जरूर नव्हती. ह्या कामांत तो पूर्ण तरबेज असून ' एतद्देशीय लोकांचें हृद्गत जाणण्यास कोणी समर्थ असेल तर तो मी ' असें डुप्ले समजत असे. तदनुसार त्यानें ती सर्व दौलत मुज्फरजंग व त्याचे साह्यकारी नबाब ह्यांनीं सारखी वांटून घ्यावी, असें फर्माविलें. अशा रीतीनें सर्वांचीं मनें वळवून घेतल्यावर, डुप्लेनें मोठा सदबार भरवून तेथें मुज्फरजंगाकडून सुभेदारीचें पद धारण करविलें. त्या दरबाराचा थाट अवर्णनीय व अविस्मरणीय होता. मुज्फरजंगास अग्रस्थानीं बसवून त्याच्या जवळच डुप्ले आपण बसला. त्यानें व इतर सरदारांनीं सुभेदारास नजराणा केल्यावर, सुभेदारानें भाषण करून खैरात वांटली ती अशी. ' आह्मीं दक्खनचे सुभेदार, आमचे दोस्त डुप्ले यांस कृष्णेच्या दक्षिणेकडील ह्मैसूरसुद्धां सर्व प्रांताची नबाबगिरी दिली आहे; शिवाय पांदिचरीच्या उत्तरेचा वल्दवूर (Valdaur) चा किल्ला व त्याखालील एक लक्षाचा प्रदेश जहागीर ह्मणून डुप्ले यांस देण्यांत येत आहे. त्यांस ' सप्तहजारी ' मनसब व मत्स्याकृति धारण करणारें मोगली निशाण अर्पण करून, शिवाय पांदिचरीचें नाणें कर्नाटकांत चालावें, असें फर्माविण्यांत येत आहे. मच्छलिपट्टण, यानान, कारिकलचा प्रदेश वगैरे सर्व ठिकाणांवर फ्रेंच कंपनीचा ताबा समजावा. डुप्लेच्या संमतीशिवाय आह्मी काडी सुद्धां इकडची तिकडे करणार नाहीं, असें त्यांस आह्मीं आश्वासन देतों. ' अशा प्रकारचा त्या खैरातीचा आशय होता. तदुत्तर डुप्लेनें तरी आपल्या शीलास व त्या प्रसंगास उचित असेंच वर्तन केलें. चंदासाहेबास सुभेदारापुढें नेऊन डुप्लेनें जाहीर केलें कीं, ' हे आमचे फार दिवसांचे दोस्त आजपर्यंत अनेक विपत्ति भोगीत आहेत. कर्नाटकच्या नबाबगिरीचे नामधारी मालक आपण आह्मांस केलें आहे; तरी त्यावर खरा हक्क ह्या चंदासाहेबांचा आहे; त्यांचें आजपर्यंतचें इमान व उद्योग ह्यांचें खरें बक्षीस त्यांस मिळालें पाहिजे. ' डुप्लेच्या ह्या औदार्यामुळें एतद्देशीयांचे मनावर केवढा परिणाम झाला असेल ह्याची कल्पनाच करावी. त्याची सर्वत्र वाहवा होऊन त्याजबद्दल सर्वांच्या मनांत त्या दिवशीं उत्कृष्ट

पूज्यभाव उत्पन्न झाला. वर सांगितलेल्या खैरातीशिवाय मुज्फरजंगानें पांच लाख रुपये फ्रेंच लष्करास वांटण्यासाठीं दिले. शिवाय त्यानें फ्रेंच कंपनीचें देणें होतें, त्यापैकीं पांच लाखांची फेड करून बाकीच्याबद्दल जामीन दिले. शिवाय फ्रेंच कंपनीस दरसाल चार लाख वसुलाचा मुलूख मिळाला. ह्या विजयाचें कांहीं तरी चिरकालीन स्मारक करावें ह्या हेतूनें ज्या ठिकाणीं मुज्फरजंगास जय मिळाला, त्या जागेवर डुप्लेनें एक शहर वसवून त्यास 'डुप्ले–फत्याबाद' असें नांव दिलें; आणि तेथें एक विजयस्तंभ उभारून त्यावर फ्रेंचांचे पराक्रम खोदून ठेविले.

**४. डुप्लेचे पोकळ मनोरथ.**—इतकें झालें तरी मुलखांत शांतता झाली नव्हती. महंमदअली हातपाय हालवीत होता. नासीरजंगाच्या मृत्यूनें त्याची निराशाच झाली; व तो त्रिचनापल्लीस जाऊन राहिला. इंग्रजांनींही त्यास सोडिलें. तेव्हां आपणास बापाची सर्व जिंदगी देऊन शिवाय दक्षिणच्या सुभ्यांत कोठें तरी एखादी मनसब द्यावी, ह्मणजे नबाबगिरीचा हक्क सोडून देण्यास आपण तयार आहों, असें त्यानें डुप्लेच्या मार्फत नवीन सुभेदाराशीं बोलणें चालविलें. हें बोलणें राजा जानोजी ह्याच्या मार्फत आलें असें ऑर्म ह्मणतो, तो जानोजी रघूजी भोसल्याचा मुलगा असावा. हे दोघेही मुज्फरजंगाचे मदतीस आलेले होते. कदाचित जानोजी निंबाळकरही असेल. महंमद अलीचें ह्मणणें डुप्लेस सर्वथैव पसंत पडून, अशा व्यवस्थेनें कर्नाटकचा तंटा कायमचा मिटेल ह्या आशेवर डुप्लेनें जानोजीस परत पाठवून आपली संमति महंमदअलीस जाहीर केली. पुढें मुज्फरजंग आपली राजधानी औरंगाबाद येथें जाण्यास निघाला. रस्त्यांत कांहीं अरिष्ट येऊं नये ह्मणून त्यानें स्वसंरक्षणार्थ फ्रेंच फौज बरोबर घेतली; व तिचा खर्च देण्याचें कबूल केलें. डुप्लेस तरी हेंच पाहिजे होतें. ह्या फौजेच्या योगानें आपला शह सुभेदारावर राहून सर्व दक्षिणचें राज्य हस्तगत करण्यास सांपडेल, अशी त्यास आशा होती. सब्सिडियरी सिस्टिम ह्मणजे तैनाती फौजेचा ह्या उगम होय. डुप्लेनें बुसीचे हाताखालीं ३०० फ्रेंच व दोन हजार एतद्दे-

शीय लोक देऊन त्यास मुज्फरजंगाचे बरोबर पाठविलें. महमंदअली कांहीं दगा करील व कठीण प्रसंग आल्यास बुसीजवळ संरक्षणाचें साधन नाहीं, असा संशय सुद्धां डुप्ले यास आला नाहीं.

ता. ७ जॅनुआरी स. १७५१ रोजीं मुज्फरजंग पांदिचरी सोडून निघाला. पाऊण महिन्यानें ते कडाप्पा येथील नबाबाच्या हद्दींतून चालले. तो नबाब मुज्फरजंगाचे लष्करांत होताच. हा नबाब आणि कर्नूल व सावनूर येथील नबाब ह्या तिघांनीं कांहीं गुप्त कारस्थान चालविलें होतें, त्याची खबर मुज्फरजंगास नव्हती. एके दिवशीं सुभेदाराची फौज व कडाप्पाचे नबाबाची फौज यांजमध्यें कांहीं क्षुल्लक कारणावरून तंटा उपस्थित झाला. वास्तविक हा तंटा पुढील घाटाचा उपक्रम होय. त्यांत नबाबाच्या लोकांनीं सुभेदाराच्या पिछाडीस जनानखान्याचे तैनातीस असलेल्या तुकडीवर हल्ला केला. त्यावरून सुभेदारास राग येऊन त्यानें नबाबाचें पारिपत्य करण्यास बुसी यास सांगितलें, हें प्रकरण विकोपास न जावें ह्मणून बुसीनें तडजोड चालविली. पण तिघेही नबाब बंडखोरपणा करून ज्यास्तच बखेडा करूं लागले. त्याबरोबर चिडीस जाऊन मुज्फरजंगानें बुसीच्या मदतीची वाट न पाहतां त्यांजवर चाल केली. त्या वेळीं मोठी निकराची चकमक उडाली. बुसी त्वरेनें आलाच. त्या गर्दीत सावनूरचा नबाब रणांगणीं पडला; व कडाप्पाच्या नबाबास जखमा लागून त्याचे लोक त्यास उचलून घेऊन जाऊं लागले. हा मुख्य बंडखोर जिवंत सुटून जावा हें मुज्फरजंगास न आवडून त्यानें पाठलाग चालविला. इतक्यांत कर्नूलचा नबाब त्यास आडवा आला. दोघेही हातघाईवर येऊन लढत असतां कुर्नूलच्या नबाबानें मुज्फरजंगास भाल्यानें ठार केलें, तें पाहून मुज्फरजंगाच्या मंडळींनीं कर्नूलच्या नबाबासही यमसदनीं पाठविलें.

ह्याप्रमाणें मुज्फरजंग पडल्यामुळें भयंकर घोटाळा झाला. तथापि बुसीचें शहाणपण व प्रसंगावधान जबर होतें. त्यानें सर्व स्थीरस्थावर करून निजाम नासीरजंगाचा भाऊ सलाबतजंग हा स्वारीबरोबर अटकेंत होता, त्यास बाहेर काढून सुभेदारीवर दाखल केलें, आणि जणूं काय कांहींच व्यत्यय आला

नाहीं, अशा रीतीनें सर्व व्यवस्था करून तो पुढें चालला. सलाबतजंगानें फ्रेंचांशीं झालेले पूर्वींचे सर्व ठराव कायम करून शिवाय आणखी कांहीं परगणे त्यास दिले. पुढें आतांना त्यांनीं कर्नूलचा किल्ला जमीनदोस्त केला, पेशवा बाळाजी बाजीराव यास दोन लाख रुपये भरून मराठ्यांची अडचण दूर केली, आणि हैदराबादेस थोडे दिवस राहून ते औरंगाबादेस दाखल झाले. तेथें सलाबतजंगास यथाविधि सुभेदारीची वस्त्रें बादशहाकडून देण्यांत आलीं.

येणेंप्रमाणें फ्रेंचांच्या युक्तीचा व सत्तेचा कळस झाला. थोड्याशा फौजेनें साडेतीन कोटींचा प्रदेश इतक्या लवकर आटोक्यांत आणिला. एकदम जोर करून सर्वच प्रदेश, निदान कर्नाटक तरी फ्रेंच सत्तेखालीं आणणें डुप्लेस शक्य होतें. पण तूर्त तसें न करितां एतद्देशीय राजांचा बोज कायम ठेवणेंच त्यास इष्ट वाटलें. महंमदअलीचीही समजूत झाल्यासारखीच होती. इंग्रजांस वैषम्य वाटलें तरी त्यांस मध्यें पडण्यास कारण नव्हतें. कारण त्यांची मदत मागण्यास कोणी तयार नव्हता. समोरासमोर लढून इंग्रजांचा कांटा काढून टाकण्यास डुप्ले तर अतितत्पर होता; पण एक्स्लाशापेलच्या तहानें त्याचे हात बांधले गेले होते. तेव्हां इंग्रजांस मध्यें पडण्यास अवकाशच मिळूं नये असा डुप्लेचा घाट होता व तो बहुतेक शेवटास गेल्यासारखा झाला.

एवंच डुप्ले पांदिचरी येथें बसून बुद्धिबळाच्या पटावरील मोहऱ्यांप्रमाणें कर्नाटकांत दक्षिणच्या सत्ताधीशांस खेळवीत होता. त्यानें डाव जिंकला असें बहुतेकांस व त्यासही क्षणभर वाटलें. हा डाव पुढें कसा व केव्हां संपला हें पाहण्याचा प्रसंग आतां येतच आहे. डुप्लेनें तर मोठमोठ्या राष्ट्रांच्या घडामोडी क्षणार्धांत करून टाकिल्या. राष्ट्रीय घडामोडी सिद्धीस जाण्यास काळ हा लागतोच; पण राष्ट्राच्या व समाजांच्या हालचाली समजून येण्यास व एकंदर काय प्रकार घडून आले त्याची लोकांस चांगली समज पडण्यासही कांहीं काळ लागतो. कल्पनेच्या धांवेपेक्षां आपली अक्कल ज्यास्त धांवत आहे, हें डुप्लेच्या लक्षांत राहिलें नाहीं. डुप्लेचाच राष्ट्रबंधु नेपोलियन याचीही पुढें तीच गति झाली हें इतिहास सांगत आहे.

एकदम जोराने उडी मारून सर्वच स्वाहा करणारांस शेवटीं कांहींच मिळत नाहीं. धिमेपणा, गांभीर्य, व शांत विचार ह्यांच्यापुढें उतावळेपणा व घाई यांचा टिकाव न लागतां एका लहानशा चुकीनें सर्व फसलें असें जें पुढें नेहमीं डुप्लेस वाटे, तें सर्वथैव खरें नव्हे.

वरील हकीकतींवरून तत्कालीन स्थितीची बरीच कल्पना करितां येते. मध्यवर्ती राज्य मोडकळीस आलें ह्मणजे देशाची धूळधाण कशी उडते ह्याचें हें उदाहरण आहे. कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नाहीं, कशाचीही क्षणाची शाश्वती नाहीं असा त्या काळीं इकडचा प्रकार असल्यामुळें, डुप्लेसाख्यांचें फावलें. बाकी डुप्लेस जें वाटे, कीं आपण अत्यंत निरपेक्षतेनें व परहितबुद्धीनें वागत आहों, तो निवळ भ्रम होता. मॅलेसन ह्मणतो, अशा युक्त्यांनीं एतद्देशीय लोकांच्या मनावर डुप्लेनें उत्कृष्ट ग्रह उत्पन्न केला, पण एतद्देशीय लोक त्या वेळींही इतके दुधखुळे नव्हते. कोणीही इसम कांहीं एक प्रकारचें वर्तन करतो, तें आपण नेहमीं दुसऱ्यांच्या बऱ्याकरितांच करतों असें तो समजतो. आपण दुसऱ्यांचें वाईट करतों असें कोणीही ह्मणत नाहीं. ह्या दृष्टीनें पाहतां, एवढ्या खटाटोपींत न पडतां, आपला व्यापार बरा कीं आपण बरा, अशा पद्धतीनें डुप्ले वागता, तर त्यानें आपल्या राष्ट्राचा ज्यास्त फायदा केला असता असें कांहींचें ह्मणणें असून, आज आपल्यापुढें बहुधा इंग्रज लेखकांनीं मांडिलेली बाजू तेवढीच आहे, हेंही ध्यानांत ठेविलें पाहिजे.

महंमदअली त्रिचनापल्ली येथें होता. पूर्वी ठरल्याप्रमाणें त्याची समजूत होऊन सर्व भानगडी लवकर मिटतील अशी डुप्ले यास फार आशा होती. पण कांहींना कांहीं सबब काढून महंमदअली आपला बेत सिद्धीस नेण्यास टाळाटाळ करूं लागला. आंतून त्यानें इंग्रजांची मदत मिळविण्याची खटपट जारीनें चालविली. त्यानें इंग्रजांस लिहून कळविलें, कीं 'माझा पक्ष ह्मणजे तुमचा पक्ष. माझा पाडाव झाला कीं तुमचाही हिंदुस्थानांतून कायमचा पाडाव झाला असें समजा.' आपली खटपट तडीस जाते असें महंमदअलीस कळतांच, त्यानें डुप्लेस लिहून कळविलें, कीं आपण त्रिचनापल्ली सोडून देण्यास

तयार नाहीं. असा जबाब आल्यावर डुप्लेनें काय करावें ? कर्नाटक इस्तगत होण्यास अडचण काय ती एक महंमदअलीची. तेवढी दूर केली म्हणजे आपलें काम संपलें असें त्यास वाटून त्यानें पुनः युद्धाची तयारी केली. चंदासाहेबाची सात आठ हजार फौज होती, तिला चारशें युरोपियन लोकांची मदत डोटिलचे हाताखालीं देऊन त्यांस त्रिचनापल्ली काबीज करण्यास पाठविलें ( मार्च १७५१ ). इकडे डुप्लेचे विजय पाहून इंग्रजांची पांचावर धारण बसली होती. कर्नाटकची नबाबगिरी डुप्लेस मिळाल्यावर तो काय इंग्रजांस येथून हांकून दिल्याशिवाय राहणार ? जर स्वसंरक्षण करणें जरूर असेल तर महंमदअलीचा पक्ष होईल तितका उचलून धरिला पाहिजे. अशा विचारानें कॅप्टिन कोपच्या हाताखालीं २८० युरोपियन व ३०० एतद्देशीय फौज इंग्रजांनीं महंमदअलीचे मदतीस त्रिचनापल्लीस पाठविली; आणि कॅप्टिन जिंजेनच्या हाताखालीं अनुक्रमें ६०० व १००० अशी दुसरी एक तुकडी त्रिचनापल्लीच्या आजूबाजूस राहून नबाबाचा पक्ष सांवरून धरण्याकरितां पाठविली. जिंजेनच्या हाताखालीं लेप्टिनंट रॉबर्ट क्लाइव्ह हा होता. त्रिचनापल्लीच्या उत्तरेस ४० मैलांवर बालकोंडा ( volcondah ) म्हणून एक मजबूद ठिकाण होतें, तें चंदासाहेबाचे हातांत पडणार असें समजल्यावरून, इंग्रज फौज त्यावर चालून गेली, ( जुलई स. १७५१ ). तेथचा अधिकारी कोणास आंत येऊं देईना. 'कर्नाटकचा नबाब जो ठरेल त्याच्या हवालीं ही जागा करूं' असें तो म्हणूं लागला. तेव्हां इंग्रजांनीं त्यावर हल्ला केला; पण उलट बाजूनीं फ्रेंचांनीं येऊन इंग्रजांचा मोड केला; तेव्हां ते पळून गेले. ह्या प्रसंगीं फ्रेंचांनीं इंग्रजांचा पाठलाग केला असता तर सर्व इंग्रज त्यांच्या तावडींत सांपडले असते, व पुढील युद्धप्रसंग बंद पडले असते. पण फ्रेंचांचा सेनापति डोटिल हा गुडघीच्या विकारानें आजारी व काम करण्यास असमर्थ होता; आणि चंदासाहेबाची कांहीं फौज फितूर झाल्यामुळें त्याच्यानें पाठलागास जाववलें नाहीं. त्यामुळें सोन्यासारखी संधि फुकट गेली. तथापि पुढें लवकरच चंदासाहेब व फ्रेंच ह्यांनीं मिळून त्रिचनापल्लीस वेढा घातला. त्या ठिकाणीं कावेरी नदींत श्रीरंग नांवाचें बेट आहे तेंही

त्यांनीं काबीज केलें. ह्याच संधीस फ्रेंचांचा सेनापति डोटिल हा अतिशय आजारी होऊन पांदिच्चरीस गेला, व जॅक्स लॉ* म्हणून दुसरा एक इसम त्याचें काम पाहूं लागला. हा नवीन इसम युद्धकलेंत अगदीं नालायक व भित्रा होता; परंतु त्याजबद्दल फ्रेंच सरकाराकडून उत्तमोत्तम शिफारसी आल्यामुळें, त्याज-कडेच सर्व काम सोंपल्याशिवाय गत्यंतर नव्हतें. ह्याचे ऐवजीं दुसरा हुशार गृहस्थ फ्रेंचांकडे असता तर ह्या युद्धाचा परिणाम अगदीं निराळाच झाला असता. एकदम जोराचा हल्ला करून फ्रेंचांनीं त्रिचनापल्ली काबीज केली असती म्हणजे सर्व भागलें असतें.

इकडे लॉ नालायक म्हणून पुढें आला, त्याचप्रमाणें इंग्रजांच्या सुदैवानें त्यांजकडे अत्यंत धाडशी व हुशार असा एक गृहस्थ पुढें आला, तो रॉबर्ट क्लाइव्ह हा होय. डुप्लेप्रमाणेंच क्लाइव्ह हा हिंमती व धाडशी असून शिवाय युद्धकलाविशारद होता. डुप्लेचें व्यंग काय तें एकच. युद्धकला येत नसल्यामुळें त्यास स्वतः सेनापतीचें काम करितां येत नसे. घरीं बसल्या तो सर्व तजवीज करून देई, व अत्यंत बिकट प्रसंगीं सुद्धां न डगमगतां काय करावें हें तो उत्कृष्ट सुचवून देई; पण तें तडीस नेण्याचें काम दुसऱ्यांकडे असल्यामुळें, हर-एक प्रसंगीं त्यास दुसऱ्याचे तोंडानें पाणी प्यावें लागे. क्लाइव्ह व डुप्ले यांज-मधील मोठा भेद हा होय. स्वतः रणांगणीं गेल्यामुळें जसा प्रसंग येईल, तशी युक्ति काढून त्यांतून निघून जाण्यास क्लाइव्ह त्यास दुसऱ्यावर अवलंबून राहवें लागत नसे. डुप्लेची गोष्ट तशी नव्हती. पुढील बनाव सांगण्यापूर्वी क्लाइ-व्हची पूर्वपीठिका येथें दिली पाहिजे.

**५. क्लाइव्हची पूर्वपीठिका.**—इंग्लंडांत श्रॉप्शॉयर परगण्यांत मार्केट ड्रेटन येथें ता. २९ सेप्टेंबर सन १७२५ रोजीं रॉबर्ट क्लाइव्ह जन्मला. तेरा

---

* टीप.—जीन लॉ (Jean Law) व जॅक्स् लॉ (Jacques Law) हे दोघे फ्रेंच बंधु त्या वेळीं हिंदुस्थानांत होते, पहिला वडील बंगाल प्रांतांत असून दुसरा धाकटा कर्नाटकांत होता. पुढील कर्नाटकच्या हकीकतींत दुस-ऱ्याचेंच नांव समजावें.

भावंडांपैकीं तो सर्वांत वडील होय. त्याचा बाप वकिली करून उदरनिर्वाह करीत असे. लहानपणापासूनच रॉबर्ट धाडशी व द्वाड होता. मारामारी केल्याशिवाय त्याचा एक दिवस जात नसे. लहानपणीं दोन तीन वर्षे तो मावशीच्या घरीं होता, तेथें त्यानें सर्वांस रडकुंडीस आणिलें. ज्या ज्या ठिकाणीं त्याला शाळेंत पाठवावा, तेथें तो नाना प्रकारच्या कलागती लावी. अभ्यासाकडे ह्मणून त्यानें कधींच लक्ष दिलें नाहीं; नेहमीं कांहीं तरी कलागतींचीं कृत्यें करण्यांत गुंतलेला असे. त्याच्या विरुद्ध जाण्याची कोणाची छाती नसे. त्याचा चलाखपणा व धाडस पाहून, कित्येकांना असेंही वाटे, कीं नशीबानें त्याला तसा प्रसंग येईल तर हा कांहीं विलक्षण कृत्य करून इतिहासांत नांव करील. तो मोठा होत चालला, तशी आईबापांस चिंता पडूं लागली कीं याचें पुढें काय करावें. कारण तो कांहींच विद्या शिकला नव्हता. तेव्हां कोठें तरी त्याला अडकवून टाकावा अशा विचारानें, ईस्ट इंडिया कंपनीकडे अर्ज करून, त्यांनीं त्याला कारकुनीची जागा देवविली. स. १७४३त तो अठरावे वर्षी मद्रासेस येण्यास निघाला. त्या वेळची रायटरची जागा किती त्रासाची असे, ह्याची वाचकांस कल्पना होईल. त्यांतून क्लाइव्हसारख्या उपद्व्यापी इसमास तर दिवसभर मेजापुढें आंकडे मोडीत बसण्याचा किती कंटाळा आला असेल हें सांगणें नकोच. व्यापाऱ्याच्या लायकीचा एकही गुण त्याच्या अंगीं नव्हता; आणि व्यापाराचें काम आल्याशिवाय पैसे मिळविण्यास रायटरास कांहीं एक साधन नव्हतें. विलायत सोडल्यापासून इकडे येण्यास त्यास एक वर्ष लागलें. जवळ खर्चास कांहीं नाहीं; स्नेही सोबती कोणी नाहीं; अशा विपरीत त्यानें मद्रासेस कामाची सुरुवात केली. त्याच्यांत आर्जवशक्ति नसल्यामुळें त्यास कोणी विचारीत नसे. म्हणून तो एकलकोंड्यासारखा राही. त्याच्या आयुःक्रमांतील हा मद्रासचा काळ अतिशय विपरीत गेला. तेथें थोड्याच काळांत दुःखी व निराश होऊन त्याला स्वदेशीं परत जावेंसें वाटूं लागलें. 'स्वदेश सोडल्यापासून माझा एक दिवसही आनंदांत गेला नाहीं,' असें त्यानें त्या वेळच्या एका पत्रांत लिहिलें आहे.

पिस्तुल उडवून प्राणत्याग करण्याचाही त्यानें प्रयत्न केला; परंतु तो सिद्धीस गेला नाहीं. तेव्हां तो इतकेंच बोलला, ' माझा प्राण जात नाहीं ह्यावरून माझ्या जगण्याचें कांहीं तरी प्रयोजन ह्या जगांत आहे.' सरकारी कामांत तो वरिष्ठांची पर्वा ठेवीत नसे, म्हणून त्यांतही त्याला कधीं सुख मिळालें नाहीं. नाइलाजामुळें तो कसा तरी काल कंठीत होता. मद्रासचा गव्हर्नर मि. मॉर्स ह्यानें त्याला घरीं बोलावून, वाटेल तीं पुस्तकें वाचण्याची परवानगी दिली. स. १७४६त फ्रेंचांनीं मद्रास काबीज केल्यावर इंग्रजांची कांहीं मंडळी पळून फोर्ट सेंट डेव्हिड येथें गेली, त्यांत क्लाइव्ह होता. तो मुसलमानी वेष करून पळून गेला. तेथें कांहीं विशेष उद्योग नसल्यामुळें तो आपला वेळ पत्ते खेळून घालवीत असे. पुढें फ्रेंचांनीं फोर्ट सेंट डेव्हिडवर हल्ला केला, तेव्हां तेथें इंग्रज फौज फारशी नसल्यामुळें सर्वांसच हातांत शस्त्र धरावें लागलें, त्यामुळें क्लाइव्हच्या मनाजोगता उद्योग त्यास मिळाला. सेंट डेव्हिडचा किल्ला फ्रेंचांस मिळाला नाहीं. पुढें इंग्रजांनीं पांदिचरीस वेढा घातला, त्यांत क्लाइव्ह हजर होता. तेथें त्यानें बराच पराक्रम केला. त्या वेळचा इंग्रजांचा सेनापति मेजर लॉरेन्स त्यानें क्लाइव्हचे गुण तेव्हांच ओळखिले. पुढें देविकोटा काबीज करण्यास इंग्रज फौज गेली, तिच्यांत क्लाइव्ह होता; आणि त्या वेळीं त्यास लेफ्टेनंट ही पदवी दिलेली होती. देविकोटा काबीज केल्यावर क्लाइव्ह यास लष्करच्या तजाविजीचें काम मिळालें. एकंदरींत क्लाइव्ह तत्कालीन परिस्थिति बारकाईनें पाहत होता. एतद्देशीय फौजा, युरोपियनांची करामत, इत्यादि प्रकार पाहून त्याला पुढील उद्योगाची कल्पना आली. पांदिचरीस इंग्रजांनीं वेढा घातला त्यांत तो होता. तेथें त्यानें अनेक शूर कामें केलीं. देविकोट्यावरील स्वारींत त्यानें अनेक प्रसंगीं आपली करामत दाखविली. कॅप्टिन जिंजेनचा वालकोंड्यावरील हल्ला फसला, त्यांत सामान पुरविण्याच्या कामावर तो होता. तेव्हां आपल्या लोकांस धीर देण्याची त्यानें पुष्कळ खटपट केली, पण ती सिद्धीस गेली नाहीं. जिंजेनची व्यवस्था त्यास बिलकूल पसंत न पडून, तो आपलें काम

सोडून फोर्ट सेंट डेव्हिड येथें गव्हर्नरच्या भेटीस गेला. त्या वेळीं गव्हर्नर मॉर्स जाऊन त्याच्या जागीं गव्हर्नर सॉंडर्स हा हा नुकताच आला होता. त्रिचनापल्लीस मदत पाठविण्याची अतिशय निकड होती. महंमदअली चंदासाहेबाच्या हातून सुटला नाहीं, तर इंग्रजांवर मोठा कठिण प्रसंग येणार होता. इतक्यांत विलायतेहून थोडी मदत आल्यावर, ८० युरोपियन व ३०० एतद्देशीय लोकांची मदत जुलै स. १७५१त सॉंडर्सनें त्रिचनापल्लीस पाठविली. मेजर लॉरेन्स तब्यत सुधारण्यासाठीं विलायतेस गेल्यामुळें, ह्या फौजेबरोबर मि. पिगट ह्यास पाठविलें, व क्लाइव्हही बरोबर गेला. थोड्या दिवसांनीं पुनः अशीच एक टोळी सॉंडर्सनें त्रिचनापल्लीस पाठविली. त्या वेळीं क्लाइव्हनें आपली पहिली नोकरी सोडून कंपनीच्या फौजेंत कॅप्टिनची जागा कायमची पत्करिली. त्रिचनापल्लीस गेल्यावर तेथची सर्व व्यवस्था क्लाइव्हच्या नजरेस आली. फौजेचे मुख्य जिंजेन व कोप दोघेही नालायक, महंमदअली अगदीं हताश झालेला, शत्रूंची फौज ताज्या दमांत व त्यांजबरोबर ९०० फ्रेंच लोक जय्यत तयारींत असलेले, महंमदअलीजवळ पैसा नाहीं, फौजेस पगार नाहीं, अशा स्थितींत त्रिचनापल्लीचा वेढा उठविण्याचें तर दूरच, पण आपणच सर्वस्वी बळी पडण्याचा प्रसंग इंग्रजांवर आला होता. ही स्थिति पाहून क्लाइव्हची खात्री झाली, कीं अशा ढिलाईनें महंमदअली सुटणार नाहीं; महंमदअलीस सोडवून फ्रेंचांचा नकशा उतरवायचा असेल, तर इंग्रजांची सर्वच व्यवस्था मुख्य ठिकाणीं जाऊन बदलली पाहिजे. असें त्यास वाटून तो फोर्ट सेंट डेव्हिड येथें परत गेला; आणि मनांत आणलेला बेत त्यानें गव्हर्नर सॉंडर्स व इतर मंडळीस कळविला. तो हा कीं, शत्रूशीं नुसती बचावाची लढाई करून भागणार नाहीं, तर धाडस करून त्यांच्या मुलखांत जिकडे तिकडे धांदल उडवून, शत्रूस जेरीस आणिलें पाहिजे. हा उद्योग मोठा धाडसाचा असतो; तो तडीस नेणारा गृहस्थ कल्पक, साहसी, दमदार व कंटक पाहिजे. बेत सिद्धीस गेला तर बरें, नाहीं तर सर्वच नुकसान व्हावयाचें. असा हा विलक्षण प्रयत्न क्लाइव्हनें मनांत आणिला. नेपोलियनसारख्या मोठमोठ्या योद्धयांनीं ह्या युक्तीचें

अनेक वेळां अवलंबन केलें आहे. ही कल्पना मूळ क्लाइव्हची. ती त्यानें अधिकाऱ्यांस समजून दिली, आणि अल्पायासानें ती तडीस नेण्याची सर्व जबाबदारी आपणावर घेतली. हल्लीं चाललेला प्रकार अत्यंत निरुपयोगी आहे, त्यापासून कांहीं एक निष्पन्न व्हावयाचें नाहीं, त्याविषयीं क्लाइव्हनें गव्हर्नर सॉंडर्सची खात्री केली. चंदासाहेबाची सर्व तयारी त्रिचनापल्लीस आहे, नबाबाची राजधानी आर्काट उघडी पडली आहे, अशा संधीस आर्काट काबीज केल्यास शत्रूची धांदल उडेल व त्रिचनापल्लीचा वेढा उठण्यास विलंब लागणार नाहीं, अशा प्रकारची युक्ति त्यानें सर्वांस समजावून दिली.

गव्हर्नर सॉंडर्स हुशार होता. त्यास ही युक्ति पसंत पडली व कांहीं झालें तरी, ती अमलांत आणण्यास लागणारी सर्व सिद्धता त्यानें एकदम करून दिली. क्लाइव्ह फोर्ट सेंट डेव्हिडहून मद्रासेस गेला व फौजेची तयारी करून ३०० एतद्देशीय व २०० युरोपियन शिपाई बरोबर घेऊन तो १७५१ च्या सेप्टेंबर ता. ६ रोजीं मद्रास सोडून आर्काटवर चालून आला.

६. **आर्काटचा वेढा** ( स. १७५१ सेप्टेंबर. )—आर्काट शहर एक लाख वस्तीचें असून त्यास लहानसा तट व त्यावर एक हजार एतद्देशीय फौज होती. तींत दोन तीन फ्रेंच इसम तोफखाना चालविण्यास होते. रस्त्यांत एक दिवस कांचीवरं येथें मुक्काम करून ता. ११ रोजीं क्लाइव्ह आर्काटवर आला. त्या दिवशीं जोराची मेघगर्जना व पर्जन्यवृष्टि होऊन त्यास बराच त्रास झाला. क्लाइव्ह अशा पर्जन्यास न जुमानतां आपणावर चालून येत आहे, असें आर्काटच्या संरक्षक फौजेस कळतांच ती पळून गेली. तिनें दम धरला असता, तर चंदासाहेबानें पाठविलेली मदत येऊन पोंचली असती. अनायासेंच किल्ल्यांत क्लाइव्हचा प्रवेश झाला; व शहर त्याच्या ताब्यांत आलें. किल्ल्यांत आठ तोफा व दारुगोळा त्यास सांपडला. किल्ल्यास वेढा पडला असतां आपला बचाव व्हावा म्हणून क्लाइव्हनें आंत अन्नसामुग्रीची व इतर तजवीज परिपूर्ण केली. ही बातमी डुप्ले यास समजली, पण त्यामुळें तो मुळींच घाबरला नाहीं. उलट आर्काटकडे लक्ष न देतां त्रिचनापल्ली काबीज

करण्याचें काम होईल तितकें जोरानें चालवावें अशी त्यानें लॉ व चंदासाहेब ह्यांस निकड लाविली. ही युक्ति ह्या दोघांनीं ताबडतोब अंमलांत आणिली असती, तर क्लाइव्हचें कांहीं एक चाललें नसतें. पण चंदासाहेबानें तसें केलें नाहीं. आर्कोट परत घेण्याकरितां आपल्या फौजेंतील तीन हजार लोक निराळे काढून ते त्यानें आपला मुलगा राजासाहेब ह्याच्या हाताखालीं आर्कोटवर पाठविले. क्लाइव्हनें आर्कोट घेतलें ही बातमी लोकांत पसरल्याबरोबर महंमदअलीस धीर आला. तिन्हाईत मंडळी महंमदअलीस येऊन मिळूं लागली, व राजासाहेबाचे हातून काय पराक्रम होतो इकडे सर्वांचे डोळे लागले. इकडे जॅक्स लॉनें कांहीं ना कांहीं सबब काढून त्रिचनापल्लीवर हल्ला तर केला नाहींच, उलट अत्यंत ढिलाई करून आपलें व फ्रेंचांचें नुकसान करून घेतलें. असा नालायक अंमलदार डुप्ले यास मिळाला, हें त्याचें मोठें दुर्दैव होय.

पुढें राजासाहेबानें येऊन आर्कोटला वेढा घातला, त्यांत क्लाइव्ह व त्याचे मूठभर लोक कोंडले गेले. ह्या प्रसंगीं क्लाइव्हच्या लोकांनीं मोठ्या शौर्यानें आपला बचाव करून शत्रूंस दाद दिली नाहीं. अनेक वेळां शत्रूंच्या माऱ्यांतून क्लाइव्ह मोठ्या नशिबानें वांचला. कित्येक वेळां जवळ उभे असलेले लोक गोळ्या लागून मेले, पण स्वतः त्यास इजा झाली नाहीं. तोफांच्या मारानें किल्ल्याचे तट बहुतेक पडून गेले. जरा ज्यास्त नेटानें त्यांनीं आपलें काम केलें असतें तर क्लाइव्हचा साफ पाडाव झाला असता. पण राजासाहेबाच्या ढिलाईनें क्लाइव्ह ह्यास आपला बंदोबस्त करण्यास सांपडे. तटास भोक पडल्याबरोबर एकदम राजासाहेबानें आंत हल्ला केला नाहीं. अन्न-सामुग्री संपल्यावर इंग्रज सहज आपल्या हातीं पडतील असें वाटून तो स्वस्थ राहिला.

इकडे क्लाइव्ह हरप्रयत्न करीतच होता. त्यानें अनेक हेर व अनेक एतद्देशीय लोक आपलेसे करून ठेविले होते, ते त्यास बाहेरची बातमी गुप्तपणें आणून पोंचवीत. क्लाइव्ह मोठ्या शिकस्तीनें आपला बचाव करीत

आहे हें पाहून, बाहेरच्या मंडळीस त्याची शाबास वाटली. पुढें विलायतेहून ज्यास्त फौज येऊन ती सॉंडर्सनें आर्काटवर रवाना केली. मुरारराव घोरपडे आपल्या मदतीस येणार अशी बातमी राजासाहेबास समजल्यावर, त्यानें क्लाइव्हला आपल्या स्वाधीन होण्याचा निरोप पाठविला. तो निरोप क्लाइव्हनें झिडकारून टाकिला. तेव्हां मोहोरमच्या दिवशीं एकदम हल्ला करून किल्ला काबीज करण्याची तजवीज राजासाहेबानें केली. पण ह्या बेताची इत्थंभूत बातमी लगेच क्लाइव्ह ह्यास कळली. राजासाहेबानें अनेक वेळां निग्रहानें हल्ले केले. पण आंतील लोकांनीं त्यास जोरानें मागें फिरविलें. राजासाहेबाचे चारशें लोक पडले. एकदां पहिल्या प्रयत्नांत लोकांनीं कच खाल्ली, कीं फिरून तोच प्रयत्न करण्यास एतद्देशीय फौजा सहसा धजत नाहींत, असा ह्या इंग्रजांस अनेक वेळां अनुभव आलेला आहे; आणि एतद्देशीय फौजांचा अनेक प्रसंगीं पराभव होण्याचें कारण इंग्रज ग्रंथकारांच्या मतें हेंच आहे. हीच अवस्था राजासाहेबाची झाली. शेवटीं तो वेढा उठवून चालता झाला, (नोव्हेंबर २४).

अशी ह्या आर्काटच्या वेढ्याची हकीकत आहे. ह्या पुढील इतिहासांत अशा प्रकारच्या लढायांचीं वर्णनें वारंवार यावयाचीं आहेत. शेंदोनशें लोकांनीं चार पांच हजार फौज अंगावर आली असतां, मोठ्या शौर्यानें आपला बचाव केला, ह्या गोष्टीबद्दल इंग्रजांस धन्यता वाटली, ह्यांत नवल नाहीं. पण त्या वेळीं तरी एकंदर एतद्देशीय लोकांच्या मनावर ह्या वेढ्याचा परिणाम विलक्षण झाला.

आर्काटच्या वेढ्यासारखे अनेक प्रसंग इंग्रज लेखक स्वराष्ट्रियांच्या भूषणार्थ खुलवून लिहीत असतात. पण सामान्यतः जो माणूस विजयी होतो, त्याचे पोवाडे गाइले जावे हा मनुष्यधर्म आहे. ऐतिह्यासिक दृष्ट्या त्यांत इतकीच उणीव आहे, कीं विरुद्ध पक्षाकडील तितकीच कच्ची हकीकत वाचकांपुढें येत नाहीं. वरील आर्काटच्या वेढ्यांतच क्लाइव्हच्या प्रत्येक हालचालीची जशी आपणांस इत्थंभूत हकीकत मिळते, तशी राजासाहेबाच्या हालचालींचीही आपणास मिळाली पाहिजे. नाहीं तर, हा प्रकार एकदेशीय होतो हें ध्यानांत ठेविलें पाहिजे.

दुसरा एक मुद्दा असा, कीं हरएक प्रसंगीं एतद्देशीय लोक सर्व प्रकारच्या गुप्त बातम्या परकीयांस देत होते, व देशद्रोहाचे व स्वामिद्रोहाचे अनेक उद्योग बिनदिक्कत तडीस नेत होते, ह्यावरून सामान्यतः ह्या देशच्या लोकांत राष्ट्रीय अभिमान विशेषसा दिसून येत नव्हता हें तर उघड आहेच; पण त्रिचनापल्लीचा वेढा चालू असतां, ऐन आणीबाणीच्या प्रसंगीं, म्हैसूरकर, गुत्तीकर, तंजावरकर, पुदुकोट्टेकर वगैरे अनेक सत्ताधीश दोन राष्ट्रांचा झगडा पाहत जवळ उभे राहतात, झगडणाऱ्या परकीय राष्ट्रांपैकीं विजयी कोण होतो, ह्याची वाट पाहत स्वस्थ बसतात, जो विजयी होईल त्याचा पक्ष स्वीकारण्याची अपेक्षा ठेवितात, पण अंगांत शक्ति असतां, ह्या परकीय लोकांनीं आपल्या मुलखांत काय म्हणून झगडावें ह्याचा विचार करीत नाहींत, मग प्रतीकार कोठचा! अशी स्थिति त्या वेळीं मोठमोठ्यांच्या मनाची झाली होती हें उघड होतें.

हा आर्काटचा वेढा हिंदुस्थानांतील इंग्रजांच्या इतिहासांतला पहिलाच मोठा प्रसंग असल्यामुळें इंग्रजी इतिहासांत त्याची मोठी ख्याति आहे. ह्या प्रसंगानें मागील युद्धाचें व घडामोडींचें स्वरूप अगदीं बदलून गेलें. फ्रेंचांची बाजू खालीं जाऊं लागली आणि इंग्रजांची वर येऊं लागली. वर अंमलदार इंग्रज असला म्हणजे त्याचे हुकूम अक्षरशः पाळून जिवाची पर्वा न करितां एतद्देशीय फौज पाहिजे तीं अचाट कृत्यें करण्यास कचरत नाहीं, ह्या एतद्देशीयांच्या मोठ्या गुणाची पहिली परीक्षा आर्काट येथें झाली; आणि तेव्हांपासून आजपावेतों ते हा आपला अमूल्य गुण हरएक प्रसंगीं प्रगट करीत आहेत. ह्या गुणाचा फायदा घेऊन इंग्रजांनीं हिंदुस्थानचें राज्य कमाविलें; ह्याच गुणावर आज ते त्याचें संरक्षण करीत आहेत. कसाही आणीबाणीचा प्रसंग आला तरी आमची हिंदुस्थानची फौज ह्या आपल्या कर्तव्यापासून कधींही पराङ्मुख झाली नाहीं. लढाईचा निकाल फौजेच्या नुसत्या संख्येवर अवलंबून नाहीं; लष्करी कवाईत व दृढ निश्चय ह्या दोन गुणांनीं वाटेल ते पराक्रम करितां येतील, ही गोष्ट एतद्देशीय लोकांच्या मनावर आर्काट येथें

प्रथम बिंबली, आणि आर्काट येथेंच इंग्रज अधिकाऱ्यांच्या ती प्रथम स्पष्ट निदर्शनास आली. ती क्लाइव्हच्या लक्ष्यांत बरोबर येतांच त्यानें तिचा उपयोग करून घेतला, व त्याच युक्तीचा पुढें हरएक प्रसंगीं इंग्रज सेनापतींनीं व मुत्सद्यांनीं उपयोग केला. सारांश, इंग्रजी राज्यस्थापनेचा जन्म आर्काट येथें झाला, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

ता. ४ ऑक्टोबर स. १७५१ रोजीं राजासाहेबानें आर्काटला वेढा घातला, तो ता. २५ नोव्हेंबरपर्यंत पन्नास दिवस चालला. ह्या वेळांत आंतील इंग्रज फौजेवर नाना तऱ्हेचीं संकटें आलीं. त्यांची अन्नसामुग्री संपली, त्यांचे बरेच लोक पडले, पण एतद्देशीय लोकांनीं आपल्या इंग्रज भाईवर अत्यंत प्रेम दाखविलें. शिजलेला भात युरोपियनांस देऊन आपण नुसते पेजेवर राहिले. अशा प्रकारचें त्यांनीं जें साह्य केलें तें चिरस्मरणीय आहे. आर्काटचा वेढा उठल्याबरोबर युद्धाचें सर्व पारडें फिरलें. क्लाइव्हनें राजासाहेबास विश्रांति दिली नाहीं. तो लगेच त्याचे पाठलागास निघाला. डुप्लेस ह्या प्रकारानें मोठी चिंता उत्पन्न झाली. त्याला आशा होती, कीं त्रिचनापल्ली हातीं येईपर्यंत राजासाहेब क्लाइव्ह यास कसाबसा थाबवूं शकेल. पण ती आशा फुकट जाऊन क्लाइव्ह बाहेर पडल्यावर तो लगेच शिरजोर होऊन, जिकडे तिकडे शत्रूचा मोड करण्याचे उद्योगास लागला. वरील लढाईनें उत्तरआर्काट प्रांत क्लाइव्हच्या आटोक्यांत आला, आणि एतद्देशीय अंमलदार मुरारराव घोरपडे, तंजावरकर वगैरे तटस्थ होते. ते अंतरंगांतून इंग्रजांच्या बाजूस वळले. या दोघांनीं इंग्रजांचा पक्ष घेतल्यामुळेंच वरील युद्धाचा निकाल त्यांचे तर्फेचा झाला. ( पहा, इ. सं. तंजावरचा इतिहास, व तंजावरचा शिलालेख पृ. ८५–९२ ).

**७. चंदासाहेबाचा शेवट.**—त्रिचनापल्लीच्या वेढ्याचें काम समाधानकारक चाललें नाहीं. वरचेवर नवीन युक्त्या सांगून दुरून हिंमत देण्यापलीकडे डुप्लेस कांहींच करितां येईना. सोन्यासारखा वेळ जॅक्स् लॉनें फुकट घालविला. कोप व जिंजेन हे दोघे इंग्रज सेनापति वेढ्यांत सांपडले

होते. एकदां कोप यास गोळी लागून तो पडला, तरी जिंजेन ह्यानें गडबड न करितां धीर धरून स्वस्थ बसण्यापलीकडे ज्यास्त कांहीं केलें नाहीं. उलट लॉच्या वेडेपणानें म्हैसूरची फौज, मराठे, वगैरे फ्रेंचांचे विरुद्ध वागूं लागले. क्लाइव्ह यास नवीन मदत पुष्कळ मिळाली. नंतर त्यानें आर्काटचा बंदोबस्त केला; आणि राजासाहेबाचा पाठलाग करून त्यानें अरणी येथें त्याचा चांगलाच पराभव केला, ( स. १७५१ ). सन १७५१च्या अखेरीस क्लाइव्ह फोर्ट सेंट डेव्हिडला गेला; आणि तेथून त्रिचनापल्लीच्या मदतीस जाणार होता, इतक्यांत अरणी येथें पराभव झाल्यावर राजासाहेब पांदिचरीस जाऊन डुप्लेस भेटला. तेथें दोघांनीं पुढील बेत ठरविले; आणि आर्काट प्रांत परत घेण्याची सिद्धता केली. फ्रेंचांची मदत घेऊन राजासाहेब अनेक ठिकाणें काबीज करीत मद्रासेवर आला. ह्या वेळीं त्यानें मद्रासेवर हल्ला केला असता, तर सर्व खेळ आटोपला असता. पण राजासाहेबानें तसें केलें नाहीं. तथापि आर्काट प्रांतांत शिरून त्यानें क्लाइव्हची पूर्वीची सर्व कामगिरी उलटून टाकिली. हें क्लाइव्ह ह्यास कळतांच तो पुनः थोडीशी फौज घेऊन, राजासाहेबाचे पाठलागास निघाला. रस्त्यांत कांचीवरं काबीज करून पुढें जाणार तों ' कावेरीपाक ' ह्या गावीं राजासाहेबाची व फ्रेंचांची फौज त्यास आडवी आली, (ता.२३ फेब्रुवारी १७५२). त्या ठिकाणीं इंग्रजांची फौज अगदींच थोडी असल्यामुळें क्लाइव्हवर भयंकर प्रसंग बेतला होता. आर्काटच्या वेळेपेक्षांही येथची वेळ आणीबाणीची होती. पण क्लाइव्हनें स्वभावास अनुसरून धाडस केलें. लढाई चालू असतां क्लाइव्हनें थोडे लोक निराळ्या मार्गानें फ्रेंचांच्या तोफखान्याच्या मागील बाजूस पाठविले. त्यांनीं फ्रेंच तोफा बंद पाडिल्या, आणि क्लाइव्ह यास जय मिळाला. परिणामावरून ह्या लढाईचें महत्व इतिहासकार फार मानितात. हिंदुस्थानांत इंग्रजांचें वर्चस्व होणार कीं फ्रेंचांचें होणार, ह्याचा खरा निकाल ह्या लढाईनें लागला. क्लाइव्हच्या उद्योगाची सर्व किल्ली त्याच्या धाडसांत होती, हें ह्या लढाईत निदर्शनास आलें.

पुढें क्लाइव्ह आर्काटला जाऊन पुनः फोर्ट सेंट डेव्हिड येथें गेला. रस्त्यांत त्यानें डुप्लेचें नवीन शहर व विजयस्तंभ मोडून टाकिला. पुढें ता.

२५ मार्च सन १७५२ रोजीं तो मद्रासेहून निघाला. इतक्यांत इंग्लंडाहून मेजर लॉरेन्सही परत येऊन त्यानें फौजेचें मुख्य काम पत्करिलें. त्याची फौज ४०० युरोपियन, ११०० एतद्देशीय व ८ तोफा इतकी झाली. डुप्लेनें शिकस्त करून लॉ ह्यास मदत पाठविली, पण उपयोग झाला नाहीं. उलट आजूबाजूचे सर्व लोक फ्रेंचांचा व चंदासाहेबाचा पक्ष सोडून भराभर इंग्रजांस व महंमदअलीस मिळूं लागले. लॉनें मेजर लॉरेन्स ह्यास अडविण्याचा प्रयत्न केला तो सिद्धीस न जातां इंग्रज फौज महंमदअलीस येऊन मिळाली. हें वर्तमान ऐकून डुप्लेची अत्यंत निराशा झाली. त्याचे सर्व मनोरथ जमीनदोस्त झाले. तथापि न डगमगतां त्यानें शक्य ती तजवीज चालविली. त्यानें डोटिल यास लॉचे मदतीस पाठविलें. डोटिल अनुभवी होता, पण वयानें व व्याधीनें पीडिलेला असल्यामुळें त्यास त्राण राहिलें नव्हतें. इकडे लॉनें वेडेपणा करून वेढा उठवून परत निघून येण्याऐवजीं कावेरी नदींत श्रीरंग म्हणून बेट आहे तेथें फौजेसह तळ दिला. तेव्हां तो इंग्रजांच्या चांगलाच तावडींत सांपडून, त्यांनींच त्यास अनायासें वेढा घातला. चंदासाहेबास हा बेत पसंत पडला नाहीं; पण काय होईल तें होवो, आपले दोस्त फ्रेंच जातील तिकडे आपण जावयाचें, अशा निश्चयानें तो वागला. त्यामुळेंच पुढें तो जिवासही मुकला. डोटिल मदत घेऊन येत असतां, क्लाइव्हनें रस्त्यांत गांठून त्याचा पराभव केला; तेणेंकरून तो लॉच्या साह्यास येऊं शकला नाहीं. देवळांत कोंडल्यामुळें चंदासाहेबाची व लॉची अवस्था कठीण झाली. शत्रूंच्या स्वाधीन होण्याशिवाय दुसरा मार्ग राहिला नाहीं. नुसते फ्रेंचच स्वाधीन झाले असते तर त्यांचें कांहीं नुकसान नव्हतें. कारण ह्या वेळीं इंग्रजफ्रेंचांचें युद्ध नसल्यामुळें फ्रेंचांस कैद करून ठेवणें इंग्रजांस शक्य नव्हतें. पण चंदासाहेबाचा मात्र सर्वस्वी नाश होण्याची वेळ आली. महंमदअलीच्या हातांत तो पडेल तर मृत्यूशिवाय गतिच नव्हती. त्याचा बचाव करण्याची विवंचना लॉ ह्यास लागली असतां, तंजावरच्या राजाचा सेनापति मानाजी* जगताप यास पैसे भरून त्यानें चंदासाहेबास बाहेर

* टीप—याचीं नांवें इंग्रज लेखकांनीं माणकोजी, माणकजी म्हणून दिलीं आहेत तीं खरीं नाहींत. तंजावरच्या शिलालेखांत चंदासाहेबाच्या मृत्यूची हकीकत विस्तारानें दिली आहे, पृ. ८९–९२.

काढून सुरक्षितपणें पोंचवावें असा बेत ठरविला. मानाजीनें ठरलेली रक्कम घेतली व चंदासाहेबाचा जीव बचावण्याची शपथ घेतली. त्याचप्रमाणें चंदासाहेब पालखींत बसून मानाजीच्या छावणींत आल्यावर, त्यास एकदम बिड्या ठोकण्यांत आल्या. दुसऱ्या दिवशीं चार प्रमुख मंडळी एकत्र जमली, त्यांत मेजर लॉरेन्स हजर होता. पहिल्या दिवशीं निकाल झाला नाहीं. मेजर लॉरेन्स त्यास आपल्या ताब्यांत घेण्यास तयार होता. पण दुसरे दिवशीं त्यानें कानावर हात ठेवून आपलें अंग त्या प्रकरणांतून काढून घेतलें. तेव्हां त्याच दिवशीं मानाजीच्या हुकुमानें चंदासाहेब ठार झाला व त्याचें डोकें महंमदअलीकडे पाठविण्यांत आलें ( ३ जून स. १७५२ ). इकडे लॉ व त्याची फ्रेंच फौज इंग्रजांचे स्वाधीन झाली, आणि महंमदअलीचे विरुद्ध लढणार नाहीं अशी शपथ घेतल्यावर त्यांस सोडण्यांत आलें. ह्याप्रमाणें ता. १३ जून स. १७५३ रोजीं ७८५ फ्रेंच शिपाई, ३५ अंमलदार, व दोन हजार एतद्देशीय शिपाई इंग्रजांच्या स्वाधीन झाले. इंग्रजांस ४१ तोफा मिळाल्या. ह्या परिणामाबद्दल डुप्लेलाच सर्वस्वी दोष देतां येत नाहीं; व त्यामुळें डुप्लेचे बेत अयोग्य होते असेंही ठरत नाहीं. उलट अत्यंत आणीबाणीच्या प्रसंगीं त्यानें अप्रतिम धैर्य व दृढनिश्चय दाखविला हें त्यास भूषणावह आहे. डुप्ले सेनापतीचें काम करण्यास लायक नव्हता, त्यामुळें सर्व भार त्यास दुसऱ्यावर टाकावा लागे. ह्या क्लाइव्ह व डुप्ले ह्यांजमधील मुख्य भेद ध्यानांत ठेवला म्हणजे या भानगडीचा उलगडा होतो.

इतका प्रसंग आला तरी डुप्ले डगमगला नाहीं. शिवाय विरुद्ध पक्षास जय मिळाल्यामुळें त्यांजमध्यें तंटे व भांडणें लागलीं. तंजावरचा राजा, म्हैसूरचा राजा व मुरारराव घोरपडे महंमदअलीचे साथीदार होते; त्यांजमध्यें फूट पाडून शत्रूंचा जोर कमी करण्याचा डुप्लेनें उद्योग चालविला. तो सिद्धीस जाऊन हे साथीदार महंमदअलीस सोडून गेले. इतक्यांत डुप्ले यास युरोपांतून मदत आली, तिच्या योगानें त्यानें इंग्रजांचा एक दोन ठिकाणीं पराजय केला. ह्याप्रमाणें त्रिचनापल्ली काबीज झाल्यापासून दोन महिन्यांचे आंत डुप्लेनें

बरीच सांवरासावर केली. ह्याच संधीस आपणास कर्नाटकचा नबाब नेमल्याचा सलाबतजंगाचा हुकूम डुप्लेस मिळाला, त्यावरून नबाबगिरीचे सर्व अधिकार चंदासाहेबाचा मुलगा राजासाहेब ह्यास डुप्ले देणार होता, पण राजासाहेब हें अवघड काम अंगावर घेण्यास खुषी नसल्यामुळें, चंदासाहेबाचा साडू मूर्तुजाअली ह्यास तें काम त्याने दिलें. ह्या कृत्यांनीं मेजर लॉरेन्स आजारी होता तो चिडून गेला, व एकदम पांदिचरीवर चालून आला. रस्त्यांत बाहूर येथें उभयपक्षांची लढाई होऊन इंग्रजांस जय प्राप्त झाला; आणि तींत फ्रेंचांचा सेनापति कर्जीन ( Kerjean ) दोनशें लोकांसह इंग्रजांचे हातांत सांपडला. इंग्रजांचे ८० लोक मेले. तथापि मुरारराव व म्हैसूरवाले उघडपणें इंग्रजांस सोडून फ्रेंचांस मिळाले. इकडे क्लाइव्हनें कोव्हलंग व चिंगलपट हे दोन किल्ले काबीज केले. पण पुढें लवकरच तब्यत बिघडून क्लाइव्ह युरोपास निघून गेला, ( स. १७५३ फेब्रुवारी ). ह्याप्रमाणें स. १७५१–५२ ची मोहीम संपली. विलायतेस जाण्यापूर्वी क्लाइव्हनें मद्रासेस त्याच्या एका स्नेह्याची बहीण मिस मास्कलिन ह्मणून होती तिच्याशीं लग्न केलें; आणि बायकोस बरोबर घेऊन तो इंग्लंडास गेला. गेल्या चार दोन वर्षांच्या धामधुमींत त्यानें दोन लाखांची पैदास केली होती.

वरील युद्धांत डुप्लेचा नकशा बराच उतरला, तरी पण त्याचें वजन किंवा महत्व फारसें कमी झालें नाहीं. त्याच्या सर्व कृत्यांबद्दल फ्रेंच कंपनीकडून त्यास मोठी शाबासकी आली. वास्तविक पाहतां इंग्रज कंपनीच्या चतुर्थांशाइतकी सुद्धां फ्रेंच कंपनीची ऐपत नव्हती; आणि इंग्रजांप्रमाणें फ्रेंचांस पैशाची व इतर मदत मुळींच मिळत नसे. शिवाय डुप्लेस आतां कर्नाटकचें राज्य प्राप्त झालें आहे, तेव्हां त्यास काय कमी आहे, अशी फ्रेंच कंपनीची समजूत होऊन, तिनें त्यास मदत पाठविली नाहीं. उलट डुप्लेच आपणास पैशाचा पुरवठा करील अशी त्यांची समजूत होती. फ्रान्समधील मुत्सद्यांस इतकें सुद्धां वाटलें, कीं आतां हिंदुस्थानचें राज्यपद खास आपणास मिळणार. परंतु अशी आशा वाटली ह्मणूनच त्यांनीं डुप्ले त्यास त्या प्रसंगीं चांगली मदत

केली पाहिजे होती. स. १७५१त दोन तीन हजार फ्रेंच लोक पांदिचरीस आले असते तर हा कार्यभाग उरकला असता. दोन तीन हजार लोक पाठविण्यास फ्रेंच सरकार असमर्थ नव्हतें. परंतु डुप्लेस आतां राज्य प्राप्त झालें आहे ह्या समजावर त्यांनीं नेहमींची ठरलेली मदत सुद्धां त्यास पाठविली नाहीं; आणि लॉसारखा अजागळ सेनापति पाठवून दिला. सारांश, अशा सर्व अडचणींतून डुप्लेनें जी कामगिरी केली तिजबद्दल प्रत्यक्ष इंग्रजांनीं सुद्धां त्याची वाहवा केली आहे. मेजर लॉरेन्स म्हणतो, 'डुप्लेचें धैर्य सहसा खचत नसे; आपल्या अंगांतील धमकेनें वाटेल तो प्रसंग तो निभावून नेई; त्याचें डोकें शांत व कल्पक होतें. स्वदेशाच्या हितासाठीं त्यानें स्वतःच्या पदरचे निदान १४ लाख रुपये तरी खर्च केले. स्वदेशापुढें त्यास स्वहिताची परवा वाटत नसे. वास्तविक त्याचें धैर्य संकटसमयीं खुलून दिसे. वाटेल त्याजवर त्याची छाप तेव्हांच बसे; व ह्याच कारणास्तव इंग्रज लोक महंमदअलीचा व त्याचा विशेष संबंध येऊं देत नसत. महंमदअलीनें तर डुप्लेस असेंच लिहून पाठविलें, कीं 'काय करावें, मी माझा मुखत्यार नाहीं.' इकडे डुप्लेचे मनोरथ सिद्धीस जाण्याच्या ऐन भरांत आले असतां, क्लाइव्हसारखा अद्वितीय पुरुष इंग्रजांचे तर्फेनें त्याजबरोबर सामना करण्यास पुढें यावा, हा केवळ त्याच्या ग्रहदशेचा योग किंवा इंग्लंडच्या सुदैवाचा जोर होय. तथापि कर्नाटकांत जरी फ्रेंचांचें बरेंच नुकसान झालें, तरी निजामच्या दरबारीं बुसीच्या कर्तृत्वानें फ्रेंचांचें महत्व चांगलेंच स्थापन झालें होतें.

महंमदअलीपेक्षां चंदासाहेब फारच कर्तृत्ववान होता. तो शूर व शहाणा होता. अन्वरुद्दीनपेक्षांही तो पुष्कळ चांगला होता. वास्तविक कर्नाटकची नबाबगिरी त्यासच मिळाली पाहिजे होती. पण हल्लीं जो झगडा चालला होता, तो कर्नाटक प्रांतास चांगला नबाब मिळवून द्यावा, ह्याबद्दल नसून, कर्नाटक प्रांताबद्दल होता. इंग्रज म्हणत हा प्रांत आपणांस पाहिजे, आणि फ्रेंच म्हणत आपणांस पाहिजे. महंमदअलीस पुढें करून चंदासाहेबास अडथळा करण्यांत इंग्रजांनीं असा स्वार्थ पाहिला, तसाच केवळ फ्रेंचांचा नव्हता.

लोकांची थोडी बहुत तरी सोय करून द्यावी अशी फ्रेंचांची[१] इच्छा होती, हें ऑर्मेही कबूल करितो. महंमदअलीचा पक्ष घेण्यांत इंग्रजांचा हेतु शुद्ध नव्हता. कारण महंमदअली पुढें कसा निघाला, आणि इंग्रजांनींच त्यास कसें वागविलें, हें प्रसंगानुसार विदित होईलच.

---

# प्रकरण अठरावें.

## फ्रेंच, निजाम व मराठे.

स. १७५१-१७५७.

१. निजामाजवळ बुसीचें वजन.   २. डुप्लेचा शेवट ( स. १७५४ ).
३. गोदेहू व डिलेरी.   ४. डुप्लेच्या कारभाराची मीमांसा.

**१. निजामाच्या दरबारीं बुसीचें वजन** ( स. १७५१-१७५३ ).- सलाबतजंगास निजामी देऊन बुसी औरंगाबादेस दाखल झाला हें मागें सांगितलेंच आहे. हा सलाबतजंग मयत निजामाचा तिसरा मुलगा असून, त्याचा वडील भाऊ गाजीउद्दीन हा दिल्लीच्या कारभारावर होता. नासीरजंगास निजामी मिळाली ही गोष्ट गाजी-उद्दीन ह्यास पसंत होती; पण नासीरजंग व मुजफरजंग दोघेही नाहींसे होऊन सलाबतजंग पुढें आला, आणि फ्रेंचांचें वर्चस्व स्थापन झालें, ही गोष्ट त्यास व मराठ्यांस आवडली नाहीं. पश्चिम किनाऱ्यावर पोर्तुगीझांचा अंमल नाहींसा झाला नाहीं, तोंच पूर्व किनाऱ्यावर व मराठशाहीच्या सरहद्दीवर दुसरे युरोपियन लोक उगवले, ही गोष्ट मराठ्यांस सहन होणारी नव्हती. निजामाच्या सरहद्दीवर उत्तरेकडे भोसले व पश्चिमेकडे पेशवे ह्या दोघांसही फ्रेंच सत्तेबद्दल वैषम्य वाटणें साहजिक होतें. मराठे हिंदु-

पदपातशाही मिळविण्याच्या उद्योगास लागले होते, व हा प्रयत्न सिद्धीस नेण्यास पेशवा बाळाजीराव सर्व बाजूंनीं प्रयत्न करीत होता. दिल्लीस गाजीउद्दिनानें मराठ्यांच्याच मदतीनें कारभार चालवून त्यांच्याशीं सख्य ठेविलें होतें. तेव्हां पेशव्यानें गाजीउद्दीन यास दक्षिणेंत येण्याची भर देऊन निजामशाही हस्तगत करण्याची मसलत दिली. ही मसलत मराठ्यांचा सरदार मल्हारराव होळकर याचे मार्फत चालली, व गाजीउद्दिनाचा दक्षिणेंत येण्याचा विचार ठरला. पण दिल्लीच्या भानगडींतून निघून येण्यांत गाजीउद्दिनाचे बरेच दिवस मोडले. दिल्लीचा बंदोबस्त करून तो मराठ्यांची मदत घेऊन स. १७५२ च्या सेप्टेंबरांत औरंगाबादेस येऊन दाखल झाला. त्या वेळेस त्याजबरोबर दीड लाख फौज होती. दिल्लीस मराठ्यांचें प्रस्थ मोडण्याचा रोहिले वगैरे अफगाणांनीं प्रयत्न चालविला, तद्वतच फ्रेंचांचें वजन दक्षिणेंतून कमी करण्याचा मराठ्यांचा हा प्रयत्न होता. पण तत्पूर्वी दक्षिणेंत बुसीनें काय उद्योग केला तें सांगितलें पाहिजे.*

थोड्याशा लोकांनिशीं बुसीनें निजामास अनेक अडचणी सोसून औरंगाबादेस आणिलें, एवढ्यानेंच त्याची दहशत जिकडे तिकडे बसली. जणूं काय, निजामाचा तो एक कुटुंबीयच बनला. त्याच्याशिवाय निजामाचें एक क्षणभर चालेनासें झालें. त्यानें औरंगबादच्या किल्ल्यांत एका बाजूस आपल्या फौजेचें ठाणें दिलें, आणि सर्व तंट्यांचा अखेर निकाल लष्करी जोरावर व्हावयाचा हें तत्त्व जाणून, त्यानें आपल्या छावणींत सर्व बंदोबस्त केला. सभोंवार तोफा वगैरे लावून त्यानें आपली फौज अक्षय जय्यत तयारीनें ठेविली. फौजेंत कडक शिस्त ठरवून ती त्यानें अमलांत आणिली; त्यामुळें मद्यपान, भांडणें वगैरे बंद होऊन, फ्रेंचांची छावणी म्हणजे अतिसुरक्षित जागा अशी सर्वांची खात्री होऊं लागली. निजाम स्वतः व्यसनी व नेभळा होता, तेव्हां त्याजवर आपलें वजन बसवून मोठ्या युक्तीनें बुसीनें सर्व कार-

* टीप—मराठ्यांच्या इतिहासांत नानासा. पेशव्याच्या हकीकतींत या वेळच्या अनेक कारस्थानांचें वर्णन आहे तें येथें ध्यानांत ठेविलें पाहिजे.

भार आपल्या हातांत घेतला, पण त्याबद्दल लोकांस वैषम्य वाटूं नये म्हणून स्वतःची शेखी त्यानें मिरविली नाहीं. किंवा लोकांस आपलें वर्चस्व भासूं दिलें नाहीं. आपली फौजही निजामाच्या छातीवर दडपण आहे असें त्यानें निजामास वाटूं दिलें नाहीं. इकडे तर आपण कोणी नव्हे, पण इकडे आपल्या संमतीशिवाय पान हालूं नये, अशा प्रकारची बुसीची व्यवस्था होती. डुप्लेशीं अगोदरच संगनमत करून ही सर्व तजवीज व हा वर्तन-मार्ग त्यानें पूर्वींच ठरवून ठेविला होता. बुसीजवळ लष्करी सामर्थ्य होतें, व प्रसंग आला तर तें लष्करी सामर्थ्य लोकांस दाखवून आपलें काम कर-ण्याची धमक त्याच्या अंगांत होती. अशी सर्व सोय जमून आल्यावर आपलें राज्य येथें कायमचें स्थापण्यास कोण म्हणणार नाहीं ? " कर्नाटक तर हातांत आहेच व दक्षिणचें राज्य आटोक्यांत आलें आहे, आतां तेथून दिल्लीवर भरारी मारण्यास काय उशीर लागणार आहे ! ' अशा प्रकारचे मनोरथ डुप्ले व बुसी ह्यांचे चित्तांत खेळूं लागले. बुसी औरंगाबादेस ठाणें देऊन राहिला तो केवळ निजामाचें संरक्षण करण्याकरितां नव्हे, तर कर्नाटकांत डुप्लेनें स्थापिलेलें फ्रेंचांचें वजन पुढें वाढविण्याकरितां. नबाबास आपल्या फौजे-शिवाय गत्यंतर नाहीं, व आपलें वजन नबाबाशिवाय कायम राहणार नाहीं, असा हा परस्परावलंबी योग असल्यामुळें, बुसी व डुप्ले यांचें चांगलेंच फावलें. एवढी फायद्याची गोष्ट नजरेस आल्यामुळें, बुसी यास आपल्या जवळून कायमचा दूर पाठविणें डुप्लेस भाग पडलें. इंग्रज जवळ असतां, पांदिचरीचा बंदोबस्त ढिला पाडून डुप्लेनें बुसीस दूर पाठविलें, ही त्याची चूक होय, असें परिणामावरून वाटण्याचा संभव आहे. तथापि आरंभींच्या परिस्थितीवरून डुप्ले अगदीं निर्भय होता. लॉरेन्स विलायतेस होता. क्लाइव्हची योग्यता दिसून आली नव्हती; आणि डुप्लेचे बेत बहुतेक सिद्धीस गेल्यासारखे होते. क्लाइव्हसारखा अद्वितीय पुरुष त्या वेळेस इंग्रजांच्या बाजूस पुढें आला नसता, तर डुप्लेनें फ्रेंचांची सत्ता चिरस्थायी केली असती, असें अजूनही लोक कबूल करितात. तथापि मोठमोठ्या पुरुषांची सुद्धां

विचारशक्ति ऐन प्रसंगीं अंध होऊन जाते, ते विकारवश होऊन एकाद्या गोष्टीच्या नादीं लागले म्हणजे त्यांच्या उद्योगाची उलट बाजू त्यांस कळत नाहीं, हा मानवी धर्म होय. ह्या मानवी धर्मास अनुसरून डुप्लेनें मागला पुढला विचार न करितां भावी वैभवाच्या भरारींत आपली मुळांतली शक्ति हीन करून घेतली, आणि बुसीसारखा लढवय्या पांदिचरीहून दूर पाठविला. ह्यामुळेंच त्याचें पुष्कळ नुकसान झालें. बाकी निजामाच्या दरबारीं इतकें वजन कायम करण्यास बुसीइतका लायक इसम फ्रेंचांस मिळाला नसता. औरंगाबादेंत पाऊल ठेवल्या दिवसापासून युक्तियुक्तीनें त्यानें आपलें वजन अतिशय वाढविलें. फ्रेंचांच्या मदतीशिवाय आपलें क्षणभर चालावयाचें नाहीं अशी त्यानें सलाबतजंगाची पक्की समजूत केली. तसेंच सुभेदाराच्या जवळचे दिवाण वगैरे अधिकारी आपल्या तर्फेचे नेमून सर्व गोष्टी त्यानें आपल्याच हातांत ठेविल्या.

बुसी औरंगाबादेस अशी व्यवस्था करीत असतां, गाजीउद्दीन मराठ्यांचे मदतीनें निजामावर चालून येत आहे अशी बातमी आली. उत्तरेकडून दीड लाख व पश्चिमेकडून पेशव्यांची एक लाख फौज निजामावर येणार ही बातमी ऐकून, बुसीनें न डगमगतां त्यांच्याशीं समोर सामना करून विलायती कवाईत शिकलेली आपली फौज मराठ्यांसही भारी आहे, असें जगास उघडपणें दाखविण्याचा निश्चय केला. तो निजामास घेऊन औरंगाबादेहून बेदर येथें आला आणि तेथून पुण्यावर स्वारी करण्याची त्यानें तयारी केली. त्यामुळें पेशवा बाळाजीराव ह्यास बरीच धास्ती पडली. बुसी बेदर सोडून पुण्याचे रोखानें येत असतां बाळाजी त्यास अडविण्यास पुढें झाला. फ्रेंचांची व मराठ्यांची ही पहिली टक्कर होय. पेशव्याजवळ निवडक स्वारांची फौज चाळीस हजार होती. बाकीची त्यानें पुण्याच्या बंदोबस्तास मागें ठेविली.

मराठ्यांकडे ताराबाई व पेशवे ह्यांचें वांकडें होतें. पेशव्याचा पाडाव करण्यासाठीं ताराबाईनें निजामास उठवून पुण्यावर स्वारी करण्याची भर दिली होती. त्यावर निमाजाकडे भेद करण्याकरितां पेशव्यानें असें उठविलें, कीं बुसी हा निजामाचें राज्य घेण्याची खटपट करीत आहे. अशातीचीं अंतरस्थी

कारस्थानें चालू असतां, मराठ्यांचा पाठलाग करीत बुसी कुकडी नदीवर पेशव्याचा तळ होता तेथें आला. ता. २१ नोव्हेंबर स. १७५१ रोजीं रात्रीं चंद्रग्रहण असून, पेशव्याचे लोक स्नान व जप करण्यांत निमग्न असतां, बुसीनें एकदम तोफखाना आणून त्यांजवर तडाखा चालविल्याबरोबर, मराठे तसेच स्वार होऊन पळून गेले. ह्या वेळीं मराठ्यांचें फारसें नुकसान झालें नाहीं. दुसरें दिवशीं बुसीनें ढमढेऱ्यांचे तळेगांवावर हल्ला करून शहराचा नाश केला असतां, तेथेंच ता. २७ नोव्हेंबर रोजीं राणोजी शिंद्याचे मुलगे दत्ताजी व महादजी, आणि कोन्हेर त्रिंबक एकबोटे ह्यांनीं बुसीवर हल्ला केला, त्यांतही मराठ्यांस यश आलें नाहीं. पुढें ता. ९ डिसेंबर रोजीं मांडवगण येथें लढाई झाली तींत एकबोटे यानें विलक्षण पराक्रम केल्यामुळें मराठ्यांची बाजू राहिली. या प्रसंगीं एकबोटे यास 'फांकडे' असा किताब मिळाला. दुसऱ्या दिवशीं भिमेवरचें कोरेगांव बुसीनें काबीज केलें; तेथून पुणें वीस मैल राहिलें. बुसीच्या मनांत पुढें लढावयाचें होतें. पण सलाबतजंगास ती गोष्ट पसंत पडली नाहीं. गाजीउद्दिनाचा पाडाव झाला म्हणजे सलाबतजंगास पुरे होतें. गाजीउद्दीन त्वरेनें येत आहे, अशी बातमी आली, आणि मराठ्यांनीं याच वेळीं त्रिंबक किल्ला निजामाचे ताब्यांत होता तो काबीज केला, तेव्हां मराठेही तडजोडीचे बोलणें करीत होते, तें मान्य करून बुसी व निजाम युद्ध बंद करून गोवळकोंड्याकडे परत गेले. पुढें निजामाचा दिवाण रामदासपंत याचा स. १७५२च्या एप्रिलांत खून झाला; व सय्यद लष्करखान ह्यास निजामानें बुसीच्या सल्ल्यानें दिवाण नेमिलें. रामदासपंत फ्रेंचांचा जसा दोस्त होता तसा सय्यदलष्करखान नव्हता. हरप्रयत्न करून फ्रेंचांस आपल्या राज्यांतून घालवून द्यावें, अशी खानाची अंतस्थ खटपट होती; त्यासाठीं मराठे व इंग्रज ह्यांच्याशीं तो कारस्थानें करीत होता. परंतु बाह्यात्कारीं त्यानें बुसीला असें कांहीं प्रेम दाखविलें, कीं त्याच्या गोड भाषणास भाळून, त्यास दिवाण नेमण्याबद्दल बुसीनेंच निजामास सल्ला दिली.

गाजीउद्दीन सेप्टेंबर १७५२त औरंगाबादेस येऊन पोंचला. पुढील

वाटाघाट चालू असतां निजामुल्मुल्कची धाकटी बायको, निजामअलीची आई, औरंगाबादेस राहत होती, तिनें गाजीउद्दिनास आपल्या येथें मेजवानीस बोलाविलें आणि अन्नांत विष घालून त्यास ठार मारिलें. ह्याचप्रमाणें सलाबतजंगाचाही नाश करून आपल्या मुलास निजामी मिळावी असा तिचा घाट होता. गाजीउद्दीन मेल्यानें सलाबतजंगाचा एक शत्रु कमी झाला. नोव्हेंबर स. १७५२त मराठ्यांशीं तह करून त्यांस त्यानें वाटेस लाविलें. यास भालकीचा तह ह्मणतात. ह्या तहानें तापी व गोदावरी ह्यांजमधील मुलूख मराठ्यांस मिळाला; आणि भोसल्यानें वाइनगंगेच्या पलीकडे येऊं नये असें ठरलें. वरील युद्धांत युरोपीय तोफखान्याचें महत्त्व पेशव्याचे व सदाशिवरावाचे नजरेस इतकें आलें कीं पुढें त्यांनीं त्या कामासाठीं गार्दी तयार केले, तेणेंकरून दहा वर्षांत सर्व हिंदुस्थानभर पेशव्यांस आपलें वर्चस्व बसवितां आलें.

भालकीचा तह झाल्यावर पुढील दोन वर्षांत बुसीनें सलाबतजंगास औरंगाबादेकडून हैदराबादेस नेऊन तेथें अगदींच संपुष्टांत आणिलें. उत्तरहिंदुस्थानांतील बहुतेक राजेरजवाड्यांशीं बुसीचीं कारस्थानें चालू होतीं, व निजामाचे व्यवहार तर त्याच्याच मार्फत चालले होते. निजामाला हलका करावा हा बुसीचा बेत असून पेशव्यांचाही तसाच होता. ह्यामुळें निजामाचें नुकसान फार झालें. ह्याजबद्दलची तक्रार निजामानें डुप्लेकडे केली, पण डुप्लेनें ती मनावर घेतली नाहीं. बुसीनें नानासाहेब पेशव्याशीं स्नेह ठेवला होता. ह्या दोघांच्या खटपटीनें दक्षिणेंतील मोगलांचें राज्य बुडतें, असें मुसलमानांसही वाटूं लागलें होतें. शाहू छत्रपतीच्या मृत्यूनंतरच्या दहा वर्षांत सर्व हिंदुस्थान आक्रमण करण्याची मराठ्यांनीं जी मोठी जोराची उचल घेतली, तींतच 'सारी दक्षिण मोकळी करण्याचा' पेशव्याचा हा घाट होता. सलाबतजंगाच्या घरांत भावाभावांत कलह होता. शहानवाजखानासारखे राजद्रोही मुसलमान व जानबा निंबाळकरासारिखे दुटप्पी मराठे सरदार त्याच्या दरबारांत वावरत होते. बुसीसारख्या भुकेलेल्या परद्वीपस्थाच्या हातीं राज्याचीं मुख्य सूत्रें होतीं. ह्यामुळें निजामाचें राज्य बहुतेक लयास जाण्याची वेळ आली

ह्यांत नवल नाहीं. परंतु सलाबतजंग वांचला ह्याचें कारण बुसीला घालवून देण्याची बुद्धि त्याला झाली. नाहीं तर पेशवा व बुसी ह्यांनीं सलाबतजंगाची राळ उडवून दिली असती, ( रा. राजवाडे, खंड १ ). मराठ्यांचा पानपतावर पराभव झाला नसता तर कदाचित् इंग्रजफ्रेंचांचा निभाव हिंदुस्थानांत लागला नसता; आणि क्लाइव्हच्या कारस्थानांस फारशी जागा उरली नसती.

बुसीचा हा उद्योग चालू असतां डुप्लेशीं त्याचा पत्रव्यवहार एकसारखा सुरू होता. कर्नाटकांत फ्रेंचांची दुर्दशा होत चाललेली पाहून त्यास हळहळ वाटली; पण निजामशाहींतला डाव टाकून त्यास डुप्लेच्या मदतीस जातां येईना. मात्र कर्नाटकची नबाबगिरी डुप्ले यास देण्याचा हुकूम निजामापासून मिळवून त्यानें पांदिचरीस पाठवून दिला. सन १७५३ च्या आरंभीं निजामशाहीची सर्व व्यवस्था लागली असें बुसीस वाटलें, पण तो प्रकार टिकला नाहीं. बुसी एकाएकीं अतिशय आजारी पडला; आणि सर्व उद्योग सोडून विश्रांति घेण्यास त्यास मच्छलिपट्टण येथें जावें लागलें. त्या वेळीं गूपिल ( Goupil ) नांवाच्या आपल्या हाताखालच्या इसमांस त्यानें कारभार सोंपला. हा गृहस्थ साधा व तत्कालीन मसलती समजण्यास असमर्थ होता. तेव्हां सय्यदलष्करखानाच्या कारस्थानांस आयतीच संधि मिळाली. गूपिलच्या ढिलेपणानें फौजेंतली शिस्तबिघडून गेली. सय्यद लष्करखानानें फ्रेंच फौजेचा पगार वेळेवर दिला नाहीं, तेव्हां ते दंगा करण्यास प्रवृत्त झाले. त्यानें निरनिराळ्या सबबी काढून फ्रेंच फौजेच्या अनेक तुकड्या निरनिराळ्या ठिकाणीं पाठविल्या. पहिली घडी बिघडल्यावर सय्यद लष्करखान निजामास घेऊन परत औरंगाबादेस गेला. या दूरच्या ठिकाणीं त्याच्या संरक्षणास फ्रेंच फौज येणें अशक्य होतें. अशा प्रकारें फ्रेंचांची पांगापांग करून लष्करखानानें इंग्रजांशीं संधान करून त्यांची फौज बोलाविली. स. १७५३च्या अखेरीस इंग्रज फौज दक्षिणेंत यावयाची असें ठरलें. इंग्रजांस त्याजबद्दल लष्करखानानें लिहिलेलें एक पत्र फ्रेंचांच्या हातांत पडून तें डुप्लेस मिळालें, तेव्हां त्याच्या मनात लख्ख उजेड पडला. त्यानें लगेच बुसीस पत्र लिहून सर्व हकीकत कळविली, आणि कसेंही करून

मच्छलिपट्टण सोडून ताबडतोब निघून दक्षिणेंत जा, असें त्यास आग्रहपूर्वक लिहिलें. बुसीची प्रकृति नीट सुधारली नव्हती, तरी पण तो तसाच निघून गेला. त्यानें सर्व फ्रेंच फौज एकत्र केली आणि बनत्या त्वरेनें औरंगाबादेस प्रयाण केलें. तेथें निजामाची त्याची गांठ पडली. सय्यद लष्करखानास त्यानें बऱ्यावाइटाची कांहींच ओळख दिली नाहीं. पण तो काकुळतीस येऊन बुसीकरितां वाटेल तें करण्यास कबूल झाला. त्याचा फायदा घेऊन बुसीनें निजामाशीं नवीन तह केला, आणि फौजेच्या खर्चाकरितां म्हणून उत्तरसरकार प्रांत आपणाकडे लावून घेतला. ह्या प्रांताचें सालाचें उत्पन्न ४० लाख रुपये होतें. ह्या प्रांतांत ४७० मैल लांबीचा समुद्रकिनारा होता, तो फ्रेंचांचे ताब्यांत आला. गंजम, चिकाकोल, विजयनगर, विशाखापट्टण, कोरिंगा, यानान, मच्छलिपट्टण, एलोर व निजामपट्टण हीं त्या प्रांतांतलीं मोठीं शहरें त्यांस मिळालीं. हा तह ता. ४ डिसेंबर, स. १७५३ रोजीं झाला. सारांश, ह्या वेळीं कर्नाटकांत जरी फ्रेंचांचें बरेंच नुकसान झालें, तरी तें वरील फायद्यानें नुसतें भरून आलें, इतकेंच नाहीं, तर उलट फारच फायद्याचें झालें. तह झाल्याबरोबर बुसीनें थोडीशी फौज व अंमलदार पाठवून हा नवीन प्रांत ताब्यात घेतला व तेथील कारभार सुरू केला.

ही गोष्ट सय्यदलष्करखानास मुळींच आवडली नाहीं. त्याचे सर्व बेत फसून उलट फ्रेंच अतिशय प्रबळ झाले, आणि सर्वच निजामशाही ते काबीज करतात कीं काय असा रंग दिसूं लागला. तेव्हां नानातऱ्हेचे प्रयत्न करून फ्रेंचांचा पगडा कमी करण्याचे सय्यदलष्करनें प्रयत्न चालविले. परंतु बुसीपुढें त्याचें चालेना. निजामाची इतराजी झाली, तेव्हां नोकरीचा राजीनामा देऊन तो घरीं बसला. नंतर शहानवाजखान दिवाण झाला, त्यानें बुसीशीं सख्य ठेवून सर्व व्यवस्था फ्रेंचांचे तंत्रानें चालविली. तथापि भोसले व इतर मराठे सरदार ह्यांस फ्रेंचांचें वाढलेलें वजन खपलें नाहीं, तें कमी करण्यासाठीं सर्वांचे प्रयत्न अव्याहत चालू होते. पुढें निजामास घेऊन बुसी हैदराबादेस गेला. तेथें दोन महिने राहून बुसी मच्छलिपट्टणास निघून

गेला ( जून १७५४ ). जाण्यापूर्वी निजामानें दरबार भरवून 'आपण आम्हांस सोडून जाऊं नये, आपल्याशिवाय आमचें क्षणभर चालावयाचें नाहीं,' अशी त्यास आग्रहाची विनंति केली. ह्यावरून सलाबतजंगाचा भार फ्रेंचांवर किती होता हें व्यक्त होतें.

२. **डुप्लेचा शेवट** ( स. १७५४ ).—स. १७५२च्या अखेरपर्यंत डुप्लेच्या कृत्यांची हकीकत मागें आली आहे. स. १७५३त बुसी आपल्या राष्ट्राकरितां मुलूख पैदा करीत असतां, डुप्ले अनेक संकटें सोसून त्रिचनापल्ली काबीज करण्याच्या खटपटींत गुंतला होता. क्लाइव्ह युरोपास निघून गेला आणि फ्रान्सहून लाटुशच्या हाताखालीं मोठी मदत आली. हा लाटुश पूर्वी इकडे पराक्रम करून अनुभव मिळविलेला होता. परंतु डुप्लेच्या दुर्दैवानें ज्या जहाजावर तो येत होता, तें समुद्रांत आग लागून सर्व लोकांसह जळून खाक झालें, ( स. १७५२ ), त्यामुळें इंग्रजांची सरशी कायम राहिली; आणि त्यांचा सेनापति मेजर लॉरेन्स ह्यास स्फुरण आलें. मराठ्यांचा सरदार मुरारराव घोरपडे व म्हैसूरचा कारभारी नंदराज ह्यांस डुप्लेनें वश करून घेऊन त्रिचनापल्ली काबीज करण्याचा उद्योग सुरू केला. फ्रेंच सेनापति मेसिन ( Maissin ) म्हणून होता. त्या सर्वांनीं मिळून मेजर लॉरेन्सच्या फौजेस रसद वगैरे पोंचूं न देतां नुसते छापे घालून त्रास देण्याचा क्रम चालविला. ह्याप्रमाणें तीन महिनेपर्यंत लॉरेन्स अतिशय त्रासून गेला. त्रिचनापल्ली काबीज करण्याचे फ्रेंचांचे प्रयत्न सारखे चालू होते. मराठ्यांची व म्हैसूरची फौज श्रीरंग काबीज करून बसली होती. त्रिचनापल्लीचा बचाव करण्यास इंग्रज कामगार डॉल्टन हा होता. डॉल्टननें श्रीरंगवर हल्ला केला, पण त्यांत त्यास यश आलें नाहीं. पुढें डॉल्टनची सामुग्री संपली. तेव्हां लॉरेन्स त्याच्या मदतीस आला. त्यावर डुप्लेनें पांदिचरीहून निराळीच फौज पाठविली. मधून मधून मराठ्यांनींही इंग्रजांची कांहीं वेळां खोड मोडिली. पुढें दोनही फौजांचे तळ त्रिचनापल्लीजवळ येऊन पडले; व लहान मोठ्या अनेक चकमकी झाल्या, त्या बहुतेकांत फ्रेंचांचाच

पराभव होत गेला आणि लॉरेन्सनें मोठी करामत करून दाखविली. शेवटच्या लढाईत पुष्कळ फ्रेंच लोक इंग्रजांच्या हातांत सांपडले. एकसारखे पराभव होत गेल्यामुळें फ्रेंचांची हिंमत खचली. त्रिचनापल्ली काबीज होईना. हा झगडा एक वर्षावर चालला व डुप्लेस सुद्धां त्रिचनापल्लीचा नाद सोडून इंग्रजांशीं तह करण्याची इच्छा उत्पन्न झाली. युरोपांतूनही युद्ध बंद करण्याबद्दल त्यास लिहून येत होतें. खर्च अतोनात झाल्याबद्दल कंपनी ओरड करूं लागली होती; डुप्लेचे शत्रुही त्याजवर उठले होते. आपल्या राष्ट्रास फायदा तर कांहीं नाहीं, उलट डुप्लेच्या नादीं लागून व्यापाराचें मात्र नुकसान झालें, असें फ्रेंच कंपनीस वाटूं लागलें. सारांश, डुप्लेचे बेत व इकडच्या घडामोडी कांहीं एक समजून न घेतां, बऱ्यावाईट प्रसंगाबरोबर फ्रेंच सरकाराच्या मनाची चलबिचल होत होती. शिवाय डुप्लेस असें वाटूं लागलें, कीं अशा युद्धानें पार येणार नाहीं. तर थोडे दिवस विश्रांति घेऊन एतद्देशीय रजवाड्यांशीं नवीन कारस्थानें रचून मग इंग्रजांचा पाडाव करावा. बुसीनेंही हाच सल्ला दिला. निजामाच्या दरबारीं जरी बुसीचें वजन चांगलें होतें, तरी तें फार वेळ टिकणारें नव्हतें, ही गोष्ट प्रत्यक्ष बुसीच जाणत होता. ‘ म्हणून कसेंही करून इंग्रजांशीं तह करा ’, अशी टोंचणी त्यानें डुप्लेला लाविली होती. बुसी डुप्लेचा एवढा दोस्त बनला कीं त्यास दत्तक घेण्याचाही डुप्लेचा विचार झाला होता. बुसीसही ती गोष्ट कबूल होती. पण तहाच्या मुळाशीं कर्नाटकचा नबाब कोण हा मुख्य प्रश्न असून, त्याबद्दल इंग्रज फ्रेंचांची एकवाक्यता होणारी नव्हती. इंग्रज म्हणत महंमदअली नबाब; डुप्ले म्हणे, आपण नबाब. तेव्हां डुप्लेनें पुनरपि एकवार त्रिचनापल्ली घेण्याचा प्रयत्न केला. नवीन फौज व नवीन योद्धे पाठविले; पण नशिबाचा खेळ असा कांहीं होता, कीं त्रिचनापल्ली-पुढें फ्रेंच आले कीं त्यांस जय येऊं नये. शेवटीं नाइलाज होऊन डुप्लेनें मद्रासचा गव्हर्नर सॉंडर्स ह्यास तह करण्याविषयीं विनंती केली, आणि सद्रास (Sadras) म्हणून डच लोकांचें ठाणें होतें तेथें दोनही राष्ट्रांचे वकील तहाची वाटाघाट करण्यास जमले (डिसेंबर ३० स. १७५३). डुप्लेनें वादग्रस्त प्रश्न

बाजूसच ठेविला. महंमदअलीस दुसरीकडे नेमणूक द्यावी, व युद्धाचा खर्च फ्रेंचांनीं द्यावा, अशा अप्रत्यक्ष रीतीनें नबाबगिरी आपणाकडे घेण्याचा डुप्लेचा घाट होता. पण तो इंग्रजांच्या लक्षांत आल्याशिवाय राहिला नाहीं. अशा रीतीनें पुष्कळ भवति न भवति होऊन शेवटीं कांहीं एक न ठरतां दोघांचेही वकील आपापल्या ठिकाणीं परत गेले. डुप्लेनें ह्या वेळीं मोठी चूक केली. कोणत्या तरी रीतीनें तह पदरांत पाडून घ्यावयाचा होता. फ्रेंचांनीं महंमदअलीस नबाब कबूल केल्यास बाकीच्या सर्व गोष्टी फ्रेंचांच्या म्हणण्याप्रमाणें कबूल करण्यास लॉरेन्स तयार होता. तेव्हां महंमदअली जरी घटकाभर नबाब असता, तरी पुढें त्यासच आपल्या पक्षांत आणण्याचे किंवा त्यास जिंकण्याचे प्रयत्न डुप्लेस करतां आले नसते असें नाहीं. अनेक प्रसंगीं मोठ्या लोकांचें मन विलक्षण विकारवश होऊन, 'खाईन तर तुपाशीं, नाहीं तर मुळींच उपाशीं,' अशा प्रकारचा हट्ट धरून, ते अंतीं आपलें सर्वस्वी नुकसान करून घेतात, तशांतला कांहींसा डुप्लेचा प्रकार झाला. त्यांचा देशबंधु प्रसिद्ध नेपोलियन बोनापार्ट ह्याची पुढें अशीच अवस्था झाली, हें जगजाहीर आहे. हट्टानें डुप्लेनें आपला घात करून घेतला.

तह मोडल्यावर डुप्लेचा किल्ला इंग्रजांनीं गिरवून त्यांत त्यांनीं ज्यास्तच कडी करून दाखविली. युद्ध तसेंच कांहीं दिवस चाललें, पण त्यापासून विशेष कांहीं निष्पन्न झालें नाहीं. उलट मराठे, तंजावरकर व म्हैसूरकर वगैरे फ्रेंचांचा पक्ष सोडून देण्याच्या बेतांत आले. अलीकडील दोन वर्षांत फ्रेंचांचा पैसा व वेळ अतिशय खर्च होऊन डुप्लेची अशी तारांबळ उडत चालली कीं त्याजविरुद्ध फ्रान्स देशांत मोठा गवगवा चालू झाला. एतद्देशीयांचाही डुप्लेवरील विश्वास उडाला इतकेंच नव्हे, तर फ्रेंच सरकारही कंटाळून गेलें. अशा मनुष्यास शत्रु फार असावयाचे. त्यांनीं ही संधि साधून डुप्लेस परत बोलावण्याविषयीं डायरेक्टरांचें मन वळविलें. सरकारचें पाठबळ कमी झालें, तेव्हां डुप्लेस खरी स्थिति लपवून ठेवावी लागली. पुढें हिंदुस्थानांत फ्रेंच कंपनीस दहा लाख रुपये कर्ज झालें आहे असें डुप्लेनें लिहून कळविल्या-

बरोबर त्यास परत बोलविण्याचा निश्चय ठरला. डुप्लेस परत बोलविण्यास आणखी असें कारण झालें कीं इकडील इंग्रजांनीं डुप्लेविरुद्ध पुष्कळच कागाळ्या आपल्या सरकाराकडे लिहून कळविल्या. ' ई. इं. कं. चा व्यापार म्हणजे सर्व इंग्रज राष्ट्राचा व्यापार होय. कृष्णेच्या दक्षिणेकडील सर्व प्रदेश आपल्या आटोक्यांत आणण्याचा डुप्लेचा हेतु असल्यामुळें, डुप्ले हिंदुस्थानांतून गेला नाहीं तर आपलें व एकंदर इंग्रज राष्ट्राचें अतिशय नुकसान होणार आहे. म्हणून परभारें फ्रेंच सरकाराकडे रदबदली करून डुप्लेस परत बोलविण्याचें करा. ' अशी जोराची ओरड इंग्रजांनीं इकडून युरोपांत लिहून पाठविल्यावर इंग्रज सरकारानें फ्रेंच सरकाराकडे खटपट केली. फ्रेंच सरकार ह्या वेळेस पैशाच्या अडचणींत होतें, म्हणून त्यालाही युद्ध करण्याची हौस नव्हती. तेव्हां दोघांनीं पूर्वीचा व्यापारी पेशा चालवावा, आणि एतद्देशीयांस मदत करण्याच्या खटपटी सोडून द्याव्या असा युरोपांत उभय सरकारांचा ठराव झाला. फ्रेंच कंपनीनें इंग्रजांशीं तडजोड करून हिंदुस्थनांतील तंट्याचा निकाल करण्याकरितां आपले वकील लंडनास पाठविले. तेथें इंग्रज कंपनीचा एकच आग्रह पडला, कीं ' सर्व तंट्याचे मूळ डुप्ले आहे; त्यास परत आणल्याशिवाय हिंदुस्थानांत शांतता होणें शक्य नाहीं. अनावर महत्वाकांक्षेच्या नादीं लागून तो सर्वांस झगडावयास लावतो. ' वास्तविक हा आरोप शत्रूंनीं केलेला होता. आणि फ्रेंच कंपनीस तो कबूल करण्याचें कारण नव्हतें. निदान डुप्ले स्वराष्ट्राची कामगिरी करीत आहे कीं स्वतःचें हित पाहत आहे, ह्याचा तरी त्यांनीं विचार करावयास पाहिजे होता. आपल्या शत्रूकडून आलेली सूचना आपल्या अहिताची असेल अशी शंका सुद्धां फ्रेंच वकिलांनीं घेतली नाहीं इंग्रज वकिलांनीं खरेपणाचा आव आणून जेवढ्या गोष्टी आवेशानें प्रतिपादन केल्या तेवढ्या फ्रेंचांस खऱ्या वाटल्या. हा परिणाम एकदम घडून आला नाहीं. हळू हळू राष्ट्रीय मत तसें बनत गेलें. हा प्रकार चालू असतां, हिंदुस्थानांत अगोदरच तह झाला आहे अशी बातमी डुप्लेकडून लंडनास पोंचली असती, तर, म्हणजे मद्रास येथें चाललेल्या वाटाघाटींत महंमदअलीविषयींचा

इंग्रजांचा आग्रह कबूल करून डुप्लेनें तह सिद्धीस नेला असता, तर पुढचीं संकटें टळलीं असतीं. मग डुप्ले यास परत बोलावण्याची जरूर राहिली नसती; आणि दोन वर्षें शांतता मिळाली असती, ह्मणजे पुढील साम्राज्याचे बेत परिपक्क करून तडीस नेण्यास डुप्लेस अवधि मिळाला असता. कर्नाटकच्या बदल्यांत उत्तरसरकार प्रांत डुप्लेस मिळाला असून, बुसीनें तो ताब्यांत घेतला असता; व दोन वर्षें तेथें व्यवस्था केल्यावर तेथून बंगाल प्रांत काबीज करण्यास त्यांस अडचण पडली नसती. कलकत्याच्या अंधार–कोठडीचा प्रकार घडल्यानंतर सिराजुद्दौल्यानें फ्रेंचांची मदत मागितली, त्या वेळीं उत्तर सरकार प्रांतांतून ती मदत फ्रेंचांस सहज पाठवितां आली असती. तेणेंकरून प्लासीच्या लडाईचा परिणाम निराळा झाला असता; आणि कदाचित् कलकत्याचे ठिकाणीं चंद्रनगरची भरभराट होऊन इंग्रजांएवजीं फ्रेंच सरकारचें राज्य हिंदुस्थानावर झालें असतें. सारांश, हा व्यूह बऱ्याच अंशीं डुप्लेच्या हट्टानें बिघडला असें ह्मणावें लागतें.

तथापि लंडनास चाललेल्या वाटाघाटींत फ्रेंच वकिलांनीं डुप्ले यास एकदम परत बोलविण्याचें कबूल केलें नाहीं. तेथें असें ठरलें, कीं, इंग्रजांनीं व फ्रेंचांनीं आपापला एक अधिकारी हिंदुस्थानास पाठवावा व त्या दोघांनीं सर्व प्रश्नांचा निकाल करावा. त्याप्रमाणें फेंच कंपनीनें गोदेहू ( M. Godeheu ) यास हिंदुस्थानास पाठविलें. इंग्रजांनीं मात्र युक्ति करून नवीन कोणी न पाठवितां सॉंडर्स ह्यासच सर्व अधिकार दिले. यामुळें डुप्लेची बाजू अगदीं ढांसळली. गोदेहू हा पूर्वी इकडे हिंदुस्थानांत चंद्रनगर येथें होता. त्या वेळीं तो डुप्लेशीं अत्यंत विश्वासानें वागून त्याची मर्जी संपादन करण्यांत दंग असे. परंतु त्याचें अंतःकरण दुष्ट असून डुप्लेचा पाडाव करण्याची संधि तो पाहत होता. डुप्ले यास कैद करून परत पाठवावें असाच त्याचा घाट होता. पण त्यास डायरेक्टरांची कबुली मिळाली नाहीं. गोदेहू आपला नाश करण्यास उद्युक्त झाला आहे अशी डुप्लेस कल्पनाही नव्हती. ता. १ ऑगस्ट स. १७५४ रोजीं गोदेहूचें गलबत पांदिचरी बंदरांत

दाखल झालें. डुप्लेस आशा होती, कीं येथील सर्व प्रकार सरळपणें गोदेहूस समजावून देऊन आपण निघून जाऊं. त्याप्रमाणें डुप्ले गोदेहूस भेटण्यास गलबतावर गेला. पण गोदेहूनें त्यास अत्यंत तिरस्कार दाखविला, त्याबरोबर डुप्लेस त्याजबद्दल संशय येऊं लागला व तो हळूहळू खरा ठरला. ता. २ ऑगस्ट रोजीं डुप्लेनें हिंदुस्थानांतील कारभार त्याच्या हवालीं केला. इतके दिवस अतोनात कष्ट करून एकनिष्ठपणें स्वराष्ट्राची सेवा केल्याचें अखेर चीज होत नाहींसें पाहून, त्यास अत्यंत दुःख झालें. गोदेहूनें त्याच्या कारभारांतील छिद्रें बाहेर काढण्याविषयीं नाहीं नाहीं त्या खटपटी केल्या; पण डुप्लेविरुद्ध कांहींच निष्पन्न झालें नाहीं. सरकारी पैशाची अफरातफर झाली असल्यास ती हुडकून काढण्यासाठीं सर्व हिशेब त्यानें बारकाईनें तपासले. पण त्यांत सरकारी पैशाची अफरातफर तर नाहींच, उलट डुप्लेचेच खासगी पैसे सरकारांत आल्याचें दिसून येऊं लागलें. डुप्लेनेंही ह्या पैशाबद्दल मागणी केली. तेव्हां हें प्रकरण अंगास चिकटेल, म्हणून गोदेहूनें हिशोबाचा तपासच सोडून दिला. कोणत्याही रीतीनें डुप्ले आपल्या पेंचांत सांपडत नाहीं असें दिसून आल्यावर, शेवटीं त्यास भिकेस लावून परत पाठवावयाचा आणि सरकाराकडे डुप्लेचें घेणें २४ पासून २८ लाख रुपये पावेतों निघत असतां, त्यास एक छदाम मिळूं द्यावयाचा नाहीं, असा गोदेहूनें निश्चय केला व तो अमलांत आणिला. ह्या घेण्याबद्दल गोदेहूनें एक अक्षर सुद्धां फ्रान्सांत लिहून पाठविलें नाहीं. डुप्लेनें कर्नाटकांत अनेक लोकांस कर्ज देऊन त्यांचे मुलूख तारण लावून घेतले होते. ह्या मुलखांचा वसूल सरळपणें डुप्ले यास दिला असता, तर त्याचे पैसे वसूल झाले असते. पण तसें कांहीं एक न करतां गोदेहूनें ते मुलूख कंपनीकडे जमा केले. कंपनीनें फ्रान्सांतून डुप्लेस दोन लाखांची हुंडी पाठविली होती, तिचेही पैसे गोदेहूनें दिले नाहींत. डुप्लेनें लोकांचें कर्जही पुष्कळ देणें होतें; आणि केवळ त्याच्याच इभ्रतीवर हजारों व्यवहार व घडामोडी झाल्या होत्या. तें कर्ज देण्यास डुप्लेजवळ कांहींच शिल्लक नव्हतें; व गोदेहूनेंही त्याची तोड काढिली नाहीं. अशा विपत्तींत हिंदुस्थानास अखेरचा रामराम ठोकून डुप्ले

ता. १४ ऑक्टोबर रोजीं स्वदेशीं जाण्यास निघाला. त्या वेळीं एकूण एक फ्रेंच लोकांस व अनेक एतद्देशीय मंडळीस अत्यंत वाईट वाटलें.

फ्रेंच सरकाराची खरी इच्छा डुप्लेनें परत यावें अशी नव्हती; व तो निघाल्यावर थोडे दिवसांनीं तसा हुकूमही हिंदुस्थानास आला. पण तत्पूर्वीच तो निघून आल्यामुळें पुढें तो प्रश्नच राहिला नाहीं. मात्र तो परत आल्यानें राष्ट्राचें मोठें नुकसान झालें असें सर्वांस वाटलें. फ्रान्सांत गेल्यावर आरंभीं त्याचें स्वागत चांगलें झालें. पण पुढें गोदेहूनें इंग्रजांशीं वेडावांकडा तह करून डुप्लेनें केलेली कमाई सर्व गमाविली, अशी बातमी फ्रान्सांत येतांच मग डुप्लेस कोण विचारतो? आतां डुप्लेपासून काय निष्पन्न व्हावयाचें आहे? सर्वच त्याच्या उलट होऊन त्याला कोणीच विचारीनासें झालें. त्याची पैशाची मागणी कोणीं मनावर घेतली नाहीं. देणेदारांनीं मात्र त्यास सतवून सोडिलें. बुसी सुद्धां त्याच्या कर्जदारांत सामील झाला. मरणापूर्वी तीन महिने त्याचें घर सुद्धां जप्त झालें. 'स्वराष्ट्राच्या फायद्याकरितां माझें तारुण्य, माझी धनदौलत व माझें सर्व जीवित मीं खर्च केलें; माझ्यावर भरंवसा टाकून माझे अनेक नातेवाईक व स्नेही माझ्या सारखेच भिकेस लागले; ते आज अत्यंत विपत्तींत काल घालवीत आहेत. माझ्या कर्जाचे राखे मीं सर्व अधिकाऱ्यांस जाहीर केले पण माझी दाद कोणीच घेत नाहींत. मीं केलेलीं कामें सर्वांस खोटींच वाटतात; व माझी मागणी पोरखेळाप्रमाणें समजतात. अत्यंत नीच मनुष्यास सुद्धां असें कधीं कोणी वागविलें नसेल. माझी आज अतिशय अपेष्टा होत आहे. घरांत थोडेंबहुत कांहीं होतें, तेंही सर्व सरकारानें जप्त केलें आहे. तुरुंगांत जाण्याची पाळी येऊं नये म्हणून दारोदार हिंडून मुदती मागण्याची मला पाळी आली आहे.' अशा प्रकारचे उद्गार मृत्यूच्या पूर्वी तीन दिवस डुप्लेचे निघाले आहेत. ज्यानें स्वराष्ट्राची एवढी सेवा केली, त्यास फ्रेंच सरकारानें असें वागवावें काय? दैव गति विचित्र आहे! ता. १० नोव्हेंबर स. १७६४ रोजीं डुप्ले मरण पावला.

सरकारानें अधिकाराच्या जोरावर कांहीं जरी न्याय केला, तरी इतिहास-

कारास तसें करतां येत नाहीं. क्लाइव्ह, वॉरन हेस्टिंग्स्, वेल्स्ली ह्या मंडळीस जर इतिहासांत मोठें स्थान मिळत आहे, तर निदान त्यांच्या बरोबरीनें तरी डुप्लेस मान मिळणें योग्य आहे. त्याचे बेत फसले ह्मणून त्याची निंदा करणें वाजवी नाहीं. त्याच्या अपयशाचा दोष फ्रेंच राष्ट्राकडे आहे, त्याजकडे नाहीं. पांच हजार कोशांवरून येऊन थोड्याशा इंग्रजांनीं हिंदुस्थानच्या अवाढव्य राज्याची कमाई केली, ह्याबद्दल आश्चर्यचकित होऊन इंग्रज ग्रंथकार स्वकीयांचे पोवाडे गाण्यांत दंग होतात. पण ह्या परिणामाचें पहिलें श्रेय डुप्लेसच दिलें पाहिजे. ह्या अघटित कल्पनेची प्रत्यक्ष जुळवणी प्रथम डुप्लेनें लोकांस करून दाखविली. डुप्लेने दाखविलेला मार्ग सुधारून इंग्रजांनीं स्वराज्याचा उत्कर्ष केला. पण मूळ कल्पना डुप्लेची, उद्योगाची सुरुवात डुप्लेनें केली, पहिले विजय डुप्लेनें संपादिले, ही गोष्ट विचारी इंग्रजही कबूल करितात. एवढा उद्योग झेंपण्याची फ्रेंच राष्ट्राची त्यावेळीं ताकद नव्हती. त्यावेळचे फ्रेंच राज्यकर्ते अदूरदर्शी, नेभळे व व्यसनासक्त होते. सद्वर्तन, सच्छील, सत्य इत्यादि थोर गुणांची त्यावेळीं फ्रान्सांत चहा नव्हती. त्यामुळें डुप्लेचे बेत फसले व तेच इंग्रजानीं उचलून पुढें सिद्धीस नेले, असें पुढें नजरेस येईल. शेत नांगरून व पेरून तयार करण्याचें काम डुप्लेनें केलें, व इंग्रजांनीं त्याची कापणी केली, असा प्रकार आहे.

३. **गोदेहू व डिलेरी,** ( स. १७५४—१७५८ ).—स्वतःचा पाणउतारा झाला तरी डुप्लेनें आपल्या मताप्रमाणें पुढील सर्व व्यवस्था कागदावर लिहून गोदेहूच्या हवालीं केली होती; व फ्रेंचांची मत्ता कायम राखण्यासाठीं कर्नाटकांत व इतर ठिकाणीं काय काय योजना केल्या पाहिजेत, हें स्पष्ट लिहून ठेविलें होतें. तसेंच इंग्रजांस मदत देण्याकरितां ऍडमिरल वॉटसनच्या हाताखालीं बरेच लोक येणार होते, त्यापूर्वी कर्नाटकचा बंदोबस्त पूर्ण करण्याविषयीं आग्रहाची सूचना डुप्लेनें गोदेहूस केली होती. पण गोदेहूनें त्यांतलें कांहींच केलें नाहीं. इंग्रज गव्हर्नर सॉंडर्स ह्याजबरोबर तहाची वाटाघाट मात्र त्यानें चालू केली. डुप्ले गेल्यानें इंग्रजांस अतिशय समाधान वाटलें,

व ते एतद्देशीयांचे मनांत फ्रेंचांच्या नालस्ती भरवूं लागले. तेव्हां फ्रेंचांचे पक्षपाती मंडळीस खालीं मान घालणें भाग पडलें. सलाबतजंगाचा विश्वास बुसीवरून उडूं लागला. मुरारराव घोरपडे व म्हैसूरकर फ्रेंचांस सोडूं लागले. निरनिराळ्या ठिकाणच्या फ्रेंच अधिकाऱ्यांस आपलीं कामें करण्याची पंचाईत पडूं लागली; आणि ते पुढें काय करावें ह्याबद्दलची वाटाघाट करूं लागले. त्रिचनापल्लीसमोर युद्ध चालूच होतें. पण त्या ठिकाणीं गोदेहूनें मदत पाठवून तजवीज केली नाहीं, तेव्हां इंग्रजांनीं त्रिचनापल्ली पूर्णपणें काबीज करून तेथील बंदोबस्त केला. कोणत्याही तऱ्हेनें तह करावयाचा व डुप्लेचें सर्व काम उलथून टाकावयाचें एवढाच गोदेहूचा उद्देश होता. ही गोष्ट सॉंडर्स ह्यास ठाऊक असल्यामुळें त्यानें मात्र या तहांत आपल्या राष्ट्राचा पूर्ण फायदा करून घेतला. सन १७५४ च्या ऑक्टोबरांत तहाची वाटाघाट सुरू होऊन दोन महिन्यांनीं तह ठरला, तो पुढें विलायतेहून मंजूर झाल्यावर कायम होणार होता. इंग्रज व फ्रेंच ह्या दोनही कंपन्यांनीं एतद्देशीय रजवाड्यांपासून मिळविलेले मानमरातब सोडून द्यावे; व इतःपर त्यांच्या आपसांतील कलहांत बिलकूल हात घालूं नये; मद्रास, फोर्ट सेंट डेव्हिड, व देविकोटा इंग्रजांकडे राहून, पांदिचरी व निजामपट्टण फ्रेंचांकडे राहवीं; उत्तरसरकार प्रांत दोघांनीं सारखा वांटून घ्यावा; इत्यादि कलमें तहात होतीं. महंमदअल्ली विषयीं उल्लेखच नव्हता. अर्थात महंमदअलीस कर्नाटक मिळालें व डुप्लेचे श्रम फुकट जाऊन इंग्रजांचा उत्कर्ष होत गेला. उत्तरसरकारप्रांत फ्रेंचांचे हातून जाणें सुलभ झालें. फ्रेंच राष्ट्रास ह्याहून जास्त लांछन तें काय ? एतद्देशीयांचे मनांत फ्रेंचांविषयीं जो पूज्यभाव व दरारा वागत होता, तो सर्व क्षणांत नाहींसा झाला. इंग्रजांकडचा सॉंडर्स हाही त्या वेळेस मोठा युक्तिबाज मुत्सद्दी होता, ह्मणून इंग्रजांचा पगडा वर येण्यास विलंब लागला नाहीं. त्यानें गोदेहूस अगदीं पिळून काढिलें. पुढील व्यवस्था करण्यास गोदेहू इकडे फार दिवस राहिला नाहीं. सुमारें सहा महिने कारभार करून, तो १७५५च्या फेब्रुवारींत निघून स्वदेशीं गेला; आणि तिकडून डिलेरी ( M. Duval de Leyrit ) याची ह्याचे जागीं नेमणूक झाली. गोदेहू

गेल्याबरोबर इकडील सर्व फ्रेंच मंडळीस अत्यंत समाधान वाटलें. कांहीं दिवस पुनरुपि डुप्ले इकडे येणार अशीही बातमी होती.

डिलेरी हा पूर्वी माहे येथें असून डुप्लेचें काम पाहिलेला होता. स. १७४१ पासून तो चंद्रनगरच्या कारभारावर होता. त्यास व्यापाराची माहिती चांगली होती, पण त्याच्या अंगीं हिंमत व दृढ निश्चय नसल्यामुळें, त्याचा कारभार फ्रेंच राष्ट्रास फायदेशीर झाला नाहीं. तह झाल्याबरोबर इंग्रजांनीं त्यांतलें प्रत्येक कलम मोडण्यास प्रारंभ केला. महंमदअलीस मदत पाठविली, आणि एतद्देशीय राजांच्या कारभारांत हात घालून ते वाटेल ती ढवळाढवळ करूं लागले. त्यांस विचारता कोणी राहिला नाहीं. फ्रेंचांच्या नुसत्या शाब्दिक सूचनेकडे लक्ष देण्याचें कारण नव्हतें; व तहाची अंमलबजावणी करण्यास लागणारा जोर फ्रेंचाचे अंगीं नव्हता. एतद्देशीयांच्या भांडणांत पडावयाचें नाहीं हें कलम नुसतें कागदावर राहिलें. दोनही राष्ट्रांचे हात येथच्या व्यवहारांत इतके अडकून गेले होते, कीं ते परत घेणें अशक्य होतें. तरी गोदेहूनें केलेला मूर्खपणा डिलेरी यास तेव्हांच कळून आला. पण विलायतेहून तहाचा निकाल काय येतो तें पाहण्यासाठीं तो कांहीं दिवस स्वस्थ राहिला. तरी उत्तरसरकार प्रांतांत त्यानें फौज पाठविली. तिकडे निजामाच्या दरबारीं बुसीचें वजन बरेंच कायम होतें, तें इंग्रजांस खपेना. १७५५च्या ऑक्टोबरांत क्लाइव्ह विलायतेहून मुंबईस आला व त्यानें पश्चिम किनाऱ्यावरील आंग्र्यांचा किल्ला विजयदुर्ग पेशव्यांचे मदतीनें काबीज केला. या ठिकाणीं इंग्रजांस पुष्कळ पैसा मिळून शिवाय पश्चिम किनाऱ्यावर एक आश्रयाची जागा झाली ( स. १७५६ ). हें काम झाल्यावर क्लाइव्ह व वॉट्सन फ्रेंचांचा समाचार घेण्यासाठीं मद्रासेस आले. इतक्यांत कलकत्याच्या अंधारकोठडींत इंग्रजांचा छळ झाल्याची बातमी आल्यावरून, होती नव्हती तेवढी सर्व फौज व आरमार घेऊन क्लाइव्ह व वॉट्सन, एक खुष्कीनें व दुसरा जलमार्गानें ताबडतोब कलकत्याकडे गेले.

स. १७५६च्या मे महिन्यांत इंग्लंड व फ्रान्स यांजमध्यें युरोपांत युद्ध

सुरू झाल्याची बातमी आली. हें युद्ध इंग्लंडच्या इतिहासांत 'सात वर्षांचें युद्ध' ह्या नांवानें प्रसिद्ध आहे. ह्या युद्धानें युरोपांत इंग्लंडचा उत्कर्ष व फ्रान्सचा पाडाव झाला. तोच परिमाण हिंदुस्थानांत घडून आल्याशिवाय राहिला नाहीं. युद्ध सुरू झाल्याची बातमी हिंदुस्थानांत स. १७५६च्या अखेरीस आली. त्यावरून फ्रान्सचें वर्चस्व पुनरपि परत मिळविण्याविषयीं डिलेरीनें मोठा प्रयत्न केला. डोटिल हा पूर्वीचा अनुभवलेला गृहस्थ पांदिचरीस होता, त्यास त्यानें फौजेचा मुख्य नेमिलें. पण डोटिल संधिवातानें खिळून गेलेला असून त्याच्यांत उत्साह किंवा ताकद बिलकुल राहिली नव्हती. सर्व भांडणाची किल्ली त्रिचनापल्ली असल्यामुळें फ्रेंच फौज सन १७५७च्या मे महिन्यांत त्रिचनापल्लीवर आली. इंग्रजांचा मुख्य कालिओ ( Calliaud ) म्हणून होता, तो डोटिल यास फसवून त्रिचनापल्लीच्या मदतीस गेला, तेव्हां डोटिल पराभव पावून पांदिचरीस परत आला. पुढें सोबिने ( M. Saubinet ) ह्याच्या हाताखालीं फ्रेंच फौज कर्नाटकांत शिरली. ह्या फौजेनें मात्र अनेक ठिकाणें काबीज करून बऱ्याच वेळां इंग्रजांचा पराभव केला. अशा प्रकारें कर्नाटकांत युद्धप्रकार चालू असतां फ्रान्सांतून काउंट लाली ( Lally ) ह्याच्या हाताखालीं एक मोठें आरमार, फ्रेंचांची सत्ता पुनरपि स्थापन करून इंग्रजांस हांकून देण्याकरितां म्हणून पांदिचरीस आलें, ( एप्रिल स. १७५८ ). त्या वेळीं आर्काट, वेलोर, कांचीवरं, चिंगलपट आणि वांदिवाश हीं ठिकाणें फ्रेंचांच्या ताब्यांत असून, इंग्रज हे मद्रास व त्रिचनापल्ली येथें कोंडले गेले होते.

४. **डुप्लेच्या कारभाराची मीमांसा.**—गोदेहूनें वेडावांकडा तह केल्यामुळें हिंदुस्थानांतील फ्रेंच सत्तेस उतरती कळा लागली, आणि डुप्लेनें घालून दिलेली पद्धति सोडून देण्यांत फ्रेंच सरकारानें आपल्या भित्रेपणाचें व अदूरदृष्टीचें मात्र प्रदर्शन केलें, अशा प्रकारचा सामान्य समज असून, अलीकडच्या कित्येक फ्रेंच लेखकांनीं प्रतिपादिलें आहे, कीं अगदीं ऐन यशःप्राप्तीच्या प्रसंगी फ्रेंच सरकारानें डुप्लेचा प्रचंड उद्योग अंगाबाहेर टाकून, त्या

कल्पक, धाडशी व स्वराज्यहितचिंतक पुरुषाला मोठ्या अडचणीच्या प्रसंगीं फशीं पाडिलें; आणि खरें पाहिलें, तर डुप्लेचाच कित्ता गिरवून इंग्रजांनीं हिंदुस्थानांत आपलें राज्य स्थापिलें आहे. हिंदुस्थानचा इतिहासकार जेम्स मिल्ल म्हणतो, 'लष्करी कवाइत शिकलेल्या युरोपियनांपुढें एतद्देशीय फौजांचा टिकाव लागावयाचा नाहीं; आणि ही लष्करी कवाईत इकडच्या लोकांस सहज शिकवितां येईल, हे दोन महत्त्वाचे शोध फ्रेंचांनीं लाविले. इतर ग्रंथकारांनीं मिल्लचाच अनुवाद केला आहे. फ्रेंच सरकारानें केलेली हयगय वगैरे डुप्लेच्या अपयशाचीं अनेक कारणें त्यानें दिलीं आहेत. डुप्ले कल्पक, दूरदृष्टि व धाडशी होता, ह्यांत संशय नाहीं. पण डुप्लेच्या हाताखालीं बुसीशिवाय लायक इसम एकही नव्हता. इंग्रजांकडे त्या वेळीं बुसीच्याच तोडीचे क्लाइव्ह व लॉरेन्स हे होते. पण बुसी स्वतःचा लौकिक व स्वतःची संपत्ति वाढविण्यांत दंग असल्यामुळें, डुप्लेनें व लालीनें चालविलेल्या राष्ट्रीय झगड्यांत त्याचें मनापासून लक्ष नव्हतें. लष्करी कवाईत शिकवून तयार केलेली एतद्देशीय फौज प्रथम डुप्लेनेंच वापरली. किनारा सोडून अंतर्भूप्रदेशांत प्रथम डुप्लेनेंच फौजा नाचविल्या; आणि मोगल बादशाही मोडकळीस आली आहे ही गोष्ट पाश्चात्यांस प्रथम डुप्लेनेंच उघड केली. ह्या सर्व गोष्टी खऱ्या असल्या, तरी अमुक अमुक बाबतींचे नवीन शोध डुप्लेनें लाविले, असें जेव्हां सांगण्यांत येतें, तेव्हां इकडील युद्धपद्धतीची व राजकीय परिस्थितीची कल्पना त्या लेखकांस बरोबर नाहीं, असें म्हणावें लागतें. पाश्चात्यांची लष्करी कवाईत सामान्यतः पूर्वेकडील लोकांत पूर्वी कधींच नव्हती. हिंदुस्थान देशाची सृष्ट स्थिति भिन्न असल्यामुळें, आशिया खंडांतील इतर देशांपेक्षां हा देश परकीय हल्ल्यांस विशेष सोयीचा झाला आहे. प्राचीन काळीं देशसंरक्षणाचें काम क्षत्रियांकडे होतें. पण अर्वाचीन काळाकडे पाहिलें, तर मध्यआशियांतून जेव्हां जेव्हां मोठ्या झुंडी हिंदुस्थानावर आल्या, तेव्हा त्यांचा प्रतिकार येथील फौजांकडून केव्हां केव्हां झाला नाहीं. प्रत्येक राजाजवळ फौज असे खरी; पण ती केवळ भाडोत्री असे. तिला राष्ट्राचा किंवा देशाचा अभिमान नव्हता. औरंगजेबाची

फौज हिंदुस्थानच्या मानानें चांगल्या तयारीनें होती खरी, परंतु त्याच वेळीं ( स. १७०२–१२ ) युरोपांत चाललेल्या 'स्पॅनिश वारसा'च्या युद्धांतील एखाद्या फ्रेंच सेनापतीनें औरंगजेबाच्या फौजेचा क्षणमात्रांत फडशा उडवून दिला असता. हिंदुस्थानांतील सेनाध्यक्षांनीं युरोपियन कवाईत पाहिली नव्हती; आणि अशी कवाईत पाहण्याचे प्रसंग डुप्लेच्या पूर्वी हिंदुस्थानांत आले नव्हते. ह्मणूच कोणीही युरोपियन सेनापति हिंदुस्थानांत असता, तरी त्यास एतद्देशीयांचा हा कमीपणा तेव्हांच दिसून आला असता. मोगलांच्या फाजेंत थोडेबहुत युरोपियन सेनानायक नेहमीं असत; परंतु त्यांनीं आपल्या फौजा युरोपियन पद्धतीनें तयार कराव्या, अशी विशिष्ट योजना मोगल बादशहानें केली नव्हती. पण डुप्लेचे युद्धसंग्राम पाहिल्याबरोबर हिंदुस्थानांतील बहुतेक सत्ताधीशांस विलायती कवाइतीचें महत्त्व कळून आलें, आणि युरोपियन लोक नोकरीस ठेवून त्यांजकरवीं आपल्या फौजांस कवाईत शिकविण्याची त्यांनीं सुरुवात केली. ह्यावरून नवीन शोध केल्याचें श्रेय जर कोणास द्यावयाचें असेल, तर तें एतद्देशीयांसच दिलें पाहिजे. युरोपियनांस त्या गोष्टी अगोदरच माहीत असल्यामुळें, डुप्लेनें नवीन शोध केला असें कांहीं म्हणतां येत नाहीं.

वास्तविक महत्वाचा प्रश्न ह्मटला ह्मणजे डुप्लेसारख्या स्वदेशाभिमानी व अक्कलवान पुरुषाला यश कां आलें नाहीं. हा होय. फ्रेंच सरकारानें व हाताखालच्या मंडळींनीं डुप्लेस चांगलें साह्य केलें असतें, तर हिंदुस्थानांत इंग्रजांचें राज्य न होतां फ्रेंचांचें झालें असतें, असें जे प्रतिपादन करितात, त्यांस तत्कालीन ऐतिहासिक परिस्थितीची ओळख चांगली नाहीं असें ह्मणावें लागतें. मोठमोठ्या राष्ट्रीय घडामोडी केवळ एकाद्या लढाईच्या परिणामावर, किंवा ऐन आणीबाणीच्या प्रसंगीं घडून आलेल्या एकाद्या लढाईच्या परिणामावर किंवा चुकीवर, अथवा आकस्मिक कारणावर अवलंबून असतात, हें ह्मणणें ऐतिहासिक दृष्ट्या बरोबर नाहीं. डुप्लेचे बेत सिद्धीस कां गेले नाहींत हें समजण्यास फ्रान्स व इंग्लंड ह्यांची तत्कालीन परिस्थिति ओळखिली पाहिजे. फ्रेंच सरकारानें डुप्लेस परत बोलावि-

त्याबरोबर फ्रेंचाचा पाडाव झाला, व इंग्रजांचा पगडा वर आला, हेंहीं म्हणणें खरें नाहीं. कर्नाटकांतील दुसऱ्या युद्धाचा परिणाम म्हणण्यासारखा कांहींच झाला नाहीं. त्यांत डुप्लेस कांहीं वेळ यशःप्राप्ति झाली ह्याचें कारण, इंग्रज फ्रेंचांत उघड युद्ध नसल्यामुळें डुप्लेस आपल्या सोयीच्या ठिकाणीं संग्राम चालवितां आला. दोनही राष्ट्रांत उघड युद्ध असतें, तर इंग्रज आरमारानें फ्रेंचांचा तेव्हांच फन्ना उडविला असता, व असाच प्रकार पुढें लालीच्या वेळेस झाला. डुप्लेचा खेळ फसला ह्याचें कारण त्याची हुशारी कमी होती हें नव्हे, तर इंग्लंडच्या मानानें फ्रान्सची एकंदर शक्ति त्या वेळीं फार कमी होती हें होय. व्यापाराच्या सवलतीसाठीं एतद्देशीय अधिकाऱ्यांच्या मर्जीवर अवलंबून राहणें बरोबर नाहीं, तर एतद्देशीयांचा पाडाव करून, आपण येथें आपलें राज्य एकदम स्थापिलें पाहिजे तरच आपला व्यापार चालेल, असा डुप्लेचा संकल्प ठरला; आणि इंग्रज आडवे गेले नसते, तर तो कदाचित् तडीस गेला असता. हिंदुस्थानांतील लोकांशीं वागतांना इकडच्या पद्धतीचा डामडौल व ऐषआराम डुप्लेनें स्वीकारिला; अशा डामडौलानें इकडच्या लोकांस आपण दिपवूं शकूं, आणि इतर नबाबांप्रमाणें आपणही एक नबाब होऊन जाऊं, हा डुप्लेचा निव्वळ भ्रम असून, हीच त्याची एक मोठी चूक होय. डुप्लेस कर्नाटकची नबाबगिरी मिळालेली इंग्रजांस कधींच खपली नसती; आणि इंग्लंडच्या आरमाचा संपूर्ण नाश झाल्याशिवाय इंग्रजांचा पाय हिंदुस्थानांतून निघाला नसता. लॉरेन्सनेंही डुप्लेबद्दल असेंच लिहून पाठविलें. ' डुप्ले हिंदुस्थानांत आहे तोंपर्यंत तह होणें शक्य नाहीं. इतके एकसारखे पराभव होत गेल्यावर कोणाचेही डोळे उघडले असते, पण डुप्लेचे उघडत नाहींत. आपणास तो कर्नाटकचा राजा समजतो, व स्वतःच्या घमेंडीपुढें त्यास दुसऱ्या कोणाची परवा वाटत नाहीं. ' लॉरेन्स डुप्लेचा प्रतिपक्षी होता, तरी त्याच्या म्हणण्यांत बरेंच तथ्य आहे.

ह्या दोन राष्ट्रांच्या झगड्याचा अखेर परिणाम जो घडून आला तो फिरविण्याचें डुप्लेस सामर्थ्य नव्हतें; आणि इंग्लंडच्या विरुद्ध जितक्या गोष्टी

सिद्धिस नेण्याचा त्याचा विचार होता, त्यांपैकीं प्रत्येक गोष्ट इंग्रजांनीं फ्रेंचाविरुद्ध तडीस नेली. असा जरी खरा प्रकार आहे, तरी ह्या लहानशा पण तीव्र झगड्यांत डुप्ले हाच सर्वथैव प्रमुख होता ह्यांत संशय नाहीं. हिंदुस्थानांत आपलें राज्य स्थापन करितां येईल, हा अदमास डुप्लेच्या पूर्वीही कित्येकांनीं केला होता. स. १७५४त इंग्रज फ्रेंचांचा तह ठरला, त्या वेळीं फौजेच्या संबंधानें दोघांची समस्थिति होती. परंतु फ्रेंचांच्या ताब्यांत ज्यास्त प्रदेश असूनही फ्रेंच सरकारानें पडती बाजू घेतली ह्याबद्दल त्यांस दोष देण्याचें कारण नाहीं. चार वर्षांच्या डुप्लेच्या जबरदस्त उद्योगानें फ्रेंचांचा प्रत्यक्ष फायदा कांहींच झाला नव्हता. खर्च मात्र अतोनात होऊन कर्जही पुष्कळ झालें होतें. इंग्रजांचा नकशा बराच उतरला होता, तरी त्यांचा ह्मणण्यासारखा पराभव झाला नव्हता. उलट त्यांची सांपत्तिक स्थिति बरी होती. एतद्देशीय दरबारीं डुप्लेचें वजन थोडेंबहुत होतें, पण विशेष भिस्त ठेवण्याइतकें तें मजबूत नव्हतें. डुप्लेस परत बोलावण्याविषयीं युरोपांत इंग्रज सरकाराकडून फ्रेंच सरकाराकडे तगादा चाललेला होता; आणि हिंदुस्थानांतील इंग्रजांचा सर्वच व्यापार बुडण्याचा प्रसंग आला असता, तर दोन कंपन्यांच्या त्या झगड्यांत सर्व इंग्रज राष्ट्र तेव्हांच सामील झालें असतें; आणि फ्रेंचांचें आरमार निःशक्त असल्यामुळें, इंग्रज आरमार आपला नाश तेव्हांच करील इत्यादि गोष्टी फ्रेंच सरकार जाणून होतें. तेव्हां डुप्लेस परत बोलावणें, आणि कर्नाटकची नबाबगिरी महंमदअलीस देणें, ह्या दोन नुकसानाच्या शर्ती कबूल करून फ्रेंच सरकारानें तह केला, आणि ह्या अडचणीच्या प्रसंगांतून कसाबसा आपला हात काढून घेतला. ह्या सर्व गोष्टी ध्यानांत घेतल्या ह्मणजे डुप्लेस फशीं पाडल्याचा आरोप फ्रेंच सरकारावर लादतां येत नाहीं.

शिवाय फ्रेंच सरकारास पैशाची मोठी पंचाईत पडली होती. नानातऱ्हेच्या युक्त्या करून, ते कसाबसा आपला निभाव करीत होते. तेव्हां हिंदुस्थानांत युद्ध चालविणाऱ्या कंपनीस पैशाचा पुरवठा करण्याचें साधन त्यांजपाशीं नव्हतें. फ्रेंच कंपनीची पत बहुतेक उडाली होती; आणि कंपनीचें दिवाळें

निघालें असतें तर फ्रेंच सरकारास बराच धक्का बसला असता. राज्यसत्ता हातांत आल्याशिवाय व्यापार चालावयाचा नाहीं, हें डुप्लेचें तत्त्व जरी निःसंशय बरोबर होतें, तरी तें त्या वेळीं फ्रान्सांत वा इंग्लंडांत लोकमान्य झालें नव्हतें. व्यापारी कंपनीनें व्यापारच करावा, राज्य मिळविण्याच्या नादास लागूं नये, असेंच मत त्या वेळच्या नामांकित फ्रेंच मुत्सद्यांचें असून हेंच मत ते डुप्लेला एकसारखें पटवीत होते. हें मत पुढें पुष्कळ दिवसांनीं सर्वमान्य झालें, आणि डुप्लेचा मुद्दा त्या वेळच्या फ्रेंच सरकारास मान्य झाला नाहीं. फ्रेंच सरकारानें डुप्लेस जरी परत बोलाविलें नसतें, तरी त्या झगड्याचा अखेर परिणाम फारसा भिन्न झाला नसता. राज्याच्या इमारती इतक्या ठिसूळ भिंतींवर उभारिल्या जात नाहींत. थोड्याशा भाडोत्री शिपायांवर किंवा एतद्देशीय रजवाड्यांच्या निष्ठेवर फारशी भिस्त ठेवितां येत नाहीं. ह्या गोष्टी, आजच्याप्रमाणेंच, त्या वेळींही निर्विवाद खऱ्या होत्या. ह्मणून डुप्लेचे मनोरथ निष्फळ झाले ह्यांत नवल नाहीं. ते सिद्धीस जाण्यास फ्रेंच आरमार मजबूद पाहिजे होतें; व थेट युरोपापर्यंत त्याचा संचार अबाधित पाहिजे होता. सन १७४८त फ्रेंच आरमाराचा निकालच लागला होता; आणि सन १७५५तील इंग्रजफ्रेंचांच्या आरमाराची तुलना करून पाहिली असतां, इंग्रज आरमारच ज्यास्त मजबूद होतें. तेव्हां हिंदुस्थानांत कोणत्या राष्ट्राचें राज्य कायम होणार, ह्या प्रश्नाची मूळ किल्ली आरमाराच्या शक्तींत होती. ही शक्ति अजमावून पाहण्यास फ्रेंच सरकारानें कमी केलें नाहीं. स. १७५६त इंग्रजफ्रेंचांचें जें युद्ध सर्व पृथ्वीवर सुरू झालें, त्यांत त्या दोन राष्ट्रांनीं होती तेवढी शिकस्त करून, आपापल्या आरमाराची शक्ति कायमची अजमावून पाहिली. त्या युद्धांत फ्रेंच आरमाराचा जो एकदां कायमचा नाश झाला, त्यांतून फ्रेंच राष्ट्रानें आपलें डोकें अद्यापि वर काढिलेलें नाहीं. सारांश, डुप्लेस परत बोलावलें ह्मणून नव्हे, तर फ्रेंच आरमारांत इंग्रजांशीं टक्कर देण्याचें सामर्थ्य नव्हतें, ह्मणून हिंदुस्थानांत फ्रेंचांचें राज्य स्थापन झालें नाहीं. ( Lyall's British Dominion in India. )

---

# प्रकरण एकोणिसावें.

## कर्नाटकांतील तिसरें युद्ध.

### स. १७५६-६३.

१ बुसी, निजाम व उत्तरसरकार प्रांत. २ लालीचें आगमन व अडचणी. ३ लालीचा व इंग्रजांचा संग्राम. ४ लालीच्या अपयशाचें पर्यालोचन. ५ फ्रेंचांच्या पाडावाची मीमांसा.

**१. बुसी, निजाम व उत्तर सरकार प्रांतः**—बुसी मच्छलिपट्टणास जाऊन तेथील मुलखाची व्यवस्था करीत होता हें मागें सांगितलेंच आहे. तो स. १७५४ अखेर तेथची व्यवस्था करून गोदेहूचा हुकूम आल्याप्रमाणें परत निजामाचे दरबारीं हैदराबादेस गेला. पण गोदेहूच्या दुर्नीतीचा परिणाम निजामच्या दरबारीं झाला असल्यामुळें, फ्रेंचांच्या वचनावरील लोकांचा भरंवसा उडून गेला होता. प्रत्यक्ष निजामानेंही बुसीस बोलून दाखविलें, कीं 'कर्नाटकाचा अधिकारी महंमदअली हा इंग्रजांचे साह्यानें वरचढ झाला आहे व फ्रेंचांचें नांव जिकडे तिकडे बुडत चाललें आहे. आज पावेतों फ्रेंचांनीं मजवर अनेक उपकार केले ते मी स्मरून आहें. पण इतउत्तर आह्मांस मदत करण्यास फ्रेंचांस सामर्थ्य व इच्छा दोनही नाहींत.' बुसीनें निजामाची पुष्कळ समजूत केली, पण त्याचा उपयोग झाला नाहीं. पुढें निजामानें म्हैसुरावर स्वारी केली. ह्या स्वारींत बुसीनें त्यास चांगलें साह्य केलें. तेथून परत आल्यावर वजीर शहानवाजखान ह्यानें बुसीविरुद्ध कारस्थान करून त्यास निजामाच्या नोकरींतून कमी केलें. बुसीस निजामाचे दरबारांतून घालवून देण्याविषयीं पेशव्यांनींही खटपट केली ती शेवटास जाऊन बुसीनें आपले सर्व फ्रेंच लोक घेऊन राज्य सोडून निघून जावें असा लेखी हुकूम निजामानें त्यास दिला; व

लगेच मद्रासेहून इंग्रजांची मदत मागण्यासाठीं पत्रें पाठविलीं, ( स. १७५६ ). इंग्रजांनीं स. १७५५-५६ त सुवर्णदुर्ग व विजयदुर्ग हे पश्चिम किनाऱ्यावरील आंगऱ्याच्या ताब्यांतील दोन मजबूद किल्ले पेशव्याच्या मदतीनें हस्तगत केल्यावर त्यांची फौज निजामाकडे येण्यास निघणार होती, पण कलकत्यास अंधार कोटडीच्या प्रकरणामुळें ती फौज तावडतोब तिकडेस गेली. वरील हुकूमानें बुसी डगमगला नाहीं. पेशवा बाळाजीराव त्यास आपल्या नोकरींत ठेवण्यास कबूल होता. पण निजामाच्या विरुद्ध वर्तन न करितां तो हुकुमाप्रमाणें नोकरी सोडून हैदराबादेस गेला व ' चार मिनार ' नावांच्या बागांत तळ देऊन राहिला. त्याच्या मदतीस पांदिचरीहून फौज येत होती. तिजवर मुख्य अधिकारी जॅक्स् लॉ होता. वाटेंत अनेक हाल सोसून शत्रूंशीं सामना देत तो हैदराबादेस येऊन बुसीस मिळाला. त्याबरोबर बुसीस जोर आला. तेव्हां निजामानें बुसीला पुनः आपल्या नोकरींत घेतलें आणि सर्व व्यवहार पूर्ववत् चालूं लागले. मात्र या भानगडींत वर्ष सहा महिने फुकट गेले, ते बुसीस मिळाले असते तर, व पांदिचरीचा कारभार डुप्ले सारख्याच्या हातांत असता तर व इंग्रजांचा जम बसला नसता. मद्रासची सगळी फौज कलकत्यास गेली होती; व तेथें बंगालच्या नबाबानें इंग्रजांचा फडशा पाडण्याचा रंग आणिला होता.

स. १७५६त निजामाच्या दरबारीं आपलें वजन बसविल्यावर बुसी थोडीशी फौज बरोबर घेऊन, उत्तरसरकार प्रांतांत गेला. तिकडे गेल्यावर त्यास नबाब सिराजुद्दौला याजकडून मदतीस येण्याविषयीं निकडीचीं बोलावणीं आलीं. इतक्यांत चंद्रनगर इंग्रजांचे हातीं पडल्याची बातमी तिकडेच असतांना बुसीला कळली; त्याबरोबर इंग्रजांचें उत्तरसरकार प्रांतांतील मोठ्या भरभराटीचें ठाणें विशाखापट्टण म्हणून होतें, तें बुसीनें हल्ला करून काबीज केलें, ( सन १७५७ ). परंतु उत्तरसरकार प्रांतांतलें हें काम अर्धवट टाकून, निजामाच्या दरबारीं घोटाळे झाल्यामुळें, बुसी यास तातडीनें औरंगाबादेस जावें लागलें. निजाम सलाबतजंगाचे दोघे भाऊ बसालतजंग व निजाम-

अली व दिवाण शहानवाजखान ह्यांनीं नानातऱ्हेचीं कारस्थानें करून बखेडे माजविले; आणि मराठ्यांची मदत घरांत आणून फ्रेंचांस काढून टाकण्याची सिद्धता केली. तेव्हां सलाबतजंगानें घाबरून बुसीस परत बोलाविलें. बुसीनें परत येऊन बखेडा मोडून टाकिला, आणि निजामाच्या दरबारीं पूर्ववत् व्यवस्था चालविली. पुढें लालीकडून निकडीचें बोलावणें आल्यामुळें, नाइलाज होऊन बुसी निघून पांदिचरीस गेला. वास्तविक बुसी निजामाचा नोकर होता; आणि लालीचा हुकूम मानण्याची त्यास फरज नव्हती. पण शिपाईबाण्यास अनुसरून स्वराष्ट्रद्रोहाचें पातक त्यानें आपल्या माथीं घेतलें नाहीं. जाते वेळीं कॉन्फ्लान्सच्या ( Conflans ) हाताखालीं त्यानें आपली कांहीं फौज दक्षिणेंत ठेवून दिली.

उत्तरसरकार प्रांतांतून बुसी निघून गेल्यावर विशाखापट्टणचा राजा आनंदराज ह्यानें फ्रेंच लोकांस हांकून देऊन शहर हस्तगत केलें; आणि फ्रेंचांशीं झुंजण्यासाठीं बंगाल्यांतून क्लाइव्हची मदत मागितली. ह्या वेळीं प्लासीची लढाई होऊन क्लाइव्ह रिकामा झाला होता. उत्तरसरकार प्रांतांतील जमीनदार लोक भराभर फ्रेंच अंमल झुगारून देऊन स्वतंत्र होऊं लागले. ही संधि साधून क्लाइव्हनें कौन्सिलच्या सल्ल्याविरुद्ध बंगाल्यांतून कर्नल फोर्ड ह्याजबरोबर पांचशें युरोपियन व दोन हजार एतद्देशीय फौज देऊन, आनंदरायास मदत व उत्तरसरकार प्रांत काबीज करण्यास पाठविलें. इकडून लालीनें त्याजबरोबर लढण्यास कॉन्फ्लान्सची रवानगी केली. त्यास अधिकार नवीनच मिळाला असल्यामुळें त्या प्रांताची विशेष वाकबगारी नव्हती. स. १७५७च्या डिसेंबर महिन्यांत फोर्डनें कॉन्फ्लान्सचा पराभव केला. पुढें कॉन्फ्लान्स मच्छलिपट्टणास गेला; आणि तेथून निजाम सलाबतजंगास त्यानें आपल्या मदतीस बोलाविलें. परंतु मदत येण्यापूर्वीच कर्नल फोर्ड ह्यानें मोठ्या तडफेनें उत्तरसरकार प्रांतांत प्रवेश केला; आणि जमीनदारांच्या मदतीनें सर्व प्रांत काबीज करून राजमहेंद्री व मच्छलिपट्टण हीं दोन मजबूद शहरें हस्तगत केलीं. कॉन्फ्लान्सला आपल्या लोकांसह कॅप्टिन फोर्डच्या स्वाधीन व्हावें लागलें. इतक्यांत

निजाम सलाबतजंग येऊन पोंचला; परंतु फ्रेंचांकडून आपला बचाव होत नाहीं असें पाहून, त्यानें फ्रेंचांची दोस्ती कायमची सोडून दिली; आणि इंग्रजांस आपल्या घरांत घेतलें. ह्या विजयानें इंग्रजांचा वर्चष्मा तिकडे चांगलाच बसला. सलाबतजंगानें कर्नल फोर्डबरोबर तह करून, राजमहेंद्री, मच्छलिपट्टण व आजूबाजूचा चार लाख उत्पन्नाचा प्रदेश इंग्रजांस कायमचा तोडून दिला; आणि फ्रेंचांनी कृष्णेच्या उत्तरेस व्यापाराचीं ठाणीं ठेवूं नयेत, व त्यांस निजामानें आपल्या नोकरीत ठेवूं नये, असें ठरलें. येणेंप्रमाणें इतकीं वर्षे खटपट करून निजामाच्या दरबारी बुसीनें वाढविलेलें फ्रेंचांचें वजन क्षणमात्रांत लयास गेलें.

उत्तरसरकार प्रांतांतील ह्या झगडा चालू असतां, बंगाल्यांतील फ्रेंचांचें ठाणें चंद्रनगर क्लाइव्हनें काबीज केलें, त्याची हकीकत बंगालच्या प्रकरणांत येईल.

**२. काउंट लालीचें आगमन व अडचणी.**—स. १७५६त युरोपांत इंग्रज फ्रेंचांचें युद्ध सुरू झालें, त्यास 'सात वर्षांचें युद्ध' असें नांव इतिहासांत आहे. त्याबरोबर हिंदुस्थानांतही जें युद्ध सुरू झालें, त्यास 'कर्नाटकांतील तिसरें युद्ध' असें म्हणतात. कोणी त्यास इकडे इंग्रजफ्रेंचांमधलें दुसरें युद्ध असेंही म्हणतात.

युरोपांतल्या अनेक राष्ट्रांतले लोक अमेरिकेंत वसाहती करून राहिले होते, त्यांत इंग्लंड व फ्रान्स ह्या दोन राष्ट्रांचे लोक प्रमुख असल्यामुळें अमेरिकेंतल्या वसाहतींवर इंग्लंडचा ताबा असावा, का फ्रान्सचा असावा, असा तंटा उपस्थित होऊन. स. १७५६च्या सुमारास ह्या दोन राष्ट्रांचें युद्ध जुंपणार असा रंग दिसूं लागला. इकडे युरोपांत प्रश्याचा पराक्रमी बादशहा फ्रेड्रिक धि ग्रेट हा आपलें राज्य वाढविण्याच्या नादांत, शेजारीं असलेल्या आस्ट्रिया देशाची राणी मेरिया तेरेसा हिचें राज्य गडप करूं पाहत होता. तेव्हां फ्रेड्रिकबरोबर लढण्यासाठीं मेरियानें पुष्कळ राजांची मदत मिळविली. फ्रान्सनें तिचा पक्ष घेतला. इकडे इंग्लंडच्या राजाच्या मालकीचें हॅनोवर संस्थान प्रश्याच्या हद्दींत होतें. त्याचा बचाव व्हावा म्हणून इंग्लंडच्या राजानें फेड्रि-

कचा पक्ष घेतला. त्यामुळें युरोपांत स. १७५६त मोठें युद्ध सुरू झालें, तें सात वर्षें चाललें ह्या युद्धांत जमिनीवर फ्रेडिककशीं व समुद्रावर इंग्रजांच्या आरमाराशीं झगडण्याचा प्रसंग फ्रान्सवर आला. इकडे हिंदुस्थानांत गोदेहूच्या तहानें इंग्रज व फ्रेंच कंपन्यांचा तंटा तुटावा तसा तुटला नाहीं. युरोपांत युद्ध सुरू झाल्यावर हिंदुस्थानांतली ही चुरस विकोपास गेली. पण इंग्रज फौज क्लाइव्हबरोबर बंगाल्यांत गेली असल्यामुळें, कर्नाटकांत एकदम झगडा सुरू झाला नाहीं. तरी फ्रेंचांनीं इंग्रजांचीं ठिकाणें घेण्याचा उद्योग आरंभिला. त्रिचनापल्ली अद्यापि इंग्रजांच्या ताब्यांत होतें. तेथील संरक्षक फौजेवर कॅप्टिन कॅलिओ होता. सन १७५७च्या एप्रिल महिन्यांत कॅलिओनें मदूरा काबीज करण्याचा प्रयत्न केला, तो सिद्धीस गेला नाहीं. इकडे मराठे सरदार येऊन कर्नाटकांतून आपला वार्षिक हक्क वसूल करीतच होते. कर्नाटकांतील नबाबांवर आतां निजामाचा ताबा राहिला नव्हता.

लालीचा जन्म स. १७०७त झाला. लहानपणापासून त्याचा काल युद्धसंग्रामांत गेला असून त्यानें अनेक मोठमोठे पराक्रम केले होते. फ्रेंच दरबारांत त्याची ख्याति चांगली असून राजाची त्याजवर मर्जी होती. तो फार धाडसी, शूर व दृढनिश्चयी म्हणून नांवाजलेला होता. कोणत्याही संकटास तो जुमानणारा नव्हता. इंग्रजांविषयीं त्याच्या मनांत अत्यंत द्वेष असून, त्यास अमेरिकेंतून व हिंदुस्थानांतून साफ घालवून दिलें पाहिजे, असें त्याचें मत होतें. डुप्ले परत गेल्यावर फ्रेंच सरकारानें सर्व गोष्टींचा विचार करून हिंदुस्थानांत कोणत्या प्रकारची व्यवस्था ठेवावयाची ह्याचा निश्चय केला; आणि त्याजबद्दल लाली यास कित्येक ताकिदी देऊन इकडे पाठविलें. हिंदुस्थानांत फ्रेंच सत्ता स्थापण्याचा उपक्रम बिलकुल करूं नये, किनारा सोडून आंत जाऊं नये, एतद्देशीयांच्या भांडणांत पडूं नये; आणि इंग्रजांचीं किनाऱ्यावरील तटबंदीचीं ठिकाणें काबीज करून, त्यांचा व्यापार समूळ बुडवून टाकावा, असा लाली ह्यास हुकूम होता. येणेंकरून खर्च न वाढतां पैशाच्या बाबतींत आपलें नुकसान भरून येईल, अशी फ्रेंच सरकारची अपेक्षा होती.

युद्ध सुरू झालें तेव्हां फ्रेंच सरकारानें लालीबरोबर फौज व आरमार व फौजेचा मुख्य अधिकार देऊन हिंदुस्थानांत पाठविलें. आरंभीं जितकी फौज लालीबरोबर यावयाची असें ठरलें होतें, तितकी येऊं शकली नाहीं. फ्रेंच सरकारानें हिंदुस्थान व अमेरिका ह्या दोनही ठिकाणीं इंग्रजांशीं युद्ध चालविलें, त्यापेक्षां एकाच ठिकाणीं जोरानें युद्ध केलें असतें तर कदाचित् त्यांच्या फायद्याचें झालें असतें. नानाप्रकारच्या अडचणींमुळें लाली ह्यास फ्रान्स सोडून निघण्यास पुष्कळ विलंब लागला. लालीच्या हाताखालीं अनेक शूर व नामांकित फ्रेंच सरदार इकडे आले. मात्र त्या सर्वांत ऐक्यभाव असावा तसा नव्हता. स्वतः लाली बुद्धिमान् व तरतरीत होता, कोणत्याही कामांत ताडफाड करून तो तें शेवटास नेत असे. पण तो स्वभावाचा उतावळा असून हिंदुस्थानांतील व्यवहारांची त्यास बिलकुल माहिती नव्हती. शिवाय हिंदुस्थानांतील फ्रेंच अधिकारी लांचखाऊ, अराजनिष्ठ व नेभळे असल्यामुळें, त्यांच्या म्हणण्याकडे लक्ष न देतां, योग्य दिसेल ती व्यवस्था जोरानें तावडतोब करावी असा त्यास फ्रेंच सरकारचा विशेष हुकूम होता. बुसीविषयीं मात्र फ्रेंच सरकाराचा अभिप्राय फार चांगला असून लालीस सर्व अधिकार देण्यांत आला होता, तरी डिलेरी हाच गव्हर्नर होता; ह्मणजे गव्हर्नर व कौन्सिल ह्यांचा अधिकार काढून घेण्यांत आलेला नव्हता. लालीच्या हाताखालचें अर्धें आरमार सुमारें सहा महिने अगोदर निघालें, तें स. १७५७च्या सेप्टेंबरांत पांदिचरीस आलें; व मागून लाली स. १७५८च्या एप्रिलांत आला. लाली येण्यापूर्वीं जी फौज प्रथम आली होती, तिचा डिलेरीनें एकदम उपयोग केला असता, तर कर्नाटक प्रांतांत त्या वेळीं इंग्रजांची फौज नसल्यामुळें, तेथें फ्रेंचांची सत्ता मजबूद होऊन मद्रास व फोर्ट सेंटडेव्हिड हीं ठिकाणें त्यास सहज काबीज करतां आलीं असतीं. लालीबरोबरच्या आरमारांत काउंट डाशे ( d'Ache' ) नांवाचा एक विचित्र गृहस्थ होता, त्याची नेमणूक लालीच्या हाताखालीं नसल्यामुळें, त्यानें मन मानेल तसें वर्तन करून, लालीचा सल्ला ऐकिला नाहीं. त्यामुळेंही फ्रेंचांचें नुकसान झालें.

एप्रिल स. १७५८त लाली पांदिचरीस उतरला. प्रथमपासूनच येथील अधिकाऱ्यांबद्दल त्याचा ग्रह वाईट झाला होता; व आपण त्या सर्वांस सुधारून शिक्षा वगैरे करण्याकरितां आलों आहों अशी त्याची समजूत असल्यामुळें, त्याचें कोणाशीं पटलें नाहीं. त्यास कोणीं कांहीं सल्ला दिली, तरी ती कपटानें दिलेली आहे असें वाटून, तिचा तो स्वीकार करीत नसे. ह्या त्याच्या कृतीमुळें त्याजला ननापासून साह्य असें कोणीं केलें नाहीं. 'आपल्या शौर्यास बट्टा लागलेला पत्करिला, एक वेळ स्वराष्ट्रद्रोही असें आपणास कोणी ह्मटलें तरी चालेल; पण लालीची खोड मोडूं' असा लालीच्या उद्दाम वागणुकीनें इतर फ्रेंच गृहस्थांचा बेत झाला. वरपासून खालपर्यंत सर्व मंडळीच्या अंतःकरणांत अशा प्रकारच्या मूर्ख समजुतींचा संचार झाला होता. किनाऱ्यावर उतरल्याबरोबर लालीनें मद्रास व फोर्ट सेंटडेव्हिड घेण्याचा निश्चय केला. पण उपयोग काय ? डिलेरीची कांहींच तयारी नव्हती. शत्रूंकडील बातमी नाहीं; तिजोरीत पैसा नाहीं; मार्गदर्शक माणसें नाहींत; बरें ही तयारी नसूनही पुढें तरी लालीस मदत देण्याची इच्छा असावी, ती एकाचीही नाहीं. लालीनें स्वतःच्या पदरचे पैसे खर्च केले; व एकट्यानें झाली तेवढी सिद्धता केली. इंग्रजांचें आरमार डाशेच्या पाठीमागून तीन महिन्यांनीं निघून, त्याच्या अगोदर सवा महिना इकडे येऊन दाखल झालें. रस्त्यांत निगापट्टणनजीक दोघांची भेट होऊन चकमक उडाली, तींत डाशेचा पुष्कळ नाश झाला. ता. १ मे स. १७५८ रोजीं लाली पांदिचरीहून निघून कडलुरास आला. ता. ४ रोजीं कडलुर त्याचे कबजांत आलें. पुढें फोर्ट सेंट डेव्हिडवर जावयाचें. पण सैन्यास धान्यसामुग्रीचा पुरवठा नाहीं व सामान वाहून नेण्यास गाड्या माणसें नाहींत, अशा स्थितींत एतद्देशीयांच्या मुलखांत शिरून सांपडेल तो इसम पकडून कामास लावावयाचा, असा लालीनें सपाटा चालविला. तसेंच खुशाल लूट करून सांपडेल तें घेण्याचा त्यानें उद्योग चालविल्यामुळें, इकडचे सर्व लोक फ्रेंचांचे शत्रु बनले. त्यामुळें लवकरच चहूंकडून तो कोंडल्यासारखा झाला. त्यास काय करावें हें सुचेना. तरी पण तो कोणत्याही

अडचणीस जुमानणारा नव्हता. वेळेवर सुचेल तें ताडकन करून त्यानें आपला उद्योग चालविला. ता. १६ मे रोजीं त्यानें फोर्ट सेंट डेव्हिडवर तोफ चालविली. थोड्याच दिवसांत किल्ला हातीं येणार, इतक्यांत बातमी आली कीं, पांदिचरीवर इंग्रजांचें आरमार येऊन तेथचे फ्रेंच शिपाई काम न करतां पगाराकरितां अडून बसले आहेत. त्याबरोबर तो लगेच पांदिचरीस गेला; आणि स्वतःच्या पदरचे पैसे काढून त्यानें लोकांची समजूत केली. पुढें परत फोर्ट सेंट डेव्हिड येथें येऊन ता. २ जून रोजीं त्यानें तो किल्ला काबीज केला. लगेच देविकोटाही त्यानें घेतलें. इतक्यांत डाशे आपलें आरमार घेऊन फो० सें० डेव्हिडवर आला. तेथें लालीनें त्याची पुष्कळ विनवणी करून मद्रासवर हल्ला करण्यास त्याची मदत मागितली. पण डाशे कांहीं केल्या तें ऐकेना. तो ह्मणे, 'आपण फक्त व्यापारी गलबतांचें संरक्षण करणार, व परत सेंट लुइ येथें जाणार.' त्याप्रमाणें ६०० लोकांसहित आपलें आरमार घेऊन तो निघून गेला. व्यापारी गलबतांचें कामही त्यानें पुरें पाडलें नाहीं. त्यास चुकवून इंग्रज गलबतें मुबलक पैसा व सामान घेऊन मद्रासेस येऊन पोंचलीं. पुढें मद्रासेवर स्वारी करावयाची, पण खर्चास कांहीं नाहीं, ह्मणून तंजावरावर स्वारी करून पैसे काढण्याची मसलत कौन्सिलनें लालीस दिली. छपन्न लाख रुपयांचा कर्जरोखा तंजावरच्या राजानें डुप्लेस लिहून दिला. तो वसूल करण्याची ही युक्ति होती. ती जरी लालीस आवडली नाहीं, तरी नाइलाजामुळें ती त्यास कबूल करावी लागली. लाली तंजावरावर आला, तो रस्त्यानें देवळें व गांवें लुटीत गेला. प्रांतांतल्या लोकांस लालीच्या स्वारीची धास्ती एवढी मोठी बसली, कीं लोक त्याचा रस्ता चुकवून आड प्रदेशांत निघून गेल्यामुळें, सर्व प्रदेश त्यास ओसाड दिसला. जुलई ता. ८ रोजीं लाली तंजावरास पोंचला. राजास दहशत पडली. तो पांच लाख देण्यास कबूल झाला. पण लालीच्या उतावळेपणानें सर्व फसलें. थोडासा जय मिळाल्याबरोबर, 'राजास त्याच्या सर्व माणसांसह कैद करून सेंट लुइ येथें घेऊन जाऊं', अशी लालीनें त्यास निष्ठुरपणाची धमकी दिली. त्याबरो-

वर राजा प्रतापसिंग चिडून गेला, व काय होईल तें होवो अशा निश्चयानें, फ्रेंचांची तोफ लागणार, इतक्यांत कारिकल व पांदिचरी घेण्याकरितां इंग्रज फौज आल्याची बातमी आली; तेव्हां लाली यास कसाबसा जीव बचावून तंजावर सोडून पांदिचरीस परत जाणें भाग पडलें. परत जातांना तंजावरकरांनीं लालीस इतका त्रास दिला, कीं तो स्वतःच तजावरकरांच्या हातांत सांपडण्याची पाळी आली होती, पण ती मोठ्या शर्थीनें टळली. तीन मोठ्या तोफा खिळे ठोकून त्यास रस्त्यांत टाकून द्याव्या लागल्या. ह्याप्रमाणें समुद्रांतून डाशे व जमिनीवरून लाली शत्रूंचा मार खात पांदिचरीस आले. तरीही डाशे लालीस मदत करण्यास कबूल झाला नाहीं. मात्र एक डच गलबत डाशेनें पकडून आणिलें, त्यावर बराच पैसा व सामुग्री लालीस मिळाली. ती घेऊन तो लगेच मद्रासेवर निघाला. रस्त्यांत बुसी त्यास येऊन मिळाला. बुसी व लाली ह्यांचें बाहेरून सख्य होतें. बुसीच्या म्हणण्याप्रमाणें लाली वागता तर बराच फायदा झाला असता. पण बुसी जी जी गोष्ट सांगे, ती कांहीं तरी मतलबाची आहे असें लालीस वाटे. बुसीपाशीं मुबलक पैसा आहे ही गोष्ट लालीस ठाऊक होती; पण हा पैसा त्यानें अन्यायानेंच मिळविला असला पाहिजे अशी लालीची समजूत होऊन, बुसीच्या सल्ल्याचाही तो अव्हेर करूं लागला. तेव्हां दोघांत चुरस वाढून बुसीनें मनापासून लालीस साह्य केलें नाहीं. तथापि अखेरपर्यंत राजनिष्ठेच्या विरुद्ध यत्किंचित् कृत्य बुसीनें केलें नाहीं. बुसीला निजामाच्या दरबारांतून लालीनें काढल्यामुळें लालीचा फायदा तर कांहीं झालाच नाहीं; उलट तेथें राहून तो पैशाची व इतर मदत करूं शकला असता ती मात्र नाहींशी झाली. आपल्या लोकांची पांगापांग न करितां, सर्वांनीं एक ठिकाणीं जमून एकदम जोराचा हल्ला इंग्रजांवर करावयाचा, असा लालीचा बेत असल्यामुळें त्यानें बुसीस परत बोलाविलें.

लालीकडून बुसीस जेव्हां बोलावणें गेलें, तेव्हां बुसी मोठा पंचाइतींत पडला. हैदराबाद सोडून जावें, तर निजामाच्या दरबारीं असलेलें फ्रेंचांचें

वजन एकदम नाहींसें होणार; न जावें, तर तिकडे लालीचा पराभव झाल्यास त्याचा परिणाम हैदराबादेस आपणावरही झाल्याशिवाय राहवयाचा नाहीं. शिवाय हुकूम तोडल्याचा दोष माथीं यावयाचा तो वेगळाच. हैदराबादेस राहूनच पैशाची व फौजेची मदत त्यास आपण वाटेल तशी करूं शकूं, तितकी मदत स्वतः थोडीशी फौज घेऊन लालीस जाऊन मिळाल्यानें व्हावयाची नाहीं, हें तो समजून होता. हा त्याचा विचार बरोबर होता; मात्र हैदराबाद फार दूर असल्यामुळें, इतक्या अंतरावरून डुप्लेची मदत सुरक्षितपणें जाऊन लालीकडे पोंचण्यास अनेक अडचणी होत्या. तेव्हां बुसी जाऊन लालीस मिळाला, हें गैर झालें असें ह्मणतां येत नाहीं.

**३. लालीचा व इंग्रजांचा संग्राम** ( स. १७५९–६१ ). —मद्रासेवर हल्ला करण्याची मुख्य व्यवस्था बुसीकडे द्यावी, असें सर्व मंडळी लालीस सांगत असतां तें त्यानें ऐकिलें नाहीं. उलट बुसीनें सर्वांचीं मनें आपल्याविषयीं बिघडविलीं आहेत, असा लालीस संशय आला. नोव्हेंबर स. १७५८च्या आरंभीं सात आठ हजार फौज घेऊन लाली मद्रासेवर निघाला. त्याजबरोबर बुसीही होता. रस्त्यांत आर्काट काबीज करून त्यांनीं राजासाहेबास कर्नाटकची नबाबगिरी दिली.

मद्रासेंत इंग्रज फौज पांच हजार होती. लॉर्ड पिगट ( Pigott ) हा हुशार गृहस्थ मद्रासचा गव्हर्नर असून, कर्नल लॉरेन्स हा अनुभवी गृहस्थ फौजेवर मुख्य होता. चिंगलपटचें ठाणें इंग्रजांकडे होतें, तें फ्रेंचांस घेतां आलें नाहीं. ह्मणून इंग्रजांस बाहेरून मदत येण्याची सवड राहिली. ता. १३ डिसेंबर रोजीं मद्रासच्या किल्ल्याबाहेरचें एतद्देशीय शहर ब्लॅकटाऊन हें लालीच्या हातीं आलें. ह्या शहरांत पुष्कळ हिंदी व्यापारी सधन होते. त्या सर्वांस फ्रेंच लष्करानें लुटून सुमारें साठ लक्ष रुपयांचा ऐवज मिळविला. पण फ्रेंच लष्करांत शिस्त कशी ती बिलकूल नसल्यामुळें तीस पसतीस हजारच काय ते सरकारी तिजोरीस जमा झाले. पांदिचरी येथील अधिकाऱ्यांच्या अंतर्वैमनस्यामुळें फ्रेंच लष्कराची शिस्त इतकी बिघडली होती, कीं कसें तरी 'बाबा

पुता करून' त्यांजकडून काम घेणें लालीस भाग पडत होतें. नाहीं तर कडक शिक्षा ठोठावण्यास लाली कांहीं असमर्थ नव्हता. डिसेंबर ता. १४ रोजीं मद्रासेस इंग्रज व फ्रेंच यांची निकराची लढाई सुरू झाली. तींत लालीच्या फौजेनें शिकस्त करून इंग्रजांचा बहुतेक पराजय केला होता. पण बुसीनें आयत्या वेळीं जशी मदत करावी तशी केली नाहीं, त्यामुळें इंग्रज बचावून परत किल्ल्यांत जाऊं शकले. पुढें फ्रेंचांनीं मद्रासच्या सेंट जॉर्ज किल्ल्यास वेढा घातला. हा वेढा चालावा तसा नेटानें चालला नाहीं. लालीकडील लोक ब्लॅकटाउनची लूट पळविण्यांत व अनेक तऱ्हेचे अनाचार करण्यांत दंग होते. ह्मणून तंजावरकर वगैरे एतद्देशीय लोकांस चिथवून इंग्रजांनीं लालीस त्रास देण्यास सुरुवात केली. शिवाय दोनशें फ्रेंच लोक राष्ट्रद्रोह करून इंग्रजांस जाऊन मिळाले होते, ते वारंवार किल्ल्यावर पुढें येऊन फ्रेंच लष्करास सांगत 'इंग्रजांस येऊन मिळा, ह्मणजे तुमचें कल्याण होईल; विनाकारण जीव कां धोक्यांत घालतां?' तथापि ता. २ जानुवारी स. १७५९ पासून दीड महिनापर्यंत लालीनें तोफांचा मारा करून किल्ला घेण्याची शिकस्त केली. पुढें तटास एक भोंक पडलें, त्यांतून एकदम आंत जाण्याचा लालीचा विचार होता. पण त्याचे अधिकारी व लोक पुढें पाय घेतना. शेवटीं ता. १६ फेब्रुवारी रोजीं ॲड्मिरल पोकॉक (Pocock) मोठें आरमार घेऊन इंग्रजांच्या मदतीस येऊन पोंचला. त्याबरोबर लालीची त्रेधा उडाली. जीव जगवून परत जावयाचें कसें व पांदिचरीचा बचाव करावयाचा कसा, हा त्याजपुढें मोठा प्रश्न येऊन पडला. दारूगोळा व धान्यसामुग्री सर्व संपली. ३३ फ्रेंच लोक जखमी होऊन खिळलेले होते, त्यांस घेऊन जातां येईना. ह्मणून त्यांस तसेच मागें ठेवून सेंट टॉमेच्या रस्त्यानें लाली वेढा उठवून पांदिचरीस आला. मागें ठेवलेल्या आजारी माणसांची काळजी घेण्याविषयीं लालीनें इंग्रज गव्हर्नरास एक विनंतिपत्र मात्र पाठविलें. ह्याप्रमाणें हिंदुस्थानांतून इंग्रजांस घालवून देण्याचा जो मोठा इरादा करून लाली इकडे आला तो त्यास सोडून द्यावा लागला. ह्या अपयशाचा सर्व वांटा लोक लालीसच देतात. लाली दुराग्रही व

एककली होता ही गोष्ट खरी; पण त्याचें वर्तन अखेरपर्यंत शूर पुरुषास शोभणारें व अत्यंत राजनिष्ठ होतें. इतर मंडळी स्वार्थाचे पाठीस लागून स्वदेशाचा घात करण्यास उद्युक्त झाली असल्यामुळें, वरील अपयशाचा बराच मोठा भाग त्यांचे माथीं येतो.

लाली मद्रास सोडून निघाला तो कांचीवरं, आर्काट वगैरे ठिकाणीं थोडासा बंदोबस्त करून पांदिचरीस आला. तेथें डिलेरी व कौन्सिल यांजबरोबर त्याचे पुष्कळ शाब्दिक झगडे झाले. इकडून इंग्रजांनीं फ्रेंचांचीं ठाणीं घेतलीं व फ्रेंच फौजेस पांदिचरीकडे रेटीत आणिलें. तरी लालीनें धीर सोडला नाहीं. तो हरतऱ्हेचे यत्न करून आपला बचाव करीत होता. हाताखालचे लोक बिथरले होते, त्यांनीं उघड बंड केलें. कांहीं शत्रूंस जाऊन मिळूं लागले. त्यांतून युक्तीनें लाली आपली सुटका करितो, तों डाशेचें फ्रेंच आरमार पोर्टलुइहून पांदिचरीस येत असतां, त्याची व अॅड्मिरल पोकॉकच्या इंग्रज आरमाराची फोर्ट सेंट डेव्हिड नजीकच्या समुद्रांत गांठ पडली; तेथें निकराची लढाई होऊन उभयपक्षीं पुष्कळ नाश झाला. डाशे जखमी झाला व अंधार पडल्यावर तो आपलीं गलबतें घेऊन पांदिचरीस आला. त्यानें आपल्या बरोबर चार पांच लाखांचा ऐवज आणिला होता, तो देऊन लगेच परत तो पोर्ट लुइस गेला. इकडे लाली फार आजारी पडला होता. त्यानें डिलेरी व बुसी यांस डाशेकडे पाठवून त्यास इकडे राहण्याविषयीं आग्रहाची विनंति केली; पण ती डाशेनें मान्य केली नाहीं. उलट पक्षीं इंग्रजांनीं अतिशय मोठी जमवाजमव करून फ्रेंचांशीं लगट केली. वांदिवाश मुक्कामीं स. १७५९, सेप्टेंबर २९, रोजीं एक निकराची लढाई होऊन इंग्रजांचा मोड झाला. पण लाली आजारी असल्यामुळें ह्या जयाचा फायदा फ्रेंचांस घेतां आला नाहीं. इंग्रजांकडे ह्या वेळेस अनेक शूर गृहस्थ जमा झाले होते. त्यांत कर्नल आयर कूट ( Coote ) हा विशेष नामांकित व शूर होता. इतक्यांत फ्रेंच लष्करानें पुनः बंड केलें. तें मोडण्यास लालीस फारच प्रयास पडले. बुसीनें आर्काटकडे जाऊन धान्य व पैसा ह्यांची थोडी बहुत जमवाजमव केली. अशा रीतीनें स. १७५९ हें वर्ष खलास झालें.

स. १७६०त शेवटच्या निकराचा सामना सुरू झाला. त्यांत लालीनें एक चूक अशी केली, कीं आपल्या फौजेचे दोन भाग केले. एक भाग त्यानें त्रिचनापल्लीकडे पाठविला; व दुसरा स्वतः घेऊन तो इंग्रजांवर निघाला. बुसीची व त्याची आर्काट येथें गांठ पडली. आपण होऊन लढाईचा प्रसंग न आणतां बचाव करून राहवें असा बुसीचा सल्ला होता, तो लालीच्या उतावळ्या स्वभावास पसंत पडला नाहीं. वांदिवाश इंग्रजांनीं घेतलें होतें तें पुनः काबीज करण्यास तो निघाला. त्या ठिकाणीं शेवटची मोठी निकराची लढाई झाली ( जानेवारी ता. १६ स. १७६० ). दोनही राष्ट्रांचे मोठमोठे सरदार त्या ठिकाणीं हजर होते. दोनही पक्षांनीं लढण्याची शिकस्त केली. लढाई ऐन रंगांत आली असतां, बुसीच्या घोड्यास गोळी लागून पडल्याबरोबर बुसी शत्रूंच्या हातांत सांपडला, आणि फ्रेंच लोक पराभव पावून पांदिचरीस पळून गेले. ह्या लढाईंत इंग्रजांचा सेनापति कूट ह्यानें मोठें नांव मिळविलें. वांदिवाशच्या ह्या लढाईनें इंग्रजफ्रेंचांच्या हिंदुस्थानांतील युद्धाचा, व त्याबरोबर हिंदुस्थानचे मालक पुढें कोण होणार ह्या प्रश्नाचा, कायमचा निकाल लागला. मार्टिन, डुमास व डुप्ले इत्यादि नामांकित फ्रेंच गृहस्थांनीं हिंदुस्थानांत फ्रेंच राज्य स्थापण्यासाठीं केलेले प्रयत्न साफ बुडाले. वांदिवाशच्या लढाईनंतर फ्रेंचांचीं ठिकाणें एकामागून एक इंग्रजांनीं काबीज केलीं. शेवटीं पांदिचरीवर गदा आली. इंग्रजांस विलायतेहून गलबतांची व फौजेची मोठी मदत येऊन मिळाली. फ्रेंचांस मात्र कोणीकडूनच मदत आली नाहीं. चार सहा महिने शर्थ करून लालीनें पांदिचरीचा बचाव केला. शेवटीं दारूसामान व अन्नसामुग्री संपल्यामुळें निरुपाय होऊन लालीस शत्रूंच्या स्वाधीन होणें भाग पडलें. ( ता. १५ जानुवारी स. १७६१ ). ह्या प्रसंगीं लाली व त्याचे शिपाई लढून लढून अगदीं प्रेतवत् झाले होते. स्वतः लाली व त्याच्याच हाताखालचे थोडे फ्रेंच ह्यांनीं लढण्याची शर्थ केली, व अखेरपर्यंत शूर शिपायांस योग्य असें वर्तन केलें. तसेंच शरण जाण्याचे प्रसंगीं कित्येक राजद्रोही फ्रेंचांनीं बेशरमपणाचें वर्तन केलें, तेही इतिहासांत नमूद आहे. पांदिचरीची तटबंदी इंग्रजांनीं पाडून टाकिली.

लाली यास इंग्रजांनीं मद्रासेहून इंग्लंडांस पाठविलें. तेथें शपथेवर त्याची सुटका होऊन तो स्वदेशास गेला. पण हिंदुस्थानांत जसे त्यास अनेक शत्रु उत्पन्न होऊन त्याचा छळ करीत होते, तशीच गोष्ट फ्रान्सांत झाली. तो जितका आपल्या शत्रूंचा निषेध करून स्वकृत्यांचें समर्थन करूं लागला, तितके त्याचे शत्रु बळावले व सर्वांनीं एकमतानें त्याजविरुद्ध तक्रार चालविली. ह्याचा परिणाम जोराचा होऊन त्याच्या जिवावर येऊन बेतलें. परंतु आपण निरपराधी आहों ह्या समजावर न डगमगतां जें येईल तें भोगावयाचें, पळून जावयाचें नाहीं, असा त्यानें निश्चय केला. त्याजवर देशद्रोहाचा खटला होऊन तें काम तीन वर्षें चाललें, आणि शेवटीं न्यायाधीशांनीं त्यास फांशीची शिक्षा सांगितली. ती ता. ९ मे, स. १७६६ रोजीं अंमलांत आली. अशा रीतीनें ह्या शूर पुरुषाचा अंत झाला. फ्रेंच राष्ट्राची तत्कालीन स्थिति किती निकृष्ट होती, हें ह्यावरून उघड होतें. लालीस शिक्षा झाली ती झाली; पण त्याजला ज्यांनीं पाठबळ दिलें नाहीं व उघड राष्ट्रद्रोह केला, असे शेंकडों लोक होते त्यांचा कोणीं तपास सुद्धां केला नाहीं.

बुसी स्वदेशीं परत गेला. त्यानें मुबलक पैसा मिळविला होता, त्यावर पुष्कळ दिवस त्यानें चैन केली. पुढें वीस वर्षांनीं म्ह. स. १७८१त पुनः फ्रेंच फौजेचें आधिपत्य स्वीकारून तो कर्नाटकांत आला, पण तेव्हां त्याच्या हातून कांहीं एक पराक्रम न घडतां त्यास इकडेच मृत्यु आला.

ह्याप्रमाणें फ्रेंच देशभक्तांनीं हिंदुस्थानांत फ्रेंच सत्ता स्थापण्याचा उपक्रम केला, तो सिद्धीस गेला नाहीं. पुढें फ्रेंच कंपनीचेंही प्रयोजन राहिलें नाहीं, तेव्हां फ्रेंच सरकारानें स. १७६९त तीही मोडून टाकिली. पांदिचरी काबीज केल्यावर इंग्रजांनीं जिंजी, थियागड वगैरे फ्रेंचांचीं एकूण एक ठिकाणें घेतलीं. कांहीं फ्रेंच लोकांनीं पळून जाऊन हैदरअलीच्या पदरीं नोकरी पत्करिली. स. १७६३त पारिसचा तह होऊन पांदिचरी, कारिकल, माही वगैरे कित्येक ठिकाणें फ्रेंचांस परत मिळालीं, तीं त्यांजकडे अजून चालत आहेत. ह्यापुढें फ्रेंचांनीं पुनरपि आपलें राज्य हिंदुस्थानांत स्थापण्याचे

कांहीं प्रयत्न केले, पण त्यांत यश न आल्यामुळें वांदिवाशच्या लढाईनें फ्रेंचांचा हिंदुस्थानांतील इतिहास संपला असेंच म्हटलें पाहिजे.

**४. लालीच्या अपयशाचें पर्यालोचन.**—आतां ह्या युद्धांत लालीला यश कां आलें नाहीं, ह्याचा विचार करूं. निकरानें, कुशलतेनें व क्षपाव्यासरशीं इंग्रजांशीं संग्राम करून त्यांचा पाडाव करणें, हेंच लालीचें मुख्य काम होतें; पण ह्या तीनही बाबतींत फ्रेंचांच्या बाजूस चुका होत गेल्या. स्वत: लाली जरी शूर व कर्तव्यतत्पर होता, तरी सेनापतीच्या कामास लायक नव्हता. त्याची नालायकी नेमणूक होण्यापूर्वींच एका फ्रेंच प्रधानानें जाहीर केली होती. तो रागीट, उतावळा, हट्टी व खाष्ट होता. शिक्षा करण्यांत अतिशय कडक असून, एकदां तोंडांतून गेलेला शब्द तो परत घेत नसे. यत्किंचित् एकाद्याची चूक झाली किंवा कोणीं यःकश्चित् त्यास विरोध दाखविला, कीं लगेच मेघगर्जनेप्रमाणें तो खवळून जाई. ह्या स्वभावामुळें हाताखालचे लोक त्यास मनापासून साह्य करीनात, उलट त्यास तोंडघशीं पाडून आपण मजा पाहत बसत; आणि वाटेल तें नुकसान झालें तरी लालीचा पाडाव करण्यांत धन्यता मानीत. लालीच्या ह्या स्वभावामुळें फ्रेंच पक्षाचें पुष्कळ नुकसान झालें. सेनापतीच्या अंगीं कौशल्य कसें पाहिजे व त्याची निवड करण्यांत वरिष्ठांनीं किती दक्षता ठेविली पाहिजे, हें ह्या प्रकारावरून दिसून येतें. मराठ्यांच्या इतिहासांतही अशीं उदाहरणें पुष्कळ सांपडतील.

तथापि लालीची फौज उत्कृष्ट होती; आणि ती इकडे येऊन पोंचली त्यापूर्वीं एक वर्ष अगोदर ती आली असती, तर लालीचें काम बरेंच तडीस गेलें असतें. इकडे फौज पाठविण्याचा फ्रेंच सरकाराचा ठराव १७५५त झाला; आणि १७५६त युद्ध सुरू झाल्याबरोबर ती निघाली असती, तर इंग्रजांच्या ऐन अडचणीच्या प्रसंगीं ती इकडे आली असती. स. १७५६च्या जून महिन्यांत बंगालच्या नबाबानें इंग्रजांस हांकून दिलें होतें; आणि ऑक्टोबरांत मद्रासची सर्व फौज घेऊन क्लाइव्ह बंगाल्यांत गेला होता. ह्या प्रसंगीं इंग्रजांनीं जशी चलाखी केली तशी फ्रेंचांनीं केली नाहीं. युरोपांत

रेंगाळत न राहतां युद्ध सुरू झाल्याबरोबर लाली निघाला असता, तर स. १७५७च्या आरंभीं तो पांदिचरीस पोंचूं शकला असता. वास्तविक तो १७५८च्या एप्रिलांत येऊन पोंचला. एक वर्ष अगोदर आला असता तर, आणि लालीनें किनाऱ्याकडून व बुसीनें हैदराबादेहून मद्रासकर इंग्रजांस निकरानें चेपलें असतें तर, निदान ह्या झगड्याचा निकाल तरी ताबडतोब लागला असता. पण दिरंगाईमुळें उलट प्रकार झाला. लाली येण्यापूर्वीच बंगाल्यांत इंग्रजांचें स्वामित्व होऊन, त्यांस पैशाची व फौजेची मुबलक मदत मिळाली. बंगाल्यांतील फ्रेंचांस क्लाइव्हनें हांकून दिलें. शिवाय कर्नल फोर्ड ह्यास पाठवून क्लाइव्हनें फ्रेंचांस उत्तरेकडून दक्षिणेस चेपीत आणिलें. मच्छलिपट्टणचें उत्कृष्ट नाकें फ्रेंचांचे हातून फोर्डनें काबीज केल्यामुळें, बुसीस होणारी मदत खुटली. निजामाच्या दरबारीं त्याचा बदलौकिक झाला, आणि अखेरीस दक्षिणेंतून फ्रेंचांचा पाय कायमचा निघाला. असा ह्या दिरंगाईचा परिणाम होय.

लालीच्या स्वभावाचा परिणाम लवकरच दिसून आला. डाशेनें त्यास मदत केली नाहीं. इकडील लोकांची व प्रदेशाची माहिती मिळविण्याचा त्यानें प्रयत्न केला नाहीं; आणि मिळालेली माहिती त्यानें झिडकारून दिली. खर्चांत तूट पडल्यामुळें गोंधळून जाऊन तो भलभलतींच कृत्यें करूं लागला. असें होत आहे तों इंग्रजांचीं आरमारें येऊन दाखल झालीं, त्यांनीं फ्रेंच आरमाराचा पाडाव केला. तेव्हां हैदराबादेहून बुसीस परत बोलावणें भाग पडलें. बरें बुसीशीं तरी त्यानें सरळ वागावयाचें होतें. त्याचाही त्यानें अपमान केला, त्यामुळें लालीचा सर्वच आधार तुटला. सर्व बाजूंनीं अडचणी आलेल्या, हातांत कांहीं एक साधन नाहीं, सर्व नोकर बिथरलेले, फौजेचा सुद्धां त्याजवर अविश्वास, अशा संकटांत सांपडून त्यानें निकरानें मद्रासेवर हल्ला केला. त्यांत त्याला यश आलें नाहीं. पांदिचरीस सर्वत्र उदासीनता व निराशा ह्यांची छाया पसरली होती. शेवटीं वांदिवाशच्या लढाईनें प्रकरणाचा निकाल लागला.

५. **फ्रेंचांच्या पाडावाची मीमांसा.**—स. १७६१त पांदिचरी पडल्या-

बरोबर युद्ध संपलें. सन १७२५ पासून स. १७६९त फ्रेंच कंपनी मोडली. त्या दरम्यानच्या चवेचाळीस वर्षांत, ३७ कोटि ६० लक्ष फ्रँक ह्मणजे सुमारें वीस कोटि रुपये फ्रेंच सरकारानें हिंदुस्थानांत व्यापार करणाऱ्या फ्रेंच कंपनीस कर्ज ह्मणून दिले. त्यापैकीं जवळ जवळ दहा कोट रुपयांचें निव्वळ नुकसान झालें. ह्या नुकसानाबद्दलची हळहळ मागें राहिली, एवढाच काय तो त्या खटाटोपीचा फायदा फ्रेंच राष्ट्रास झाला, असें व्हाल्टेयर ह्मणतो. स. १७६६च्या तहानें पूर्वीचीं चार दोन ठिकाणें फ्रेंचांच्या ताब्यांत आलीं खरीं; परंतु ह्या ठिकाणीं तटबंदी करूं नये, आणि फ्रेंच फौज ठेवूं नये, असा करार असल्यामुळें, इकडील फ्रेंच सत्ता कायमची बुडाली. युद्धास काय किंवा व्यापारास काय, किनाऱ्यांवर तटबंदी केलेल्या मजबूद जागा पाहिजेत, आणि युरोपियन आरमाराकडून त्या ठिकाणांचा बचाव झाला पाहिजे, ह्या मुख्य गोष्टी जरूर असतात. ह्या दोनही गोष्टी फ्रेंचांस प्रतिकूल झाल्या. खरें पाहिलें तर हा परिणाम एक दोन व्यक्तींच्या नालायकपणानें घडून आला असें नाहीं. त्यास आणखीही पुष्कळ सामान्य व प्रबल कारणें होतीं. केवळ व्यक्तीची नालायकी असती तर ती भरून काढतां आली असती.

अलीकडचा एक फ्रेंच लेखक ह्मणतो, 'फ्रेंच सरकारच्या ताकिदी जर लालीनें बाजूस ठेविल्या असत्या, आणि डुप्लेचा क्रम स्वीकारून बुसीचा उपदेश ऐकिला असता, तर हिंदबादशाहीचा मुगुट आज व्हिक्टोरिया राणीच्या डोक्यावर फडकला नसता.' हें प्रतिपादन बरेंच धाडसाचें आहे. डुप्लेची कल्पकता व बुसीची हुशारी कितीही असली, तरी त्यांच्या कारभाराची सर्व भिस्त एतद्देशीयांच्या दरबारीं आपलें वजन राखण्यावर, ह्मणजे आपल्या हालचालींची व व्यवहारांची मर्यादा होईल तितकी वाढविण्याकडे होती. हिंदुस्थानांतील राजांच्या छातीवर फौजेचें दडपण ठेवून राज्यविस्तार करितां येणें शक्य होतें. पण राज्याचा मूळ पाया त्यामुळें तयार होत नाहीं. आज सुद्धा अशी स्थिति आहे. सरहद्दीवरच्या किंवा आजूबाजूच्या सत्ताधीशांच्या प्रदेशांत ढवळाढवळ करून इंग्रजांनीं आपलें राज्य वाढविलें व अजूनही

वाढवितील. इंग्रजी राज्याचा मूळ पाया व त्याचा मुख्य आधारस्तंभ युरोपांत आहे. युरोपांत इंग्रज राष्ट्राची सत्ता जोंपर्यंत प्रबळ आहे, जोंपर्यंत इंग्रजी आरमार एकंदर साम्राज्याचें संरक्षण करण्यास समर्थ आहे, तोंपर्यंतच हा राज्यविस्तार टिकेल. मुळांतली ही शक्ति हीन झाल्यावर बाहेरचा दिखाऊ विस्तार यत्किंचित् टिकणारा नाहीं. मात्र बाहेरच्या विस्तारामुळें राष्ट्रीय आरमारास पुष्टि येते एवढी गोष्ट खरी. हाच न्याय तत्कालीन फ्रेंच राज्यासही अगदीं तंतोतंत लागू पडतो. मुळांतच जर फ्रेंच राष्ट्राची शक्ति हीन होती, तर हिंदुस्थानांतील चार दोन रजवाड्यांशीं युक्तीनें किंवा जबरीनें केलेल्या स्नेहसंबंधांचा उपयोग कितीसा व्हावयाचा होता ? हिंदुस्थानांतून इंग्रजांस घालवून देण्याचें काम अशक्य होतें. लालीच्या ठिकाणीं डुप्ले असता, किंवा दुसरा कोणी दिव्य पुरुष निर्माण झाला असता तरी, असलेल्या परिस्थितीचें ऐतिहासिक दृष्टया अवलोकन करावयाचें असेल तर, तें काम सर्वथैव अशक्य होतें. इहलोकच्या घडामोडी आकस्मिक, कल्पनातीत किंवा दैविक कारणांनीं निर्माण होतात, असा ज्यांचा ग्रह असेल त्यांनीं इतिहासाचें अध्ययन करण्याची जरूर नाहीं. ह्या घडामोडी मानवी शक्तींनीं उत्पन्न होतात, आणि मानवी बुद्धीला त्या परिज्ञेय असतात, असें समजणारांसच इतिहासाचें अध्ययन उपयोगी आहे. फ्रेंच सरकारानें डुप्लेला मध्येंच परत बोलाविलें; लाबूर्डोनें किंवा डाशे हे आपलीं गलबतें घेऊन एकदम चालते झाले; किंवा लालीचा स्वभाव उतावळा व हट्टी होता, इत्यादि कारणांनीं हिंदुस्थानांतील फ्रेंच सत्ता बुडाली अशांतला प्रकार नाहीं. ह्या कारणांचा परिणाम तात्पुरता झाला असेल. पण अखेरचा परिणाम त्या कारणांनीं विशेष बदलूं शकला नसता.

दुसरे कित्येक लेखक असें प्रतिपादन करितात, कीं दूरदूरच्या प्रदेशांत जाऊन, मोठमोठे राष्ट्रीय उद्योग करण्याची अक्कल व धाडस फ्रेंच राष्ट्राच्या अंगीं नाहीं, म्हणून फ्रेंचांचें राज्य हिंदुस्थानांत स्थापन झालें नाहीं. हें म्हणणेंही वरच्याइतकेंच अप्रयोजक आहे. धाडस, कल्पकता इत्यादि

गुणांत फ्रेंच राष्ट्र इतरांहून बिलकूल कमी नाहीं. सतराव्या व अठराव्या शतकांत अमेरिका व आशिया खंडांत फ्रेंचांनीं शहाणपणाचे व धाडसाचे अनेक उद्योग केले आहेत. फ्रेंच राष्ट्राची उणीव दुसऱ्याच गोष्टींत होती. पंधराव्या लुईच्या कारकीर्दीत फ्रान्सचा कारभार शहाणपणानें हांकला गेला नाहीं. राज्यांतील मोठमोठ्या घडामोडी हुशार प्रधानांच्या मार्फत न चालतां, राजाच्या मर्जीत असलेल्या रक्षांच्या व खुषमस्कऱ्यांच्या तंत्रानें चालत. अठराव्या शतकांत फ्रेंच सत्तेचा ऱ्हास होण्याचीं अशीं आणखी अनेक कारणें आहेत, तीं सर्व येथें देण्याचें प्रयोजन नाहीं. 'सात वर्षांच्या युद्धां'त फ्रेंच राष्ट्राला हिंदुस्थानांत अपयश आलें एवढेंच नाहीं, तर त्याच युद्धांत उत्तर अमेरिकेंतील व आफ्रिकेंतील सर्व वसाहती फ्रान्सच्या हातांतून गेल्या; उत्कृष्ट वेस्ट इंडिया बेटें फ्रान्सला सोडून द्यावीं लागलीं; जर्मनींत फ्रान्सची पुरी फजिती उडाली; समुद्रावर जिकडे तिकडे फ्रान्सला अपजय येत गेलें; इत्यादि परिणाम जर त्याच युद्धांत घडून आले आहेत, तर हिंदुस्थानांतील फ्रेंच सत्ता तेवढी लालीच्या बेअकलीपणामुळें किंवा डुप्लेस परत बोलाविल्यामुळें लयास गेली, असें कसें म्हणतां येईल ?

तर मग ह्या युद्धांत फ्रेंचांचा पराजय होण्याचीं व इंग्रजांना यश येण्याचीं विशेष कारणें कोणतीं झालीं तें पाहूं. बंगालच्या नबाबाचा पराजय होऊन, (१) बंगालप्रांत इंग्रजांस मिळाल्यामुळें पैसा, लष्कर वगैरे युद्धाचें सर्व साहित्य इंग्रजांस आयतें जवळ तयार झालें; आणि बाहेर युद्ध करीत जाण्यास सत्तेची जागा उत्पन्न झाली. अशी स्वसत्तेची फ्रेंचांची जागा मॉरिशस होती, पण ती फार दूर असून, बंगाल प्रांताइतकी समृद्ध नव्हती. (२) दुसरी गोष्ट अशी, कीं सुदैवानें इंग्रजांस क्लाइव्हसारखा अद्वितीय पुरुष लाभला. फ्रेंचांचा योद्धा लाली हा प्रत्येक बाबतींत क्लाइव्हपेक्षां कमी होता. हीं तात्कालिक कारणें झालीं. पण फ्रेंचांच्या हीनतेचीं सामान्य कारणें अशीं होतीं, कीं (३) फ्रेंच ईस्ट इंडिया कंपनीची सांपत्तिक स्थिति वाईट होती. (४) युरोपांत व हिंदुस्थानांत फ्रेंच कंपनीचा कारभार व्यवस्थेशीर चालत

नव्हता. ( ५ ) युरोपांतील राज्यकारभाराच्या सोयीसाठीं हिंदुस्थानांतील व्यापाराचा व वसाहतींचा दुरुपयोग करण्यांत येत असे. ( ६ ) फ्रान्सच्या आरमाराची सत्ता संपुष्टांत आल्यामुळें त्याजकडून दूरदूरच्या प्रदेशाचें संरक्षण होणें अशक्य झालें. ( ७ ) इंग्रज राष्ट्रानें ह्या झगड्यांत मनापासून व उल्हासानें लक्ष घातलें. युद्धाचीं सूत्रें हालविणारे इंग्रजांकडचे गृहस्थ फारच हुशार होते. इंग्रजांचा युद्धखात्याचा मुख्य वुल्यम पिट्ट ह्याच्या इतके हुशार गृहस्थ आजपर्यंत फार थोडे झाले आहेत. राष्ट्रांतील धाडसी व हिंमतवान लोकांस चांगलें पाठबळ देऊन पिट्टनें त्यांजकडून राष्ट्राची कामगिरी उत्कृष्ट तऱ्हेची करून घेतली. उलट पक्षीं फ्रान्सचा राजा पंधरावा लुई व त्याचे नीतिभ्रष्ट सल्लागार ह्यांची तुलना पिट्टबरोबर कशी व्हावी ! दोघां राष्ट्रांमधील हा भेद विशेष ध्यानांत ठेवण्याजोगा आहे. ( ८ ) उभय राष्ट्रांच्या शिक्षणांत व प्रगतींतही फ्रान्सच्या हीनतेची मीमांसा बरीच सांपडेल. वरचेवर अपयश येत गेल्यामुळें, दूरदूरच्या प्रदेशांत वसाहती ठेवून राज्य वाढविणें योग्य आहे कीं काय, असा प्रश्न फ्रान्सांत पुढें आला. मॉन्टेस्क्यू-सारख्या विद्वानानें प्रतिपादिलें होतें, कीं देशांतील चांगले लोक अशा उद्योगांत बाहेर गेल्यामुळें राष्ट्राचें मोठें नुकसान होतें. नंतर व्हॉल्टेयर पुढें आला. बाहेर जाऊन वसाहती करण्याच्या विरुद्ध त्याचा कटाक्ष असल्यामुळें तो ह्मणूं लागला, ‘ कानडा प्रांत हातांतून गेला हा फ्रान्सचा मोठाच फायदा होय. बर्फाळ व निरुपयोगी प्रदेशाकरितां जीव देण्यांत हांशील काय ? पारिस किंवा लंडन येथील लोकांच्या चैनीकरितां कॉफी, तपकीर व मसाले आणण्याच्या कामांत फ्रेंच लोकांचें रक्त कां खर्ची घालावें ? ’ पुढें रूसो निपजला. तो ऐषआराम व तत्कालीन सुधारणा ह्यांच्या विरुद्ध होता. फ्रान्सांत धर्माधिकाऱ्यांचें वजन अतोनात होतें. ह्या धर्माधिकाऱ्यांचें वजन नाहींसें करण्यांत व्हॉल्टेयर व रूसोसारख्या मंडळींनीं शिकस्त केली. अशा प्रकारच्या शिकवणीनें द्वीपांतरीं वसाहती व राज्यस्थापना करण्याच्या विरुद्ध एकंदर विचारी फ्रेंच लोकांचा कल झाला होता.

उलट पक्षी इंग्लंडांत धर्मवेडाचा बंडावा मोडून, लोकांमध्यें विचारस्वातंत्र्याचा व उदात्त प्रागतिक कल्पनांचा फैलाव होऊं लागला होता. व्यापारवृद्धीस विचारस्वातंत्र्य अवश्य पाहिजे. वाटेल तिकडे भटकणें, वाटेल तें खाणें, जरूर पडेल तसा आचार ठेवणें, अशा प्रकारची सामाजिक, धार्मिक व नैतिक स्वतंत्रता लोकांस असल्याशिवाय त्यांच्या हातून व्यापारासारखीं राष्ट्रीय कामें तडीस जावयाचीं नाहींत. इंग्लंडांत अशा प्रकारचे नवीन विचार सुरू झाल्यामुळें, त्यांचा व्यापार व राज्य हीं अप्रतिहत वृद्धि पावलीं. तशा प्रकारची विचारस्वतंत्रता पोर्तुगाल, स्पेन किंवा फ्रान्स ह्या देशांत त्या काळीं उत्पन्न न झाल्यामुळें, त्या राष्ट्रांचे व्यापारवृद्धीचे व राज्यवृद्धीचे प्रयत्न सिद्धीस गेले नाहींत. 'इंग्लंडांत सामाजिक, धार्मिक वगैरे बाबतींतील निरर्थक बंधनांतून विचारी व विद्वान् लोकांचें मन मुक्त होऊन, त्यांच्यांत चौकस बुद्धि उत्पन्न झाली होती, आणि सोयीस व उपयोगास येईल तें करण्यास कोणासही आडकाठा असूं नये, अशा प्रकारचा कल सामान्यतः राष्ट्रांत उत्पन्न झाला होता,' असें इंग्लंडचा विद्वान् इतिहासकार लेकि प्रतिपादन करितो. असें विचारस्वातंत्र्य उत्पन्न झाल्याबरोबर, ह्मणजे अठराव्या शतकाच्या मध्यभागीं, व्यापाराचे व राज्यवृद्धीचे उद्योग इंग्रजांनीं हातीं घेतले; आणि ते तडीस नेले. पोर्तुगाल व स्पेन ह्या राष्ट्रांनीं ते उद्योग आरंभिले, तेव्हां वरील विचारस्वातंत्र्याच्या अभावीं ते उद्योग शेवटीं फसले. फ्रान्सची स्थिति सर्वस्वी स्पेनपोर्तुगालसारखी नसली, तरी बऱ्याच अंशीं तशी होती. फ्रान्सांत धर्मखात्याचा पगडा इतर राष्ट्रीय चळवळींवर अतोनात होता. कर्नाटकांत लाली निकरानें लढत असतां, त्याचा पाडाव करून फ्रान्सची राजकीय शक्ति कमी करण्याकरितां पांदिचरीस जेझुइट पाद्री लाव्हूर ह्याचे प्रयत्न आटोकाट चालू होते. म्हणजे अमुक एक धर्मसंबंधीं दुराग्रह तडीस नेण्यासाठीं, राष्ट्राचें इतर बाबतींतील सामर्थ्य हीन करण्यास धर्मखात्याची मंडळी तत्पर होती. आपण हिंदवासी लोकांनीं ह्या गोष्टीपासून आजच्या प्रसंगीं सुद्धां चांगलाच बोध घेण्यासारखा आहे.

पाश्चात्य राष्ट्रं बाहेर गेलीं, तेव्हां परकी लोकांस जुलमानें क्रिस्ती धर्मांत आणण्याचा त्यांनीं सपाटा चालविला. वरील प्रकारचा धर्मसंबंधी दुराग्रह मनांतून नाहींसा झाला, म्हणजे मुत्सद्दी मंडळीचे व्यवहार निर्वेध चालतात. अशी स्वतंत्रता असल्याशिवाय मुत्सद्दी मंडळीचे उद्योग तडीस जावयाचे नाहींत. इंग्रजांना हिंदुस्थानांत आपलें धार्मिक वेड मूळपासून आंवरून धरावें लागलें. सारांश, इंग्रज ईस्ट इं० कंपनीचा उद्योग हिंदुस्थानांत तडीस जाण्यास जीं नैतिक कारणें झालीं असतील, त्यांत इंग्रजांच्या मनाचा संपूर्णपणें व्यवहारिक कल व धार्मिक दुराग्रहाचा अभाव हें एक प्रबळ कारण होय.

कर्नाटकांत इंग्रजफ्रेंचांचे जे तीन झगडे झाले; त्यांतील पहिल्यांत व दुसऱ्यांत दोघांची बहुतेक बरोबरीच होती. दुसऱ्यांत कदाचित् फ्रेंचांचें वजन थोडें ज्यास्त होतें. तिसऱ्या झगड्यांत फ्रान्सचा पाडाव झाला, त्यांतून फ्रान्सला आपलें डोकें वर काढतां आलें नाहीं. पुढें वीस वर्षांनीं म्हणजे स. १७८१त फ्रान्सनें पुनरपि हिंदुस्थानांत आरमार आणून आपलें गेलेलें वैभव परत मिळविण्याचा प्रयत्न केला. त्यांत फ्रान्सच्या आरमाराचा मुख्य अधिपति सफ्रां ( Suffren ) हा अत्यंत कुशल व अद्वितीय होता, तरी हिंदुस्थानच्या किनाऱ्यावर स्वसत्तेचें असें एकही मजबूद ठिकाण फ्रान्सच्या हातांत नसल्यामुळें, त्या वेळीं सर्व बाजूंनीं इंग्लंडावर अनेक शत्रु उठले होते, तरी इंग्लंडानें युक्तीनें आपला बचाव केला, तेणेंकरून फ्रान्सला यश आलें नाहीं. ह्यावरून स. १७६३ हें वर्ष हिंदुस्थानांतील पाश्चात्यांच्या इतिहासांत विशेष स्मरणीय आहे. त्या वर्षापासून इंग्लंडचे सर्व युरोपियन प्रतिस्पर्धी नाश पावून जाग्यावर बसले; आणि इंग्लंडची सत्ता निष्कंटक झाली. युरोपियन शत्रु नाहींसे झाल्यामुळें, इंग्लंडला ह्या देशांत एतद्देशीय राजे एवढेच कायते एक शत्रु होते, त्यांचा समाचार घेऊन आपलें राज्य वृद्धिंगत करण्यास इंग्रजांस पुढें पूर्ण मोकळीक मिळाली. स. १७६३ नंतर जो झगडा एतद्देशीय व इंग्रज ह्यांजमध्यें व्हावयाचा होता, त्यांत यश कोणास येणार ह्याजबद्दल संशय बाळगण्याचें कारण नव्हतें, आणि अनेकांनीं त्याचें भाकित बिनचूकपणें अगोदरच करून ठेविलें होतें.

---

# प्रकरण विसावें.

## सिराजुद्दौला व बंगाल.*

### सन १७५६.



**१. बंगालचे नबाब,** ( स. १७०१–४२ ).—बंगाल्यांत इंग्रजांच्या वसाहती कशा स्थापन झाल्या त्याची हकीकत मागें प्रकरण १० कलम ४ व प्रकरण १२ कलम ३।४ ह्यांत दिली आहे. हिंदुस्थानांत इंग्रजांच्या राज्यस्थापनेची सुरुवात प्रथम बंगाल्यांत झाली; आणि बंगाल प्रांत प्रथम त्यांच्या हातीं आल्याने पुढील राज्यविस्तार करण्यास त्यांस सामर्थ्य आलें. ह्मणून बंगाल प्रांतांत इंग्रजांचा एतद्देशीय अधिकाऱ्यांशीं संबंध कसकसा जडत गेला तें सांगितलें पाहिजे. बंगाल्यांत पुष्कळ दिवस परराज्य होतें. तेराव्या शत-

*ह्या व पुढील प्रकरणांतील माहिती समजण्यास पुढील नकाशांत दाखविलेलीं खालील भूगोलिक स्थलें वाचकांनीं ध्यानांत ठेविलीं पाहिजेत. भागीरथी पाटणावरून आग्नेयीस वाहत जाते तिला राजमहालच्या खालीं एक फांटा फुटतो, त्यास हुगळी नदी म्हणतात. ही बहुतेक दक्षिणवाहिनी असून कलकत्याच्या खालीं समुद्रास मिळते. हिच्या कांठावरून खालीं, मुर्शिदाबाद, कासीमबाजार, प्लासी, खटवा, हुगळी, चिनसुरा, चंद्रनगर, कलकत्ता, व अगदीं मुखाशीं फुल्टा अशीं ठिकाणें असून, वर भागीरथीच्या कांठीं बक्सार, पाटणा, मोंगीर, भागलपूर, राजमहाल व घेरिया अशीं ठिकाणें, हुगळीचा फांटा फुटण्याच्या अगोदर, वरून खालीं ह्या क्रमानें आहेत.

काच्या प्रथमार्धांत बंगाल प्रांत मुसलमानांच्या ताब्यांत गेला. तेव्हांपासून पांचशें वर्षे होऊन गेलीं तरी मुसलमानांचा कबजा ढिला पडला नाहीं. मोगल बादशहांच्या अमदानींत बंगाल प्रांताचा कारभार करण्याकरितां बादशहा आपला सुभेदार पाठवीत असे. औरंगजेब बादशहाच्या मृत्यूनंतर हे सुभेदार स्वतंत्र झाले; आणि त्यांचा अधिकार आनुवंशिक बनला. वरील पांचशें वर्षांच्या काळांत बाहेरचे नवीन मुसलमान देशांत पुष्कळ आले, तथापि बंगाल्यांत हिंदूंचाच भरणा विशेष होता व अजूनही आहे. मुख्य अधिकारी मुसलमान असला, तरी हल्लींप्रमाणें त्या वेळींही सर्व कच्चा कारभार हिंदु नोकरांच्याच हातीं होता. फौजेंतही भरणा हिंदूंचाच विशेष असे. हिशेबाचें काम व व्यापार हीं कामें सर्वस्वी हिंदूंचीं होतीं. उमिचंद व नगरशेट ऊ. जगतशेठ वगैरे धनाढ्य व्यापाऱ्यांचें वजन राज्यांत अतोनात असून, त्यांच्या संमतीशिवाय पान हालत नसे. तथापि सामान्य जनसमूहास राजकीय घडामोडींची परवा वाटत नव्हती. सामान्यतः हिंदु लोक निर्व्यसनी, आदरशील व धार्मिक होते. तसेंच स्त्रिया ममताळू व पतिनिष्ठ होत्या. सामाजिक, धार्मिक व औद्योगिक विषयांत राज्यकर्त्यांकडून उपद्रव होत नसल्यामुळें, लोक बहुशः परराज्याविषयीं बेफिकीर असत. त्या वेळचा एक इंग्रज गृहस्थ लिहितो, ' आम्हां पाश्चात्यांचें मन तेव्हांच विकारवश होतें, त्यामुळें सुखदुःखाचीं प्रचंड स्थित्यंतरें आम्हांस भोगावीं लागतात, तसा प्रकार हिंदुस्थानांत होत नाहीं. लहानपणींच लग्न झाल्यामुळें स्त्रीविषयक उपद्व्यापास थाराच मिळत नाहीं. धर्माकडून समाधानवृत्तीचें पोषण होत असल्यामुळें, महत्त्वाकांक्षा, चढाओढ इत्यादि दुःखद प्रकार त्यांच्यांत उत्पन्न होत नाहींत. त्यांस मद्यपान ठाऊक नसल्यामुळें तत्संबंधीं व स्त्रीविषयक दुराचार त्यांच्यांत उद्भवतच नाहींत. मात्र ह्याचा एक उलट परिणाम असा दिसतो, कीं पाश्चात्यांप्रमाणें धडपड, साहस, ईर्षा इत्यादि मानसिक शक्ति हिंदूंच्या ठिकाणीं तीव्र होत नाहींत. त्यांची साधी राहणी व देशाची उष्ण हवा ह्यांमुळें तीव्र शक्तींचा अवरोध होतो. तसेंच त्यांची दृष्टि आकुंचित राहून, ऐहिक बाबतींत त्यांच्या ठिकाणीं शेकडों वर्षांत कांहींच

फरक दिसून येत नाहीं. '*

पांचशें वर्षांच्या मुसलमानी अंमलांत हा प्रकार बहुतेक असाच कायम होता. एवढ्या काळांत हिंदूंनीं राज्यकर्त्यांविरुद्ध उठावें, अशा प्रकारचा जाच राज्यकर्त्यांनीं त्यांजला केला नाहीं. हिल्ल म्हणतो, 'अठराव्या शतकाच्या प्रथमार्धांत बंगाल्यांतील शेतकऱ्यांची स्थिति, फ्रान्स किंवा जर्मनी येथील शेतकऱ्यांच्या मानानें बरीच चांगली होती.' मोगल बादशाहीच्या ऱ्हासकालांत मात्र महाराष्ट्राप्रमाणें बंगाल्यांतही हिंदूंचीं मनें मुसलमानांवर क्षुब्ध झालीं होतीं व बऱ्याच लोकांच्या मनांत स्वराज्याचे विचार घोळत होते. सिराजुद्दौल्याच्या कारकिर्दींत हिंदूंचा हा क्षोभ पुष्कळच वाढला होता.

व्यापार व उद्योगधंदे हिंदूंच्या हातांत असल्यामुळें आणि इंग्रज, फ्रेंच व डच इकडे केवळ व्यापाराचाच उद्योग करीत असल्यामुळें, पाश्चात्यांचे व्यवहार बहुधा हिंदूंशींच चालत. व्यापाराचे परवाने मिळविण्यापुरतीच काय ती त्यांस मुसलमान अधिकाऱ्यांची जरूर लागे. कलकत्ता, चंद्रनगर व चिनसुरा येथें इंग्रज फ्रेंच, आणि डच ह्यांच्या अनुक्रमें मोठ्या वसाहती असून, त्य सर्वांची भरभराट होती. तेथें बंदोबस्त चांगला असल्यामुळें सिराजुद्दौल्याच्या भीतीनें पुष्कळ हिंदु व्यापारी आपला माल व संपत्ति युरोपियनांच्या हद्दींत नेऊन ठेवीत असत. औरंगजेबाच्या अखेरी पावेतों बंगाल प्रांताचा कारभार सुरळीत चालला होता. स. १६९६त औरंगजेबानें आपला नातू अजीमुश्शान ह्यास बंगालच्या कारभारावर नेमिलें. १७०१त मुर्शीदकुलीखान ह्याची नवाब अजीमुश्शानच्या हाताखालीं बंगालच्या दिवाणीवर नेमणूक झाली. मुर्शीदकुलीनखान मूळचा ब्राह्मण असून, पुढें मुसलमान झाला होता. त्याचें व अजीमुश्शानचें पटलें

* Scrofton's Reflections on the Government of Hindusthan, in Hill's Bengal, Records, P. XXI. बंगाल्यांतील राज्यक्रान्तीचा व त्या वेळच्या कारस्थानांचा इंग्रजांचा पत्रव्यवहार अलीकडे सरकारांतून प्रसिद्ध झाला आहे, त्या धोरणानें ह्या प्रकरणांतील मजकूर लिहिला आहे.

नाहीं. अजीमुश्यान पैशाचा लोभी होता. त्याची मर्जी संपादून इंग्रजांनीं त्यास नजराणे वगैरे देऊन खुष केलें व त्याजपासून बंगाल्यांत सुतनटी, गोविंदपूर आणि कालीकोट हीं तीन गांवें खरेदी केलीं, (स. १६९८). त्याजबद्दल दरसाल ११९५ रुपये इंग्रजांस सारा भरावा लागे. अर्थात् ह्या खरेदीनें इंग्रजांस जमीनदाराची पदवी प्राप्त झाली. इतर जमीनदारांप्रमाणें, लोकांस दंड करणें, फटके मारणें, कैदेंत टाकणें, वगैरे प्रकारांनीं ते ह्या गांवांवर आपला अंमल चालवूं लागले. ही गोष्ट हुगळीच्या मोगल अधिकाऱ्यास आवडली नाहीं. त्यानें त्या विरुद्ध तक्रार केली; पण पुनरपि अजीमुश्शानची इंग्रजांनीं तोंडदाबी केल्यामुळें, त्या तक्रारीचा उपयोग झाला नाहीं. ह्या उपक्रमानें इंग्रजांच्या कलकत्याची भरभराट झाली.

त्या वेळीं बंगाल प्रांतांतील मोगलांचें मुख्य ठाणें डाका येथें होतें. पुढें मुर्शिदकुलीखान डाका सोडून मुकसदाबाद येथें गेला. ही जागा प्रांताच्या मध्यभागीं असून, ती राज्यकारभाराच्या सोयीची आहे, ह्मणजे लष्करी बंदोबस्त ठेवण्यास व वसूल गोळा करण्यास तिचा उपयोग चांगला होईल, असें जाणून, मुर्शिदकुलीखानानें तेथेंच नबाबाचें मुख्य ठाणें बसवून, स. १७०४त त्या शहराचें पहिलें नांव बदलून आपल्या नांवावरून मुर्शिदाबाद हें त्याचें नांव ठेविलें. स. १७१३त मुर्शिदची सुभेदारीच्या जागेवर नेमणूक होऊन सगळ्या प्रांताचा मुख्य कारभार त्याजकडे आला. इंग्रजांसारख्या परकीय व्यापाऱ्यांस त्याच्या कारभाराची ओळख लवकरच पटली. स. १७०६त इंग्रजांस कासीमबाजार येथें वखार घालण्यास त्यानें परवानगी दिली, त्याजबद्दल त्यानें पंचवीस हजार रुपये घेतले. बाहेरून आणलेल्या चांदीचीं नाणीं मुर्शिदाबादच्या टांकसाळींतून पाडून घेण्यासाठींच कासीमबाजारची वखार इंग्रजांनीं मुद्दाम मुर्शिबादेजवळ घातली. स. १७१३त मुर्शिदकुलीचा इंग्रजांस फारच जाच होऊं लागला, तेव्हां त्यांनीं दिल्लीस आपले वकील पाठवून बादशहाकडून नवीन फर्मान आणिलें, त्याचा अर्थ मुर्शिदखानानें फारसा इंग्रजांच्या फायद्याचा केला नाहीं, तरी त्या योगानें इंग्रजांच्या धंद्यास कायद्याचा

पाठिवा मिळून, शिवाय फ्रेंच व डच ह्यांजपेक्षां पुष्कळच सवलती त्यांस प्राप्त झाल्या. हें फर्मान कसें मिळालें त्याची हकीकत मनोरंजक आहे ती अशीः—

स. १७१३त फर्रुखसेयर बादशहा गादीवर येऊन सय्यद बंधूंचें प्राबल्य सुरू झालें. रजपुतांनीं आपल्या मुली बादशहास देण्याचें बंद केल्यावरून, फर्रुखसेयरनें जोधपुरच्या अजितसिंगाचा पाडाव करून त्याची मुलगी इंद्र कुमारी पकडून दिल्लीस आणिली, आणि तिच्याशीं लग्न लावणार, इतक्यांत बादशहाची प्रकृति मूळव्याधीचे विकारानें अतिशय बिघडली. याच वेळीं बंगाल्यांत इंग्रज व्यापाऱ्यांस मुर्शीदकुलीखानाचा त्रास असह्य होऊन, त्यांनीं आपली दाद लावून घेण्याकरितां बादशहाकडे वकील पाठविले. त्यांत जॉन सर्मन ( Surman ) व कोजी सर हौद ( Cogee Surhoud ) मुख्य असून बरोबर सर्जन हॅमिल्टन नांवाचा शस्त्रवैद्य होता. त्याजकडून बादशहानें सन १७१५च्या ऑक्टोबर नोव्हेंबर महिन्यांत मूळव्याधीवर शस्त्रोपचार करून घेतला, तेणेंकरून तो चांगला बरा झाला. ता. १० डिसेंबर रोजीं बादशहानें हॅमिल्टनचा दरबारांत गौरव करून त्यास बक्षिसें दिलीं. नंतर लगेच बादशहाचें लग्न रजपूत राणीशीं मोठ्या थाटानें झालें. लग्नसोहळा दोन महिने चालला होता.* याप्रमाणें बादशहा खूष झालेला पाहून हॅमिल्टननें त्यास विनंति केली, कीं कंपनीचे व्यापारी मागत असलेल्या सवलती त्यांस द्याव्या. बादशहानें ही विनंति तत्काळ मान्य करून कलकत्त्या नजीक ३८ गांव खरेदी करण्याची व स्वतःचीं नाणीं पाडण्याची परवानगी त्यांस दिली, आणि त्यांच्या व्यापारावर सर्व जकातींची माफीही ठरवून दिली. या संबंधाचें विशिष्ट फर्मान मागाहून तयार होऊन तें स. १७१७ त इंग्रजांचे हातांत पडलें; त्याचें तात्पर्य व परिणाम पुढें सांगण्यांत येतील.

मुर्शिदकुलीखानानें वसुलाच्या कामांत पुष्कळ फेरफार केले. यामुळें बादशहाचा वसूल वाढला, पण हिंदूंस त्याचा अंमल फार दुःसह झाला.

* म. रि.—म. वि. १ पृ. ९७; Irvine's Later Mughals P. 309; मु. रि., पृ. ८०°.

मुर्शिदाबाद येथील सर्व हिंदु देवळें त्यानें पाडून टाकिलीं. जगत्शेट ह्मणून मुर्शिदाबादेस एक धनाढ्य व्यापारी कुटुंब याच वेळेस उदयास आलें. ह्या कुटुंबाचा संस्थापक माणिकचंद ह्मणून एक जैन व्यापारी होता, त्याचा पुतण्या फत्तेचंद यास मुर्शिदाबादच्या मुख्य सरकारी पेढीचा सर्व अधिकार व जगतशेट हा किताब मिळाला. माणिकचंद १७३२त व फत्तेचंद १७४४त मरण पावले. पुढें फत्तेचंदाचे दोन नातू शेट महताबराय व महाराजा स्वरूपचंद उदयास आले. त्यांचा संबंध पुढील हकीकतींत येणार आहे. जगतशेटाकडे सरकारी तिजोरीचा कारभार असल्यामुळें, व सरकारची सर्व देवघेव त्याच्याच मार्फत होत असल्यामुळें, त्यास व्यापारांत चांगली किफायत होत असे. सालचें निदान चाळीस लाखांचें निव्वळ उत्पन्न त्यास होई. मुर्शिदकुलीखान मोठा धूर्त व कडक होता. त्यानें आपल्या प्रांतांत उत्कृष्ट बंदोबस्त ठेवून वसुलाची भरभराट केली. फौजेचा वगैरे खर्च भागवून दरसाल दहा लाखांहून ज्यास्त रक्कम तो दिल्लीस रवाना करीत असे.

मुर्शिदकुलीखान स. १७२५त मरण पावला; आणि बंगालचा कारभार त्याचा जांवई सुजाखान यास मिळाला. सुजाखानाच्या हाताखालीं हाजीमहंमद व अलिवर्दीखान हे दोघे अफगाण सरदार राज्यकारभारांत प्रमुख झाले. स.१७३९त अलिवर्दीखानाचा पुतण्या झैनउद्दीन ह्मणून होता, त्यास अलिवर्दीची मुलगी दिली होती. त्यांस एक मुलगा झाला. त्याचें नांव महंमद. हाच पुढें सिराजुदौला ह्मणून प्रसिद्धीस आला. त्याजवर अलिवर्दीखानाची बहाल मर्जी असे. सुजाखान चौदा वर्षें शांतपणानें कारभार करून स. १७३९ त मरण पावला. तेव्हां नबाबगिरीचें काम त्याचा मुलगा सर्फराजखान यास मिळून सर्व कारभार हाजीमहंमद व अलिवर्दीखान ह्यांच्या हातांत आला. सर्फराजखान व्यसनांत निमग्न राहत असल्यामुळें अलिवर्दीखान सर्वस्वी मुखत्यार झाला. पुढें सर्फराजखानावर उठून अलिवर्दीनें स. १७४१त त्यास लढाईंत ठार मारिलें; आणि रोख सुमारें एक कोट व जवाहीर सुमारें एक कोट असा दोन कोटींचा मयत नबाबाजवळचा ऐवज दिल्लीस पाठवून बाद-

शहास खूष केलें. तेव्हां बादशहानें अलिवर्दीखानास बंगालच्या सुभेदारीवर कायम केलें.

२. **अलिवर्दीखान** ( स. १७४२–५६ ).—अलिवर्दीच्या कारकीर्दीत मराठ्यांनीं बंगाल्यावर स्वाऱ्या सुरू केल्या, त्यांची तपशीलवार हकीकत म. रि. मध्यविभागांत दिली आहे. ह्या स्वाऱ्या दहा वर्षें चालू होत्या. रघूजी भोसले व त्याचा दिवाण भास्करपंत ह्यांस प्रथम अलिवर्दीखानाविरुद्ध लढण्यासाठीं मयन नबाबाच्या मंडळीनीं मदतीस बोलाविलें. त्यावरून भोसल्याची फौज स. १७४२त बंगाल्यांत शिरली. त्यांनीं अलिवर्दीचा पराभव करून मुर्शिदाबादेंतून सुमारें अडीच कोट रुपयांचा विषय नेला. पुनः स. १७४४त भास्करपंतानें बंगाल्यावर स्वारी केली असतां अलिवर्दीनें युक्तीनें त्याचा खून करविला. त्याबद्दल रघूजीनें पुढें एकसारख्या बंगाल प्रांतावर स्वाऱ्या करून अलिवर्दीस इतकें जेरीस आणिलें, कीं स. १७५१त त्यानें ओढ्या प्रांत मराठ्यांस कायमचा देऊन व सालाची बारा लाख खंडणी कबूल करून, कसाबसा आपला बचाव करून घेतला. ह्याप्रमाणें मराठ्यांस जाग्यावर बसविल्यानंतर अलिवर्दीचीं पांच वर्षें शांततेंत गेलीं. ह्याच पांच वर्षांत सिराजुद्दौल्याचें वजन फार वाढलें. पुढील भानगडी समजण्यास सिराजुद्दौल्याची पुढील वंशावळ उपयोगी पडेल.

आजोबाच्या लाडांत वाढल्यामुळें सिराजुद्दौल्याचा स्वभाव बराच लहरी बनला होता. शिवाय त्यास दुर्व्यसनेंही जडलीं असून लोकांची त्याजवर बिलकुल भक्ति नव्हती. कित्येक मुसलमान ग्रंथकार लिहितात कीं, त्याचें मनही ठिकाणावर नव्हतें. त्याची ही दशा पाहून अलिवर्दीच्या तोंडून असे उद्गार निघत, कीं ह्याच्या हातीं कारभार आला असतां हे टोपीकर सर्व देश तेव्हांच गिळंकृत करतील. मरणापूर्वी अलिवर्दीनें सिराजपासून शपथ घेवविली, कीं ' आपण दारूस शिवणार नाहीं. ' ही शपथ त्यानें पुढें अक्षरशः पाळिली.

अलिवर्दीच्या मरणापूर्वी अनेक संकटें उत्पन्न होऊन सिराजशिवाय दुसरा लायक इसम कारभार करण्यास उरला नाहीं. दिल्लीची बादशाही तर

मीर्झामहंमद.

- हाजीअहंमद मृ. १७४७.
  - १ नवाझिस महंमद, ऊर्फ शहामतजंग, डाकाचा करभारी. मृ. १७५५.
  - २ सय्यद अहंमद, ऊर्फ शौकतजंग, पुर्नियाचा कारभारी. मृ. १७४७.
  - ३ झैन-उद्दीन अहंमद ऊर्फ फैबतजंग पाटणाचा कारभारी.
- अलिवर्दीखान मृ. स. १७५६.
  - १ घसीटा बेगम.
  - २
  - ३ अमीना बेगम.
  - ह्या तिघां मुलींचीं लग्नें अनुक्रमें हाजी अहंमदच्या तिघां मुलांशीं झालीं.
    - मीर्झा महंमद ऊर्फ सिराजुद्दौला, स. १७५६-५७.
    - फज्लूकुलीखान
    - मीर्झा महादी.
- मुलगी शहाखानम् ल. मीर जाफरअलीखान, नबाब, १७५७
  - मीरान, मृ. १७६०.

मृतप्राय झालीच होती. इकडे बंगाल्यांत सिराजचा आजा व बाप स. १७४७त मरण पावले. नवाझिस महंमद व त्यानें दत्तक घेतलेला फज्लूकुलीखान हे दोघेही बरे होते. पण दोघेही स. १७५५च्या पूर्वी मरण पावले. दुसरे प्रतिस्पर्धी होते ते सर्व सिराजनें नाहींसे केले. हा प्रकार चालू असतां युरोपीय व्यापारी झडप घालण्यासाठीं

टपून बसले होते. *अलीवर्दीखान मरण पावल्याबरोबर* राज्याची इमारत ढांसळून पडणार अशी त्यांची समज असून, ते आपले निरानिराळे तर्क आपापल्या सरकारांस लिहून पाठवीत होते. सिराजुद्दौल्यास नबाबगिरी मिळणें अशक्य होय,। असेंच इंग्रजांस वाटत होतें. ह्मणून ह्या उच्छृंखल पाश्चात्य व्यापाऱ्यांवर सिराजुद्दौला चिडून गेला होता.

अशा अडचणींत राज्यांत वजनदार गृहस्थ कायते दोघे जगतशेट असून, त्यांची अलिवर्दीवर विशेष भक्ति होती. मीर जाफरअलीखान हा सेनापति असून त्याच्या हाताखालीं रायदुर्लभ हा हिंदु गृहस्थ मुख्य होता. दोघांचीही शौर्याबद्दल विशेष ख्याति होती. ह्या सर्वांपासून सिराजुद्दौल्यास मदत करण्याचें अलिवर्दीखानानें वचन घेतलें; तसेंच घसीटाबेगम व सिराज ह्यांची गोडी करण्याचाही पुष्कळ प्रयत्न त्यानें केला, पण तो सिद्धीस गेला नाहीं. एकंदर निरवानिरव करून अलिवर्दीखान स. १७५६च्या १० एप्रिल रोजीं मरण पावला. त्या वेळीं त्याचें वय ८२ वर्षांचें होतें. इंग्रज ग्रंथकार ऑर्म् लिहितो, ' अलिवर्दीखान सार्वजनिक कामांत तर हुशार होताच; पण खासगी वर्तनानें सुद्धां तो अत्यंत निर्मळ होता. त्यास कोणतेंही व्यसन नव्हतें. त्याचें एकपत्नीव्रत कधीं ढळलें नाहीं. '

तथापि अलिवर्दीखानाचा कारभार इंग्रजांस पसंत पडला नाहीं. तो त्यांजशीं अन्यायानें असा कधींच वागला नाहीं, असें इंग्रजच कबूल करतात. ठरलेले करार अक्षरशः अमलांत आणण्यांत त्यानें दक्षता ठेविल्यामुळें त्याच्या कडकपणाबद्दल मात्र ते नाखुष होते. मराठ्यांचे हल्ले चालू असतां कलकत्त्यास तटबंदी करण्याची त्यानें इंग्रजांस मोकळीक दिली. त्यामुळें इंग्रजांनीं 'मराठा खंदक' आपल्या किल्ल्यासभोंवती बांधिला. मराठ्यांशीं लढण्यांत खानास अतिशय खर्च आल्यामुळें व त्यायोगें इंग्रजांचेंही संरक्षण झाल्यामुळें स. १७४४–४५त त्यानें इंग्रजांपासून साडेतीन लाख रुपये घेतले. ह्याशिवाय अलिवर्दीनें इंग्रजांस विशेष कांहीं त्रास दिला नाहीं. ते फाजील स्वतंत्रता दाखवूं लागले, कीं खान ती तेव्हांच दडपून टाकीत असे. बादशहाचा संपूर्ण अधिकार अपणास

आहे अशा रीतीनें तो इंग्रजांशीं वागे. तटबंदी बांधून व लष्कर वाढवून इंग्रज आपल्या बंदोबस्ताची तजवीज करूं लागले, की हा लगेच त्यांस प्रतिबंध करी. फाजील सवलत दिली असतां हे आपल्याच छातीवर बसण्यास चुकणार नाहींत हें तो पूर्णपणें ओळखून होता. तो त्यांस म्हणे, 'तुम्ही व्यापारी, तुम्हांस तट काय कामाचे ? मी आहेंच तुमचें संरक्षण करणारा; तुम्हांस भीति बाळगण्याचें कारण नाहीं.' दक्षिण हिंदुस्थानांत इंग्रजफ्रेंचांनीं मोठी दंगल उडवून दिली आणि एतद्देशीय रजवाड्यांस बाहुल्यांसारखें नाचविलें, हें त्यास पूर्ण माहीत होतें. आंग्र्याचा विजयदुर्ग किल्ला क्लाइव्हनें घेतला, हेंही त्यास आवडलें नाहीं. असले प्रकार आपल्या हद्दींत घडूं नयेत अशी त्याची मोठी इच्छा असून, ती तडीस नेण्याचे विचार त्याच्या मनांत घोळत होते. त्यानें इंग्रजांस एकदम घालवून दिलें नाहीं, ह्याचें कारण व्यापाराच्या कामांत त्यांचा उपयोग राज्यास आहे असें त्यास वाटे. पुढे आपल्या राज्याची हे लवकरच वाट लावतील अशी भयंकर विवंचना त्यास लागली होती. तो म्हणे, 'हे इंग्रज म्हणजे पोळ्यांतल्या मधमाशा होत; आपणांस पोळ्यांतला मध मिळण्याचा संभव आहे खरा, पण मध काढतांना माशांस धक्का लागला तर त्या डसून प्राण घेण्यास कधीं चुकणार नाहींत.' म्हणून तो इंग्रजांशीं फारच जपून वागे. प्रसंग आला तर आपले हक्क पूर्णपणें बजावण्यास तो कधीं कचरला नाहीं. स. १७४९त त्यांनीं कांहीं आगळीक केली, तेव्हां तिचें नुकसान भरून येईपर्यंत कित्येक महिने त्यानें त्यांचा सर्व व्यापार बंद केला, तेव्हांच ते शरण आले. तथापि उभयतांमध्यें पुढें नेहमींच चुरस होती. इंग्रजांस नेहमीं असें वाटे, कीं 'आपणांवर नबाब विनाकारण जुलूम करितो; स. १७१७त फर्रुखसेयर बादशहानें दिलेल्या फर्मानांतील कलमें तो बरोबर पाळीत नाहीं; कलमांचा अर्थ तो वाटेल तसा आपल्या फायद्याचा करितो.' यावर नबाबाचें म्हणणें असें, कीं 'इंग्रजांस फारच सवलती मिळालेल्या आहेत; तेवढ्याच पाळून ते स्वस्थ बसत नाहींत. उलट त्या सवलतींचा दुरुपयोग करून ते एत-

देशीय व्यापाऱ्यांचें व एकंदर राज्याचें नुकसान करितात.' वाटेल त्यानें नबाबाची आगळीक किंवा नुकसान करून इंग्रजांकडे जावें, आणि इंग्रजांनीं त्यास आश्रय द्यावा, असा प्रकार चाले.

**३. जकातमाफीचा दुरुपयोगः**—स. १६१५त सर टॉमस रोनें मोगल बादशहांपासून व्यापाराच्या कांहीं सवलती मिळविल्या त्या शंभर वर्षे पावेतों तशाच चालू होत्या. त्याबद्दलचें कायमचें व उपयोगाचें फर्मान स. १७१६त फर्रुखसेयर बादशहाच्या वेळच्या अंदाधुंदींत इंग्रजांस मिळालें. त्या वेळचे नामधारी बादशहा हरतऱ्हा करून पडकी बादशाही सांवरीत होते. बहादूरशहाचा व जहांदरशाचा जम बरोबर बसला नाहीं, तेव्हां सर्व शत्रूंची तोंडदाबी करून आपला बचाव करण्याचा फर्रुखसेयरनें विचार केला. मराठ्यांस चौथाईचे व सरदेशमुखीचे हक्क त्याच वेळेस त्यानें लिहून दिले. तसेंच इंग्रजांपासून दरसाल कायमची रक्कम ठरवून घेऊन त्यांस आयात व निर्यात व्यापाराची पूर्ण मोकळीक दिली.

ठरीव जकात देऊन हिंदुस्थानांत व्यापार करण्याची मोकळीक मोगल बादशहांनीं सर्व प्रकारच्या लोकांस व राष्ट्रांस दिलेली होती. जकातीची माफी अगर व्यापाराचा मक्ता अमुक एका राष्ट्रास असा कधींच दिलेला नव्हता. हा प्रकार औरंगजेबाच्या अखेरीपर्यंत चालला. औरंगजेब मरण पावल्यावर, राज्यांतील शिस्त मोडल्यामुळें परकी व्यापाऱ्यांस जाच होऊं लागला; तेव्हां इंग्रजांनीं आपले वकील बादशहाकडे पाठवून जकातीच्या माफीचें वर सांगितलेलें फर्मान मिळविलें, त्यांतील आशय असा ' सुरत येथें इंग्रजांनीं वखारी घातल्या तेव्हांपासून कधीं साडेतीन टक्के, कधीं अडीच टक्के, कधीं तीन टक्के, अशी जकात निरनिराळया बादशहांनीं इंग्रजांवर बसविलेली होती. स्थानिक अंमलदारांच्या जाचामुळें, इंग्रजांनीं सुरतेच्या वखारी आज तीन वर्षें बंद केल्या आहेत. बहार व ओरिसा प्रांतांत त्यांस जकात द्यावी लागत नाहीं. बंगाल्यांत ते दरसाल तीन हजारांची रक्कम उकती देतात. असला भिन्न प्रकार बंद करून आपणापासून एक ठरीव रकम घेऊन, सर्व राज्यांत सरसकट एक कायदा ठरवावा,

अशी इंग्रजांची मागणी आहे. सबब असें ठरविण्यांत येतें, कीं सुरत येथें इंग्रजांपासून दहा हजार रुपये पेषकष म्हणून घ्यावे; आणि त्यांस वाटेल तिकडे कांहीं एक जकात न भरतां व्यापार करण्याची पूर्ण मोकळीक असावी. नवीन वखारी घालण्यास व मालाची खरेदी विक्री करण्यास त्यांस आमच्या अधिकाऱ्यांनीं मदत करावी; चोरी झाल्यास चोरास पकडून शिक्षा करावी; आणि चोरीस गेलेला माल त्यांस परत देववावा. देण्याघेण्याच्या व्यवहारांत त्यांस कोणीं त्रास न देतां, योग्य व्यवहार घडला असेल तसा निकाल करावा; विनाकारण जाच करूं नये. ह्या फरमानाची एकच प्रत त्यांजजवळ असल्यामुळें त्याच्या नकला निरनिराळ्या ठिकाणीं ते दाखवितील त्या आमच्या अधिकाऱ्यांनीं मान्य कराव्या. इंग्रजांपैकीं कोणी कांहीं आगळीक केल्यास त्यांजला परभारें शिक्षा न करितां, त्या ठिकाणच्या मुख्य इंग्रज अधिकाऱ्यांकडे त्यांस शिक्षेसाठीं पाठवून द्यावें. त्यांस नवीन वखार घालावयाची असेल, तेव्हां त्यांस चाळीस विघे जागा मोफत द्यावी.' ( ता. ६ जानेवारी, स. १७१७ ).

हें फर्मान किती मोघम व व्यापक आहे हें सहज दिसून येतें. कोणकोणत्या जिनसांवर जकात माफ होती, तें ठिकठिकाणच्या मोगल अमलदारांस समजण्यासाठीं इंग्रजांचा मुख्य अधिकारी आपल्या सहीचा एक कागद व्यापाऱ्यांजवळ लिहून देई; त्यांत इंग्रजींत व फारसी भाषेंत जिनसाचें नांव, व तो कोठून कोठें जावयाचा त्याचें ठिकाण नमूद केलेलें असे. ह्या कागदास दस्तक म्हणत. पुढें पुढें अशीं दस्तकें खासगी व्यापाऱ्यांसही व इकडेच विकून खपणाऱ्या हरएक प्रकारच्या मालाविषयीं मिळूं लागलीं. आरंभीं ह्या जकातीच्या माफीपासून राज्याचें विशेष नुकसान झालें नाहीं; पण सर्व खासगी व्यापाऱ्यांस ही माफी पुढें मिळून एतद्देशीय व्यापाऱ्यांचें अतोनात नुकसान होऊं लागलें. वरील फरमानामुळें स्थानिक अधिकाऱ्यांच्या मर्जीचा व लहरीचा इंग्रजांस पूर्वी त्रास पोंचत असे तो बंद झाला. म्हणजे स्वतःच्या बचावाकरितां मराठ्यांस व इंग्रजांस बादशहानें कायमचे बादशाही हक्क देऊन टाकिले. ह्या फरमानाचा दुरुपयोग करून देशांतील सर्व व्यापार इंग्रज बुडवूं लागले हें,

पाहून मुर्शिदकुली अगर अलिवर्दी ह्यांजसारख्या नवाबांस पुष्कळ वैषम्य वाटलें, आणि फरमानाची होईल तेवढी ओढाताण करून आपल्या व्यापाराचें संरक्षण करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. हा झगडा सिराजुद्दौल्याच्या वेळेस विकोपास गेला.

फर्रुखसियर बादशहानें इंग्रजांस जी ही जकातीची माफी दिली तिला अनुसरून इंग्रज अधिकारी दस्तकें सोडीत. वस्तुतः हिंदुस्थानांतून बाहेर जावयाच्या कांहीं ठरींव जिनसांसंबंधानें मात्र जकातीची माफी होती. फर्मानांतील ही मर्यादा सोडून कंपनीचे व्यापारी निर्गत किंवा आयात पाहिजे त्या मालाचा व्यापार जकात दिल्याशिवाय करूं लागले. तसेंच कंपनीच्या नांवावर विकणाऱ्या पाहिजे त्या इसमासाठीं ते जकातीची माफी मागूं लागले. पैशाचा लोभ कोणास सुटला आहे असें नाहीं. त्यांतून हे इंग्रज व्यापारी नानातऱ्हेचीं संकटें सोसून इकडे येत असत, ते पैसा कमावण्याकरितां येत असत. कंपनीचे अधिकारी माफीचीं दस्तकें वाटेल त्यास देऊं लागले. जकातीच्या नाक्यावर दस्तक दाखविलें, कीं जकातअधिकारी तो माल बिनजकातीनें जाऊं देत असत. होतां होतां हा अनिष्ट प्रकार अतोनात वाढला. कित्येक तर बनावट दस्तकें करून दाखवीत. त्यामुळें एतद्देशीयांचा सर्व व्यापार बसला व बंगालच्या कारभाराचें उत्पन्न अतोनात कमी झालें. त्याबद्दल नवाबांनीं वाटेल तितकी कानउघाडणी करावी, पण लालचावलेले इंग्रज व्यापारी बऱ्याबोलानें वठणीवर येईनात. हा तंटा निकरावर आल्याशिवाय राहिला नाहीं. तशांत नवाबाच्या अधिकाऱ्यांस थोडाबहुत लांच भरला कीं इंग्रजांचें काम होई. ह्या लांचाच्या युक्तीचा इंग्रजांनीं पदोपदीं उपयोग केला आहे. कंपनीचा त्या वेळचा पत्रव्यवहारच ह्याची साक्ष देतो. हुगळीचा फौजदार, डाकाचा नायब व प्रत्यक्ष सुभेदाराच्या गादीचा पुढील हक्कदार ह्यांस वेळोवेळीं लांच चारून कंपनीचे व्यापारी वेळ निभावून नेत असत. हा अनीतीचा प्रकार पुढें पुढें अतिशय वाढला.

नबाब अलिवर्दीखान कारभार पाहत होता, तोंपर्यंत हा तंटा निकरावर आला नाहीं. तो हुशार होता. तो जेव्हांच्या तेव्हां सर्व तंट्यांचा योग्य निकाल

करी, केवळ लांचखाऊ कामगारांवर भिस्त ठेवून स्वस्थ बसत नसे. इंग्रजांची चूक सिद्ध झाली कीं त्यानें शिक्षा ठाठावलीच. तथापि मराठ्यांशीं पंधरा वर्षे झगडण्यांत त्याचा बहुतेक काल गेल्यामुळें, इंग्रजांचा कायमचा बंदोबस्त त्याजकडून झाला नाहीं. इंग्रज व्यापारी दस्तकाचा दुरुपयोग करून हळू हळू हातपाय पसरीत चालले हें पाहून, त्यास फार वाईट वाटे. हॉल्वेल म्हणतो, मरणसमयीं त्यानें आपल्या नातवास शेवटचा निरोप असा सांगितला कीं ' बाबारे ह्या इंग्रजांची लष्करी शक्ति कसेंही करून एकवार तूं मोडून टाक.'

इंग्रजांची ही लष्करी शक्ति हळूहळू वाढत चालली होती. आरंभीं वखार व आंतील माल सांभाळण्यासाठीं त्यांनीं थोडे बरकंदाज नोकर ठेविले. ह्या बरकंदाजांची प्रसंगोपात त्यांनीं एक लहानशी पलटण बनविली. त्या धामधुमीच्या काळांत नबाबास त्यांचें संरक्षण करणें कठीण पडूं लागल्यामुळें, संरक्षणासाठीं लष्करी बंदोबस्त करण्याची परवानगी इंग्रजांस देणें नबाबास भाग पडलें. एवढेंच संपादन करून इंग्रज स्वस्थ बसले नाहींत. त्यांनीं कलकत्यास फोर्टविल्यम किल्ला बांधिला; कासीमबाझारच्या वखारीस तटबंदी केली; मराठा खंदक दुरुस्त केला; कवाईत शिकवून ते आपलें लष्कर तयार करूं लागले; तोफा व बंदुका त्यांनीं पैदा केल्या; आणि फ्रान्सशीं युद्धप्रसंग येईल या सबबीवर बंदरांत कायमचें आरमार ठेवून दिलें. कर्नाटकांत तर त्यांची शक्ति वाढलीच होती. हा सर्व प्रकार पाहून नबाब अलिवर्दीखानास मोठाच धाक पडला. पण तो दुरुस्त करण्यास जगला नाहीं. मात्र मरणसमयीं पुढील कर्तव्य त्यानें आपल्या नातवास पढवून ठेविलें.

इकडे बंगालच्या इंग्रजांची स्थिति चमत्कारिक झाली होती. नबाबाकडून त्यांस दपटशा येत होता. त्यांच्या मनांतून लष्करी बंदोबस्त वाढविण्याचें फार होतें. पण विलायतसरकाराकडून त्याजबद्दल त्यांस वरचेवर ठपका येत असे. ' नबाबाच्या मार्फतच आपला बचाव करून घ्या, स्वतः आपला लष्करी बंदोबस्त करण्याच्या नादास लागूं नका, ' असा त्यांस निक्षून हुकूम आला होता. हा हुकूम उघडपणें धाब्यावर बसविण्याची त्यांस छाती नव्हती. तथापि

होईल तितका त्यांनीं स्वतःचा बंदोबस्त केला. धरसोडीचा मुत्सद्दीपणा लढवून आपलें काम भागविण्याचा त्यांचा इरादा होता. अशी मुत्सद्देगिरी पूर्वेकडील असो किंवा पश्चिमेकडील असो. तत्कालीन विशिष्ट परिस्थितींत ही अपरिहार्य आहे असें ते समजत. कपटविद्येची त्यांस पर्वा वाटत नसे. अशी लाज धरून दुर्बलांचा निभाव लागत नसतो. * तसेंच इंग्रजांच्या मालावर जकात माफ होती. पण वाटेल त्या स्वजातीयांस किंवा एतद्देशीयांस जकातीच्या माफीचें दस्तक ते देत, त्यामुळें नबाबाच्या जकातीचें उत्पन्न बहुतेक नाहींसें झालें. एतद्देशीयांचा व्यापारही सर्व बसला. तसेंच इंग्रजांनींही आपल्या हद्दींत कित्येक कर बसविले. हा प्रकार नबाबास कसा खपावा ? सन १७१७ तील फर्रुखसेयरचें फर्मान वाचलें असतां तें मोठें विचित्र दिसतें. पूर्वीच्या बादशहांची शिस्त फर्रुखसेयरच्या वेळेस चालू असती तर असें मोघम फर्मान कधीं सुटलेंच नसतें. पण इतकीं मोघम अतिव्याप्तीचीं कलमें सुद्धां इंग्रजांस पुरेशीं झालीं नाहींत. त्यांचा त्यांनीं अतिशय दुरुपयोग केला हें त्यांच्याच दप्तरांतील कागदांवरून सिद्ध होतें.

एवंच इंग्रजनबाबांची दोन हात होण्याची सर्व सिद्धता सिराजुद्दौला अधिकारावर येण्याच्या पूर्वींच तयार झाली होती. प्रत्यक्ष इंग्रजांसही त्याबद्दल अतिशय खुमखूम असून, एकदां दोन हात होतील तर बरें असें वाटत होतें. सन १७५२तील ऑर्मच्या लिहिण्यावरूनच हा प्रकार सिद्ध होत आहे. बिचाऱ्या डच व फ्रेंच लोकांची स्थिति थोडीशी निराळी होती. त्यांस कांहीं बादशहाकडून फर्मान मिळालेलें नव्हतें. डच लोक व्यापाराशिवाय दुसऱ्या कोणत्याही नादांत पडत नसत. फ्रेंचांची सत्ता मात्र बरीच होती व त्यांचा एकंदर व्यवहार एतद्देशीयांस प्रिय होता.

अशा स्थितींत अलिवर्दीखान मरण पावला. तेव्हां पुढें जी राज्यक्रांति घडून आली व जिला सिराजुद्दौला कारण झाला असें इंग्रज इतिहासकार

* ( Plassy, by Akshay Kumar Mitra, Modern Review, July 1907 ).

लिहितात, त्या राज्यक्रांतीची तयारी अगोदरच होऊन चुकली होती. सिराजुद्दौला नाममात्र कारण झाला. क्लाइव्हसारखा निरंकुश पुरुष पुढें येण्याचा काय तो अवकाश होता.

**४. सिराजुद्दौल्यास त्वेष येण्याचीं कारणें.**—अलिवर्दीखान मरण पावला तेव्हां सुभेगिरीसंबंधानें त्याच्या वारसांत तंटे लागले. त्यास तीन मुली होत्या, त्यांचीं लग्नें त्याच्या भावाच्या तिघां मुलांशीं झालीं होतीं. ह्या जावयांस त्यानें निरनिराळ्या प्रांतांत मोठमोठीं हुद्यांचीं कामें दिलीं होतीं, ( वंशावळ पहा. ) मरणसमयीं सिराजुद्दौल्यास दत्तक घेऊन त्याजला अलिवर्दीनें कारभार सुप्रत केला. अलिवर्दीखान मरण पावल्यावर त्याचे नातू एकमेकांशीं झोंबूं लागले. ते आपल्या कारभारावर गबर झाले होते. हे आपणास कोणत्या वेळेस काय दगा करतील ह्याचा सिराजुद्दौल्यास भरंवसा वाटत नव्हता. त्यांजकडे परभारें वसूल जमा होई, त्याचा हिशेब ते बरोबर देत नसत. शिवाय त्यांच्या संचयावर सिराजाचा डोळा होता. ह्या कौटुंबिक कलहामुळें इंग्रजांसारख्या परकीय व्यापाऱ्यांस वेळ पडेल तसें वागावें लागत असे. जो अधिकारावर येईल त्याची तर मर्जी संपादन करणें त्यांस जरूर होतेंच; तथापि त्याचा अधिकार कोणत्या वेळेस जाईल व दुसरा कोण इसम पुढें येईल ह्याचा नेम नसल्यामुळें, इतर हक्कदारांस चिडविणें हें इंग्रजांस योग्य वाटत नव्हतें. उघडपणें ते सिराजला निष्ठा दाखवीत, तरी इतरांशीं त्यांचीं अंतस्थ संधानें चालू होतीं. ही गोष्ट नवाबास कळून त्यास राग आला.

डाकाचा कारभारी नवाझिस महंमद मरण पावला, तेव्हां मागें त्याची बायको घसीटा बेगम होती, तिचा कारभार राजवल्लभ नांवाच्या गृहस्थाकडे होता. तत्संबंधीं सरकारी हिशेबाचे झाडे देण्याकरितां त्यास सिराजनें डाक्याहून मुर्शिदाबादेस बोलाविलें, आणि हिशेब बरोबर दिले नाहींत, म्हणून त्यास अटकेंत ठेविलें. राजवल्लभाजवळ पैसा खूब होता व तो त्याजकडून काढण्याचा नवाबाचा विचार असावा. आपली दौलत सुरक्षित ठेवण्याची राजवल्लभास पंचाईत पडली, म्हणून त्यानें आपला मुलगा किसनदास ह्याच्या हवालीं बहु-

तेक दौलत करून, त्यास कलकत्यास पाठविलें. डाका येथें इंग्रजांच्या वखारी असून त्यांच्या व्यापारास राजवल्लभाकडून पुष्कळ प्रकारची मदत झाली होती. सबब त्यास अडचणीच्या प्रसंगीं साह्य करणें आपलें कर्तव्य होय असें समजून इंग्रजांनीं त्याच्या धनदौलतीचा व मुलांचा सांभाळ कलकत्यास केला. किसन-दासाची बायको प्रसूत व्हावयाची होती. सबब कासीमबाजारच्या वखारीचा मुख्य वॅट्स् ह्याच्या शिफारशीनें इंग्रजांनीं किसनदासास कलकत्ता येथें उमिचंदाचें घर होतें तें राहवयास दिलें. हा प्रकार जासुदांकडून सुभेदारास कळला आपल्या मर्जीतून उतरलेल्या गृहस्थास व त्याच्या कुटुंबास इंग्रजांनीं ह्याप्रमाणें आश्रय दिला, हें पाहून त्यांस चीड आली. ह्याच सुमारास घसीटाबेगम, शौकतजंग वगैरेशीं इंग्रजांचे गुप्त व्यवहार चालू होते, त्यामुळें आपल्या विरुद्ध इंग्रज खटपट करीत आहेत, अशी सुभेदाराची भावना झाली.

इकडे युरोपांत इंग्रजफ्रेंचांचें युद्ध सुरू होणार अशी बातमी त्यांस हिंदु-स्थानांत येऊन आपापल्या ठाण्यांची डागडुजी व व्यवस्था करण्याविषयीं विलायतेहून हुकूम आले. तेव्हां नदीच्या बाजूनें तटबंदी करून इंग्रजांनीं आपल्या वखारीचा बंदोबस्त केला. आलिवर्दीखान जिवंत असता तर त्यांस त्यानें आपल्या हद्दींत लढूं दिलें नसतें. पण आलिवर्दीखान मेल्यावर सुभेदाराचें वजन तितकें राहणार नाहीं व आपणांस पाहिजे तसा धुमाकूळ मांडण्यास मिळेल, अशी युरोपियनांची अटकळ होती. आपला कोणास संशय येऊं नये ह्मणून ते बाह्यतः एकमेकावर सुभेदारांच्या विरुद्ध वागल्याचे आरोप करीत. हे विचार व बेत उघड उघड चालत असल्यामुळें ते सिराजाच्या कानावर गेले, तेणेंकरून त्याचें अंतःकरण अतिशय व्यग्र झालें; आणि ह्या पाश्चात्य व्यापाऱ्यांची त्यास फारच चीड आली. त्यानें इंग्रजांवर नजर ठेवण्याकरितां मिदनापूरचा कारभारी राजाराम ह्यास मुद्दाम कलकत्यास पाठविलें. कासी-मबाजारच्या वखारीवर वॅट्स् नांवाचा एक हुशार, धाडसी व कारस्थानी इंग्रज मुख्य होता. सिराजच्या दरबाराची व हालचालींची खडानखडा बातमी तो कलकत्यास हरहंमेश लिहून कळवीत असे. तसेंच हरएक बाबतींत आतां

पुढें काय करावें, असा प्रश्न कलकत्याचे कौन्सिलपुढें आला, ह्मणजे ते प्रथम वॅट्सची सल्ला घेऊन, त्या धोरणानें वागत. ह्मणजे एका अर्थानें वॅट्स् हा सुभेदाराच्या दरबारांतील इंग्रजांचा हेर होता; आणि दुसऱ्या अर्थी तो नबाबाच्या दरबारीं इंग्रजांचा वकील होता, असें ह्मणतां येईल. 'सुभेदार तुह्मांवर चिडला आहे,' ही बातमी वॅट्सनें कलकत्यास गव्हर्नर ड्रेक ह्यास लिहून कळविली; आणि किसनदासास आपल्या हद्दींतून काढून देण्याविषयीं आग्रहपूर्वक विनंति केली, ती मान्य न करितां उलट राजारामसारखे नबाबचे अनेक बातमीदार कलकत्यास होते, ते सर्व ड्रेकनें आपल्या अटकेंत ठेविले.

हातीं अधिकार आल्याबरोबर सिराजनें पहिल्याप्रथम घसीटाबेगमची सर्व संपत्ति हस्तगत केली, त्याबरोबर त्याचा वचक जिकडे तिकडे बसला. पुढें त्यानें आजाच्या वेळचे कामगार काढून नवीन कामगार नेमिले. तसेंच नवीन तटबंदी केली असेल ती पाडून टाकण्याविषयीं त्यानें इंग्रजांस व फ्रेंचांस हुकूम केला. ह्या बाबतींत फ्रेंचांनीं त्याची समजूत केली; पण इंग्रजांनीं मात्र तेढा प्रकार आरंभिला. 'कलकत्यास तटबंदी केली, हें तुम्ही हुकमाबाहेर करीत आहां, तटबंदी वगैरे करण्यास अगोदर आमची परवानगी घेतली पाहिजे.' असें कळविण्यासाठीं नबाबानें आपले वकील इंग्रजांकडे पाठविले. ह्या वकिलांचें ह्मणणें न जुमानतां इंग्रजांनीं त्यांस आपल्या हद्दींतून घालवून दिलें. कासीमबाजारच्या वखारीचा मुख्य वॅट्स् ह्याच्या सल्लयानें ह्या सर्व गोष्टी इंग्रज करीत होते. वॅट्स् त्यांस असें कळवीत असे, कीं 'सिराजुद्दौल्याची नेमणूक सुभेगिरीवर कायमची नसून, घसीटाबेगमचा मुलगा लवकरच नबाब होण्याचा संभव आहे.'

सिराजुद्दौल्यानें हुकूम सोडिला होता तो असा, कीं, 'अलीकडे इंग्रजांचें वर्तन दुःसह झालें आहे. कलकत्याजवळ ते नवीन तटबंदी करीत असून त्याजबद्दल आमची परवानगी तर घेतलीच नाहीं, पण नुसतें कळविलें सुद्धां नाहीं. हा प्रकार दुर्लक्ष करण्यासारखा नाहीं. कारण इंग्रज केवळ व्यापारी आहेत; व व्यापारी ह्मणून ते राहतील तर ते आह्मांस हवेच आहेत. पण ह्या देशाचीं राज्यसूत्रें आमच्या हातांत असून आम्हीं असें फर्मावितों, कीं इंग्रजांनीं बांधि-

केली ही नवीन तटबंदी एकदम पाडून टाकावी. ' हा हुकूम वॅट्सनेंच प्रथम इंग्रजांस कळविला; व त्याबरोबरच सुभेदाराचा पाय कायम झालेला नाहीं असेंही त्यानें कळविल्याप्रमाणें, इंग्रजांनीं नबाबाच्या वकिलांस मोठ्या अपमानानें घालवून दिलें; आणि वॅट्स् ह्यास लिहून कळविलें, कीं ' सुभेदाराकडे संधान ठेवून आह्मांस अपाय न होईल अशी तजवीज व्हावी. ' ह्यावरून इंग्रजांचें वर्तन जाणूनबुजून धरसोडीचें होतें हें उघड आहे. हा कच्चा प्रकार ऑर्मनेंच दिला आहे.

राजारामाचा भाऊ नारायणदास कलकत्यास सुभेदाराकडून बातमी काढण्यासाठीं गेला. त्या वेळीं गव्हर्नर ड्रेक व उमिचंद ह्यांजमध्यें थोडें वैषम्य आलें होतें. उमिचंद व नारायणदास ड्रेकच्या भेटीस आले असतां, नारायणानें आणिलेलें सुभेदाराचें पत्र न स्वीकारतां ड्रेकनें नारायणदासास आपल्या हद्दींतून बाहेर काढून दिलें; आणि तटबंदीसंबंधानें स्वतःच्याच जबाबदारीवर कौन्सिलच्या सल्ल्याशिवाय नबाबास परत जबाब पाठविला. तो जबाब हल्लीं उपलब्ध नाहीं. तथापि ड्रेकच्या सांगण्यांत पुढें असें आलें, कीं 'इंग्रज आज शंभर वर्षें येथें व्यापार करीत आहेत. त्यांजविषयीं संशय घेण्याचें कांहीं कारण नाहीं. नवीन तटबंदी कांहीं एक केलेली नाहीं. फ्रेंचांशीं युद्ध होण्याचा रंग असल्यामुळें जुन्या तटबंदीची मात्र डागडुजी केली आहे.' हें विचित्र उत्तर वाचून सुभेदारास राग आला. तो ह्मणाला, ' माझ्या राज्यांत झगडा करणार हे कोण! त्यांजवर परचक्र आलें असतां त्यांचें संरक्षण करण्यास आह्मांस सामर्थ्य नाहीं कीं काय! ' वरील पत्र येऊन नबाबास पोंचतें तोंच आपला वकील नारायणदास ह्यास घालवून दिल्याची बातमी त्याजकडे आली. तेव्हां सर्व युरोपीय लोकांस बंगाल्यांतून घालवून देण्याचा सुभेदारानें निश्चय केला, आणि प्रथम इंग्रजांवर मोहीम करण्याचें ठरविलें.

ह्याप्रमाणें इंग्रजांचें प्रकरण निकरावर येण्यास अनेक कारणें होत गेलीं. इंग्रजांस विलक्षण सवलतीचें फर्मान मिळून, जितका सुभेदाराचा कारभार दुर्बल, तितक्या इंग्रजांच्या सवलती ज्यास्त, असा प्रकार असल्यामुळें, इंग्र-

यांच्या मनांत सुभेदाराची सत्ता संपुष्टांत आणावी असे विचार चालले होते. ते अलिवर्दीखानासही माहीत असल्यामुळें, त्यानें मरणापूर्वी त्यास केलेल्या उपदेशाअन्वयें ह्या ताज्या दमाच्या तरुण बांडानें तो उपदेश एकदम अंमलांत आणण्याची तयारी चालविली. हें वास्तविक भावी राज्यक्रान्तीचें पहिलें मुख्य कारण होय. ह्याशिवाय अनेक तात्कालिक कारणें घडलीं त्यांचें स्वरूप वर सांगितलेंच आहे. इंग्रज लोकांच्या वखारी स्वतः पहाव्या अशी सुभेदाराची इच्छा होती; पण त्या त्यांनीं त्यास दाखविल्या नाहींत. ते आपल्या वखारी कोणासच दाखवीत नसत. फ्रेंचांचा बंगाल्यांतील अंमलदार जीन लॉ ह्यानेंही आपल्या वृत्तान्तांत हाच प्रकार वर्णिला आहे. इंग्रज लोक मोठ्या थाटानें राहत असत व त्यांची कलकत्यास मोठी भरभराट होती, त्यामुळें त्यांच्यापाशीं पुष्कळ संपत्ति आहे असें सुभेदारास वाटून, साधल्यास त्यांची संपत्ति आपणांस मिळावी हाही उद्देश होता.

प्रत्यक्ष सिराजुद्दौल्याच्या लेखांत ह्या तंट्याचीं कारणें नमूद आहेत, तीं हीं १. येथील कायदा मोडून इंग्रजांनीं नवीन तटबंदी केली आहे. २. फर्मानाचा दुरुपयोग करून त्यांनीं व्यापारांत भलतेच प्रकार चालविले आहेत. ३. सुभेदार आपल्या कारभाऱ्यापासून हिशेब मागत असतां, तो न देतां कारभारी इंग्रजांकडे पळून जातो; व त्यास इंग्रज आश्रय देतात.

ह्या तिसऱ्या कारणासंबंधानें सिराजुद्दौल्यानें गव्हर्नर ड्रेकबद्दल अत्यंत त्वेषाचे उद्गार काढिले आहेत. ' इंग्रजांनीं खंदक केला आहे, तो भरून काढावा, तटबंदी पाडावी, मुर्शिदकुलीखानाच्या वेळेस जसा व्यापार चालू होता, तसाच आतांही चालवावा; ह्या गोष्टी ते न करतील तर कांहीं एक सबब न ऐकितां, त्यांस आमच्या देशांतून आह्मी घालवून देणार. ' परवानगी नसतां नवीन तटबंदी केली, हें इंग्रजांच्याच लेखांवरून सिद्ध होत आहे. फर्मानांत दिल्या नाहींत अशा व्यापाराच्या सवलती ते वापरीत होते, हेंही त्यांस कबूल आहे. किसनदासासंबंधानें इंग्रजांस इतकेंच वाटत होतें, कीं नवीन सुभेदाराचा पाय राज्यांत कायम होऊं द्या, म्हणजे त्याजबद्दल विचार करण्यांत येईल. कारण

यदाकदाचित् नबाबाचे प्रतिस्पर्धी बंड करूं लागले, तर दोन दगडांवर भिस्त ठेवून वेळ पडेल तसें वागण्याचा त्यांचा विचार होता. सिराजुद्दौल्याला हा प्रकार ' मूले कुठारः ' असाच वाटल्यास नवल नाहीं. हे सगळे प्रकार खरे असले, तरी त्याबद्दल त्यानें इतकें चिडण्याचें व इतके सक्त इलाज घेण्याचें कारण नव्हतें, असें इंग्रज ह्मणतात. त्याच्या जुलमास त्रासलेले एतद्देशीय लोक वरील सर्व प्रकार मोठ्या उत्सुकतेनें पाहत होते.

**५. कासीमबाजारच्या वखारीचा पाडाव** ( जून १, १७५६ ).— वर सांगितलेला प्रकार घडत असतां सिराजुद्दौला मुर्शिदाबादेच्या उत्तरेस तीन मैलांवर राजमहाल येथें राहत होता. तेथून त्यानें दोन हुकूम पाठविले. पहिला कासीमबाजार येथील इंग्रजांची वखार काबीज करण्याचा, व दुसरा कलकत्याचे इंग्रजांस पळून जाण्यास वाट मिळूं नये व खालून त्यांस नवीन मदत येऊं नये, ह्मणून खालीं बंदरावर असलेलें मकबा येथील इंग्रजांचें ठाणें काबीज करण्याचा. कासीमबाजारच्या फ्रेंच वखारीचा मुख्य जीन लॉ नांवाचा गृहस्थ असून मि. वॅट्स् हा इंग्रज वखारीचा मुख्य व इकडील कारभारांत चांगला वाकबगार गृहस्थ होता. त्याची उमर ३८ वर्षांची होती. ता. २४ मे स. १७५६ रोजीं सुभेदाराचा सेनापति मीर्झा उमरबेग फौज घेऊन कासिमबाजारच्या वखारीवर आला. उमरबेगास धन्याच्या मनांतील प्रकार सर्व ठाऊक नव्हता. त्यानें इंग्रज, डच व फ्रेंच तिघांच्याही वखारीस वेढा घातला; तेव्हां वॅट्स् यास वाटलें, कीं हा उपक्रम केवळ पैसे उपटण्यापुरता आहे. पण दुसरे दिवशीं डच व फ्रेंचांच्या वखारी सोडून सर्वच फौज प्रथम इंग्रजांवर आली, तेव्हां मात्र वॅट्स् घाबरला, आणि त्यानें कलकत्याहून मदत मागविली. त्यानें गव्हर्नरास कळविलें, कीं ' सुभेदारास सामोपचाराच्या गोष्टी लिहून त्याची समजूत काढा. ' त्याप्रमाणें कलकत्याच्या कौन्सिलनें सुभेदारास पत्रें लिहिलीं, पण तीं पोंचलीं नाहींत; व ' ज्यास्त फौज पाठवितां येत नाहीं; तुह्मांपाशीं लोक आहेत, तेवढ्यांनीं पावसाळ्यापर्यंत सहज निभाव होईल, ' असें पत्र वॅट्स् यास लिहिलें, तेंही त्यास पोंचलें नाहीं. इकडे वॅट्स् अगदीं भयंकर अडचणींत

आला होता. त्याच्यापाशीं फक्त पन्नास लोक होते; पैकीं निम्मे युरोपियन होते. तोफा अगदीं निरुपयोगी होत्या. लढून निभाव लागण्यासारखा नव्हता; आणि लढून यशःप्राप्ति न झाल्यास कंपनीकडूनही त्यास ठपका आला असता. वॅट्स्‌जवळ त्याची बायको असून तिचा प्रसूतिसमय समीप आला होता. अशा स्थितींत तो नबाबाच्या स्वाधीन होण्याची संधि पाहूं लागला. ता. १ जून रोजीं सिराजुद्दौला मुर्शिदाबादेस आला; आणि लगेच त्यानें आपला सेनापति रायदुर्लभ यास कासीमबजारचा तट व वखार इस्तगत करण्यास पाठविलें; व आपणही मागाहून लगेच तेथें आला. रायदुर्लभनें वॅट्स् ह्यास सुभेदाराच्या भेटीस बोलविलें. तेव्हां सर्वांच्या सल्ल्यानें तो भेटीस गेला. तेथें सुभेदारानें त्यास कैद केलें. तसीच आणखी कांहीं मंडळी कैद झाली व कांहीं पळून गेलीं. तेव्हां तट सिराजच्या हातीं आला. वॅटस्‌नें अशा प्रकारें तट सोडून दिल्याबद्दल लोक त्यास दूषणें देतात. पण तो सुभेदाराच्या सहज इस्तगत झाला असता असें बहुतेकांचें ह्मणणें आहे. ता. ५ जून रोजीं वॅट्स् ह्यास बरोबर घेऊन सिराज कलकत्यावर निघाला. येतांना कासिमबाजारच्या तोफा व दारूसामान त्यानें आपल्याबरोबर घेतलें. त्याशिवाय त्या वखारींतून त्यानें कांहीं घेतलें नाहीं.

वॅट्स्‌ची खटपट फुकट जाऊन सुभेदारानें फौज पाठवून कासीमबाजारच्या वखारीस वेढा दिला, हें ऐकून कलकत्यास कौन्सिलचे डोळे उघडले. 'वाटेल ती अट कबूल करून त्याची समजूत करा,' असें त्यांनीं वॅट्स् ह्यास लिहिलें. तेव्हां वॅट्स्‌नें खालील अटी कबूल करून सुभेदारास करारनामा लिहून दिला. (१) कलकत्याच्या किल्ल्यास पेरिन्स येथें बांधिलेला बुरूज मोडून टाकावा, (२) सुभेदाराच्या पदरचे लोक कलकत्यास पळून येतील त्यांस आश्रय न देतां परत पाठवावें; (३) गेल्या कित्येक वर्षांत कंपनीनें लोकांस दस्तकें कसकशीं दिलीं त्याचा हिशेब द्यावा; (४) अयोग्य दस्तकें दिल्याचें सिद्ध झाल्यास त्याबद्दल नुकसानी भरून द्यावी; (५) व हॉल्वेल ह्यास कलकत्ता येथें जमीनदारीचे अधिकार दिल्यामुळें रयतेचें नुकसान होत आहे, सबब ते अधिकार काढून घ्यावे.

ह्या अटी अगदीं योग्य होत्या. मात्र त्या कबूल केल्यास अयोग्य मार्गांनीं पैसा कमावण्याची इंग्रजांस बंदी होणार होती. सबब हा करार कागदावरच राहून त्याप्रमाणें इंग्रज वागले नाहींत. उलट ते सुभेदारास वेचकुल्या दाखवूं लागले. तेव्हां सिराजुद्दौल्यास वाईट वाटून आजानें सांगितलेल्या कानमंत्राची त्यास पक्की आठवण झाली. तो मंत्र त्याच्या मनांत रात्रंदिवस घोळूं लागला, व वरील दिलेला करारनामा इंग्रजांकडून बजावण्याचा त्यानें निश्चय केला. लगेच त्यानें फौज बरोबर घेऊन कलकत्त्यावर स्वारी केली. त्याजबरोबर उघड सामना करण्याची तेथील इंग्रजांस ताकद नव्हती. म्हणून डाका, जगदिया, बालासोर वगैरे ठिकाणच्या वखारींस त्यांनीं लिहून पाठविलें, कीं ' होईल तितका ऐवज घेऊन वखारी सोडून निघून यावें. ' इकडे कित्येक सावकार लोकांच्या मार्फत सुभेदाराशीं त्यांनीं रदबदली चालविली; व कसेंही करून ' वरच्या करारनाम्यांतून आपणांस मुक्त करावें व दंड घेऊन त्यानें परत जावें,' अशी खटपट इंग्रजांनीं सुरू केली.

**६. कलकत्त्यांतून इंग्रजांचा उठाव** ( जून १७५६ ).—सिराजुद्दौला कलकत्त्यावर फारच त्वरेनें आला. एकशें साठ मैलांचें अंतर, एवढ्या फौजेसह भर उन्हाळ्यांत, रस्ते सुद्धां नाहींत अशा जागेंतून, त्यानें अकरा दिवसांत गांठिलें. डच व फ्रेंच ह्यांची मदत मिळविण्याचा त्यानें प्रयत्न केला, पण तो सफल झाला नाहीं. कोणीं त्यास इंग्रजांची बढाई सांगितली असतां तो चिडून जात असे. तथापि वर सांगितलेल्या अटी इंग्रजांनीं कबूल केल्या असत्या, तर तशी कबुलात घेऊन तो परत गेला असता. फ्रेंचांची तर खात्री झाली होती, कीं तो इंग्रजांस अतिशय भीत होता. मुर्शिदाबादेस खोजावाजीद म्हणून मोठा सावकार होता, त्याच्या मार्फत त्यानें इंग्रजांशीं गोडी करण्याचें आरंभिलें होतें. त्या वेळीं सुद्धां कासीमबाजारची टपाल कलकत्यास सतावीस तासांत येत असे. दुसऱ्या तारखेचीं वॅट्स्चीं पत्रें तिसऱ्या तारखेस कलकत्यास आलीं. खोजावाजीदनें गोडी करण्याचा उपक्रम पंधरा सोळा तारखेस केला; पण इतक्या उशिरां माघार घेणें शक्य नव्हतें. कासीमबाजार पडल्याची बातमी ७ जूनला कलकत्यास आली.

इकडे कलकत्याच्या कौन्सिलनें ता. २० मे पासून आपल्या बंदोबस्ताची व फौजेच्या व्यवस्थेची तयारी चालविली होती. डच व फ्रेंच यांस त्यांनीं आपल्या मदतीस बोलाविलें आणि हा प्रसंग सर्व युरोपियनांवर आहे, सर्वांनीं एक होऊन त्याचें निवारण केलें पाहिजे, अशीं नानाप्रकारें त्यांस भर दिली. डच लोकांनीं तर आपला नेहमींचा व्यापारी बाणा सोडण्याचें साफ नाकारिलें; आणि फ्रेंचांनीं जरी बाह्यतः सहानुभूति दाखविली, तरी प्रसंग पडल्यास तुह्मी आमच्या किल्ल्यांत येऊन राहा असें सांगण्यापलीकडे त्यांनीं ज्यास्त कांहीं केलें नाहीं. फ्रेंचांनी सुभेदारास कांहीं दारूगोळा दिला असें इंग्रज ह्मणतात, पण ती गोष्ट फ्रेंच कबूल करीत नाहींत. इंग्रजांनीं कलकत्याच्या बंदोबस्ताची जी नवीन व्यवस्था केली ती फारशी चांगली नव्हती. सात तारखेला खोजा-वाजीदचें पत्र त्याचा दिवाण शिवबाबू याजबरोबर कलकत्यास आलें, त्यांत असा मजकूर होता, कीं ' सुभेदाराला चिथविण्याचें सर्व काम उमिचंदानें केलें आहे. ' गव्हर्नरनें उलट जबाब पाठवून सुभेदाराची समजूत करण्याचा प्रयत्न केला. इकडे आपला बंदोबस्त उत्कृष्ट आहे असा आव दाखविण्या-साठीं इंग्रजांनीं आपले पंधरा शिपाई पाठवून कलकत्याच्या खालीं सुखसागर येथें बरीच धामधुम सुरू केली. त्याचा परिणाम उलट होऊन सुभेदाराच्या फौजेनें इंग्रजांची रसद मात्र बंद केली. ता. ११ रोजीं फौजेची गणति करितां इंग्रजांचे एकंदर पांचशेंपंधरा लोक भरले. त्यांपैकीं फक्त निम्मे युरोपियन होते. त्यांच्या तोफा चांगल्या नव्हत्या. त्या व्यवस्थित जागीं आणण्यास प्रयास पडले. दारू होती पण ती बहुतेक दमट होऊन निरुपयोगी झाली होती. कल-कत्ता शहराचे तीन भाग होते. पहिला वखारी वगैरे असलेला फोर्टवुल्यमचा तट, दुसरा युरोपियन वस्तीचा भाग, आणि तिसरा एतद्देशीयांच्या वस्तीचा भाग. दुसरे दोन भाग सोडून देऊन तटाचा मात्र बचाव करण्याचा इंग्रजांनीं निश्चय केला. कलकत्यांतील बहुतेक व्यापारी व लोक आपली धनदौलत व कुटुंबें बाहेरगांवीं पाठवून आपल्या बचावास लागले. गोविंदराम मित्र ह्मणून एक कलकत्याचा गृहस्थ होता, तो इंग्रजांच्या तर्फेनें एकसारखी खटपट करीत

होता. सुभेदार कलकत्यावर येत असतां वॅट्स् त्याजबरोबर होता. त्याचें १२ तारखेचें पत्र आलें, कीं ' थोडासा दंड भराल व सुभेदाराच्या मागण्या कबूल कराल, तर अजून आपला उपक्रम सोडून तो परत जाईल. ' त्यावर कलकत्याहून जबाब गेला, कीं ' कासीमबाजार येथें अपमान झाला तेवढा पुरे. इतउत्तर सुभेदाराची मनधरणी करणें आह्मांस बिलकुल पसंत नाहीं. ' खरा प्रकार असा होता, कीं आपण कलकत्याचा बचाव सहज करूं शकूं, अशी ड्रेक यास घमेंड होती. सुभेदाराच्या तोफखान्याचीच कायती इंग्रजांस भीति होती, कारण त्याच्या तोफखान्यावर पोर्तुगीझ व फ्रेंच लोक होते. पाद्री मंडळीच्या मार्फत ह्या तोफखान्यावरील लोकांचीं मनें बिघडविण्याचा इंग्रजांनीं प्रयत्न केला; परंतु तो सफल झाला नाहीं.

इंग्रजांची अशी समजूत झाली होती, कीं लोकांच्या सांगीवरून सुभेदाराचें मन चिडून गेलें आहे. इंग्रज व सुभेदार ह्यांजमध्यें रदबदली करणारे मुख्य इसम काय ते दोन, एक खोजा वाजीद व दुसरा उमिचंद. हे दोघेही मोठे वजनदार व्यापारी होते. दोघांचाही इंग्रजांस निष्कारण संशय आला होता. ता. १३ रोजीं इंग्रजांनीं उमिचंदाच्या घरीं फौज पाठवून त्यास पकडून किल्ल्यांत आणून कैदेंत ठेविलें. तसेंच किसनदास कदाचित् पळून जाईल ह्मणून त्यासही धरून किल्ल्यांत आणिलें. दोघेही थोडी चकमक होऊन रक्तपात झाल्याशिवाय हस्तगत झाले नाहींत. उमिचंदास इंग्रजांनीं कैद केलें हें खोजावाजीद यास आवडलें नाहीं.

ता. १६ जून रोजीं सुभेदार कलकत्यास येऊन उमिचंदाच्या बागेंत उतरला. उमिचंद कैद झाल्यापासून त्याचे सर्व लोक इंग्रजांवर नाराज झाले होते, त्यांनीं कलकत्याविषयीं उपयुक्त माहिती सुभेदारास दिली. ता. १७ जून रोजीं नबाबाची सर्व फौज येऊन पोंचली. त्याच दिवशीं इंग्रजांकडील एक हजार मजूर लोक नोकरी सोडून निघून गेले. इंग्रजी फौजेंतील लोकांची बायकामुलें बाहेर शहरात होतीं, तीं किल्ल्यांत घुसल्यामुळें बरीच गडबड उडाली. ता. १८ रोजीं लढाई सुरू झाली. त्या दिवशीं इंग्रजांच्या तोफांनीं सुभेदाराच्या

फौजेंत पुष्कळ धुमाकूळ उडवून दिला. तथापि सायंकाळीं इंग्रजांस आपल्या माऱ्याच्या जागा सोडून मागें हटावें लागलें. पहिल्या दिवसाच्या ह्या चकमकींत इंग्रजांची घमेंड पुष्कळ उतरली. ता. १८ रोजीं रात्रीं पुढें काय करावें ह्याचा विचार किल्ल्यांत सुरू झाला. बरेच लोक जखमी झाले होते. अन्नसामुग्री होती, पण शिजविण्यास कोणी नव्हतें. अधिकाऱ्यांचे हुकूम हाताखालचे लोक पाळीनात, तेव्हां किल्ल्यास लागून नदींत गलबतें होतीं, त्यांत बसून पळून जाण्याचा विचार इंग्रजांनीं ठरविला. पैसाअडका व सामानसुमान गलबतावर चढविण्यांत आलें. इकडे इंग्रजांचा असा विचार चालू असतां एकदम एक तोफेचा गोळा त्यांच्या समोर किल्ल्यांत येऊन पडला. त्याबरोबर सर्वांच्या मनाची चलबिचल झाली. त्या मंडळींत हॉल्वेल म्हणून एक गृहस्थ होता. त्यानें उमिचंदास भेटून अशी विनवणी केली, कीं सुभेदाराकडे जाऊन कांहीं तरी तडजोड करा. उमिचंद अगोदरच चिडून गेला होता व कदाचित् सुभेदार आपली रदबदली ऐकणार नाहीं, म्हणून त्यानें ही गोष्ट मनावर घेतली नाहीं. तारीख १९ रोजीं सकाळीं दहा वाजतां गव्हर्नर ड्रेक यास असें कळलें, कीं दारूगोळा शिल्लक नाहीं. ही गोष्ट बायका मंडळीच्या कानावर जातांच त्यांनीं गलबताकडे धूम ठोकिली. त्या गडबडींत चेंदा होऊन दोनएकशें माणसें बुडून मेलीं. इतक्यांत किल्ल्यांतून बोटीवर चढण्याचें नाकें काबीज करण्यास सुभेदाराचे लोक येत आहेत असें कळलें. तेव्हां तर एकच गोंधळ उडाला. गव्हर्नर ड्रेक ह्याची बोबडी वळली. आपण मात्र एकटे मागें राहून सुभेदाराच्या हातीं पडणार, आपणावर त्याचा विशेष डोळा आहे, असें त्यास डोळ्यापुढें दिसूं लागलें. बऱ्याच दिवसांची दगदग व जागरण ह्यांमुळेंही तो थकून गेला होता. अशा विवंचनेंत तोही कसाबसा शेवटची उडी घेऊन गलबतावर चढला. पुढें गलबतें जरा खालीं जाऊन राहिलीं. मागें राहिलेल्या लोकांच्या बचावासाठीं गलबतें वर आणिलीं पाहिजे होतीं; पण खलाशी लोकांस परत येण्याचें धैर्य होईना; आणि त्यांत धीराचा असा एकही मनुष्य नसल्यामुळें परत येण्याचा विचार रहित करून सर्व मंडळी गलबतें

हांकारून खालीं समुद्राकडे निघून गेलीं. सारांश, मागें कित्येक मंडळी तशीच टाकून स्वतःचा जीव बचावण्याच्या अनिवार हांवेमुळें इंग्रजांनीं जो हा पळ काढिला, त्यानें त्यांच्या नांवास लांछन आलें आहे. गलबतें बरींच खालीं जाऊन एक दिवस थांबलीं. तेथून पुनः पुढें निघून ता. २६ जून रोजीं फुल्टा येथें समुद्रकाठीं येऊन राहिलीं. त्या ठिकाणीं डच लोकांनीं त्यांचा परामर्ष घेतला, ह्मणून त्यांचा बचाव झाला. सुभेदाराचा तोफखाना चांगला असता तर इंग्रजांचें एकही गलबत सुरक्षितपणें पळून जाऊं शकलें नसतें. एवंच ह्या प्रकारणांतला पहिला भाग संपला.

**७. अंधारकोठडीचा प्रकार** ( रविवार, ता. २० जून १७५६ ).—आतां मागें जी इंग्रज मंडळी राहिली, तिचा परिणाम काय झाला हें सांगावयाचें. ड्रेक गलबतें घेऊन निघून गेल्याची बातमी समजतांच मागील मंडळींत मोठा हाहाःकार उडाला. ते रागानें अगदीं वेडे होऊन गेले. तथापि प्रसंगच आणीबाणीचा असल्यामुळें, मनांतला राग गिळून त्यांस पुढील उद्योगास लागणें भाग पडलें. पोर्तुगीझ व आर्मिनियन ह्या दोन राष्ट्रांचे लोक खेरीज करून एकंदर १७० क्रिस्ती लोक लढण्याच्या लायकीचे मागें होते. ते सर्व ड्रेक निघून गेल्याबरोबर एकत्र जमले ( ता. १९ जून ). त्यांनीं ड्रेक व इतर कौन्सिलर यांस कामावरून दूर केलें, आणि हॉल्वेल यास आपला मुख्य नेमिलें. हॉल्वेल हा कौन्सिलचा अगदीं जुना मेंबर असून कलकत्याचा जमीनदार म्हणजे मॅजिस्ट्रेट होता. त्यामुळें त्यास त्या बाजूच्या लोकांची माहिती होती. मात्र तो स्वभावानें तुसट असून कोणासच आवडत नसे. तथापि त्यासच लोकांनीं तूर्त गव्हर्नरचें काम दिलें. प्रथम सर्वांनीं जीव बचावून पळून जाण्याचा निश्चय ठरविला. पण प्रिन्स जॉर्ज नांवाचें गलबत मागें होतें तें त्यांस मिळूं शकलें नाहीं. तेव्हां सर्व लोक बाहेरचीं घरें सोडून किल्ल्यांत जमा झाले. कांहीं झालें तरी मरेपर्यंत लढून किल्ल्याचा बचाव करावयाचा असा हॉल्वेलनें निश्चय केला. इकडे गलबतें परत बोलविण्याचे बावटे त्यांनीं किल्ल्यावर लाविले; पण त्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं. ता. १९ रोजीं किल्ल्यासभोंवतालच्या घरांतून सुभेदाराचे

सैन्यानें बंदुका सोडून किल्ल्यांतील लोकांस अगदीं हैराण केलें. रात्रीं त्या घरांस आग लागल्यामुळें जिकडे तिकडे भयंकर देखावा दिसूं लागला. हैराण झालेले लोक बेकबजा होऊन वाटेल त्या घरांत शिरून यथेच्छ मद्यपान करूं लागले. रात्रीं ५६ असामी इंग्रजांचा पक्ष सोडून सुभेदारास जाऊन मिळाले. ते बहुतेक डच होते.

रविवार ता. २० जूनचा दिवस उजाडला, आणि सुभेदाराचा मारा ज्यास्तच जोरानें सुरू झाला. किल्ल्यांतील लोकांची दाणादाण होऊं लागली. एका बुरुजावर इंग्रजांचे एकदम ४० लोक जमा झाले. दारूगोळा सर्व संपला. आतां शत्रूच्या स्वाधीन व्हावें, ह्मणून सर्व असामी हॉल्वेलचीं आर्जवें करूं लागले. तो तें मान्य करीना. दुपार झाली. इंग्रजांचे एकंदर २५ लोक मेले व ७० जखमी होऊन पडले. तोफखान्याकडील फक्त १४ असामी शाबूद होते. सकाळींच हॉल्वेलनें उमिचंद कैदेंत होता त्याची भेट घेतली, आणि त्याजकरवीं सिराजच्या मर्जीतला अंमलदार माणिकचंद ह्यास पत्र लिहून, इंग्रजांबद्दल रदबदली करण्यास सांगितलें. उमिचंदाचें हें पत्र सकाळीं गेलें. दुपारीं दोन वाजतां किल्ल्यासमोरील एका घरांतून सुभेदाराचा कोणी मनुष्य लोकांस खूण करून लढणें बंद करा असें सांगूं लागला. हॉल्वेनें किल्ल्यांतून त्यास पाहिलें, तेव्हां 'लढाई बंद कराल तर तह करूं' असें त्यास उत्तर मिळालें. हा परिणाम उमिचंदाचे पत्राचा असेल असें समजून हॉल्वेलनें लढणें बंद केलें. पुढें चार वाजतां सुभेदाराची फौज किल्ल्यांत घुसली. त्यांनीं अडथळा करणारांस कापून काढिलें. तेव्हां कांहीं केलें तरी मरण चुकत नाहीं, असें पाहून हॉल्वेलनें लढून मरण्याचा निश्चय केला. इतक्यांत सुभेदाराचा एक अधिकारी आला. त्याजपुढें शस्त्रें ठेवून सर्व त्याच्या स्वाधीन झाले. पुढें हॉल्वेल यास तटावर आणिलें, तेथून त्यानें सुभेदार पलीकडे बसला होता, त्यास सलाम केला. त्यानें त्याचा सलाम घेतला. तेव्हां लढाई तहकूब होऊन फालतु लोक सुद्धां सर्व त्याच्या स्वाधीन झाले. नंतर सुभेदार पालखींत बसून किल्ल्यांत फिरला. हॉल्वेस यास हात बांधून त्याजपुढें आणिलें. त्यानें त्याचे हात सोडविले, व ' तुम्हांस

अपाय होणार नाहीं' असें वचन दिलें. 'मात्र आम्ही येथील अधिकारी आहों, आम्हांवर तुम्ही शस्त्र चालवावयाचें नव्हतें. तसेंच येथचे मोठमोठे कारखाने व सुंदर घरें तुम्हीं जाळून टाकिलीं, ही गोष्ट फार वाईट केली.' अशा रीतीनें सुभेदारानें संताप व्यक्त केला. इतकें झाल्यावर किल्ल्याचे बाहेर वेब्‌स्टर-बर्नच्या घरांत सुभेदारानें रात्रीस मुक्काम केला. पोर्तुगीझ व आर्मिनियन यांस त्यानें बाहेर जाऊं दिलें. तसेंच दुसरेही कित्येक युरोपियन अनायासें निघून गेले. सुभेदाराचे फौजेनें युरोपियनांचीं घरें लुटलीं, पण या पलीकडे त्यांना दुसरा त्रास दिला नाहीं. सर्व मंडळी इंग्रजांचा खजिना शोधण्यांत व रात्रीची तर्तूद करण्यांत गुंतली होती. इतक्यांत कांहीं युरोपियन सोल्जर्स दारू पिऊन दंगा करूं लागले. त्यांत त्यांनीं सुभेदाराचे कित्येक लोक ठार मारिले. हा बभ्रा त्याच्या कानावर गेला. तेव्हां ' या युरोपियन लोकांस रात्रभर मोकळें ठेवणें चांगलें नाहीं, ते वाटेल तो दंगा करतील. तेव्हां दंगे-खोरांस अटक्यांत ठेवण्याची जागा असेल तर पाहवी, व तेथें ह्यांस रात्रभर बंदोबस्तानें ठेवावें;' असा त्यानें हुकूम फर्माविला. इकडे हस्तगत झालेल्या इंग्रज सुभेदाराचे अंमलदार इंग्रजांवर चवताळून गेले असून, दिवसभर लढून त्यांचे सुमारें सात हजार लोक मेले होते. त्यांनीं कैद्यांस एका लहानशा खोलींत बंदोबस्तानें ठेविलें. ही खोली १८ फूट लांब व १८ फूट रुंद एवढी असून तींत दंगेखोर कैदी ठेवण्याचा प्रघात होता. रात्रीं चुडी घेऊन ते अधिकारी किल्ल्यांतील खोल्या तपासूं लागले. तेव्हां तपासतां तपासतां एवढीच खोली त्यांस मजबूद सांपडली. या लहा-नशा खोलींत १४६ इंग्रज कैद्यांस पहारेकऱ्यांनीं खचून भरिलें, त्यामुळें रात्र-भर गुदमरून बहुतेक सर्व मरण पावले, आणि सकाळीं दारें उघडिल्यावर फक्त २३ असामी मरणोन्मुख जिवंत सांपडले, असा मजकूर हॉल्वेलच्या लेखाच्या आधारावर आजपावेतों इतिहासांत सर्वत्र नमूद केलेला आहे, परंतु तो खोटा असून, त्या अंधार कोठडींत फक्त ९ असामीच कोंडले होते, असें अलीकडे मि. लिटल नामक गृहस्थांनीं साधक बाधक पुराव्याची छाननी करून

सिद्ध केलें आहे. कोंडलेल्या नऊ इसमांचीं नांवें:—१ हॉल्वेल, २ कोर्ट, ३ कुक, ४ वॉल्कॉट, ५ लॅशिंग्टन, ६ बर्डेट, ७ रे० बेलामी, आणि दोन जखमी झालेले लष्करी अंमलदार ८ कोल्स् व ९ स्कॉट. यांपैकीं रे० बेलामी पूर्वीच आजारी असल्यामुळें व शेवटचे दोन असाध्य जखमांमुळें त्या रात्रीं मरण पावले व बाकीचे सहा इसम सकाळीं जिवंत सांपडले, असा वास्तविक प्रकार आहे. खोलीस एक लहानशी गजांची खिडकी होती, तिच्याजवळ आळी-पाळीनें बसून ते कैदी बाहेरची हवा घेत आणि पहारेकरी त्यांस खिडकीच्या गजांतून मधून मधून पाणी पिण्यास देत. या प्रकरणाची तपशीलवार चर्चा येथें करणें शक्य नाहीं. जिज्ञासूंनीं लिटल्चा लेख* पाहवा. ता. १९ रोजीं एकंदर १७० लोक असून त्यांपैकीं बहुतेक दोन दिवस पावेतों लढून मेले, जखमी झाले किंवा पळाले. अर्थात् कोठडींत कोंडण्यास १४६ शिल्लक राहिले हें संभवतच नाहीं.

सकाळीं सुभेदारानें हॉल्वेलची भेट घेतली, तेव्हां तो बोलला, 'पैशाची मला कांहींच माहिती नाहीं.' त्यावरून हॉल्वेल व दुसरे दोन असामी यांस सुभेदारानें मीरमदन नामक आपल्या अधिकाऱ्याच्या कैदेंत सोंपिलें. बहुधा हा प्रकार उमिचंदाच्या सांगीवरून झाला असावा. कारण उमिचंद व किसनदास हे दोघेही आतां कैदेंतून सुटून सुभेदाराच्या मर्जींतले झाले होते. त्यानें त्यांस पोषाख देऊन खुष केलें. मीरमदननें त्या तिघांस एका बैलांच्या गाड्यांत घालून उमिचंदाच्या बागेंत नेलें. तेथें एक दिवस राहि-ल्यावर त्यांस उन्हांतून चालवीत गोदीच्या टोंकाशीं आणिलें. पुढें ता. २४ रोजीं बहुधा सुभेदाराच्या हुकुमानेंच त्यांस होडींत घालून मुर्शिदाबादेस पाठविलें. तेथें ता. ७ जुलई रोजीं ते येऊन पोंचले. सुभेदारही तेथें ११

* J. H. Little on the Black Hole;—Bengal Historical Magazine, September 1915,—Bengal Past & Present Vol. XI. याचाच अनुवाद डिसेंबर १९२१च्या 'नवयुगांत' छापलेला पाहवा.

जुलैस आला. ता. १६ जुलै रोजीं त्यानें त्यांची भेट घेतली. त्यानें लगेच त्यांच्या बिड्या तोडवून मोकळें केलें; आणि 'त्यांस सोडून द्या, व पाहिजे तिकडे जाऊं द्या, आणि रस्त्यांत कोणी त्यांस जाच करणार नाहीं अशी तजवीज करा,' अशा प्रकारचा स्पष्ट हुकूम, पुनः पुनः खरावून, त्यानें आपल्या अधिकाऱ्यांस दिला. ह्याप्रमाणें सुटका झाल्यावर ते तिघे डच लोकांच्या टांकसाळींत गेले. तेथें कांहीं दिवस आराम वाटल्यावर ते हुगळी नदींतून खालीं येऊन फुल्टा येथें असलेल्या बाकीच्या इंग्रजांस ता. १२–१३ ऑगस्ट रोजीं येऊन मिळाले.

ता. २१ जून रोजीं सकाळीं वरील तिघां शिवाय किल्ल्यांत जे इंग्रज जिवंत सांपडले, त्यांस नबाबानें सोडून दिलें; व कलकत्ता शहर काबीज करून त्यास अलीनगर असें नांव दिलें; आणि तेथें एक नवीन मशीद बांधिली. सुटलेल्या लोकांपैकीं जितके पायीं चालण्यास समर्थ होते, तितके चालत येऊन जवळच खालीं नदींत असलेल्या गलबतांवरील इंग्रजांस मिळाले. ड्रेक वगैरे मंडळीच्या मनांत सुभेदारावर चाल करून जाण्याचा विचार आला नाहीं, ह्या भित्रेपणाबद्दल त्यांस त्यांच्या जातभाईकडून अतिशय दोष देण्यांत येतो. शिवाय जखमी झालेली मंडळी चंद्रनगर येथें येऊन फ्रेंचांच्या आश्रयास राहिली.

कलकत्त्यास इंग्रजांचें मुख्य ठाणे होतें, त्याप्रमाणें बालासोर, डाका वगैरे ठिकाणीं त्यांच्या वसाहती होत्या, त्या सुद्धां सुभेदाराच्या स्वाधीन झाल्या; आणि तेथचे लोक स्वसंरक्षणार्थ बाहेर निघून गेले. त्यांत दोन तीन सुंदर इंग्रज स्त्रिया सिराजच्या हातांत पडल्या होत्या; पण त्यांस त्यानें आपल्या जवळ न ठेवितां सोडून दिलें. डाकाच्या वखारींत रोकड व माल मिळून चौदा लाखांचा ऐवज त्यास मिळाला. यावरून इंग्रजांचा व्यापार बराच चांगला होता असें दिसतें.

एकंदरींत इंग्रजांचें ह्या प्रकरणांत पुष्कळ नुकसान झालें. सुमारें पंचाण्णव लाख रुपये नुकसान झालें, असा इंग्रजांनीं अदमास केलेला आहे. शिवाय व्यापार बंद पडला. खासगी व्यापाऱ्यांचें नुकसान दोन कोट रुपयांचें झालें

असें पुढें क्लाइव्हनें विलायतेस लिहून पाठविलें. कलकत्याच्या किल्ल्यांत मात्र सुभेदारास पन्नास हजारांपेक्षां ज्यास्त रक्कम मिळाली नाहीं. इंग्रजांचा व्यापार बंद पडल्यामुळें त्यांचें फार नुकसान झालें असेंही क्लाइव्ह ह्मणतो. ह्या प्रकरणांत इंग्रजांच्या बायकामुलांस मुळींच त्रास पोंचला नाहीं; आणि पुष्कळ बायकामुलें त्यांत मेलीं असे लेख आहेत ते सर्व खोटे होत. कोणाची कोणास दाद नाहीं अशा स्थितींत कल्पनेवर भिस्त ठेवून लिहिलेले लेख आधारभूत गणतां येणार नाहीं.

कलकत्याच्या अंधारकोठडीच्या या प्रकरणांत नाना प्रकारचे तर्क वितर्क चालून खरा प्रकार सर्वस्वी लोपून गेला आहे. पुढील अन्याय झांकण्याच्या बुद्धीनें मागील क्षुल्लक प्रकार मुद्दाम फुगविण्यांत आले. एकंदर प्रकार इंग्रजांनीं आपणांवर ओढून आणिला. किसनदासाचा पक्ष इंग्रजांनीं उचलिला, तरी पण पुढें त्याची व सुभेदाराची गोडी झाली. उमिचंदास तर इंग्रजांनीं उगाच कैद केलें. योग्य मार्गानें तंटा मिटविण्याची इच्छा इंग्रजांनीं दाखविली असती तर त्यांस देशांतून घालवून द्यावें असा सुभेदाराचा बिलकूल हेतु नव्हता; उलट अडचणीच्या प्रसंगीं इंग्रजांच्या मदतीची अपेक्षाच तो ठेवीत होता. आपणावर इंग्रजांनीं हुकमत चालविण्याचा प्रयत्न करूं नये, एवढेंच त्यांस पटवून देण्याची त्याची इच्छा होती. परंतु कलकत्यास आल्यावर जेव्हां इंग्रजांनीं त्याजवर शस्त्र धरिलें तेव्हां त्याचा नाइलाज होऊन दोन दिवसांच्या लढाईंत प्राणहानि व नुकसान अतोनात झाल्यामुळें त्यास चीड उत्पन्न झाली. जे इंग्रज ता. २० रोजीं स्वाधीन झाले, त्यांस एकदम कापून टाकण्याची सुद्धां सुभेदारास सवड होती. पण तसें न करितां फक्त खजिन्याची माहिती घेऊन त्यांस सोडून द्यावें एवढाच त्याचा हेतु होता. फुल्टा येथें इंग्रज पुढें सहा महिने होते, पण त्यांस तेथून हुसकावून देण्याचा प्रयत्न सुभेदारानें केला नाहीं, यावरून त्यांचा सूड घेऊन नायनाट करावा अशी त्याची बुद्धिच नव्हती. इंग्रज लढून पळून गेले नसते तर उभय पक्षीं तडजोड होऊन तंटा मिटला असता. परंतु तसें झालें असतें तर क्लाइव्हच्या पुढील उपद्व्यापांस सबब उत्पन्न झाली नसती.

**८. इंग्रजांनीं कलकत्याचें पुनर्ग्रहण** ( ता. २ जानेवारी, १७५७ ). आतां कलकत्ता परत घेण्याविषयीं इंग्रजांनीं काय तजविजी केल्या तें सांगावयाचें. ड्रेक व कौन्सिलर्स फुल्टा येथें आल्याबरोबर त्यांनीं कलकत्ता पडल्याची हकीकत मद्रासेस कळविली. मात्र ही गोष्ट विलायतेस कळवूं नये, किल्ला घेतल्यावर मग दोनही हकीकती एकदम कळवितां येतील, असें त्यांनीं लिहिलें. ह्यामुळें त्या प्रसंगाची सरकारी हकीकत पुढें पुढें कधींच कोणी तिकडे लिहून पाठविली नाहीं. हॉल्वेलनें पाठविलेलीं दोन तीन पत्रें उपलब्ध आहेत. त्याचें पहिलें पत्र जुलै ता. १८ चें असून दुसरें ऑगस्टांतलें व तिसरें नोव्हेंबरांतलें आहे. हीं तीनही मिळून व दुसऱ्या आणखी अशाच पत्रांवरून ह्या प्रकरणाची हकीकत आजपावेतों प्रचलित राहिली. अलीकडे बंगालींत 'सिराजुद्दौला' नांवाचें पुस्तक प्रसिद्ध झालें असून त्यांत 'अंधारकोठडीचा' सर्व प्रकार बनावट असल्याचें प्रतिपादिलें आहे. अंधारकोठडीचा प्रकार ता. २० जूनला झाला; व पुढें ता. १८ जुलै पावेतों सुमारें एक महिनाभर हॉल्वेलची प्रकृति नीट नसून पत्र लिहिण्याचीं साधनें अनुकूळ नसल्यामुळें, त्यानें ती हकीकत एकदम लिहून कळविली नाहीं. तसेंच मुसलमान इतिहासकार त्याबद्दल कांहींच लिहित नाहींत. कलकत्याची हकीकत मद्रासेस ता. १६ ऑगस्ट स. १७५६ रोजीं व लंडनास ता. १२ जून स. १७५७ रोजीं पोंचली. लंडनास गेलेली बातमी पॅरिस येथें व ऐर्लंडात खासगी पत्रें गेलीं, त्यांवरून पसरली होती. लंडनास बातमी पोंचली, तिच्यामुळें एकदम हाहाःकार उडूं नये व व्यापारी देवघेवींत चलबिचल होऊं नये, ह्मणून अधिकाऱ्यांनीं आपली शिकस्त केली. कलकत्ता परत घेतल्याची वार्ताही त्यांनीं मुद्दाम बाहेर पसरिली, व ह्या भानगडींत कंपनीचें फारसें नुकसान झालें नाहीं असा पुकारा केला. ड्रेक व कांहीं इतर मंडळीस त्यांनीं परत बोलाविलें, ह्या पलीकडे कोणास कांहीं एक शिक्षा केली नाहीं; किंवा पुढें त्या प्रकरणाचा विशेष तपासही केला नाहीं. लवकरच सर्व तंटा मिटून मीरजाफराकडून पुढें वाटेल तसा पैसा उकळण्यांत आल्यामुळें सहजच सर्व पक्षांची समजूत झाली.

मद्रासेहून मदत येऊन आपली सुटका होईल असें फुल्टा येथील मंडळीस वाटत होतें. पण तसा प्रकार न झाल्यामुळें त्यांचे तेथें फार हाल झाले. मद्रासेस ही बातमी समजली, पण त्या योगें तेथें जी घाबरपट्टी उडाली, तिजमुळें उद्योगाचें भान कोणासच राहिलें नाहीं. मद्रासच्या कौन्सिलचा मेंबर ऑर्म ह्यानेंच ह्या प्रसंगाचें वर्णन दिलें आहे. मेकाले ह्मणतो कीं, मद्रासेस 'कलकत्याहून वर्दी येऊन पोंचतांच अठ्ठेचाळीस तासांच्या आंत मदत पाठविण्याचा निश्चय झाला.' ह्या विधानास मेकालेजवळ काय पुरावा होता कोण जाणे? मद्रासच्या कौन्सिलांत दोन महिने वाटाघाट चालली, तेव्हां मदत पाठविण्याचा निश्चय ठरला.

'इकडे कलकत्ता हातांत पडल्यामुळें सुभेदार पुष्कळ चढून गेला. विजयाच्या भरांत पुढील बंदोबस्त न करितां, उलट स्वतःच्या घमेंडींत तो बेफिकीर राहिला. त्यानें कलकत्याच्या बंदोबस्तास माणिकचंद यास नेमिलें. खालीं फुल्टा येथें इंग्रज लोक जहाजांवर राहिले होते, त्यांस त्यानें हुसकून दिलें नाहीं, ह्मणून तेथूनच पुढील संग्रामाची तजवीज त्यांस सहज करतां आली. ह्या पळपुट्यांच्या अंगीं पराक्रम तो काय असणार! हे झकत दंड भरून शरण येतील, असा त्याचा समज होता. बरसात संपतांच आपण चंबूगवाळें उचलून मद्रासेस जाणार, अशी आफवा लोकांत उठवून तूर्त फुल्टा येथें इंग्रज निश्चित राहिले. फ्रेंच व डच मंडळी हा सगळा तमाशा पाहत स्वस्थ होती. त्यांस इंग्रजांच्या ह्या पळून जाण्यानें आनंदच झाला, कारण व्यापारांतील त्यांचा एक प्रतिस्पर्धी परभारें नाहींसा झाला.

जून ता. २४ रोजीं कलकत्ता सोडून सुभेदार वर हुगळीस गेला. तेथें डच लोकांपासून ४॥ लाख व फ्रेंचांकडून ३॥ लाख रुपये त्यानें किल्ले बांधल्याबद्दल दंड ह्मणून घेतले. ह्या पलीकडे त्यांसही घालवून देण्याच्या भरीस तो पडला नाहीं. ता. ११ जुलई रोजीं तो परत मुर्शिदाबादेस येऊन पोंचला. तेथून वॅट्स् व कोलेट यांस त्यानें कैदेंतून सोडून दिलें, व ह्या व सर्व पराक्रमाची हकीकत त्यानें बादशहास लिहून कळविली. इतक्यांत त्याचा चुलत भाऊ शौकतजंग ह्यानें बंड केलें. राजमहाल येथें उभयतांची

लढाई होऊन शौकतजंग पडला ( ता. १६ ऑक्टोबर ). मुर्शिदाबादेस परत आल्यावर सुभेदारानें आपली दौलत मोजली, ती जडजवाहीर शिवाय करून ६८ कोट रुपये भरली, असें लिहिलेलें आहे.

ड्रेक व त्याचें आरमार ता. २६ जून रोजीं फुल्टा येथें दाखल झालें. तेथें त्यांस डच लोकांनीं अन्नसामुग्री वगैरे पुरविली, पण फ्रेंचांनीं कांहीं एक दिलें नाहीं. त्या लोकांस गलबतांवर उघड्या हवेंत ऊन व पाऊस खात निजावें लागे. फुल्टा येथें तापाची सांथ एकसारखी असते. तेणेंकरून त्यांस फारच त्रास झाला. अशा स्थितींत त्यांचें मनही शांत नव्हतें. झालेल्या प्रकाराचा दोष एकमेकांवर ढकलून एकमेकांचीं वर्में काढण्यांत ते दंग होते. अशा स्थितींत ते फुल्टा येथें कां पडून राहिले तें समजत नाहीं. हळू हळू त्यांस आजूबाजूच्या एतद्देशीय लोकांकडून धान्य वगैरे मिळूं लागलें. इतर ठिकाणची मंडळीही पळून येऊन फुल्टा येथें त्यांस मिळाली. पुढें त्यांनीं सुभेदाराच्या दरबारांतील प्रमुख मंडलीस एक पत्र लिहून तें वॅट्सच्या मार्फत त्याजकडे पाठविलें. ह्या पत्राचा उपयोग झाला नाहीं. फुल्टा येथें ड्रेकचा अधिकार इंग्रज मंडळी कोणीच कबूल करीनात. पहिले गव्हर्नर व कौन्सिलर्स तेच आपण आहों असें ड्रेक ह्मणे; पण तें कोणी मानीत नसे. ता. १३ जुलै रोजीं मॅनिंग्हॅम व लेबोम ह्या दोन गृहस्थांस त्यांनीं मद्रासेस पाठविलें, व तेथें कलकत्याची सर्व हकीकत कळवून पुढील विचार ठरविण्याची विनंति केली. मात्र विलायतेला ही हकीकत कळवूं नये असा त्यांचा बेत होता. हे गृहस्थ ता. १२ ऑगस्ट रोजीं विशाखापट्टण येथें आले. इकडे मद्रासेस ही बातमी अगोदरच पोंचून तेथून मेजर किल्पॅट्रिक दोनशें लोक घेऊन जहाजांतून फुल्टा येथें ता. ३१ जुलैला आला. पुढें ता. १३ ऑगस्ट पावेतों वॅट्स्, हॉल्वेल वगैरे कौन्सिलची सर्व मंडळी फुल्टा येथें येऊन मिळाली. तेव्हांच एकंदर काय प्रकार झाला त्याची खरी हकीकत कळून सर्व मंडळीची चांगली समजूत पडली. किल्पॅट्रिकच्या येण्यापासून विशेष फायदा झाला नाहीं. त्याजबरोबरचे व दुसरे बहुतेक लोक फुल्टा येथें तापानें आजारी पडले,

व एक गलबत दवाखान्याकरितांच राखून ठेवावें लागलें. सर्व मंडळी जमल्यावर कौन्सिलचा कारभार पूर्ववत् चालू झाला. त्यांनीं सुभेदारास गोड गोड पत्रें लिहून, आपण सूड घेण्याची तजवीज करीत आहों, ह्याचा त्यांनीं त्यास सुगावा लागूं दिला नाहीं. ता. २५ ऑक्टोबर रोजीं बलरामगढीचें ठाणें इंग्रजांनीं काबीज केलें व तेथेंच सर्व कारभार सुरू केला. हें ठाणें फुल्टापासून पुष्कळ खालीं बालासोरनजीक पूर्वकिनाऱ्यावर आहे. ह्या वेळीं वॉरन्हेस्टिंग्स् मुर्शिदाबादेस होता, तो तेथची सर्व हकीकत लिहून पाठवित असे. ता. १० ऑक्टोबर रोजी त्यास सुभेदारानें घालवून दिलें, तेव्हांपासून तिकडची बातमी बंद झाली. अशा स्थितींत पुढील तजवीज करण्यांत बरेच दिवस गेले. डिसेंबरांत विलायतेहून हुकूम येऊन पुढील सर्व कारभार व व्यवस्था करण्यासाठीं एक नवीन निवडक कमिटी नेमण्यांत आली, तींत ड्रेक, वॅट्स्, बेचर, मॅनिंग्हम व हॉल्वेल ह्यांस नेमलेलें होतें. ही समिति नेमल्यावर पूर्वीचें कौन्सिल बंद पडलें. बंगाल प्रांत जिंकून पुढील राज्यक्रांति तडीस नेण्याचें काम ह्या समितीनेंच केलेलें आहे. फॉरन डिपार्टमेंट ह्म० परराज्यसंबंधीं खातें ह्मणून हिंदुस्थान सरकारची एक शाखा आहे, ती पुढें ह्या सिलेक्टकमिटीचीच बनलेली आहे.

कासीमबाजारचें ठिकाण हातचें गेल्याची बातमी तारीख ३ ऑगस्ट रोजीं मद्रासेस कळली; तसेंच १७ ऑगस्ट रोजीं कलकत्ता पडल्याची बातमी आली. मद्रासेस अनुभविक सेनापति लॉरेन्स होता, पण त्याची प्रकृति फार अशक्त झाली होती. गव्हर्नर पिगट लढवय्या नव्हता. ॲड्मिरल, वॉट्सन आरमाराचा मुख्य होता, तो कंपनीचा नोकर नसून, इंग्लंडच्या राजाचें आरमार हिंदुस्थानांत होतें त्याचा मुख्य होता. पावसाळा असल्यामुळें मदत पाठविण्याची एकदम घाई करूं नये असें वॉट्सनचें व इतरांचें ह्मणणें पडलें. ता. १३ जुलईचीं पत्रें २९ ऑगस्ट रोजीं मद्रासेस आलीं, त्यांत दोन ऑफिसर्स कलकत्याहून मद्रासेस येत आहेत असें कळलें. ह्याच संधीत युरोपांत इंग्लंड व फ्रान्स ह्यांजमध्यें युद्ध सुरू होण्याच्या बेतांत होतें;


प्लासी प्रकरणाचा नकाशा
बक्सार
बंकीपुर
पाटणा
भा गी र थी
भागीरथी न.
मोंगीर
भागलपुर
राजमहाल
गौड
रौदसगड
गया
घेरिया
राजशाही
मुर्शिदाबाद
कासीमबाजार
पबना
हजारीबाग
प्लासी
दामोदर
नदी
बोलपुर
रवटवा
डाका
पुरुलिया
बंकूरा
बरद्वान
हुगळी
चिनसूरा
चंद्रनगर
हौरा
कलकत्ता
मिदनापुर
फुल्टा
स्केल
20
40
60
80
100

व त्यासाठीं इंग्लंडाहून हिंदुस्थानांत मदत येत होती. ती आल्यावर पुढील विचार ठरवावा असा निश्चय झाला. ता. १९ सेप्टेंबर रोजीं विलायतेहून दोन गलबतें आलीं. नंतर कर्नल क्लाइव्ह व ॲड्मिरल वॉट्सन् ह्या दोघांस बंगाल्यांत पाठविण्याचा निश्चय झाला. क्लाइव्ह हा कंपनीचा नोकर असून इंग्रज सरकारच्या फौजेंत त्यास जागा होती, ह्मणून मद्रासेस कंपनीची व सरकारची अशा ज्या दोन फौजा होत्या, त्या दोघांचीं मुख्यपदें स्वीकारण्यास क्लाइव्ह योग्य होता. एकंदर फौज बरीच मोठी निघाली, तींत सहाशें युरोपियन होते. ता. १६ ऑक्टोबर सन १७५६ रोजीं वॉट्सनचीं जहाजें मद्रासेहून निघालीं. सुभेदाराशीं उगाच तंटा वाढवूं नका, गोडी करून व्यापार सुरू करा,' अशा आशयाचीं शिफारसपत्रें मद्रासकर इंग्रजांनीं निजाम व आर्कोटचा नबाब यांजपासून घेऊन क्लाइव्हबरोबर दिलीं होतीं. क्लाइव्ह निघून आला, तेव्हां सुभेदाराशीं लढण्यास पुरेशी फौज त्याजवळ होती; आणि बंगाल प्रांतांत कंपनीची कायमची सुव्यवस्था लावून देण्याचा त्याचा निश्चय झाला होता. ह्या कामांत यश आल्याशिवाय राहणार नाहीं अशी सर्वांची खात्री होती. लाली येऊन पोंचण्यापूर्वीच सर्व काम फत्ते करून क्लाइव्हनें परत यावें, अशी मद्रासकरांची इच्छा होती. ह्या मंडळीस हुबळी येथें येण्यास दीड महिना लागला. ता. १३ डिसेंबर रोजीं वॉट्सन, ड्रेक व हॉल्वेल ह्यांच्या गांठी पडल्या. त्याच दिवशीं क्लाइव्हनें सुभेदाराशीं पत्रव्यवहार सुरू केला, त्यांत त्यास युद्धास पाचारण करण्याचाच इंग्रजांचा आशय दिसला. वॉट्सन व क्लाइव्ह ह्यांनीं त्यास लिहिलेलीं पत्रें बरींच धमकीचीं होतीं. पण त्यांचा जबाब आला नाहीं. गलबतें नदींतून वर जाण्याचा मार्ग दाखविण्यास वाटाड्ये (pilots) मिळेनात. पुष्कळ लोक आजारी होते व कांहींना हींवताप येऊं लागला होता. ते थोडेसे वर गेले व अचूक नबाबाच्या फौजेपासून दोन मैलांच्या टप्प्यांत नकळत आले. तेथें उभयतांची एक चकमक उडाली. तींत दोघांचेंही बरेंच नुकसान झालें. कलकत्त्यास सुभेदाराचा अधिकारी माणिकचंद होता, तो बंदुकीचा आवाज ऐकतांच मुर्शिदाबादेस पळून गेला. पुढें ता. २ जानेवारी रोजीं कलकत्त्याचा

किल्ला फोर्ट विल्यम् विशेष आयास न पडतां इंग्रजांच्या हातांत आला. ता. २ जानेवारी रोजीं वॉट्सननें स्वतः किल्ला स्वाधीन करून घेऊन, तो ड्रेक व कौन्सिल ह्यांच्या ताब्यांत दिला. ह्या वेळीं इंग्रजांकडील मंडळींत नानातऱ्हेचीं भांडणें व अंतस्थ कलह चालू होते. क्लाइव्ह हा सर्वांसच अप्रिय झाला होता. हॉल्वेलचें व त्याचें फारच वांकडें आलें. वॉट्सन राजाचा नोकर व क्लाइव्ह कंपनीचा नोकर असल्यामुळें उभयतांत चुरस लागली होती.

कलकत्त्याचें ठाणें इंग्रजांचे ताब्यांत आलें, तेव्हां तेथील सर्व मोठमोठ्या इमारती व मजबुदीच्या जागा पडून गेल्या होत्या. घरांतलें सामान, खिडक्या, दरवाजे वगैरे काढून, सुभेदाराच्या लोकांनीं जळणास वापरिलें होतें. एतद्देशीय लोकांच्या वस्तीचा भाग तर इंग्रज व सुभेदार ह्या दोघांनींही जाळला होता; व बहुतेक घरें लटून फस्त केलीं होतीं. तथापि इंग्रज जे फुल्टा येथें हाल काढीत होते, त्यापेक्षां कलकत्ता त्यांस पुष्कळ आरामाचा वाटला; व एक महिन्याच्या आंत सर्वांनीं तेथें आपली व्यवस्था लावून घेतली. धनधान्याची समृद्धि असल्यामुळें पुनः सर्वांची पूर्ववत् चंगळ चालू झाली. मात्र सुभेदाराशीं झालेल्या चकमकींत कंपनीचें नुकसान झालें, त्याप्रमाणें प्रत्येक इसमाचें थोडें बहुत खासगी नुकसानही झालें, तें त्याजकडून भरून काढण्यासाठीं प्रत्येकाचा हट्ट चालू होता. या हट्टामुळेंच पुढें मीरजाफराकडून प्रत्येकानें वाटेल तसा पैसा उपटण्याचा क्रम सुरू केला.

ता. ३ जानेवारीस किल्ला इंग्रजांचे हातीं आला; व लगेच त्यांनीं सुभेदाराशीं युद्ध सुरू केल्याचे जाहीरनामे काढिले. ह्या जाहीरनाम्यांत सुभेदाराच्या आगळिकीचें वर्णन असून, जे कोणी त्यास सोडून आपणांस येऊन मिळतील, त्यांचें आपण संरक्षण करूं, असें कलकत्तेकरांनीं एतद्देशीयांस अभिवचन दिलें. पुढें ते आपली मजबुदी करण्यास लागले; आणि नदींतून लढाई करीत वर जाऊन, सुभेदाराचें हुगळी येथील ठाणें काबीज करण्यासाठीं, ता. ८ जानेवारीस इंग्रज फौज निघाली, तिनें हुगळीचा किल्ला घेतला. जातां येतां नदीवरील व अंतःप्रदेशांतील अनेक ठिकाणें त्यांनीं जाळून लुटून फस्त केलीं.

त्यांत त्यांनीं डच लोकांच्या सुद्धां वखारी लुटल्या. ता. १९ रोजीं सुभेदाराचे सर्व किल्ले व धान्याचे सांठे जाळून इंग्रज फौज परत कलकत्त्यास आली. येणेंकरून पूर्वीचे पळपुटे इंग्रज ते हे नव्हत, अशी लोकांची खात्री होऊन, विशेषतः गलबतांवरील भयंकर तोफांची मोठीच दहशत सर्वांना बसली. इंग्रजांचे एतद्देशीय शिपाई सुद्धां आपल्या इंग्रज दोस्तांच्या बरोबरीनें पराक्रम गाजवीत होते, आणि क्लाइव्हची सर्व भिस्त त्यांजवरच होती.

सुभेदारास ह्या बातम्या कळतांच तो मुर्शिदाबाद सोडून खालीं आला. त्याची फौज तादृश त्याच्या कह्यांत नव्हती. ह्मणून फ्रेंच व डच ह्यांजशीं स्नेह जोडण्याकरितां त्यानें अंतस्थ कारस्थान चालविलें. क्लाइव्हशीं सुद्धां तह करण्याच्या मिषानें त्यानें पत्रव्यवहार सुरू केला. ह्या कामासाठीं फ्रेंचांचे दोन वकील कलकत्त्यास कौन्सिलकडे आले. ( १ ) आपलें सर्व नुकसान भरून मिळावें, ( २ ) बंगाल प्रांतांत इंग्रजांचे सर्व व्यवहार पूर्वीप्रमाणें चालू द्यावे. ( ३ ) त्यांनीं मर्जीप्रमाणें आपल्या वसाहतींची मजबुदी करावी आणि ( ४ ) कलकत्त्यास एक स्वतःची टांकसाळ घालण्याची इंग्रजांस परवानगी असावी, अशा प्रकारच्या तहाच्या अटी इंग्रज कौन्सिलनें फ्रेंच वाकिलांस कळविल्या. ह्या अटी इतक्या कडक होत्या, कीं जणूं काय इंग्रजांनींच सुभेदाराचा पराभव केला होता, असें त्यांवरून दिसलें. तथापि पहिल्या तीन त्यानें कबूल केल्या. चवथी टांकसाळीची अट आपल्या अधिकारांतली नाहीं, तिला बादशहाची परवानगी पाहिजे, असें त्यानें कळविलें. तथापि कांहींना कांहीं सबब काढून क्लाइव्हनें तहाचें बोलणें लांबणीवर टाकिलें. त्यास लढण्याचीच विशेष ईर्ष्या असून तह नको होता. इकडे सिराजुद्दौलाही चिडून गेला होता. पुनः एकवार इंग्रजांचा सडकून समाचार घ्यावा, ह्या उद्देशानें तो फेब्रुवारीच्या आरंभीं कलकत्त्यावर चालून आला, व उमिचंदाच्या बागेंत तळ देऊन राहिला. वाटेंत हुगळीहून त्यानें खालील पत्र इंग्रजांस लिहिलें. ' तुह्मीं हुगळी शहर काबीज करून तें लुटलें आहे; व आमच्या प्रजेशीं लढाई करून व्यापाराच्या अटी मोडल्या आहेत

सबब आह्मी मुर्शिदाबादेहून हुगळी येथें आलों असून, आतां नदी उतरून तुमच्या छावणीवर हल्ला करणार आहों. पण त्यापूर्वी सलोख्याचें बोलणें करून आपला व्यापार पूर्ववत् चालू करावयाचा असेल, तर बोलणें करण्यासाठीं वकील पाठवून द्यावे.' क्लाइव्हच्या मनांत तह करावयाचा नव्हता. तरी पण इंग्रज वकील तहाचें बोलणें करण्यास आले; परंतु दोघांच्याही मनांत लढण्याची उत्सुकता असल्यामुळें, तह न होतां, ता. ५ फेब्रुवारी स. १७५७ रोजीं क्लाइव्ह व सुभेदार यांची एक निकराची लढाई झाली. तींत उभयपक्षांकडील पुष्कळ लोक पडले. वास्तविक इतका रक्तपात पुढें प्लासीच्या लढाईंत सुद्धां झाला नाहीं. ही लढाई झाल्यावर उभयपक्षांचा तह ठरून, कराराचे रोखे सहीशिक्यानिशीं एकमेकांनीं एकमेकांस करून दिले, (ता. ९ फेब्रुवारी, स. १७५७). त्यांत वर सांगितलेल्या इंग्रजांच्या सर्व मागण्या सिराजुद्दौल्यानें कबूल केल्या. ह्यास अलीनगरचा[1] तह ह्मणतात.

वास्तविक तंटा येथेंच मिटला पाहिजे होता. पण इंग्रजांच्या बाजूस अंतर्वैमनस्य अतिशय असल्यामुळें प्रकरण मिटलें नाहीं. सुभेदारानें इंग्रजांचें नुकसान भरून द्यावें असें एक कलम होतें. त्यांत लोकांच्या खासगी नुकसानीचा उल्लेख नव्हता. इंग्रजांची धनतृष्णा अनिवार असल्यामुळें व प्रत्येकास आपलीच पिशवी भरण्याची घाई झाल्यामुळें, तहाच्या अटी बरोबर पाळाव्या, असें इंग्रजांच्या मनांत मुळींच नव्हतें. त्यांतून प्रत्यक्ष क्लाइव्हच्या महत्वाकांक्षेस तर मर्यादाच नव्हती. त्याचें इतर सर्वांशीं वांकडें असल्यामुळें केवळ स्वच्छंदानें वाटेल तें करण्यास तो उद्युक्त झाला. ह्या वेळचीं त्यानें आपल्या बापास लिहिलेलीं पत्रें आहेत, तीं वाचलीं ह्मणजे, त्याच्या महत्वाकांक्षेची व हेतूंची खात्री पटते.

---

# प्रकरण एकविसावें.

## प्लासी व बंगालचा ग्रास.

### सन १७५७-१७६०.

१. चंद्रनगरचा पाडाव, (मार्च १७५७). २. सुभेदारास पदच्युत करण्याचा व्यूह. ३. प्लासीची लढाई (२३ जून, १७५७). ४. प्लासी व इंग्रजांच्या उद्योगाची चर्चा. ५. मीरजाफराचा उद्वेग.

**१. चंद्रनगरचा पाडाव** ( मार्च, १७५७ ).—बंगाल्यांतील कामगिरी आटपली, तेव्हां आतां क्लाइव्हनें परत आलें पाहिजे होतें. पण इंग्रज फ्रेंचांचें युद्ध सुरू झाल्यानें चंद्रनगराहून फ्रेंचांचा उठाव न केल्यास ते मागें काय घोटाळा करतील ह्याचा नेम नव्हता. तेणेंकरून झालेला खटाटोप फुकट गेला असता. वर सांगितल्याप्रमाणें सुभेदारांशीं तह झाला, तरी तो फार वेळ टिकेल असा क्लाइव्ह यास भरंवसा नव्हता. शिवाय सुभेदाराच्या एकंदर परिस्थितीचा क्लाइव्ह ह्यास जो अनुभव आला त्यावरून, थोडासा प्रयत्न केला असतां, बंगाल प्रांत समग्र आपल्या कबजांत येईल, अशी क्लाइव्हची अटकळ झाली. ह्मणून फ्रेंचांशीं युद्ध सुरू झाल्याची बातमी आली होती तरी, व मद्रासेस मुळींच फौज नाहीं हें माहीत असतांही, हिय्या करून बंगाल्यांतच राहण्याचा क्लाइव्हनें निश्चय केला. बंगाल्यांत राहूनच त्यास चांगलें काम करतां आलें. सूर्त बंगाल्यांतील फ्रेंचांचें ठाणें चंद्रनगर काबीज करण्याचा विचार त्याच्या डोक्यांत आला. वास्तविक सुभेदाराशीं चाललेल्या भांडणांत फ्रेंचांनीं इंग्रजांविरुद्ध कांहीं एक कृत्य केलें नव्हतें. उलट त्यांचा इंग्रजांस उपयोगच घडला होता. स. १७४१त डुप्ले गेल्यापासून चंद्रनगरची भरभराट कमी होऊं लागली. स. १७५६त चंद्रनगर येथें रेनॉल्ट ह्मणून फ्रेंचांचा मुख्य कारभारी होता. त्याजपाशीं फौज फारशी नव्हती; १५० युरोपियन व ३०० एतद्देशीय एवढीच होती. ह्मणून एका बाजूस इंग्रज व दुसऱ्या बाजूस सुभेदार ह्यांच्याशीं कसाबसा स्नेह राखून रेनॉल्ट आपला बचाव करीत होता. सिराजुद्दौल्यानें कलकत्यावर

स्वारी केली, त्या वेळां इंग्रजांनीं फ्रेंचांची मदत मागितली, ती त्यांनीं दिली नाहीं. तथापि इंग्रजांस चंद्रनगर येथें आश्रय देण्याचें रेनॉल्टनें कबूल केलें होतें. त्यानें सुभेदारास मात्र मदत केली नाहीं. इतक्यांत युरोपांत इंग्रजफ्रेंचांचें युद्ध सुरू झालें अशी सुरतेकडून स. १७५६च्या डिसेंबरांत कलकत्यास बातमी आली. रेनॉल्टची फौज थोडी होती, पण ती व्यवस्थित असून चंद्रनगरचा तट चांगला मजबूद होता. तथापि इंग्रजांशीं स्नेह करण्याचाच विचार त्यानें ठरविला. त्यास क्लाइव्हनें प्रथम कबुली दिली. पुढें जानेवारी स. १७५७च्या आरंभीं क्लाइव्ह व वॉट्सन हे कलकत्ता सोडून वर हुगळी येथें आले तेथें त्यांस फ्रेंच वकील भेटले. तहाची बोलाचाली झाली, पण निष्पन्न कांहीं झालें नाहीं. दोघांसही ऐकमेकांचा चांगला वचक होता. सुभेदाराशीं झालेल्या तहांत इंग्रजांचे जे दोस्त किंवा शत्रु असतील तेच त्याचेही दोस्त किंवा शत्रु असावे असें एक कलम होतें. तह संपवून सुभेदार कलकत्याहून परत गेला, तेव्हां चंद्रनगरच्या फ्रेंचांशीं सलोखा करून व इंग्रजांस दिलेल्या सवलती फ्रेंचांस देऊन सिराजुद्दौला पुढें राजधानीस गेला. ह्या प्रसंगीं त्याचा व फ्रेंचांचा गुप्त सलोखा झाला असें इंग्रजांस वाटून, त्यांच्या मनांत वैमनस्य आल्यामुळें, इंग्रजफ्रेंचांचा स्नेह होणें दुरापास्त झालें. सुभेदाराशीं इंग्रजांचा तह झाला, तेव्हांपासून इंग्रजांनीं आपला एक वकील मि. वॅट्स् ह्यास त्याच्या दरबारीं ठेवून दिलें. ह्या वॅट्स्‌बरोबर उमिचंदही इंग्रजांचे तर्फे तेथें राहत असून, तोच आंतील सर्व कारस्थानांची वर्दी इंग्रजांस देत असे. तसेंच फ्रेंचांचा एक गृहस्थ जीन लॉ* ह्मणून मुर्शिदाबादेस फ्रेंचांचे तर्फे वकील होता. इंग्रजफ्रेंचांचा तह ठरेना, व त्यांचें युद्ध होणार हें निश्चित झाल्याबरोबर, फ्रेंचांस मदत करण्याकरितां सुभेदारानें आपली फौज पाठविली. ह्यामुळें इंग्रजांस फार राग आला. ह्या वेळची एकूणएक पक्षांच्या मनाची स्थिति अशी कांहीं घोटाळयाची झालेली होती, कीं त्यांतून खरा प्रकार निवडून काढणें कठीण पडतें. जो तो आपला मतलब कसा साधेल हें पाहत होता, व पुढें कांहीं तरी

---

* वर पृष्ठ ४४९ टीप पहा.

भयंकर प्रकार घडणार, प्रस्तुतची प्रक्षुब्ध संशयग्रस्त स्थिति फार दिवस टिकणें शक्य नाहीं, हें प्रत्येक असामी जाणून होता. सुभेदार तर अगदींच कचाट्यांत सांपडला होता. तिकडून बादशहा बंगाल्यावर चालून येणार अशी खबर लागल्यामुळें सुभेदार पाटणास जाण्यास निघाला, आणि आपल्या मदतीसाठीं क्लाइव्ह ह्यास त्यानें फौज घेऊन बोलाविलें. क्लाइव्हला हेंच पाहिजे होतें. तो सुभेदाराच्या मदतीस ह्मणून निघाला व पुढें पत्र पाठवून त्यानें असेंही कळविलें, कीं ' आपण दोघे पाटणास गेल्यावर पाठीमागें फ्रेंचांसारखा शत्रु कायम ठेवून पुढें जाणें चांगलें नाहीं, ह्मणून प्रथम फ्रेंचांचा चांगला बंदोबस्त करून मी पुढें येतों. ' ह्याच संधीस इंग्रजांच्या मदतीस विलायतेहून बरीच नवीन फौज आली, व कितीं संकटें आलीं तरी निभाव लागण्याइतकी इंग्रजांची तयारी झाली.

क्लाइव्हच्या धाडसाविषयीं सर्वत्र ख्याति होती. तरी एकादा कठीण प्रसंग येऊन ठेपला, कीं त्याच्या मनाची अत्यंत तारांबळ उडे. त्याच्या आयुष्यांतील सर्व मोठे प्रसंग अशा धरसोडीनें पार पडले आहेत. ऐन आणीबाणीच्या प्रसंगीं त्यानें होऊन स्वतःच्या हिंमतीनें मनाचा निश्चय करून पराक्रम गाजविला असें नाहीं. इंग्रजांची बहुतेक फौज बंगाल्यांत आल्यामुळें, ह्या वेळेस जर फ्रेंच योद्धा बुसी आपली फौज घेऊन निजामाच्या दरबारांतून मद्रासेवर चालून आला असता, तर मद्रासचा सर्व मुलूख फ्रेंचांचे हातांत पडला असता, अशी क्लाइव्हची सुद्धां खात्री होती. तथापि ता. २४ मार्चला क्लाइव्ह फौजेसह चंद्रनगरावर आला. सुभेदाराकडून फ्रेंचांस मदत आली नाहीं. उलट आजूबाजूचे त्याचे कामगार इंग्रजांसच मिळाले. पुढें नदींतून वॉट्सनचीं जहाजें चंद्रनगरकडे आलीं, त्यांस एका फितुर झालेल्या फ्रेंचानें बंदरांत येण्याचा मार्ग दाखविला. त्या योगानें ता. २३ मार्च रोजीं चंद्रनगर इंग्रजांच्या हवालीं झालें. वॉट्सनचीं जहाजें आलीं नसतीं तर क्लाइव्हचा संपूर्ण नाशच झाला असता. तरी फ्रेंच लोक जितके लढाईंत पडले, तितकेच इंग्रजांचेही पडले. रेनॉल्ट सुद्धां सर्व लढाऊ फ्रेंचांस इंग्रजांनीं कलकत्यास नेऊन कैदेंत ठेविलें; व बाकीच्यांस सोडून दिलें.

अलीनगरच्या तहाअन्वयें फ्रेंचांशीं अशा प्रकारें युद्ध करण्याची इंग्रजांस मनाई होती. सुभेदारानें इंग्रजांस बजावून सांगितलें, 'कीं आमच्या मुलुखांत असा युद्धप्रकार बिलकुल खपावयाचा नाहीं. तुम्ही बऱ्या बोलानें फ्रेंचांशीं तह करून कायमचा सलोखा करा.' पण वॉट्सन हें म्हणणें मुळींच जुमानीना. त्यानें चंद्रनगरावर स्वारी केली. त्यास अडविण्याकरितां नंदकुमार सुभेदाराची फौज घेऊन आला. म्हणजे फ्रेंचांस मदत करावी असा त्यास हुकूम होता. पण हुकुमाप्रमाणें न वागतां तो फौज घेऊन बाजूस गेला; आणि त्यानें चंद्रनगर काबीज करण्यास इंग्रजांस सवड दिली. हें काम लांचानें झालें. क्लाइव्ह म्हणतो, 'कलकत्याचा धनवान व्यापारी उमिचंद ह्याचे कंपनीवर कायमचे उपकार आहेत. हुगळीचा फौजदार दिवाण नंदकुमार ह्याची आपणास मदत झाली, ती उमिचंदामुळें. उमिचंदाच्या मसलतीनें नंदकुमार जर आपली फौज घेऊन बाजूस सरला नसता, तर चंद्रनगर आपल्या हातीं आलें नसतें.' ह्या उमिचंदाचे उपकार पुढें क्लाइव्हनें व नंदकुमाराचे वॉरन हेस्टिंग्सनें कसे फेडले हें दिसून येईलच.

चंद्रनगर हातीं आल्यानें बंगाल्यांतील फ्रेंचांची सत्ता मोडली, व सुभेदाराचा समाचार घेणें इंग्रजांस सुलभ झालें. तशीच पुष्कळ युद्धसामुग्री आयती इंग्रजांस मिळाली. शिवाय बंगाल्यांत फ्रेंचांचा व्यापार चांगला चालत असल्यामुळें, तेथून पांदिचरीस जी पैशाची वगैरे मदत होत असे ती ह्यापुढें बंद झाली. तेणेंकरून पांदिचरीचें महत्त्व ढांसळलें. चंद्रनगर पडल्याची बातमी विलायतेस पोंचली, तेव्हां कंपनीच्या शेअरचा दर एकदम शेंकडा १२ टक्के चढला. पुढें क्लाइव्ह आपल्या फौजेसह चंद्रनगर येथेंच दोन महिने तळ देऊन राहिला.

**२. सुभेदारास पदच्युत करण्याचा व्यूह (मे, १७५७).**—चंद्रनगर पडल्यामुळें सिराजुद्दौल्यास अतिशय धास्ती पडली. क्लाइव्ह एकदम मुर्शिदाबादेवर चालून येतो कीं काय, असें त्यास वाटलें. नाना प्रकारचीं पत्रें लिहून तो क्लाइव्हची समजूत करूं लागला 'बादशहाची फौज परत

गेली आहे, तेव्हां आतां आमच्या मदतीस आपण इकडे येण्याचें कारण नाहीं,' असेंही त्यानें लिहून पाठविलें. क्लाइव्हही जशास तसे जबाब पाठवून आपल्याबद्दल नबाबाच्या मनांत संशय राहूं नये, अशा गोड गोड भुलथापा देऊन वेळ मारून नेत होता.

ता. ९ फेब्रुवारीचा तह झाल्यापासून इंग्रजांच्या मागण्या एकसारख्या वाढत चालल्या होत्या. तहाचा अर्थ भलताच करून ते सुभेदारास अगदीं ग्रासून टाकूं लागले. नुसता तहाचा अर्थ वाटेल तसा करून ते एतद्देशीय अधिकाऱ्यांस शिक्षा करूं लागले. रयतेचें जें कर्ज इंग्रजांनीं देणें होतें, तें ते देईनात. इंग्रज लोकांची भेट सुभेदारानें नजराणा दिल्याशिवाय व विलंब लावल्याशिवाय घ्यावी, कलकत्याच्या खालीं त्यानें आपली फौज आणूं नये, इत्यादि नाना प्रकारच्या मागण्या इंग्रजांनीं केल्या. त्यांचा एजंट वॅट्स् हा मोठा धूर्त व स्वार्थसाधु होता. अशा प्रकारच्या भलभलत्याच मागण्या प्रत्यक्ष वॉट्सन ह्यासही पसंत नव्हत्या. पण सगळीं सूत्रें एकटा क्लाइव्ह हालवीत होता. रिकामें बसण्याचा कंटाळा आल्यामुळें कांहीं तरी कुरापत काढून उतावळेपणानें सर्वच स्वाहा करण्याच्या विचारांत तो मग्न झाला. सुभेदाराच्या राज्यांत ठिकठिकाणीं फ्रेंचांच्या वखारी होत्या, त्या सर्व जप्त करून आपणांस द्याव्या, अशी क्लाइव्हनें मागणी केली. सुभेदार ती कबूल करीना. फ्रेंच वखारी नाहींशा केल्यापासून बादशहाच्या वसुलाचें नुकसान होतें, अशी योग्य सबब सुभेदारानें त्यास परत कळविली. ह्या प्रसंगीं खुद्द सिराजच्या दरबारांत वॅट्स् आणि जीन लॉ ह्या दोन राष्ट्रांच्या वकिलांत जबरदस्त झटापट चालू झाली. वाटेल त्या रीतीनें दरबारच्या लोकांस ते आपापल्या पक्षाकडे ओढूं लागले. हुगळी येथें नंदकुमार नांवाचा फौजदार मोठा वजनदार गृहस्थ होता, तो व उमिचंद हे इंग्रजांच्या पक्षांत होते. वॅट्स् व लॉ ह्यांची झटापट विकोपास जाऊन जीन लॉ यास नबाबानें दरबारांतून काढून दिलें. तेव्हां तो व त्याचे लोक पाटणा येथें रामनारायणाचे आश्रयास गेले. पण तेथून आयर कूटनें त्यांस हुसकून दिल्यावर जीन लॉ प्रथम अयोध्येच्या वजिराकडे गेला. व पुढें शहाआलमजवळ नोकरीस राहिला. स. १७५९त पाटणा येथें बादश-

ह्याचा पराभव झाल्यावर जीन लॉ इंग्रजांचे हातांत सांपडला व स. १७६२त परत स्वदेशीं गेला. पुढें तो पांदिचरींचा गव्हर्नर होऊन परत आला होता. त्यानें आपल्या आठवणींचें पुस्तक लिहिलेलें आहे.

मुर्शिदाबादेहून निघतांना लॉनें सुभेदारास बजावलें, कीं 'सावध राहा, तुमची माझी भेट होणें आतां शक्य नाहीं' सांगण्याचा मतलब कीं सुभेदाराची लवकरच उचलबांगडी होण्याचा योग आला. पाटणाचा कारभारी रामनारायण ह्यानें लॉची तजवीज बरी लावून दिली. लॉ निघून गेल्यावर मुर्शिदाबादेस सर्वच बजबज सुरू झाली. लोक आपापल्या हेतुनुरूप सिराजुद्दौल्यास नानाप्रकारच्या बातम्या येऊन सांगत, त्यायोगें उतावळ्या स्वभावामुळें तो अगदींच गोंधळून गेला. लोक भलभलते तर्क करूं लागले. पुढें कांहीं तरी भयंकर प्रकार होणार अशी प्रत्येकाची मनोदेवता बोलूं लागली.

जगत्‌शेटीचें व इंग्रजांचें बरें नव्हते. कारण हे शेट फ्रेंचांशीं मिळून होते. पैसेवाले असल्यामुळें सुभेदार त्यांजबद्दल साशंक होता, व त्यांसही त्याची भीतिच होती. तेव्हां ते इंग्रजांच्या पक्षांत शिरण्याची अपेक्षा करूं लागले. सुभेदाराकडे जबर मागण्या करण्याची ते इंग्रजांस भर देत; व इकडे त्या मागण्या धुडकावून देण्याची सल्ला ते सुभेदारास देत. सुभेदारानें नुकसानी दाखल इंग्रजांस तीस लाख रुपये दिले. पण तेवढ्यानें इंग्रजांची तृप्ति होईना. त्याशिवाय तहाच्या कलमांतील कित्येक बाबतींची निकड क्लाइव्हनें त्यास लाविली. सर्व बंगाल प्रांतांत कंपनीच्या व्यापाराचे परवाने, व आणखी पुष्कळ गोष्टी त्यानें दरडावून मागितल्या. लवकरच बुसी आपल्या मदतीस येईल, ह्या आशेवर सुभेदारानें क्लाइव्हच्या मागण्यांकडे लक्ष दिलें नाहीं. ता. २० एप्रिल रोजीं त्यानें वॅट्स् ह्यास दरबारांतून घालवून दिलें. तेव्हां दरबारांतील वजनदार गृहस्थांच्या सल्ल्यानें वॅट्स् हा सिराजुद्दौल्यास पदच्युत करण्याच्या विचारास लागला. राज्यक्रान्ति घडवून आणणें शक्य असून जरूर आहे, असें त्यानें क्लाइव्ह यास लिहून पाठविलें; व आपल्या फौजेची कोणत्या वेळेस जरूर लागेल त्याचा नेम नाहीं, फौज तयार ठेवावी,' असें लिहिलें.

चंद्रनगर पडल्यावरही सुभेदाराने फ्रेंचांशीं संधान ठेविलें होतें. त्याच्या मदतीस बुसी येत आहे अशी वदंता आली होती. तसेंच लाली मद्रासेवर येणार होता, तेव्हां मद्रासेस जावें कीं इकडेच राहवें, अशा पंचायतींत क्लाइव्ह असतां, सुभेदारास पदच्युत करण्याचा घाट त्याच्या सरदारांनीं केलेला क्लाइव्ह यास कळला, आणि तोच ताबडतोब घडवून आणण्याची त्यानें तजवीज चालविली. इकडे सिराजुद्दौला लंगडा पडला. त्यास अडचणी पुष्कळ होत्या. हाताखालचे अधिकारी फितुर होऊन त्यास पदच्युत करण्यास उद्युक्त झाले होते. तेव्हां फ्रेंचांची मदत घेणें किंवा इंग्रजांशीं समेट करणें, ह्यांशिवाय अन्य उपाय त्यास राहिला नव्हता. अशा स्थितींत एकंदर बनाव असा घडून आला, कीं त्यानें फ्रेंचांस सोडून इंग्रजांशीं समेट केला. तो एकटा व असहाय होता, तरी त्याची फौज चांगली होती. पण फौजेच्या अधिकाऱ्यांनीं फितुरी करून इंग्रजांच्या मदतीनें मीरजाफर ह्यास सुभेगिरीवर बसविण्याचा उद्योग चालविला. मीरजाफरनें इंग्रजांशीं गुप्त तह केला. ह्या तहाची वार्ता कोणास सुद्धां नव्हती. सर्व व्यूह क्लाइव्ह व वॅट्स् ह्यांनीं रचिला. क्लाइव्हनें कलकत्यास व वॅट्स्‌नें मुर्शिदाबादेस राहून सर्व कारस्थानें केलीं. पण मुर्शिदाबाद येथें वॅट्स्‌च्या हालचालींवर सुभेदारच्या हेरांची टेहेळणी असल्यामुळें, कलकत्याचा धनाढ्य व वजनदार व्यापारी उमिचंद ह्याची त्यानें मदत घेतली. प्रसंग पडला ह्मणजे तह व शपथा सर्व गुंडाळून ठेवण्यांत येतात. तदनुसार अलीनगरच्या तहानंतर तीन महिन्यांनींच इंग्रजांनीं सुभेदारास गादीवरून काढण्याचा घाट घातला. पण हा बेत उघडपणें तडीस जाणें शक्य नसल्यामुळें क्लाइव्हनें गोड गोड पत्रें लिहून त्यास निर्धास्त ठेविलें, कपटाचा संशय येऊं दिला नाहीं. असें गोड पत्र ज्या टपालवाल्यानें नेलें त्याच्याच जवळ वॅट्‌सूला क्लाइव्हचें पत्र होतें त्यांत खालील हजकूर होता. ‘ मीरजाफराला सांगा कीं भिऊं नका. पांच हजार शूर फौज घेऊन मी तुह्मांस येऊन भेटतों. मी रात्रीचा दिवस करून आल्याशिवाय राहत नाहीं व प्राण गेला तरी तुह्मांस सोडणार नाहीं. ’ ह्या प्रका-

राबद्दल व्हीलर* ह्मणतो, ' हे सर्व तह तरी, खरें म्हटलें म्हणजे, मोठ्या राज्यक्रान्तीच्या पूर्वी केलेले करार होत. इंग्रजांनीं पाहिजे तें मागावें अशी त्यांची शक्ति असून, होऊं घातलेला नवीन सुभेदार मीरजाफर वाटेल तें देण्यास तयार होता. नाहीं होय म्हणण्याची त्याची प्राज्ञा काय ? '

इकडे जगतशेट वगैरे मंडळींनीं मीरजाफर ह्यास सुभेगिरीवर स्थापण्याचा घाट रचिला. इंग्रज तह मोडून आपणावर चालून येण्याचा विचार करीत आहेत, अशा बातम्या सिराजुद्दौल्यास चहूंकडून येऊं लागल्या, तेव्हां मीर जाफरअलीखान सेनापति ह्यास त्यानें प्लासी येथें इंग्रजांवर शह ठेवण्यास पाठविलें. इंग्रजांनीं मीरजाफराचा पक्ष उचलिला. सिराजच्या मनांत तह पाळावयाचा नसून, तो फ्रेंच वगैरेंच्या मदतीनें तह मोडण्याची वाट पाहत आहे, व सर्व लोक त्यास कंटाळले असून राज्यक्रांति होणार हें जर निश्चित आहे, तर पुढें होणाऱ्या अधिकाऱ्याशीं प्रथमपासूनच संधान ठेवणें क्लाइव्ह यास अवश्य वाटलें. ह्याबद्दल त्यानें सिलेक्टकमिटीची समजूत केली, व कमिटीच्या परवानगीनें मीरजाफर ह्यास पत्र पाठवून त्याजला मदत करण्याच्या अटी लिहून पाठविल्या. मुर्शिदाबादेस उमिचंद व वॅट्स् हे ह्या कटांत सामील होते. मात्र वॅट्स्चा त्याजवर विश्वास नव्हता; आणि जगतशेट व उमिचंद ह्यांचें वांकडें असल्यामुळें, दोघेही आपापले काबे साधण्यास उत्सुक झाले होते. ह्या वेळीं प्रत्येक इसम लबाडीच्या काव्यांत इतकी कमाल करीत होता कीं, त्यांच्या पोटांतले हेतु बाहेर कळणें शक्य नाहीं; व ते समजून घेण्यांत अर्थही नाहीं. मीरजाफरास इंग्रजांनीं सुभेगिरी मिळवून दिल्यास त्यानें इंग्रजांचे उपकार कसे फेडावे, ह्याजबद्दलचा लेखी ठराव वॉट्सन्च्या मार्फत ठरत होता. उमिचंद हा सर्व प्रकार बाहेर फोडणार अशी भिति पडली. ठराव गुप्त ठेवण्याबद्दल उमिचंद तीस लाख रुपये मागूं लागला. अशा अडचणीस जुमानणारा क्लाइव्ह नव्हता. उमिचंदास सपशेल फसविण्याचा त्यानें निश्चय केला. ठराव लिहिण्याकरितां एका कोऱ्या कागदा-

* Wheeler's Early Records of British India.

वर मीरजाफराची सही घेऊन तो कागद वॅट्सनें कलकत्यास पाठविला; व त्यांत 'उमिचंदाबद्दल पाहिजे तें कलम घाला,' असें कळविलें. आपल्या कामास उमिचंद व्यत्यय आणितो हें क्लाइव्ह त्यास सहन न होऊन, त्यास अजिबात फसविण्याचा चमत्कारिक व्यूह क्लाइव्हनें रचिला. उमिचंदाच्या हातांत सर्वांची शेंडी असून, त्यानें हा गुप्त बेत सुभेदारास जाऊन कळविला असता, तर भयंकर परिणाम झाल्याशिवाय राहिला नसता. तेव्हां उमिचंदास गप्प बसवून अखेरीस त्याच्या तोंडास पानें पुसण्याची युक्ति क्लाइव्हनें काढिली. त्यानें एक पांढरा व एक तांबडा अशा दोन कागदांवर ते ठराव लिहिले. पैकीं उमिचंदास तीस लाख देण्याचें कलम तांबड्या कागदांत नमूद असून पांढऱ्यांत नव्हतें. पांढऱ्या कागदावरील ठराव खरा, आणि तांबड्या कागदावरील खोटा, अशी क्लाइव्हनें योजना केली. पांढऱ्या कागदावर सर्व इंग्रज अधिकाऱ्यांनीं सह्या केल्या. परंतु तांबड्या कागदावर ॲड्मिरल वाट्सन् सही व शिक्का करीना. तेव्हां क्लाइव्हच्या हुकुमानें ल्यूशिंग्टननें त्यावर वॉट्सन्‌ची सही बनावट केली. अशा रीतीनें तयार केलेला लाल कागद उमिचंदास दाखवून तूर्त त्याची समजूत करण्यांत आली. खोटा कागद तयार करणें आणि त्याजवर बनावट सही करविणें, हीं दोन घोर पातकें क्लाइव्हनें केलेलीं आहेत. त्याबद्दल पुढेंही त्यास कधीं पश्चाताप वाटला नाहीं. तो ह्मणतो, 'तसा प्रसंग आला, तर ही गोष्ट मी शंभरदां करीन.' पण हें समर्थन त्याच्या जातभाईस पसंत पडलें नाहीं. मिल्, मॅलेसन प्रभृति ग्रंथकारांनीं त्याच्या ह्या निंद्य वर्तनावर खरपूस टीका केली आहे. इंग्रजांच्या राज्याचा पाया अशा कपटप्रचुर राजनीतीवर रचिला गेला आहे, ह्याहून ज्यास्त टीका ह्या प्रकारावर करण्याची अवश्यकता दिसत नाहीं. उमिचंदाच्या मनांत इंग्रजांच्या खरेपणाविषयीं मोठा भरंवसा होता. सुभेदारास इंग्रजांच्या वागणुकीच्या वहीम आला असतां, उमिचंद त्यास ह्मणाला, 'मी आज चाळीस वर्षें इंग्रजांच्या आश्रयाखालीं राहिलों आहें. एवढ्या वेळांत त्यांनीं आपला शब्द मोडल्याचें एकही उदाहरण घडलेलें नाहीं. इंग्लंडांत एखाद्यावर खोटें बोलल्याचा अपराध सिद्ध झाला तर त्याची अप्रतिष्ठा करितात.' ह्याजबद्दल

सुभेदारापुढें उमिचंदानें ब्राह्मणाच्या पायांची शपथ घेतली. अशा प्रकारें समजूत झाल्यामुळें सुभेदार इंग्रजांच्या संबंधानें अगदीं निश्चित राहिला. फ्रेंच व इतर लोक इंग्रजांविषयीं नाना प्रकारच्या कंड्या पिकवीत असतां त्यानें मात्र तिकडे लक्ष दिलें नाहीं, आणि मीर जाफरास प्लासीहून परत बोलाविलें. मे महिन्यांत कटाची सर्व सिद्धता झाली.

मीरजाफर व इंग्रज ह्यांजमध्यें झालेल्या ठरावांतील कलमें. १ सिराजुद्दौल्यानें इंग्रजांस दिलेले सर्व हक्क व सवलती मीरजाफरानें कबूल करून इंग्रजांबरोबर हरएक प्रकारची दोस्ती ठेवावी. २ फ्रेंच लोकांस बंगाल प्रांतांतून घालवून देऊन त्यांची सर्व मालमत्ता इंग्रजांस द्यावी. नुकसानीबद्दल मीरजाफरानें कंपनीस १०० लाख, कलकत्याच्या युरोपियन रहिवाश्यांस ५० लाख, फौजेस पन्नास लाख, सिलेक्ट कमिटीस बारा लाख, हिंदु रहिवाश्यांस वीस लाख, आर्मिनियन व्यापाऱ्यांस सात लाख, उमिचंदास वीस लाख येणेंप्रमाणें रकमा द्याव्या. ३ कलकत्याच्या खंदकाबाहेर सर्व बाजूंनीं सहाशें यार्डांचा व कलकत्यापासून खालील किनाऱ्यापर्यंतचा एकंदर प्रदेश मीरजाफरानें कंपनीस द्यावा. ४ मीरजाफराच्या बचावासाठीं इंग्रजांची फौज राहील तेव्हां तिचा खर्च त्यानें द्यावा आणि सर्व शत्रूंपासून इंग्रजांनीं त्याचें संरक्षण करावें.

ह्याप्रमाणें मीरजाफराशीं गुप्त तह करण्यांत आला. त्यायोगें इंग्रजांचा पुष्कळच फायदा व्हावयाचा होता. ह्मणून ह्या तहाच्या सांगतेसाठीं एखाद्या तरी साक्षीची जरूर होती. साक्षीदाराच्या देखत कुराणावर हात ठेवून तहाची कबुली मीरजाफराकडून मिळवावी, अशी क्लाइव्हची वॅट्स् ह्यास ताकीद होती. मुर्शिदाबादेस ह्या तहाची कबुली घेण्यास काय काय अडचणी येतील हें क्लाइव्ह ह्यास ठाऊक नव्हतें. मीरजाफराविषयीं सुभेदारास संशय असल्यामुळें त्याच्या सर्व हालचालींवर त्याची सक्त नजर होती. वॅट्स्वरही तसाच पाहरा होता. एके दिवशीं वॅट्स् एका जनानी म्यान्यांत बसून मीरजाफराच्या जनानखान्यांत गेला. तेथें मीरजाफरानें करारावर स्वतः सही केली व 'जिवांत जीव आहे तोंपर्यंत हा करार मी पाळीन, ह्यास देव आणि पैगंबर साक्ष आहेत'

असें लिहून दिलें. पुढें शिकारीस जाण्याचें निमित्त करून ता. १२ जून रोजीं वॅट्स् मुर्शिदाबाद सोडून निघाला, तो ता. १४ रोजीं क्लाइव्ह यास येऊन मिळाला. उमिचंदही त्याच सुमारास कलकत्यास आला. वॅट्स् पळून गेल्याची बातमी सुभेदारास कळली, व प्रकरणाच्या मुळाशीं मीरजाफर आहे, अशी त्याची खात्री झाली. परंतु त्यानें मीरजाफरास एकदम नोकरीवरून दूर करण्याचें सोडून, उलट त्याची विनवणी करून आपणास संपूर्णपणें मदत करण्याचें त्याजपासून इमान घेतलें. भावी संकटांचा इशारा लॉ यानें अनेक प्रकारें सुभेदारास दिला होता. पण 'भवितव्यता बलीयसी' होऊन त्यानें विशेष खबरदारी घेतली नाहीं. मात्र इंग्रजांची लबाडी त्यास पूर्ण कळून आली. 'तुम्हीं तह मोडला आहे,' असा लेख त्यानें क्लाइव्ह व वॉट्सन् यांस लिहून पाठविला, व आपण ५० हजार फौज घेऊन प्लासी येथें गेला.

३. **प्लासीची लढाई.** ( ता. २३ जून, १७५७ ).—वरील गुप्त तह सहीशिक्क्यानिशीं तयार होऊन इंग्रजांच्या हातांत पडल्यावर क्लाइव्ह पुढील उद्योगास लागला. आरंभापासून अखेरपर्यंत त्याच्या मनाची धरसोड चालली होती. कोणाचाही त्यास भरंवसा येत नव्हता; आणि कायमचा निश्चय म्हणून त्यानें कधींच ठरविला नाहीं. मीरजाफरास मात्र तो खूब धीर देत होता. कलकत्त्यापासून प्लासीपावेतों शत्रूच्या मुलखांतून त्यास आपली फौज न्यावयाची होती. रस्त्यांत हुगळी, अग्रद्वीप, खटवा इतक्या ठिकाणीं सुभेदाराच्या फौजेचीं ठाणीं होतीं. त्या ठिकाणच्या अधिकाऱ्यांस उमिचंदामार्फत आपणाकडे वश करून घ्यावयाचें क्लाइव्हचे मनांत होतें; त्यांच्या बोलण्यांत खरेपणा किती आहे, याचा अदमास काढावयाचा होता. केव्हां कोठें विश्वासघात होईल याचा नेम नव्हता. प्रत्येक ठिकाणीं लटके हल्ले करून शत्रूस हूल दाखवावी लागत होती. प्रत्यक्ष मीरजाफराचा व त्याच्या साथीदारांचा सुद्धां क्लाइव्ह यास भरंवसा नव्हता. ह्या सर्व अडचणींतून निभावून प्लासीच्या रणभूमीवर त्यास जावयाचें होतें. बेत फसला तर एकही इसम परत येऊं शकावयाचा नाहीं हें तो जाणून होता. क्लाइव्हजवळ घोडेस्वार मुळींच

नव्हते. म्हणून बरद्वानच्या राजाकडून त्यानें स्वारांची एक टोळी मदतीस मागविली. शिवाय खटवा येथें त्यानें सगळया मंडळींची मुद्दाम सभा भरवून सल्ला घेतली. प्रश्न असा होता, कीं नबाबाच्या फौजेवर एकदम हल्ला करावा कीं पुढें काय प्रकार होतो तें पाहत स्तब्ध बसावें. अशा मसलतींत वयानें लहान असेल त्याचें मत प्रथम घेतात, व वयाच्या क्रमानें वृद्ध असेल त्याचें मत शेवटीं घेतात. क्लाइव्हनें आपलें मत प्रथम दिलें. एकदम हल्ला करून जाऊं नये, काय होतें तें पाहत येथेंच बसावें, असें त्यानें आपलें मत दिलें. दुसऱ्या अकरा अधिकाऱ्यांचें मत तसेंच पडलें. मेजर आयर कूट ह्याचें मत एकदम हल्ला करावा असें होतें. त्या मताचे आणखी पांच असामी होते. पण पुढें मीरजाफराकडून पत्रें आलीं, तेव्हां एकदम हल्ला करण्याचा क्लाइव्हचा निश्चय ठरला. क्लाइव्हच्या फौजेंत ६५० इंग्रज पायदळ व १५० तोफखान्याचे लोक होते, त्यांपैकीं ५० आरमारावरचे होते. शिवाय एकवीसशें एतद्देशीय पायदळ फौज होती, व थोडे पोर्तुगीझ होते. सर्व मिळून तीन हजार लोक होते. मीरजाफरास पांच हजार फौजेचें वचन क्लाइव्हनें दिलेलें होतें, पण वचनाइतकीसुद्धां त्याची फौज नव्हती. त्याचेजवळ फक्त ८ तोफा होत्या.

प्लासी गांव हुगळी नदीच्या पूर्वतीरावर आहे. तेथें एक विस्तीर्ण मैदान असून, त्याजवर पळसाचीं झाडें पुष्कळ असल्यामुळें त्यास 'पलाशी' हें नांव पडलें. ता. १३ जून रोजीं सुभेदारास जबाब पाठवून क्लाइव्ह आपल्या फौजेसह मुर्शिदाबादेकडे येण्यास निघाला. ता. १९ रोजीं त्यानें खटव्याचें ठिकाण काबीज केलें. ह्या मजबूद जागेचा क्लाइव्ह यास चांगला उपयोग झाला. त्या वेळीं पावसाळा सुरू होऊन फौजेचे हाल होत होते. मीरजाफराचा दम कोठपर्यंत चालतो ह्याजबद्दल क्लाइव्ह ह्यास कांहींच कल्पना नव्हती. ता. २२ रोजीं पहांटे क्लाइव्हची फौज खटवा सोडून निघाली, ती संध्याकाळीं प्लासीच्या राईंत आली. ह्या राईस लक्षबाग असें नांव होतें. ह्या राईंत आश्रयाची जागा असून तेथें सुभेदाराच्या तोफा इंग्रजांस लागण्याजोग्या नव्हत्या. चाळीस तोफा,

पंधरा हजार स्वार, व तीस हजार पायदळ एवढी फौज सुभेदाराची होती. प्लासी येथें आल्यावर मात्र आपल्यावर मोठा कठीण प्रसंग आलासें क्लाइव्ह यास वाटलें. रात्रभर चालून त्याचे लोक थकले होते. ता. २३ रोजीं सकाळीं त्याचा मुक्काम प्लासीच्या आंबराईत असतां सूर्योदयाबरोबर सुभेदाराची फौज त्या आंबराईवर येऊं लागली. त्या फौजेवर मुख्य अंमलदार सहा होते. पैकीं मीरमदन मोहनलाल, व कॅप्टिन सिन्फ्रे ( Sinfray ) हे धन्याच्या हुकुमा-प्रमाणें वर्तत होते. मीरजाफर, यारलतीफ, व रायदुर्लभ हे तिघे फितूर असून उगाच शोभेकरितां उभे होते. सर्वच फौज आंबराईवर आली असती, तर इंग्रजांचा एकही इसम जिवंत राहिला नसता. पहिल्या तिघांनीं निकराचा हल्ला केला. क्लाइव्हचा व उमिचंदाचा ह्या वेळचा एक संवाद एका मुसलमान इतिहासकारानें दिला आहे. क्लाइव्ह उमिचंदास ह्मणाला, ‘ आह्मांस तुह्मी खासें फसविलें ! तुह्मी ह्मणालां होतां, कीं सुभेदाराची फौज लढणार नाहीं असा बंदोबस्त केलेला आहे. मग हें काय ? आतां निभाव कसा लागणार ! ’ पन्नास तोफांचा इंग्रजांवर असा कांहीं जोराचा भडिमार सुरू झाला, कीं बचा-वासाठीं नदीच्या पात्रांत तिच्या उंच कांठाच्या आडोशास ते येऊन राहिले. जवळच एक शिकारीची झोंपडी होती तींत क्लाइव्ह बसला होता, तेथें त्यास रात्रीच्या श्रमानें झोंप लागली होती, असें ह्मणतात.

तिसऱ्या प्रहरीं मीरमदन गोळी लागून पडला. त्याबरोबर जवळच्या फितूर मंडळींनीं फौज परत बोलवा, व मुर्शिदाबादेस परत चला, अशी सल्ला सुभेदारास दिली. त्यानें लगेच तसा हुकूम सोडला. त्याबरोबर अव्यवस्था झाली व एका हल्ल्याबरोबर इंग्रजांचा अनायासेंच जय झाला. प्लासीच्या लढाईची गणना हिंदुस्थानच्या इतिहासांतील निकालाच्या लढायांत प्रमुखत्वानें होत आहे. लढाईंत सुभेदाराचे पांचशें लोक पडले, आणि इंग्रजांचे बावीस पडून पन्नास जखमी झाले. प्लासी येथें लढणें असें विशेष झालेंच नाहीं. क्लाइव्ह ह्मणतो, ‘ ह्या लढाईंत रक्तपात फार थोडा होण्याचें कारण, एक तर नदीच्या उंच कांठाचा आह्मांस आश्रय होता, व दुसरें, सुभेदाराची फौज मनापासून लढली नाहीं, ’

फौजेचा धन्यावर मुळीं विश्वासच नव्हता. मीरजाफर, रायदुर्लभ, व यारलतीफ मुळीं लढलेच नाहींत. ते मजा पाहत दूरउभे होते. त्यांनीं मनावर घेतलें असतें, तर त्यांपैकीं कोणत्याही एकट्यानें इंग्रजांचा खरपूस समाचार घेतला असता. शिवाय सिराजुद्दौला घाबरून एकाएकीं पळून गेला नसता, तरी काम भागलें असतें. सकाळपासूनच त्यास दुश्चिन्हें होत असून, त्याचा जीव ठिकाणावर नव्हता. आपली आतां धडगत नाहीं असें त्याच्या मनानें घेतलें. शांतपणानें दम धरून राहिला असता, तर त्याला भिण्याचें कारण नव्हतें. पण मीरमदन पडल्यावर त्याचें धैर्य सर्वथैव खचून गेलें. त्यानें लगेच मीरजाफरास बोलाविलें, व आपली पागडी काढून त्याच्या हातांत दिली; आणि मोठ्या काकुळतीनें म्हणाला ' माझा व ह्या दौलतीचा संभाळ करणें हें आतां सर्वस्वी तुझ्या हातीं आहे. ' ह्या शद्बांनीं मीरजाफरावर बराच परिणाम झाला. म्हणूनच तो उघडपणें इंग्रजांस न मिळतां बाजूस राहिला. मीरजाफर व रायदुर्लभ बाजूस राहिलेले पाहून, आतां आपली धडगत नाहीं असें समजून, सिराज उंटावर बसून पळून गेला. मुर्शिदाबादेस आल्यावर सिराजुदौला अगदींच भांबावून गेला; त्यास कोणीच विचारीना. जनानखान्यांतील बायांचे विलाप ऐकून त्याचें अंतःकरण विदीर्ण झालें. नेववेल तितका दागदागिना हत्तीवर भरून घेऊन, तो वेष बदलून आपली एक आवडती बायको व एक विश्वासू नोकर बरोबर घेऊन होडींत बसून पाटणाकडे गेला. तिकडे फ्रेंच गृहस्थ जीन लॉ आपणास भेटेल, अशी त्यास आशा होती. त्याची होडी रात्रंदिवस एक सारखी नव्वद मैल प्रवास करून सहाव्या दिवशीं राजमहाल येथें आली. तेथें कांठावर थोड्या विश्रांतीकरितां ते उतरले असतां, दानाशहा नांवाच्या फाकिरानें त्यास ओळखून, मीरजाफराचा भाऊ मीरदाऊद याच्या स्वाधीन त्यास केलें. लॉ मुर्शिदाबादेकडे येत होता त्यास वादळामुळें एक दोन तास उशीर लागला नसता, तर त्याची व सिराजची गांठ राजमहाल येथें पडली असती. मीरदाऊदनें त्यास पकडून, मुर्शिदाबादेस पाठविलें. एक वर्षापूर्वी त्या दानाशहा फकिराचे कान सिराजुदौल्यानें कापविले होते. ता. २ जुलई

रोजीं त्यास मीरजाफरापुढें आणिलें. त्या वेळचा देखावा अत्यंत हृदयद्रावक होता. आपला जीव जगविण्याबद्दल सिराजनें मीरजाफराची नाना प्रकारें विनवणी केली. पण मीरजाफराचा मुलगा मिरान मध्यें आडवा आला; आणि त्यानें त्यास एक रात्र आपल्या ताब्यांत मागून घेतलें. कशाकरितां तें सांगणें नकोच. त्याच रात्रीं सिराजचा खून झाला. दुसऱ्या दिवशीं त्याच्या शरिराचे तुकडे हत्तीवर घालून लोकांस दाखविण्यांत आले. दैवाचा खेळ विचित्र आहे !

लढाईच्या दुसऱ्या दिवशीं म्हणजे ता. २४ रोजीं सकाळीं क्लाइव्हनें मीरजाफराकडे जाऊन, त्यास सुभेदार ह्या नांवानें संबोधून त्याचें अभिनंदन केलें; आणि त्यास एकदम मुर्शिदाबादेस जाण्यास सांगितलें. त्याप्रमाणें त्याच दिवशीं निघून मीरजाफर संध्याकाळीं मुर्शिदाबादेस पोंचला. मनसूरगंज नामक वाड्यांत त्यानें आपला मुक्काम ठेविला. क्लाइव्हही लगेच निघाला. दुसऱ्या दिवशीं मैदापूर येथें त्यानें मुक्काम केला. तेथून त्यानें वॅट्स् ह्यास मीरजाफराकडे पाठवून, ठरल्याप्रमाणें सर्व लोकांच्या बक्षिसांच्या रकमा देण्याविषयीं मागणी केली. एकंदर रक्कम सुमारें दोन कोट वीस लक्ष होती. पण खजिन्यांत सगळा ऐवज दीड कोटीहून कमीच होता. तेव्हां मीरजाफर गांगरून गेला. त्यास काय करावें तें सुचेना. अशा स्थितींत राजा दुर्लभराय व जगतशेट ह्यांनीं तोड काढिली. अर्ध्या रकमेची भरती रोख व ऐवज मिळून, व बाकीची निम्मी रक्कम तीन हप्त्यांनीं तीन वर्षांत फेडावी, असा ठराव करून घेऊन क्लाइव्ह स्वतः मुर्शिदाबादेस येऊन मुरादबागेच्या वाड्यांत उतरला. पुढें दरबार भरवून मोठ्या इतमामानें मीरजाफरानें सुभेगिरी धारण केली. सिराजुद्दौला आपण होऊन पळून गेल्यामुळें मीरजाफरास अनायासें सुभेगिरी मिळाली. त्याजविरुद्ध कोणी तक्रार केली नाहीं. त्या वेळीं अफगाणिस्तानचा अहंमदशहा अब्दाली दिल्लीवर चालून आलेला असल्यामुळें बंगालच्या ह्या भानगडींत मन घालण्यास बादशहासही फावलें नाहीं. तथापि झालेला प्रकार बादशहास पसंत पडला असें मात्र नाहीं. पुढें बंगाल काबीज करण्याकरितां बादशहानें त्या प्रांतांत अनेक स्वाऱ्या केल्या.

मीरजाफराची स्थापना झाल्यावर सर्वांची धाड त्याच्या खजिन्यावर येऊन पडली. खजिन्यांत चाळीस कोटींचा ऐवज आहे असा लोकांचा समज होता. पण प्रत्यक्ष पाहतां दीड कोटींची भर होतांना हरहर! फौजेचा पगार तुंबला होता तो देण्याची निकड होती. शिवाय इंग्रजांचा लकडाही मोठा होता. तेव्हां सरासरी निम्म्याची भर झाल्यावर ती सर्व संपत्ति मोठ्या समारंभानें तीनशें होड्यांत भरून कलकत्त्यास आणिली. वास्तविक कोणास किती रक्कम मिळाली याचा बरोबर थांग लागत नाहीं. क्लाइव्हचा अदमास असा आहे, कीं प्रत्येक इंग्रजांस निदान तीस हजार रुपये तरी मिळाले. त्या पैशाच्या वांटणीबद्दल इंग्लंडांत मोठा वाद सुरू झाला. आपण केलें हें गैर केलें असें क्लाइव्हला कधींच वाटलें नाहीं. त्यापूर्वी इंग्रजांबद्दल एतद्देशीयांच्या मनांत जी पूज्यबुद्धि होती ती क्लाइव्हच्या त्या अपहार-कृत्यानें पार नाहींशी झाली, व इंग्रज हे आपल्या जीविताचा आणि मालमत्तेचा संभाळ करण्याकरितां येत आहेत, असा जो सामान्य जनसमूहास मोठा भ्रम होता, तो क्लाइव्हच्या या कृत्यानें क्षणमात्रांत नाहींसा झाला आपले नवे धनी पहिल्यापेक्षां शतपट अपहारी आहेत, अशी लवकरच लोकांची खात्री झाली.

स. १७७३त हिंदुस्थानच्या कारभाराचा तपास करण्यासाठीं पार्लमेंटची सिलेक्ट कमिटी नेमिली, तिच्या निवेदनांत या खैरातीचे आंकडे दाखल आहेत तेः—

| | | | | |
|---|---|---|---|---|
| स. | १७५७त | मीरजाफराच्या नेमणुकीच्या प्रसंगीं | रु. | १,२६,१०,७५०. |
| स. | १७६०त | मीरकासीम ... ... | रु. | २०,०२,६९०. |
| स. | १७६३त | पुनः मीरजाफर ... | रु. | ४३,७४,९९०. |
| स. | १७६४त | मन्रोचें कुटुंब व फौज मिळून | रु. | ८,२८,८८०. |
| स. | १७६५त | नवीन सुभेदाराच्या प्रसंगी | रु. | १३,९३,५७०. |
| स. | १७६५त | कार्नॅक ग्रास... ... | रु. | ९,०९,९९०. |
| | | एकूण वांटलेली रकम | रु. | २,२१,२०,८७०. |

ह्या सर्व रकमांचा इसमवार तपशिल दिलेला आहे, तो येथें देण्याचें प्रयोजन नाहीं. फक्त मासल्याकरितां पहिल्या रकमेचा तपशील देतों.

| | | |
|---|---|---|
| गव्हर्नर ड्रेक ह्यास ... ... ... | | रु. ३,१५,०००. |
| क्लाइव्ह ह्यास ... ... ... | | रु. २३,४०,०००. |
| सिलेक्ट क. च्या सभासदाबद्दल ... | रु. २,८०,०००. | |
| सेनापतीबद्दल ... ... ... | रु. २,००,०००. | |
| खासगी बक्षिस ह्मणून ... ... | रु. १८,६०,०००. | |
| वॅट्स् ह्यास ... ... ... | | रु. १०,४०,०००. |
| सिले. क. सभासद ह्म. ... ... | रु. २,४०,०००. | |
| खासगी बक्षिस ह्मणून ... ... | रु. ८,००,०००. | |
| किल्पॅट्रिक ह्यास ... ... ... | | रु. ६,०७,५००. |
| सेनापति म्हू ... ... ... | रु. २,७०,०००. | |
| खासगी बक्षिस... ... ... | रु. ३,३७,५००. | |
| मॅनिंग्हॅम व बेचर ह्यांस प्रत्येकीं २,७०,०००, | | रु. ५,४०,०००. |
| कौन्सिलचे सहा सभासद प्रत्येकीं एक लाख | | रु. ६,००,०००. |
| वॉल्श ह्यास ... ... ... | | रु. ५,८२,५००. |
| स्क्रॅफ्टन ह्यास ... ... ... | | रु. २,२५,०००. |
| ल्यूशिंग्टन ह्यास ... ... ... | | रु. ५८,२५०. |
| ग्रँट् ह्यास ... ... ... | | रु. १,१२,५००. |
| फौज व आरमार मिळून ... ... | | रु. ६०,००,०००. |
| | एकूण | रु. १,२६,१०,७५०. |

इंग्रजांनीं आपल्या **नुकसानाची भरपाई** घेतली त्याबद्दल खालील रकमा दाखल आहेत.

| | | |
|---|---|---|
| स० १७५७त मीरजाफरापासून भरपाई | | रु. २,१५,००,०००. |
| ई. इं. कं. करितां ... ... | रु. १,२०,००,०००. | |
| युरोपियन नोकरांकरितां ... | रु. ६०,००,०००. | |
| आर्मिनियन नोकरांकरितां ... | रु. १०,००,०००. | |
| एतद्देशीय नोकरांकरितां ... | रु. २५,००,०००. | |

| | | |
|---|---|---|
| स. १७६०त मीरकासिमानें कं. ला भरपाई | रु. | १६,२५,०००. |
| स. १७६३त मीरजाफरानें कं. ला भरपाई | रु. | ३७,५०,०००. |
| स. १७६३त युरोपियन व एतद्देशीय नोकरांस | रु. | ३०,००,०००. |
| सुजाउद्दौल्यापासून भरपाई... ... | रु. | ५८,३३,३३०. |
| एकूण नुकसान भरपाई... | रु. | ३,८७,०८,३३०. |
| एकूण बाक्षिस... ... ... | रु. | २,२१,२०,८७०. |
| एकूण भरपाई... ... ... | रु. | ३,८७,०८,६३०. |
| एकूण | रु. | ६,०८,२९,२००. |

येणेंप्रमाणें, रोख रक्कम सहा कोटींची त्या वेळीं बंगाल्यांतून इंग्रजांनीं घेतली.

पुढें उमिचंदास फसविण्याचा शेवटचा अंक सुरू झाला. दरबार आटोपल्यावर क्लाइव्हनें त्यास कळविलें, कीं ' तांबडा कागद खोटा आहे, तुह्मांस कांहीं एक मिळणार नाहीं. ' हे शब्द ऐकतांच आकाशांतून कुऱ्हाड पडल्यासारखें होऊन, उमिचंद बेशुद्ध पडला. तेथून नोकरांनीं उचलून नेऊन त्यास पालखींत बसविलें. घरीं गेल्यावर तो भ्रमिष्ट झाला. कांहीं दिवसांनीं क्लाइव्हची त्याची पुनः गांठ पडली, तेव्हां क्लाइव्हनें त्यास तीर्थयात्रेस जाण्यास सांगितलें. त्याप्रमाणें तो तीर्थयात्रेस गेला, आणि तशाच भ्रमिष्ट स्थितींत तो पुढें अठरा महिन्यांनीं मरण पावला. तांबडा कागद खोटा कां हें त्यानें क्लाइव्हला विचारलें असतें, तर त्यास काय उत्तर होतें ? खोटा कागद करून उमिचंदास फसविण्याचा उपक्रम करण्याची क्लाइव्ह त्यास कांहीं एक जरूर नव्हती. दोन कोट रक्कम गेली, तशी आणखी एक वीस लाख जाती, ह्मणून त्यांत क्लाइव्हचें कांहीं नुकसान नव्हतें; व पैसेही क्लाइव्हचे जात नव्हते. त्यावरून क्लाइव्हचा दुष्ट स्वभाव मात्र व्यक्त होतो. अशा दुर्वर्तनानें हिंदुस्थानांतील लोकांचीं मनें इंग्रजी राज्याविषयीं पुढें अनुरक्त राहिलीं नाहींत. त्याबद्दल इंग्रज ग्रंथकारांनीं सुद्धां क्लाइव्हवर भरपूर टीका केली आहे. उमिचंदानें इंग्रजांविरुद्ध कांहीं एक खटपट केलेली नाहीं. उलट इंग्रजांचे बेत सिद्धीस जाण्यास त्यांस त्याचा फारच उपयोग झाला. राज्यक्रान्ति झाल्यावर पुढें

प्रत्येक इंग्रजानें किती रकमा उपटल्या हें पाहिलें म्हणजे उमिचंदाचे वीस लाख कांहींच नाहींत असें म्हणावें लागतें.

एवढी मोठी राज्यक्रान्ति सहज कशी घडून आली, ह्याचीं कारणें पुढें सांगावयाचीं आहेत. पण सिराजुद्दौल्याच्या हातून स्वभावाच्या व कृतीच्या ज्या अनेक चुका झाल्या, त्यांत मुख्य बाबत पैशाची दिसून येते. त्याचें राज्य जरी सधन होतें, तरी पैशाची सर्व व्यवस्था सावकारांच्या हातांत असल्यामुळें, त्यास नेहमीं सावकारांच्या मर्जीवर अवलंबून राहवें लागे. सावकार बिथरले, कीं त्याचा इलाज चालत नसे. त्या वेळची परिस्थितीच अशी होती, त्यामुळें अगर स्वतःच्या वेडेपणामुळें त्यानें सर्व भिस्त दुसऱ्या मंडळीवर टाकिली. प्रत्येक बाबत स्वतःच्या हातांत ठेवून, आपण आपले उद्योग स्वतःच्या बुद्धीनें व जबाबदारीनें त्यानें केले असते, तर दुसऱ्यांनीं फसविण्याचा प्रसंग त्याजवर आला नसता. ह्या बाबतींत शिवाजी, अहंमदशहा अब्दाली, अगर हैदरअली ह्यांचे कारभार धूर्ततेचे दिसतात. स्वावलंबनाची गोष्ट निराळी आहे.

हिंदुस्थानांत इंग्रज लोक राज्य स्थापित गेले, त्याचे निरनिराळे प्रकार एकसमयावच्छेदेंकरून ध्यानांत आणिले, म्हणजे मराठे व शीख हे इंग्रजांशीं उघडपणें लढून पराभव पावल्यावर इंग्रजांच्या ताब्यांत गेले, पण बंगालचे, अयोध्येचे व कर्नाटकचे नबाब, व प्रत्यक्ष मोगल बादशहा हे तर केवळ युक्तीनें, दौर्बल्यानें व भोळेपणानें फशीं पडले. ज्या अफगाण, मोगल, पठाण वगैरे शूर मुसलमानांनीं पराक्रम करून ह्या देशांत राज्यें कमाविलीं, ते पुढें अगदीं दीन होऊन अनाथासें परकीयांच्या ताब्यांत गेले. शूर मुसलमानांच्या पूर्वीच्या व पुढच्या स्थितींत हें केवढें तरी अंतर पडलें. एकंदरींत इंग्रजांच्या तरवारीपेक्षां, त्यांच्या मुत्सद्दी काव्यानेंच हें राज्य बहुतांशीं त्यांजला प्राप्त झालें आहे.

**४. फ्रान्सी व इंग्रजांच्या उद्योगाची चर्चा.**—राज्यांची बडा-मोड होणाऱ्या हिंदुस्थानांत ज्या कित्येक लढाया झाल्या, त्यांत प्लासीच्या लढाईची गणना आहे. ह्या लढाईनें कलकत्त्याच्या अंधारकोठडीचा सूड इंग्र-

त्यांनीं घेतला आणि तलवारीच्या जोरावर लढाई जिंकली असें सामान्यतः पाश्चात्य ग्रंथकार लिहितात. परंतु हा ग्रह चुकीचा आहे. तिच्या परिणामाविषयीं मतभेद असूं शकेल, पण तींत इंग्रजांस जय मिळाला तो केवळ कपटविद्येनें, तरवारीच्या जोरावर नव्हे. प्लासीच्या तलवारबहादुरीबद्दल ३९व्या पलटणीस हिंदुस्थानच्या फौजेंत पहिला मान मिळतो, व इतरांसही पुष्कळ बहुमान देण्यांत आले, पण ते फुकट होत. ह्या लढाईंत लढणें असें फारच थोडें झालें, व जें झालें तेंही युद्धनीतीनें झालें नाहीं. बाकी प्लासीच्या लढाईनें हिंदुस्थानांतील मुसलमानी राज्याचा अंत होऊन इंग्रजी रियासतीचा आरंभ कायम झाला. ह्या दृष्टीनें प्लासीचें महत्व अतोनात आहे.

प्लासीच्या लढाईनें अनेक गोष्टींचा निकाल लागला. क्लाइव्हच्या हातून ब्रिटिश राज्याचा पाया हिंदुस्थानांत पक्का घातला गेला. एतद्देशीयांच्या कारभारांत फूट पाडून, आपला कावा साधण्याची युक्ति इंग्रजांस साधली. ह्याच युक्तीचा अवलंब त्यांच्या पुढील कारभारांत दिसून येतो. त्यांच्या एतद्देशीय दोस्तांनीं त्यांस कधीं दगा दिला नाहीं. हिंदी प्रजेची दुर्बलता व त्यांच्या स्वभावांतील दोष इंग्रजांच्या नजरेस स्पष्टपणें आले. एकदम एखाद्या महत्कृत्यानें इकडचे लोक कसे दिपून जातात, आणि त्यांच्या मनावर एखाद्या बाह्य गोष्टीचा परिणाम कसा होतो, हें वरील हकीकतीवरून व्यक्त होतें. मोगल बादशाहीच्या ऱ्हासकालांत राज्याची व लोकांची स्थिति किती निकृष्ट झाली होती आणि तिचा उपयोग धूर्त पाश्चात्यांनीं कसा करून घेतला, हें प्लासीच्या प्रकरणावरून चांगलें समजून येतें.

हिंदुस्थानांत स्वराज्य स्थापन करितांना इंग्रजांस दोन शत्रु होते, एक युरोपियन, व दुसरे एतद्देशीय. पैकीं 'सात वर्षांच्या युद्धांत' युरोपियन शत्रूंचा निकाल लागला. पण एतद्देशीय शत्रूंचा पाडाव करून, येथें कायमची राज्यस्थापना करण्यास इंग्रजांस सुमारें शंभर वर्षे लागलीं. सन १७५७ची प्लासीची लढाई हा राज्यस्थापनेचा आरंभ धरल्यास तेथपासून शंभर वर्षांनीं म्हणजे स. १८५७तील बंडानें ह्या कृत्याची समाप्ति झाली असें

ह्मणतां येईल. हीं जीं शंभर वर्षे गेलीं, त्यांतील पहिल्या पन्नास वर्षांत राज्य-स्थापना समाप्त झाली, व पुढील पन्नास वर्षांत इंग्रजी राज्य या देशावर एक-छत्री, अखंड व बद्धमूल झालें. इंग्रजांचा हा उद्योग प्रचंड असून तो इतक्या सुलभ रीतीनें त्यांनीं तडीस नेल्याबद्दल कोणासही आश्चर्य वाटेल. युरोप खंडाच्या वायव्येकडील लहानशा बेटांत बसून जेव्हां इंग्रज लोक ह्या आपल्या पराक्रमाचें स्वरूप मनांत आणितात, तेव्हां त्याबद्दल त्यांस अत्यंत धन्यता वाटते. इतिहासांत असा प्रकार कधीं झाला नाहीं. नवीन राज्यें जिंकण्याचे जे सामान्य उपाय प्रचारांत आहेत, ते ह्या बाबतींत सर्वथा बाजूसच राहिले. एखाद्या साडेसातींत जसें कोणाचें एकदम नशीब उघडावें, तसा प्रकार, कोणाच्या ध्यानीं मनीं नसतां, ह्या इंग्रजी राज्यस्थापनेचा झाला, अशा प्रकारचे विचार त्यांच्या मनांत येणें साहाजिक आहे. सीलीकृत ' इंग्लंड देशाचा विस्तार' ह्या पुस्तकांत या विषयाची भरपूर चर्चा केलेली असून ती मार्मिक अभ्यासकांनीं अवश्य वाचावी. युद्धकलेंत ज्यास्त प्रवीण लोकांकडून हा देश सहज जिंकतां आला असता, व मागचा इतिहास पाहिला तर हा अनेक वेळां परकीय लोकांनीं जिंकलेलाही आहे. बाबरानें बारा हजार फौजेनिशीं ह्या देशावर स्वारी केली, आणि इब्राहीम लोदीच्या एक लाख फौजेचा पानपतावर पराभव करून मोगल बादशाहीची स्थापना केली. वास्तविक इंग्रजांच्या शक्तीपुढें बाबराची शक्ति कांहींच नव्हती असें ह्मटलें तरी चालेल; आणि बाबरानें पराभव केलेल्या फौजेएवढी मोठी फौज इंग्रजांशीं सामना करण्यास कधींच पुढें आली नाहीं. नाहीं ह्मणण्यास पंजाबच्या शीखांशीं मात्र इंग्रजांच्या कित्येक निकराच्या चकमकी उडाल्या. त्या वगळल्या तर इंग्रजांस इकडे लढण्याचे खरेखुरे प्रसंग विशेष आलेच नाहींत. सारांश, बाबरानें व इतरांनीं जर हा देश सहज जिंकला होता, तर अठराव्या शतकांत मोगल बादशाही कोसळूं लागली, तेव्हां, आतां दुसरा कोणी तरी येऊन हा देश जिंकणार, कदाचित् येथें व्यापाराकरितां आलेल्या पाश्चात्यांपैकींच एकादें राष्ट्र हा देश जिंकील, असा अंधुक अंदाज पुष्कळ विचारी लोकांच्या मनांत येऊं लागला होता.

प्रसिद्ध फ्रेंच प्रवासी बार्नियर औरंगजेबाकडे आला असतां त्यानें हिंदुस्थान देश सहज जिंकतां येईल असें भाकीत केलें. ' फ्रान्सचा एखादा सेनापति वीस हजार फौजेनिशीं हा देश तेव्हांच जिंकील,' असें त्यानें लिहिलें आहे. जेम्स् मिल्ल नांवाचा एक इंग्रज गृहस्थ वीस वर्षे हिंदुस्थानांत होता, त्यानें बंगाल प्रांत सहज रीतीनें जिंकण्याची युक्ति स. १७४६त ऑस्ट्रियाच्या बादशहास लिहून कळविली होती. दोन कोटि वसुलाचा बंगाल प्रांत भलताच कोणी नबाब बळकावून बसला आहे, तो समुद्राच्या बाजूनें तेव्हांच हिसकून घेतां येईल, असें त्याचें मत असून, तत्कालीन स्थितीची योग्य पारख करून पुढील शक्यतेचें बिनचूक भविष्य त्यानें केलें होतें. तसेंच एकदां बंगाल प्रांत इंग्रजांच्या हातांत पडल्याबरोबर पुढें सर्व देश हळू हळू त्यांच्या ताब्यांत जाणार ही गोष्ट ओघानेंच प्राप्त झाली, तींत आश्चर्य करण्यासारखें कांहीं नाहीं, हेंही त्या वेळीं अनेकांस पूर्णपणें कळून आलें होतें.

ई. इं. कंपनीनें उघडपणें एतद्देशीय सत्ताधीशांशीं सामना केल्याचा पहिला प्रसंग प्लासी हाच होय. म्हणून त्या वेळीं एतद्देशीयांची लष्करी व्यवस्था कशी होती व इंग्रजांस इतक्या सुलभ रीतीनें प्लासीवर जय कां मिळाला, या प्रश्नांचा जरा खोल विचार करणें जरूर आहे. अठराव्या शतकांत इंग्रजांनीं एतद्देशीयांशीं लढण्याचा क्रम आरंभिला, तेव्हां आमच्या फौजा फारच अव्यवास्थित असून राज्यकर्तेही अकुशल होते, म्हणूनच इंग्रजांस सहज जय मिळत गेले. हा देश जरी सधन व सुस्थितींत होता, तरी राज्यकर्ते दुर्बल व नेभळे होते. शिवाय इंग्रजांचा प्रवेश समुद्राच्या बाजूनें व राजधानीपासून अतिशय दूर असलेल्या बंगालसारख्या प्रांतांत प्रथम झाला. मध्यवर्ती बादशाही सत्ता ढांसळल्यामुळें राज्याचे दूरदूरचे प्रांत अगदीं निराधार झाले. बंगाल्यांतले लोक इतर प्रांतांपेक्षां युद्धकलेंत अगदींच कमी होते, आणि तशांत सिराजुद्दौल्याचा कारभार लोकांस सुखकर नव्हता, या गोष्टीचा इंग्रजांस फायदा मिळाला. औरंगजेबानंतर बादशाही शिस्त व फौज साफ बिघडली. औरंगजेब किंवा अलिवर्दीखान यांजपुढें इंग्रजांचा निभाव लागला नसता. पुढें

थोडक्याच वर्षांनीं हैदरअलीशीं किंवा मराठ्यांशीं इंग्रजांनीं सामना केला त्यांत त्यांचा निभाव लागला नाहीं, ह्यावरून प्लासीच्या लढाईचें अपयश सिराजुद्दौल्यास त्याच्या दुर्बल व अकुशल कारभारामुळेंच आलें, असें ह्मणावें लागतें. आरंभींच्या संग्रामांत इंग्रजांस जय येत गेले ते ह्या कारणामुळेंच होत. इंग्रजांशीं सामना करणाऱ्या फौजा केवळ भाडोत्री होत्या. त्यांची आपल्या धन्यावर निष्ठा नव्हती. अशा भाडोत्री फौजा त्या काळीं सहज जमा करतां येत असत. दंगेखोर, लुटारू व पोटासाठीं भटकत फिरणारे येथचे अगर बाहेरचे हजारों लोक त्या वेळीं देशभर पसरले होते. पगार दिला ह्मणजे तेवढ्या वेळेपुरती ते वाटेल त्याची नोकरी करीत. पण युरोपियनांच्या तोफांचा मारा यथास्थित होऊं लागला ह्मणजे त्यापुढें ते टिकाव धरीत नसत. त्यांजवरचे अधिकारी सुद्धां धन्याचे हुकमांत न वागतां, वेळ पडेल त्याप्रमाणें शत्रूंशीं गोडी करून स्वार्थ साधण्यास उद्युक्त असत. अशा प्रकारच्या फौजांची व त्यांवरील अंमलदारांची धन्यास नेहमींच मोठी धास्ती असे; ते कोणत्या वेळेस गळा कापतील ह्याचा नेम नसे. अशा भाडोत्री शिपायांस गोळा करून अनेक धूर्त व साहसी पुरुष हिंदुस्थानांत अठराव्या शतकांत निरनिराळ्या प्रांतांत आपली राज्यसत्ता स्थापीत होते. बंगालचे नबाब, अयोध्येचे वजीर, म्हैसूरचा हैदरअली, दक्षिणचा निजाम हे अशाच प्रकारें भाडोत्री शिपायांच्या टोळ्या जमा करून त्या धामधुमीच्या काळांत उदयास आले.

अशा झगड्यांत युरोपियन लोक सामील झाल्याबरोबर अफगाणांचा धंदा बुडतोसा वाटूं लागला. सशास्त्र रीतीनें युद्धकलेचें शिक्षण मिळालेल्या युरोपिनांपुढें ह्या भाडोत्री लष्कराचा निभाव लागेना. सर्वांनीं मिळून एक जुटीनें व व्यवस्थितपणें, अगोदर सर्व तपशील व व्यवस्था ठरवून, अव्वलपासून अखेरपर्यंत कामगिरी बिनचूक बजावणें, ही सुधारलेली युद्धपद्धति युरोपियनांनीं इकडे सुरू केल्याबरोबर, तिच्यापुढें अव्यवस्थित, अशिक्षित व भाडोत्री शिपायांचा निभाव कसा लागावा? असाच प्रकार कर्नाटकांत व बंगाल्यांत, इंग्रज, फ्रेंच व एतद्देशीय फौजा ह्यांच्या संबंधानें झाला.

युरोपियनांनीं जरा निकराचा मारा केल्याबरोबर ह्या भाडोत्री फौजा समरांगण सोडून पळून जात. लहानशा पगाराकरितां प्राण देण्यास कोण तयार होईल? जयाचें पारडें झुकलेलें पाहतांच देशांत लढवय्ये ह्मणून जे लोक होते, ते भराभर युरोपियनांच्या बाजूस येऊन लढूं लागले. कारण युरोपियनांकडून त्यांस पगार वेळेवर मिळे, व लढाईंत जय येण्याची खात्री असे; इतकेंच नाहीं, तर संग्रामप्रसंगीं ते अमदीं युरोपियनांच्या बरोबरीनें सर्वांच्या पुढें राहून लढूं लागले. लढवय्या वर्ग ह्मणून ह्या देशांत नेहमींच एक मोठा फिरता लोकसमुदाय होता. ह्या लढवय्या वर्गाची संख्या वीस लाखपर्यंत असावी असा कित्येकांनीं अदमास केला आहे. त्यांस लढण्याची संधि मिळाली आणि त्याबद्दल पगार मिळाला, ह्मणजे त्यांचा संतोष असे. परंतु आपण लढतों हे कोणाकरितां, व ह्यापासून काय मिळवायचें, हे विचार त्यांच्या अंतःकरणांत येत नसत. युरोपियन लोकांनीं व विशेषतः इंग्रजांनीं आपल्या फौजा ह्या देशांत बनविल्या, त्या अशाच वर्गातील लोकांच्या बनविल्या. महिना दीड महिन्याच्या अवकाशांत वाटेल तितके पायदळ व स्वार जमा करतां येत, असा त्या वेळचा उल्लेख सांपडतो. मध्यआशियांतून अफगाण लोकांच्या झुंडीच्या झुंडी इकडे येत व निरनिराळ्या प्रांतांतील लष्करांत नोकऱ्या पत्करीत. परंतु युरोपियनांच्या फौजांत आरंभीं अफगाण लोक फारसे नव्हते. उद्दाम व आडदांड अफगाणांपेक्षां ह्या देशांतील नरम, विश्वासू व साधे हिंदुच त्यांस पायदळांत आवडत. शंभर वर्षेंपावेतों ह्या हिंदु पायदळानें इंग्रजांची नोकरी उत्कृष्ट बजाविली आहे. तोफखान्यावरच्या लोकांनीं आपलें काम यथायोग्य बजावलें, आणि लाल डगल्याचे थोडेसे युरोपियन बरोबरीनें काम करण्यास असले, ह्मणजे एतद्देशीय फौजेनें इंग्रजांकरितां आजपावेतों अत्यंत महत्वाची कामगिरी केलेली आहे.

ह्यावरून इंग्रजांना आरंभीं जय कसे येत गेले हें व्यक्त होईल. त्यांचे आरंभींचे संग्राम किनाऱ्याकिनाऱ्यानें झाले. बंगाल प्रांत त्यांनीं प्रथम जिंकिला. तेथील सुभेदार अगोदरच अप्रिय व परकीय होता. त्याची फौज भाडोत्री व बिथरलेली

होती. अफगाण व मराठे ह्यांच्या स्वाऱ्यांनीं देश हैराण होऊन, शेती व व्यापार बराच निकृष्टावस्थेंत होता. ह्यामुळें इंग्रजांस किनाऱ्यावरील प्रदेशांत सहज जय येत गेले. पण हा प्रकार फार दिवस टिकला नाहीं. जसजसे प्रदेश जिंकीत ते अंतः-प्रदेशांत जाऊं लागले, तसतसी त्यांची मति कुंठित होऊं लागली. मराठ्यांनीं तर त्यांस चांगलेंच अडविलें. कारण मराठ्यांच्या फौजा इतरांसारख्या केवळ भाडोत्री नव्हत्या; त्यांच्या ठिकाणीं थोडा बहुत राष्ट्रीय अभिमान जागृत होता, आणि राज्यकारभारही बऱ्यापैकीं होता. इंग्रजांनीं बंगाल प्रांत काबीज केला, त्याच वेळीं मराठ्यांनीं बहुतेक हिंदुस्थान देश पादाक्रान्त करून ते आपलें साम्राज्य स्थापण्याच्या बेतांत होते. मराठ्यांच्या कृत्यांचा इंग्रजांस आयताच फायदा मिळाला. म्हैसूरचा राजा, निजाम, व खुद्द मोगल बादशहा व त्याचे प्रांतोप्रांतींचे सुभेदार, ह्यांजला मराठ्यांनीं परभारें हैराण करून टाकिल्यामुळें, इंग्रजांस तें काम करण्याची जरूर राहिली नाहीं. इंग्रज मध्यें घुसले नसते, तर हिंदुस्थानांत मराठ्यांचें साम्राज्य होण्याचा अगदीं रंग आला होता.इंग्रजांचें हें सुदैव कीं आरंभींच मराठ्यांशीं झगडण्याचा त्यांस प्रसंग आला नाहीं; आणि पुढें जेव्हां तसा प्रसंग आला, तेव्हां इंग्रजांच्या राज्यांत बरीच स्थीरस्थावर होऊन त्यांची शक्ति वाढली होती. हिंदुस्थानांत इंग्रजी राज्य स्थापनेस जर कोणी जोराचा अडथला केला असेल तर तो मराठ्यांनींच होय; तसेंच हिंदुस्थानांत इंग्रजांचे जोराचे रणसंग्राम मराठ्यांशींच झाले.

एवढ्यावरून सुदैवाच्या कल्पनातीत जोरानें इंग्रजांस हिंदुस्थानचें राज्य लाभलें, अगर हिंदुस्थानच्या लोकांनीं आपण होऊनच हा देश जिंकून इंग्रजांच्या हवालीं केला, हीं विधानें खरीं नाहींत. कित्येक लोक असें प्रतिपादन करितात कीं हिंदुस्थानचे खरे क्षात्रिय किंवा लढवय्ये लोक इंग्रजांस कधींच सामील झाले नाहींत; चोर, रामोशी, घरदार नसून पोटासाठीं भटकत फिरणारे, महार मांग, वगैरे निकृष्ट वर्गांतील लोक आपल्या नोकरींत ठेवून इंग्रजांनीं हा देश जिंकिला; हिंदुस्थानचे खरे योद्धे (representative military classes) त्यांस सामील झाले नाहींत, हें ह्मणणें

खरें खोटें ठरविण्यास इंग्रजांच्या फौजांचे जातवार आंकडे तपासून पाहिले पाहिजेत. तथापि कित्येक ठळक प्रमाणांवरून वरील सिद्धान्त स्थापन होत नाहीं. एक तर हलक्या जातीचे लोक नोकरीस ठेवून इंग्रजांनीं हा देश जिंकिला असें खरें मानलें, तरी येथचे लष्करी पेशाचे लोक स्वदेशसंरक्षण करण्यास पुढें आले नाहींत हें निर्विवाद आहे. जर त्यांनीं, स्वदेशसंरक्षण केलें असतें, तर इंग्रजांच्या ताब्यांत हा देश गेला नसता. दुसरें, मुसलमानांनीं ह्या देशांत प्रवेश केला त्या वेळेपासूनचा किंवा त्याच्याही पूर्वीचा इतिहास अवलोकन केला तर येथच्या लोकांत राष्ट्रीय अभिमान मुळींच नव्हता असें ह्मणावें लागतें. स्वराष्ट्राभिमान ह्मणजे परकीयांस आपल्या देशांत घुसूं न देणें. परकीय लोक एकसारखे देशावर स्वाऱ्या करीत होते आणि त्यांस अडविण्यास आमचे लोक पुढें आले नाहींत. एक प्रकारचा प्रांतिक अभिमान आपल्या लोकांत होता, पण तो इतका आकुंचित होता, कीं एका प्रांतानें दुसऱ्या प्रांतास मदत तर कधीं केलीच नाहीं, उलट त्याविरुद्ध शत्रूसच मदत केलेली आहे. रजपूत व मराठे दोघेही पृथक्पणें मुसलमानांशीं लढले, पण ते दोघे एक होऊन तिसऱ्या परकीय शत्रूंशीं लढले, असा प्रकार कधीं झाला नाहीं. शेवटीं शेवटीं मराठ्यांस तर रजपूत लोक आपले शत्रूच समजत. इंग्रजमराठ्यांचीं युद्धें झालीं, तेव्हां रजपूत लोक भराभर जाऊन इंग्रजांस मिळाले. सारांश, अद्यापि आमचा स्वभाव प्रांतिक व एकदेशीय ह्मणजे अत्यंत अंकुचित व अनुदार आहे. विस्तृत, उदार व एकराष्ट्रीय समदृष्टि आपल्या लोकांत बाणलेली नसल्यामुळें, परकीय प्रवेश येथें किती सुगम होतो हें इंग्रजांच्या ह्या एकंदर इतिहासावरून आपणास उत्कृष्ट दिसून येतें.

स्कॉटूलंडचे हायलंडर्स व लोलंडर्स ह्यांचें फार दिवस वांकडें असून, दोघांचा हितार्थ एक आहे असें त्यांस दिसून आल्याबरोबर, ते एक झाले. नॉर्मन लोकांनीं इंग्लंड देश जिंकिला, तेव्हां सॅक्सन लोकांशीं आरंभीं त्यांचा अत्यंत वैरभाव असूनही शंभर दीडशें वर्षांत दोनही जातींचें ऐक्य झालें. सारांश, दोघांमध्यें प्रेम उत्पन्न होण्यास, दोघांचा हितार्थ एकच आहे, अशी

दोघांचीही खात्री झाली पाहिजे. हितार्थ एक असून समान आपत्ति सहन करण्याचा प्रसंग आला म्हणजे स्वराष्ट्राभिमान उत्पन्न होतो.*

५. मीरजाफराचा उद्वेग.—प्लासीच्या लढाईनें बंगाल्यांत राज्यक्रान्ति होऊन इंग्रजांच्या अडचणी मिटतील असें वाटलें होतें, तसा प्रकार झाला नाहीं. मीरजाफर राज्य करण्यास नालायक होता. तो भांग पिऊन सदा अंगावर दागिने घालून ऐषआरामांत निमग्न राही. त्याचा मुलगा मिरान यानें तर आपल्या क्रूरपणाची कमाल करून सोडली. त्यामुळें मीरजाफराविषयीं लोकरच जिकडे तिकडे असंतोष व गवगवा उत्पन्न झाला. जवळ पैसा बिलकुल नव्हता. दरबारांतील गृहस्थ नाखुष झाले होते. तिकडे द्रव्यानें भरलेल्या शेंकडो बोटी कलकत्यास जातात, व इकडे मीरजाफराजवळ खर्चास पैसा नाहीं, हें पाहून तर बहुतेकांस मीरजाफराच्या कृत्याचा त्वेषच आला. त्याच्या नेभळेपणाची कमाल झाल्यामुळें ‘ क्लाइव्हचा तट्टू ’ अशा नांवानें लोक त्याची थट्टा करूं लागले. पूर्वी इंग्रज लोक सुभेदाराकडे आर्जवें करीत येत असत, आतां ते धनी होऊन बसले, व सुभेदारासच त्यांची मनधरणी करावी लागे. हा वर्ष दोन वर्षांतला फेरफार आपल्या डोळ्यांसमोर झालेला पाहून मीरजाफराची सर्वांसच मोठी चीड आली. प्रत्यक्ष मीरजाफर तरी इंग्रजांस कोठें चाहत होता. नानातऱ्हा करून इंग्रजांचा नकशा कमी करण्याचा तो प्रयत्न करूं लागला. पण कोणतीही युक्ति सिद्धीस न गेल्यामुळें, पुनः मुकाट्यानें क्लाइव्ह यास शरण जाणें त्यास भाग पडे. शिवाय त्यानें आपल्या आप्तवर्गाचें समाधान करण्यासाठीं, पूर्वीचे बहुतेक कामगार नोकरीवरून काढून आपले नातेवाईक नोकरीत भरले, त्या योगेंही तो अप्रिय झाला. वरच्या वर्गाची अशी स्थिति असतां बिचाऱ्या खालच्या शेतकरी वगैरे वर्गांची काय दैना उडाली असेल त्याची कल्पना करावी.

---

* या संबंधानें कै. प्रो. लिमयेकृत ‘ गनिमीकावा व कवाइति कंपू ’ हा लेख व केळकरकृत ‘मराठे व इंग्रज’ यांतील विवेचन अत्यंत उपयुक्त आहे.

दोन महिन्यांच्या आंत शिकस्त करून, मीरजाफरानें एक कोट पांच लाख रकमेचा भरणा इंग्रजांकडे केला. ह्मणजे पहिल्या हप्त्यापैकीं सुमारें सहा लाख देणें बाकी राहिले. मीरजाफरास सुभेगिरी मिळाली, पण तिजोरी धुऊन निघाल्यामुळें तो मोठ्या पेचांत आला. फक्त इंग्रजांची समजावणी करण्यांतच खजिना रिकामा झाल्यामुळें, त्याच्या अनेक एतद्देशीय साथीदारांस देण्यास त्याजजवळ कांहींच राहिलें नाहीं. ' आपणास सुभेगिरी मिळाली ह्मणजे तुह्मांस बक्षीस देऊं, ' असें त्यानें पुष्कळांस वचन दिलें होतें. इंग्रजांकडे एवढ्या मोठ्या रकमा गेल्या नसत्या, ह्मणजे लोकांची थोडी बहुत समजूत त्यास काढतां आली असती. इंग्रजांची मदत घेतांना त्यास गोड वाटलें; पण आतां सर्व सत्ता त्यांच्या हातांत जाऊन, ते नाचवितील तसें आपणास नाचलें पाहिजे, त्यांच्या हातून सुटण्यास आतां मार्ग नाहीं, असे विचार मनांत येऊन, तो इंग्रजांचा द्वेष मात्र करूं लागला. पैसा उकळण्यासाठीं लोकांवर जुलूम केल्यामुळें ते खवळून गेले. राजा दुर्लभराय घरीं बसला. प्रांतोप्रांतींचे अधिकारी बंडें करून उठले. अशा अडचणींत पुनः त्यास मदतीसाठीं क्लाइव्हकडे धाय घ्यावी लागली. क्लाइव्हला हेंच पाहिजे होतें. बंगालचा कारभार सर्वथैव आपल्या तंत्रानें चालावा, अशी योजना त्यास करावयाची होती. क्लाइव्हनें लगेच आयर कूटच्या हाताखालीं फौज पाठविली. लॉचा पाठलाग करीत कूट पाटणास गेला. पाटणाचा कारभारी रामनारायण मीरजाफरास जुमानीनासा झाला होता. पाठीमागून कांहीं दिवसांनीं क्लाइव्ह स्वतः फौज घेऊन मीरजाफरासह तो वर राजमहाल येथें गेला. मीरजाफरास पेंचांत गांठून क्लाइव्हनें मागील बाकी देऊन टाकण्याबद्दल त्यास एकदम तगादा लाविला. तेव्हां मीरजाफरानें नवीन ठराव करून, कलकत्त्याच्या दक्षिणेकडील सव्वादोन लक्ष पाउंड उत्पन्नाचा मुलूख त्यानें कंपनीस दिला, ( जानेवारी, स. १७५८ ). पुढें मीरजाफर व क्लाइव्ह पाटणास गेले. ह्या ठिकाणीं सोऱ्याचा व्यापार मोठा चाले. उत्पन्न झालेला सर्व सोरा दरसाल लिलांवानें विकण्यांत येत असे, त्याचा मक्ता कायमचा कंपनीस द्यावा अशी क्लाइव्हनें मागणी केली. ती

कबूल करणें मीरजाफरास भाग पडलें. ह्याप्रमाणें बहार प्रांतांतील सोन्याचा सर्व कबजा कायमचा इंग्रजांच्या हातांत गेला. पुढें ही मंडळी पाटणास तीन चार महिने राहिली. तेथें मीरजाफरास सुभेगिरीवर कायम केल्याबद्दल आणि क्लाइव्ह ह्यास सहा हजारांची मनसबगिरी दिल्याबद्दल, बादशहाचीं फरमानें आलीं. तेव्हां मोठा थाट व समारंभ करण्यांत आले. स. १७५८च्या मे मासांत क्लाइव्ह परत कलकत्यास आला.

वर मीरजाफरानें कंपनीस जहागीर दिली म्हणून सांगितलें, त्यांतील प्रदेशाचा सालाचा वसूल कंपनीस सुमारें वीस लाख रुपये येत असे, व त्यांपैकीं तीन लाख सुभेदाराकडे सारा म्हणून भरावा लागे. ह्याशिवाय बादशहानें क्लाइव्हला मनसब दिली, त्यावरून तो अमीर बनला. ह्या मनसबीचा अर्थ असा, कीं क्लाइव्हनें सहा हजार पायदळ व पांच हजार स्वार एवढी फौज ठेवावी; व त्याबद्दल बादशहाकडून त्यास नेमणूक मिळावी. क्लाइव्हनें फौज तर कांहीं ठेविली नाहींच, पण मीरजाफराकडे नेमणूक मात्र मागितली. क्लाइव्हनें मागणी केल्यावर मीरजाफरास नाहीं होय म्हणण्याची सोय नव्हती. तेव्हां कंपनीच्या जहागिरीचा जो वसूल दरसाल तीन लाख त्यास यावयाचा, तोच परभारें क्लाइव्हनें कंपनीकडून घ्यावा, असा ठराव मीरजाफरानें करून दिला. ह्या तीन लाखांच्या नेमणुकीबद्दल पुढें कंपनी व क्लाइव्ह यांजमध्यें मोठा तंटा उपस्थित झाला.

कलकत्यास आल्यावर क्लाइव्हनें तेथील तटाची चांगली दुरुस्ती करून कायमचा बंदोबस्त केला. त्या वेळीं त्याची प्रेसिडेंटच्याच जागयावर नेमणूक होती. इतक्यांत इकडे काउंट लालीं मोठी फौज घेऊन पांदिचरीस आल्यामुळें, क्लाइव्ह यास कर्नाटकांत निघून येण्याविषयीं बोलावणें आलें. या वेळीं मोगल बादशाहींत नानातऱ्हेच्या भानगडी चालू होत्या. अहंमदशहा अब्दाली व मराठे ह्यांचा झगडा निकरावर येऊन, कोणत्या वेळेस काय प्रकार होईल, ह्याचा नेम नव्हता. बंगाल्यांतही अस्वस्थताच होती. स. १७५८त बादशहाचा मुलगा शहाजादा अली गौहर ह्यानें बंगाल प्रांतावर स्वारी केली. त्यास अयो-

ध्येचा वजीर व फ्रेंच गृहस्थ जीन लॉ ह्यांची मदत होती. मीरजाफरानेंही मराठ्यांस आपल्या मदतीस बोलाविलें. अशा स्थितींत क्लाइव्हनें बंगाल प्रांत सोडून जाणें शक्य नव्हतें. शहाजाद्यानें मीरजाफरावर स्वारी केली, तेव्हां त्यास मदत करण्याकरितां क्लाइव्ह पाटणास गेला, ( एप्रिल १७५९ ). हें समजल्यावर शहाशादा निघून परत गेला.

इंग्रजांच्या ह्या चढत्या भरभराटीचें डच लोकांस वैषम्य वाटूं लागलें. चिनसुरा येथें त्यांची वसाहत होती. इंग्रजांचा वर्चष्मा कमी करण्याकरितां मीरजाफरानें डच लोकांशीं आंतून संधान लाविलें होतें. ऑक्टोबर सन १७५९त सात डच जहाजें फौज भरून हुगळी नदींत येऊन दाखल झालीं. त्यांस घालवून देण्यासाठीं क्लाइव्हनें मीरजाफरास निकडीचा तगादा लाविला. मीरजाफर हुबळीस गेला, तेथें त्याचें आणि डच लोकांचें खलबत झालें. ह्या वेळीं क्लाइव्ह जवळ फारशी फौज नव्हती, तरी तो डगमगला नाहीं. लवकरच कर्नल फोर्ड व कॅप्टिन नॉक्स (Knox) त्यास येऊन मिळाले. डच लोकांनीं इंग्रजांशीं उघड उघड लढाई सुरू केली. तेव्हां क्लाइव्हनें हाताखालील हुशार अंमलदारांच्या मदतीनें जमिनीवर व पाण्यांत दोनही ठिकाणीं त्यांचा पराभव केला. इंग्रजांचा पराभव होईल ह्मणून मीरजाफर वाट पाहत होता. परंतु त्यांचा जय झालेला ऐकून त्याची निराशा झाली. क्लाइव्हनें डच लोकांशीं कायमचा तह करून त्यांचा पुनः वर पगडा होऊं नये अशी व्यवस्था केली. एवढें काम केल्यावर क्लाईव्हचें मन स्वस्थ झालें. तेव्हां आतां आपलें काम झालेंसें वाटून, कायमची विश्रांति घेण्यासाठीं युरोपास जाण्याचा विचार त्यानें मनांत आणिला. वॅन्सिटार्ट ( Vansittart ) ह्मणून एक गृहस्थ होता, त्यास त्यानें आपला कारभार पाहण्यास नेमिलें; आणि फौजेवर कालिओडची नेमणूक केली. पुढें मीरजाफराशीं त्यांच्या ओळखी करून देऊन क्लाइव्हनें रजा घेतली. त्या वेळीं आपला मोठा आधार जातो असें मीरजाफरास वाटलें. १७६०च्या फेब्रुवारी महिन्यांत क्लाइव्ह निघून स्वदेशीं गेला.

# सूची.



# भूगोलिक निर्देश.

हिंदुस्थान देश ब्रिटिश सत्तेखालीं जाणें ही जगाच्या इतिहासांतील एक अत्यंत महत्वाची घडामोड असून तीच या पुस्तकाचा विषय आहे. ती समजण्यासाठीं समग्र पृथ्वीचें चित्र डोळयांपुढें पाहिजे. संदर्भ असलेलीं सर्व स्थलें मावतील एवढा मोठा नकाशा पुस्तकांत घालणें शक्य नाहीं. वास्तविक स्वतंत्र नकाशाचें पुस्तकच विद्यार्थ्याजवळ पाहिजे. परंतु त्याच्या अभावीं सोबतचा पृथ्वीचा नकाशा व खालील समजुती एवढ्यांवर वाचकांचें काम भागण्यासारखें आहे. बहुतेक घडामोडी समुद्रकिनाऱ्यानें झाल्यामुळें पृथ्वीच्या एकंदर किनाऱ्याचे खंड पाडून प्रत्येक खंडाखालीं संदर्भाचीं स्थलें नजीकच्या बेटांसह खालीं देण्यांत येत आहेत:—

## १ हिंद–पश्चिम किनारा, कराची ते सीलोन.

| | | |
|---|---|---|
| १ कराची | २ ठठ्ठा ( पत्तल ) | ३ दीव |
| ४ खंबायत | ५ भडोच | ६ सुवाळी |
| ७ सुरत | ८ दमण | ९ डाहाणू |
| १० तारापूर | ११ माहीम | १२ वसई |
| १३ ठाणें | १४ साष्टी | १५ मुंबई |
| १६ खांदेरी उंदेरी | १७ अलीबाग | १८ चौल |
| १९ जंजिरा | २० दाभोळ | २१ रत्नागिरि |
| २२ राजापूर | २३ विजयदुर्ग | २४ मालवण |
| २५ वेंगुर्ला | २६ पणजी | २७ मार्मगोवा |
| २८ अंजद्वीप | २९ कारवार | ३० कुमठा |
| ३१ होनावर | ३२ भटकळ | ३३ मंगळूर |
| ३४ काननूर | ३५ तेलिचरी | ३६ माही |

| | | |
|---|---|---|
| ३७ कालिकोट | ३८ पुनानी | ३९ कोचीन |
| ४० कोलम | ४१ अंजनगो | ४२ त्रिवेंद्रम |
| ४३ कामोरीन | ४४ सीलोन. | |

## २ हिंद–पूर्वकिनारा, सीलोन ते सिंगापूर.

| | | |
|---|---|---|
| १ सीलोन | २ नागापट्टण | ३ कारीकल |
| ४ ट्रांकीबार | ५ पोर्टो नोव्हो | ६ कडलूर |
| ७ फोर्ट सेंट डेव्हिड | ८ वलुदवूर | ९ पांदिचेरी |
| १० फोर्ट सेंट जॉर्ज | ११ सेंट टॉमे | १२ मद्रास |
| १३ अड्यार | १४ मद्रास | १५ पुलिकत |
| १६ आर्मागांव | १७ निजामपट्टण | १८ मच्छलिपट्टण |
| १९ राजमहेंद्री | २० यनान | २१ कोकोनाडा |
| २२ पिठापूर | २३ विशाखापट्टण | २४ शिकाकोल |
| २५ गोपाळपूर | २६ गंजम. | २७ जगन्नाथपुरी |
| २८ हरिषपूर | २९ बालासोर | ३० चंदपूर |
| ३१ कलकत्ता | ३२ डाका | ३३ चित्तगांव |
| ३४ रंगून | ३५ मलाका | ३६ सिंगापूर |

## ३ आशिया–पूर्व किनारा, सिंगापूर ते बेहेरिंग.

| | | |
|---|---|---|
| १ सिंगापूर | २ सुमात्रा (राजधानी अचीन) | ३ बांका |
| ४ जावा ( राजधानी बेटाव्हिया ) | ५ बँटम् | ६ फ्लोरिस् |
| ७ तिमोर | ८ सेलिबीझ बेट (रा. मॅकॅसर) | ९ मोलक्का बेटें |
| १० टर्नेट | ११ टायडोर | १२ बांडा |
| १३ अंबोयना | १४ पुलवे | १५ पुलारून |
| १६ रोझंजीन | १७ न्यू गिनी | १८ फिलिपाइन बेटें |
| १९ कांतान | २० फोर्मोसा | २१ शांघाय |
| २२ कोरिया | २३ जपान बेटें | २४ बेहेरिंग. |

## ४ अमेरिका–पश्चिम किनारा, बेहेरिंग ते केप हॉर्न.

| | | |
|---|---|---|
| बेहेरिंग | २ हवाई ऊ. सँडविच बेटें ( होनोलुलु ) | ३ फीजी बेटें |
| न्यू झीलंड् | ५ पनामा | ६ केप हॉर्न. |

## ५ अमेरिका–पूर्व किनारा, ग्रीनलंड ते केप हॉर्न.

| | | |
|---|---|---|
| ग्रीनलंड | २ बॅफिन् बे | ३ डेव्हिस् स्ट्रेट. |
| हड्सन बे | ५ लॅब्रॅडॉर | ६ न्यू फाउंडलंड् |
| व्हर्जीनिया | ८ बहामा बेटें | ९ क्यूबा (रा. हावाना) |
| सेंट डॉमिंगो | ११ जमेका | १२ डेरिअन् |
| अमेझॉन | १४ ला प्लॅटा | १५ मॅगलन सामुद्रधुनी |
| | १६ केप हॉर्न. | |

## आफ्रिका–पूर्वकिनारा, कराचीपासून केप ऑफ गुडहोपपावेतों.

( इराणी अखात, आरबी समुद्र व तांबडा समुद्र धरून. )

| | | |
|---|---|---|
| १ कराची | २ ऑर्मझ | ३ गोंबरून |
| ४ बसरा (वर बगदाद) | ५ मस्कत | ६ सोकोट्रा |
| ७ एडन | ८ मोचा | ९ जिद्दा ( आंत मक्का ) |
| १० अकाबा | ११ सुवेझ | १२ मलिंद |
| १३ मोंबासा | १४ झांझीबार | १५ किल्वा |
| १६ डेलगॅडो केप | १७ मोझांबिक | १८ सोफाला |
| १९ आलगोआ | २० मॉरीशस ( पोर्ट लुई ) | २१ बुर्बो बेट |
| २२ मादागास्कर बेट | २३ नाताल | २४ केप ऑफ गुड् होप्. |